श्री.

# भरतखंडाचा अर्वाचीन कोश.



हा ग्रंथ

## रघुनाथ भास्कर गोडबोले

शालोपयोगी नवीन मराठी को-
शाचे व प्राचीन ऐतिहासिक
कोशाचे कर्त्ते, यानीं केला.तो

पुणें येथें

रा. रा. रावजी श्रीधर गोंधळेकर

यांच्या

जगद्हितेच्छु छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

ता० २५ मार्च १८८१ ई०

आवृत्ति पहिली.

किं० ५ रु० ट० ६ आणे.

शके १८०२




सन १८८१ इसवी.

सार्वभौम धर्म जेधवां कलींत ज्ञाहत
तेथपासुनीच काळ आजवेन्हिं पावल
ख्यात त्यांस होउनी सजीव कीर्ति शोभ
जे नृसिंह वत्कथांत रंगती भले भले।।

श्रीमच्छंकर सद्यतींद्र गुरुच्या शोधार्थ हे त्कृति॥
झाली तीसह साधुसंत गणिले राजे कवी जेकृती॥
आतां हींत जरी अनार्य असती आले तरी षहा॥
नाहीं, गुंज सुवर्ण तुल्य तुळतां मोल्यें सुवर्णाचहा॥२

श्री.

# प्रस्तावना.

पूर्वीच्या प्राचीन ऐतिहासिक कोशाप्रमाणेंच, भरतखंडाचा अर्वाचीन कोश लिहावा असें मनांत आणून तो हल्लीं आह्मीं तयार केला आहे. अगदीं पहिला जो स्वायंभुवमनु त्यापासून कौरव पांडवांचें युद्ध होई पर्यंतच्या काळास,आम्हीं पूर्वीच्या कोशांत प्राचीन मानिलें असल्यामुळें, युधिष्ठिरास राज्याभिषेक होऊन, त्याचा शक चालू झाल्यापासून जो आलीकडचा काळ, त्याची आह्मी अर्वाचीनांत गणना केली आहे.

या अर्वाचीन काळांत भरतखंडामध्यें जे श्रीमच्छंकराचार्यप्रभृति सत्पवक्ते व महात्मे असे ईश्वरपरायण पुरुष होऊन गेले; म्हणजे ज्यांनीं आपल्या आयुष्याचा सद्व्यय करून लोककल्याणा करितां अनेक प्रयत्न केले, व त्यांस सन्मार्गास लाविलें, यांचीं मात्र नांवें या ग्रंथांत लिहावीत असें आह्मी प्रथम मनांत आणिलें होतें; परंतु तो आमचा बेत आमच्या कित्येक सूज्ञ मित्रांच्या सूचने वरून आह्मांस वाढवावा लागल्या मुळें, हल्लीं यांत इतरांचींहीं नांवें आह्मी दाखल केलीं आहेत.

येथें आह्मी यांचीं ज्यांचीं नांवें लिहिलीं आहेत ते जातीचे कोण होते, कधीं जन्मले व समाप्त झाले, त्यांनीं कोणकोणते ग्रंथ कोणकोणत्या भाषांतून लिहिले, तशींच त्यानीं विशेष कृत्यें कोणतीं केलीं, त्यांच्या जन्मभूमि कोणत्या व कोठें होत्या आणि त्यांचीं नांवें पहिलीं असलेलीं तींच आहेत कीं बदललीं आहेत, इत्यादि गोष्टींचा आमच्यानें करवला तितका शोध करून व तो सांपडला तितका यांत सामील करून हें काम आम्हीं चालू काळा पावेतों आणून पोहोंचविलें आहे.

शोधा अंतीं असें कळून आलें आहे कीं, भरतखंडामध्यें द्वापरयुगाच्या समासीस भरतशक[1] [illegible]त होता. व तो [illegible] वर्षें चालला होता. पुढें कलीच्या आरंभास युधिष्ठिरशक[2] [illegible] झाला व तो ३०४४ वर्षें चालला. त्या पुढें विक्रम संवत् १३५

---

१- हा भरत राजा दुष्यं[illegible]चा पुत्र समजावा. भरतखंड हें नांव ज्याच्या नांवानें चालू झालें तो समजूं नये. या विषयीं आमच्या प्राचीन कोशांतील (भरत) श. पहा. २- युधिष्ठिर शकामागून विक्रम आणि शालिवा० यांचे शक जे चालू झाले त्याच प्रमाणें सप्तर्षींचा शक व परशुराम शक हेही दोन शक चालू झाले. यांतून पा[illegible] काश्मिर व दुसरा मलबार येथें हल्लीं चालत आहे. व तो तेथल्याच प्रांतीं आहे.

वर्षे चालून नर्मदेच्या दक्षिणेस शालिवाहन शक चालू झाला त्याचें आज १८०२रें वर्ष आहे. आणि त्यावरून असें समजून येतें कीं, आज कलियुग गत होऊन त्याचीं ४९८१ वर्षे झालीं आहेत.

युधिष्ठिरशकाच्या आरंभाविषयीं दोन मतें आहेत. त्यांतील पहिलें हें कीं, भरत शकाचें ८९१वें वर्ष आरंभून प्रभव संवत्सर चालू होतां तों, तेंच वर्ष युधिष्ठिरानें आपल्या शकाचें पहिलें ठरविलें. कारण त्यास त्याच वर्षी राजसूययज्ञांत ऋषींनीं राज्याभिषेक केला होता. दुसरें मत असें कीं, त्यानें प्रभवसंवत्सरापासून आपला शक चालू केला खरा; परंतु दुर्योधनानें त्यास कपटानें १२ वर्षे अरण्यवास व एक वर्ष अज्ञातवास करायास लावून त्याचा शक बंद पाडिला. त्यामुळें तेराव्या वर्षी त्यानें परत येऊन व सर्व कौरवांस मारून, चौदाव्या वर्षी विक्रम संवत्सरापासून पुनः आपला शक चालू केला. ह्या मतभेदामुळें, त्या त्या मताच्या जैन वगैरे पंडितांनीं ऐतिहासिक वृत्तांत लिहितां, जे जे संवत्सर जागोजाग लिहिले आहेत, त्या दोहोंत तेरा वर्षांचा फेर आढळतो. त्याचें कारण हेंच होय. या विषयीं वाचकांनीं चार्वाक व बुद्ध यांचे संवत्सर पडून पाहिल्यास ही गोष्ट त्यांच्या ध्यानांत तेव्हांच येईल. अस्तु. परंतु वरील १३ वर्षे कोणत्या शकांत धरावीत त्यांचा विचार पाहूं गेल्यास सरळ मार्गानें आमचें मत असें आहे कीं, ज्याअर्थी भारती युद्ध कलियुगांत झालें नाहीं, त्याअर्थी वरी वर्षे भरत शकांतच मोजणें योग्य आहेत.

बौद्ध व जैन पंडितांनीं, आप आपल्या ग्रंथांतून जे प्राचीन काळचे शककर्ते राजे वर्णिले आहेत, त्यांत यौवनाश्व, रघु, मरुत्त इत्यादिक सूर्यवंशी आणि शशबिंदु, अजमीढ भरत आदिकरून सोमवंशी अनेक जे आहेत. परंतु युधिष्ठिर शकापूर्वीचा शककर्ता भरतराजा व त्याचा शकारंभ संवत्सर ईश्वर, ह्याजसा आम्हांस स्पष्ट आढळला आहे तसा भरत शकापूर्वीचा शककर्ता मरुत्तराजा व त्याचा शकारंभ संवत्सर चित्रभानु, एवढा मात्र त्यांत आढळला आहे. आणि तेवढ्या वरून तूर्त असें कळून आलें आहे कीं, मरुत्त शक ७५५५ वर्षे त्यापुढें भरतशक ९०३ वर्षे आणि वर लिहिलेलीं गत कलियुगाचीं ४९८१ वर्षे मिळून एकंदर १३४३९ वर्षे होतात. येथपर्यंत हा भरतखंड जसा स्वतंत्रपणानें स्थित आहे असाच सृष्टीच्या उत्पत्तीपासून मरुत्तशकारंभापर्यंतही बिन-

१- सृष्टि उत्पन्न होऊन सुमारें ६००० वर्षे झालीं आहेत असें पश्चिमेकडील लोकांचें मत-

धोक होता, असें ह्मणण्यास कांहींच हरकत दिसत नाहीं.

वर जी आह्मी भरतखंडाची स्वयंत्र स्थिति असल्याचें लिहिलें, तें केवळ देश व काळ यांसच अनुलक्षून लिहिलें. धर्मास अनुलक्षून लिहिलें नाहीं. आणि तें तर लिहिणें अवश्य आहे; कारण, अनादि काळापासून चालत आलेल्या वैदिक धर्मांत, चालू कलियुगाच्या सातव्या शतकांतील उत्तरार्धापासून चार्वाक प्रथम धरून, तहत शेवटीं आजच्या समाज त्रयी पर्यंत, जी त्या संबंधानें येथें धामधूम उडून गोंधळ झाला आहे, तो अतिशय दुःखकारक आहे.

स्वायंभुवमनूपासून थेट आजच्या चालू वैवस्वत मन्वंतराच्या २८ व्या चौकडींतील कलियुगा पर्यंत, येथें जे जे राजे त्यांच्या त्यांच्या वंशांत होऊन गेले, ते ते सर्व वैदिक धर्मनिष्ठ म्हणजे वर्णाश्रमधर्ममर्यादा पाळणारेच होऊन गेले, असें भारतादिक ग्रंथां वरून व बौद्ध जैन यांच्या इतिहासावरून समजून येतें. म्हणून, वैदिक धर्म हा अत्यंत प्राचीन असून त्या वेदास अनुसरून असणारीं स्मृतिपुराणें त्यांतील धर्मही तसेच आहेत. अर्थात्, बौद्धादिक नास्तिक मतें व त्यांतील धर्म त्यां मागचे म्हणण्यास कोणत्याही प्रकारें प्रत्यवाय दिसत नाहीं.

बौद्धमत वैदिक धर्माच्या जरी मागचें आहे, तरी तें लपून छपून बरेंच प्राचीन असल्याचें वाल्मीकिरामायणा वरून दिसून येतें. त्या मतांतील लोकांच्या मनांतून अहिंसाधर्मभिषानें यज्ञ बंद पाडावेत असें तेव्हां पासून असतांही, त्याकाळचे राजे व ऋषि त्यांच्या पुढें त्यांचा कांहीं उपाय चालेना. त्या मुळें तो ग्रह, ही संधि केव्हां येईल तिची मार्गप्रतीक्षा करीत असतां, गेल्या द्वापर युगाच्या अंतीं भारती युद्धांत प्रायः सर्व राजे नाश पावले. तसेच ऋषीही अदृश्य झाले. असें पाहतांच चार्वाकाच्या व क्षपणकाच्या रूपानें प्रगट झाला. आणि त्यानें ईश्वर नाहीं, परलोक नाहीं इत्यादि प्रकारचें नास्तिक शास्त्र प्रवृत्त करून, लोकांस यज्ञकर्मापासून परावृत्त केलें असें वृत्त त्यांच्याच ग्रंथावरून दिसून येतें.

ही नास्तिक मताच्या आघाडीची चार्वाक क्षपणकरूप जोडी, युधिष्ठिरश-

---

आहे; तें, ही वरील वैदिक काळा पैकीं लहानशी संख्या पाहून डळमळेल यांत संशय नाहीं; व तेणें करून त्यांस वाईट वाटेल हेंही खरें; परंतु या गोष्टीस आमचा उपाय नाहीं. कारण आम्हांस जें आटळून आलें तें न लिहिणें रास्त नाही

काच्या साहाशें साठाव्या वर्षाच्या सुमारास प्रगट झाल्यावर, मागून बुद्ध व अर्हत क्रमानेंच उत्पन्न झाले. त्यांनीं जरी त्यांच्या मताचें खंडन केल्याचें व ईश्वर आणि परलोक आहेत असें मानल्याचें जैन ग्रंथावरून दिसतें. तरी वेद हे पौरुष होत हा जो त्यांचा सिद्धांत, तो त्यांनीं जीवा पलीकडचा समजून, अहिंसा धर्मं मिषानें कर्मकांड बंद पाडलें. तें इतकें कीं, तो शब्द थोड्याच काळांत कानांनीं मात्र ऐकावा. अशी दशा त्यास येऊन पोंचली. अर्थात् ज्ञानकांडही त्याच पंथास लागून राहिलें होतें.

या प्रमाणें कर्म आणि ज्ञान या दोहोंचा ऱ्हास करून, बौद्ध व जैन आपला तृतीय पंथ विस्तृत करीत, सर्व भरतखंडांत सुमारें दीड हजार वर्षें पर्यंत एकसारखी धुमश्चक्री उडवीत असतां, त्याच संधींत वैदिक लोक मध्यम कांडास (उपासना कांडास) अनुसरले. परंतु तें मध्यमकांड आगमोक्त व श्रुतिविरुद्ध असल्यामुळें, एकंदरींत सर्व गोंधळच होऊन गेला असें पाहून, स्वामी कार्तिक, ब्रह्मदेव आणि इंद्र, हे तिघे ईश्वराज्ञेनें प्रथम पृथिवीवर पुढें आले व त्यानीं कुमारिलभट्ट, मंडनमिश्र व सुधन्वा, या नांवानीं अवतीर्ण होऊन, तशीच कर्मकांडाची पूर्ववत् स्थापना करून, बौद्ध व जैन यांचा अगदीं धुवा धुवा उडवून दिला.

असें जरी झालें, तरी कर्मकांड ज्ञानांगत्वानें चालावें हें योग्य असतां, तें प्राधान्यानेंच चालू झालें. व वेदविरुद्ध अनेक उपासना प्रवृत्त झालेल्याही तशाच राहिल्या असें पाहून, स्वतः ईश्वर शंकराचार्य या नांवानें पृथिवीवर आला. व त्यानें शैव, शाक्त, वैष्णव, गाणपत्य आणि सौर, इत्यादिकांचीं आगमोक्त मतें खंडित करून व मंडन मिश्राचीही खोड जिरवून, श्रुतिप्रतिपाद्य कर्म, उपासना व ज्ञान, यांची यथायुक्त स्थापना केली. व आपलें मत शुद्धाद्वैत अशा नांवानें सर्वत्र चालू केलें.

शंकराचार्य हे बादरायण व्यास मुनीच्या शिष्य परंपरेंतील चौथे पुरुष होते. व त्यांचें शुद्धाद्वैत मतही त्यांच्या मनोभिप्रायास तिळभर सुटून नव्हतें. असें पाहून सर्व देशांतील सर्व महान् महान् विद्वान् व विचारवान् पंडितांनीं, तसीच साक्षात्कारी भगवद्भक्तांनीं त्यास अनेक प्रकारांनीं पुष्टी दिली. असें असतां, विष्णुस्वामी, रामानुजाचार्य, मध्वाचार्य आणि वल्लभाचार्य, या चौघांनीं, आचार्यांनीं खंडित केलेल्या आगमोक्त मताकडेसच पुनः वक्री अवलोकन करून, मा-

नव्यान त्याचेंच चर्वित चर्वण केलें त्याचें अतिशय आश्चर्य वाटतें. आतां जरी यांच्या ह्या कृतीपासून शुद्धाद्वैतास कांहीं अपाय झाला नाहीं व होणारही नाहीं, तरी बदरी केदारापासून कुमारी पर्यंत, व सिंधुनदीपासून ब्रह्मपुत्रा नदीपर्यंत, या विस्तीर्ण प्रदेशांत धर्मसंबंधानें जें ऐतें उत्कृष्ट ऐक्य झालें होतें, तें चार ठिकाणीं विभागलें गेल्यानें निर्बळ झालें ही गोष्ट मोठीच शोचनीय जाहली.

पण एवढ्याच शोक करीत बसणें आमच्या देशबांधवांच्या कपाळीं कोठें आहे? तर "दुःखावर डाग" किंवा "ओझ्यावर उपराळा," या म्हणी प्रमाणें स्वामीनारायणपंथ, नानकपंथ, मानभावपंथ, लिंगाईत पंथ इत्यादिकांनीं, व प्रस्तुतच्या समाजत्रयीनें; त्यांस इतकें बेजार केलें आहे कीं, ईश्वरा, नको नको हा त्रास असें सुद्धां ते म्हणूं लागले आहेत.

खरोखर जर पाहिलें, तर अधिकारा वांचून वैदिक धर्मात आपल्या मनःकल्पित तर्कानें निष्कारण ढवळा ढवळ करून, लोकांस आपणाकडे वळवून घेणें, या सारखें पाजीपणाचें दुसरें कोणतेंच काम नाहीं. हा अधिकार वास्तविक म्हटला म्हणजे, ईश्वरी नियमाप्रमाणें ज्या चौकडींत जे व्यास होतात त्यांचाच आहे. म्हणून कृष्णद्वैपायनांनीं (चालू चौकडींतील व्यासांनीं) जी व्यवस्था केली आहे ती सर्वांस निमुटपणानें पाळणें भाग आहे. वेदामध्यें कर्म आणि उपासना परमेश्वरार्पण बुद्धीनें केली असतां, त्यांपासून क्रमानेंच चित्त शुद्धि व चित्तस्थैर्य प्राप्त होऊन ब्रह्मस्वरूप ज्ञानाचा अधिकार येतो, व त्या ज्ञानानें प्राणी हा निरतिशय सुखरूप होतो, असें सांगितलेलें रहस्य पूर्णपणें जाणून, व्यासांनीं ज्ञान (ज्ञानकांड) श्रेष्ठ होय असें सांगितलें आहे, व तें ज्ञान वेदांचा शेवटचा भाग असल्या मुळें त्यास वेदांत हें नांव दिलें आहे, असें असतां, कर्मास किंवा उपासनेस वेदांत हें नांव नसतां, तें त्याच्या ठिकाणीं बळें मानून तेणें करूनच मोक्ष आहे, असें आपल्याच बुद्धीनें निश्चित करणें व लोकांस तसाच उपदेश करणें, हा केवढा फाजीलपणा व चूक आहे बरें? ही चूक व्यासांच्या परंपरा शिष्य शंकराचार्यांकडून मात्र अगदीं झाली नाहीं. आणि या-

१:– पुणें येथें ज्या सालीं पुनर्विवाह प्रकरण उपस्थित होऊन ब्राम्हण्यांत अतिशय घोटाळा होण्याचा प्रसंग आला. त्या वेळीं त्याचें खंडन करण्या करितां विष्णुस्वामि प्रभृतींकडील अधिकाऱ्यांपैकीं कोणी एक तरी आला होता काय? शंकराचार्यांचे मात्र अधिकारी आले होते. तेव्हां सर्व साधारण कार्य जें ब्राम्हण्य संरक्षण, तेथें सुद्धां ज्यांची शंकराचार्यांशी इतकी फूट, त्यांचें इतर कामांत त्यांशीं ऐक्य कोठून असेल! म्हणून ही गोष्ट शोचनीय खरी असें म्हटल्या वांचुन उपाय नाहीं.

च कारणास्तव शांकर शब्द हें ताशिवाय, चार्वाकापासून समाजत्रयीपर्यंत जेव-ढीं म्हणून मतें व धर्म आहेत, त्यांस धर्म कोण म्हणत असतील ते म्हणोत. परंतु तत्ववेत्ते त्यांस धर्माभासच ह्मणतात.

अस्तु. हा जो विषय आम्हीं बोललों तो जरी अप्रासंगिक नाहीं. तरी तो बराच लांबल्यामुळें त्याचा उपसंहार करून वाचकांस कळवितों कीं, कलियुगामध्यें, निष्पक्षपात बुद्धीनें व सत्य स्मरून ज्या महान् पुरुषानें ज्ञानकांडाचा उद्धार केला, तो पुरुष खरा खरा कधीं होऊन गेला त्याचा मुख्यत्वें करून कालनिर्णय व्हावा, त्या विषयींची उत्कंठा आम्हांस अतिशय उत्पन्न झाली. ह्मणून प्रथम आम्हीं दोन शंकरविजय आहेत ते चांगले मन लाऊन वाचले. त्यांत आमचा सामान्यतः इतकाच निर्णय ठरला कीं, या दोन्ही ग्रंथांतील शंकराचार्य खचित निरनिराळे आहेत. परंतु हा निर्णय आम्हास काईम करितां येईना. इतक्यांत शोध करतां करतां जैन ग्रंथाधारें तो निर्णय कायम ठरून, आमचा हेतु सिद्धीस गेला. सारांश, हा कोश तयार होण्यास हें वरील कारण मूळ असल्यामुळें, याच्या मुखपृष्ठावर याच अर्थाचें पद्य आह्मीं लिहिलें आहे असें वाचकांच्या लक्षांत येईलच.

हा कोश तयार करण्या साठीं आम्हांस जे जे ग्रंथ पाहावे लागले. त्यांचीं नांवें आम्हीं कोशारंभीं जी सांकेतिक शब्दांची परिभाषा दिली आहे ती वरून वाचकांस समजतीलच. म्हणून त्यांची पुनरुक्ति येथें करणें नको. दुसरें, या कोशांत जे शक जागोजाग आम्ही दाखविले आहेत. ते मुख्यत्वें करून शालिवाहनाचे आहेत. परंतु ते ज्या कोणांस विक्रम संवताच्या किंवा इसवी किंवा फसली सनाच्या रूपानें कळण्याची इच्छा असेल, त्यांनीं त्यांत क्रमानेंच १३५ व ७८ मिळवून फसली सना करितां वजा करावेत म्हणजे त्यांस इष्ट संवत् अथवा सन तत्काळ कळेल. आणखीं असें कीं, विक्रम संवताच्या व शालिवाहन शकाच्या कोणत्या वर्षीं कोणता संवत्सर होता, तो ज्यांस कळण्याची इच्छा असेल त्यांनीं, क्रमानें त्यांच्या त्यांच्या वर्षसंख्येंत ९ व १२ मिळवून त्या बेरजेस ६०नीं भागावें, आणि भागाकार होऊन जी बाकी राहील तेथपर्यंत, प्रभवापासून संवत्सर मोजल्यानें जें नांव येईल, तो तो त्याचा संवत्सर अनुक्रमानें समजावा.

या कोशांत ज्या ज्या गोष्टी आम्हीं लिहिल्या आहेत, त्या सर्व वर सांगितलेल्या ग्रंथाधारेंच लिहिल्या आहेत. व कित्येक वृद्धसंमत असून कित्येक

स्वतःच्या माहितीच्या आहेत. परंतु यांची जमवाजमव करतानां आम्हांस सर्व गोष्टी एकदम कळल्या नाहींत. तर आज एक व उद्या एक अशा कळत गेल्या. शिवाय माहिती जमविण्यांत आम्हांस जो त्रास झाला, त्याच्या योगानें मस्तक अगदीं बधिर होऊन गेलें, व तेणें करून या प्रथमावृत्तींत स्थलविशेषीं अगत्य लिहिण्याच्या गोष्टी बऱ्याच राहून गेल्या. त्यां बद्दल आमचे अत्यंत प्रियमित्र रा· रा· मोरेश्वर बळवंत फणशे यांनीं जें टिपण करून पाठविलें तें, व आम्हांसही जे प्रकार ध्यानांत आले ते, मिळून दोन्ही एकत्र करून व त्यांची एक पुरवणी बनवून, यास लगेच जोडिली आहे. इतकें करूनही यांत अजून कांहीं चूक राहिली नसेल असें आमच्यानें म्हणवत नाहीं. तथापि सुज्ञ वाचक तूर्त इकडे लक्ष्य न देतां, यांतील गुणाचाच आदर करतील असा पूर्ण भरंवसा जाणून, या कामीं ज्या गृहस्थांनीं आह्मांस साक्षात् साह्य दिलें त्यांचीं नांवें सांगून ही प्रस्तावना आह्मी पुरी करितों.

आमच्या साह्यकर्त्यांत आम्हांस पहिल्या प्रतीचें साह्य देणारे रावसाहेब श्रीकृष्णशास्त्री तळेकर होत. हे सरकारी विद्याखात्याकडे मराठी भाषेचे ट्रान्स्लेटर होते. काश्मिराकडील जेवढी माहिती यांत आहे तेवढी सर्व आम्हांस यांजकडून मिळाली. परंतु लिहिण्यास खेद होतो कीं, आमच्या ग्रंथाचे तीन अंक निघतात तोंच, यांस एका एकीं मृत्यूनें गांठिलें. मृत्यु हा तर सर्वत्रांस आहेच. व तो यथाकाळीं आल्यांत तादृश वाईटही वाटत नाहीं. पण यांचें तसें झालें नाहीं. असो. दुसऱ्या प्रतीचें साह्य देणारे रा· रा· विश्वनाथ पंत ऊर्फ भय्यासाहेब किबे होत. जैन ग्रंथांतील जेवढी माहिती यांत आहे तेवढींतील कांहीं अंश यांजकडून मिळाला. परंतु हे गृहस्थ एका तऱ्हेचेच असल्या कारणानें, तेवढी मिळविण्यांतही आम्हांस यांकडून जो कित्येक प्रकारचा त्रास सोसावा लागला तो सांगतां पुरवत नाहीं. म्हणून यांच्या बद्दल कांहीं विशेष लिहिण्यास आमचें मन घेत नाहीं. तिसऱ्या प्रतीचें साह्य देणारे वे॰ शा॰ सं॰ वामन एकनाथ शास्त्री केमकर व विठ्ठलदाजी शास्त्री धारूरकर हे उभयतां होत. यांनीं दिलेलें साह्य जरी फार मोठें नाहीं, तरी जें दिलें तें त्यांनीं मनःपूर्वक दिलें; हें सांगण्यास आम्हांस फार संतोष वाटतो. आणि त्या कारणानें एकंदरींत या सर्वांचे आम्ही फार आभार मानितों.

ऐतिहासिक कोश या नांवाच्या संबंधानें पाहतां, प्राचीन कोशाचा हा दुस-

रा भाग आहे असें ह्मणण्यास चिंता नाहीं. म्हणून प्राचीन कोश पुराणादिकांतील भानगडींची समजूत पाडण्यास जसा उपयोगी आहे, तसाच हाही आहे. किंबहुना ज्यास्त उपयुक्त आहे, म्हटलें तरी चालेल. कारण जुन्या गोष्टींहून नव्यांची अभिरुचि लोकांस अधिक असणें सांहजीक आहे. आतां याचा उपयोग लोकांस कितपत होईल हें जरी आह्मांस सांगतां येणार नाहीं, तरी नाटकें व कल्पित कादंबऱ्या यांहून याचा उपयोग त्यांस फार होईल असें आम्हांस वाटतें. परंतु आम्हांस वाटतें तेंच लोकांस वाटतें अगर वाटेल हा जरी नेम नाहीं, तरी पुष्कळ सुज्ञ लोकांच्या मतें याचा उपयोग फार आहे, असें आम्हांस दिसून आल्या कारणानें, आमचे देशबांधव या कामीं अलक्ष करणार नाहींत असें जाणून, आतां येथून पुढें स्वस्थ विश्रांति घेण्या विषयीं आम्ही त्यांचा निरोप घेतों.

रघुनाथ भास्कर गोडबोले.
शा·म·को·व प्रा·ऐ·को·यांचे कर्ते.

श्री.

# या ग्रंथांतील सांकेतिक शब्दांची परिभाषा.

**अ०**— अध्याय.

**आनं० गि० शंक० वि०**— आनंदगिरीचा शंकरविजय संस्कृत.

**आर्यवि० सु०**— आर्यविद्या सुधाकर संस्कृत यज्ञेश्वर भट्टकृत.

**उत्त० सू०**— उत्तराध्ययन सूत्रवृत्ति संस्कृत जैन० मताचा ग्रंथ.

**उ० अ०**— उत्तर अक्षांश.

**कविच०**— कविचरित्र मराठी.

**काव्यदो० गुज०**— काव्यदोहन गुजराथी (मि० दलपतराम डाह्याभाई कृत.)

**कालि० नि०**— कालिदासाचा निबंध (मि० विष्णुकृष्ण चिपळुणकर कृत.) मराठी.

**ग्यारे० को०**— ग्यारेट साहेबांचा इंग्रजी कोश.

**तुका० गाथा**— तुकारामाचा गाथा मराठी.

**दंडि० नि०**— दंडीचा निबंध मराठी (चिप० कृत)

**द्र० भा०**— द्रविडभाषा.

**नव०**— नवनीत मराठी (रा० परशुरामपंत तात्या गोडबोले कृत.)

**नाथली०**— नाथलीलामृत ओंवीबद्ध मराठी (भैरवनाथ कृत).

**नाभा० भक्त०**— नाभाजीची भक्तमाला हिंदु०

**नि० मा०**— निबंधमाला (मि० चिपळु० कृत).

**पू० रे०**— पूर्वरेखांश.

**प्रक०**— प्रकरण.

**प्रव० शारो०**— प्रवचन शारोद्धार गुजराथी जैन मताचा ग्रंथ.

**प्रा० ऐति० को०**— प्राचीन ऐतिहासिक कोश मराठी (स्वकृत).

**प्रा० हिंदु० न०**— प्राचीन हिंदुस्थानाचा नकाशा इंग्रजी (हेन्री कीपर्ट कृत).

**बाण० नि०**— बाणभट्टाचा निबंध मराठी (मि० चिपळुणकर कृत).

**बूल्हर० का० शो०**— बूल्हर साहेबांचा काश्मीराकडील कवि वगैरे विषयींचा शोध. इंग्रजी.

**भक्तवि०**— भक्तविजय ओंवीबद्ध मराठी (महीपति बावा कृत).

**भव० नि०**— भवभूतीचा निबंध मराठी (मि० चिपळुणकर कृत).

**भोज०**— भोजप्रबंध संस्कृत (बल्लाळमिश्रकृत).

**महा० व कर्ना० इति०**— महाराष्ट्र व कर्नाटक प्रांताचा इतिहास (मि० बाळाजी प्रभाकर मोडक कृत).

**मांडे शा०**— मांडे यांची शकावली.

**माध० शंक० वि०**— माधवाचार्यकृत शंकरविजय संस्कृत.

**राजमा०**— राजमालिका मराठी (नीलकंठ लक्ष्मण सर मुकदम कृत).

**रामदा० च०**— रामदास चरित्र मराठी.

**ललित वि०**— ललित विस्तर संस्कृत (जैन ग्रंथ).

**वृद्धमा०**— वृद्ध माहिती तोंडची.

**श०प०**— शब्द पहा.

**सर्वद०सं०**— सर्वदर्शन संग्रह संस्कृत (सायण माधवकृत)

**सरलाप्र०**— सरला प्रस्तावना संस्कृत (प्रोफेसर तारानाथ तर्कवाचस्पतिकृत.)

**संक्षे० जि० वि०**— संक्षेप जिन विजय जैन ग्रंथ (कल्याण कीर्तिकृत).

**सु०**— सुमारें.

**सुबं० नि०**— सुबंधूचा निबंध (मि० विप० कृत)

**हिंदु० हस्त० इति०**— हिंदुस्थानाचा हस्तलिखित इतिहास.

**हिंदुस्थां० छा० इति०**— हिंदुस्थानाचा छापील इतिहास.



# भरतखंडाचा अर्वाचीन कोश.

**अकनिष्ठ—** बौद्धमताचा एक साधु. हा २४ तीर्थकरांतील एकाचा संप्रदायी होता. या शिवाय याची माहिती दुसरी कांहीं सांपडली नाहीं.

**अकंपित—** महावीर नांवाच्या चोविसाव्या तीर्थकराचा शिष्य. यास होऊन गेल्यास २४०५ वर्षे झालीं आहेत. ( महावीर श० ) पहा.

**अकबर—** दुसऱ्या हुमायून बादशाहाच्या मागून दिल्लीतील बादशाही तक्तावर झालेला बादशाहा. याचें जन्म शालिवाहन शकाच्या १४६४ व्या वर्षी शुभकृत नामक संवत्सरीं झालें, व यास बादशाहीचा अधिकार यांच्या वयाच्या चौदाव्या वर्षी म्हणजे शके १४७८ मध्यें प्राप्त झाला. हा स्वतः विद्वान्, नीतिमान्, आणि विद्यावृद्धि करण्या विषयीं मोठा शौकी होता. असें सांगतात कीं, मुसलमानी धर्मांत सुंता म्हणून जो एक धर्मसंस्कार करावा लागतो, तो यानें आपणास मुळींच करून घेतला नव्हता इतकेंच केवळ नव्हे, तर आपल्या सर्व राज्यांत असा एकसहा हुकूम फरमाविला होता कीं, कोणाचाही मुसलमानाचा मुलगा असो, तो चांगला समजुतीत आल्या शिवाय त्याची सुंता कोणी करूं नये. सारांश, या हुकुमा वरून काजी लोक याच्या विषयीं अतिशय कुरकुर करीत, व हा नास्तिक आहे म्हणून याची मनांतल्या मनांत निंदाही करीत. अकबरानें आपला राज्यकारभार चांगला चालावा म्हणून फैजी, अबुफजल, खानखान, आणि बीरबल, असे चौघे विद्वान् व बुद्धिवान् प्रधान पदरीं बाळगले होते. यांत तिघे मुसलमान व चौथा ब्राह्मण होता. लोकांत ज्या बादशाहा बिरबलांच्या गोष्टी सांगतात ते उभयतां हेच होते. यां शिवाय जगन्नाथराय पंडित, तानसेन गवई, लुक्मान हकीम, गंगभाट, व चतुरसाबाजी इत्यादिक गुणी मनुष्येंही याच्या पदरीं पुष्कळ होतीं.

अकबरानें जोतपुर व जयपुर येथील राजांच्या कन्यांशीं विवाह केले होते, ही गोष्ट प्रसिद्ध आहेच. त्यांतील एकीची अतिरूपवान् कन्या लवंगी होती. व तीच जगन्नाथराय पंडितास यानें प्रसन्न होऊन लग्न करून दिली होती. शिवाय मुसलमान जातीच्याही स्त्रिया यास होत्या व त्यांतील एकीचा मुलगा सेलीम अथवा जहानगीर तोच याच्या मागें बादशाहा झाला.

दिल्लीच्या गादीवर जे जे बादशाहा होऊन गेले, त्यांत या सारखा न्यायी व निष्पक्षपाती बादशाहा झालाच नाहीं असें आबालवृद्धांच्या मुखीं अजून आहे; त्यावरून

हा चांगलाच होऊन गेला असें दिसून येतें. यानें ४९ वर्षे पर्यंत शांततेनें राज्य करून वयाच्या ६३ व्या वर्षी ह्मणजे शालिवाहन शके १५२७ विश्वावसुनामक संवत्सरीं परलोकवास केला. (हिंदु० हस्त० इति०)

**अकालीलोक**— शीख लोकांची एक शाखा. ह्यांच्या मधील लोक नानकानें स्थापिलेल्या धर्माचे मोठे अभिमानी असतात, व आपणास ईश्वराचे शिपायी आहों असें ह्मणवितात. यांचा पोशाक निळ्या रंगाचा असतो, व हे आपणापाशीं नेहेमीं हत्यारें बाळगतात. नानकाच्या गादीवर बसलेल्या गुरु गोविंदशिंगाचे नियम हे विशेषें करून पाळतात. एकदां हे लोक बिथरून अमृतसर शहराचे संरक्षक झाले असतां, यांस ताळ्यावर आणण्यास रणजितशिंगास मोठे आयास पडले असें ह्मणतात. सारांश, हे लोक अतिशय कडवे आहेत. (ग्यारे० को०).

**अंकुशी**— जैन लोकांच्या चोवीस देवतींतील एक.

**अकोट**— विजापुर तालुक्यांतील आनंदतनय कवीचा मूळ गांव. (वृत्त मा०)

**अक्कलकोट**— हें एक लहानसें संस्थान व शहर आहे. सोलापुराच्या पूर्वेस हें सुमारें दाहा कोसांवर असून येथील राजा मराठा आहे. शाहू राजा दिल्लीहून साताऱ्यास येत असतां शालिवाहन शके १६३० मध्यें जें त्याचें ताराबाईशीं युद्ध झालें, त्या वेळीं कोणी एका मराठ्याच्या बाईनें दंग्याच्या भीतीमुळें आपलें तान्हें मूल शाहू राजाच्या पायांवर आणून टाकिलें, व आपण पळून गेली. त्याच मुलाचें शाहूनें पालन करून, व लढाईंत त्याची फत्ते झाल्या मुळें त्यास फत्तेशिंग नांव देऊन, अक्कलकोटचा राजा केलें. फत्तेशिंगानेंही आपण शाहूचा पाळींव पुत्र अशा नात्यानें आपणास भोंसला उपनांवाचा ह्मणविलें. (हिंदु० छा० इति०)

**अक्कलकोटचे स्वामी**— रामभारती हा शब्द पहा.

**अंग**— जैन लोकांचें बारा भागांचें एक धर्मपुस्तक.

**अगडशाहा**— नानकाच्या मागून शके १४९२ मध्यें त्याच्या गादीवर बसलेला पहिला पुरुष. हा नानकाचा शिष्य होता, व यास जो पुढें गादी चालविणारा शिष्य मिळाला त्याचें नांव अमेरदास होतें. (हिंदु० छा० इति०).

**अंगदेश**— आमच्या प्राचीन कोशांत चतुर्थाचार्यौ जो अंगशब्द लिहिला आहे तोच हा देश होय. यास हल्लीं भागलपुर मांत असें ह्मणतात. याची प्राचीनकालीं राजधानी चंपा नांवाची नगरी होती; परंतु ती सांप्रत ओसाड असून ती जवळच जें भागलपुर शहर वसलें आहे, त्या वरूनच तिजविषयीं व्यवहार होत आहे.

**अगस्त्य**— सुमारें अडीच हजार वर्षां मागें हा एक कवि शूद्र ज्ञातींत जन्मला होता. पुराणप्रसिद्ध जो अगस्त्य ऋषि त्याचाच हा अवतार होय असें यास लोक समजतात. तामिळ भाषेचें व्याकरण प्रथमतः यानें रचिलें, म्हणून त्यास अगस्त्यव्याकरण असें नांव प्रसिद्ध आहे. न्याय, वैद्यक, रसायनशास्त्र इत्यादिकांवरही याचे ग्रंथ पुष्कळ आहेत असें म्हणतात. वर जो आम्ही याचा काळ दाखविला तो डॉक्टर कॉल्डवेल यांच्या मता प्रमाणें आहे. (ग्यारे० कोश.)

**अगस्त्यव्याकरण**— अगस्त्यकवीनें केलेलें तामिळ भाषेचें व्याकरण तें.

**अगाधशत्रु**— अज्ञातशत्रु शब्द पहा.

**अग्निकुमार**— वल्लभाचार्यांनीं केलेला ग्रंथ. हा संस्कृत भाषेंत आहे.

**अग्निमित्र**— दाहा शुंग अथवा शुंग राजांतील दुसरा. पुष्पमित्राचा पुत्र व सुज्येष्ठ राजाचा बाप. हा युधिष्ठिरशक सुमारें १८५० या वर्षीं होता. (राजमा०)

**अग्रदास**— हा सिद्धपुरुष नाभाजीचा गुरु होता.

**अग्रा शहर**— याचें जुनें नांव यमप्रस्थ. हें यमुनेच्या कांठीं भरतपुराच्या पूर्वेस व मथुरेच्या आग्नेयीस आहे. हें सुमारें उत्तर अक्षांश २८ व पूर्व रेखांश ७७ वर आहे. ताजमहाल नांवाची एक नामांकित इमारत ती येथेंच आहे.

**अचलबावा**— हा सिद्ध पुरुष जातीचा ब्राह्मण व पन्हाळा येथील प्रसिद्ध चिद्घनस्वामींचा गुरु होता. (तुडुमा०)

**अचलभ्रातृ**— जैनमती शेवटल्या महावीर नांवाच्या तीर्थंकराचा शिष्य. यास होऊन गेल्यास २४०५ वर्षें झालीं आहेत. (महावीर शब्द पहा).

**अचिरा**— शांति अथवा शांती नामक सोळाव्या तीर्थंकराची आई.

**अच्युतरावजी मोडक**— हा संस्कृत भाषेचा कवि नासीक येथील राहणारा, ज्ञातीचा कोंकणस्थ ब्राह्मण, व रघुनाथभट्टजी नामक नामांकित विद्वान् सिद्धपुरुषाचा शिष्य होता. याची कृष्णलीला इत्यादि वर्णनपर संस्कृत स्फुट कविता पुष्कळ व मोठी मनोवेधक आहे. नुकेच वारलेले त्र्यंबकराज बावा नासिककर गोसावी ते यांचेच शिष्य होते. व यांच्याच कवितेनें प्रख्यात्स आले. यांनीं हिरण्यकेशी ब्राम्हणां करितां केलेलें आन्हिक तेंही पुष्कळ प्रसिद्ध आहे. यांचें जन्म शालिवाहन शक सुमारें १७०० तहोऊन हे आपल्या वयाच्या ५५ व्या वर्षीं म्हणजे शके १७५५ मध्यें नासीक येथें मरण पावले असें लोक सांगतात.

**अच्युताश्रम**— सन्यासी होते. यांचें विशेष वृत्त कांहीं आढळत नाहीं.

**अजगरबावा**— सुमारें पन्नास वर्षां मागें हा एक पुरुष मोठा ब्रह्मनिष्ठ होऊन गेलेला जातीचा ब्राह्मण होता. याची स्थिति अशी सांगतात कीं, कोणी उठविल्यास उठावें, निजविल्यास पडून रहावें, जेऊं घातल्यास जेवावें वगैरे. त्या वरून कित्येक कुचाळ लोकांनीं एकदां याच्या डोईवर पेटलेल्या गोंवरीचें खांड ठेऊन ते निघून गेले. कांहीं वेळानें दुर्गंध सुटल्या वरून आजू बाजूच्या लोकांनीं येऊन पाहिलें तों बावांचें डोकें जळत असून ते स्वस्थ आहेत, हूं कीं चूं कांहीं करीत नाहींत. मग त्यानीं तें खांड काढिलें व औषधें लाऊन त्यांचें डोकें बरें केलें, असें पुण्यांतील वृद्धलोक सांगतात.

**अजंटाडोंगर**— हा तापी नदीच्या दक्षिणेस खानदेशांत आहे. या पासून याच नांवाची एक नदी निघते. या डोंगरांत एके ठिकाणीं बौद्धलोकांचीं कोरींव लेणीं आहेत. फरग्यूसन नामक इंग्लिश ग्रंथकारानें आपल्या शिल्पविद्येच्या इतिहासांत असें लिहिलें आहे कीं, हीं लेणीं एकंदर २६ आहेत, व तीं १९०० वर्षा पूर्वी कोरलेलीं आहेत. इंग्लिश लोक या लेण्यास अजंत्याचें लेणें म्हणतात, परंतु आपल्या लोकांत फरदापुरचें लेणें अशा नांवानें याची प्रसिद्धि आहे; कारण फरदापुर गांवांतून निघतांच लेण्याचा रस्ता लागतो.

**अजंटा नदी**— अजंटा डोंगरांतून निघालेली एक नदी ती.

**अजमीर**— या शहरास प्राचीन काळीं अंबावतीपुरी असें नांव होतें. हें मारवाडांत आहे. व याचे उत्तर अक्षांश सुमारें २६ व पूर्व रेखांश ७४ आहेत.

**अजयगड**— चेदी देशाची राजधानी जी शक्तिमती तिचें हल्लींचें हें नांव आहे. असें इंग्रजींत असलेल्या प्राचीन हिंदुस्थानाच्या नकाशा वरून समजून येते. या शहराचे उत्तर अक्षांश सुमारें २५ व पूर्व रेखांश ८१ आहेत.

**अजातशत्रु**— शिशुनाग वंशांतील पांचवा राजा. विधिसार अथवा बिंबिसार राजाचा पुत्र व दर्भक राजाचा बाप. हा सर्वार्थसिद्ध नांवाचा जो दुसरा बुद्ध त्याचा साक्षात् अनुयायी होता. त्यावरून हा होऊन गेल्यास आज सुमारें साडेतीन हजार वर्षे होऊन गेलीं आहेत. (ग्यारे० कोश०)

**अजित**— जैन लोकांच्या चोवीस तीर्थंकरांतील दुसरा. यास ते लोक दुसरा अर्हत असें मानितात. अर्थात् मूळ अर्हताच्या मागून हा झाला असें उघड सिद्ध होतें. जैन लोकांनीं उत्सर्पिणी म्हणजे उत्कृष्ट काल, आणि अवसर्पिणी म्हणजे निकृष्ट काल, असे जे कालाचे दोन भेद मानिले आहेत, त्यांतील दुसऱ्या काला पैकीं दुःखरूप जो सांप्रतचा पांचवा फेरा त्यांत हा जन्मला होता असें त्यांचें मत आहे. (प्रब० शारो०)

२– नववा तीर्थकर जो पुष्पदंत त्याचा एक सेवक.

**अजितापीड**— काश्मीर येथील राजा. कैयटाच्या वेळीं होता. ( कैयट शब्द ) पहा.

**अदमान्**— दद्द्र जातीय आंध्र अथवा आंध्रभृत्य राजांतील आठवा. हा मेघःस्वातीचा पुत्र, व अनिष्टकर्म्याचा बाप होता. हा असण्याचा काळ युधिष्ठिराच्या २१व्या शतकाच्या सुमाराचा खास आहे असें दिसून येतें. ( राजमा० ).

**अणुभाष्य**— वल्लभाचार्यकृत संस्कृत ग्रंथ.

**अंतःकरणप्रबोध**— संस्कृत भाषेंत असलेला वल्लभाचार्यकृत एक ग्रंथ.

**अंतरिक्ष**— सूर्यवंशीय राजांतील एक. हा पुष्कर अथवा किन्नराश्व राजाचा पुत्र,आणि सुतपा, सुषेण व सुमित्र या तिघांचा बाप. हा राजा दुसऱ्या बुद्धाचा नववा पूर्वज होता. ( राजमा० ) व जैन ग्रंथ.

**अंतर्ज्योति**— वेदांताचार्यकृत संस्कृत ग्रंथ.

**अंतर्भाव**— रामदासस्वामीकृत स्फुट ग्रंथांतील एक. याचे समास पांच आहेत, व हा मराठी भाषेंत ओंवीबद्ध आहे.

**अंतर्वेदी**— भागीरथी व यमुना या दोन नद्यांमधील जो दुआब अथवा दोयाब नांवाचा प्रदेश तो.

**अन्तालूरूपय्या**— तैलंगणांत होऊन गेलेला एक प्रख्यात कवि. याची कविता तैलंगभाषेंत चांगल्या प्रतीची व पुष्कळ आहे. कावेल्ली व्यंकट बोरय्या ह्मणून जो एक तैलंग ब्राह्मण मोठा प्रसिद्ध होऊन गेला तो या कवीच्या ग्रंथाचें अध्ययन केल्यानें होऊन गेला. ( कविच० ).

**अंतोबागोसावी**— समर्थ रामदास स्वामींचा शिष्य. सातारप्रांतांत मेथवड ह्मणून जो गांव आहे, तेथील हा राहणारा असे. समर्थांनीं यास पंढरी येथें आषाढी कार्तिकीस जात जावें ह्मणून आज्ञा करून त्यास तेथें एक मठ बांधून देवविला होता. असें सांगतात कीं, समर्थच या दोन्ही वाऱ्यांस कित्येक वर्षें जात असत, परंतु पुढें आपणास न बनल्यास यानें जात जावें असें सांगितल्या वरून हा जाऊं लागला. ( रा०च० )

**अथर्वणाचार्य**— हा तैलंग जातीचा ब्राह्मण कवि फार जुना आहे. सुमारें साडेतीन हजार वर्षां पूर्वीं हा होऊन गेल्या विषयीं लोकवार्ता दाट आहे. संस्कृत आणि तेलंगी या दोन्ही भाषा यास उत्कृष्ट येत होत्या. महाभारताच्या सारांशावर जो यानें तेलंगी भाषेंत ग्रंथ रचिला, तो तुटक तुटक अशा रीतीनें कांहीं कांहीं उपलब्ध आहे. यास प्रमाण असें आहे कीं, जे कवि याच्या मागून झाले त्यांच्या ग्रंथांत याच्या कवितेचा

पुष्कळ भाग त्यांनीं घेतलेला आढळतो. (कविच०)

**अदितिकुंडलाहरणनाटक—** कदंब कवीनें केलेलें संस्कृत भाषेंत नाटक आहेतें. यांत भौमासुरानें अदितीचीं हरण करून नेलेलीं कुंडलें कृष्णानें त्यास मारून परत आणून तिचीं तिला दिलीं, ही कथा आहे. (बुल्ह० का० शो०)

**अद्वयवादी—** अमरसिंहानें अमरकोशांत जीं बुद्धाचीं अनेक नांवें लिहिलीं आहेत त्यांतील तेरावें. आमच्या मतें अमरानें लिहिलेलीं नांवें दोन होऊन गेलेले जे नामांकित बुद्ध त्यांचीं आहेत. (शाक्यमुनिस्तुयः सशाक्य सिंहः) येथून असलेलीं सर्व कांहीं नांवें दुसऱ्या बुद्धाचीं स्पष्ट दिसून येतात, म्हणून आरंभीचीं नांवें निवळ मुख्यबुद्धाचींच असावींत असें आमचें अनुमान आहे. बुद्ध हा सर्व कांहीं दृश्य भास असत् मानणारा व त्यास आधारभूत सत्यवस्तु कांहीं नाहींच असें म्हणणारा अद्वयवादी होता.

**अद्वैत—** शब्दाद्वैत शब्द पहा.

**अद्वैतमकरंद—** हस्तामलकाचार्यकृत संस्कृत ग्रंथ. याजवर स्वयंप्रकाश स्वामीची टीका आहे.

**अद्वैतसरणी—** सिद्धेश्वर भट्ट कृत संस्कृत ग्रंथ. (सिद्धेश्वरभट्ट शब्द पहा).

**अद्वैतसिद्धांत—** आलसानी पेदन्ना यानें केलेला तेलंगी भाषेंत ग्रंथ.

**अद्वैतसिद्धि—** मधुसूदन सरस्वती कृत संस्कृत ग्रंथ.

**अद्वैतानंद—** हे नामांकित पुरुष श्रीक्षेत्र काशी येथें सन्यास घेतल्यावर रहात असत. हे मूळचे महाराष्ट्र ब्राम्हण मोठे विद्वान् होते. यांजवळ अध्ययन करण्यास पुष्कळ विद्यार्थी असत, म्हणून यांस काशींत गुरुस्वामि असें लोक म्हणत. शांकर वेदांत विषयावर यांचा ब्रह्मविद्याभरण नांवाचा उत्कृष्ट ग्रंथ आहे. सदानंदकृत जो वेदांतसार नामक ग्रंथ त्यावर यांची संस्कृत टीका आहे. मध्वमुनीश्वर व कटिबंधादिक कविता करणारा जो प्रसिद्ध अमृतराय तो असे दोघे यांचे शिष्य होते. हे कधीं जन्मले व मरणकाळीं यांचें वय किती होतें तें आम्हांस कोठें आढळलें नाहीं. परंतु शके १६८७ पार्थिवनामक संवत्सरीं हे काशींत समाधिस्थ झाले, हा शोध पक्का लागला आहे. (नृ० मा०)

**अधिकमासवर्णन—** केशवकविकृत गुजराथी भाषेंत. (गुज० काव्यदो०)

**अधिकरणमाला—** भारती तीर्थकृत शांकरसूत्र भाष्यावरील ग्रंथ.

**अनंगभीम—** कलिंग देशाचा राजा. यास लाडदेव असेंही दुसरें नांव होतें. यानें शके

१०९४ मध्यें जगन्नाथाचें देऊळ बांधिलें, अशा विषयींचा लेख त्या देवळांतील एका दगडी खांबावर कोरलेला आहे. अनंगरंग ग्रंथाचा कर्ता जो कल्याणमल्ल तो याच्या पदरीं होता. असें सांगतात कीं, यानें हा ग्रंथ कल्याणमल्लाकडून बुद्ध्या करविला. आणि जर ही गोष्ट खरी असेल, तर हा राजा मोठा विषयी होता असें ह्मटलें पाहिजे म्हणून कविचरित्रांत लिहिलें आहे. ( क० च० )

**अनंगरंग**— कल्याणमल्लानें केलेला कामशास्त्रविषयक संस्कृत ग्रंथ.

**अनघडशाहा**— हा एक नामांकित अवलिया फकीर होऊन गेला. याचा तकिया पुणें येथें भवानी पेठेंत आहे. या तकियांत असलेल्या विहिरींत रामेश्वरभट्ट नामक ब्राह्मणानें याच्या परवानगी वांचून एकदां स्नान केल्या वरून त्याच्या अंगाचा दाह झाला, व तो तुकारामाच्या अभंगांचा पाठ केल्यानें शांत झाला. ही गोष्ट यास कळल्यावर याला आश्चर्य वाटून यानें तुकारामाची भेट घेतली, व त्याशीं कांहीं संभाषण करून आनंदानें परत आला. या गोष्टी वरून हा तुकारामाच्या वेळेस होता असें उघड दिसून येतें. ( तुका० गाथा. )

**अनर्घ्यराघवनाटक**— मुरारि कवीनें केलेलें संस्कृत भाषेंत नाटक.

**अनंत**— जैन लोकांच्या चोवीस तीर्थकरांतील चोदावा.

**अनंतफंदी**[1]— नगर प्रांतांत संगमनेर म्हणून जो मोठा गांव आहे तेथील हा राहणारा होय. हा वाजसनी ब्राह्मण होता, व याचें गोत्र कौंडिन्य होतें. याच्या बापाचें नांव भवानी बावा, व आईचें नांव राऊबाई असून याचें आडनांव घोलप होतें. संगमनेरास मलीकफंदी म्हणून एक चमत्कारिक फकीर होता, त्याशीं याचा फार स्नेह असल्यामुळें लोकांनीं त्याचें फंदी हें उपपद यास जोडलें, व तेव्हां पासून यास असें नांव पडलें. याचें जन्म शके १६६६ रक्ताक्षिनामक संवत्सरीं झालें होतें, व हा मरण पावला त्या वेळेस ७५ वर्षांच्या वयाचा असून त्या वेळेस शालिवाहन शक १७४१ होता.

अनंतफंदी पूर्वीं तमाशे करीत हिंडत असे, व स्वतः रचलेल्या लावण्या तमाशांत ह्मणून पोऱ्यास नाचवीत असे. एकदां असें झालें कीं, अहल्याबाई होळकरीण संगमनेरास येऊन उतरली असतां तिला याचें वृत्त कळलें. त्या वरून तिनें यास बोलावून आणून सांगितलें कीं, जें कृत्य तुम्ही करतां तें ब्राह्मणास करणें योग्य नाहीं. तेव्हां पासून यानें तमाशा करण्याचें सोडून दिलें, व कथा करणें धरिलें.

---

१— अनंत फंदीचें सविस्तर वर्णन व त्याच्या लावण्या वगैरे कवितेचा संग्रह रा. शंकर तुकाराम शालिग्राम यांनीं एकत्र करून एक पुस्तक छापलें आहे त्यांत याची सर्व माहिती दिली आहे.

यांची कविता कटाव, फटके, लावण्या, व क्वचित् श्लोक, आर्या, आणि ओंव्या अशा प्रकारची असून, ती प्रायः सर्व मराठी भाषेंत आहे. ओंवीबद्ध असा यांचा एकच माधवग्रंथ मात्र आहे. अनंतफंदीस श्रीपतफंदी अथवा सवाईफंदी या नांवाचा एकच मुलगा होता, व तोही कवि होता. यांचे वंशज हल्लीं संगमनेरास आहेत. (नव०)

**अनंतभट्ट**— आनंदमूर्ति म्हणून समर्थ रामदास स्वामींच्या पंचायतनांत प्रसिद्ध पुरुष होते. त्यांचें मूळचें नांव. (रामदा०च०)

**अनंतराजा**— काश्मीर देशाचा राजा. हा शके ९५१ पासून ९८६ पर्यंत होता. (बुल०शो०)

**अनंतशयन**— त्रावणकोर येथील विष्णूचें स्थान. येथें चौदा हात लांबीची विष्णूची मूर्ति शेषावर निजलेली असल्या कारणानें या स्थळास हें नांव पडलें आहे. आनंदगिरीनें आपल्या शंकरविजयांत असें लिहिलें आहे कीं, भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्य येथें दिग्विजय करीत फिरत आले असतां, या स्थळीं देवदर्शन करून एक महिना पर्यंत राहिले होते, व येथें त्यांस उपनयनादि संस्कार हीन असे विष्णुशर्मादिक साहा प्रकारचे वैष्णव आढळले होते. त्या वरून आचार्यांनीं त्यांस बोध केला व पुनः ब्राह्मण्यांत आणिलें.

**अनंतानंदगिरि**— आनंदगिरि शब्द पहा.

**अनंतोपाध्याय**— हा विद्वान् ब्राह्मण पंढरपुर येथें राहात असे. प्रसिद्ध जे काशीनाथोपाध्याय (ऊर्फ बाबा पाध्ये) व विठ्ठलोपाध्याय (ऊर्फ तात्या पाध्ये) हे दोघे विद्वान् यांचे पुत्र होते.

**अनंभट्ट**— हा जातीचा तैलंग ब्राह्मण मोठा नय्यायिक होता. गरिकपाद जें तैलंगणांतील खेडे गांव, पूर्वीं निजाम अल्लीच्या अमला खालीं होतें, तेथें याचें जन्म झालें. शालिवाहनाच्या १५ व्या शतकांत चालुक्य राजांच्या वेळीं याचा उदय झाला. कौंडिण्यपुर ज्यास कोंडवीडू असें म्हणतात. तेथील संस्कृत शाळेंत हा बारा वर्षें राहून न्यायशास्त्र पढला, व त्या शास्त्राचें ज्ञान यानें उत्तम प्रकारचें संपादिलें.

पुढें यानें, नवीन अभ्यास करणाऱ्यांस न्यायशास्त्रांतील पदार्थ व सिद्धांत, थोडक्यांत कळावे या हेतूनें एक लहानसा तर्कसंग्रह नांवाचा ग्रंथ रचिला. तो हल्लीं सर्वत्र प्रख्यात असून, न्यायशास्त्राचे प्रथमाभ्यासी पहिल्यानें तोच पढत असतात.

यानें तर्कसंग्रह ग्रंथ केल्यावर न्यायशास्त्र पढविण्या साठीं एक स्वतःचें विद्यालय स्थापिलें. आणि तेथें आपल्या शिष्यांस तर्कसंग्रह, तर्कदीपिका, मुक्तावली, आणि गदाधरी, अशा क्रमानें त्या ग्रंथांचे पाठ दिले. या प्रमाणें याचा क्रम बहुत

दिवस चालल्यानें याचे विद्यार्थी त्या शास्त्रांत उत्कृष्ट प्रवीण झाले.

अनंभट्ट सुमारें आपल्या वयाच्या ५५ व्या वर्षी श्रीशैल मल्लिकार्जुनाच्या दर्शनास गेला. या शिवाय यानें कोणताही प्रवास कधींच केला नाहीं. फार तर काय, पण द्रव्याच्या आशेनेंही हा कोणा राजाच्या भेटीस कधीं गेला नाहीं. कारण, तो सर्वदां संतोषवृत्तीचा असल्या मुळें, जें कांहीं द्रव्य त्याच्या बापाच्या वेळचें त्या जवळ होतें, तेवढ्यांतच तो आनंदी असे. देवदर्शन करून हा आपल्या गांवीं आल्यावर, यानें सकाळ व संध्याकाळचे दोन तास स्नानसंध्येंत घालवून राहिलेल्या वेळांत विद्यार्थ्यांस पढविण्याचा नियम ठेविला. यास मुलें पुष्कळ झालीं, परंतु याच्या अंतकाळीं त्यांतील एकही जिवंत नव्हतें म्हणून सांगतात. (कविच०)

**अनागोंदी—** किष्किंधा नगराचें हलीं चाललेलें नांव. यास मध्यंतरीं विद्यानगर किंवा विजया नगर असेंही म्हणत असत. हें शहर उत्तर अक्षांश सुमारें १६° व पूर्व रेखांश ७७° वर आहे. येथील राज्य शके १३२२ मध्यें मुसलमानांनीं बुडविलें. व रामराजा रणांगणांत ठार मारिलें. या पूर्वीं विद्यारण्य येथें होता. (हिंदु० हल्ल० इति०)

**अनाथ—** हा एक विख्यात साधु होऊन गेला. हिंदुस्थानी भाषेंत दोहरे बद्ध असे याचे विचारमाल आणि सर्वसार उपदेश हे दोन ग्रंथ आहेत

**अनाथपिंडद—** श्रावस्ती नगरींतील एक मोठा धनाढ्य सावकार. हा सर्वार्थसिद्ध नामक बुद्धाच्या वेळेस म्हणजे युधिष्ठिर शकाच्या चौदाव्या शतकारंभीं तेथें होता.(ल०)

**अनार्यलोक—** आर्य म्हणजे श्रेष्ठ लोक जे नव्हेत ते. जसे अंबष्ट, निषाद इत्यादि जातींप्रमाणें उत्पन्न झालेले शक, यवन, चीन, खश, दरद आदि करून. यांत अंबष्ट, निषाद यांची उत्पत्ति मनूनें आपल्या संहितेच्या दाहाव्या अध्यायांतील आठव्या श्लोकांत येणें प्रमाणें लिहिली आहेः—

ब्राह्मणाद्वैश्य कन्यायां मंबष्टो नाम जायते ॥
निषादः शूद्र कन्यायां यः पारशव उच्यते ॥ ८ ॥

असें सांगून पुढें मनूनें ४३–४४–४५ या तीन श्लोकांत क्षत्रिया पासून झालेल्या जातीं विषयीं या प्रमाणें लिहिलें आहे व त्यांस दस्यु म्हणजे चोर म्हटलें आहेः—

शनकैस्तु क्रिया लोपा दिमाः क्षत्रिय जातयः॥ वृषलत्वं गता लोके ब्राह्मणा दर्शनेनच ॥ ४३॥ पौंड्रकाश्चौंड्र द्रविडाः कांबोजा यवनाः शकाः ॥ पारदाः पल्हवाश्चीनाः किराता दरदाः खशाः ॥ ४४ ॥ मुखबाहूरुपज्जानां या लोके जातयो बहिः॥ म्लेच्छ वाचश्चार्यवाचः सर्वे ते दस्यवः स्मृताः ॥ ४५ ॥

पुढें अनार्यांचें म्हणजे संकर जातींचें लक्षण कसें, व कोणत्या गुणानीं ओळखावें, तें अठ्ठावन्नाव्या श्लोकांत या प्रमाणें लिहिलें आहे:-

अनार्यता निष्ठुरता क्रूरता निष्क्रियात्मता ॥
पुरुषं व्यंजयंतीह लोके कलुष योनिजं ॥५८॥

सारांश, आर्यभाषा म्हणजे संस्कृत भाषा, किंवा म्लेच्छ भाषा, अथवा बोबडी भाषा, यांतून लोक कोणतीही बोलणारे असोत. शेवटील श्लोकांत जीं लक्षणें सांगितलीं आहेत, तीं ज्यांच्या मध्यें आहेत, ते संकर जातीय अथवा अनार्य म्हणजे नीच लोक समजावेत.

**अनिष्टकर्मा—** आंध्रभृत्य राजांतील नववा. अरमान् राजांचा पुत्र व हालेय राजाचा बाप. युधिष्ठिर शकाच्या २२ व्या शतकाच्या मध्यास हा राजा असावा, असा सुमार आहे. (राजमा०).

**अनुभवप्रकाश—** विद्यारण्य कृत संस्कृत ग्रंथ.

**अनुभूतिस्वरूपाचार्य—** सारस्वत व्याकरणाचा कर्ता. याच्या विषयीं असें सांगतात कीं, हा विद्वान् पुरुष एकदां पंडितांच्या सभेंत संभाषण करीत असतां, याच्या मुखा वाटे एक प्रयोग अशुद्ध निघाला. त्यास प्रमाण काय म्हणून पंडितानीं यास पुसल्यावर यानें प्रमाण आहे म्हणून सांगून तें उद्यां दाखवीन असें म्हटलें. पुढें सभा विसर्जन होऊन यानें घरीं आल्यावर शुचिर्भूत होऊन सरस्वतीची आराधना आरंभिली. तीवरून तिनें प्रसन्न होऊन जें व्याकरण यास दिलें, तें यानें दुसरे दिवशीं पंडितांस दाखवून त्यांची शंका दूर केली. हा पुरुष पाणिनीच्या मागून झाला, अशी लोकांत प्रसिद्धि असल्याचें ऐकिवांत येतें. (वृद्ध मा०)

**अनुला—** महानाग राजाची स्त्री. ही अशोक राजाच्या वेळेस म्हणजे युधिष्ठिर शकाच्या अठराव्या शतकाच्या मध्यास होती. सिंहलद्वीपांत बौद्ध धर्म हिनें प्रथम चालू केला अशा विषयीं हिची प्रख्याति आहे. हिला बौद्ध धर्माचें उत्कृष्ट ज्ञान होतें, व तो आपण स्वतः पाळून दुसऱ्यां कडून पाळविण्या विषयीं हिच्या मनांत पराकाष्ठेची आवड असे. हिची नणंद संघमित्रा तिनें हिच्या उत्कंठे वरून हिला बौद्ध धर्माची आचार्या असें वारंवार संबोधन दिलेलें आहे. (म्यारे० कोश)

२— कोरांग राजाची स्त्री. ग्रंथकारांनीं ही महादुराचरणी असल्याचें वर्णिलें आहे. सिंहलद्वीपाचा राजा जो हिचा पति कोरांग, त्यास, व आपल्या तिष्यनामक पुत्रास, हिनें विष घालून मारिल्यावर, एका पाठीमागें एक असे चार उपपतीही तसेच मारिले.

शेवटीं हिचा पुतण्या कालकंडिष्य हिच्यावर उठला, आणि त्यानें हिला इसवी सना च्या ४१ वर्षां पूर्वी ठार मारून आपण राजा झाला. (ग्र्यारि० कोश०)

**अनेकार्थकैरव–** हेमचंद्र कृत ग्रंथ.

**अनेकार्थकैरवकौमुदी–** हेमचंद्र पंडितान्च्या शिष्यानें संस्कृत भाषेंत केली.

**अनेकार्थध्वनिमंजरी–** महाक्षपणककृत संस्कृतभाषेंतील कोश.

**अनेकार्थसंग्रह–** हेमचंद्रकृत कोश.

**अन्नमदेव–** प्रतापरुद्र राजाचा धाकटा भाऊ. याला प्रतापरुद्रानेंच होऊन गादीवर बसविलें, व आपण निवांत राहिला. अन्नमदेवही मोठा सुज्ञ होता म्हणून, जें जें करणें तें तें तो भावास पुसल्या वांचून करीत नसे. या विषयीं अशी गोष्ट आहे कीं, विद्यानाथ पंडितानें प्रतापरुद्रावर जें एक नाटक रचिलें होतें, तें प्रतापरुद्रानें राज्य सोडल्यावर पुरें झालें, व विद्यानाथास बक्षीस देण्याचा प्रसंग आला. त्यावरून प्रतापरुद्रानें आपल्या हातांतील आंगठी खुणे साठीं विद्यानाथा जवळ देऊन त्यास म्हटलें कीं, तूंही आंगठी घेऊन अन्नमदेवाकडे जा, आणि तुला लागेल तितकें द्रव्य त्याजवळून घे. त्याप्रमाणें विद्यानाथ जातांच अन्नमदेवानें तत्काळ त्यास लागत होतें तितकें द्रव्य दिलें. शिवाय आपल्या वारंगूळ राजधानींत एक संस्कृत विद्यालय स्थापून त्यावर विद्यानाथास मुख्य गुरु नेमिलें. हा वृत्तांत शालिवाहनाच्या १३व्या शतकांत झाला. (कविच०)

**अन्नंमय्या–** पोरय्या कवीचा भाऊ. (कवि० च०)

**अन्नाय्याचारी–** हा तैलंग जातीय ब्राह्मण किंवा कोण तें कळत नाहीं व कधीं झाला तेंही समजत नाहीं, मात्र तेलंगी भाषेंत दोन भागांनीं रचिलेलें पितामह चरित्र यानें प्रसिद्ध आहे, त्यांत सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाचें यानें वर्णन केलें आहे. (कविच०)

**अन्नावेमारेड्डी –** तैलंगणांतील कोंडवीडू येथील राजा. तेनाल रामलिंगानें ज्यापासून कंधारी घोडा कृष्णदेव रायलू करितां आणिला तोच हा. (कविच०)

**अन्वयबोधिनी–** कविचूडामणि चक्रवर्तीकृत वेदस्तुतीवरील संस्कृत व्याख्या.

**अपगगा–** आपगगा अत्रेयस्त्री बहीण. (पिरली) श० पहा.

**अपय्यादीक्षित–** हा जातीचा द्रविड ब्राह्मण होता. कांची नगराच्या आग्नेयी दिशेस आदिपाल्यनामक अग्रहारांत हा राहात असे. याच्या बापाचें नांव नारायण दीक्षित होतें. शालिवाहनाच्या पंधराव्या शतकांत विद्यानगरच्या कृष्णदेव राजाच्या कारकिर्दींत याची भरभर झाली. याचा इतिहास असा आढळतो कीं, यानें आपल्या वयाच्या बाराव्या वर्षीं वेदाध्ययन संपवून शास्त्राभ्यासास आरंभ केला, व तें अध्ययन

समाप्त झाल्यावर शांकरवेदांताचेंही मनन केलें. हा खरा वेदशास्त्रसंपन्न, सदाचारशील आणि निर्मत्सर बुद्धीचा असल्या मुळें शैवांत व वैष्णवांत अत्यंत मान्य असे.

यास बायका तीन होत्या, व तिघींचे मिळून अकरा मुलगे होते. यानें आपल्या भर उमेदींत कित्येक सभांत जाऊन न्याय वगैरे विषयांत, व मुख्यत्वें करून शिव आणि विष्णु यांच्या साम्यदर्शनांत महान् महान् पंडितांशीं वाद केला, आणि त्यांचें मत खंडित केलें, तेणें करून चंद्रगिरि येथील राजा व्यंकटपति रायह्याची यावर मोठी भक्ति बसली. व त्यानें यानें सर्व कुटुंब आणि विद्यार्थी यांच्या निर्वाहाकरिता यास मोठ्या उत्पन्नाची जमीन इनाम करून दिली, तिच्यावर हा स्वस्थपणानें निर्वाह करून विद्यार्थ्यांस पढवूं लागला.

पुढें यानें कित्येक ग्रंथ लिहिले ते येणें प्रमाणें:— तीस अध्यायांची शिवार्चन चंद्रिका, वीस अध्यायांचा शिवतत्त्व विवेक, या जगतास परमकारण एक शिवच अशा तात्पर्याची शिवमणि दीपिका, शिवकर्णामृत, पंचरात्रागम मत खंडन, सत्तावीस पटलांचा वीरशैव नामक ग्रंथ, शतश्लोकी आत्मार्पण ग्रंथ, रामायण सारस्तव, आणि नामसंग्रह माला, व शब्दप्रकाश हे दोन कोश. यांत आरंभींचे तीन ग्रंथ कित्येक यज्ञ केल्यावर लिहिले असून बाकीचे सर्व मागून लिहिले आहेत.

आत्मार्पण ग्रंथा विषयीं असें सांगतात कीं, तो करण्या साठीं यानें अगोदर पासून धोत्र्याच्या बिया खाण्याचा क्रम चालविला होता. कारण धर्मा विषयीं विचार करण्यास अंतःकरण फार निर्मळ पाहिजे, व तें साफ राखण्याची शक्ति या वनस्पतीच्या अंगीं आहे, ह्मणून तिच्या योगानें जें जें यास स्फुरलें तें तें यानें लागलीच चार लेखकांकडून लिहविलें. या ग्रंथाविषयीं दक्षिण हिंदुस्थानांतील सर्व लोक पराकाष्ठेचें आश्चर्य करितात इतका तो उत्कृष्ट झाला आहे.

अपय्या दीक्षित त्रिचनापल्ली, तंजावर, आणि मधुरा इत्यादि ठिकाणच्या राजांस भेटायास गेला असतां, तेथें त्यांनीं याची विद्वत्ता व बुद्धिमत्ता पाहून पुष्कळ बक्षिसें देऊन प्रोत्साहन दिलें. त्या वरून यानें वेदांत, न्याय, व अलंकार इत्यादि विषयांवर ८४ ग्रंथ लिहिले. त्यांत कुवलयानंद, व चित्रमीमांसा, हे दोन अलंकार विषयावरील ग्रंथ उपलब्ध असून, वृत्तिवार्तिक, रत्नपरीक्षा व सिद्धांतलेश हे वेदांत विषयावरील याचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. शिवाय मध्वमुख कपोल चपेटिका, मध्वमत कुठार, रामानुजमत विध्वंस, दशकुमार चरित संक्षेप इत्यादि याचे अनेक ग्रंथ आहेत. (क. च.)

हा मोठा नैष्ठिक व स्वधर्म तत्पर असल्या मुळें यानें कावेरी नदीच्या तीरीं अ-

नेक यज्ञ केले, व पुनः पूर्ववत् विद्यार्थ्यांस पढवीत स्वस्थ राहिला. याकडे जो जो कोणी मनुष्य येई त्या जवळ हा शिवाचीच स्तुति करी, व तद्विषयक सिद्धांत त्यास मोठ्या आल्हादानें सांगून जें वाक्य त्यां पुढें ह्मणे तें असें :—

मुरारेच पुरारेश्च न भेदः पारमार्थिकः ॥
तथापि मामकी भक्तिश्चंद्रचूडे प्रधावति १ ॥

अर्थ— विष्णु आणि शिव या दोघांत वास्तविक दृष्ट्या कांहीं भेद नाहीं, तथापि माझी भक्ति चंद्रशेखर जो शिव त्याच्याकडे धांवत्ये.

एकदां असें सांगतात कीं, हा विष्णुमंदिरीं दर्शनास गेला, व तेथें " शांताकारं भुजगशयनं पद्मनाभं सुरेशं विश्वाधारं गगन सदृशं मेघवर्णं शुभांगं ॥ लक्ष्मीकांतं कमलनयनं योगिभिर्ध्यान गम्यं वंदे विष्णुं भव भय हरं सर्वलोकैक नाथं " असें ध्यान म्हणायाचें विसरून " शांतं पद्मासनस्थं शशधर मुकुटं पंचवक्त्रं त्रिनेत्रम् शूलं वज्रंच खड्गं परशु मभयदं दक्षभागे वहंतं ॥ नागं पाशंच घंटां प्रलयहुतवहं सांकुशं वामभागे नानालंकार युक्तं स्फटिक मणिनिभं पार्वतीशं नमामि" असें ह्मटलें तेणें करून देवळांतील विष्णुमूर्ति अदृश्य झाली, व त्या जागीं शिवप्रतिमा प्रगटली. हें याच्या गांवीं नसून हा घरीं आला. परंतु लोकांच्या दृष्टीस असें पडल्यावर, त्यानीं ती गोष्ट यास येऊन कळविली. तेव्हां यानें विष्णूचें ध्यान पुनः म्हणून पूर्ववत् विष्णुमूर्ति प्रकट केली. ( सुद्भमा० )

व्यंकटपति राजाच्या सभेमध्यें एकदां तातचार्य नामक हैंसवेदांनी, अपय्यादीक्षिताशीं वाद करूं लागला असतां यानें त्याचा पराजय केला. त्यावरून तातचार्यानें याशीं हाडवैर बांधून, हा राजाच्या नगरांतून निघून आपल्या गांवीं चालला असतां, मार्गांत याबर मारेकरी पाठविले. परंतु ते यास येऊन गांठतात, तों मध्येंच कोणी वीर पुरुष प्रकट होऊन त्यानें त्यांस पिटाळून लाविलें. व हा आपल्या घरीं येऊन सुखरूप पोहोंचला. ही गोष्ट राजास कळल्यावर, त्यानें दीक्षितांचा अमूल्य वस्त्राभरणांनीं सत्कार करून तातचार्याचा अतिशय धिक्कार केला.

कांहीं दिवसांनीं दीक्षित महायात्रेस गेले, व तेथें त्यांची जगन्नाथराय पंडिताशीं भेट झाली. त्रिस्थळीची यात्रा झाल्यावर परत गांवीं आले असतां पुढें पारमार्थिक विषयावर त्यानीं संस्कृत भाषेंत परें लिहिलीं त्यांतील आमच्या आढळांत एक असलेलें खालीं लिहिलें आहे.

ब्रह्मैवाहं किल सद्गुरोः कृपया ॥ ध्रु० ॥ ब्रह्मैवाहं ब्रह्मैवाहं ॥ सत्यज्ञा-

नानंत घनोहं॥ दृश्या दृश्य भासातीतं॥ हेतु विहीनं सुगम स्वरूपं॥
ब्रह्मै०॥१॥ माया ऽ विद्या जीवेश्वरयोः॥ सर्वाधारं चाधिष्ठानं॥ सर्वाती-
तं सर्वांतरयोः॥ सच्चित्सुखमय पूर्ण स्वरूपं॥ ब्रह्मै०॥२॥ भेदाभेदो
भय विवर्जितं॥ सर्व द्रष्टा साक्षि मयोहं॥ भगवत्पादीय मिदं ज्ञानं
दीक्षित सूनोर्गलमज्ञानं॥ ब्रह्मैवाहं किल सद्गुरोः कृपया॥ ३ ॥

या पदावरून भगवत्पूज्यपाद जे शंकराचार्य त्यांच्या सिद्धांता विषयीं याची खात्री झालेली किती दृढ होती तें उघड दिसून येतें.

पुढें दीक्षित अक्षय काशीवास करण्याच्या हेतूनें तयारी करूं लागले; परंतु ग्रामस्थांनीं स्वदेश सोडून जाऊं नये असा आग्रह केल्या वरून, मूळ आचार्यांची जन्मभूमि जें चिदंबरपुर तेथें जाऊन ते राहिले. व आपला सर्व काळ तेथें त्यानीं स्वधर्माचरणांत घालविला. दीक्षितां जवळ स्फटिकाचीं पांच शिवलिंगें होतीं. त्यांतील त्यानीं ब्राम्ह्यास दोन, पुतण्यास एक, मुलास एक, येणें प्रमाणें देऊन एकाची चिदंबर येथें स्थापना केली. व पुढें थोड्याच काळानें ते आपल्या वयाच्या ९० व्या वर्षी चिदंबर येथें मरण पावले. (कविच०)

**अपरपांड्यदेश**— दक्षिणेकडे हल्लीं जेथें मधुरा शहर आहे त्याच्या सभोंवतालचा देश.

**अपरादित्य**— कोंकणचा एक राजा. याचा वकील तेजकंठ, काश्मीरच्या जयसिंह राजा जवळ होता. याज्ञवल्क्य स्मृतीवर या राजाची टीका आहे. हा राजा शालिवाहन शकाच्या ११ व्या शतकाच्या उत्तरार्धांत होता. (बुल्हर. का. शो.)

**अपरोक्षानुभूति**— श्रीमच्छंकराचार्य कृत स्तोत्र. यावर वामनाची समश्लोकी टीका आहे.

**अपशब्दनिराकरण**— हा ग्रंथ, संस्कृत व्याकरणावर जगधर पंडितानें केलेला आहे.

**अप्पर**— हा एक कवि जैन धर्मी तामिळ जातीय होता. याशीं गणा सबंधरानें वाद करून यास पराजित केल्या वरून हा पुनः वैदिक धर्मांत आला. तामिळ भाषेंत याची कविता पुष्कळ होती असें ह्मणतात; परंतु ती सांप्रत उपलब्ध नाहीं. (कविच०)

**अप्परसू**— कृष्णदेव रायडू राजाचा राजनीति पढविणारा गुरु. तिम्मरसूही यासच म्हणत. (कविच०)

**अप्पाकवि**— हा तेलंग कवि कधीं झाला तें कळत नाहीं. मात्र आंध्रप्रयोग रत्नाकर आणि छंदासंभावना असे याचे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. यांत पहिला छंदःशास्त्रावर असून हे दोन्ही तेलंगी भाषेंत आहेत. (कविच०)

**अफगाणिस्थान**— पंजाबाच्या वायव्येकडील प्रांत.

**अफजूलउदवला**— निजामाच्या गादीवरील पुरुष. हा नासीर उदवला याच्या मागूनहा हैदराबाद येथील गादीवर बसला. व शके १७७९ पासून १७९१ पावेतों बारा वर्षे गादीवर होता. (हिंदु० छा० इ०)

**अंबष्टदेश**— ब्राह्मणा पासून वैश्यकन्येच्या ठायीं झालेल्या संततीस अंबष्ट म्हटलेलें आहे त्यांचा जो देश तो. प्राचीन हिंदुस्थानाच्या नकाशांत याचें मुख्य शहर मरुहृद्ध लिहिलें असून त्याचे उत्तर अक्षांश सुमारें ३° व पूर्वरेखांश ७१ असल्याचें दृष्टीस पडतें. मरुहृद्धास जैन लोक वरुणनगर म्हणतात. (प्रव० शारो०)

**अंबाडप्रांत**— निजाम सरकारच्या हद्दींतील प्रांत.

**अंबादास**— समर्थ रामदास स्वामींचे शिष्य कल्याण गोसावी त्यांचें मूळचें नांव.(राम० च०)

**अंबिकादेवी**— भगवत्पूज्य पाद श्रीमच्छंकराचार्य त्यांची आई जी विशिष्टा, तिचेंच जैनाच्या ग्रंथांत लिहिलेलें नांव.

**अबूचाडोंगर**— आरावली नामक पर्वताचें अत्यंत उंच शिखर तें. हें भूमीच्या सपाटी पासून पांच हजार फूट उंच आहे. हा डोंगर गुजराथेंत असून उदेपुराच्या वायव्येस आहे. यावर जैन लोकांच्या देवाचें मंदीर, तसेंच एक दत्तात्रेयाचें व एक शिवाचेंही देवालय आहे. येथें सर्व प्रकारचीं फुलझाडें व फळझाडें असून तीं बारमहा फलपुष्पयुक्त असतात, म्हणून सांगतात. याचे उत्तर अक्षांश सुमारें २५ व पूर्वरेखांश ७३ आहेत.(इ० मा०)

**अब्बनकवि**— हा तैलंग कवि कधीं झाला तें कळत नाहीं. परंतु संस्कृतांत व तैलंगींत हा चांगला प्रवीण होता. यानें पुरूरवा राजाचें चरित्र संस्कृतांतून तेलंगींत तीन भागांनीं चांगलें उतरलें आहे. (कविच०)

**अब्बोका**— श्रीधराची आई व बलदेवाची स्त्री. (बुल्ह० का० शो०)

**अभयप्रदानसार**— वेदांताचार्य कृत संस्कृत भाषेंतील ग्रंथ.

**अभसर**— बौद्धमतांत मानिलेला तेरावा स्वर्ग.

**अभिधर्म**— बौद्धांनीं मानिलेल्या तीन पवित्र ग्रंथांतील एक. हा पाली भाषेंत म्हणजे मागधी भाषेंत आहे. यांत धर्मसंबंधीं उपदेश वचनें पुष्कळ आहेत, व तीं आकाशवासि देवांनीं सांगितलीं असें त्यांचें मत आहे. हा ग्रंथ त्यांस पराकाष्ठेचा पवित्र वाटत असल्यामुळें तो वाचणारांसही ते फार मान देतात. (ग्यारे० ई० की०).

**अभिधानकोश**— संस्कृत भाषेंत असलेला एक कोश.

**अभिधानरत्नमाला**— हलायुध कोशासच म्हणतात.

**अभिधावृत्तिमातृकाव्याख्या**— संस्कृत भाषेंत मुकुलभट्ट कृत.

**अभिनंदन–** जैन लोकांच्या चोवीस तीर्थकरांतील चौथा. (तीर्थंकर) श० पहा.

**अभिनवगुप्त–** हा शालिवाहनाच्या नवव्या शतकांत काश्मीर देशांत होता. याचा बाप चुखल, आजा वराहगुप्त, भाऊ मनोरथगुप्त असून याचा गुरु लक्ष्मणगुप्त होता. या शिवाय इंदुराज व तौत हेही याचे दुसऱ्या शास्त्रसंबंधानें गुरु होते. याला महामहेश्वराचार्य म्हणत. अलंकारशास्त्र, शैवदर्शन, भगवद्गीता टीका, भैरवस्तोत्र इत्यादि ग्रंथ याचे आहेत. (बुल्ह० का० शोध)

**अभिनवगुप्ताचार्य–** हा महापंडित कामरूप देश ज्यास हल्लीं आसाम म्हणतात तेथील राहणारा जातीचा ब्राह्मण असून शाक्त होता. विद्याशंकर भारती नांवाचे जे नामांकित दुसरे शंकराचार्य होऊन गेले, ते दिग्विजय करीत त्या देशांत शालिवाहन शके ४६२ मध्यें गेले असतां, त्यांचा याशीं वाद झाला व त्यांत त्यानीं यास पराजित केलें.

पराजय झाल्यावर लोकप्रवाद भीतीनें, यानें बाह्यात्कारीं शाक्तमत टाकिल्यासारखें दाखवून, त्यांचें शिष्यत्व स्वीकारिलें; परंतु मनांत गांठ बांधिली कीं, जरी हा समर्थ पुरुष वादांत जिंकण्यास अशक्य आहे, तरी मी यास दैवी उपायानें जिंकीन; असें म्हणून यानें अल्पच काळांत वैद्यांसही अपरिहार्य असा भगंदर नांवाचा रोग त्यांस उत्पन्न केला. याच अर्थावर माधव पंडितानें आपल्या शंकरविजयांत श्लोक लिहिले आहेत ते असे:—

> तदनंतरमेष कामरूपा नधिगत्याभिनवोपशब्दगुप्तं॥ अजय त्किल शाक्तभाष्यकारं स च भग्नो मनसेदमालुलोचे ॥ १५८ ॥ निगमाब्जविकासिबालभानो र्न समोमुष्य विलोक्यते त्रिलोक्यां॥ न कथंचन मद्दृशां वदोसौ तदमुं दैवतकृत्यया हरेयं॥ १५९ ॥ इति गूढमसौ विचिंत्य पश्चा त्सहशिष्यैः सहसा स्वशाक्त भाष्यं॥ परित्द्दत्य जनापवादभीत्या यमिनःशिष्य इवान्ववर्तनैषः ॥१६०॥ (सर्ग १५) अथ यदा जितवान्यतिशेखरो ऽभिनवगुप्तमनुत्तममांत्रिकं॥ स तुतदापजितो यतिगोचरं हतमनाः कृतवानपगोरणं॥ १॥ स ततोऽभिचचार मूढबुद्धि र्यतिशार्दूलममुं प्ररूढरोषः अचिकित्स्यतमो भिषग्भिरस्मा दजनिष्ठास्य भगंदराख्य रोगः ॥२॥ (स० १६)

अशा प्रकारच्या दुर्धर व्याधीपासून जरी आचार्य समाधानवृत्तीनें असत, तरी शिष्यमंडळीच्यानें तें दुःख पहावेना, म्हणून त्यानीं आम्हांस वैद्य आणण्यास तरी आज्ञा द्यावी अशी विनंति केली. या विनंतीकडे आचार्य लक्ष देईनात. शेवटीं हे नित्य प्रार्थना करितात असें पाहून एके दिवशीं आज्ञा दिली. त्यावरून मंडळींतील कित्येकांनीं चोहोंकडे

हिंडून चांगल्या चांगल्या राजवैद्यांस आचार्यांसमीप आणिलें.

त्यांनीं पुष्कळ उपचार केले. परंतु व्याधि उणा होत नाहीं असें पाहून ह्मणाले कीं, आतां आमचा उपाय थकला. त्या वरून आचार्यांनीं शंकराचें स्मरण केलें. इतक्यांत शंकराज्ञेनें ब्राह्मणवेष धारण करून तेथें अश्विनीकुमार प्रगट झाले व त्यांनीं सांगितलें कीं, हा रोग वैद्यांच्यानें बरा होणारा नव्हे. कारण, ही कोणी करणी केलेली आहे. इतकें बोलून अश्विनीकुमार गेले असतां शिष्यमंडळी पैकीं एकानें मांत्रिक प्रयोगास[1] आरंभ केला, व तो करतांच आचार्य बरे होऊन अभिनवगुप्त तत्काळ मरण पावला. त्या विषयीं माधव पंडितानें श्लोकरूपानें असें लिहिलें आहे.

> अमुनैव नतो गदेन नीचः प्रतियातेन हतो ममार गुप्तः॥ मतिपूर्वकृतो महानुभावे व्यनयः कस्य भवे त्सुखोपलब्धौ॥ ३२॥ (सर्ग १६)

**अभिमन्युविवाह**— गुजराथी भाषेंत केलेला रघुनाथदास याचा ग्रंथ.

**अभिसारीदेश**— याची राजधानी याच नांवाचें शहर होतें. हल्लीं तेथें हजारा शहर आहे.

**अभिज्ञानचिंतामणि**— हेमचंद्रनामक जैन पंडितानें केलेला ग्रंथ. हा संस्कृतभाषेंत आहे.

**अभीतिस्तव**— वेदांताचार्यानें केलेला संस्कृत ग्रंथ.

**अभीर देश**— आभीरदेश शब्द पहा.

**अमदाबाद**— गुजराथेंतील एक मोठें शहर. या जवळून साबरमती नदी वाहते.

**अमम**— पुढें होणारा जैनमनि साधु.

**अमरकंटक**— पर्वत. हा गोंडवणाच्या उत्तर बाजूस असूनयाणसून नर्मदा नदी निघाली आहे.

**अमरकोश**— अमरसिंहानें केलेला कोश. याचीं तीन कांडें आहेत. (अमरसिंह शब्द पहा.)

**अमरकोशपंजिका**— बृहस्पति कविकृत संस्कृत भाषेंत.

**अमरविवेक**— महेश्वर भट्टानें अमरकोशावर लिहिलेला व्याख्या ग्रंथ.

**अमरसिंह**— विक्रमादित्याच्या सभेंत जीं नऊ पंडितरत्नें होतीं त्यांतील हा तिसरा. या विषयीं जो श्लोक प्रसिद्ध आहे तो आह्मीं धन्वंतरी शब्दावर लिहिला आहे. याच्या नांवापुढें सिंह असें उपपद आहे त्यावरून हा क्षत्रिय होता असें दिसतें. हा जैनधर्म पाळणारा होता असेंही दिसून येतें. कारण, अमरकोश आरंभितानां जें यानें मंगलाचरण केलें आहे तें जैनसंप्रदाया प्रमाणें आहे. यानें केलेला अमरकोश अग्निपुराणांतील नांवाचा संग्रह आहे. व तो अत्यंत लोकोपयोगीही आहे. क्षीरस्वामि, रामाश्रम, रायमुकुट,

---

[1] हा मांत्रिक प्रयोग पद्मपादाचार्यानें केला असल्याचें माधवाचार्य पंडित लिहितो. परंतु ती चूक आहे. कारण पद्मपादाचार्य पहिल्या शंकराचार्यांच्या वेळेस मात्र होता. या वेळेस मुळींच नव्हता. म्हणून इतरानें कोणी केला असावा.

भरतमाल, नीलकंठ, भानुदीक्षित, रुद्रभट्ट, नारायणचक्रवर्ती, अच्युतोपाध्याय, मथुरेश पंडित, आणि महादेवभट्ट वेदांति इत्यादि पंडितांनीं यावर टीका केल्या आहेत. या सर्व टीकांत रामाश्रमकृत टीका सर्व मान्य आहे. अमरसिंह विक्रमसभेंत होता म्हणून, त्यास झाल्याला आज सुमारें दोन हजार वर्षे होत आलीं आलीं आहेत. (कविच०)

**अमरावती**— कर्नाटकांत असणारें कृष्णानदीच्या कांठचें शहर. हें हलीं ओसाड आहे.(ग्रा०)

**अमरुक**— रसिक संजीवनी ग्रंथाचा टीकाकार. ( बु० का० शोध० )

**अमरुराजा**— परकाया प्रवेशकाळीं शंकराचार्य ज्या मृत झालेल्या राजाच्या देहांत प्रवेशले होते तो. आनंदगिरिकृत शंकरविजयांतील अठ्ठावन्नाव्या प्रकरणांत याची हकीगत आहे.

**अमरुशतक**— अमरु राजाच्या शरीरांत शंकराचार्य प्रवेशले असतां तेथें त्यानीं कामशास्त्र विषयावर जो ग्रंथ केला त्याचें हें नांव. हा करण्यास आधार वात्स्यायनाचीं सूत्रें होत.

**अमरेली**— काठेवाड जिल्ह्यांतील एक गांव.

**अमाई**— तुकारामाचा मूळपुरुष विश्वंभर त्याची बायको. २– शाहामुनीचा बाप मानसिंग त्याची बायको.

**अमितभ**— बौद्ध लोकांत जे मुनि प्रसिद्ध आहेत त्यांतील एक.

**अमिनाबाई**— शाहामुनीचा पणजा जो शाहाबाबा त्याची बायको.

**अमेरदास**— नानकाचा शिष्य जो अगडशाहा त्याचा हा शिष्य होता. अगडशाहाच्या मागें हाच गादीवर बसला. याचा शिष्य रामदास. (हिंदु० छा० इ०)

**अमोघवर्ष**— शालिवाहनाच्या आठव्या शतकांत कांचीनगर येथें राज्य करीत असणारा राजा. हा जैनधर्मी होता, व याच्या पदरीं सेनाचार्य नांवाचा एक विद्वान् जैनपंडित होता. या सेनाचार्यानें जैनधर्मावर कित्येक ग्रंथ लिहिलेले आहेत. त्यांत त्यानें बर दाखल केलेला शालिवाहन शक लावला (असल्या मुळें, हा राजाही त्याच शकांत होता असा निश्चय झाला आहे. (ग्यारे० को०)

**अमोघसिद्ध**— बौद्ध लोकांच्या मतांत मानलेला एक देव. याच्या प्रीत्यर्थ प्रार्थना व हवन करण्याचा त्यांच्यांत संप्रदाय आहे. (ग्यारे० इं० को०)

**अमृतराय**— हा जातीचा देशस्थ आश्वलायन ब्राह्मण नामांकित कवि होऊन गेला. याचें जन्म शालिवाहन शके १६२० मध्यें बहुधान्य संवत्सरीं झालें होतें. औरंगाबादेस बिसा सोरो म्हणून एक मोंगलांचा मुत्सद्दी होता त्याच्या पदरीं हा असे. याचें

मूळ राहण्याचें ठिकाण बीड परगण्यांत असून, तेथून हा निघाला तो वरील मुलखाच्या पदरीं चाकरीस राहिला.

असें सांगतात कीं, हा कांहींसा थट्टेखोर असे. एकदां यानें मध्वमुनीश्वर म्हणून एक साधु होता त्याची थट्टा केली. तीवरून मध्वमुनीश्वर यास रागें न भरतां इतकेंच ह्मणाले कीं, तुला परमेश्वरानें अमृता सारखी वाचा दिली आहे, शिवाय आई बापांनीं तुझें नांवही तसेंच ठेविलें आहे, असें असतां त्या वाणीचा तूं असा उपयोग करावास हें तुला योग्य नाहीं. त्यावरून यास पश्चात्ताप झाला, व तेव्हांपासून यानें वाणीचा चांगला उपयोग करण्याचा निश्चय केला.

याच्या वृत्तींत पालट पडला असें पाहून मध्वमुनीश्वरानें आपले गुरु अद्वैतानंद त्यांजकडून यास अनुग्रह देवविला, व तेव्हां पासून हा कविता करूं लागला. याचे कटिबंध पुष्कळ आहेत. याची कविता मनोरंजक व यमकाच्या भरण्या मुळें गोड आहे. तशीच ती सर्व उपलब्धही आहे. दामाजीपंताची रसद, शुकचरित्र, ध्रुवचरित्र, सुदामचरित्र, द्रौपदी वस्त्रहरण, मार्कंडेयावर चूर्णिका, रामचंद्र वर्णन, जीवदशा वर्णन, गणपति वर्णन, दुर्वास यात्रा इत्यादि आख्यानें यानें केलेलीं आहेत. मराठी भाषेंत जशी याची कविता आहे, तशीच हिंदुस्थानींतही आहे.

हा मोठा वैराग्यशील पुरुष होता, व कामकारभार करणें सोडल्यावर कीर्तन करूं लागला. बाळाजी बाजीराव उर्फ नाना साहेब पेशवे यांच्या कारकिर्दीत पुणें येथील शनवारच्या वाड्यांत याचें एक कीर्तन झालें होतें. पुढें हा शके १६७५ श्रीमुख संवत्सरा मध्यें मरण पावला. (कविच०) (सुरूमा०)

अमृतराव— गोपाळपंत भुसकुटे यांचा औरस मुलगा, व रघुनाथरावाचा दत्तपुत्र. पेशवाई बुडाल्यावर याला इंग्लिशांनीं चित्रकोटास नऊ लक्ष रुपये वर्षासन करून देऊन ठेविलें होतें. पुढें हा तेथेंच शके १७४६ मध्यें मरण पावला. यास विनायक राव हा औरस पुत्र होता, व त्याचा नातु हल्लीं आहे.

अमृतसर— शीख लोकांचें शहर. केकय देशाची राजधानी जें राजगृह शहर ज्यास प्राचीन काळीं गिरिव्रज ह्मणत असत त्याच्या जवळच हें आहे. याचे उत्तर अक्षांश सुमारें ३१° व पूर्वरेखांश ७४° आहेत.

अमृतसागरी— भास्कराचार्यकृत लीलावती ग्रंथावरील गंगाधरपंडितकृत संस्कृतटीका.

अमृतार्णव— हा वेदांतपरग्रंथ मराठी भाषेंत ओंवीबद्ध आहे. याच्या ओंव्या, बत्तीस अक्षरांचा नियम धरून एकतीसशें पंचवीस आहेत. व याचे एकंदर सर्ग बत्ती-

स आहेत. भट्टदत्तात्रेय बाबा नामक एक सत्पुरुष याचा कर्ता आहे. व तो त्यानें निरालंबनामक उपनिषदावर असलेल्या मूळ गद्यरूप व्याख्येवर शके १७९१ मध्यें लिहिला आहे. सदरील व्याख्येशीं प्रस्तुतच्या ग्रंथकाराचा संबंध असल्या मुळें त्यास या विषयीं कांहीं अधिक लिहितां येत नाहीं.

**अमृतानुभव**– हा ग्रंथ मराठींत ओंवीबद्ध असून ज्ञानेश्वरानें केलेला आहे. याचीं प्रकरणें दाहा व ओंव्या आठशें आहेत. हा समजण्यास अतिशय अवघड असल्यामुळें यावर शिवकल्याणानें टीका लिहिली आहे; परंतु ती ओंवींतील अभिप्राय आहे तसा समजून देण्यास बराच वेळ लावित्ये, ह्मणून श्रीमत्परमहंस नारायणतीर्थ ऊर्फ हंसराज स्वामि यानीं सम ओंवी टीका लिहिलेली आहे. या ग्रंथाची गोष्ट विशेषें करून सांगण्या जोगी अशी आहे कीं, संस्कृतांतून प्राकृतांत भाषांतर होऊन आलेले ग्रंथ हज़ारों आहेत त्या प्रमाणें याचें नाहीं. हा मूळ मराठी भाषेंत असतां त्या वरून याचें पद्यरूप संस्कृत भाषांतर आठशें श्लोकांनीच प्रल्हादबावा बडवे यानीं केलें आहे. (सद्भूमा०)

**अयुतायु**– कलियुगांतील सोमवंशी राजा. श्रुतश्रवा राजाचा पुत्र, व निरमित्राचा बाप. हा राजा जरासंध वंशीय होता. (राजमा०)

**अयोध्या**– दक्षिण कोसल देशाची प्राचीनकाळची राजधानी. हिला हल्लीं औध म्हटलेलें नकाशांत आढळतें. ही नगरी शरयू नदीच्या कांठीं असून हिचे उत्तर अक्षांश सुमारें २७° व पूर्वरेखांश ८२° आहेत.

**अय्यादीक्षित**– हा द्रविड जातीय स्मार्त ब्राह्मण प्रसिद्ध जे अपय्यादीक्षित त्यांचा पुतण्या होता. यास सर्व शास्त्रांतील थोडथोडेंच परंतु चांगलें ज्ञान होतें. शिवाय यास कवित्वशक्तीही होती. हा आपल्या बुद्धिचातुर्यानें मधुराशहरचा राजा तिरुपतिमल्लनाईक त्याचा प्रधान झाला. प्रधानकीचें काम चालवीत असतां याच्या कारकिर्दींत प्रजा सुखानें नांदत होती. यानें नीलकंठविजय नांवाचा एक चंपु रचिला आहे, व त्यांत नानातऱ्हेच्या सर्व देशांचें वर्णन नाटकाच्या पद्धतीवर लिहिलेलें आहे. (क०क०)

**अर**— जैन लोकांच्या चोवीस तीर्थकरांतील आठवा.

**अरकाटशहर**– हें मद्रास इलाख्यांत आहे. येथील अधिकाऱ्यांस अरकाटचे नवाब असें लोकांत ह्मणण्याची रूढी आहे. या शहराचे उत्तर अक्षांश सुमारें १३° असून पूर्वरेखांश ७९° आहेत.

**अरणी**– सुभानराव म्हणून जो मद्रास इलाख्यांत प्रसिद्ध पुरुष होऊन गेला त्याचा हा मूळ गांव. हा मद्रासेच्या पश्चिमेस सुमारें चाळीस कोसांवर आहे.

**अरिशालपल्ली**— बहु आणि पयस्विनी या दोन नद्यां मधला कांची मंडलांतील एक अग्रहाराचा गांव.

**अरिष्टनेमि**- चोवीस तीर्थकरांतील बाविसाव्याचें दुसरें नांव.

**अरुगण**- जैनमतांतील ईश्वराच्या १००८ नांवांतील एक.

**अरुणगांव**— तापी आणि पयोष्णा या दोन नद्यांच्या संगमा लगतचा गांव. चांगदेव ह्मणून जो प्रख्यात साधु महाराष्ट्र देशांत होऊन गेला तो या स्थळीं झाला.

**अरुणभेंडी**— सांवता माळ्याचा मूळ गांव.

**अरुणाचल**— येथें महादेवाचें एक प्रसिद्ध स्थान आहे. यांतून पर्वणी इत्यादि दिवशीं अग्नीच्या ज्वाला निघतात, ह्मणून यास तेजोलिंग म्हणतात. हें स्थान त्रिचनापल्लीच्या पूर्वेस कावेरी नदी पासून पांच साहा कोसांवर आहे.

**अर्कगिरि**— वेरूळचें लेणें ज्या पर्वतांत आहे त्याचें जैन ग्रंथांत नांव.

**अर्कबंधु**— सर्वार्थसिद्धनामक जो दुसरा बुद्ध त्याच्या नांवांतील अमरसिंहानें आपल्या अमर कोशांत लिहिलेलें साहावें नांव.

**अर्जीविनय**— निष्कुळानंद कवीनें गुजराथी भाषेंत लिहिलेला ग्रंथ.

**अर्जुनगीता**— धनदास कविकृत गुजराथींत रचलेली कृष्णार्जुन संवादरूप गीता.

**अर्जुनमल्ल**— नानकाच्या गादीवरील पांचवा पुरुष. हा रामदासाचा शिष्य होता व त्याच्या मागें गादीवर बसला. शीख लोकांत धर्मशास्त्रा प्रमाणें जो ग्रंथ मानला जातो तो यानें रचिला, व त्याचें नांव ग्रंथराज असें ठेविलें. हा शालिवाहनाच्या सोळाव्या शतकारंभीं होता. (बुल्ह०का०शोध).

**अर्जुनवर्मा**- रसिक संजीवनी ग्रंथाचा कर्ता. हा क्षत्रिय होता. (बुल्ह०का०शोध.)

**अर्थपति**— प्रसिद्ध जो बाणभट्ट कवि त्याचा आजा व कुबेरभट्टाचा पुत्र.

**अर्धगंगा**— कावेरी नदीसच नांव.

**अर्धनारीश्वरस्तोत्र**— संस्कृत भाषेंत कल्हणकृत.

**अर्बुदाचल**— आबूच्या डोंगराचें जुनें नांव.

**अर्हत**— हा एक जैनधर्म स्थापक नामांकित आचार्य होऊन गेला. युधिष्ठिर शकाचीं चवदाशें चवेचाळीस वर्षे गत झाल्यावर १४४५ व्या वर्षी तारणनामक संवत्सरीं बहार प्रांतांतील पाटना शहरांत याचें जन्म झालें, असें जैन ग्रंथांत आहे. हा संवत्सर विक्रम संवत्सरा पासून गणलेला आहे. हें संवत्सर असें कां मोजतात त्याची उपपत्ति आम्हीं प्रस्तावनेंत दिली आहे; परंतु हा अर्हत भागवत प्रसिद्ध समजूं नये.

कारण तो प्राचीन आहे, व त्याची गोष्ट आमच्या प्राचीन कोशांत आहे. या वरून सारांश असा समजावा कीं, या धर्माचें बीज फार पुरातन आहे; परंतु त्या वेळचे वैदिक धर्मी राजे, व ब्राह्मण, स्वतः विद्वान् असून परम विचारशील असल्या कारणानें त्यानीं या धर्माचें डोकें वर होऊंच दिलें नाहीं, ह्मणून तो धर्म दृग्गोचर झाला नाहीं. तीच स्थिति कलियुगांत नाहींशी होतांच त्याची वृद्धि झाली.

अशा प्रकारच्या धर्माचें बीज प्रस्तुत कलियुगांत ज्या ज्या नांवांनीं विस्तार पावलें त्या विषयीं (आर्यवि० सुधा०) ग्रंथांत येणें प्रमाणें आढळतें :—

आदौ लोकायत मत प्रकाशन महा पटुः॥ वेदबद्धं महामार्गं खंडितुं यत्नमातनोत्॥१॥ ततो बौद्धा मुक्तकच्छा स्ततो जैना दिगंबराः॥ श्वेतांबराश्च त इति नास्तिका बहुरूपिणः॥२॥ नास्ति वेदो दितो लोक इति येषां मतिःस्थिराः॥ नास्तिकास्ते तथास्तीति मतिर्येषांत आस्तिकाः॥३॥ अवैदिक प्रमाणानां सिद्धांतानां प्रदर्शकाः॥ चार्वाकाद्याः षड्विधास्ते ख्याता लोकेषु नास्तिकाः॥४॥

अर्थ:— आरंभीं लोकायत मत म्हणजे देह हाच आत्मा असें मत प्रतिपादन करणारा महा कुशल चार्वाक उत्पन्न झाला, व त्यानें, वेदानें बांधिलेला राजमार्ग खंडित करण्याचा यत्न केला. त्याच्या मागून मुक्तकच्छ जो बुद्ध तो उत्पन्न झाला, आणि त्याच्या मागून दिगंबर व श्वेतांबर अशा दोन भेदांनीं अनेक प्रकारचे जैन निर्माण झाले. हे सर्व नास्तिक आहेत; कारण वेदप्रतिपाद्य जो परलोक तो ते नाहीं असें ह्मणून वेदासही मानीत नाहींत. तात्पर्य वेदविरुद्ध प्रमाणांनीं प्रतिपादित सिद्धांत जे दाखविणारे ते चार्वाकादिक साहा नास्तिक लोकांत प्रसिद्ध आहेत. साहा नास्तिक ह्मणजे पहिला चार्वाक, दुसरा बौद्ध याचे भेद योगाचार, सौत्रांतिक, वैभाषिक आणि माध्यमिक, असे चार आहेत. हे चार बौद्ध व चार्वाक मिळून पांच आणि साहावा अर्हत. येणें प्रमाणें हे साहा नास्तिक समजावेत; ह्मणून भागवत प्रसिद्ध जो अर्हत त्याहून हा निराळा समजावा; कारण त्यास जैनलोक सुगत असें ह्मणतात. (सुगत शब्द) पहा.

बौद्ध जसा चार्वाकाचें मत खंडित करून आपलें स्थापितो, तसाच अर्हत बौद्ध मतांतील पहिला सिद्धांत जो (सर्वं क्षणिकं क्षणिकं) म्हणजे सर्व कांहीं क्षणिक आहे त्याचें खंडन करून आपलें मत स्थापितो, तो प्रकार असा,— अर्हत बौद्धास ह्मणतो अरे, जर सर्व कांहीं क्षणिकच आहे असें मानिलें, तर फलास साधन-

भूत जीं कर्मे तीं सर्व व्यर्थ होतील. कारण कर्म करणारा क्षणिक असल्या मुळें भोगकाळीं तो मुळींच उरत नाहीं. कदाचित् एक कर्म करितो, आणि दुसरा फळ भोगितो असें ह्मणशील तर हेंही असंभवनीय आहे; ह्मणून ज्यानें कर्मे केलीं, तोच मी सांप्रत त्याचें फळ भोगीत आहें. अशा प्रकारें पूर्वोत्तर कालांचा परामर्ष बाळगणारा, दोनींही काळीं कोणी तरी एक स्थायी आहे असें स्पष्ट अनुभव सिद्ध असतां क्षणिकत्व मानणें विचारी पुरुषांस अयोग्य होय.

पुनः ह्मणशील कीं, हें सर्व जरी क्षणिक आहे तरी संतानरूपानें नित्य आहे. ह्मणजे क्रमा क्रमानें उत्पन्न होणाऱ्या, व परस्परांशीं संलग्न असणाऱ्या ज्या सजातीय वस्तु त्यांतील कार्यरूपानें नित्य आहे ह्मणून समान संतानांतील पूर्वप्रत्यय कर्मकर्ता आणि उत्तर प्रत्यय फलभोक्ता होण्यास अवघड तें कोणतें? यांत एकानें कर्म करावें आणि भलत्यानें फल भोगावें, हा अतिप्रसंगही येत नाहीं. कारण त्या दोहों प्रत्ययांचा कार्य कारण भाव नियामक आहे. या विषयीं सर्वदर्शन संग्रहांत अर्हतांचें ह्मणणें विद्यारण्यांनीं या प्रमाणें लिहिलें आहेः—

यस्मिन्नेव हि संताने आहिता कर्मवासना ॥ फलं तत्रैव बध्नाति कार्पासे रक्तता यथा ॥ १ ॥ कुसुमे बीजपूरादे र्यल्लाक्षाद्युपसिच्यते ॥ शक्तिराधीयते तत्र काचितां किं न पश्यसीति ॥ २ ॥

अर्थः— जसें कापसाचें बीज लाखेच्या रंगानें रंगवून पेरलें असतां अंकुरादि परंपरेनें कापसाचे ठिकाणीं तांबडा रंग येतो, तसें पूर्वप्रत्ययानें केलेल्या शुभाशुभ कर्माचें फळ परंपरेनें उत्तर प्रत्यय भोगतो. परंतु हें तुझें ह्मणणें व्यर्थ आहे. अरे, तूं जो दृष्टांत दिलास त्यांत कापसाच्या बीजाचा नाश रंग देतांच अंगीकारिला नाहींस. अर्थात् तुझा क्षणिकत्व पक्ष सहज बुडाला. दुसरें असें पहा कीं, बीज, अंकुर, स्कंध, शाखा, पत्र, पुष्प व फळ यांचाही क्रमानें संतानीं संतान या रूपानें परस्पर संबंध आहे. यांत जर असें होईल कीं, बीजाच्या नाशा नंतर अंकुर, अंकुर नाशानंतर स्कंध, स्कंधनाशा नंतर शाखा, त्या नाश पावल्यावर पानें, पानें नाश पावल्यावर फुलें, आणि फुलें गळाल्यावर फळें येतील, तर मात्र क्षणिकत्व सिद्ध होऊन पूर्वप्रत्यय कर्ता, व तो नष्ट झाल्यावर उत्तरप्रत्यय फलभोक्ता असें ह्मणतां येईल; परंतु तसें मुळींच होत नाहीं.

आतां कार्य कारणभाव नियामक आहे असें जें तूं ह्मटलेंस तेंही संभवत नाहीं. पहा गुरूचें ज्ञान शिष्यज्ञानास कारण आहे, व शिष्याचें ज्ञान त्याचें कार्य आहे.

यांत गुरूच्या ज्ञानानें जें जें अनुभविलें त्याचें स्मरण शिष्यज्ञानास व्हावें. अथवा गुरूनें केलेल्या कर्माचें फळ शिष्यानें भोगावें, तसें घडत नाहीं; तथापि घडतेंच असें ह्मणशील तर, कृतप्रणाश आणि अकृताभ्यागम हे त्यावर दोन दोष येतील. कृतप्रणाश ह्मणजे ज्यानें जें कर्म केलें तें त्याच्या भोगास न येतां सरलें, आणि अकृताभ्यागम ह्मणजे कांहीं कर्म न करितां कोणाच्या तरी भोगास आलें.

पुनः क्षणिकत्व पक्ष स्वीकारिला तर, ज्ञानकालीं ज्ञेय नाहीं, व ज्ञेयकालीं ज्ञान नाहीं, असें होऊन, ज्ञान व ज्ञेय यांचा ग्राह्य ग्राहकपणा संभवत नाहीं, व तो न संभवला तर संपूर्ण लोकव्यवहाराचा अस्त होईल. तूं ह्मणशील, ज्ञानामध्यें ज्ञेयाचा संस्कार राहिल्यानें व्यवहार चालेल; परंतु क्षणिकत्वामुळें संस्कारच राहणें मुळीं दुर्घट आहे. तस्मात् क्षणिकत्व वाद युक्तीला अगदीं असत्य आहे.

येणें प्रमाणें बौद्धांच्या क्षणिकत्व पक्षाचें खंडन करून अर्हत आपलें मत सांगतो:-

सर्वज्ञो जितरागादि दोष स्त्रैलोक्य पूजितः ॥ यथास्थितार्थ वादीच देवोऽर्हन् परमेश्वरः ॥ १ ॥ कर्त्ता न तावदिह कोपि यथेच्छया वा दृष्टोऽन्यथाकर कृतावपि तत् प्रसंगः ॥ कार्यं किमत्र भवनापि च तक्षकाद्यै राहत्य च त्रिभुवनं पुरुषः करोति ॥ २ ॥ कर्त्तास्ति नित्यो जगतः स चैकः स सर्वगः स स्ववशः स सत्यः ॥ इमाः कुहेयाः कु बिडंबना स्यु स्तेषां न येषा मनुशासक स्त्वं ॥ ३ ॥

अर्थ- सर्वज्ञ, रागादिदोष जिंकलेला, त्रैलोक्य पूज्य, आणि यथार्थ वादी, असा जो देव अर्हन् तो परमेश्वर होय. जगाचा कर्त्ता एक कोणी आहे असें नाहीं. तसेंच स्वतः कर्त्या वांचून झालें असेंही दिसत नाहीं; कारण चटई वगैरे पदार्थ कर्त्या वांचून झालेले आढळत नाहींत. जर एकानेंच जग केलें असतें तर पृथिव्यादिक तत्त्वांची त्याला काय गरज होती पहा. घर बांधणें झालें तर गौंडी, सुतार, मजूर इत्यादि पुष्कळ लोक लागतात. मग एवढें विस्तीर्ण जग तें एकाच्यानें कसें करवेल. तस्मात् सारीं तत्वें परस्पर मिळून त्यां पासून जग उत्पन्न होतें. जगाचा कर्त्ता नित्य, एक, सर्वगत आणि स्वतंत्र ह्या कुत्सित कल्पना त्यांच्याच मतांत दिसतात कीं, ज्यांस सर्वज्ञ जो तूं अर्हन् तो उपदेश करीत नाहींस. सारांश जगाचा कर्त्ता एक नाहीं, व तो स्वतंत्र आणि सर्वगतही नाहीं.

मोक्षाचीं साधनें कायतीं तीन आहेत. सम्यक् दर्शन, सम्यक् ज्ञान व सम्यक् चरित्र.

रुचिर्जिनोक्त तत्वेषु सम्यक् श्रद्धा न मुच्यते ॥ जायते तन्निसर्गेण गुरोर-

धिगमेनवा ॥ यथावस्थित तत्वानां संक्षेपाद्विस्तरेणवा ॥ योऽव बोधस्तमत्रा-
हुः सम्यक् ज्ञानं मनीषिणः ॥२॥ सर्वथा वद्य योगानां त्यागश्चारित्र मुच्यते
कीर्तितं तदहिंसादि व्रतभेदेन पंचधा ॥ अहिंसा सूनृतास्तेय ब्रह्मचर्यापरि-
ग्रहाः ॥३॥ चिदचिद्वे परे तत्वे विवेकस्तद्विवेचनं ॥ उपादेय मुपादेयं हेयं हेयंच
कुर्वतः ॥४॥

अर्थ– सम्यक् दर्शन ह्मणजे अर्हतानें प्रतिपादन केलेल्या तत्वार्थावर म्हणजे जिनोक्त तत्वां-
वर रुचि असणें. सम्यक् ज्ञान म्हणजे, जीवादिक पदार्थ ज्या स्थितीनें आहेत त्या स्थिती-
चें मोह संशयरहित ज्ञान असणें. हें ज्ञान पांच प्रकारचें आहे. म्हणजे मतिज्ञान. २श्रु-
तज्ञान. ३ अवधिज्ञान. ४ मनःपर्यायज्ञान. ५ आणि केवलज्ञान. आणि सम्यक् चारित्र
ह्मणजे पातकास उत्पन्न करणाऱ्या कर्मांचा त्याग करणें. याचे अहिंसा, सूनृत, अस्ते-
य, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह असे पांच भेद आहेत. या तिहींनीं मोक्ष होतो एकेका-
नें होत नाहीं. या जगांत जीव आणि अजीव अशीं दोन तत्वें आहेत. त्यांस ज्यास बोध
आहे तो जीव व इतर अजीव अशा विवेचनाचें नांव विवेक होय. अशा प्रकारें या म-
तांतील हा सारांश आहे.

जैन मतांतील साधु भिक्षाशन करणारे, केशांचें उलुंचन करणारे, श्वेतांबर प-
रिधान करणारे, क्षमाशील व निःसंग असतात. कित्येक दिगंबर ह्मणजे रक्तांबर
धारण करणारे, आणि पाणिपात्र ह्मणजे हस्तरूप पात्र येणें करूनच अशन करणा-
रे इत्यादि प्रकारचे असतात. परंतु ते बौद्धास मानितात. अर्हतास मानीत नाहीत.

अशा प्रकारें अर्हतानें जैनमत स्थापून त्याचा प्रसार केला. नंतर धर्मसंबंधीं
कित्येक ग्रंथ लिहून, व जागोजाग आपले मठ स्थापून, त्यां करितां राजे लोकांकडून
उत्पन्नें करून घेतलीं. अर्हताच्या वयास चाळीस वर्षे झालीं असतां शिशुनाग वंशां-
तील शेवटला अथवा दाहावा राजा जो महानंदी तो मरण पाऊन मगध देशीय क्ष-
त्रिय राजवंश बुडाला, व शूद्र जातीय नंदराजांची कारकीर्द सुरू झाली. या कारकी-
र्दीच्या पस्तिसाव्या वर्षी ह्मणजे आपल्या वयाच्या सुमारें ९० व्या वर्षी युधिष्ठिर श-
क १५३३ मध्यें विकारिनामक संवत्सरीं ज्येष्ठ वद्य द्वादशीस गुरुवारीं पुष्कर तीर्थीं अ-
र्हत परलोकवासी झाला. हा जो संवत्सर येथें लिहिला आहे, तो प्रभवा पासून गण-
लेला आहे. असे संवत्सर जैन ग्रंथकर्ते कां गणतात त्याची उपपत्ति आह्मीं प्रस्ताव-
नेंत दिली आहे.

अर्हन्– जैन ज्या नावानें ईश्वरास हांक मारितात तो. "सर्वज्ञो जितरागादि दोषस्त्रैलोक्य

पूजितः॥ यथास्थितार्थ वादीच देवोऽर्हन् परमेश्वरः॥"- यासच हल्लींचे जैन अरिहंत अथवा अरिहंता अशा नांवानें वारंवार स्मरतात.

**अलक**- हरविजय ग्रंथाचा टीकाकार. (बुल्ह० का० शोध०)

**अलकदत्त**- कल्याण कवीचा गुरु. (बुल्ह० का० शोध०).

**अलंकार**- शालिवाहनाच्या ११ व्या शतकाच्या उत्तरार्धांतील काश्मीर येथील सुशल राजाचा दिवाण. हा जातीचा ब्राह्मण होता. याचा भाऊ, जो मंखककवि त्यानें श्रीकंठ चरित्र नांवाचा केलेला संस्कृत ग्रंथ, तो यानें कसा उतरला आहे हें भावाच्या सांगण्यावरून पाहण्यासाठीं पंडितांची सभा केली. त्या वेळेस तीस पंडित जमले होते. त्यांचीं नावें खालीं लिहिलीं आहेत:-

१ आनंद कवि नैयायिक. २ आनंदकवि दुसरा. ३ कल्याणकवि. ४ गर्गकवि. ५ गोविंद कवि. ६ जनकराज वैदिक व वैयाकरणी. ७ जल्हण. ८ जिंदुकमीमांसक. ९ तेजकंठ. १० त्रैलोक्यकवि मीमांसक. ११ दामोदर. १२ नंदन. १३ नागकवि. १४ पद्म. १५ पद्मराज कवि. १६ प्रगट. १७ भूद्द. १८ मंडन मंखाचा गुरुबंधु. १९ योगराज. २० रमयदेव. २१ रुय्यक मंखाचा गुरु. २२ लक्ष्मी देव. २३ लोष्ठकवि. २४ वागीश्वर. २५ श्रीकंठ. २६ श्रीगर्भ. २७ श्रीगुण. २८ श्रीवत्स. २९ शंभु. आणि ३० सुहल. हे तीस कवि कोण कोठले वगैरे वृत्तांत त्यांच्या त्यांच्या नांवावर पहावा. (बुल्ह० का० शोध०).

**अलंकारचूडामणि**- संस्कृत भाषेंत हेमचंद्रकृत ग्रंथ.

**अलंकारतिलक**- संस्कृत भाषेंत वाग्भट्टकृत. अलंकार विषयावर.

**अलंकार रत्नाकर**- शोभाकर पंडित कृत संस्कृत भाषेंत.

**अलंकार विमर्षिणी**- जयरथ कृत अलंकार सर्वस्वावर टीका.

**अलंकारशेखर**- राजा माणिक्य देवकृत. कोणी ह्मणतात हा ग्रंथ यानें दुसऱ्याकडून करविला.

**अलंकारसर्वस्व**- अलंकार विषयावर रुय्यक कवीनें केलेला संस्कृत ग्रंथ.

**अलंकारोद्धारण**- शोभाकर पंडिताचा अलंकार विषयावर हा दुसरा ग्रंथ.

**अलकावती**- अळंदी गांवाचें जुनें नांव.

**अलखबुलाखी**- हा कवि जातीचा साठोदरा गुजराथी ब्राह्मण अमदाबाद येथें रहात असे. हा शांकर मतानुयायी होता. याची मान्यता लोकांत चांगली असल्या मुळें लोक याच्या पादुकांची पूजा करितात. यानें गुजराथी भाषेंत पदें वगैरे कविता पुष्कळ केलेली आहे, व हा शालिवाहन १७६० मध्यें होता अशा विषयीं चांगला आधार आहे.

**अलंप्रभु**— हा जातीचा आराध्यज्ञातीय तैलंग ब्राह्मण होता. लिंगाईत धर्माचा स्थापक जो बसव तो याचा शिष्य असे. प्रभुलिंगलील ह्मणून जो तैलंग भाषेंत ग्रंथ आहे त्यांत याचें वर्णन या प्रमाणें लिहिलेलें आढळतें. हा शिवांशानें जन्मला होता. व अत्यंत पवित्र वर्तणुकीचा असे. हा शांत, पुष्कळ प्रवास केलेला व जागोजाग अनेक चमत्कार दाखविल्या मुळें लोकांत प्रख्यातीस आलेला असा होता. याचें शरीर वज्रासारखें बळकट होतें. इत्यादि याची हकीगत ब्रौन साहेबानें आपल्या ग्रंथांत लिहिली आहे. (ग्यारे० को०)

**अलमगीर**— अहमद्शाहाच्या मागून दिल्ली येथें झालेला बादशाहा. हा शके १६७६ पासून १६८१ पर्यंत पांच वर्षें गादीवर होता, व पुढें पदच्युत झाला. (हिंदु० छा० इति०).

**अलाहाबाद**— प्रयागाचें नांव.

**अवतारकवि**— ईश्वर शतक नामक ग्रंथाचा कर्ता. (बुल्ह० का० शोध.)

**अवंती नगरी**— माळव्यांतील नामांकित नगरी, व विक्रमादित्याची राजधानी. भास्कराचार्यांनीं ही किती अंशांवर आहे त्या विषयीं या प्रमाणें लिहिलें आहे.—"निरक्ष देशात् क्षिति षोडशांशे भवेदवंती गणितेन यस्मात् ॥ तदंतरं षोडश संगुणंस्यात् भूमानमस्मात् बहु किंत दुक्तं ॥". अर्थः— निरक्ष देश ह्मणजे लंका तिजपासून भूमीच्या एकंदर परिधीच्या १६ व्या भागावर अवंती आहे. अर्थात् या नगरीचे उत्तर अक्षांश २२½ आहेत. नकाशा मध्यें ही नगरी हल्लीं २३ उत्तर अक्षांशावर लिहिलेली आढळते. आमचे ज्योतिषि लंके पासून उत्तर ध्रुवा पर्यंत गेलेली याम्योत्तर रेषा या नगरी वरून गेल्याचें समजतात, व तिला आपली याम्योत्तर रेषा मानितात. हल्लींच्या शहरा पासून दक्षिणेस एका मैलावर हें शहर पूर्वीं होतें असें दिसून येतें. कारण, तेथें भूमींत खणिलें असतां इमारतींचे खांब वगैरे अजून आढळतात. या नगरीस हल्लीं उज्जनी नांवानें लोक व्यवहार करितात. येथें महाकालेश्वर नांवाचें ज्योतिर्लिंग आहे. असें सांगतात कीं, येथें विक्रमादित्याचा संगमरवरी दगडाचा एक पुतळा स्थापिलेला होता; परंतु तो मुसलमानांनीं फोडून टाकून नाहींसा केला. (मांडे० शका०)

**अवंतीवर्मा**— काश्मीर येथील एक राजा. (बुल्ह० का० शोध.)

**अवधूतकवि**— भगवद्भक्तिनामक स्तोत्राचा कर्ता. हा काश्मीराकडील राहणारा होता. (बुल्ह० का० शोध.)

**अवधूतगीता**— गोरक्षनाथकृत संस्कृत गीता. हिजमध्यें दत्तात्रेयाचा व गोरक्षाचा संवाद आहे.

**अवघ्नतिपुरी**— अजमीर शहराचें जुनें नांव.

**अवसर्पिणी—** जैनलोक काळाचे दोन भाग करितात, व त्यांस उत्कृष्ट आणि निकृष्ट अशा अभिप्रायानें उत्सर्पिणी व अवसर्पिणी अशीं नांवें देतात. यावरून अवसर्पिणी हा निकृष्ट काल असून त्याचे साहा भाग ते कल्पितात. त्यांचीं नांवें अशीं आहेत. १ पहिला सुसमसुसम. २ सुसम. ३ सुसम दुःसम. ४ दुःसम सुसम. ५ दुःसम आणि ६ दुःसम दुःसम. सांप्रत पांचवा कालभाग दुःसम म्हणजे दुःखाचा आहे, व त्याचें प्रमाण २१००० वर्षांचें आहे, असें त्यांचें मत आहे. (प्रव॰ शारो॰)

**अवीह—** बौद्धमतांत मानिलेला अठरावा स्वर्ग.

**अव्ययवृत्ति—** हा ग्रंथ व्याकरण विषयावर संस्कृतांत आहे व तो काश्मीराकडील कृष्णस्वामि कवीनें केलेला आहे.

**अव्हेयर—** ही नामांकित कवयित्री सुमारें दोन हजार वर्षां मागें होऊन गेली. हिचें जन्म तामिळ देशीय लोकांच्या जातींत झालें. ही व हिचीं साहा भावंडें मिळून सात माणसें ज्ञानी होतीं म्हणून, जशी यांची कीर्ति स्वदेशीं होती, तशीच परदेशीं व द्वीपांतरींही होती असें म्हणतात. या सात भावंडांत अव्हेयर आपगा, वालीज आणि मुरगा ह्या चौघी स्त्रिया परस्पर बहिणी आणि तेरू वेलुर, आधिकनान आणि कपिलर, असे तिघे पुरुष भाऊ होते.

अव्हेयर नीतिशास्त्र, ज्योतिष शास्त्र, वैद्यशास्त्र, भूगोल व रसायन विद्या, यांत इतकी निष्णात होती कीं, त्या प्रत्येक विषयावर तिनें ग्रंथ लिहिले आहेत. अत्तिसुदी, कोनिवेंडन, मुदुरसी, नादवाली इत्यादिक हिचे नीतिशास्त्रावरील ग्रंथ होत. याच प्रमाणें इतर विषयांवरही ग्रंथ असून तामिळ देशांतील विद्यालयांत ते सर्व शिकविण्याची चाल आहे. यावरून या स्त्रीची योग्यता केवढी मोठी होती हें सहज समजून येतें. असो, अव्हेयर ही इतर विद्यांत जशी पारंगत होती, तशीच मंत्रशास्त्र, धातुवाद व कल्पविद्या यांतही होती. असें सांगतात कीं, कल्पविद्येच्या योगानें ही २४० वर्षे वांचली होती.

अव्हेयरचा बाप पिरली अशा नांवाचा एक तामिळ ब्राह्मण होता, व आई अतिशूद्र जातीची होती. ब्राह्मणास अतिशूद्र जातीची स्त्री कशी मिळाली, व मुलें होण्याचा योग कसा घडून आला तो वृत्तांत आम्हीं पिरलीच्या नांवावर लिहिला आहे. (पिरली शब्द पहा.) अव्हेयर हिचें जन्म झाल्यावर, पिरलीनें हिला अरण्यांत सोडून दिलें असतां तिला एका कवीनें पोशिलें, व ती बुद्धिमान् आहे असें पाहून तिला विद्या शिकविली. त्यावरून ही विद्वान् होऊन मोठ्या प्रख्यातीस आली. मरे पर्यंत हिनें लग्न

न करितां, आपला काळ ब्रह्मचर्य व्रतानें विद्याभ्यासांत व कविता करण्यांतच घालविला अशी हिची कीर्ति अजून लोक गातात. (कविच०)

**अशीरगड**– हा किल्ला बऱ्हाणपुराच्या उत्तरेस साहा कोसांवर आहे. येथें गंगा व यमुनानां-वाची दोन लेणी आहेत व त्यांत पाणी खेळविलेलें आहे.

**अशोकराजा**– यास कोणी अशोकवर्धन अथवा विशोक असेंही ह्मणतात. हा राजा मौर्यवंशी ह्मटलेला आहे. याच्या बापाचें नांव वारिसार होतें. व तो चंद्रगुप्ताचा पुत्र होता. अर्थात् हा राजा चंद्रगुप्ताचा नातू असून त्यापासून तिसरा पुरुष होता. जैनलोकांच्या ग्रंथांत याचा राज्याभिषेक युधिष्ठिर शकाच्या १७४५ व्या वर्षी प्रजापतिनामक संवत्सरांत लिहिला आहे. व हा पंचेचाळीस वर्षें राज्य करून शेचाळिच्या वर्षी युधिष्ठिर शक १७९१ पिंगलनामक संवत्सरीं मरण पावला ह्मणूनही लिहिलें आहे.

वरील शका वरून उघड सिद्ध होतें कीं, या राजास राज्याभिषेक झाला त्या गोष्टीस आज ४९८० व्या वर्षी ३२३५ वर्षें झालीं आहेत. क्लासिकल डिक्शनरींत ग्यारेट साहेबानीं हाच काळ इसवी सना पूर्वी तीनशें पंचवीस वर्षें लिहिला आहे. व त्या वरून-या राजास होऊन गेल्यास बावीसशें वर्षें सुमारें झालीं आहेत असें दिसतें. परंतु तो त्यानीं लिहिलेला काळ हजार वर्षांनीं उणा असल्या मुळें जैनांच्या ग्रंथाशीं व भागवताशीं विरुद्ध आहे ह्मणून चुकीचा आहे. ही एवढी चूक कशी झाली, तिचें कारण आह्मी चाणक्य शब्दावर लिहिलें आहे. यास्तव (चाणक्य शब्द पहा) ह्मणजे खात्री होईल.

इतिहास कर्त्यांनीं असें लिहिलें आहे कीं, हा राजा जैनधर्मी असून मोठा द्रव्यवान् होता. त्या मुळें यानें जैनधर्म अतिशय उत्कर्ष दशेस आणिला. तो असा कीं, प्रथमतः यानें चौसष्ट हजार बौद्ध पुरोहितांस आश्रय देऊन, सर्व हिंदुस्थानांत चौऱ्यांयशीं हजार शिलास्तंभ उभारिले. यानें शिलास्तंभांवर जे लेख कोरविले ते प्राचीन लिपीचे असून पाली अथवा मागधी भाषेंत आहेत. यानें आपल्या कारकिर्दींत जैनपुरोहितांची सभा भरवून त्यांच्या अनुमतानें सिंहलद्वीप आदिकरून मोठमोठाल्या ठिकाणीं उपदेशक पाठविले व जैनधर्माचा अतिशय प्रसार केला. याच्या कोरीव लेखां विषयीं कित्येक असें ह्मणतात कीं, त्यांत यानें ग्रीस देशांतील राजपुत्रांचीं नांवें कोरिवलीं आहेत, परंतु ज्या राजपुत्रांचीं तीं नांवें असतील, ते, वर ज्यांहीं अशोक राजाचा काळ दाखविला त्या वेळचे असले तरच ते लेख संभाव्य होतील नाहीं तर होणार नाहींत.

हा राज्य करीत असतां यानें राज्यांत पुष्कळ घडामोडी केल्या. अनेक लहान ल-

हान राज्यें मोडून आपल्या राज्यास जोडिलीं. पांडवांच्या वंशांतील शेवटला राजा क्षेमक ज्यास (लक्ष्मीदेव) असें ह्मटलें आहे त्यास ज्या त्याच्या वीरसेन प्रधानानें मारून राज्य बळकाविलें, व दिल्ली मध्यें गादी स्थापिली, त्याच्या वंशाची समाप्ति केली. मेवाड, मारवाड, भाटिया वगैरे प्रांतांत आपला अंमल बसविला व पुष्कळ लोकांस आपल्या मतांत ओढिलें. ह्या युधिष्ठिर शकाच्या वर लिहिलेल्या वर्षी फाल्गुन वद्य १० मंदवारीं बाहार प्रांतांतील मुंगेरी शहरांत सायंकाळच्या समयीं मरण पावला. याचा पुत्र सुयश तो याच्या मागें राज्य करूं लागला. यानें लेणीं कोरविलीं त्या बद्दलचा उतारा आह्मी जैन ग्रंथांतून घेऊन खालीं दिला आहे तो असाः—

"युग्मऋक्ष तृतीयेचा कूपारा भूमिसंज्ञकेः॥ [१७६२] वामेन मेलनाल्लब्धा ज्ञातव्यागत वत्सराः॥ शकस्य पंडुपुत्रस्य तस्मिन्वर्षे महा दिने॥ शुचौ मासेतु राकायां समाप्ति मगमत्सभा॥ तावत्तस्मिन्महा राज्यं कृतवान् वसतिं तदा॥ अश्विनौ भूश्च [१२] वामेन एकत्वेन यथावधिः॥ तावद्दक्षिण काष्ठायां स्थितो राजा महा बलः॥ विरोधि वत्सरे सम्यक् सोमवारे शुभे दिने॥ समाप्तिमगमत्कार्यं सभा दुर्गादिकं महत्॥" ततो राजा ज्योतिर्लिंगं घृष्णेश्वर मरिंदमः॥ भक्त्या च नम्र वृत्याच पूजां चक्रे यथा विधिः॥ ततो गतो दक्षिणाशां जिगीषार्थं महाबलः॥ येनकेन प्रभावेन कार्याणि कृतवान्प्रभुः॥ तत्सर्वं विस्तरेणैव वदामि जिन सत्तम॥

अर्थः—अशोक राजा सैन्यासहवर्तमान दक्षिणदिशा जिंकण्या साठीं निघाला तो नर्मदा नदी उतरून वेरुळास आला व तेथें त्यानें डोंगरी किल्ला देवगड नांवाचा बांधिला. तसेच आणखी कित्येक किल्ले बांधून अनेक लेणीं करविलीं. नंतर सुदर्शन नांवाचा कोणी बलाढ्य राजा महाराष्ट्र देशांत राज्य करीत होता, त्यावर त्यानें स्वारी केली. तेव्हां तो राजा युद्धास येऊन दोघांचें युद्ध नेवासें येथें झालें. त्यांत सुदर्शन मरण पावला असतां त्याचें राज्य वगैरे सर्व हरण करून व त्याच्या पुत्रास आपला ताबेदार करून तगर येथें आपली राजधानी केली. पुढें वीरबाहु नामक जैनास तेथें स्थापून पुनः अशोक देवगडास आला. तेथून त्यानें आपले सरदार वराड, बंगाला, तैलंगण, पांड्य, केरल, तोरल इत्यादि ठिकाणीं पाठवून ते देश काबीज करविले, व तेथें तेथें आपले जैन अधिकारी ठेविले. हें सर्व कृत्य व लेणीं वगैरे कामें होत पर्यंत यानें देवगडास राहून तेथूनच सर्व राज्यकारभार चालविला. लेणीं कोरण्याचें काम युधिष्ठिर शक १७६२ वें वर्ष गत होऊन १७६३ मध्यें विरोधि संवत्सरांत आषाढ शुद्ध १५ सोमवारीं

समाप्त झालें. हीं कामें आटोपण्यास १२ वर्षे लागलीं. तों पर्यंत हा देवगडासच राहिला होता. या वरून लेण्याच्या कामास आरंभ युधिष्ठिर शक १७५० मध्यें झाला होता,असें उघड सिद्ध होतें. नंतर घृष्णेश्वर ज्योतिर्लिंगाची यानें मोठ्या भक्तीनें पूजा करून,स्व-तः दक्षिणेंत गमन केलें.

मि॰ग्यारेट साहेबांनीं आपल्या कोशांत या वृत्तांता बद्दल कांहींच लिहिलें ना-हीं. मात्र इतकीं कामें करण्यास यानें इतका पैका कोठून आणिला त्या विषयीं अ-सें लिहिलें आहे कीं, नंदराजां पैकीं एका नंदानें नदींत एक खड्डा कोरवून त्यांत आठ को-ट रुपये ठेविले होते. ते यास सांपडले व त्या पैशावर हीं कामें झालीं एवढें लिहिलें आहे.

**अशोकवर्धन**— अशोक राजा तोच.

**अशौचनिर्णय**— हा ग्रंथ संस्कृतांत आहे. याचे कर्ते वेगळाले असून ग्रंथही भिन्न भिन्न आ-हेत. भट्टोजी दीक्षितांनीं व नागोजी भट्टांनीं हे ग्रंथ लिहिले आहेत.

**अश्वधाटी**— जगन्नाथराय पंडितानें लिहिलेला संस्कृत ग्रंथ. याचे श्लोक सत्तावीस आहेत. व हा त्यानें आपला नातू रामचंद्र यास उद्देशून त्याच्या बोधार्थ केला आहे.

**अश्वमेधक**— युधिष्ठिर कुलोत्पन्न सोमवंशी राजा. सहस्रानीक राजाचा पुत्र व असीम कृष्णा-चा बाप. यानें ८१ वर्षे ११ महिने २४ दिवस राज्य केलें,व त्या वेळेस कलियुगाची एकंदर चारशें एकतीस वर्षे सुमारें झालीं होतीं. (हिंदु॰ हस्त॰ इति॰) व (राजमा॰)

**अष्टावक्र**— संस्कृत भाषेंत असलेला अद्वैतमताचा ग्रंथ. याचे वीस उपदेश अथवा प्रकरणें करून सुंदर कवीनें हिंदुस्थानी भाषेंत कविता केली आहे.

**असिक्नीनदी**— पंजाबांत ज्या प्रसिद्ध पांच नद्या आहेत त्यांतील जी चंद्रभागा नदी तिचेंच जु-नें नांव.

**असीमकृष्णा**— युधिष्ठिर कुलोत्पन्न सोमवंशी राजा. अश्वमेधकाचा पुत्र व निमिचक्र राजा-चा बाप. यानें ७५ वर्षे ८ महिने व ८ दिवस राज्य केलें. व त्या वेळेस एकंदर कलियु-गाचीं वर्षे सुमारें पांचशें साहा झालीं होतीं. (राजमा॰) व हिंदु॰ हस्त॰ इति॰)

**अहमदनगर**— नगर ह्मणून जें शहर आहे तेंच. याचे उत्तर अक्षांश सुमारें १९° व पूर्व-रेखांश ७५° आहेत.

**अहमदशाहा**— नादीरशाहा स्वारी करून स्वदेशीं गेल्यावर दिल्लीस झालेला बादशाहा. हा शके १६७० पासून १६७६ पावे तों साहा वर्षे गादीवर होता. व पुढें पदच्युत झाला.

**अहल्याबाई**— ही महा साध्वी व नामांकित बाई होळकर घराण्यांत होऊन गेली. मल्हार-राव होळकराचा मुलगा जो खंडेराव त्याची ही बायको व मालीरावाची आई होती

हिचा नवरा व मुलगा लवकरच मरण पावल्या मुळें मल्हारराव जो हिचा सासरा त्या-च्या मागें राज्यकारभार पाहणें हिला प्रासच झालें. ही राज्य चालवीत असतां हिनें गंगाधर यशवंत चंद्रचूड, व गोविंदपंत गानू या दोन प्रामाणिक व चतुर ब्राह्मणांस, अनुक्रमें दिवाण व कारभारी नेमून होळकरवंशी तुकोजी रावास सेनापति नेमिलें होतें. हिनें राज्य ३० वर्षें पर्यंत उत्कृष्ट वहिवाटिलें, आणि त्यांत इतकीं धर्मकृत्यें केलीं कीं, सर्व हिंदुस्थानांत हिचें धर्मकृत्य नाहीं असें तीर्थ व क्षेत्र आढळतच नाहीं. ही पुण्यपरायण बाई आपल्या वयाच्या सुमारें ६० व्या वर्षी म्हणजे शके १७०७ त मरण पावली. व सेनापति तुकोजी राव तो, ही असतांच राज्याधिकारी झाला. (हिंदु० हस्त० इति०) व (छा० इ०)

**अहल्योद्धार साक्या**— मोरोपंत कविकृत प्राकृत ग्रंथ.

**अहिक्षत्रानगरी**— पांचाल देशाची प्राचीनकाळीं होती, राजधानी ती. या जागीं प्राचीन नकाशा वरून हल्लीं फरकाबाद शहर आढळतें, व त्यावरून हें शहर उत्तर अक्षांश सुमा० २७° वर व पूर्व रेखांश ७९° वर होतें, असें दिसून येतें. जैन लोकांच्या ग्रंथांत ही नगरी जांगल देशाची राजधानी लिहिली आहे. व त्यावरून असें वाटतें कीं, जैनांच्या ग्रंथाच्या वेळीं, ही त्याचीच राजधानी असावी.

**अहीरदेश**— आभीरदेश शब्द पहा.

**अहीर राजे**— मित्रपाळ वंशांतील शेवटचा राजा विक्रमपाळ त्यास, अहीरनामक त्याच्या वजिरानें मारलें व तो आपण गादीवर बसला. हे राजे एकंदर आठ झाले. ते व त्यांचीं राज्यकारकिर्दीचीं वर्षें येणें प्रमाणें होतीं.

| राजाचें नाव. | राज्य केल्याची वर्षसंख्या. वर्ष | महिने | दिवस. |
|---|---|---|---|
| अहीरराजा | २४ | ० | १० |
| विक्रमअहीर | ३३ | ० | १२ |
| मुलुखचंद्र | ० | २ | २ |
| विक्रमचंद्र | १२ | ७ | १९ |
| मूळचंद्र | २ | ५ | ९ |
| रूपचंद्र | १३ | ११ | ७ |
| मलराणचंद्र | १२ | ० | ४ |
| सूरचंद्र | २६ | ९ | १४ |
| | १२५ | ० | १७ |

येणें प्रमाणें या वंशांतील आठ राजांनीं मिळून एकशें पंचवीस वर्षें व सत्रा दिवस

राज्य केलें. विक्रमपाळास मारलें त्या वेळेस युधिष्ठिर शक एकुणतीसशें अठरा वर्षें अकरा महिने व तेरा दिवस इतका गत झाला होता, व त्यास वरील वर्षे मिळविल्यानें एकंदर ३०४४ वर्षें होतात. सारांश अहीरवंशाच्या राज्यकारकीर्दीची व युधिष्ठिर शकाची समाप्ति बरोबर होऊन, पुढें विक्रम संवत् सुरू झाला. यांतील राजांच्या राज्यकारकीर्दीचा काळ (दिल्लीचें राजघराणें) यावरून पडताळून पाहवा. (हिं० ह० इति०)

**अहोबळ**— द्रविड देशांतील एक गांव. या गांवीं वडगळ संज्ञेची रामानुजाची गादी आहे.

**अळंदी**— या गांवाचें जुनें नांव अलकावती. पुण्याच्या उत्तरेस सुमारें नऊ कोसांवर इंद्रायणी नदीच्या कांठीं हा गांव असून येथें प्रसिद्ध जो ज्ञानेश्वर त्याची समाधि आहे.

**अळें**— हा गांव साधारण मोठा आहे. पुणें व नगर यांच्या मध्यें हा असून ज्ञानेश्वरानें पैठण येथें ज्या रेड्याकडून वेद बोलविले असें लोक ह्मणतात त्याची समाधि येथें आहे.

**अक्षचरण**- }
**अक्षपाद्**- } न्यायशास्त्र कर्त्ता जो गौतम ऋषि त्याचें नांव.

**अक्षयगीता**—गुजराथी भाषेंत आखोभगत यानें केलेली गीता.

## आ.

**आका**— रुद्राजीपंत देशपांडे कऱ्हाडकर त्यांची ही कन्या, व समर्थ रामदास स्वामींची शिष्य. हिचा नवरा लहानपणींच मरण पावल्या मुळें ही बाळविधवा होती. हिला समजूं लागल्यावर हिनें मनाशीं विचार केला कीं, आतां परलोक प्राप्तीचा विचार पहावा. नंतर हिनें बापाच्या अनुमतानें समर्थांचा उपदेश घेतला, व त्यांची सेवा करीत जवळ राहिली. ही मोठी एकनिष्ठ गुरुभक्त होती. हल्लीं परळी किल्यावर जी रामदास स्वामींची समाधि व दगडी सभामंडपा सहित देऊळ आहे तें समर्थांच्या मागें हिनें बांधिलें. समर्थांच्या वडील बंधूच्या मुलांस चांफळास आणून स्थापून संस्थानचा कारभार छत्तीस वर्षें केला. हिनें समर्थांच्या मागून चाळीस वर्षांनीं ह्मणजे शके १६४३ व्या वर्षी देह ठेऊन परलोकीं गमन केलें. (राम० च०)

**आकाशलिंग**— चिदंबर येथें आहे. (चिदंबर) श० पहा.

**आखोभगत**— अमदाबादे जवळ राजपूर ह्मणून गांव आहे तेथील हा राहणारा जातीचा सोनार होता. हा शालिवाहन शकाच्या १६४० व्या वर्षी होता. व यानें गुजराथी भाषेंत केलेली अक्षयगीता त्या प्रांतीं प्रसिद्ध आहे. (काव्यदो० गु०)

**आख्यातटिप्पणी**— हा ग्रंथ न्यायशास्त्र विषयावरील आहे, व तो काश्मीराकडील ग-

हणाऱ्या रघुदेवानें केलेला आहे.

**आगमसार**– हंसराज स्वामींनीं लिहिलेला वेदांतपर ओंवीबद्ध ग्रंथ. पांच समासांची एक पंचिका, अशा याच्या चौदा पंचिका आहेत, व सात सात पंचिकांचें पूर्वार्द्ध, व उत्तरार्द्ध असा त्यांत विभाग आहे. हा ग्रंथ मराठी भाषेंत आहे, व याच्या ओंव्या सुमारें साडेतीन हजार आहेत. हा ग्रंथ आमच्या जवळ प्रत्यक्ष आहे. व यावर शक जरी नाहीं तरी १७६१ त हा झालेला आहे.

**आगवर**– कपिलर कविकृत तामिळ भाषेंतील ग्रंथ. यांत त्यानें आपला व आपल्या अक्षेयर प्रभृति भावंडांचा सविस्तर वृत्तांत लिहिला आहे.

**आचारादर्श**– श्रीदत्त कवीनें केलेला धर्मशास्त्र विषयावरील ग्रंथ.

**आचारार्क**– दिवाकर कविकृत धर्मशास्त्र विषयावरील ग्रंथ.

**आजेय**– शिशुनागवंशीय राजा. दर्भकाचा पुत्र व नंदीवर्द्धनाचा बाप. (राजमा०)

**आत्मपुराण**– शंकरानंद स्वामींनीं केलेला संस्कृत श्लोकबद्ध ग्रंथ. याचे अध्याय अठरा व श्लोकसंख्या सुमारें बारा हजार आहे. या ग्रंथास मूळ आधार उपनिषदांचा आहे, व यांत शांकर वेदांताचें चांगलें स्पष्टीकरण केलें आहे. हा ग्रंथ विद्यारण्यांच्या पूर्वीचा आहे.

**आत्मविलास**– शंभुरामकृत वेदांत विषया वरील ग्रंथ.

**आत्मज्ञान**– हा ग्रंथ गुजराथी भाषेंत आहे. व तो भवानभगत यानें केलेला आहे.

**आत्मार्पण**– संस्कृत भाषेंत अपय्या दीक्षित यानीं केलेला शतश्लोकी ग्रंथ. हा ग्रंथ रचण्या पूर्वी दीक्षितांनीं काय साधन चालविलें होतें तें त्यांच्या नांवावर लिहिलेलें पहावें.

**आत्माराम**– हा एक गुजराथी ब्राह्मण कवि होता. रामवनवास वर्णन तें यानेंच केलेलें आहे. (काव्यदो०गु०) २– समर्थ रामदास स्वामीनीं जे स्फुट ग्रंथ लिहिले त्यांतील एक. याचे समास पांच आहेत, व या मध्यें विषय शांकर वेदांताच्या पद्धतीचा आहे.

**आत्माराम पांडे**– प्रसिद्ध जो तुळशीदास कवि त्याचा बाप. (क०च०)

**आत्यास्वामि**– प्रसिद्ध जे रंगनाथ स्वामि त्यांचे हे धाकटे बंधु. यांचें मूळ नांव विठ्ठलराव आत्या. हे मोठे भगवद्भक्त व अंतर्निष्ठ होते. गृहस्थाश्रमानें वागून चाकरीच्या संबंधानें हे नेहेमीं निजामाच्या हैद्राबादेस असत. (वृद्ध०मा०)

**आत्रेयत्र्यंबक**– उत्तरचंपु ग्रंथाचा कर्ता. (बुल्ह० शो०)

**आदमल्ल**– वैद्यशास्त्र विषयक शार्ङ्गधर ग्रंथाचा टीकाकार. (बुल्ह० शो०)

**आदितराम**– हा एक गुजराथी ब्राह्मण कवि होऊन गेला. याची कविता ज्ञानपरआ-

हे. (काव्यदो०गु०)

**आदिनारायण**— हा ब्राह्मण जातीचा कवि कोठें व कधीं झाला तें कळत नाहीं. परंतु याचीं पदें पुष्कळ आहेत.

**आदिपाल्य**— द्रविड देशांतील एक अग्रहाराचा गांव. हा कांचीनगराच्या आग्नेयीस आहे. प्रसिद्ध जे अपय्या दीक्षित ते मूळ येथील राहणारे होते.

**आधिकनान**— अव्हेयरच्या तीन भावांतील एक. हा मोठा दैववान् होता. पिरली जो याचा बाप त्यानें यास अरण्यांत सोडल्यावर एका राजानें यास वाढविलें. पुढें हा मोठा झाल्यावर यास त्याच राजानें चांगला आश्रय दिल्या वरून अनेक विषयांवर यानें तामिळभाषेंत काव्यें रचिलीं. असें सांगतात कीं, यानेंही आपल्या भावंडांप्रमाणेंच लग्न मुळींच लग्न केलें नाहीं. (कविच०)

**आंध्रकालिदास**— हा तेलंग जातीय ब्राह्मण कवि वारंगूळ शहरचा राहणारा शके९०४ मध्यें होता. विक्रमादित्याच्या सभेंत जो कालिदास होता त्याच्या प्रमाणेंच हा बुद्धिवान् व विद्वान् असे म्हणून, तसाच त्याच्या जातीचा नसून तैलंग होता म्हणून, ओळखी साठीं लोकांनीं याच्या नांवास आंध्रपद जोडिलें तें अजून लोकांत चालत आहे. तेलंगींत व संस्कृत विद्येंत हा उत्कृष्ट प्रवीण होता. यानें अनेक देशांतून पर्यटनें केलीं होतीं. धारेस जो भोजराजा होऊन गेला त्याचा व याचा काळ एकच दिसून येत असल्या वरून त्याच्या पदरीं हाच कालिदास होता हें म्हणणें निराधार होणारनाहीं. (द्वितीयार्थक कालिदास) पहा. यानें ग्रंथ केले त्या विषयीं आमचें मत आह्मी द्वितीयार्थक कालिदास शब्दावर दिलें आहे. कविचरित्रांत संवर्त विजय नांवाचा ग्रंथ मात्र एक याच्या नांवावर आहे.

**आंध्रकौमुदी**— नन्नयभट्टकृत तेलंगी भाषेचें व्याकरण. हा ग्रंथ संस्कृत भाषेंत आहे, व यावर बालसरस्वतीची टीका आहे.

**आंध्रदीपक**— तेलंग भाषेचा अत्युत्कृष्ट जुनाट कोश. याचा कर्त्ता मामिडीं. व्यंकाय्या म्हणून तैलंग होता. (म्यारे० इं० कोश).

**आंध्रदेश**— तैलंगण देशाचें मूळ नांव. कलिंग देशाच्या पश्चिम दिशेकडे हा आहे. राजमहेंद्री, हैदराबाद इत्यादि शहरें यांतीलच होत. कलिंगाच्या नैर्ऋत्येस त्रिलिंग देश प्राचीन नकाशांत आहे. त्या वरून आंध्र देशा सुद्धां सर्वांस तेंच नांव पडलें. पुढें त्रिलिंग शब्दाचा अपभ्रंश तैलंग झाला, व तेंच नांव चालू झालें असें वाटतें.

**आंध्रनामसंग्रह**— लक्ष्मण कविकृत तेलंगी भाषेंतील नांवाचा संग्रह.

**आंध्रप्रयोगरत्नाकर**– अप्पा कविकृत छंदःशास्त्र विषया वरील ग्रंथ. हा फार लोकमान्य आहे. २– तेलंगी भाषेंतील ह्मणींचा संग्रह. याचा कर्त्ता बप्पनकवि होता.

**आंध्रभृत्य राजे**– युधिष्ठिर शकाच्या २१व्या शतकाच्या समाप्तीस या राजांचा उदय झाला. हे राजे तैलंग ज्ञातीचे शूद्र होते. काण्व राजांतील शेवटला राजा जो सुशर्मा त्यास त्याच्या आंध्र ज्ञातीय बली नांवाच्या सेवकानें मारिलें, व आपण राज्य करूं लागला. हे राजे एकंदर तीस वर्णिले आहेत व यांची एकंदर राज्यकारकीर्द ४५६ वर्षांची लिहिली आहे. (भाग० १२ स्कंध.) या राजांचीं नांवें येणें प्रमाणें:— १ बलि. २ कृष्ण. ३ श्रीशांतकर्ण. ४ पौर्णमास. ५ लंबोदर. ६ विकल. ७ मेघःस्वाति. ८ अटमान. ९ अनिष्टकर्मा. १० हालेय. ११ तलक. १२ पुरीषभीरु. १३ सुनंदन. या पुढें मध्यंतरीं आठ राजे होऊन गेल्यावर नववा चकोर वर्णिला असल्याचें भागवताच्या टीकेवरून दिसून येतें ह्मणून, २२ चकोर समजावा. २३ शिवःस्वाति. २४ गोमति, २५ पुरीमान्. २६ मेदःशिरा. २७ शिवस्कंद. २८ यज्ञश्री. २९ विजय. ३० चंद्रविज्ञ, यासच लोमधी असेंही नामांतर होतें. ग्यारेट साहेबानीं मधल्या आठांचीं नांवें आपल्या कोशांत दाखविलीं आहेत; परंतु तीं नांवें त्यांनीं कोठून काढलीं तें समजत नाहीं.

**आंध्रसभाचिंतामणि**— आंध्र कौमुदीवर बाल सरस्वतीनें लिहिलेली टीका.

**आनंदक**– हा राजा काव्यप्रकाश निदर्शन ग्रंथाचा कर्त्ता शके १५८७ मध्यें काश्मीर देशांत होता. (बु० का० शो०)

**आनंद कवि**— मंखाच्या ग्रंथाची परीक्षा करण्यास जे ३० पंडित जमले होते त्यांतील एक. हा नैयायिक होता. (बुल्ह० का० शो०) २– तीस पंडितांतील एक. शंभु वैद्य कवीचा पुत्र. (बु० का० शो०). ३– धर्मसंप्रदाय दीपक ग्रंथाचा कर्त्ता. (बुल्ह० का० शोध.)

**आनंदकाव्य**— आनंदकविकृत संस्कृत काव्य.

**आनंदगिरि**– भगवत्पूज्यपाद जे श्री मच्छंकराचार्य त्यांचा हा महाविद्वान् संन्यासी साक्षात् शिष्य होता. यानें शंकरविजय ग्रंथ केला. व तो जो जो वृत्तांत याच्या समोर घडून आला तो तो यानें जशाचा तसाच यथास्थित लिहिला. हा बृहस्पतीच्या अंशानें जन्मला होता ह्मणून माधव पंडितानें आपल्या शंकरविजयांत लिहिलें आहे. तें वाक्य येणें प्रमा०:–

विधिरास सुरेश्वरो गिरां निधिरानंदगिरि र्व्यजायत॥ अरुणः समभूत्स
नंदनो वरुणो जायत चित्सुखाह्वयः॥ (सर्ग ३ श्लोक ६)

यानें स्वतः शंकरविजय ग्रंथाच्या आरंभीं आचार्यांस नमन करून असें ह्मटलें आहे:–

नमामि शंकराचार्य गुरुपाद सरोरुहं॥ यस्य प्रसादान्मूढो ऽपि सर्वज्ञो ऽहं

सदास्थलं ॥ १॥ – गद्य – अथानंता नंत गिरिरह प्रमवि ह्माङ्गस्य भग-
वतः शिष्यः स्वगुरो रवतार प्रयोजनं वर्णयामि॥ असें लिहून नंतर ग्रंथास आरंभ केला आहे. पुढें ग्रंथ समास झाल्याबर शेवटीं या प्रमाणें म्हटलें आहे.

इहतु सकल लोकैः सेव्यमानो गुरुर्मे विदित सकल वेदः शंकराचार्यनामा
मत विदखिल कर्माण्यंतरायाणि हत्वा दिव्रातु परस तत्वोद्धार मोक्षं स एव १

आचार्यांनीं जें गीताभाष्य लिहिलें त्यावर जी याची व्याख्या आहे तिला आनंदगिरा असें म्हणण्याचा लोकांत प्रचार आहे. अनंतानंदगिरि असें हा आपलें नांव ग्रंथांत जरी लिहीत असतो तरी लोकांत वरील नांवाचाच प्रचार फार आढळतो. हा मूळच्या शंकराचार्यांचा शिष्य होता, म्हणून यास होऊन गेल्याला आज २८०० वर्षें पुरीं होऊन गेलीं आहेत. या विषयीं (शंकराचार्य पहिले) हा शब्द पहा.

**आनंदतनय**– हा कवि जातीचा देशस्थ आश्वलायन ब्राह्मण अकोट येथील कुळकर्णी होय. याचें मूळनांव गोपाळपंत असून बापाचें नांव आनंदराव होतें. मुरार परब्रह्म ह्मणून जे एक नामांकित साधु गृहस्थ होते त्यांचा हा शिष्य, व शिवाजीराजाचा बाप जो शाहाजी त्याचा गुरु होता. अरणी ह्मणून जो करनाटकांत परगणा आहे तेथील मामलत याजकडेस होती. याचीं पदें पुष्कळ प्रसिद्ध आहेत. त्यांशिवाय यानें प्राकृत श्लोकबद्ध रचलेलें मार्कंडेयाख्यान व उमारमा संवाद प्रसिद्ध आहे. (वृद्धमा०)

**आनंदतीर्थ**– मध्वाचार्यांचें संन्यास घेतल्या नंतरचें नांव.

**आनंदमूर्ति**– भालगांव येथील राहणारा कोणी एक अनंतभट्ट नांवाचा ब्राह्मण होता. त्यासच पुढें हें नांव पडलें. असें सांगतात कीं, नाशीकचे राहणार कोणी रघुनाथ स्वामि होते. त्यांचा क्रम गंगोत्रीस जाऊन तेथें कावड भरावी व ती रामेश्वरास अर्पण करावी. तेथून सेतु (वाळू) घ्यावा आणि तो गंगेस आणून अर्पावा. याच प्रमाणें पुनः करावें. या प्रमाणें चालत असतां, अनंतभट्ट हा त्यांचा शिष्य होऊन त्यांजबरोबर यात्रा करूं लागला. एकदां रामेश्वरास जातांना रघुनाथ स्वामींचा मुक्काम प्रतिरवेपे प्रमाणेंच ब्रह्मनाळ येथें झाला असतां, लोकांनीं प्रार्थना केली कीं, आतां आपला वृद्धापकाळ झाला आहे यास्तव येथेंच रहावें, परंतु ती गोष्ट त्यांनीं अमान्य करून त्या सर्वांस सांगितलें कीं, हा अनंतभट्ट येथें राहील व हा राहिला असतां आम्हीच राहिलों असें जाणून तुह्मी याची सेवा करावी. इतकें सांगून यास तेथें ठेविलें. व आपण निघून गेले. तेव्हां पासून याच्या आनंदित वृत्तीवरून यास असें नांवपडलें.

हा पुरुष चांगला समाधानी होता, व समर्थ रामदास स्वामि यांच्या पंचायतनांत याची गणना होती. याची समाधि शके १६१८ मध्यें कार्तिक शुद्ध १४चे दिवशीं ब्रह्मनाळींच झाली. (रामदासच०)

**आनंदराव गायकवाड**— गोविंदरावाच्या मागून बडोदें येथील गादीवर बसलेला पुरुष. यानें शके १७२२ पासून १७४० पर्यंत १८ वर्षें अधिकार केला. व पुढें मरण पावला. याच्या मागें याचा भाऊ सयाजी गादीवर बसला. (हिंदु० हस्त० इति०).

**आनंदलहरि**— संस्कृत भाषेंतील एक ग्रंथ. यावर गौरीकांत कवीचें भाष्य आहे.

२— एकनाथ स्वामींचा मराठी ओंवीबद्ध स्फुट ग्रंथ.

**आनंदलहरिभाष्य**— गौरीकांतानें केलेलें संस्कृत भाष्य.

**आनंदवर्धन**— हा ब्राह्मण कवि अवंतीवर्मा राजाचा आश्रित होता, व यानें ध्वन्यालोकलोचन नांवाचा ग्रंथ केला आहे. शालिवाहन शतक १० वा. (बुल्ह० का० शोध).

**आनंदसरस्वती**— सरस्वती संन्यासी यांत जे दोन भेद आहेत त्यांतील दुसरा भेद.

**आनंदानुभव**— हा कवि तत्वदीपिका ग्रंथाचा कर्ता. (बुल्ह० का० शोध.)

**आनंदीटेंकडी**— पैठणा जवळची टेंकडी. (लहान डोंगर) शक कर्ता जो शालिवाहन त्याच्या वेळीं त्या प्रांतांत दुष्काळ पडला असतां, त्यानें या टेंकडींतून हजारों खंडी धान्य व अपरिमित द्रव्य काढून लोकांस उदारपणें वांटिलें, व दुष्काळा पासून त्यांचें संरक्षण केलें. (हिंदु० हस्त० इति०).

**आनंदीबाई**— रघुनाथराव पेशवे म्हणजे राघोबादादा यांची बायको. पेशव्यांच्या घराण्यांत ही केवळ कृत्याच होऊन गेली, नारायणराव जो हिचा पुतण्या त्याला मारेकऱ्यांकडून हिनें मारविलें व घरांत कलागत वाढविली. धाकटा बाजीराव तो हिचा वडील मुलगा होता.

**आनर्तदेश**— द्वारका राजधानीच्या आसमंतातचा प्रदेश. (प्राची० ऐ० कोश०).

**आपग्गा**— ही तामिळ जातीची कवयित्री अव्वैयरची बहीण व पिरलीची मुलगी होती. हिचें जन्म अर्काट प्रांतांतील ऊटकाडू नांवाच्या गांवांत झाल्यावर पिरलीनें हिला तेथेंच रानांत सोडिलें. तीच ही एका परटाच्या स्त्रीस सांपडून तिनें हिचें पालन पोषण केलें. पुढें हिला शास्त्रज्ञान कसें झालें असेल तें असो. हिनें नीतिपातल नांवाचा एक ग्रंथ नीतिशास्त्रावर रचिला व इतर भावंडां प्रमाणें लग्न केलें नाहीं. (कविच०).

**आपिशाली**— एक संस्कृत वैयाकरण होऊन गेला. व्याकरणावर याचा ग्रंथ ही आहे.

**आपेगांव**— पैठणाच्या पश्चिमेस आठ कोसांवर असणारा गांव. निवृत्ति, ज्ञानेश्वर इत्यादि

भावडांचा हा वृत्तीचा गांव होता.

**आपोलिंग—** जंबुकेश्वर तीर्थ. यांतून सर्वदां पाणी वाहतें, म्हणून हें नांव आहे.

**आबाजीपंत पुरंदरे—** पेशव्यांचे मुतालीक. हे सासवडचे कुळकर्णी. यांचे वंशज विद्यमान आहेत.

**आबूचा डोंगर—** हा डोंगर गुजराथेंत आहे. (अबूचा डोंगर शब्द पहा.)

**आभीरदेश—** प्राचीन नकाशांत मरुभूमीच्या दक्षिणेस हा देश लिहिला आहे. जैन ह्मणतात कीं, तापी व नर्मदा या दोन नद्यांमधील जो प्रदेश तो आभीर देश.

**आंमाई—** प्रख्यात तुकारामाचा पूर्वज जो विश्वंभर त्याची स्त्री.

**आयलभास्कर—** हा कवि तैलंग ब्राह्मण होता. याचा उदय शालिवाहनाच्या चवदाव्या शतकांत झाला. यानें केतुमतन ग्रंथाचें तेलंगींत भाषांतर केलें, व पुष्कळ तारा झाल्यावर हा मरण पावला. (कविच०)

**आराध्यब्राह्मण—** तैलंग जातींतील एका शाखेचे ब्राह्मण. निजामहैदराबादेकडे यांचा मोठा भरणा आहे. यांच्या वेषाचा प्रकार असा आहे कीं, यांच्या गळ्यांत यज्ञोपवीत तर असतेंच, व त्या शिवाय लिंगाईत लोकां प्रमाणें लिंगाकृति प्रतिमाही असते. हे आपणांस स्मार्त ह्मणवितात, व भस्म, रुद्राक्ष धारण करितात. लिंगाईत धर्माचा स्थापक जो बसव तो याच जातीचा ब्राह्मण होता. या जातींत कित्येक वैष्णवही असतात. आणि ते गळ्यांत लिंग बांधीत नाहींत. आराध्य ब्राह्मणांत पूर्वी त्रिशूलादिकांच्या तप्तमुद्रा घेण्याची चाल होती; परंतु ती हल्लीं बंद आहे.

**आरावलीडोंगर—** आबूच्या पहाडाचें जें शिखर तें याच डोंगराचा भाग होय.

**आर्द्रक—** आठ जे मोघम आंध्रभृत्य राजे झाले त्यांतील ग्यारेटच्या मता प्रमाणें एक.

**आर्यक—** मृच्छकटिक नाटकांतील एक अवंती नगराच्या राजा विरुद्ध बंड करणारा गुराखी.

**आर्यदीक्षित—** हा कवि जातीचा द्रविड ब्राह्मण स्मार्त होता. हा शके १६०० मध्यें अग्रहार गांवीं होता. व याची मान्यता लोकांत चांगली होती. यानें अलंकारशास्त्र व अध्यात्म विद्या या दोहोंवर मिळून एकंदर ८४ ग्रंथ लिहिले. आपल्या वयाच्या ९०व्या वर्षी द्रविड देशांतील चिलंब्रम गांवीं हा मरण पावला. ग्यारेट साहेबांनीं याचें नांव आपल्या कोशांत आर्यदिक्षित लिहिलेलें चुकून पडलें आहे. (ग्यारे० इं० को०)

**आर्यभट्ट—** हा ब्राह्मण हिंदुस्थाना मध्यें मोठा ज्योतिषी होऊन गेला. याला होऊन गेल्यास आज सुमारें १३०० वर्षे होऊन गेलीं आहेत, असें लेसन साहेब नांवाच्या ए-

का गृहस्थाचें ह्मणणें आहे. आमच्या मतें हा लिहिलेला काळ बिनचूक आहे. कारण सूर्यादिक ग्रह पृथ्वी भोंवते फिरतात. अशा फार प्राचीन मताशीं याचें मत उलट असल्या मुळें, हें मत अर्वाचीन आहे. ह्मणजे याचा आर्यसिद्धांत सूर्यसिद्धांताच्या मागला आहे. सूर्यसिद्धांत कधीं झाला या विषयींची व्याख्या आह्मी त्या शब्दावर दिली आहे. कोलब्रुक ह्मणतो कीं, आर्यभट्ट इ०स०५व्या शतकांत होता. पण तें खोटें.

यानें ज्योतिषावर जीं सूत्रें लिहिलीं आहेत त्यांस कोणी आर्यभट्टीय सूत्रें ह्मणतात, व कोणी आर्यसिद्धांत ह्मणतात. यानें त्यांत असें लिहिलें आहे कीं, पृथ्वी आपल्या आंसा ( कण्या ) भोंवती पश्चिमेकडून पूर्वेकडे लोटत फिरते, आणि त्यामुळें सूर्यादि ग्रह व नक्षत्रें पूर्वेकडून पश्चिमेकडे जातात असें दिसतें. त्यास यानें दृष्टांत दिला आहे तो पुढील आर्येंत येणें प्रमाणें लिहिला आहेः—

" अनुलोम गति नौस्थः पश्यत्यचलं विलोमगं यद्वत् ॥

" अचलानि भानि तद्वत् सपश्चिम गानि लंकायाः ॥ १ ॥

अर्थ— नौकेंत बसणारे लोक, ज्या दिशेकडे नौका जाते, तिच्या उलट दिशेकडे ज्या प्रमाणें तीरचे अचल पदार्थ जातां पाहतात, त्याच प्रमाणें वरील गोष्ट होते. ह्मणजे पृथिवीच्या गतीच्या उलट अचल नक्षत्रें व ग्रह लंकेच्या पश्चिमेस जातात असें दिसतें. (ग्यारे० इं० को०).

**आर्यभाषा—** आर्य लोकांची जी संस्कृत भाषा ती.

**आर्यलोक—** भरत खंडांतील श्रेष्ठ अथवा कुलीन लोक ते. आलीकडे सुमारें सात आठशें वर्षा पासून या लोकांस पश्चिमे कडील लोकांनीं हिंदुलोक असें ठेवलेलें नांव सिंधुनदीच्या संबंधाचें असून नवीन होय. आर्यलोकांच्या उत्पत्ती विषयीं पश्चिमेकडील लोकांचें मत असें आहे कीं, इसवी सना पूर्वीं कित्येक शतकां मागें पृथिवीवर जलप्रलय झाला असतां, नौकेंत बसलेला कोणी नोहा नांवाचा मनुष्य काकेशस पर्वताच्या आश्रयानें जीवंत राहिला. पुढें प्रलय सरून पृथिवी कोरडी झाल्यावर तो पर्वताच्या खालीं उतरला, व त्या पासून जी संतति वाढली, तीपैकीं कित्येक लोक पश्चिमेकडे व कित्येक पूर्वेकडे गेले. त्यांतील पूर्वेकडील लोक तेच आर्य होत.

याच गोष्टीचें प्रतिपादन पूर्वेकडील लोक या प्रमाणें करतात. त्रिविष्टप ह्मणजे तिबेत नांवाचा जो भौमस्वर्गरूप देश ( पृथिवीवरील स्वर्ग ) तेथील राहणारे जे लोक, त्यांतून कांहीं लोक पश्चिमेकडे व कांहीं दक्षिणपूर्व वगैरे दि-

शांकडे गेले. यांत पश्चिमेनर जे लोक ते आर्य होत. हीच गोष्ट ते उपपत्तीनें सिद्ध करितात ती अशी कीं,- जर झालेला प्रलय त्या देशा पुरताच असेल तर आर्यलोक बुडाले नाहींत हें उघडच आहे. आणि जर तो सर्व पृथिवीवर झाला असेल तर पृथिवीवरील सर्व पर्वतांत उंच गणिलेला जो हिमालयपर्वत तो काकेशसाहून उंच ह्मणून न बुडाल्या मुळें त्याच्या आश्रयानें राहणारे आर्य बुडाले नाहींत. एवंच दोहीं पक्षीं आर्य लोक बुडून मरण्याचा संभव नसल्या मुळें, तसेच प्रलयांत सांपडलेले लोक वांचण्याचा वानवा असल्या मुळें, पश्चिमेकडील लोकआर्य लोकांची संतति होय, हेंच ह्मणणें सयुक्तिक दिसतें. (आर्यवि० सुधा०)

या गोष्टीस दुसरें प्रमाण आहे तें असें कीं, पश्चिमेकडील लोक आर्यांची संतति असल्या मुळें, आर्यभाषेचे ह्मणजे संस्कृत भाषेचे शब्द अपभ्रंश रूपानें त्यांच्या भाषेंत जसे आढळतात तसे संस्कृत भाषेंत त्यांच्या भाषेचे शब्द आढळत नाहींत; ह्मणून पश्चिमेकडील लोकांची संतति आर्य नसून, आर्यांचीच संतति ते लोक होत असें कित्येकांचें ह्मणणें आहे, व तें आह्मांसही खरें दिसतें.

**आर्यसिद्धांत**– आर्यभट्ट ह्मणून जो एक प्रख्यात ज्योतिषी होऊन गेला त्यानें रचलेला ग्रंथ. यांत पृथिवी फिरते आणि सूर्यादिक स्वस्थ पदार्थ फिरत नाहींत, असें मत आहे.

**आलसानीपेद्दन्ना**– हा तैलंग जातीय ब्राह्मण कवि शालिवाहन शके १४३० मध्येंहोता. दुप्पट प्रांतांत दुरला नामक गांवीं याचें जन्म झालें, व पुढें याचा उदय नृसिंहदेव रायलू याच्या कारकीर्दींत झाला. यानें लहानपणींच संस्कृत व तेलंगी भाषेचें मार्मिक ज्ञान संपादिलें. याच्या विद्वत्ते वरून याला नृसिंह देवाच्या दरबारांत पंडिताची जागा मिळाली. यानें नृसिंहदेवावर रचलेली कविता त्यानें पाहिली तेव्हां तो फार खुष झाला. कांहीं काळानें नृसिंहदेव वारला, व त्याचा पुत्र कृष्णदेव रायलू विद्यानगरचा राजा झाला, तरी हा दरबारांत होताच. कृष्णदेवानें तर अष्टदिग्गज पंडितांत यास श्रेष्ठ पदवि दिली होती. हा कवि रामभक्त असे, व याची कविता लोकांस फार प्रिय वाटे.

यानें स्वारोचिष मनुचरित्र नांवाचा ग्रंथ फारच उत्कृष्ट लिहिलेला आहे. त्यांत यानें कोणकोणते विषय गुंफले आहेत ते सर्व आह्मी त्या ग्रंथाच्या नांवावर दाखविले आहेत. दुसरा रामस्तवराज हाही ग्रंथ याचाच असून अद्वैतसिध्दांत नांवाचा तिसरा ग्रंथ तेलंगी भाषेंत आहे. असें सांगतात कीं,- हे ग्रंथ रचिले त्या

वेळेस हा ५५ वर्षांच्या वयाचा होता. याच्या साठाव्या वर्षी याचा आश्रयदाता कृष्णदेव रायलू अल्पवयांत मरण पावल्या मुळें, यास अतिशय दुःख झालें. त्या समयीं यानें कृष्णदेवाच्या औदार्यादिक गुणांचें स्मरण करून जी एक स्फुट कविता रचिली आहे तींत इतका करुण रस ओतला आहे कीं, ती कोणी वाचूं लागल्यास त्यास गहिंवर आल्या वांचून राहात नाहीं.

कृष्णदेव मरण पावल्यावर त्याचा पुत्र कृष्णदेवराम रायलू गादीवर बसला. त्यानेंही या कवीची चांगली मान्यता राखिली होती. हा कवि पुढें थोडक्याच दिवसांनीं मरण पावला. लोकवार्ते वरून असें ऐकण्यांत येतें कीं,– हा जीवंत असतांच याची कविता सर्व तैलंगणभर पसरली. व ती मुळें जी यानें लोकप्रियता व प्रतिष्ठा संपादिली तशी कोणत्याच कवीनें संपादिली नाहीं. (क॰ च॰)

**आशाराम–** एक गुजराथी कवि. याचीं पदें वगैरे पुष्कळ प्रसिद्ध आहेत. (काव्य॰ गु॰)

**आसामदेश–** कामरूप देश. त्यासच हल्लीं हें नांव चाललें आहे. हा देश प्राग्ज्योतिष देशाच्या दक्षिणेस आहे, असें प्राचीन हिंदुस्थानाच्या इंग्रजी नकाशा वरून समजतें. ब्रह्मपुत्रा नांवाची जी प्रसिद्ध नदी ती यांतून वाहात पुढें भागीरथीस मिळाली आहे.

**आस्तिक–** वेदोक्त जो परलोक ईश्वर इत्यादि विषय तो ज्यांस संमत आहे ते आस्तिक होत. गौतम व कणाद, कपिल व पतंजली आणि जैमिनि व बादरायण व्यास हे सहा आस्तिक होत. व यांचीं जीं मतें तीं साहा दर्शनें होत. या विषयीं वचन आढळतें तें असें:–

वेदप्रमाणकानीह प्रोचुर्ये दर्शनानि षट् ॥
न्याय वैशेषिकादीनि स्मृतास्ते आस्तिकाभिधाः १

---

## इ. ई.

**इच्छाराम–** डांकूर म्हणून जो गांव गुजराथेंत आहे तेथील राहणारा हा गुजराथी ब्राह्मण कवि होता. यानें गुजराथींत दशावतार वर्णन एवढाच काय तो एक ग्रंथ लिहिला आहे. (काव्यदो॰ गु॰)

**इंदुकांत–** प्रसिद्ध जो नास्तिक शिरोमणि देहात्मवादी चार्वाक होऊन गेला त्याचा बाप.

**इंदुमतीपरिणय–** गोविंदकविकृत तैलंगी भाषेंतील इंदुमतीच्या विवाहाचें वर्णन.

**इंदुर**— होळकर सरकारचें राजधानीचें शहर. याचें मध्यकाळीं नांव इंद्रवर होतें असें प्राचीन नकाशा वरून दिसतें. याचे उत्तर अक्षांश सुमारें २३ व पूर्वरेखांश ७७ आहेत. येथें होळकर राज्य करीत आहे.

**इंदुराज**— तोतुकाचा नातू, श्रीभूतिराज याचा पुत्र; हा कात्यायन गोत्री ब्राह्मण होता. व काश्मीराकडे राहात असे. (बुल्ह० शो०)

**इंद्रप्रस्थ**— यास हल्लीं दिल्ली शहर म्हणतात. हें यमुनेच्या कांठीं आहे. कौरव असतानां युधिष्ठिर (धर्मराज) येथें राज्य करीत होता. भरत शकाच्या ८९१ व्या वर्षी प्रभव संवत्सरांत येथें राजसूय यज्ञ झाला. व सर्वांसमक्ष युधिष्ठिरास राज्याभिषेकही झाला. असें जैन लोकांच्या ग्रंथावरून समजतें. (संक्षेप जिनवि०सं०)

**इंद्रवर**— हल्लीं यास इंदुर असें म्हणतात.

**इराणदेश**— पारसीक देश हें याचें जुनें नांव आहे.

**इंद्रसरस्वती**— सरस्वती सन्यासी यांत जे दोन भेद आहेत त्यांतील पहिला भेद.

**इब्राहीमलोदी**— तैमुरलंग स्वारी करून स्वदेशीं गेल्यावर मागून झालेला दिल्ली येथें बादशाहा. यानें शके १४३८ पासून १४४८ वर्षे पर्यंत १० वर्षे बादशाही केली. (हिंदु० छा० इ०)

**इरावती**— पंजाबा मध्यें ज्या पांच नद्या आहेत त्यांतील एक. हल्लीं हिला रवी नदी असें नांव चालतें.

**इलिचपूर**— वराडांतील एक शहर. याचे उत्तर अक्षांश सुमारें २१ व पूर्वरेखांश ७८ आहेत. आमच्या प्राचीन कोशांत कोसलदेश तीन आहेत. त्यांत ज्याची राजधानी श्रावस्ती नगरी तो ईशान्यकोशल. व ज्याची राजधानी अयोध्या तो आग्नेय कोसल असें आह्मी लिहून दक्षिण कोसलदेश एक निराळाच लिहिला आहे, तोच वराडदेश समजावा. त्यांतील जी प्राचीन राजधानी उज्जिहाना तीसच हल्लीं इलिचपूर हें नांव असावें असें आह्मांस वाटतें.

**इलेश्वरनगर**— श्रीशैल मल्लिकार्जुनाच्या पश्चिमेकडील नगर. इलेश्वरोपाध्यायांचें हें राहतें नगर होतें.

**इलेश्वर विजय**— इलेश्वरोपाध्यायांनीं केलेला संस्कृत ग्रंथ. यांत जाति म्हणून जेवढ्या आहेत तेवढ्या कशा उत्पन्न झाल्या, त्या ओळखण्याच्या खुणा कोणत्या, व त्यांचे परस्परांशीं संबंध कसे झावेत, इत्यादि गोष्टींचा फारच सूक्ष्म विचार केलेला आहे. हा ग्रंथ काय कारणानें झाला त्या विषयींचें वृत्त इलेश्वरोपाध्या-

य या नांवावर पहावें. हा ग्रंथ हल्लीं कोठें सांपडत नाहीं, असें ह्मणतात. (कविच०)

**इलेश्वरोपाध्याय**— हा महाविद्वान् ब्राह्मण शालिवाहन शकाच्या सातव्या शतकांत होता. श्रीशैल मल्लिकार्जुन नामक क्षेत्राच्या पश्चिमेस इलेश्वरपुर होतें तेथें हा रहात असे. याचें मूळनांव निराळें असावें असें कित्येक ह्मणतात. कित्येक ह्मणतातकीं, इलेश्वर नगर हें नांव तेथें इलेश्वर नांवाचें जें महादेवाचें स्थान होतें त्या वरूनच पडलें होतें. व त्याच देवाच्या प्रसादानें हा मुलगा झाल्या मुळें याच्या आईबापांनीं यास हें नांव ठेविलें.

इलेश्वरोपाध्याय तैलंगजातीचा ब्राह्मण होता, असें त्याच्याच लेखा वरून दिसून येतें; कारण यानें तैलंगण देशाचे १०० भाग कल्पून, जें त्या देशा विषयीं वर्णन लिहिलें आहे त्यांतच हा उल्लेख केला आहे. हे जे भाग यानें कल्पिले ते नाड अशा संज्ञेनें तैलंगणांत प्रसिद्ध आहेत व त्या प्रमाणें व्यवस्थाही चालत असल्याचें ऐकण्यांत येतें; कारण कोंडवीडू वगैरे प्रांतांतील दफ्तरांत ते लेख अजून असून तिकडील पाटील कुळकरण्या जवळही त्यांचे उतारे सांपडतात.

हा ब्राह्मण न्याय, व्याकरण, अलंकार, मीमांसा, व धर्मशास्त्र यांत उत्कृष्ट प्रवीण होता. शांकरवेदांताचेंही यास चांगलें ज्ञान होतें. यानें गौतम स्मृतीवर स्मृतिदर्पण नांवाची टीका लिहिली आहे. तसेंच श्रीशैल मल्लिकार्जुन याच्या विवाहपर उत्कृष्ट संविधान साधून एक नाटक लिहिलेलें गिरीश नाटक या नांवानें प्रसिद्ध आहे. याचा तिसरा ग्रंथ इलेश्वर विजय होय; तोही सर्वमान्य असून त्यांतील प्रमाणें अनेक ग्रंथकारांनीं आपापल्या ग्रंथांतून प्रमाणार्थ घेतलेलीं आढळतात.

हा आपल्या वयाच्या पंधराव्या वर्षीच देशांतरीच्या राजांच्या भेटीस जाऊं लागला, व शांकरमताच्या प्रतिपक्षांशीं वाद करून त्यांचें खंडन करूं लागला. तैलंगण देशांत जरी अनेक उलटा पालटी झाल्या, व तो अनेक राजांच्या सत्तेखालीं गेला, तरी यानें जे त्याचे शंभर भाग ठरविले, व वेलनाड, मुरिकीनाड, कासल नाड इत्यादि त्यांस नांवें दिलीं, तीं अद्यापि जशाचीं तशींच चालत आहेत. यानें जें हें उपकारक कृत्य केलें, त्या बद्दल अनेक राजांनीं व श्रीमान् गृहस्थांनीं यास निरनिराळ्या पुष्कळ जमिनी बक्षीस दिल्या. त्या जरी सर्व यानें ब्राह्मणांस वांटिल्या, तरी त्यांच्या सनदा अजून याच्या वंशजां जवळ आहेत असें ह्मणतात.

इलेश्वरोपाध्यायांनीं, रघुपति पेंठ व नारायणगड इत्यादि ठिकाणच्या राजांस संस्कृत काव्यें व छंदःशास्त्र हीं पढविल्या मुळें, त्यांनीं याचा बहुमान करून यास

इतकें द्रव्य दिलें कीं, यानें त्यावर एक खासगी विद्यालय स्थापिलें. असें सांगतात कीं, या विद्यालयांत काव्य, नाटक, अलंकार, धर्मशास्त्र, न्याय व व्याकरण इत्यादिशास्त्रांचा अभ्यास करणारे पांचशें विद्यार्थी असत. व त्यांचीं संभाषणें ऐकून ऐकून याच्या घरांतील स्त्रियाही संस्कृत भाषा अस्खलित बोलत.

इलेश्वरोपाध्यायांच्या विद्यालयांत जे विद्यार्थी पढत होते, त्यांत बुद्धीनें मंद असून पाठ धारण करण्यास असमर्थ असे कित्येक असल्या मुळें, यानें त्यांस तें सामर्थ्य यावें या हेतुनें ज्योतिष्मती (मालकांगोणी) या नांवाचा एक कल्प ग्रंथांतून काढून व चांगला सिद्ध करून त्यांस सांगितला. त्या योगानें ते चांगले बुद्धिमान् होऊन विद्वान् झाले.

मालकांगोणी ह्मणून जें नांव वर लिहिलें तीं फळें बुंदाच्या आकृती एवढालीं असून शेंदरी रंगाचीं असतात. यांचें विधान असें आहे कीं, सदर वनस्पतीचें तेल सूर्यग्रहणांत पिऊन पाण्यांत उभें राहावें व एक मंत्र आहे त्याचा जप ग्रहण सुटे पर्यंत करावा, ह्मणजे बुद्धि अतिशय तीव्र होते. या कल्पाचा उपयोग, पुढें पुढें म्हैसूर, तंजावर, काशी व कांची इत्यादि ठिकाणचे विद्यालयगुरूही करूं लागले. हाच कल्प याची नाची ह्मणून कन्या होती तिनें कसा केला व त्या योगानें तिची बुद्धि कशी तीव्र झाली तो वृत्तांत आह्मी तिच्या नांवावर लिहिला आहे तो पहावा.

त्या कवीस पुत्रसंतति मुळीच नव्हती, तीन कन्या मात्र होत्या. त्या तिघींचीही लग्नें होऊन त्या आपआपल्या सासरीं सुखानें नांदत होत्या. परंतु कांहीं दिवसांनीं असें झालें कीं, थोरली मुलगी मात्र सुखानें प्रपंच करीत राहिली, व दुसऱ्या दोघींचा प्रकार या प्रमाणें झाला; तो असा कीं;– मधली मुलगी नाची होती तिचा नवरा मृत्यु पावला. व कनिष्ठ कन्येचा नवरा जातीचा ब्राह्मण नव्हे, अशी वार्ता उठली. त्या वरून तिनें त्या गोष्टीचा शोध करून बापास मोघम असें येऊन पुसलें कीं;– मडकें विटाळल्यास तें शुद्ध कशानें होतें? यानें उत्तर केलें अग्नींत भाजिलें ह्मणजे. त्या वरून ती मुकाट्यानेंच आपल्या गांवीं आली व तिनें नवरा, मुलें, व आपण घरांत कोंडून घेऊन, तसेंच सर्व घर चोंहींकडून पेटवून, आपणांसहित सर्वांस जाळून घेऊन प्राणत्याग केला.

ही गोष्ट इलेश्वरोपाध्यायांस कळल्यावर त्यांस अतिशय वाईट वाटलें. वत्याच भिरिरींत त्यांनीं इलेश्वरविजय हा ग्रंथ लिहून सर्वत्र प्रकट केला; कारण इतर

ब्राह्मणांनीं तरी या प्रमाणें पुढें फसूं नये. यांत त्यांनीं काय काय विषय लिहिलेआ-हेत ते ग्रंथाचे नांवावर पहावे. यांची मधली मुलगी नाची,ती तीर्थयात्रेस गेलेली परत आली, व तिनें कित्येक राजांकडून आपल्या विद्वत्तेवर मिळवून आणलेलीं बक्षिसें बापापुढें ठेविलीं,त्या योगानें थाकटीचें दुःख तो विसरला, व पुढें थोड्या-च काळानें मरण पावला. (कविच०)

कविचरित्रांत इलेश्वरोपाध्यायांची व खानें खानाची भेट होऊन उभयतांचीं प्रश्नोत्तरें झाल्याचें लिहिलें आहे; परंतु खानखान अकबराच्या वेळचा म्हणजेश-के१५ शांमध्यें झालेला, व इलेश्वरोपाध्याय शके सातशांनला असल्या मुळें दोघांची भेट होण्याचा संभव नाहीं.

**इल्लय**— हा कवि शके १२९० मध्यें होता. विजयनगर म्हणून जें नामांकित शहर आहे तेथें हा राहात असे. ज्योतिष विद्येंत याची गति चांगली असल्या मुळें, त्याच नग-रच्या विरूपाक्ष राजानें यास आपल्या पदरीं बाळगिलें. यानें सूर्यसिध्दांतावर टी-का लिहिली ती शिवाय दुसरा कांहीं ग्रंथ लिहिला नाहीं. हा त्याच शहरांत मृत्यु पावला; परंतु कधीं व त्यावेळेस याचें वय किती होतें त्याचा कांहींच शोध नाहीं. (कविच०)

**ईश**— ईशावास्य शब्द पहा.

**ईशावास्य**— एक उपनिषद् आहे.

**ईशान**— प्रसिद्ध जो बाणभट्ट कवि त्याचा बाळमित्र. हाही कवि होता.

**ईश्वरकृष्ण**— सांख्य शास्त्रा वरील संस्कृत व्याख्याकार. (सर्वद०सं०)

**ईश्वरचंद्रगुप्त**— एक कवि. (बुल्ह०शो०)

**ईश्वरतीर्थ**— सिंहलगिरीचे सन्यासी शिष्य. (सर्वद०सं०)

**ईश्वरशतक**— अवतार कवीनें केलेला शंभर श्लोकांचा ग्रंथ.

**ईश्वरानंद**— भाष्यप्रदीप विवरण व भाष्यप्रदीप व्याख्या यांचा कर्ता. (बुल्ह० शो०)

---

## उ. ऊ.

**उखाहरण**— गुजराथी भाषेंत प्रेमानंदानें केलेलें काव्य.

**उग्रभूति**— शिष्यहितान्यास ग्रंथाचा कर्ता. (बुल्ह० शो०)

**उग्रशैव**— साहा प्रकारच्या शैवांतील दुसरा. हे भुजद्वयावर डमरूच्या आकृतीच्या तप्त मुद्रा धारण करीत. आज सुमारें २००० वर्षा मागें जेव्हां मूळचे शंकराचार्य

झाले, व ते फिरत फिरत रामेश्वरास गेले, त्या वेळीं त्यांस हे सर्व शैव भेटले, व त्यांचें त्यांनीं खंडन करून ते शरण आले असतां त्यांस आपल्या अनुयायी वर्गांत मिळवून घेतलें. (आनं॰ गि॰ शंकरवि॰).

**उच्चलराजा**– काश्मीराकडील राजा. शिवरथ नांवाचा पुरुष तो याचा प्रधान होता. (बुल्ह॰ शो॰).

**उच्छिष्टगणपती**– साहा प्रकारच्या गाणपत्यांतील एक मत. (या मतांत मद्याचा उपयोग करितात.) (आनं॰ शंकर॰ प्र॰१७) पहा.

**उज्जनपाळ**– पृथ्वीपाळ वंशांतील दुसरा राजा. याला राज्याभिषेक झाला तो शक शालिवाहन ४२१ होता. व त्याच सालीं केरल देशांत शिवगुरु नामक ब्राह्मणास शंकर नांवाचा पुत्र झाला. व तोच पुढें शृंगिरीस शंकराचार्यांच्या गादीवर बसला. (हिंदु॰ हस्त॰ इ॰).(व जैन ग्रंथ.)

**उज्जनी**– उज्जयिनी नगरी तीच.

**उज्जयीनी**– अवंती नगर तेंच.

**उज्वलदत्त**– व्याकरणावर उणादि सूत्रवृत्ति नामक ग्रंथकर्ता. (बुल्ह॰ काश्मी॰ शो॰)

**उडुपी**– उडुपी प्रश्न गांवासच हल्लीं ह्मणतात.

**उडुपी प्रश्न**– घांटमाथ्यावरचा गांव. शंकराचार्यांच्या मताशीं विरुद्ध काढलेलें जें मध्वाचार्यांनें द्वैतमत त्याची ही जन्मभूमि

**उणादि सूत्रवृत्ति**– हा ग्रंथ संस्कृत व्याकरणावर आहे, व तो उज्वलदत्तानें केला आहे.

**उणादिसूत्रवृत्तिदशपदी**– माणिक्यदेवानें व्याकरण विषयावर लिहिलेला ग्रंथ. (बुल्ह॰ का॰ शोध.)

**उत्कलदेश**– यास हल्लीं ओरिसा प्रांत ह्मणतात.

**उत्तरकोसल**– हा एक देश असून याची राजधानी श्रावस्ती नगरी होय. आमच्या प्राचीन कोशांत इंद्रप्रस्थाच्या संबंधानें यास ईशान्य कोसल ह्मटलेलें आहे. या देशास जैन लोक कुंणाल देश ह्मणतात. (प्रवचन शारो॰ छापील पृ॰५६६-५६७) पहा.

**उत्तरगोग्रहण**– संस्कृत भाषेंतील ग्रंथ. लक्ष्मीनारायणाप्पा यानें केलेला.

**उत्तरचंपु**– आत्रेय व्यंकट यानें केलेला चंपु.

**उत्तरत्रिगर्त**– हल्लीं लुधियाना प्रांत ह्मणतात, असें जैनांचें मत आहे.

**उत्तरनैषधचरित्र**– हर्षकवीनें केलेला संस्कृत ग्रंथ.

**उत्तरमीमांसा**– बादरायणकृत ज्ञानकांडपर ब्रह्मसूत्रें. यावर श्रीमच्छंकराचार्यांनें भाष्य आहे.

**उत्तररामचरित्र**— भवभूति कवीनें रचलेलें संस्कृत ससांकी नाटक.

**उत्तरसयाम**— हा देश कुचबिहार प्रांताच्या दक्षिणेस आहे.

**उत्तरसरकार**— मद्रास इलाख्यांतील तैलंगणदेश संबंधीं प्रांत.

**उत्पल**— उदयाकराचा पुत्र प्रत्यभिज्ञा सूत्रांचा कर्त्ता. शके ८५२ पासून ८७२ इतक्या काळांत हा होता. (बुल्ह० शोध.)

**उत्पलदेव**— काश्मीराकडील राहणारा. रामकंठ कवीचा गुरु. (बुल्ह० का० शोध.)

**उत्पलभट्ट**— जगच्चंद्रिका म्हणून जी बृहज्जातकावर संस्कृत टीका आहे तिचा कर्त्ता.(बुल्ह० का० शोध.)

**उत्सर्पिणी**— जैन लोक कालाचे दोन भेद मानितात. ह्मणजे एक उत्कृष्ट काल,आणि दुसरा निकृष्ट काल. त्या दोहोंतील उत्कृष्ट काल तो. शोध.)

**उदयनाचार्य**— न्यायकुसुमांजळी कारिकांचा कर्त्ता. हा विद्यारण्यांच्या पूर्वी होता.(बु०

**उदयरत्न**— गुजराथेंतील खेडा येथील राहणारा एक जती. जैन धर्मा विषयीं याचे कांहीं ग्रंथ आहेत. (काव्यदो०गु०).

**उदयाकर**— उत्पल कवीचा बाप.

**उदाजी पवार**— पेशव्यांचा सरदार व धार संस्थानाच्या गादीचा मूळपुरुष. याचे वंशज हल्लीं धारेस आहेत. (हिंदु० हस्त० इति०).

**उद्धवगीता**— गुजराथी भाषेंत मुक्तानंद कविकृत.

**उद्धवगोसावी**— समर्थ रामदास स्वामींचे पहिले शिष्य. यांची मूळ हकीकत अशी आहे कीं,– समर्थ जांबेहून निघून नाशीक येथें आल्यावर, रामत्रयोदशाक्षरी मंत्राचें पुरश्चरण करावें असें त्यांच्या मनांत आलें. ह्मणून त्यांनीं गंगातीरीं निवांत स्थळ कोणसें त्याचा शोध करितां लोकांनीं टाकळी गांव सांगितला त्यावरून समर्थ तेथें येऊन राहिले, आणि त्यांनीं पुरश्चरणास आरंभ केला.

या गोष्टीस सुमारें १० वर्षें लोटलीं असतां,एके दिवशीं पुरश्चरणसंबंधीं जप आटपून माध्यान्ह सध्यें करितां समर्थ गंगेवर येऊन बसले. तों असें झालें कीं,– टाकळीच्या उत्तरेस एका कोसावर दसक पंचक नांवाचा एक गांव आहे, तेथील राहणारा अग्निहोत्री देशस्थ आश्वलायन कोणी सदाशिवपंत नांवांचा ब्राह्मण, पंडुरोगाच्या व्याधीनें कांहीं संतति न होतां अल्प वयांतच मरण पावला. त्यावरून त्याची स्त्री उमाबाई सहगमनाच्या निश्चयानें पतीच्या प्रेतासह व आप्तवर्गांसहित टाकळीस आली. ती तेथें आल्यावर व सहगमनाच्या

विधीची सर्व सिद्धता झाल्यावर, आतां सहगमनास निघणार इतक्यांत तिनें समर्थांस पाहिलें, ह्मणून तिच्या मनांत आलें कीं, हा कोणी तरी सत्पुरुष आहे, तर यास अंतकाळीं नमस्कार करून यावें. असें ह्मणून ती समर्थांकडे गेली, व जाऊन तिनें त्यांस नमस्कार केला. या वेळीं समर्थ ब्रह्मयज्ञ आटपून बसले होते, व उमाबाईनें नमस्कार केलेला पाहून तिला त्यांनी 'अष्टपुत्रा सौभाग्यवती' असा आशीर्वाद दिला. तो ऐकून ती चकित झाली, व तशीच स्तब्ध उभी राहिली.

इकडे समर्थांनीं तर्पण आटोपिलें, व जाण्यास निघाले इतक्यांत तिनें पुनः नमस्कार केला. त्या वरून पुनः समर्थांनीं तोच आशीर्वाद देऊन बाईस ह्मटलें कीं, एवढा वेळ कां उभ्या राहिलां ? असें ऐकून उमाबाई ह्मणाली महाराज, आपण जो मला आशीर्वाद दिला तो सत्यच आहे; परंतु तो काय याच जन्मीं फलद्रूप होणार कीं पुढल्या जन्मीं ! असें कां पुसत्यें ह्मणाल तर, माझा पति कालच गत झाल्या मुळें मी येथें सहगमनास आल्यें आहें. इतकें तिचें बोलणें ऐकून समर्थ किंचित् स्तब्ध झाले, व रघुपतीची मर्जी असें मनाशीं बोलून तिला ह्मणाले बाई, तुमचा नवरा तुह्मी मेला ह्मणतां त्यास तो कसा मेला तें आह्मांस पाहूं द्या, इतकें ऐकतांच बाईनें व तिच्या मंडळीनें समर्थांसि सदाशिव पंताच्या प्रेताजवळ नेलें. समर्थांनीं त्याच्या सर्व अंगास हात लाऊन तेथून जे पळत निघाले ते हां हां ह्मणतां इतके दूर गेले कीं, कोणासही ते दिसेनात. त्या वरून मंडळी आश्चर्य करीत आहे तों, सदाशिवपंत चांगला खडखडीत उठून बसला.

सदाशिव पंत उठून बसतांच मंडळीस पुसूं लागला कीं, मला येथें कां आणिलेंत ? त्यावरून त्यांनीं त्यास सर्व हकीकत सांगितली, व ह्मणाले आतां गांवीं चलावें तेव्हां सदाशिव पंत ह्मणाला, ज्यांच्या हस्तस्पर्शानें मी सजीव झालों, त्यांचें दर्शन झाल्या शिवाय मला गांवीं येणें नाहीं, व अन्नही ग्रहण करणें नाहीं. त्यावरून उमाबाई शिवाय करून बाकीची मंडळी गांवाकडे निघून गेली. पुढें इकडे हीं उभयतां स्त्री पुरुषें समर्थांच्या शोध करीत असतां तिसऱ्या दिवशीं त्यांस समर्थांची भेट झाली. तेव्हां दोघांनीं त्यांस नमस्कार करून प्रार्थना केली कीं, आतां आह्मांस अनुग्रह देऊन पावन करावें. त्यावरून त्यांनीं त्यांस अनुग्रह दिला, व सांगितलें कीं, तुह्मांस आठ पुत्र तर आह्मी दिलेच आहेत, त्याच्यावर आणखी दोन अधिक होतील. बाईनें विनंति केली कीं, पहिला मुलगा जो होईल तो समर्थांस अर्पण करावा असें मनांत आलें आहे, तर ती आमची इच्छा सफळ व्हावी.

असें ऐकून तथास्तु ह्मणून समर्थ निघून गेले, व सदाशिवपंत आणि उमाबाई आपल्या गांवीं परत आलीं.

कांहीं दिवसांनीं उमाबाईस प्रथमपुत्र झाला असतां तिनें तो समर्थांकडे आणिला. तेव्हां समर्थ ह्मणाले हा आह्मांस अर्पण झालाच आहे, परंतु लहान आहे, यास्तव मुंज होई पर्यंत तुह्माजवळच असूं द्या. त्या वरून ती परत गेली. पुढें तिला अनुक्रमानेंच नऊ पुत्र झाले व त्यावरून त्यांच्या घराण्यास दसपुत्रे आडनांव पडलें तें अजून चालत आहे.

उद्धव मोठा झाल्यावर समर्थांच्या विद्यमानें सदाशिवपंतानें त्याची मुंज केली, व लागलीच त्यास त्यांच्या स्वाधीन केलें. समर्थही त्यास घेऊन आले, व त्याची त्यांनीं टाकळीस स्थापना करून त्यास स्नानसंध्येचा सर्व विधि सांगितल्यावर रामत्रयोदशाक्षरी मंत्राच्या पुरश्चरणास त्याकडून आरंभ करविला. हें याचें पुरश्चरण चाललें असतां समर्थ तीर्थयात्रेस गेले. ते तिकडून परत येण्याच्या संधीस याचें पुरश्चरणही समाप्त झालें. पुढें समर्थ येतांच यानें त्यांस मी देह किंवा याहून कोणी निराळा आहें अशा अर्थाचे कित्येक प्रश्न केले, व त्यांनीं त्याचीं उत्तरें दिलीं, तीं हंसपद्धति नामक ग्रंथाच्या दुसऱ्या अष्टकांतील पांचव्या प्रकरणांत लिहिलीं आहेत, त्यांतील सारांश येणें प्रमाणें:—

## ओंव्या.

तुझा तूंचि गुरु परिपूर्ण ॥ तूंच निजांगें ब्रह्म आपण ॥ ऐसें हें उपदेशाचें लक्षण ॥ ऐकून बाळ प्रश्न करी ॥ २ ॥ मी ब्रह्म कैसा परिपूर्ण आणि गुरु मी माझा कैसा आपण ॥ असें तरी मजकां आलें वेगळेपण ॥ आणि वियोग कां वाटे ॥ ३ ॥ उत्तरः— ॥ कांहीं उपाधि नसतां सघन ॥ जैसें असे पा शब्द गगन ॥ तैसा तूं असती निरंजन या सृष्टीच्या पूर्वीं ॥ ६ ॥ त्या तुझ्या ठायीं माया उद्भवली ॥ ह्मणावी परी सर्वथा नाहीं झाली ॥ अहं ब्रह्म स्फूर्तिजे उठिली ॥ तेचि माया परी मिथ्या ॥ ७ ॥ त्या माये तें जाणे तें ज्ञान ॥ समग्र स्वरूपा नेणें तें अज्ञान ॥ हेंचि विद्या अविद्येचें लक्षण ॥ परी ब्रह्म या वेगळें ॥ ९ ॥ विद्येंत चैतन्य जें भासलें ॥ त्यासीईश्वरनाम आलें ॥ जैसें मेघीं आकाश सांपडलें ॥ परी तें त्या ऐसें नव्हे ॥ ११ ॥ अविद्या नेणिवेंत व्यापलें तेंचि प्रतिबिंबलें जीव नांव पावलें ॥ परी त्या विकारें ब्रह्म नाहीं

मळलें ॥ तया माजी असोनी ॥ १३ ॥ त्या जीवेश्वर उपाधी पासून ॥ भूत भौ-
तिकें झालीं निर्माण ॥ तेची चंचल जड प्रकार दोन ॥ परी ब्रह्म चंचळ ना
जड ॥ १५ ॥ असो मी देह जैसें दृढ झालें ॥ उच्चार न करितां बळकट बै-
सलें ॥ ऐसें मी ब्रह्म पाहिजे प्रत्यया आलें ॥ न उच्चारितां या नांव ज्ञान
॥ ५४ ॥ जीव उपाधीहून परतें ॥ तेवीं ईश्वरोपाधीशीं भिन्न तें ॥ परब्रह्म-
ओळखावें निरुतें ॥ मीच ऐसें अपरोक्ष ॥ ५५ ॥ अगा उद्धवा त्वां पुशि-
लें होतें ॥ मी अंगें ब्रह्म कैसें निरुतें ॥ तें सांगितलें उपाधी परतें ॥ आ
तां अनुभवीं अंतरीं ॥ ५६ ॥

इतका उपदेश उद्धवास करून समर्थ कृष्णातीरास गेले. व इकडे यानें आपली उपदेशानुरूप दृढता करून कृतार्थ झाला. उद्धव गोसावी यांचें जन्म शके १५४६ मध्यें झालें. व त्यांची समाधि समर्थांच्या मागून ३२ वर्षांनीं म्हणजे शके सोळाशें पस्तीसां मध्यें फाल्गुन शुद्ध प्रतिपदेच्या दिवशीं टाकळी येथें झाली. याची कविता शिव अशा नांवाची आहे. कारण, समर्थांनीं तें नांव कवितेंत घालीत जावें अशी यास आज्ञा केली होती. रामदास स्वामींचें यानें कांहीं चरित्रही लिहिलें आहे असें म्हणतात, परंतु तें आम्हांस आढळलें नाहीं. (रामदा० च०).

**उद्धवचिद्घन**— माणदेशीं मोंगलाईंत धारूर म्हणून एक गांव आहे, तेथील हा राहणारा होय. हा जातीचा ब्राह्मण व रामोपासक होता. शके १२५० मध्यें हा असल्याचें ऐकिवांत येतें. यानें भक्त चरित्र व गोऱ्या कुंभाराचें चरित्र असे दोन ग्रंथ ओंवीबद्ध मराठींत लिहिले आहेत. असें सांगतात कीं,- एके वर्षीं याच्या घरीं रामजयंतीचा उत्साह चालला असतां कीर्तन प्रसंगीं श्रोते व हरिदास यांस यवनांनीं शीणमार करून कीर्तनाचा उच्छेद केला. त्या वरून मारुतीनें यवन अधिकाऱ्याच्या पोटांत शूळ उत्पन्न करून पुष्कळ यवनांस जबर मार दिला. व गांवांतील मशिदी पाडल्या. त्या वरून अधिकारी भयभीत होऊन त्यानें येऊन यापाशीं क्षमा मागितली, व उत्साहाचा भंग केल्या बद्दल एक हजार रुपये दंड दिला. त्या वरून त्याचा शूल राहून गांवांतही स्वस्थता झाली. (कविच०).

**उन्मत्तभैरवमत**— कापालिक मताचा एक भेद. यांत नरकपाल धारण व मद्यपान इत्यादि कर्में आहेत. या मतानें वागणारा जातीचा कोणी शूद्र होता, त्याची व मूळशंकराचार्य यांची भेट झाली असतां आचार्यांनीं त्याच्या मताचें खंडन करू-

न त्यास ह्मटलें. आह्मी ब्राह्मणादिक तीन वर्णांची व्यवस्था सुरव्यत्वें करून करण्या साठीं प्रयत्न करीत आहों. तूं शूद्र असल्या मुळें कसाही वागलास तरी आह्मांस तुझी गरज नाहीं. आनंदगिरीचा शंकरविजय प्रकरण २४ पहा.

**उद्बोधनाथ**— हे ज्ञातीचे आश्वलायन ब्राह्मण राशीनचे कुळकर्णी व केसरी नाथाचे गुरु होते.

**उदेपूर**— हें शहर मेवाडांत आहे. येथील रजपूत राजे आपल्यास शिसोदे क्षत्रिय ह्मणवितात. जयपुर व जोतपुर येथील राजे जरी उदेपुरवाल्यांचे नातलग आहेत तरी त्यां पेक्षां हे उंच मानले आहेत; कारण यांच्यावर अनेक प्रसंग गुजरले व पुष्कळ संकटें आलीं असतांही यांनीं अकबरास अन्य उपायानें खुष केलें. परंतु आपली मुलगी ह्मणून त्यास लग्न करून कधींच दिली नाहीं. हें शहर उत्तर अक्षांश समारें २५ व पूर्व रेखांश ७३ वर आहे.

**उपकोशा**— वररुचि नामक कवीची स्त्री. ही मोठी पतिव्रता होती. (ग्यारे० इं० को०)

**उपदेशसाहस्री**— मूळ शंकराचार्य कृत हजार श्लोकांचा वेदांतपर संस्कृत ग्रंथ. याबर कृष्णा सरस्वती याची टीका आहे.

**उपनिषद्ब्रह्म**— संक्षेप शारीरकाचे टीकाकार एक महापंडित स्वामि. (हृद्‌मा०)

**उपनिषद्भाष्य**— १ ईशावास्य. २ केन. ३ कठवल्ली. ४ प्रश्नोपनिषत्. ५ मुंडकोपनिषत्. ६ मांडुक्य. ७ तैत्तिरीय. ८ ऐतरेय. ९ छांदोग्य आणि १० बृहदारण्यक. या दाहा उपनिषदांवर मूळ शंकरार्यांनीं लिहिलेलें भाष्य तें. या विषयींचा श्लोक. "ईश केन कठ प्रश्न मुंड मांडुक्य तित्तिरिः॥ ऐतरेयंच छांदोग्यं बृहदारण्यकं तथा॥ १॥

**उपवर्षपंडित**— हा महाविद्वान् ब्राह्मण सुमारें साडेतीन हजार वर्षां मागें होता. कात्यायन अथवा वररुचि, व्याडी आणि पाणिनी हे तिघे याचे शिष्य होते. (सरलाप्र०)

**उपेंद्रभान**— ओरिसा प्रांतांतील गमसर संस्थानचा राजा. यानें शब्दमाला व गीताभिधान असे दोन कोश केले. शालिवाहन शक सुमारें १५०० (बुल्ह० का० शोध०)

**उपेंद्रसरस्वती**— गंगाधर सरस्वतीच्या सात शिष्यांतील एक. (हृद्‌मा०).

**उमरेट**— हा गांव गुजराथेमध्यें डांकुरा जवळ आहे.

**उमाबाई**— उद्धव गोसावी यांची आई.

**उमारमासंवाद**— आनंदतनयकृत मराठींत.

**उरगप्पादंडनाथ**— हा कवि लष्करी खात्यांतला मोठ्या पदवीचा सरदार होता. कोणी ह्मणतात कीं, विजयनगरचा राजा हरिहरराय त्याच्या पदरीं हा असे.

याचें जन्म विजयनगर अथवा अनागोंदी येथें झालें. व याचा उदय शालिवाहनाच्या तेराव्या शतकांत झाला. याची गति संस्कृत व्याकरणांत चांगली होती. आणि त्यावरूनच यानें नानार्थरत्नमाला आणि एकाक्षरी निघंट असे दोन कोश केले. त्यांचा उपयोग सर्व भरतखंडांत विद्यालयांतून होतो. (कविच०)

**उरासा**— दार्वदेशाचें शहर. (दार्व शब्द पहा.)

**उरुक्रिय**— कलियुगांतील सूर्यवंशी राजा. भारती युध्दांत अभिमन्यूनें मारलेलाजो बृहद्बल राजा त्याचा हा नातू, बृहद्रणाचा मुलगा व वत्सवृध्दाचा बाप होता. हिंदु० हस्त० इति०

**उळिवी**— विरीषपुरीचें हल्लींचें नांव. हें नांव पडण्याचें कारण असें आहे कीं, कल्याण येथील विजलराजास बसवानें मारल्यावर तो पळाला असतां, मलबार किनाऱ्यास असणाऱ्या विरीषपुरास गेला. इतक्यांत राजपुत्रानें त्याचा पाठलाग करून, त्या शहरास वेढा दिला. तेव्हां बसवानें पाहिलें कीं, आतां आपला बचाव होणें कठीण आहे. ह्मणून त्यानें तेथें एक विहीर होती, तींत "उळीवेनु" असे शब्द उच्चारून उडी टाकली, व आपला जीव दिला. उळीवेनु या कानडी शब्दाचा अर्थ 'मी मुक्त होईन' असा आहे. सारांश तेव्हां पासून असें नांव पडलें. या गांवास लिंगाईत लोक फार मानतात, व तेथें यात्रेसही जातात. (बसवश०)प०

**उदकादू**— अक्केयरची बहीण आपग्गा, तिचें जन्म या गांवीं झालें.

**ऊर्ध्वपुंड्रविधि**— वेदांताचार्यानें उभ्या तिलकाच्या विधी विषयीं केलेला संस्कृत ग्रंथ.

---

## ऋ, ए ऐ आणि ओ-औ.

**ऋतुसंहार**— कालिदास कविकृत संस्कृत काव्य. याचे सर्ग साहा आहेत.

**ऋषभदेव**— भरत इत्यादि शंभर पुत्रांचा बाप तो. (प्रा० ऐ० को०) पहा. यास बौद्ध व जैन आपल्या धर्माचा मुख्य आचार्य समजून त्यास सर्वज्ञ असें नांव देतात. या विषयीं (सर्वज्ञ) शब्द पहा. २— जैनांत जे चोवीस तीर्थकर होऊन गेले त्यांतील पहिला तो. (प्रब० शारो०)

**ऋषिभक्तस्वामि**— मुरार परब्रह्म व जगन्नाथ बावा यांचे गुरु. (वृद्धमा०)

**ऋषीकदेश**— हल्लीं यास रूस ह्मणजे रशिया ह्मणतात. हा देश अगदीं उत्तरेकडे आहे. (प्रा० ऐ० को०).

**एकचक्रानगरी**— पूर्वी भीमसेनानें जेथें बकासुर मारला तें हें शहर आमच्या प्रा-

चीन कोशांत लिहिलेंच आहे. याचें हल्लींचें नांव पतियाळा शहर होय. असें जैन लोकांच्या ग्रंथा वरून समजतें. याचे उत्तर अक्षांश क्रमानें ३° व पूर्वरेखांश ७६° आहेत.

**एकदंतभट्ट**— साहा गाणपत्यांतील स्वर्ण गणपतीचा उपासक. हा पहिल्या शंकराचार्यांच्या वेळेस होता. आनंदगिरीच्या शंकर विजयांतील १८ वें प्रकरण पहा.

**एकनाथस्वामि**— प्रसिद्ध जो भानुदास नांवाचा साधु त्याचा हा पणतू, चक्रपाणीचा नातू, व सूर्योपंताचा पुत्र. याचे आईचें नांव रुक्मिणी होतें. हा देशस्थ आश्वलायन ब्राह्मण होता, व पैठणास रहात असे. याचें जन्मवृत्त भक्तविजया मध्यें पंचेचाळिस्या अध्यायांत वर्णिलेलें आहे. त्यांतील सारांश येणें प्रमाणें:— याचा व्रतबंध झाल्यावर याचीं आई बापें निवर्तलीं. तेव्हां याचें पालन पोषण याचा आजा जो चक्रपाणि त्यानें केलें, व वंशास तंतु काय तो हा एकच होता ह्मणून यास घरांतील माणसें एका अशा नांवानें हांक मारीत.

हा सदाचार संपन्न, नैष्ठिक, क्षमाशील, भक्तिमान् आणि विरक्त, असा होता. व त्यावरून हा ज्ञानसंपन्न परिपूर्ण झाल्यावर लोक यास ज्ञानेश्वराचाअवतार आहे असें ह्मणूं लागले. चक्रपाणीनें याजकडून प्रथम थोडेंसें वेदाध्ययन करविलें होतें. व पुराण ऐकणें हें तर यास स्वाभाविकच आवडतअसे. हा लहानपणीं नेमानें पुराणास जाई, व त्यांत जी शंका येई ती मोठ्या नम्रतेनें पुराणिकास पुसे. याला कृष्णाची भक्ति करणें मनापासून आवडे. ह्मणून त्याचीं पूजा अर्चा हा मोठ्या भक्तिभावानें करी. या प्रमाणें याचा क्रम बरेच दिवस चालला असतां, याच्या मनांत आलें कीं, श्रीगुरूस शरण जावें. परंतुश्रीगुरु आपणांस कसा भेटेल, व तो पहावा कोठें अशा विचारांत हा असतां, कोणी यास असें सांगितलें कीं, दौलताबादेस (देवगड) जनार्दनपंत ह्मणून कोणी गृहस्थ शांकर मतानुयायी तेथील यवन अधिकाऱ्या जवळ कारभारी आहेत ते बहुत योग्य आहेत. त्या वरून आजास पुसून हा तेथें गेला, व युक्तीनें त्यांची भेट घेऊन प्रार्थना करून ह्मणाला कीं, मी श्रीचरणांस शरण आलोंआहें तर पावन करणें आपणांकडे आहे. त्या वरून जनार्दन पंतांनीं यास आश्वासन दिलें, व जवळ राहण्याची आज्ञा केली.

हा तेथें राहून यानें त्यांची सेवेनें इतकी मर्जी संतुष्ट केली कीं, यास त्यांनीं ब्रह्मविद्येचा उपदेश केला. पुढें तींत याची दृढता झालेली पाहून, सरकारी काम

काज कांहीं दिवस याजकडून करविल्यावर यास नरसोबाच्या वाडीस पाठविलें. कारण तेथें घाट बांधण्याचें काम त्यांस कर्तव्य होतें, तें हाच चांगल्या रीतीनें करील असें त्यांस दिसून आलें. पुढें हा तेथें गेला, व गुरूच्या आज्ञे प्रमाणें तें काम यानें उत्कृष्ट रीतीनें कडेस लाविलें. यानें करविलेलें काम पाहून जनार्दनपंत इतके संतुष्ट झाले कीं, त्यांनीं आपल्या गुरूचें स्मरण केलें. त्या बरोबर ते तेथें प्रकट झाले असतां, जनार्दनपंतांनीं यावर कृपा करण्याची विनंति केली. ती वरून त्यांनीं, तूं कृतार्थ आहेस असा एकनाथास आशीर्वाद दिला, व आतां घरीं जाऊन प्रपंच परमार्थ सांग करावा, अशी आज्ञा करून आपण अंतर्धान पावले.

यानें चमत्कार वगैरे लोकांस दाखविल्याच्या गोष्टी भक्तविजयांत व लोकांच्या सांगण्यांत पुष्कळच आहेत, परंतु सर्वभूतीं भगवद्भाव नशीच भूतदया ही विषयीं जी याची एक गोष्ट आहे ती अशी;- एकदां असें झालें कीं, याच्या घरीं पितृतिथि असतां, त्या निमित्य आदल्या दिवशीं यानें ब्राह्मणांस क्षण दिला. नंतर दुसऱ्या दिवशीं स्वयंपाकास आरंभ होऊन कित्येक पदार्थ तयार झाले, इतक्यांत त्या मार्गानें जाणाऱ्या अतिशूद्रांस त्यांचा खमंग सुवास आल्यानें, असें अन्न आपणां सारख्या हतभाग्यांस कोठून मिळणार? अशा विषयीं परस्परांत संभाषण झालेलें नाथांच्या कानांवर गेलें; त्या वरून नाथ लागलेच बाहेर आले, व अतिशूद्रांस हांक मारून परत बोलावून ह्मणाले, तुह्मीं सर्वजण बायका मुलांसुध्दां स्नान करून सत्वर यावें, ह्मणजे स्वयंपाक सिध्द आहेच, जेऊन मग खुशाल पाहिजे तिकडे जावें. असें ऐकून अतिशूद्र ह्मणाले महाराज, आपण आह्मांस दयेस्तव बोलांवितां ह्मणून आह्मी यावें हें खरें, परंतु मोंगलाई असल्यामुळें सरकारांत कोणी चाहाडी केल्यास आमचा परिणाम नीट होणार नाहीं, ह्मणून भय वाटतें. तेव्हां नाथ ह्मणाले, त्याची काळजी तुह्मांस करणें नलगे. प्रसंगच आल्यास सरकार व आह्मी पाहून घेऊं. तुह्मांस इजा होऊं देणार नाहीं. त्यावरून गांवांतील अतिशूद्र मंडळी सर्व तेथें जमा झाली, व त्यांस नाथांनीं यथेच्छ भोजन देऊन राहिलेलें अन्न त्या सर्वांस वांटून दिलें व मार्गस्थ केलें.

नंतर सडा संमार्जन करून पुनः स्वयंपाकास आरंभ झाला, व नाथ स्नान करून संध्या होतांच देवार्चनास घेऊन बसले. इकडे गांवांत अतिशूद्रांस आधीं जेऊं घातल्याचा सर्वत्र बोभाटा झाल्यानें ब्राह्मणांनीं कट केला कीं, आज नाथांच्या घरीं भोजनास कोणीही जाऊं नये. इतक्यांत नाथाच्या घरीं सर्व त-

चारी झाल्यावर त्यांनीं ब्राह्मणांस बोलाऊं पाठविलें; परंतु सर्वांचा निरोप असा परत आला कीं, आह्मी कोणी येत नाहीं, तेव्हां नाथांस मोठा विचार पडून आतां आयत्या वेळेस ब्राह्मण कोठून आणावे ह्मणून, आंत बाहेर, आत बाहेर अशा प्रकारें घरांत येरझारा करीत असतां असें सांगतात कीं, एका एकीं पहातात तों ब्राह्मण येऊन पाटावर बसले आहेत. त्या वरून नाथ हर्षितहोऊन त्यांनीं यथासांग श्राद्ध कडेस लाऊन ब्राह्मणांस विडे दक्षिणा दिली. व त्यांस मार्गस्थ केलें. तों गांवचे ब्राह्मण बाहेर वाट पहात बसलेच होते कीं, याच्या घरचें श्राद्ध आज कसें होतें तें पाहूं. इतक्यांत श्राद्धीय ब्राह्मणांची झुंड बाहेर पडलेली त्यांनीं पाहिली. तों त्यांत कोणाचा बाप, कोणाचा आजा, कोणाचा चुलता इत्यादि आहेत, असें पाहून सर्व लज्जित होऊन आप आपल्या मनांत ह्मणूं लागले कीं, आपणांस साधूचा छळ घडला हें नीट झालें नाहीं. सारांश पुढें ब्राह्मणांनीं नाथास क्षमा मागितली व ती त्यांनीं संतोषानें अंगीकारिली.

आतां नाथांनीं जे ग्रंथ लिहिले ते येणें प्रमाणें होत :— प्रथमतः यांनीं गुरूची आज्ञा झाल्या वरून दौलताबादेस असतां चतुःश्लोकी भागवतावर टीका लिहिली, व ती चंद्रभट्टाच्या घरीं तयार करून गुरूस आणून निवेदन केली. पुढें पैठणास आल्यावर, भागवताच्या एकादश स्कंधावर टीका लिहिण्यास आरंभ करून, पहिली पंचाध्यायी पैठणास समास केली, व राहिलेला ग्रंथ श्रीक्षेत्र काशी येथें शालिवाहन शके १४९५ मध्यें पुरा केला. असें सांगतात कीं,– ही टीका चालली असतां काशींतील ब्राह्मणांनीं याचा फार छळ केला; परंतु पुढें असा चमत्कार झाला कीं, तीच टीका त्याच ब्राह्मणांनीं पालखींत घालून तिची मिरवणूक क्षेत्रभर केली. याचा तिसरा ग्रंथ भावार्थरामायण, चौथा रुक्मिणी स्वयंवर, पांचवा हस्तामलक, साहावा ग्रंथ आनंद लहरी आणि सातवा ग्रंथ ब्रह्मकाष्टकावर टीका स्वात्मसुख अशा नांवाची, या शिवाय पदें, अभंग, जागल्या, जोशी, गारुड इत्यादि कविता यांची पुष्कळ असून गोड आहे.

नाथाची ओंवी साडेचार चरणी असते, व शेवटच्या चरणांत अनुप्रास साधलेला असतो, आणि त्यावरून ही ओंवी नाथाची अशी तेव्हांच ओळखतां येते. याची गुरुभक्ति इतकी कडकडीत होती कीं, यानें जेवढी ह्मणून क-

विता केली तेवढींत एका जनार्दन या नांवा शिवाय दुसरें नांव लिहिलेंच नाहीं. याच्या अंतःकरणांत गुरुभक्तीचें असलेलें प्रेम, एकादश स्कंधांत जागोजाग इतकें प्रकट झालें आहे कीं, खऱ्या गुरुभक्तास तें वाचतानां प्रेमाश्रु येणार नाहींत असें कधींच होणार नाहीं.

## चतुःश्लोकी भागवत टीकेंतील वेंचे.

तप या नांवाची काय स्थिती ॥ तपें पाविजे कोण प्राप्ति ॥ ऐशी विधाता हा चित्तीं ॥ तपाची स्थिति गति विचारी स्वयें ॥ १०२ ॥ तप ह्मणजे परम साधन ॥ येणें साधे आत्मनिधान ॥ ऐकोनी मी असावधान ॥ ऐसें स्वहित स्फुरण हृदयीं स्फुरिलें ॥ १०३ ॥ तप ह्मणजे नव्हे स्नान ॥ तप ह्मणजे नव्हे दान ॥ तप नव्हे शास्त्रव्याख्यान ॥ वेदाध्ययन नव्हे तप ॥ १०८ ॥ तप ह्मणजे नव्हे योग ॥ तप ह्मणजे नव्हे याग ॥ तप ह्मणजे वासना त्याग ॥ जेणें तुटती लाग कामक्रोधाचे ॥ १०९ ॥ जेणें दंभलोभ निःशेष आटे ॥ अहं ममता समूळ तुटे ॥ याच नांवें तप गोमटें ॥ मानी नेटपाटें विधाता ॥ ११० ॥ निष्ठा केलिया तपस्थिति ॥ जाहली सद्गुरूची प्राप्ति ॥ आतां गुरुमुखें प्रजापती ॥ आत्मप्रतीति पावेल ॥ १५६ संतोषून श्री नारायण ॥ ब्रह्मयाशीं ह्मणे आपण ॥ जें अभीष्ट वांछी तुझें मन ॥ तो वरु संपूर्ण माग वेगीं ॥ ३०७ ॥ ऐक स्वामि विश्वनाथ ॥ तूं अनाथाचा निजनाथ ॥ मज करावेंजी सनाथ ॥ ऐसें प्रार्थितउपनम्य मान ॥ ३२९ ॥ कां ह्मणशी उपलप्यमान ॥ मी केवळ झालोंजी अज्ञान त्या मजवरी कृपा करून ॥ निजगुह्य ज्ञान सांगावें ॥ ३३० ॥ ऐकें बा विषय वासनेवीण ॥ वृत्तीशीं जें विवेक स्फुरण ॥ त्या नांव बोलिजे ज्ञान ॥ सत्य जाण स्वयंभू ॥ ३९७ ॥ कीं चिद्रूपें वृत्तीचें स्फुरण ॥ त्या नांव बोलिजे ज्ञान तेंचि स्वयें होइजे आपण ॥ या नांव विज्ञान विधातया ॥ ३९८ ॥ देहाचें जाऊन अहंपण ॥ ब्रह्माहमस्मि स्फुरे स्फुरण ॥ ते स्फूर्तिही विरे संपूर्ण ॥ या नांव विज्ञान पूर्णत्वाचें ॥ ३९९ ॥

## हस्तामलक ग्रंथांतील वेंचे.

अतिशयेंसी श्रीशंकरु ॥ करिते झाले प्रश्नादरु ॥ ज्ञान विज्ञान निज निर्धारु ॥ आत्मसाक्षात्कारु प्रकटावया ॥ ५१ ॥ तूं कैंचा कोणाचा कोठील कोण तुझें कोठून आगमन ॥ काय नांव कोण वर्ण ॥ पुढारां गमन तुज कोठें

॥५८॥ ऐसा आचार्यांचा प्रश्न ॥ ऐकतां प्रकाशलें निजज्ञान ॥ जैवी लागतां रविकिरण ॥ सूर्यकांत संपूर्ण प्रभा दावी ॥ ५९॥ देखोनि पूर्णिमा पूर्ण चंद्र ॥ भरितेनें उचंबळे क्षीरसागर ॥ तैसी देखोनि प्रश्नादर ॥ ज्ञानाब्धि अपार उलथलें भरितें ॥ ६० ॥ कीं होतां वसंताचें आगमन ॥ कोकिळा सांडी निज मौन ॥ तैसी आचार्यांचें ऐकतां वचन ॥ विसर्जी मौन यावज्जन्म ॥ ६१ ॥ ऐकतां आचार्यांचें वचन ॥ करतळामळ प्रकाशी ज्ञान ॥ या लागीं तेंचि अभिधान ॥ हस्तामलक जाण ह्मणती पैं ॥ ६२ ॥

### येंचे स्वात्मसुख.

एकाचेनि अविद्या नाशें ॥ जग मुक्त होय अपैसें ॥ मानिती त्यां मतपिसें मताभिमानें ॥ ३५५ ॥ एक्या दोरें दांवण उपडिली ॥ तरी अवघीं कैशीं मुक्त झालीं ॥ ते अधिकाधिकचि गुंतलीं ॥ परस्परानु मिळणी ॥ ३५६ ॥ तेवी एकाच्या अनुष्ठान सिद्धी ॥ जो जगाची मुक्ति प्रतिपादी ॥ तो जाण पां त्रिशुद्धि ॥ अधिक गुंते ॥ ३५७ ॥ एकाचेनि भोजनें ॥ केवी तृप्त होइजे सकळ जनें ॥ एकाचेनी अमृतपानें ॥ काय जग अमर होय ? ॥ ३५८ ॥ तैशी एकाचेनि परप्राप्ति ॥ सकळां लागीं होय मुक्ति ॥ हे बोली साच वदती ॥ परी सिध्द अर्थ तो नव्हे ॥ ३५९ ॥ अहो ज्याची अविद्या निरसे ॥ त्याशीं जग मुक्त दिसे ॥ तेथें अवघे मुक्त करावे ऐसें ॥ साभिमानत्वचि उरे ॥ ३६० ॥ फिटली अविद्येची बाधा ॥ तेचि एक प्राप्त मुक्तिपदा ॥ हे वसिष्ठादिमत मर्यादा ॥ ज्ञानियाची ॥ ३६१ ॥

एकनाथाच्या स्त्रीचें नांव गिरिजाबाई होतें, व ती महान् पतिव्रता होती. गिरिजाबाईस एक नाथा पासून हरिपंडित म्हणून एक मुलगा व लीलाबाई नांवाची एक मुलगी झाली होती. ही लीलाबाई प्रसिद्ध जो मुक्तेश्वर कवि त्याची आई होती. नवनीतांत यास मुली दोन लिहिल्या आहेत ती चूक आहे.

एकनाथांनीं शके १५०६ मध्यें ज्ञानेश्वरी चांगली शोधून प्रगट केली. त्यामुळें वारकरी लोक त्यास फार मान देतात. यांची समाधि शके १५२१ मध्यें फाल्गुन वद्य ६स पैठण येथेंच झाली, व त्या वेळेस त्याचें वय ६१ वर्षांचें होतें; कारण याचें जन्म शके १४७० मध्यें झालें होतें. एकनाथास रामाजनार्दन आणि जनी जनार्दन असे दोघे गुरुबंधु होते. एकनाथाचे संप्रदायी, भानुदास एकनाथ हें भजन कीर्तनादिकांच्या अंतीं करून शेवटीं, एकनाथ, एकनाथ, असें पांच सहा

वेळ ह्मणून कीर्तन समास करितात. हेंच प्रतीक पुढें वारकऱ्यांनीं उचललें.

**एकनाथी भागवत**— एकनाथांनीं भागवताच्या ११ व्या स्कंधावर लिहिलेली टीका; हि-ची संख्या सुमारें चौस हजार आहे. हा ग्रंथ शालिवाहन शक १४९५ मध्यें झाला.

**एकनाथीरामायण**— भावार्थ रामायण तेंच.

**एकवीससमासी**— समर्थ रामदास स्वामिकृत स्फुट ग्रंथांतील एक.

**एकशिलानगर**— एकासील नगर तेंच. (भोज प्रबंध पहा.)

**एकादशीचरित्र**—समर्थ रामदास पंचायतनांतील प्रसिद्ध साधु जे केशव स्वामि त्यां-नीं केलेला ग्रंथ.

**एकांबरेश्वर**— महादेवाचें दक्षिण दिशेकडील प्रसिद्ध स्थान. येथील शिवलिंगास पृथिवीलिंग असें नांव आहे; कारण त्यावर पाणी ओती ओती तों तें लागलेंच कोरडें ठणठणीत पडतें. हें स्थान शिवकांचींत आहे.

**एकासील नगर**— यास हल्लीं वारंगुळ शहर ह्मणतात. (सप्रूमा०).

**एकाक्षरनाममाला**— विश्वशंभुकृत संस्कृत भाषेचा कोश.

**एकाक्षरनिघंट**— उरगाच्या दंडनाथ यानें केलेला संस्कृत कोश.

**एकाक्षरी कोश**— पुरुषोत्तमराज कविकृत संस्कृत कोश. (चार्यशब्द प्र०

**एलम्मागारु**— प्रसिद्ध जे वल्लभाचार्य त्यांची आई. लक्ष्मणभट्टाची स्त्री. (वल्लभा-

**एलोर**— उत्तर सरकार गांवा जवळील किल्ला व गांव. हा तैलंगणांत आहे.

**एलोरा**— इंग्रज लोक वेरूळास व त्यांतील लेण्यास ह्मणतात.

**ऐंद्रव्याकरण**— पाणिनीचें व्याकरण होण्या पूर्वीं भरतखंडांत जें व्याकरण चालू हो-तें तें; परंतु हें जिनेंद्रकृत व्याकरण समजूं नये. तें निराळें व हें निराळें असें स-मजावें. (सरला प्र०).

**ऐरावतविजय**—लक्ष्मीनारायणाच्या यानें जे संस्कृत ग्रंथ लिहिले त्यांतील एक.

**ओड्र देश**— ओरिसा प्रांत तोच. हा गोंडवणाच्या पूर्वदिशेकडील प्रांत समजावा.

**ओढिया**— हें शहर आहे. जगन्नाथक्षेत्र तें हेंच.

**ओरिसा**— उत्कल देशाचें हल्लींचें नांव. हा कलिंग देशाचे ईशान्येकडील प्रांत समजावा.

**औधप्रांत**— अयोध्या प्रांत.

**औमा**— गोपीचंद राजाची पट्टराणी. मैनावती जी हिची सासू तिनें जालंदर ना-थास गुरु करून ती त्याची भक्तिभावानें रात्रंदिवस सेवा करीत असतां हिला

तें करणें विपरीत आहेसें वाटून, तो वृत्तांत हिनें आपला नवरा गोपीचंद्र यास कळविला, व सर्व शहरांत या बद्दलचा शब्द लोक आपणांस देतात ह्मणून सांगितलें. त्या वरून गोपीचंद्र संतप्त होऊन, आईचें अनुमत न घेतां त्यानें ज्ञालंदरास लिदींत पुरलें. (गोपीचंद्र श० पहा.

**औरंगजेब**– दिल्लीचा बादशाहा. शाहाजाहानाचा मुलगा. शके १५८० पासून १६२९पर्यंत यानें ४९ वर्षें बादशाहीचा अधिकार केला, व पुढें मरण पावला. मुसलमानी धर्माचा यास फार अभिमान असे; परंतु हिंदूंस त्रास देणें हा याच्या अंगीं मोठा दुर्गुण होता.

**औरंगाबाद**– हें शहर दौलताबादेच्या दक्षिणेस आहे. याचें पहिलें नांव खडकी. याचे उत्तर अक्षांश सुमारें २° व पूर्वरेखांश ७६ आहेत.

# क.

**ककुभ**– ओरिसा प्रांतांतील पर्वत.

**कच्छ देश**– कांठेवाड व गुजराथ यांच्या वायव्येकडील देश. याचें मुख्य शहर भूज.

**कंजेवरम**– दक्षिणेंतील एक शहर. याचे उत्तर अक्षांश १° असून पूर्वरेखांश ८°आहेत. कांची नगरासच हें हल्लीं नांव आहे.

**कटक**– कलिंग देशांतील एक शहर.

**कठोपनिषत्**– कठ अथवा कठवल्ली उपनिषत्. याचें बंगालींत राममोहनरायानें भाषांतर केलें आहे.

**कडी**– गुजराथेंतील एक गांव.

**कणभक्ष**– कणाद ऋषि.

**कणाद**– वैशेषिक न्यायशास्त्राचा कर्ता. साहा आस्तिकांतील एक. उत्तराध्ययनसूत्रवृत्ति नामक जैन ग्रंथाच्या तिसऱ्या अध्ययनांत याच्या विषयीं असें आढळतें. हा अंतरंजिका नामक नगरचा राजा जो बलश्री, त्याच्या कारकीर्दींत होता. महावीर ह्मणून जो जैन लोकांचा चोविसावा तीर्थंकर विक्रमसंवता पूर्वीं ४७० वर्षें मरण पावलेला त्या पूर्वीं हा ५४४ वर्षें होता. या विषयीं त्या ग्रंथांत वचन आहे तें येणें प्रमाणें:–

चतुश्चत्वारिंशदाढ्ये वर्षाणां पंचभिः शतैः॥ श्रीवीरमुक्तेर्जातस्य षष्ठस्याथोच्यते कथा॥१॥

यावरून आज यास होऊन २९४९ वर्षें झालीं आहेत असें स्पष्ट दिसतें. जैनलोक

याला साह्याचा निन्हव ह्मणतात.

**कण्हेरखेड**— सातान्या पासून ६ कोसांवर कोरेगांव तालुक्यांत हा गांव आहे. शिंदे घराण्याचा मूळपुरुष राणोजी तो येथील पाटील होता.

**कथाकल्पलता**— हंसराज स्वामींनीं केलेला प्राकृत ओंवीबद्द ग्रंथ. याचीं अठरा पूर्व व अठरा उत्तर प्रकरणें आहेत. वेदांत विषय ज्यांस मुळींच गोड लागत नाहीं, अथवा समजत नाहीं. त्यांस त्यांची गोडी लागावी अशा प्रकारच्या रूपकाच्या तऱ्हेनें यांत गोष्टी सांगितल्या आहेत. याची संख्या सुमारें दहा हजार ओंव्याचीं आहे.

**कथाकौतुक**— श्रीधर कवीनें केलेलें फारशी भाषेंतील चमत्कारिक गोष्टींचें भाषांतर.

**कथासरित्सागर**— सोमदेवभट्ट यानें गुणाढ्याच्या पैशाची भाषेंत लिहिलेल्या बृहत्कथेचें केलेलें संस्कृत भाषांतर.

**कथासारामृत**— महीपति कविकृत ओंवीबद्द मराठी ग्रंथ.

**कदंबकवि**— अदिति कुंडलाहरण नाटकाचा कर्ता. ( बुल्ह॰ का॰ शो॰ ).

२— हा नामांकित कवि प्रतापरुद्र राजाचा दिवाण होता. याचें मूळचें राहणें कलिंगदेशांतलें होतें. याच्या हातीं राजसत्ता असून लोकांत वजनही चांगलें होतें. हा ज्योतिषविद्येंत चांगला निपुण होता. याला त्या शास्त्राचा लहानपणा पासून छंद असल्या मुळें यानें ज्योतिषार्णव नांवाचा एक ग्रंथ रचिला. या ग्रंथाचा उपयोग पंचांगें करण्यांत फार पडतो. या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत यानें आपला जन्म शके १३८४ चित्रभानु संवत्सरीं लिहिला आहे. ( कविच॰ )

**कंदाहार**— कंधार देश.

**कंधारदेश**— जुनें नांव गांधार देश. याची राजधानी तक्षशिला. जिला पश्चिमेकडील लोक तक्षिला ह्मणतात.

**कंधारशहर**— काबुलाचें मुख्य शहर.

**कनकगिरि**— काशींतील राहणारा जैमिनी मतावलंबी ब्राह्मण. ( आनं॰ श॰ प्र॰ ) प॰

**कनकदास**— हा कानडा कवि जातीचा बेरड होता. कानडी भाषेंत याचीं पदें पुष्कळ आहेत. याची हकीकत अजून आह्मांस कळली नाहीं.

**कनकाई**— प्रसिद्ध तुकाराम त्याची आई. बोल्होबाची बायको.

**कनियानूर**— केरल देशांतील शहर. याचे उत्तर अक्षांश सुमारें ११° व पूर्वरेखांश ७६° आहेत.

**कनोजदेश**— जुनें नांव कान्यकुब्ज देश.

**कनोजशहर**— कान्यकुब्ज देशाचें शहर. हें लखनौच्या वायव्येस असून याचे उत्तर अक्षांश सुमारें २७° व पूर्वरेखांश ८०° आहेत.

**कन्यकापुराण**— तिमय्या सातीं नामक कवीनें तेलंगी भाषेंत रचलेला ग्रंथ. यांतील कथा अशी आहे कीं, राजमहेंद्री शहरा जवळ येनुगोंडा नांवाचा गांव असे. तेथील राजपुत्र विष्णुवर्द्धन त्यानें एका वैश्याच्या कन्येवर बलात्कार केला, व तिचें कौमारत्व भंगून टाकिलें. त्या मुळें त्या कन्येनें खेद पाऊन, अग्निप्रवेश करून आपणास जाळून घेतलें. ही गोष्ट तिच्या घरच्या माणसांस व इतर आप्तांस कळल्यावर, त्यां पैकीं सुमारें शंभर माणसांनीं तिच्या शोकानें अग्निप्रवेश केला. ज्या स्थळीं या कन्येनें आपणास जाळून घेतलें तेथें पुढें लोकांनीं देऊळ बांधून त्यांत तिची मूर्ति करून बसविली. व तिचें नांव कन्यका परमेश्वरी असें ठेविलें. हिला वाणी लोक फार मानितात, व तिची पूजाही करितात. हें चरित्र फारच रसभरित आहे असें ह्मणतात. (कविच०)

**कन्याकुमारी**— दक्षिणसमुद्रांत ही एक भूशलाका आहे. हिला हिंदुस्थानाचें दक्षिणटोंक म्हटलेलें आहे. हिचे उत्तर अक्षांश ८° व पूर्वरेखांश सुमारें ७७° आहेत.

**कन्हया**— प्रसिद्ध जो तुकाराम त्याचा आजा. शंकराचा पुत्र. व बोल्होबाचा बाप.

**कपिल**— कौशांबी नगरचा राजा जिनशत्रु त्याच्या काश्यपनामक उपाध्यायाचा पुत्र. यानें श्रावस्ती नगरांत अध्ययन केलें. जैनलोकांच्या उत्तराध्यन सूत्रवृत्तींतीलआठव्या अध्ययनांत याची सविस्तर कथा आहे; परंतु त्यांत सांख्यशास्त्रकर्ता हाच असें कांहीं लिहिलें नाहीं. त्या वरून तो कपिल निराळा व हा निराळा असें दिसून येतें.

**कपिलर**— अव्वेयर म्हणून जी प्रसिद्ध कवयित्री तिच्या तीन भावांतील एक. याच्या पिरली नामक बापानें यास अरण्यांत सोडून दिल्यावर एका ब्राह्मणानें याचें संगोपन केलें. व तामिळ भाषा उत्कृष्ट शिकविली. यानें पुढें कित्येक कविताबद्ध ग्रंथ लिहिले, त्यांत आगवर नांवाचा एक ग्रंथ लिहिला. त्यांत यानें आपलें व आपल्या भावंडांचें, सर्व इतिवृत्त लिहून, आपलें जन्म चोळदेशांत झाल्याचें लिहिलें आहे. (कविच०)

**कपिलवस्तु**— एक शहर. येथें सूर्यवंशी शुद्धोदन राजा राज्य करीत होता. यासच पुढें सर्वार्थ सिद्ध नांवाचा झालेला पुत्र नामांकित बौद्ध मानला गेला. हें शहर नेपाळाच्या दक्षिणेस व हिमालयाच्या अगदीं पायथ्याशीं आहे. याच्या दक्षिणेस

गोरखपुर यास लगतच आहे. याचे उत्तर अक्षांश सुमारें २८ व पूर्व रेखांश ८४ आहेत. ( हिंदुस्था० प्रा० प्रका० )

**कप्पडी**– कल्याण ज्यास कल्याण कलबुर्गा ह्मणतात,त्याजवळचा एक गांव. लिंगाईत धर्माचा स्थापक जो बसव तो कांहीं दिवस येथें राहात असे.

**कबीर**– हा एक मोठा साधु पुरुष होऊन गेला. याचें जन्म झाल्यावर हा ज्या मुसलमान जातीच्या स्त्री पुरुषांस सांपडला त्या वरून यास त्याच जातीचा ह्मणून ग्रंथकारांनीं वर्णिलें आहे. याचें जन्म तीन चार प्रकारांनीं लिहिलेलें आढळतें. कोणी ह्मणतात, नीमा नांवाचा एक मोमीन होता, तो एक्ये वेळीं विणायाच्या कापडाचें सूत धुण्यास भागीरथीवर गेला असतां तींतून नुकेंच वहात आलेलें मूल त्याच्या दृष्टीस पडलें, व तें त्यानें घरीं आणून नुरी नांवाच्या आपल्या स्त्रीपाशीं दिलें, तोच हा होय. कोणी ह्मणतात, याचें जन्म शिंपल्यांतून झालें. कोणी ह्मणतात खानदेशांत काशी ह्मणून एका गांवांतील लहर तलावांत हा मोमिनास सांपडला. कोणी ह्मणतात, रामानंद स्वामीच्या मुखा वाटे एका विधवेस, 'पुत्रवतीभव' असा चुकून आशीर्वाद निघाला, त्या वरून ती गर्भिणी झाली असतां, लोकलज्जेनें अरण्यांत राहिली, व तेथें प्रसूत होऊन झालेलें मूल तसेंच सोडून देऊन निघून गेली, तोच हा मोमिनास सांपडला. सारांश या सर्व गोष्टींत खरी कोणती हा निर्णय जरी आज होऊं शकत नाहीं, तरी याचें जन्म अन्यत्र झालें असून हा मोमिनास सांपडला एवढी गोष्ट निःसंशय खरी आहे.

याच्या अद्भुत ज्ञाना वरून भाविक लोक याला शुकाचा अवतार असें मानितात. याचें जन्म कधीं झालें इत्यादिकां विषयीं कबीरपंथी लोक असें ह्मणतात.–" संवत् बारहसें पांचमो ज्ञानी कियो विचार॥ काशी माहीं प्रगट भयो शब्द कहो टकसार॥ १॥ संवत् पंधरहसे पांचमो मगर कियो गवन॥ अगहन सुदी एकादशी मिले पवन सो पवन॥"२॥– ह्मणजे या दोहोऱ्यांतील अर्थ असा कीं;– संवत् बाराशें पांचां मध्यें किंवा शके १०७० त याचें जन्म काशींत झालें व पंधराशें पांचांमध्यें अथवा शके १३७०त आश्विन शुद्ध एकादशीस मगर ह्मणून गांव आहे तेथें याचें निर्याण झालें. या वरून हा तीनशें वर्षे वांचला होता असें उघड दिसून येतें.

हा ज्ञानेश्वर वगैरे भावंडें यांच्या वेळेस जरी होता, तरी त्यांच्या पूर्वी असल्याचा दाखला असा आढळतो कीं, याचे गुरु जे प्रसिद्ध रामानंद स्वामि तेच

ज्ञानेश्वराच्या बापाचे गुरु होते, ह्मणून हा त्यांचा काका गुरु दिसत असून त्यां पूर्वीचा खास असें उघड सिद्ध होतें. अस्तु, नानकाची व याची भेट होती असें कित्येक ह्मणतात. शिवाय असेंही सांगतात कीं, बहिलोलखान लोदी त्याचा पुत्र जो शिकंदर त्यानें, हा मुसलमान असून हिंदुधर्म पाळितो अशा बद्दल याचा पुष्कळ छळ केला. परंतु या दोन्ही गोष्टी संभवत नाहींत. कारण, याची समाधि शके १३७० मध्यें असून नानकाचें जन्म शके १३९१ मध्यें आहे, आणि शिकंदराचा राज्यारंभ इसवी १४८८ ह्मणजे शके १४१० मध्यें आहे. म्हणून हा मेल्यावर नानक एकवीस वर्षांनीं जन्मला. व शिकंदराची राज्यकारकीर्द चाळीस वर्षांनीं सुरू झाली.

कबीर हा आपल्या बापाचा जो धंदा होता तोच चालवून निर्वाह करीत असे. याच्या बापानें याचें लग्न केलें होतें, व यास कमाल नांवाचा एक मुलगा झाला होता. कबीरास रामाची भक्ति करणें मनापासून आवडत असे, ह्मणून तो ती करण्यांत लहानपणा पासूनच तत्पर असे, आणि तेंच वळण याच्या पुत्रास लागून तोही याच्याच प्रमाणें नामांकित भक्तमंडळांत गणनीय झाला.

कबिरानें रामानंद स्वामीचा अनुग्रह संपादिला, त्या विषयीं अशी गोष्ट सांगतात कीं;– एकदां कबीर, स्वामींच्या स्नानास जाण्याच्या वाटेवर पाहांटचे वेळेस त्यांची वाट पहात बसला. इतक्यांत नित्य नेमा प्रणें ते स्नानास चालले असें पाहून यानें त्यांस आडवें होऊन साष्टांग दंडवत केलें, व विनंति केली कीं, कृपा करून मला अनुग्रह द्यावा. स्वामि ह्मणाले तूं कोण व तुझें नांव काय? तेव्हां यानें आपली जात सांगून मला कबीर ह्मणतात असें सांगितलें. त्या वरून स्वामि बोलले, तूं यवन असल्या मुळें आह्मांपासून अनुग्रह पावण्यास योग्य नाहींस. तर तो तूं अन्य कोणा पासून संपादन कर. असें ऐकून यानें म्हटलें महाराज, माझी भावना आपणां शिवाय अन्यत्र बसत नाहीं, यास्तव मजवर कृपा करावी. त्यावर स्वामींनीं कांहीं एक उत्तर न देतां तसेच स्नानास निघून गेले. असें पाहून हा निरुपाय होऊन घराकडे परत आला; परंतु त्या दिवसा पासून आपले गुरु रामानंद स्वामि असें यानें भाषणांत वगैरे सांगण्याचा पाठ धरिला.

कबिराचा कीर्तन करण्याचा नियम असे. त्या प्रमाणें तो एकदां कीर्तन करीत असतां त्यानें ही सर्व कृपा रामानंदाची असें बोलून त्यांच्या नामघोषानें भ-

जन केलें व कीर्तन आरोपिलें. ही गोष्ट जात जात स्वामींच्या कानांवर गेली. तेव्हां त्यांस आश्चर्य झालें व मनाशीं ह्मणाले कीं, आह्मीं तर यास अनुग्रह दिला नाहीं, असें असून हा लोकांस आमचें नांव सांगतो त्या अर्थी एकदां ही गोष्ट समक्ष अनुभवास आणून सोडिली पाहिजे. पुढें हा कीर्तनास जेव्हां उभा राहील तेव्हां आह्मांस कळवावें, अशी शिष्यांस ताकीद करून ते आपला नित्यक्रम करीत असतां एके दिवशीं शिष्यांनीं, आज्ञे प्रमाणें हा कीर्तनास उभा राहिल्याची खबर स्वामींस येऊन दिली. त्या वरून स्वामि तेथें मुकाट्यानेंच जाऊन व एका बाजूस उभे राहून, पुढें हा काय करतो तें पहात उभे राहिले. कीर्तन आरोपण्याच्या संधीस यानें पाठा प्रमाणें आपलें नांव उच्चारून भजन आरंभिलें असें स्वामींनीं पाहून, रागानें पायांतील लांकडी पादुक यावर फेंकली. ती याच्या मस्तकास लागून जरी यास ती पासून दुःख झालें, तरी तें स्वामींनीं आपणांवर अनुग्रह केला, या आनंदांत विसरून तो अधिकच नाचूं लागला. तेणें करून स्वामि संतुष्ट होऊन त्यांनीं याच्यावर कांहीं दिवसांनीं पूर्ण ब्रह्मविद्येचा अनुग्रह केला.

कबिरानें साधु संतांस भोजन वगैरे देण्या साठीं एकदां आपली बायको एका वाण्याच्या घरीं गाहाण ठेविली, व शिधा आणून सर्वांस यथेच्छ भोजन दिलें. तशीच एकदां राजाची कोठी फोडून तींतून लागत होता तितका सरंजाम चोरला, इत्यादि गोष्टी, भक्तविजयाच्या पांचव्या व साहाव्या अध्यायांत अनेक आहेत. त्या त्यांत पहाव्या. व त्या गोष्टीं वरून वाचकांनीं इतकेंच अनुमान करावें कीं, याच्या अंतःकरणांत भूतदया फार होती.

कबीर चांगला ज्ञाता, उपासक व वैराग्यशील असल्या मुळें पराकाष्ठेचा निस्पृह होता. शिवाय एकादी गोष्ट एखाद्याच्या मनांत युक्तीनें बिंबवून देणें तेंही चातुर्य याच्या अंगीं चांगलें होतें. त्या विषयीं असें सांगतात कीं, एकदां कोणी एकानें यास येऊन असें पुसलें कीं, प्रपंचांत राहून परमार्थ होत नाहीं असें कित्येक ह्मणतात त्यास हें खरें किंवा कसें? कबीर ह्मणाला याचें उत्तर मी आपणांस उद्यां देईन; तों पर्यंत आपण येथेंच राहावें, व मी शिधा देतों हा घेऊन भोजन करावें. आलेला गृहस्थ बरें ह्मणून भोजन करून तेथेंच राहिला. नंतर दुसऱ्या दिवशीं पुनः यानें दिलेला शिधा घेऊन त्यानें भोजन केलें, व याकडे आला. इकडे कबिरानेंही आपलें देवतार्चन आटोपिलें. व भोजन करून

विणायाच्या वस्त्राचा ताणा, त्यांतील सुतें वेग वेगळीं करण्या साठीं उन्हांत ताणला. कांहीं वेळानें सुतें वेग वेगळीं करीत असतां कबिरानें एका एकीं आपल्या बायकोस हांक मारून तिला दिवा लाऊन आणावयास सांगितला. त्या बरोबर तिनें तो लाऊन आणिल्यावर तिजकडून तो यानें सुता जवळ धरवून गुंतलेलें सूत उकलें, व तिला दिवा परत नेण्यास सांगितलें. ही गोष्ट यानें भर दिवसास केलेली पाहून आलेल्या मनुष्यास मोठें आश्चर्य वाटलें, व यास वेडा म्हणावें कीं, शाहाणा ह्मणावें, अशा विषयीं विचार करूं लागला. तथापि ती गोष्ट मनांत ठेऊन, त्यानें यास पुसलें कीं, माझ्या शंकेचें उत्तर मला तुह्मी केव्हां सांगणार? कबीर म्हणाला मी तुह्मांस त्याचें उत्तर मघाशींच दिलेलें तुमच्या ध्यानांत आलें नाहीं असें दिसतें, यास्तव उलगडून सांगतों तें ऐकावें. भरदोन प्रहरच्या उन्हाच्या उजेडाहून सुतें वेगळीं करण्यास दिव्याचा उजेड अधिक नाहीं, असें असतां मी बायकोस दिवा आणायास सांगितल्या बरोबर तिनें बिलकूल तक्रार न करितां मी सांगितलें तें मुकाट्यानें केलें. सारांश अशी बायकोची ज्यास अनुकूलता असेल त्यासच प्रपंचांत राहात असतां परमार्थ घडेल. एऱ्हवीं घडणार नाहीं. इतकें ऐकून आलेला गृहस्थ समाधान पावून आपल्या घरीं निघून गेला. (भ०मा०)

कबिरानें शकनिधान नांवाचा एक ग्रंथ लिहून बाकीचे संप्रदाय प्रवृत्ती विषयीं लिहिले आहेत. शिवाय दोहरे व पदेंही असंख्य आहेत. ही याची सर्व कविता हिंदुस्थानी भाषेंत असून 'कहे कबीर' 'कहत कबीर' अथवा 'दास कबीर या प्रमाणें तिच्या शेवटास नांव घालण्याची याची चाल आहे. यानें केलेल्या सर्व कवितेचा संग्रह याच्या जन्मभूमी पासून जवळ असणाऱ्या चौडा नामक गांवीं असल्या विषयीं याचे संप्रदायी बोलतात.

कबीरसंप्रदायी लोक परस्पर भेटले असतां परस्पर नमन करणें तें, बंदगी, अथवा बंदगी साहेब, किंवा सत् साहेब असें ह्मणून करीत असतात. श्रुतगोपाळ व धर्मदास हे कबिराचे दोघे पट्टशिष्य होते. त्या दोघांनीं मिळून गोरक्षनाथ कथा, रामानंद कथा, आनंद सार, शब्दावली, मंगल, बसंत, होरी, रेखता, झुलना, कहार, हिंडोला, बारमास, छंचर आणि अलीफनामा असे लहान मोठे ग्रंथ लिहिले असून विज्जक नांवाचा ग्रंथ भागोदास नामक एका संप्रदायिकानें लिहिला आहे.

आपण आपल्या घरांत जशा हंड्या टांगतों त्या प्रमाणें शाहामृगाचीं अं-

डीं आगो आग टांगणें ही कबीरपंथी लोकांच्या मठाची मुख्य खूण आहे. तसेंच प्रायः मैदानाच्या जागेंत कीर्तन करणें असतां, सभोंवतें शुभ्र वस्त्राच्या पताकांचें आवार करून त्यामध्यें ते लोक कीर्तन करण्यास उभे राहतात. आणि त्यावरून हें कीर्तन कबीर पंथ्यांचें आहे, असें तेव्हांच पाहणारांच्या ध्यानांत येतें. आह्मी जी कीर्तना विषयींची तऱ्हा सांगितली ती पंढरीस स्वतः पाहिल्या वरून सांगितली आहे.

रामानुजाचार्यांच्या संप्रदायांतून प्रथम रामानंदी संप्रदाय निघून त्यांतून पुढें कबीर पंथ निघाल्या मुळें कपाळीं तिलक करण्याची रीत त्यांची यांची सारखीच आहे. भेद एवढाच कीं, रामानुज लोक मधली रेघ पिंवळी लावितात आणि रामानंदी वगैरे तांबडी लावितात. या वरून वाचकांनीं असें समजावें कीं,– जेवढे ह्मणून बैरागी लोक आहेत तेवढे सर्व रामानंदी होत. अस्तु. कबीरपंथांत हाल्लीं एकंदर बारा उपदेश किंवा १२ पंथ आहेत, असें ऐकण्यांतयेतें.

कबीर मरण पावला त्या वेळेस, हिंदु व मुसलमान हा आमचा हा आमचा असें ह्मणून वाद करूं लागले. तेव्हां असें सांगतात कीं, याच्या अर्ध्या देहाच्या तुळशी व अर्ध्या देहाचा सबजा झाला. त्या वरून मुसलमानांनीं सबजा घेऊन तो गोरख पुरा जवळ मगर ह्मणून गांव आहे तेथें नेऊन पुरला, व त्यावर मशीद बांधली, आणि तुळशी काशी येथील वीरसिंह राजानें काशीस आणवून त्यांचें दहन केलें, व त्या ठिकाणीं एक मोठें वृंदावन बांधिलें. (कविच०).

**कमला**– प्रसिद्ध जे वल्लभाचार्य त्यांच्या विठ्ठलनाथ नामक वडील मुलाची तिसरी मुलगी.

**कमलाकर**– गीतगोविंद ग्रंथाचा टीकाकार (बुल्ह०) २– शूद्र कमलाकर ग्रंथकर्ता.

**कमाल**– कबिराचा मुलगा. हा बापा प्रमाणेंच रामभक्त व मोठा वैराग्यशील होता. गोकुळ, मथुरा, वृंदावन, अयोध्या व द्वारका, इत्यादिक क्षेत्रांच्या यानें यात्रा करून साधूंचीं दर्शनें घेतलीं होतीं. याचें चरित्र महिपतिबावांनीं भक्तविजयाच्या ६व्या अध्यायांत पुष्कळ सविस्तर लिहिलें आहे. त्यांत एक गोष्ट अशी लिहिली आहे कीं,– हा फिरत फिरत चित्रकूटास गेला असतां, तेथें एक सावकार होता त्यानें एक अमोलिक हिरा याच्या पुढें ठेऊन विनंति केली कीं, कृपा करून याचा अंगीकार करावा. त्या गोष्टीस यानें नाकारून तेथून निघण्याची सि-

प्ता केली. इतक्यांत सावकारानें यास न कळूं देतां तोच हिरा याच्या पदरीं मु-
काम्यानें बांधून यास मार्गस्थ केलें. कांहीं दिवसांनीं हा घरीं येऊन बापास
भेटला व दोघेही आनंदानें गोष्टी करीत बसले. पुढें एक दोन दिवसांनीं हा
आपलें प्रवास संबंधीं गांठोडें सोडूं लागला तों तोच हिरा याच्या दृष्टीस प-
डला, तसाच कबीराच्याही दृष्टीस पडला. पडतांच कबीर यास ह्मणाला,तूं
माझा पुत्र नव्हेस, यास्तव या वेळेस घरा बाहेर हो. यानें विनंति केली, सावका-
रानें दिलेला हा हिरा गांठोड्यांत केव्हां बांधला तें मला ठाऊक नाहीं. आपण
रागाऊं नये. मी हा त्याचा त्यास परत देऊन येतों. इतकें बोलून लागलाच हिरा
घेऊन बाहेर पडला. व चित्रकूटास जाऊन हिरा सावकारास परत करून हा
माघारा काशीस आला. तेणें करून कबीर संतुष्ट होऊन त्यानें याचा अंगीका-
र केला असतां उभयतांही स्वकष्टार्जित द्रव्यानें निर्वाह करीत रामभजन करू-
न स्वस्थ राहिले. (कविच०).

**करणाकुतूहल**— भास्कराचार्यांनीं शके ११०५ मध्यें ज्योतिष शास्त्र विषयावर लिहि-
लेला संस्कृत ग्रंथ.

**करमेतीबाई**— हिंदुस्थानी भक्त. (नाभाजींचा भक्तमाल ग्रंथ पहा.)

**करवीरक्षेत्र**— कुवलयपुर शब्द पहा.

**करहाट देश**— कऱ्हाड प्रांत.

**कराची शहर**— सिंध प्रांतांतील शहर व बंदर. याचे उत्तर अक्षांश सुमारें २५ व पू-
र्वरेखांश ६७ आहेत.

**करुणामृत**— दैविदास कृत ग्रंथ मराठींत.

**करुषदेश**— हा देश उत्तर कोसलाच्या वायव्येस आहे. (प्राची०हिंदु० नका०).

**कर्नाटक देश**— कुंतल देशाच्या पूर्वेकडील देश. (प्राची० नका०)

**कर्णामृत**— बिल्वमंगलकृत संस्कृत भाषेंतील ग्रंथ. (वृद्ध मा०).

**कर्मकथा**— गुजराथी भाषेंत हिमराम कविकृत.

**कर्मक्रियाकांड**— शके ९९५ मध्यें सोमशंभु कवीनें केलेला ग्रंथ.

**कर्मजित्**— कलियुगांत जे मागध राजे झाले त्यांतील एक. जरासंध वंशीय बृहत्से-
नाचा पुत्र व सृतंजयाचा बाप. (राजमा०).

**कर्मतत्त्व**— मराठी भाषेंत वामनपंडित कृत श्लोकबद्ध ग्रंथ. यांत शांकरवेदांत पर
आठ प्रकरणें आहेत तीं अशीं— १ फलतत्त्व. २ यत्नतत्त्व. ३ भोगतत्त्व. ४ भो-

रूपतत्व. ५ आत्मतत्व. ६ वेदतत्व. ७ जीवतत्व आणि अनुभवतत्व.

**कर्महीनवैष्णवमत**– साहा प्रकारच्या वैष्णवांतील एक मत. (आनं० शां० प्र० १०) पहा.

**कर्मानंद**– एक भगवद्भक्त. (ना० भ०) पहा.

**कर्माबाई**– भक्तविजय अध्याय ३५ यांत हिची गोष्ट अशी लिहिली आहे कीं, जगन्नाथ क्षेत्रांत सात्विक नांवाचा राजा राज्य करीत असतां, ही बाई तेथें होती. हिचा नवरा मेला त्या वेळेस ही गरोदर होती. पुढें प्रसूत होऊन हिला पुत्र झाला. कांहीं दिवसांनीं पुत्राचें लग्न झालें व त्यासही पुत्र झाला; परंतु अल्पच काळांत पुत्र मरण पावून हिला अनिवार दुःख झालें. तथापि नातू होता त्यावर दृष्टि देऊनही समाधानानें राहात असतां, तोही एका एकीं मरण पावला. तेणें करून हिला जें दुःख झालें तें वर्णन करितां येत नाहीं. एकदां असें झालें कीं, हिच्या घरीं कोणी साधु येऊन उतरले, त्यांनीं हिला शोकग्रस्त पाहून त्यांजवळ असलेली गोपाल मूर्ति त्यांनीं हिला देऊन सांगितलें कीं, तूं या मूर्तीची सेवा करीत जा, व ती अशी कर कीं, लहान लेंकरास जसें जपतात, त्या प्रमाणें तिळमात्र न विसंबितां प्रातःकाला पासून अस्तमान पर्यंत, भोजनादिक सर्व व्यवहार यथासांग करण्यांत उपेक्षा करूं नको. त्या वरून त्या मूर्तीची सेवा मनोभावा पासून ही करूं लागली. तो हिचा भाव इतका फलद्रूप झाला कीं, ती धातुमूर्ति हिच्या हातानें प्रत्यक्ष जेऊं लागली.

एकदां असें झालें कीं,– हिला कांहीं कारणा मुळें उशीर होऊन देवास नैवेद्य वेळेवर पावला नाहीं. या बद्दल जगन्नाथ देवाच्या पुजाऱ्यांस देवाचा दृष्टांत असा झाला कीं, तुम्हीं उद्यां कर्माबाईकडे जा व तिला सांगा कीं, काल नैवेद्यास तूं उशीर केल्या मुळें देवास भुकेनें फार पीडा केली. असा दृष्टांत होतांच पुजाऱ्यांस आश्चर्य वाटलें. व त्यांनीं ती गोष्ट कर्माबाईस येऊन कळविली. नंतर हिचा नैवेद्य देवास प्रिय आहे असें जाणून त्या दिवसा पासून देवास प्रथम खिचडीचा नैवेद्य होणें तो, कर्माबाईचा झाला पाहिजे असें ठरविलें. त्या प्रमाणें अजून जगन्नाथास चालत आहे. या बाईस होऊन गेल्यास सुमारें दोन हजार वर्षें होऊन गेलीं आहेत. ( भक्तवि० अ० ३५ ).

**कलकत्ताशहर**– हें भागीरथीचा जो हुगळी नांवाचा फांटा त्याच्या कांठीं वसलेलें असून बंगाल्यांत आहे. याचे उत्तर अक्षांश सुमारें २२ व पूर्वरेखांश ८८ आहेत. हें शहर हल्लींच्या सरकाराची मुख्य इलाख्याची जागा असून येथें त्याचा मु-

ख्य अधिकारी राहती. याला कांहीं काळा पूर्वी नवद्वीप ह्मणत असत, असें ह्मण०

**कलबुर्गाशहर**— हें शहर कर्नाटकाचे हद्दींत आहे. कल्याण ह्मणून जें नामांकित शहर आहे त्याच्या दक्षिणेस हें असून याचे उत्तर अक्षांश सुमारें १७° व पूर्व रेखांश ७७° आहेत.

**कलशराजा**— काश्मीरचा राजा. कल्याण येथील परमर्दीदेव राजानें पंडित मागितला असतां त्याकडे यानें बिल्हण कवीस पाठविलें. (बुल्ह० का० शोध०)

**कला**— वैद्यनाथ कविकृत संस्कृत व्याकरण विषयावरील ग्रंथ.

**कलापव्याकरण**— कातंत्र व्याकरण तेंच.

**कलाविलास**— क्षेमेंद्रकृत ग्रंथ.

**कलिकालवर्णन**— कृष्णाराम कविकृत गुजराथी भाषेंतील ग्रंथ. यांत कलियुग संबंधीं वर्णन आहे.

**कलिंगदेश**— हिंदुस्थानांतील पूर्वेकडचा देश. हा ओरिसा व तेलंगण यांच्यामध्यें आहे. विजयपत्तन वगैरे शहरें यांतील होत. (प्राची० हिं० न०).

**कल्पतरु**— वाचस्पतिमिश्रकृत संस्कृत ग्रंथ. यावर त्याची स्त्री भामती तिची व्याख्या आहे. (वृद्धमा०).

**कल्पद्रुम**— वल्लभ मताचा एक ग्रंथ.

**कल्याण**— हा हरिद्वार येथील राहणारा ब्राह्मण असून मोठा भगवद्भक्त होता. यानें बायकोस एक मुलगा व मुलगी झाल्यावर तीर्थयात्रेस गमन केलें. भक्तविजयाच्या ३२ व्या अध्यायांत याची कथा अशी लिहिली आहे कीं;- हा हरिद्वाराहून निघून यात्रा करीत करीत दक्षिणेस रामेश्वर क्षेत्रांत आला असतां, तेथें निराधार नामक ब्रह्मचाऱ्याची व याची गांठ पडून सोबत जमली; कारण तोही तीर्थयात्रा करीतच फिरणारा होता. कल्याणाची दक्षिणेकडील सर्व यात्रा समाप्त झाली असतां, जेव्हां तो पुनः उत्तरेकडे परतला, तेव्हां निराधारही त्या बरोबर निघाला. नंतर फिरत फिरत दोघेही मथुरेस आले. तेथें असें झालें कीं, कल्याणास हींव ताप लागला. व तो सारखा ६ महिने होता. त्या वेळेस निराधारानें भिक्षा मागून आणून त्यास पथ्य वेळच्या वेळेस घालावें. त्याचीं वस्त्रें धुवावीं. या प्रमाणें तो खटपट करीत असतां कांहीं दिवसांनीं कल्याणास आराम पडून त्याची प्रकृति बरी झाली. पुढें तेथून उभयतां निघणार तों, कल्याण निराधारास ह्मणाला तूं मजबरोबर हरिद्वारास चल; कारण माझ्या मनांत

असें आलें आहे कीं, माझी मुलगी तुला लग्न करून द्यावी. निराधार ह्मणाला तूं ह्मणतोस तें मला मान्य आहे, परंतु ही गोष्ट तुझी बायको कबूल करीलच ह्मणून कशा वरून? कल्याण ह्मणाला तें कांहीं असो, मी माझी मुलगी तुला देणार असें ह्मणून कल्याणानें त्यास देवळांत नेलें, व मथुरानाथास साक्ष ठेऊन त्याच्या हातावर त्यानें तुला कन्या दिली अशा संकल्पाचें उदक सोडिलें, त्या वरून निराधार ब्रह्मचारी कल्याणा बरोबर हरिद्वारास गेला.

कल्याणानें हरिद्वारास येतांच बायकोस सांगितलें कीं, आपली मुलगी मी या ब्राह्मणांस देण्याचा संकल्प केला आहे; यास्तव मुलीचें लग्न मी याशीं लावणार. ही गोष्ट बायकोस मान्य होईना, त्या वरून कल्याणानेंआपण संकल्प केल्याचा व त्यास मथुरानाथ साक्ष असल्याचा एकंदर सर्व वृत्तांत राजास निवेदन केला. राजा ह्मणाला आपण ह्मणतां तें सर्व खरें; परंतु साक्ष पटल्या शिवाय मी तरी कसें करावें? त्या वरून कल्याणानें मथुरानाथास आणण्या साठीं निराधारास मथुरेस पाठविलें. मथुरानाथही कल्याणाच्या भक्तीस्तव निराधारा बरोबर मथुरेहून निघाले व हरिद्वारास आले. ही गोष्ट राजास कळतांच त्यानें मथुरानाथाची हीच मूर्ति खास होय अशी चौकशी करून कल्याणाची मुलगी लग्न करून तत्काळ निराधारास देवविली. (भक्त० अ० ३२)

**कल्याण कवि**— अलकरत्नाचा शिष्य. मंखाच्या ग्रंथाची परीक्षा करण्यास बसेलेल्या तीस पंडितांतील एक. (बुल्ह० का० शो०).

**कल्याणकीर्ति**— जैनमताचा एक पंडित. संक्षेपजिनविजय नामक ग्रंथाचा कर्त्ता. यास होऊन गेल्यास सुमारें तीनशें वर्षें झालीं. असें जैन लोक ह्मणतात.

**कल्याणगोसावी**— समर्थ रामदास स्वामींचे शिष्य. गोदावरीच्या तीरीं असणाऱ्या बाभूळ गांवचा राहणारा कोणी एक कौशिक गोत्री देशस्थ आश्वलायन ब्राह्मण कृष्णाजीपंत नामक कुळकर्णी होता, त्याचा हा वडील मुलगा. याचें मूळचें नांव अंबादास होतें, व यास एक दत्तात्रेय नांवाचा धाकटा भाऊ होता. अंबादास व दत्तात्रेय हे दोन मुलगे झाल्यावर कृष्णाजीपंतास काशीस जावेंसें वाटून तो निघून गेला असतां, यास याचा भाऊ व आई सहित याचा मामा पाराजी पंत कोलापूर येथें सरकारी कामावर होता त्यानें आपणा जवळ ठेविलें.

पाराजीपंत मोठा सभ्य मनुष्य होता. त्यानें या उभयतां भाच्यांस चांगले रीतीनें वाढविलें. एकदां असें झालें कीं, समर्थ फिरत फिरत कोल्हापुरासआले असतां, पाराजीपंताच्या मनांत त्यांचा अनुग्रह घेण्याचें आलें. ह्मणून त्यानें समर्थांस विनंति केली कीं, मला अनुग्रह देऊन पावन करावें. समर्थ बरें आहे असें ह्मणाल्या वरून सर्व सिद्धता करून त्यानें त्यांस आपल्या घरींआणिलें, व अनुग्रह घेतला.

पुढें भोजनाची तयारी झाली. व सर्व मंडळी सहित समर्थ भोजनास बसले, त्या वेळेस पाट रांगोळ्या वगैरे बेत बात पाहून समर्थांनीं पाराजीपंतास पुसलें, हा सर्व बेतबात ठेवणारा तुमच्या घरीं कोणता मनुष्य आहे. पाराजीपंतानें विनंति केली हा अंबादास माझा भाचा आहे, त्याची ही सर्व व्यवस्था होय. मला घरांत पाहण्यास बनत नसल्या मुळें सर्व व्यवस्था नेहेमीं हाच ठेवितो. त्या वरून अंबादासाकडे समर्थांनीं पाहिलें, व भोजन झाल्यावर पाराजीपंतास ह्मटलें कीं, हा तुमचा भाचा तुह्मीं आमच्या सेवे करतां द्यावा. पाराजीपंत ह्मणाले आपल्या सेवेस मी स्वतः हजर आहें. पाहिजे तर मीच समागमें येतों; परंतु या भाच्यावर माझी सत्ता नाहीं; कारण यास आई आहे. समर्थ ह्मणाले तिला पुसून द्या. त्या वरून पाराजी पंतानें बहिणीस पुसलें तों, तिचा रुकार पडला, असें पाहून त्यानें तत्काल अंबादासास समर्थांच्या स्वाधीन केलें.

पुढें समर्थ अंबादासास बरोबर घेऊन निघाले ते सातार प्रांतांत मसूर ह्मणून गांव आहे तेथें आले. व चैत्रमास आरंभला ह्मणून साला बाद प्रमाणें त्यांनीं तेथें रामनवमीच्या उत्साहास आरंभ केला. त्या सालीं समर्थांच्या मनांत असें आलें कीं, छबिन्याच्या वाटेवर जें झाड देवाची पालखी जाण्यास प्रतिबंधक आहे त्याची फांटी तोडलीं असतां प्रतिबंध दूर होईल, ह्मणून त्यांनीं तीं तोडण्यास अधिकाऱ्याची परवानगी घेतली, आणि अंबादासास कुऱ्हाड घेऊन जाऊन झाडावर चढून ती फांटी तोडण्याची आज्ञा केली. अंबादास तत्काळ उठला व कुऱ्हाड घेऊन समर्थांच्या आज्ञे प्रमाणें फांटी तोडूं लागला. तों तोडतां तोडतां फांटी तुटण्याच्या बेतास आली असें पाहून घाई घाईनें दुसऱ्या फांटीवर जात असतां पाय घसरून तीवरून जो निसटला तो खालीं विहीर होती तींत पडला. ही गोष्ट झाली त्या वेळेस समर्थ तेथें नव्हते स्नान सं-

ध्येस गेले होते. इतर मंडळी मात्र होती; परंतु विहिरींत उडी टाकून अंबादासास वर काढण्यास कोणाचेंही धैर्य होईना. शेवटीं ही पुकार समर्थांच्या कानावर जाऊन स्नानसंध्या आटोपतांच ते विहिरी पाशीं आले, व अंबादास, अंबादास अशा दोन तीन हांका मारिल्या, आणि कल्याण आहेस कीं, म्हणून त्यास वरून पुसलें तेव्हां समर्थांच्या कृपेनें कल्याण आहें असें त्याचें उत्तर आंतून आलें. त्या वरून हा जिवंत आहे असें जाणून त्यास युक्तीनेंच त्यांनीं बाहेर काढविलें. आणि तेव्हां पासून त्याला कल्याण अशा नांवानें हांक मारण्याचा पाठ ठेविला.

मसुराहून निघून समर्थ फिरत असतां त्यांच्या मनांत आलें कीं, संप्रदायिकां करितां कांहीं ग्रंथ करावा ह्मणून त्यांनीं यास किता देऊन सांगितलें कीं, या प्रमाणें तूं आपलें बाळबोध अक्षर तयार कर. त्या प्रमाणें यानें अक्षर केलें असतां त्यांनीं ओंवी सांगावी व यानें ल्याहावी. अशा पद्धतीनें दासबोध आदि करून सर्व ग्रंथ यानें लिहिले. सारांश हा समर्थांचा लेखक होता. या विषयीं यानें दासबोध ग्रंथावर जी आरती लिहिली आहे तींत या गोष्टीचा उल्लेख स्पष्ट केला आहे, ती आरती खालीं लिहिलेली वाचकांनीं पाहावी.

> जयजया दासबोधा ॥ ग्रंथराजा प्रसिद्धा ॥ आरती ओंवाळीन ॥ विमळ ज्ञान बाळबोधा ॥ जय जया दास बोधा ॥ ध्रु० ॥ वेदांत संमतीचा ॥ काव्यसिंधु भरला ॥ श्रुतिशास्त्र ग्रंथ गीता ॥ साक्षी संगसु केला ॥ महानुभाव संतजनीं ॥ अनुभव चाखीला ॥ अज्ञान जडजीवा ॥ मार्ग सुगम केला ॥ जयजया दासबोधा ॥ १ ॥ नवविधाभक्ति पंथें ॥ रामरूप अनुभवी ॥ चातुर्य निधिमोठा ॥ मायाचक्र उगवी हरिहर हृदयींचें ॥ गुह्य प्रगट दावी बध्दूची सिद्ध झाले ॥ असंख्यात मानवीं ॥ जयजया दास बोधा ॥ २ ॥ वीसही दशकींचा ॥ अनुभव जो पाहे ॥ नित्य नेमें विवरीतां ॥ स्वयें ब्रह्मची होय ॥ अपार पुण्य गांठी ॥ तरी श्रवण लाहे ॥ कल्याण लेखकाचें ॥ भावगर्भ हृदय ॥ जय जया दास बोधा ॥ ३ ॥

याच प्रमाणें समर्थांवर यानें केलेली एक आरती आहे ती अशीः—

> जय जय जय जय ॥ आरती सद्गुरु स्वामि समर्था ॥ काया वाचा जिवें प्राणें ॥ ओंवाळीन आतां ॥ ध्रु० ॥ ब्रह्मा विष्णु हरादीक मान-

सीं ध्याती॥ सुरवर किन्नर नारद तुंबर कीर्तनीं गाती॥ आगम नि-
गम शेष स्तवितां मंदली मती॥ तो तूं आह्मां पूर्ण कामा मानवांप्रा-
सि॥ जय०॥१॥ ऋषिवर कविवर मुनिवर ज्ञानी॥तुझेची स्थापीले॥
षड्दर्शनीं मत्र गुमानीं पंथ चालिले॥ अपरं परा परात्परा पार ना-
कळे॥ पतीत प्राणी पदा लागुनी कल्याण झाले॥ जय जय०॥२॥

कल्याण हा परम गुरुभक्त होता. मोरोपंतानें याचें एका आर्येंत असें वर्णन केलें आहे कीं, हा भरताचाच अवतार होय. समर्थांच्या शिष्यमंडळींत जे प-हिले शिष्य उद्धव गोसावी त्यांच्या बरोबरीचा हाच एक होता. याचीं पदेंही पु-ष्कळ आहेत. डोमगांव येथें याच्या हातचा लिहिलेला दासबोध अजून आहे. याची गुरुसेवा मोठी वर्णनीय होती. याच्या शरीर संपत्तीचें अनुमान ज्यास करणें असेल, त्यानें सज्जन गडावर जे दोन माठ याचे पाणी आणायाचे आहे-त ते प्रत्यक्ष जाऊन पहावे म्हणजे तेव्हांच ध्यानांत येईल. ते दोन माठ एका खेपेनेंच ऊरमोडी नदीचे हा समर्थां करितां पिण्यास पाणी पाहिजे ह्मणून भ-रून आणीत असे.

डोमगांव ह्मणून सीना नदीच्या कांठीं एक खेडें आहे तेथें याचा मठ अ-सून गादीवर महंत आहे. याचा भाऊ दत्तात्रेय ह्मणून जो वर सांगितला तो-ही पुढें समर्थांचा शिष्य झाला. त्याचा मठ साताऱ्या जवळ शिरगांवास आ-हे. कल्याण गोसावी समर्थांच्या मागून ३२ वर्षांनीं ह्मणजे शके १६३६ मध्यें आषाढ शुद्ध १४ स डोमगांव येथें समाधिस्थ झाले. यांचें वय मरण काळीं ९६ वर्षांचें होतें. आणि त्यावरून यांचें जन्म शके १५४० मध्यें झालें होतें, असें उघ-ड होतें. हा समर्थां प्रमाणेंच ब्रह्मचारी होता. ह्मणून याचे महंत ब्रह्मचारी-च असतात. (रामदा०च० वगैरे.)

**कल्याणदास**– हा जातीचा कोण होता तें कळत नाहीं. परंतु शके १७४८ मध्यें हा होता व डांकुरास राहात असे. प्रसंग वर्णन म्हणून याचा एक ग्रंथ गुज-राथी भाषेंत असून कांहीं पदेंही आहेत. (काव्य०गु०).

**कल्याणदुर्ग**– हैसूर प्रांतांतील एक गांव.

**कल्याणनिर्णय**– निष्कुळानंद कवीनें केलला गुजराथी भाषेंत ग्रंथ.

**कल्याणभट्ट**– जयरथ नामक कवीचा गुरु. ८ बुल्ह०शो०).

**कल्याणमल्ल**– अनंगरंग नामक ग्रंथाचा कर्त्ता. हा कलिंग देशांतील राहणारा

असे. कविचरित्रांत हा ब्राह्मण होता असें लिहिलें आहे; परंतु मल्ल अशाक्षरां वरून तो क्षत्रिय होता असें कोणी ह्मणतात. कलिंग देशाचा राजा अनंग भीम त्याच्या पदरीं हा विद्वान् मनुष्य होता. अर्थात् शालिवाहनाच्या अकराव्या शतकाच्या समासीस हा होता असें स्पष्ट दिसून येतें. (कविच॰)

**कल्याणराय**— वल्लभमतानुसारी पुष्टीप्रवाह मार्ग नामक ग्रंथाचा हा कर्त्ता. (क॰च॰)

**कल्याणशहर**— हें शहर बेदराच्या पश्चिमेस असून याचे उत्तर अक्षांश सुमारें १८° व पूर्वरेखांश ७७° आहेत.

**कल्हणपंडित**— राजतरंगिणी नामक ग्रंथाच्या प्रथम भागाचा कर्त्ता. अर्धनारीश्वरस्तोत्र यानेंच केलेलें आहे. हा शालिवाहन शकाच्या सुमारें अकराव्या शतकांत होता. (बु॰ शोध॰).

**कविकंकण**— हा कवि जातीचा बंगाली शके १४९२च्या सुमारास असल्याविषयीं शोध लागतो. चैतन्यचरणामृत हा ग्रंथ यानें केलेला आहे. (बुल्ह॰शो॰)

**कविकल्पद्रुम**— क्रियापदाच्या मूळधातूं विषयीं बोपदेवकृत संस्कृत ग्रंथ. यांत एकंदर धातु दोन हजारां पासून साडेतेवीसशें पर्यंत आहेत. यावर दुर्गादास कृत धातुदीपिका नांवाची टीका आहे, तशीच रामन्यायालंकार याची कविकामकल्पद्रुम नांवाची ही एक व्याख्या आहे. (बोपदव) शा॰प॰.

**कविकामधेनु**— बोपदेवकृत संस्कृत ग्रंथ. यांत समानातु पूर्विक धातु कसे पालटतात त्यां विषयीं निरनिराळ्या खुणा देऊन निराळे काढिले आहेत, व त्यां विषयीं साधारण नियमही बांधिले आहेत. (बोपदेव) शा॰प॰.

**कविकामकल्पद्रुमव्याख्या**— रामन्यायालंकारकृत संस्कृत ग्रंथ.

**कविगजांकुशाचंडांश**— भैरव कविकृत छंदःशास्त्र विषयक तेलंग भाषेंतील ग्रंथ.

**कविचूडामणिचक्रवर्त्ति**— अन्वय बोधिनीचा कर्त्ता. (बुल्ह॰ शो॰).

**कविरथ**— कलियुगांतील युधिष्ठिर वंशीय राजा. चित्ररथाचा पुत्र, व दृष्टिमान् राजाचा बाप. यानें ७९ वर्षें, ८ महिने, २९ दिवस राज्य केलें. याच्या कारकीर्दीची समाप्ति कलियुगाच्या ७४०व्या वर्षीं होऊन तींनच चार्वाक व क्षपणक हे दोघेही आपलें नास्तिक मत वाढवून मरण पावले होते, असें जैनांच्या ग्रंथावरून कळतें.

**कविराज**— राघव पांडवीय नामक संस्कृत काव्याचा कर्त्ता. कविराज धीवधर असें ही यास ह्मणत. (बुल्हर॰ काश्मी॰ शोध॰).

**कविराट्**– ब्राह्मण पंडित. तिक्कनसोम याजीचा गुरु.

**कव्यहोत्र**– पहिल्या शंकराचार्यांच्या वेळचा, अग्न्युपासक मताचा वादी. या बरोबर आचार्यांचा वाद होऊन त्यास त्यांनीं जिंकलें होतें. (आनं० शं० प्र० १२)

**कशिनीकोटा**– तैलंगणांतील एक प्रांत.

**कंसवधनाटक**– दामोदर कविकृत संस्कृत भाषेंत रचलेलें नाटक. (बुल्ह० शो०)

**कस्तूरीतिलकपंचाशती**– वेदांताचार्यकृत संस्कृत ग्रंथ.

## का.

**कांकरव**– प्रसिद्ध वल्लभाचार्यांच्या वडिलांचा तैलंगणांतील मूळ गांव.

**कांकरेजीदेवी**– ही देवी गुजराथेंत आहे. हिचें वर्णन गुजराथींत दलपत कवीनें केलें आहे.

**काकवर्ण**– शिशुनाग राजाचा पुत्र. व क्षेमधर्मा राजाचा बाप. (राजमा०)

**कांचनकवि**– धनंजय विजय नामक ग्रंथाचा कर्ता. (बुल्ह० शो०).

**कांचनपुर**– गौडबंगाल्यांतील गोपीचंद्र राजाचें शहर. हें प्राचीन व अर्वाचीन कोणत्याच नकाशांत सांपडत नाहीं.

**कांचीनगर**– शिवकांची आणि विष्णुकांची नांवाचीं दोन नगरें आहेत, त्यांचें साधारणनांव. यांस कांची मंडल अथवा तांडमंडल नांव असल्याचें आढळतें. हें नगर अर्काटाच्या पूर्वेस व तिरुपतीच्या ह्मणजे व्यंकटेशाच्या आग्नेयीस आहे. याचे उत्तर अक्षांश सुमारें १३° व पूर्वरेखांश ८०° आहेत. या दोन नगऱ्यामध्यें वेदवती नदी आहे.

**काठमांडू**– नेपाळ देशाची राजधानी. याचे उत्तर अक्षांश सुमारें २८° व पूर्व रेखांश ८५° आहेत.

**काठेवाड**– याचें जुनें नांव सौराष्ट्र देश. सोरटी सोमनाथ यांतच आहे.

**कांडम्र**– हा एक ग्रंथ तामिळ भाषेंत आहे. व त्यांत अव्हेयर इत्यादिकांची हकीकत आहे.

**काणभूति**– कात्यायन अथवा वररुचि या पासून बृहत्कथा नांवाचा इतिहासविषयक ग्रंथ ऐकणारा पुरुष.

**काण्वराजे**– शौंग अथवा संग राजांतील शेवटला राजा देवभूति, त्यास त्याच्या वसुदेव नामक प्रधानानें मारून आपण राज्यपद बळकाविलें, तोच काण्वराजांतील मूळ पुरुष. याचा पुत्र भूमिमित्र तो दुसरा राजा. तिसरा भूमिमि-

याचा पुत्र नारायण, आणि नारायणाचा पुत्र जो सुशर्मा तो चौथा राजा. त्या चार राजांनीं मिळून एकंदर ३४५ वर्षें राज्य केलें. (राजमा०).

**कातंत्रकौमुदी**– गोवर्द्धन कविकृत कातंत्र व्याकरणावर व्याख्या.

**कातंत्रव्याकरण**– पाणिनीच्या व्याकरणाहून सोपें असें सर्व वर्मा कवीनें शातवाहन राजा करितां रचलेलें व्याकरण. (बूल्ह० शोध.)

**कांतारक**– सत्याद्रि पर्वता जवळील पश्चिम समुद्र कांठचा हैंवनामक प्रदेश. प्रसिद्ध जें गोकर्ण क्षेत्र तें याच प्रदेशांतील होय.

**कांतिमती**– प्रसिद्ध जो रामानुजाचार्य त्याची आई.

**कात्यायन**– उपवर्ष नामक पंडिताच्या तीन शिष्यांतील एक. याच्या बापाचें नांव सोमदत्त, व आईचें नांव वसुदत्ता होतें. सोमदत्त हा कौशांबी नगरचा राहणारा होता. पाणिनीनें केलेल्या व्याकरणावर जीं वार्तिकें आहेत तीं याचीच होत. बृहत्कथा ह्मणून जो ग्रंथ सात लक्ष श्लोकांचा आहे, त्याचा कर्त्ता हाच होय. कविचरित्रांत असें लिहिलें आहे कीं,– हा विक्रमादित्याच्या सभेंत वररुचि अशा नांवानें प्रसिद्ध होता; परंतु तो वररुचि निराळा समजावा. कारण, याचें नांव जरी वररुचि होतें तरी हा पाणिनीचा गुरुबंधु प्रसिद्ध आहे ह्मणून पाणिनी जसा चंद्रगुप्ताच्या वेळचा तसाच हा जाणावा. दुसरें हा नंदराजाचा सचिव होता असें ही प्रमाण आढळतें; या कारणास्तव पाणिनीच्या सूत्रां वरील वार्तिककार विक्रम सभेंतील वररुचि नव्हे, असें निश्चयात्मक समजावें. बृहत्कथेच्या आरंभीं हा पुष्पदंत गंधर्वाचा अवतार होय, असें लिहिलें असून यास आज मितीस होऊन गेल्यास ३३०० वर्षें जवळ जवळ झालीं आहेत. (सरलाप्र०).

**कादंबरी**– ही एका गंधर्वाची कन्या होती. व हिनें तारापीड नांवाच्या उज्जयिनीच्या राजपुत्रास वरिलें होतें, हिचीच कथा जींत वर्णिली आहे त्यास कादंबरी असें नांव आहे.

**कादंबरीकथासार**– रत्नाकर कविकृत संस्कृत ग्रंथ.

**कादंबरीग्रंथ**– तारापीडास वरणारी जी कादंबरीनामक गंधर्व कन्या तीच मुख्य नायिका असल्या मुळें तिचें वर्णन ज्यांत आहे तो ग्रंथ. याचें पूर्वार्द्ध बाणभट्टानें रचिलें असून उत्तरार्द्ध त्याच्या भूषण भट्ट नामक पुत्रानें रचिलें आहे. (निबं० मा०).

**कादंबरीशहर**— राजमहेंद्री प्रांतांतील गोदावरीच्या कांठचें शहर. हें मुकुंदीई-श्वररूद राजाकडून ब्राह्मणांस अग्रहार आहे.

**कानडीभाषा**— द्रविडभाषे पासून निघालेल्या ज्या तामिळ वगैरे पांच भाषा, त्यांतील एक. (द्रविडभाषा श०प०).

**कानपुर**— ब्रह्मावर्ता जवळचें शहर. हें भागीरथीच्या कांठीं आहे.

**कानीफनाथ**— जालंदरनाथाचा शिष्य. हा मद्रदेशाच्या सुरथ राजाचा पुत्र. हा जातीचा क्षत्रिय होता. व याच्या आईचें नांव भामिनी होतें. नाथलीलामृताच्या १९साव्या अध्यायांत असें लिहिलें आहे कीं, हा पुत्र सुरथराजास जालंदर नाथाच्या प्रसादानें झाला, व राज्य न करितां जालंदराचा शिष्य होऊनत्यांबरोबर वैराग्य वृत्तीनें हिंडूं लागला. गोपीचंद्रानें जालंदरास लिदींत पुरलें असतां, यानें तेथें जाऊन त्यांस बाहेर काढिलें, व गोपीचंद्रास अमर केलें.(गोपीचंद्र शब्द पहा.) यास होऊन गेल्यास दोन हजारांवर वर्षें झालीं आहेत.

**कान्हूपात्रा**— मंगळवेढें येथें श्यामा नांवाची एक कळवंतीण राहात होती, तिची ही कन्या. ही रूपानें अप्रतिम सुंदर होती, व गाणारीही उत्कृष्ट असे. ही वयांत आल्यावर हिच्या आईनें हिला बेदरास नेऊन हिचा गुण बादशाहास दाखवावा व द्रव्य मिळवावें असा बेत केला, परंतु तो बेत हिनें नाकारून पंढरपुरास जाऊन देवापुढें भजन करणें आरंभिलें. त्यावरून लोकांस आश्चर्य झालें, परंतु हिच्या रूपाची तारीफ बादशाहाच्या कानावर जाऊन तो ही विषयीं लुब्ध झाल्या मुळें त्यानें हिला आणाया करितां पंढरीस कामगार पाठविला. त्यानें येऊन हिला बादशाहाकडील निरोप कळविल्यावर हिनें मी देवदर्शन करून येतें व मग आपणा बरोबर निघतें, असें सांगितलें. त्यावरून कामगार बरें ह्मणाला असतां ही देवळांत गेली. व करुणा भाकून देवाची स्तुति करीत असतां असतांच हिचें प्राणोत्क्रमण झालें त्यावरून आलेला कामगार परत गेला. ही दामाजीपंताच्या वेळेस असल्याची लोकांत बोलवा आहे. भक्तविजयांत हिचें चरित्र ३९व्या अध्यायांत सविस्तर आहे, मात्र त्यांत काळ लिहिला नाहीं.

**कान्यकुब्ज**— हा देश असून यास हल्लीं कनोज प्रांत ह्मणतात.

**कान्होपाठक**— हा भगवद्भक्त व मोठा विरक्त पुरुष केंदूर पाबळचा जोशी होता. पाठक उपनांवा वरून हा वाजसनी ब्राह्मण असल्याचें स्पष्ट दिसून

येतें. नामा पाठकी ह्मणून जो एकशें वीस अध्यायांचा ओंवीबद्ध ग्रंथ आहे, तो यानेंच केलेला आहे. शालिवाहन १२०० च्या सुमारास हा विद्यमान होता. कारण यास निवृत्तिनाथांचा अनुग्रह असून तो त्यांचा शिष्य असे. कविचरित्रांत याचा शक सोळाशें लिहिलेला चुकीचा आहे, असें माहितगार लोक त्यांच्या वंशजांच्या सांगण्या वरून ह्मणतात.

**कान्होजी आंग्रे**— लढाऊ गलबतां वरील एक मराठा सरदार. हा शके १६५० या सुमारास होता. (हिंदु० इति०).

**कान्होबा**— प्रसिद्ध तुकाराम बावांचा हा धाकटा भाऊ होय. तुकयाबंधु अशा नांवानें जी अभंग वगैरे कविता आढळते ती सर्व याचीच आहे.

**कापालिक**— भैरवाचा जो उपासक तो.

**कांपिल्यनगर**— हें शहर दरद देशांत कांबोजाच्या ईशान्येस आहे. (प्रा॰न॰) पहा. भारता मध्यें हें शहर पांचालाची राजधानी होय असें लिहिलें आहे. याचे उत्तर अक्षांश सुमारें ३६ व पूर्वरेखांश ७४ आहेत.

**काबूलदेश**— सुलेमान कोहाच्या पश्चिमेकडील देश. याचें मुख्य शहर कंधार.

**कांबोजदेश**— याचें मुख्य शहर कांबोज.

**कांबोजशहर**— याचे उत्तर अक्षांश सुमारें ३६ व पूर्वरेखांश ७१ आहेत.

**कामकर्मा**— चतुर्दश लोकोपासक एक पुरुष. (आनं॰गि॰ शं॰ वि॰ प्र॰ ३८) पहा.

**कामंदक**— काश्मीराकडील एक कवि. नीतिसार ग्रंथाचा कर्ता. (बुल्ह॰ का॰ शोध॰)

**कामंदकीय नीतिसार**— कामंदक कृत धर्मशास्त्र विषया वरील ग्रंथ.

**कामदास**— प्रबोधचंद्रोदयाचा टीकाकार. (बुल्ह॰ का॰ शोध॰)

**कामरूपदेश**— यास हाल्लीं आसाम ह्मणतात.

**कामाक्षि**— बंगाल्याच्या ईशान्ये कडील देवीचें स्थान. आसामांत हिचीं देवळें पुष्कळ आहेत. २— पहिल्या शंकराचार्यांच्या आईची आई व सर्वज्ञ ब्राह्मणाची स्त्री. (शंकराचार्य पहिले) शब्द पहा.

**कायतत्रिपुरदास**— भक्त (ना॰ भ॰ ग्रं॰) पहा.

**कारकपरीक्षा**— व्याकरण विषया वरील पशुपति कविकृत संस्कृत ग्रंथ.

**कारलें**— हा गांव मुंबई व पुणें यांच्या मध्यभागीं आहे. येथें कोरींव लेणें फारच चांगलें आहे. पाली अथवा मागधी भाषेंत लिहिलेले शिलालेख येथें बरेच आहेत, व ते शालिवाहन शका पूर्वी साहाशें वर्षां मागले असल्या विष-

चीं त्या लेखां वरून सिद्ध होतें.

**कारिकल**– हिंदुस्थानाच्या पूर्वकिनाऱ्या वरील शहर.

**कार्यप्रकाशिका**– सौगत सूत्रां वरील टीका.

**कालकंठिष्य**– महाकुल महानिष्य राजाचा पुत्र. कौरांग राजा अथवा त्याचीबायको जी महादुराचारी अनुला तिचा हा पुतण्या. यानें अनुला जी याची चुलती तिनें तिच्या पतीस व पुत्रास वगैरे विष घालून मारिल्या मुळें अतिशय संतापून, इसवी सना पूर्वी एकेचाळिसाव्या वर्षीं हिला ठार मारिलें, व आपण गादीवर बसला. (ग्या· इं· को·)

**कालंजर पर्वत**– हा पर्वत एक मारवाडांत व दुसरा निषाद देशांत या प्रमाणें आढळतो. (प्रा· हिं· नका·)

**कालनिर्णय सिद्धांत**– धर्मशास्त्र विषया वरील रघुरामकृत संस्कृत ग्रंथ.

**कालमाधव**– माधवाचार्य कृत धर्मशास्त्र संबंधीं संस्कृत ग्रंथ. याचीं प्रकरणें चार आहेत.

**कालहस्ती**– हें एक शहर आहे. येथें कालहस्ती नामक महादेवाचें स्थान आहे, व त्या महादेवास वायुलिंग अशी संज्ञा आहे. लिंगा जवळ दिवा टिकत नसल्या मुळें वायुलिंग नांव आहे, असें लोक बोलतात. मद्रासेच्या वायव्यकोंपऱ्यास हें शहर सुमारें पंचवीस कोसांवर आहे.

**काल्हास्त्री**– कालहस्ती नगरासच हल्लीं म्हणतात.

**कालिकोट**– पश्चिम समुद्र किनाऱ्या कडील शहर व बंदर.

**कालिदास***– हा संस्कृत भाषेचा विख्यात कवि. विक्रमादित्याच्या सभेंत जीं नऊ पंडित रत्नें होतीं त्यांतील सातवें रत्न होता. या विषयीं एका कवीनें म्हटलें आहे तें असें:-

धन्वंतरिः क्षपणकामरसिंह शंकुः वेतालभट्ट घटखर्पर कालिदासः

ख्यातो वराह मिहिरो नृपतेः सभायां रत्नानि वै वररुचि र्नव विक्रमस्य १

हा पंडित विक्रमाच्या वेळचा असल्यामुळें यास होऊन गेल्यास आज १९०० वर्षांवर काळ झाला आहे, या विषयीं अगदीं संशय करणें नको. अस्तु. याची कवि वर्गांत योग्यता केवढी मोठी होती ती विषयीं कोणी कवीनें असें वर्णन केलें आहे:-

पुरा कवीनां गणना प्रसंगे कनिष्ठिकाधिष्ठित कालिदासः ॥ अद्या-

---

* कालिदास कवी विषयीं निबंधमालाकार रा· रा· विष्णुकृष्ण चिपळूणकर यांनीं जो एक निबंध लिहिला आहे, तो वाचकांनीं पाहण्या जोगा आहे, व त्यांत याचें त्यांनीं सविस्तर वर्णन लिहिलें आहे म्हणून कविनेसह ज्यांस तें पाहणें असेल त्यांनीं तो निबंध पहावा.

पि तत्तुल्य कवेरभावा दनामिका सार्थवती बभूव॥१॥
अर्थ- कोणी कवि, आज पर्यंत नामांकित कवि किती झाले ह्मणून बोटांनीं मोजूं लागला, व कालिदासाच्या स्थानीं प्रथम त्यानें करंगळी मोजिली. नंतर पुढें पाहूं लागला तों त्या सारखाच दुसरा कवि त्यास कोणी आढळेना, त्यामुळें करंगळी जवळचें बोट अनामिका या नांवानें जें पूर्वी पासून लोक बोलत आले, तें नांव तेणें करून सार्थ झालें असें तो ह्मणाला.

हा ज्ञातीचा पंचगौडां पैकीं एका जातीचा ब्राह्मण होता. यानें ऋतुसंहार, कुमार संभव नाटक, शाकुंतल नाटक, मेघदूतकाव्य, रघुवंशकाव्य, आणि विक्रमोर्वशी नाटक इतके ग्रंथ खरे लिहिले. मालविकाग्नि मित्र व नलोदय काव्य हे दोन ग्रंथ याचे कोणी आहेत ह्मणतात, कोणी यानें केलेले नव्हेत असें ह्मणतात, ह्मणून त्यां विषयीं वाद आहे. यां शिवाय सर्व वृत्तांचीं लक्षणें ज्यांत सांगितलीं आहेत तो श्रुतबोध, प्रश्नोत्तर माला, असज्जन वर्णन, महापंचाष्टक, गंगाष्टक, आणि राक्षसकाव्य इत्यादि ग्रंथांविषयींही असाच वाद आहे.

हा कवि भोजराजाच्या वेळचा नसून त्या पूर्वींच होऊन गेला असल्याविषयीं प्रमाण आहे तें असें;- बाणभट्ट नामक प्रसिद्ध कवीनें हर्षचरित लिहितांना त्यांत याच्या विषयीं असें लिहिलें आहे - श्लोक ॥ निर्गतासु नवाकस्य कालिदासस्य सूक्तिषु ॥ प्रीतिर्मधु रसार्द्रासु मंजरीष्विव जायते ॥ १ ॥ ह्मणजे कालिदासाच्या मुखांतून निघालेलीं वचनें, मधानें थबथबलेल्या मंजरी पाहून जसा आनंद होतो तसा कोणास होत नाहीं? अर्थात् होतोच. या बाणभट्टाच्या वाक्यावरून कालिदास हा बाणभट्टा पूर्वींचा असें उघड दिसून येतें. आतां बाणभट्ट कधीं होता त्या विषयीं (चिपळूणकर कृत बाणभट्टाचा निबंध) पहा. त्या निबंधावरून बाणभट्ट शालिवाहन शकाच्या ५७२व्या वर्षांतला आहे. अर्थात् कालिदास या शका पूर्वींचा असून भोजराजा शके ९०४मध्यें झालेला आहे. ह्मणून या शकानंतरचा ह्मणजे सुमारें सवातीनशें वर्षांनीं मागचा असल्यामुळें त्याच्या वेळचा हा कालिदास नव्हे असें स्पष्ट होतें.

उपमा अशी कालिदासानेंच द्यावी, या विषयीं एका कवीनें असें ह्मटलें आहे:- श्लोक;- उपमा कालिदासस्य भारवेरर्थगौरवं॥ दंडिनः पदलालित्यं माघे संति त्रयोगुणाः॥ १॥ अर्थ उघड आहे. सारांश हा कवि इतका लोकोत्तर मान्य झालेला आहे कीं;- यूरोपस्थ मोठ मोठाल्या विद्वानांस देखील याची कविता

व याचें बुद्धिचातुर्य पाहून आश्चर्य वाटतें.

वर जे ग्रंथ सांगितले त्यां शिवाय सेतुकाव्य, रामायणचंपु हे ग्रंथही याच्या नांवावर मोडणारे आहेत. परंतु ते सर्व वर प्रमाणेंच याचे असल्याचा संशयच आहे. अस्तु, कित्येकांच्या मतें हा शक्तिउपासक होता म्हणूनही आहे, पण ही गोष्ट अगदीं खरी नाहीं, मात्र हा स्मार्त असेल. असें सांगतात कीं, मरण्या काळीं यानें सन्यास घेतला होता, व ही गोष्ट खरीही दिसते. कारण, उज्जनी जवळ उत्तरेच्या अंगीं क्षिप्रा नदीच्या कांठीं दत्ताच्या आखाड्यांत हालीं गोसावी वगैरे लोकांची राहण्याची जागा आहे, तेथें याची समाधि आहे. (कन्न.व ग्मा.)

२– भोजराजा धारेस राज्य करीत असतां, त्याच्या आश्रयास कालिदास होता, असें पुष्कळांच्या मुखीं आहे. या वरून तो आंध्रकालिदासच असला पाहिजे, असें आह्मांस कविचरित्रकारांच्याच पुढील लेखा वरून दिसून येतें. कविचरित्रकारांनीं याची गणना संस्कृत कवींत न करितां, प्राकृत तैलंग कवींत केली असल्या मुळें जरी या विषयीं प्रथम कांहींसा संशय वाटतो, तरी हा संस्कृतांत उत्कृष्ट प्रवीण होता, व यानें देशपर्यटनही केलें होतें, असें ते लिहून भोज व ह्या दोघांचाही काळ ते शालिवाहन शके ९०४ लिहितात, ह्मणून संशयास जागा राहात नाहीं. दुसरें असें कीं, एकदां भोजराजानें, यास आपला चरम ग्रंथ वर्णन करण्यास सांगितलें असतां, यास राग येऊन, हा आपल्या विलासवती वेश्येस घेऊन धारा नगरीहून निघाला. तो मग कोणत्याही राजाच्या आश्रयास राहण्यास न जातां एकशिला नगरीस (वारंगूळ शहरास) आला. तो मग पुनः भोजराजायास, तेथें येऊन भेटला, तरी त्या बरोबर गेला नाहीं. (भोजप्रबंधाचा शेवट पहा) या वरून हा वारंगूळचा राहणारा होता ह्मणून, आंध्र (तैलंग ब्राम्हण) होता. तसेंच याचें वर्णनही कानांत कुंडलें इत्यादि प्रकारचें तैलंग लोकांच्या चालीस अनुसरून भोजप्रबंधांत असल्याचें दिसून येतें. जसें, कश्चि दध्यगात्। कनकमणि कुंडलशाली, इत्यादि. ह्मणून भोजराजा जवळ कालिदास हाच होता, असें निर्विवाद ह्मणणें येतें.

आणखी असें कीं, चांगले चांगले बहुश्रुत व वृद्ध यांच्या सांगण्यावरून हा आंध्रकालिदास शक्तिउपासक होता असेंही ऐकण्यांत येतें, त्या वरून आह्मांस खास दिसून येतें कीं, श्यामलादंडक वगैरे ग्रंथ यानेंच केलेले होत. तसाच हा अत्यंत स्त्रैणही होता, ह्मणून पुष्पबाण विलास, क-

पूर मंजरी, हास्यार्णव नाटक, श्रृंगारतिलक, व श्रृंगाररसाष्टक इत्यादि ग्रंथांचा कर्ता, याच्या वांचून दुसरा कोणी नसावा.

धारा नगरी येथें भोजराजाकडे जे जे कवि जात, त्यांस तो त्यांची कविता ऐकून घेऊन प्रति अक्षरास एक लक्ष द्रव्य देई. त्याच प्रमाणें हाही तेथें गेला. याच्या जाण्या पूर्वी अशी गोष्ट घडली होती कीं, शंकरनामक एका कवीस राजानें बारा लक्ष द्रव्य दिलें होतें, व त्यावरून इतर पंडितांस वाईट वाटलें होतें, ह्मणून ते शंकर कवीची निंदा व राजाचा असमंजसपणा बोलत असतां तें यास गेल्या बरोबर कळलें. तेव्हां यानें पंडितांस या प्रमाणें समजाविलें कीं, राजानें शंकर कवीस दिलें तें जाणूनच दिलें आहे. ह्मणजे त्यास स्वतः एक लक्षच देऊन, केवळ त्याचेच अंशभूत व त्याच्या समागमें असणारे जे एकादश रुद्र त्यां बद्दलचें अकरा लक्ष द्रव्य निराळें दिलें. असें याचें चमत्कारिक भाषण ऐकून पंडितांस याची विद्वत्ता व तोडजोडीचें चातुर्य कळून आलें. त्यांत आणखी विशेष असें झालें होतें कीं, हा प्रथम आला त्या वेळेस यानें सर्वांस नमस्कार करून राजा सभेंत नव्हता ह्मणून त्यांस राजा कोठें आहे हें पुसलें होतें. आणि ही तोड झाल्यावर आपल्या जवळची पानसुपारी काढून सर्वांस दिल्यानें तर सर्व अगदीं खुष होऊन गेले होते.

पुढें भोजराजा सभेंत आला. त्या वेळीं पंडितांनीं याच्या तोडीची स्तुति करीत याची प्रशंसा केली. यानेंही राजास आशीर्वाद देतांच भोजराजानें यास नमस्कार करून याचा हात धरिला. व यास आणून आसनावर बसविलें. नंतर याची विद्वत्ता भोजानें पाहिली, ती वरून त्यानें यास आपल्या पदरीं ठेविलें. या गोष्टीस बराच काळ लोटला. व याचें वर्चस्व फार झालें. तशांत हा वेश्यालंपट असल्या कारणानें पंडित याचा त्रास करूं लागले. राजाही त्रास करी. पण यास दूर करीना. ह्मणून सर्वांनीं राजाच्या दासीकडून राजाच्या मनांत असा संशय घातला कीं, कालिदासाचें व राणीचें सूत आहे. त्या वरून भोजराजानें यास निघून जाण्यास सांगितलें. तेव्हां हा वेश्येचे घरीं लपून राहिला. कांहीं दिवसांनीं राजानें पंडितांस एक समस्या पुसली. ती त्यांच्यानें उलगडेना. ह्मणून ते पळून जाऊं लागले. हें कालिदासास कळून त्यानें ती पूर्ण करून पंडितांस दिली. ती त्यांनीं राजास दाखविल्या वरून, कालिदास शहरांतच आहे असें जाणून त्यास राजानें पुनः माघारें आणिलें.

या गोष्टीस कांहीं दिवस लोटल्यावर, कालिदासानें असेंच पाहिलें कीं, राजा पूर्वी जसा आपला मान ठेवीत होता तसा आलीकडे ठेवीत नाहीं. त्या अर्थी आतां येथें राहूं नये हें बरें असें जाणून, हा अल्लालदेशीं जाऊन त्या राजाच्या आश्रयास राहिला. तरी तेथूनही पुनः भोजराजानें यास बहुमानाचें पत्र लिहून परत धारानगरीस आणविलें.

मग मात्र हा राजा जवळ बरेच दिवस होता. शेवटीं भोजानें यास चरमग्रंथ लिहिण्यास सांगितल्या वरून हा रागावून वारंगूळ येथें गेला. तो पुनः धारेस आला नाहीं, हें नर आह्मी वर लिहिलेंच आहे. हें याचें चरित्र कित्येक श्लोकांसहित आह्मी भोजराजाच्या नांवावर लिहिलें असल्या मुळें येथें संक्षेपांत दाखविलें आहे. (भोजप्र०)

३– हा तिसरा कालिदास जातीचा वडनगरी गुजराथी ब्राह्मण होता. काठेवाडांत वसावड ह्मणून गांव आहे; तेथें हा राहात असे. शालिवाहन शके १६९२ मध्यें हा विद्यमान होता. यानें गुजराथी भाषेंत ध्रुवाख्यान, प्रल्हादाख्यान व सीतास्वयंवर येणे प्रमाणें तीन ग्रंथ लिहिलेले प्रसिद्ध आहेत. याच्या मरण कालाचा शोध नाहीं. (काव्यदो॰गु०).

**कालियकुतूहलप्रहसन**– भरद्वाज कविकृत संस्कृत भाषेंतील ग्रंथ.

**कालियमर्दन**– भागवता पैकीं वामनानें श्लोकबद्ध मराठींत केलेलें कवित्व.

**कावेरीनदी**– ही नदी कुर्ग प्रांतांतून निघून व द्रविड देशांतून वाहात जाऊन, पूर्वसमुद्रास मिळाली आहे. हिला अर्धगंगा असेंही नांव आढळतें. कुंभकोण शहर हिच्या दक्षिण तीरास आहे.

**कावेली व्यंकटबोरय्या**– हा कवि आरवेली नियोगी ह्मणून तैलंग ब्राह्मण जातींत एक शाखा आहे, तिजमधील उत्तम कुळांत जन्मला होता. उत्तरसरकार गांवा जवळ एलोर नांवाचा किल्ला आहे, तेथें याचें जन्म शके १६९८ यां मध्यें झालें. याला वडील व धाकटे असे कित्येक भाऊ होते. याच्या बापाचें नांव कावेली व्यंकट सुबय्या होतें. व्यंकट सुबय्या मोठा संभावित गृहस्थ होता, व तो विजयनगरच्या राजाचा वंशपरंपरेनें मंत्री असे. व्यंकट बोरय्या दाहा वर्षांच्या वयाचा होई पर्यंत एलोर येथील गांवठी शाळेंत शिकत होता. पुढें ती शाळा सोडून तो काव्यें शिकूं लागला. यानें केलेली संस्कृत कविता उद्दाम व सुरस होती ह्मणून, ती पाहून विद्वान् लोकांस मोठें आश्चर्य झालें.

याचा वडील भाऊ एका मोठ्या अधिकारावर होता. तशी जागा आपणांस मिळण्याची योग्यता याची ह्मणून, हा एलोरा जवळ कोत्तुरु नामक खेडें आहे तेथील काजी जवळून फारसी व हिंदुस्थानी भाषा शिकला. नंतर तेथून निघून मछलीपटनास गेला, व तेथें यानें मार्गन साहेबानें स्थापिलेल्या इंग्रजी शाळेंत इंग्रजी भाषेचा अभ्यास केला. याचा इंग्रजी अभ्यास बराच झाला व याचें वय पंधरा वर्षांचें झालें, तेव्हां कर्नल पीयर्स ह्मणून एक इंग्रज सेनापति होता त्याचा याचा स्नेहभाव जडून, त्यानें यास आश्रय दिला, व पलटणींत पगार वांटण्याचें त्यानें यास काम सांगितलें.

काम आटोपल्यावर जो यास अवकाश सांपडे, तेवढ्यांत हा तेलंगी भाषेचीं काव्यें अवलोकन करी. अप्पालू रूपय्या ह्मणून जो एक तैलंग कवि प्रसिद्ध होऊन गेला त्याचीं बहुतेक काव्यें यानें पाहिलीं. याच सुमारास डेंट साहेबानें यास आपल्या जवळ इंग्रजी कारकुनीची जागा दिली. त्या जागेवर हा असतां, याच्या वडील भावानें याची शिफारस करून यास सर कारकुनीची जागा देवविली. हें काम यानें बरेच दिवस वहिवाटिलें. पुढें असें झालें कीं, मेकेन्झी नांवाचा एक इंग्लिश गृहस्थ एंजीनियर होता, त्याला जनरलची पदवि मिळून निजामाच्या राज्यांत काम पाहण्याचा सरकारचा हुकूम झाला, त्या वेळीं त्यास दुभाषी मनुष्याची गरज पडली. तेंव्हां याची शिफारस होऊन ती मोठी जागा यास मिळाली.

शके १७२० मध्यें टिपू बरोबर जी इंग्लिशांची लढाई झाली, तींत हा मेकेन्झी साहेबा बरोबर होता. त्या वेळेस यानें तेथें जें वृत्त घडलें त्याचें तेलंगी भाषेंत कविता रूपानें वर्णन लिहिलें आहे. तें असें कीं, श्रीरंगपट्टणचा किल्ला इंग्लिशांच्या हातीं कसा लागला, व किल्ल्यावर बावटा कसा चढविला; या काव्यांत करुणरस फार आहे. तथापि बावटा चढविल्या वेळचें जें यानें वर्णन लिहिलें आहे तें इतकें बाहणीचें आहे कीं, वाचकांस ती गोष्ट आपण प्रत्यक्षच पाहतों आहों कीं काय असा भास होतो.

याची बुद्धि चांगली होती ह्मणून, व हा सर्वांशीं मनमिळाऊ पणानें वागणारा असे म्हणून, मेकेन्झीस हिंदुस्थानाचा इतिहास लिहिण्यास जें जें साहित्य लागत होतें, तें तें यानें मोठ्या तजविजीनें मिळवून दिलें. आणि त्या वरून दिसून येतें कीं, हा अतिशयच विलक्षण उद्योगी होता. शके १७२१ मध्यें सर आर्थर वेलस्ली साहेबानें महाराज धुंडी यांस पळत असतां हरिहर येथें धरिलें, त्या वेळ-

वेंद्दा यानें तैलंगींत एक काव्य लिहिलेलें पूर्वीच्या सारखेंच मनोवेधक आहे. पुढें यानें एका सत्पुरुषाचें वर्णन शंभर श्लोकांनीं लिहिलें, आणि तेव्हां पासून तर याचा लौकिक फारच वाढला. या शिवाय यानें श्रीरंगचरित्र नांवाचाएक ग्रंथ लिहिला. त्यांत श्रीरंगपट्टणच्या राजाची वंशावळी व यादव राजाचें वर्णन वगैरे पुष्कळ विषयांचा संग्रह आहे. अखेर सर्वत्र शांतता झाल्यावर यानें भूगोल व भूमिति यांचा अभ्यास करून, केवळ ज्ञानानें नकाशे इतके उत्कृष्ट काढिले कीं,–ते पाहून मेकेन्झीस याच्या बुद्धीचें पराकाष्ठेचें आश्चर्य झालें.

याचें लग्न याच्या विसाव्या वर्षी कशिनीकोटा प्रांतांतील व्यंकटाचलम नामक गृहस्थाच्या धाकट्या मुलीशीं झालें. तिजपासून यास एक कन्या मात्र झाली होती. पुढें असें झालें कीं, याच्या अल्प वयांतच यास अपस्मार रोग उत्पन्न होऊन शके १७२५ त हा आपल्या वयाच्या २६व्या वर्षी मरण पावला. हा मरण पावला हें वर्तमान मेकेन्झीस कळल्यावर त्यास अतिशय वाईट वाटलें. व त्या वियोग दुःखानें त्यानें त्या वेळेस अलेक झांडर जॉन्सन् यास येणें प्रमाणें पत्र लिहिलें:–

"माझा एका एतद्देशीय बुद्धिमान् गृहस्थाशीं स्नेह झाला होता, व त्याचें नांव व्यंकट बोरय्या होतें. हा केवळ अल्प वयस्क होता, तरी तो प्रज्ञाशाली असून सर्व लोकांशीं मनमिळाऊ असा होता. माझ्या पाहण्याच्या कामांत मला अनेक गोष्टींचें शोध करण्यास ज्या ज्या लोकां बरोबर प्रसंग पडले, त्यांची यानें मला चांगली समजूत घालून दिली. हिंदुलोकांच्या ज्ञानरूपी द्वारांत माझा प्रवेश करून देणारा हाच काय तो एक मला साहाय्य होता."

या प्रमाणें पत्र लिहिल्यावर मेकेन्झी साहेबानें याच्या स्मरणार्थ याचा एक पुतळा करवून, तो समुद्र किनाऱ्यावर उभा केलेला अद्यून मद्रास येथें आहे. (कविच०)

**कावेली व्यंकट सुबय्या**– कावेली व्यंकट बोरय्याचा बाप.

**काव्यकौतुक**– तौत कवीनें केलेला संस्कृत ग्रंथ. यावर अभिनवगुप्ताची टीका आहे.

**काव्यप्रकाश**– हा संस्कृत काव्यविषयक ग्रंथ एक मम्मटाचा असून दुसरा जयंत कवीचा आहे.

**काव्यप्रकाशसंकेत**– रुचक कविकृत संस्कृत ग्रंथ.

**काव्यादर्श**– दंडिकविकृत संस्कृत ग्रंथ.

**काव्यालंकार**– रुद्रक ह्मणजे शतानंदकृत आर्याछंदोबद्ध १६अध्यायांचा संस्कृत ग्रंथ.

**काव्यालोकलोचन**- रत्नाकर कविकृत संस्कृत ग्रंथ.

**काशिकावृत्ति**-संस्कृत व्याकरणावर जिनेंद्रकृत व्याख्या. २-न्यायविषयक ग्रंथ. याचे पहिले चार अध्याय जयादित्यानें रचिले असून पुढील चार वामन कवीनें रचिले आहेत.

**काशीखंड**- ओंवीबद्ध प्राकृत ग्रंथ. याचा कर्त्ता शिवगोमा होय. स्कंदपुराणांतील नऊ खंडां पैकीं, हें एक खंड आहे.

**काशीदास**- हा एक बंगाली कवि होऊन गेला. यानें कृत्तिवासास साह्य घेऊन महाभारत व रामायण यांचें बंगालींत भाषांतर लिहिलें आहे. (बुल्ह॰ का॰ शोध॰)

**काशीनाथोपाध्याय**- अनंतोपाध्यायांचा ज्येष्ठपुत्र. यास लोक बाबापाध्ये ह्मणतात. धर्मशास्त्रावर धर्मसिंधु ह्मणून जो ग्रंथ आहे तो यानें लिहिला असून, त्याची मान्यता या देशांत सर्वत्र चांगली आहे. हा जातीचा कऱ्हाडा ब्राह्मण, व पंढरपुर येथील राहणारा होता. वारकरी यास भगवद्भक्त समजतअसत. हाल्लीं जो तुकारामाच्या साडेचार हजार अभंगाचा गाथा आहे, तो याच्या संमतीनें मलाप्पा वासकरानें कायम केलेला वारकरी लोक मोठ्या आदरानें मानितात. कर्नाटकांतील बहुतेक कृष्णाचार्यादिक आचार्य याचेच शिष्य होऊन गेले; असा याचा लौकिक आहे. सारांश हा मोठा विद्वान् व भगवद्भक्त असा पुरुष होऊन गेला, व शेवटल्या बाजीरावाच्या कारकिर्दीत हा होता असें लोक बोलतात. (ब्रह्म॰).

**काशीपुरी**- हल्लीं वाराणसीच्या अपभ्रंशानें या नगरीस बनारस ह्मणतात. ही नगरी प्रयागांच्या पूर्वेस आहे. व हिचे उत्तर अक्षांश २७° असून पूर्वरेखांश सुमारें ८१° आहेत.

**काशीबाई**- थोरल्या बाजीराव साहेबांची स्त्री. ही चासकर जोशी यांची कन्या.

**काशीमणिपुर**- लौहित्य देशांतील शहर. याचे उत्तर अक्षांश सुमारें २५° व पूर्वरेखांश ९४° आहेत.

**काशीमाहात्म्य**- रत्नधर कविकृत संस्कृत भाषेंत.

**काशीराजपंडित**- यानें सोनपत पानपतच्या लढाईचा वृत्तांत फारसी भाषेंत लिहिला आहे.

**काशीराजस्वामि**- प्रसिद्ध जे केशव स्वामि त्यांचे गुरु.

**काशीरावहोळकर**- यास व याच्या बायकोस, हा तुकोजीचा औरस ह्मणून यशवंतराव होळकरानें मारेकरी घालून ठार मारविलें.

**काशीश्वरगोसावी–** भक्त (ना. भ. मं.) पहा.

**काश्मीरदेश–** दार्व देशाच्या पूर्वेकडील देश. याची राजधानी (श्रीनगर अथवा काश्मीर आहे. पूर्वी त्यास काश्यपपुर ह्मणत असत. याचे उत्तर अक्षांश सुमारें ३५ व पूर्वरेखांश ७४ आहेत.

**काश्यपपुर–** काश्मीर शहर तेंच.

**काळबाबा–** विष्णुबाबा शेंबेकर शब्द पहा.

**किंदुबिल्व–** ओरिसा प्रांतांतील गांव. प्रसिद्ध जो जयदेव स्वामि त्याची ही जन्मभूमि.

**किरातदेश–** याचे उत्तर आणि पूर्व असे दोन भेद आहेत. उत्तरकिरातांत धवलगिरि आणि चंद्रगिरि अशीं हिमालयाचीं दोन शिखरें आहेत, व पूर्वकिरातांत त्रिपुरी शहर आहे.

**किरातकाव्यदुर्घट–** राजकुंद कविकृत.

**किरातार्जुनीयकाव्य–** भारवी कवीनें केलेलें संस्कृत काव्य.

**किरीटीरामराजा–** शके १४८६ मध्यें अनागोंदी येथें असणारा राजा. असें सांगतात कीं, या राजानें पंढरपूरच्या विठोबाची मूर्ति अनागोंदीस नेली असतां, एकनाथ स्वामींचा पणजा भानुदास यानें ती पुनः पंढरीस आणिली; परंतु ही गोष्ट थोडी असंभाव्य दिसते; कारण या शकांत एकनाथ स्वामि १६ वर्षांचे असून त्यांचा पणजा भानुदास तो त्या वेळीं नव्हता असें एकनाथ चरित्रा वरून साफ दिसतें.

**किलकिलयवन–** ग्रीक लोकांस संज्ञा. हे लोक शके ९८० मध्यें नारसिंह देव कोंकणचा राजा त्याच्या कारकीर्दींत कोंकणांत आले होते. (महा० व कर्ना० इति०).

**किशोरभक्त–** साधु. (ना. भ. मं.) पहा.

**किष्किंधानगर–** यासच विद्या नगर किंवा हल्लीं अनागोंदी ह्मणतात.

**कीर्तिकौमुदी–** सोमेश्वर कविकृत संस्कृत भाषेंत.

**कील–** अग्रदासाचा मित्र. हा मोठा सिद्ध पुरुष होता. नाभाजीस नवी दृष्टि यानेंच दिली.

**कुचबिहार–** हा एक प्रांत व शहर हिमालयांत आहे, याचे उत्तर अक्षांश सुमारें २७ व पूर्वरेखांश ८९ आहेत.

**कुचमर्दिनी–** जगन्नाथराय कृत ग्रंथ. यांत प्रौढमनोरमा ग्रंथाचें यानें खंडन केलें आहे.

**कुंडिनपुर–** विदर्भ देशाचें शहर. हें उत्तर अक्षांश ३१ व पू. रे. ७८ यांवर होतें.

**कुंतलदेश–** कर्नाटकाचा पश्चिम प्रदेश. याच्या नैर्ऋत्येस केरल देश आहे. (प्रा. हिं. न.)

**कुतुभदीन्**– शके ११२८ तागाईत ११३२ पावेतों चार वर्षे दिल्लीच्या गादीवर होता.

**कुंथु**– जैन लोकांच्या २४ तीर्थकरांतील सतरावा.

**कुबेरभट्ट**– प्रसिद्ध जो बाणकवि त्याचा पणजा. चित्रभानूचा आजा. व अर्थपतीचा बाप.

**कुंभकोण**– द्रविड देशांतील कावेरी नदीच्या कांठचें शहर. हें तिच्या दक्षिणतीरास आहे. याच्या पूर्वेस कारिकल शहर व बंदर आहे. दक्षिणेस नागपत्तन व त्याच्याकांहीसें पश्चिमेस तंजावर आहे. यास अंत्यरंग असें म्हणतात. याचे उत्तर अक्षांश सुमारें ११ व पूर्वरेखांश ७९ आहेत.

**कुमारपाल**– चालुक्य वंशीय राजा. नेहरवाला प्रांतांतील पूर्णपत्तन (पाटण) येथील राजा जयसिंह, त्याच्या मागून हाच त्याच्या गादीवर बसला. यास हेमचंद्र नामक जैन पंडितानें वैदिक धर्मांतून जैन धर्मांत आणिलें. यानें स्वतः जैनधर्म स्वीकारल्यावर आपली बहुतेक प्रजा जैनधर्मांत बलात्कारानें आणिली. प्रबंधचिंतामणि ग्रंथांत मेरुतुंगाचार्यांनें याचा राज्याभिषेक शके १०६४ मध्यें कार्तिक शु०१० च्या दिवशीं झाल्याचें लिहिलें आहे. असें सांगतात कीं, राजानें जैनधर्म स्वीकारला, व तो प्रजेकडूनही स्वीकारविला. ही गोष्ट ऐकून राणीस फार वाईट वाटलें. तथापि ती वात्यात्कारीं राजाच्या मर्जीप्रमाणें चालूं लागली, मात्र कधीं कधीं युक्तीनें रस्त्यावरील खिडकीस चिकाचा पडदा लावून व त्याच्या आड उभी राहून, या प्रमाणें अर्धा श्लोक म्हणे:-" किं करोमि क गच्छामि को वेदानुद्धरिष्यति?" म्हणजे मी काय करूं व कोणीकडे जाऊं? वेदाचा उद्धार कोण करील? या प्रमाणें क्रम चालतां चालतां एके दिवशीं तिनें वरील अर्धा श्लोक म्हणण्यास, व जैन वेषानें शहरांत फिरणारा वेदप्रबोधनामक मोठा विद्वान् गौडब्राह्मण तिच्या खिडकी खालीं येण्यास गांठ पडून त्यानें तो अर्धा श्लोक ऐकिला. तेणें करून तो अति हर्ष पावून खालून या प्रमाणें उत्तर देता झाला:-" मा विषीद वरारोहे भट्टाचार्योऽस्ति भूतले " म्हणजे, हे गुणवान् स्त्रिये, खेद करूं नको; मीं भट्टाचार्य पृथिवीवर आहें. हें त्यानें म्हटलेलें श्लोकार्द्ध ऐकतांच तिनें त्यास माडीवर बोलावून नेऊन त्याचा सत्कार केला, व त्यास राजाचें कृत्य कळविलें. त्यावरून त्यानें तिला आश्वासन देऊन तत्काल राजसभेंत गमन केलें. व जैन पंडितांचा वादांत पराभव करून पुनः राजास वैदिक धर्मांत आणिलें. (आर्यवि॰सु॰).

**कुमारसंभव**– विक्रम सभेंतील कालिदासकृत नाटक. याचे सात सर्ग आहेत. व त्यांत कार्तिकेयाच्या जन्मा पर्यंत कथानक आहे. यावर मल्लीनाथाची टीका

आहे. याच काव्याचे आणखी १० सर्ग आहेत, असें ह्मणतात; परंतु त्यां विषयीं वाद आहे. २– भट्ट उद्भट कृत याच नांवाचें काव्य.

**कुमारसंभवटीका**– मल्लीनाथकृत संस्कृत भाषेंत असलेली टीका.

**कुमारस्वामि**– पोटय्या कवीचा भाऊ.

**कुमारिलभट्ट**– हा जातीचा तैलंग ब्राह्मण मोठा विद्वान् होता. यास भट्टपाद असेंही ह्मणत. माधवानें आपल्या शंकरविजयांत याच्या विषयीं या प्रमाणें लिहिलें आहे.– श्लोक ॥ नैगमीं कुरु मर्यादा मवतीर्य महीतले॥ निर्जित्य सौगतान् सर्वान्नाम्ना यार्थ विरोधिनः॥५५॥ ब्रह्मापि ते सहायार्थं मंडनो नामभूसुरः ॥ भविष्यति महेंद्रोपि सुधन्वा नाम भूमिपः॥५६॥ ततः सतारका राति रजनिष्ठ मही तले॥ भट्टपादोऽभिधायस्य भूषादिक् कृदशामभूत्॥५७॥ (सर्ग १)– अर्थ;– तूं पृथिवीवर अवतरून आणि वेदार्थ विरुद्ध जे सौगत त्यांस जिंकून, वैदिक धर्माची मर्यादा बांध. ब्रह्मदेवही तुझ्या साह्या साठीं मंडन अशा नांवानें ब्राह्मण होऊन, इंद्र, सुधन्वा या नांवानें राजा होईल. अशी शिवाज्ञा झाल्या नंतर तो तारकासुराचा हंता शत्रु स्वामिकार्तिक भट्टपाद अशा नांवानें अवतरता झाला. व दिशारूप स्त्रियांस भूषित करिता झाला.

याच प्रमाणें आत्मपुराणाच्या प्रस्तावनेंत गद्य आढळतें तें येणें प्रमाणें:–
"पुरा किल बौध्दादिभिः प्रवर्तितेन वेद विरुद्धेन मतेन विदूषिताशय तया परित्य-"
"क्त वैदिक पंथान मवैदिकेन कदध्वना प्रवर्तमाने र्जनैः संकुल तया कथावशेष वै-"
"दिक पथमखिलं भूवलयं पर्य्या लोच्या कारण करुणानिधि रंबिकारमणो बौ-"
"द्धादि प्रसारित कापथोच्छेद पूर्वकं वैदिक मार्ग मव्याहतं स्वाज्ञापयेऽवतारिते-"
"न सेनान्या कुमारिलभट्ट रूपेणावतरता प्रावीवृतत् । तेनच कर्मण एव पुरुषार्थ-"
"तां विचिन्वता सकलोपनिषद्भागानां कर्तृपुरुष स्तावकत्वेनार्थ वादत्व मुद्घो-"
"षयताऽव्युच्छिन्नः कर्म मार्ग एव व्यातन्यत."– अर्थ;– पूर्वी बौद्धादिकांनीं प्रवर्तविलेलें जें वेदविरुद्ध मत तेणें करून मलिन झालीं आहेत अंतःकरणें ज्यांचीं अशा जनांनीं वैदिक मार्ग सोडून नास्तिक मार्गाचें अवलंबन केलें असतां, वेद मार्गाच्या कथा मात्र अवशेष राहिल्या आहेत ज्यावर अशा प्रकारें संपूर्ण भूमंडल व्याप्त झालेलें अवलोकन करून, सहज करुणानिधि जो अंबिकारमण शिव, तो बौद्धप्रसारित जो कुमार्ग तदुच्छेद पूर्वक अकुंठित वैदिक मार्गाप्रत आपल्या आज्ञेनें अवतरलेल्या कुमारिल भट्टरूप स्वामि कार्तिका कडून

प्रचलविता झाला. तेव्हां कर्मासच परम पुरुषार्थता असें कुमारिल भट्टानें मानून, व सकल उपनिषद्भागास कर्मकर्त्या पुरुषाचें स्तुतिरूपानें अर्थवादत्व म्हणजे शब्दगौरव आहे असें कल्पून, अनादि कर्ममार्गाप्रत विस्तृत केलें. कुमारिलभट्टानें कर्मकांड प्रतिपादनपर प्रथमतः जैमिनिसूत्रभाष्य लिहून नंतर जैनमत भंजन या नांवाचाही एक ग्रंथ लिहिला असें सांगतात.

आतां जैन लोकांनीं याच्या विषयीं आपल्या ग्रंथांत जें याचें वृत्त लिहिलें आहे तें येणें प्रमाणें :- ॥श्लोक॥

आंध्रोत्कलानां संयोगे पवित्रे जयमंगले ॥ ग्रामे तस्मिन्महा नद्यां भट्टाचार्यः कुमारकः॥ आंध्रजातिस्त्रितिरिको माताचंद्र गुणासती॥ यज्ञेश्वरः पितायस्य शुक्लेंदुरिव वर्द्धतः ॥ नंदाः पूर्णो भूश्वनेत्रे मनुजानांच वामतः ॥ मेलने वत्सरो धाता युधिष्ठिर शकस्यवे ॥ [२१०९] भट्टाचार्य कुमारस्य कर्मकांडस्य वादिनः ॥जातो प्रादुर्भवस्तस्मिन् विज्ञेयो वत्सरे शुभे॥ राधेच शक्लपक्षेच राकायां भानुवासरे॥ मध्यान्हे शरजन्माच प्रादुर्भूतो महाबली॥ महा वादी महान् घोरः श्रुतीनांचाभिमानवान् ॥ जिनाना मंतकः साक्षा दुरुद्देष्टाऽतिपापवान् ॥ सुधन्वा नामको राजा सोपि दुष्टस्तथा भुवि॥ जिनानां येन साधूनां कृतं कदन मद्भुतं ॥ आत्मपाप निवृत्यर्थं प्रयागे वेणि संगमे॥ पश्चात्तापयुतो भट्टः शरीर मदहत्स्वकं ॥गुणानांच तथा स्थानां कार्तिके यस्य मेलनात्॥ प्रमाथी माघमासस्य शक्लपक्षस्य पौर्णिमा॥ [६३] भट्टाचार्यस्य दहनं मध्यान्हे सूर्य आगते॥ भस्मी भूतस्तदा सर्वे पश्यंतिच महाद्भुतं ॥अष्टचत्वारि वर्षाणि जन्मकालाद्गतानिवें॥ प्रादुर्भवः शंकरस्य ततो जातोऽति वादिनः॥ [४८] इति-

अर्थ:- आंध्र व उत्कल देश यांच्या संधींत असलेल्या एका महानदी तीरच्या जयमंगल नामक पवित्र गांवांत भट्टपाद जो कुमारिल भट्ट त्याचें जन्म झालें. हा जातीचा तैलंग ब्राह्मण तैत्तिरीय यजुर्वेदी होता. याच्या आईचें नांव चंद्रगुणा व बापाचें नांव यज्ञेश्वर भट्ट होतें. युधिष्ठिर शकाचीं एकवीसशें नऊ वर्षें गत झाल्यावर २११० व्या वर्षीं धातानामक संवत्सरीं वैशाख शुद्ध पूर्णिमेस रविवारीं मध्यान्हीं सूर्य आला असतां याचें जन्म झालें. हा महाबलवान् स्वामिकार्तिकेय अवतरला होता म्हणून वेदोक्त कर्मकांडाचा मोठा धुरंधर वादी, श्रुतींचा अभिमानी, व जैन लोकांचा साक्षात् यमच होता. यानें ज्या श्रीनिकेतन नामक जैनाचार्या जवळ

अध्ययनमिषानें राहून त्या पासून जैनमत समजून घेतलें, त्यावरच शेवटीं उलटू-न त्याचा घात करविला हें कृत्यमात्र पापाचें केलें. हा जसा कृतघ्न होता, असाच या-चा साह्यकर्ता सुधन्वा राजाही जैन धर्मी असून आपल्या जातीवर उलटून पडल्या मुळें दुष्ट होता. कारण साधु जे जैन त्यांचें त्यानें विलक्षण कांडांत काढिलें. याच पापनिवृत्ती साठीं कुमारिल भट्टानें प्रयाग येथें आपल्यास जाळून घेतलें. हा म-रण पावला त्या वेळेस याच्या वयास ६३वें वर्ष होतें. व प्रमाथि संवत्सरांतील माघशुद्ध १५ होती. भगवत्पूज्य पाद श्रीमच्छंकराचार्य ते यास याच्या अंतका-ळीं ह्मणजे आपल्या वयाच्या १५ व्या वर्षी भेटले होते, अर्थात् याच्या वयाच्याअ-ठ्ठेचाळिसाव्या वर्षी ते पृथिवीवर जन्मास आले होते.

सारांश, वरील जैन पंडितांच्या लेखा वरून कुमारिलभट्ट स्वामिकार्तिका-चा अवतार होय, ह्मणून जें वैदिक पंडितांनीं लिहिलें आहे, तें स्वकपोलकल्पित नव्हे, असें सिद्ध होतें. तसेंच माधवानें आपल्या शंकरविजय ग्रंथांत- "कुमारि-ल मृगेंद्रेण हतेषु जिनहस्तिषु ॥ निष्प्रत्यूह मवर्द्धन्त श्रुतिशाखाः समंततः"- ह्म-णून जें लिहिलें तेंही खरें असें स्पष्ट दिसून येतें. जैन, बौद्ध वगैरे आचार्यांनीं हिंसाभयानें जे यज्ञयागादिक बंद पाडले होतें, त्यां विषयींची श्रुतियुक्तरूप प्र-माणांनीं कुमारिल भट्टानें सिद्धता करून, व त्यांचें मत चुकीचें आहे असें त्यांच्या पदरीं घालून, नंतर त्यांस सुधन्वा राजा कडून देहांत शिक्षा देवविल्या. कित्येकां-स तर जसें पूर्वी लोकांनीं बुद्धास चीन वगैरे ठिकाणीं भरतखंडांतून घालवून दिलें, त्या प्रमाणें देशपार करविलें.

बुद्धास लोकांनीं देशपार केलें त्या विषयीं येणें प्रमाणें आढळतेः-

> पुरा काले बुद्ध नाम्ना पुरुषेण प्रकाशितं ॥ बौद्धं मत मथैनंहि द्वि-जाः पाखंडिनं जगुः ॥ निर्वासिया मासुरमुं वर्णाः सर्वे स्वदेशतः ॥ त-तः स सिंहल द्वीपं तिबेटं चीन भूमिकां ॥ ब्रह्मदेशंच गत्वाथ बौद्ध-धर्म समातनोत् ॥ (आर्य सु०)

अर्थः- पूर्वी बुद्धनामक पुरुषानें प्रकाशित केलेलें जें बौद्धमत (बुद्धीच आत्माअ-सें मत) तेणें करून त्यास द्विज म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, आणि वैश्य, हे, हा पा-खंडी आहे असें बोलते झाले. आणि याच कारणानें त्यास त्रिवर्णांनीं स्वदेशांतून घालवून दिलें, तेव्हां तो येथून निघून गेला, व आपला धर्म सिंहलद्वीप, तिबेट, चीन, आणि ब्रह्मदेश येथें विस्तारिता झाला. आनंदगिरीनें आपण लिहिलेल्या

शंकरविजयांत कुमारिल भट्टा विषयीं इतकेंच लिहिलें आहे कीं, तो अग्निकाष्ठें भक्षण करीत असतां शंकराचार्यांची व त्याची भेट झाली. परंतु जैन लोकांस त्यानें जिंकण्यास काय काय उपाय केले त्या बद्दल त्यांत कांहीं लिहिलें नसून त्याचा विस्तार माधव पंडितानें आपल्या शंकरविजयांत केला आहे तो येणें प्रमाणें :—

ततः सतारकारातिं रजनिष्ठ महीतले॥ पट्टपादो भिधाचस्य भूषादिक् सुदृशा मभ्रून् ॥६०॥ स्फुटयन् वेदतात्पर्य मभाज्जैमिनि सूत्रितम्॥ सहस्रांशुरिवानूरु व्यंजितं भासयन् जगत् ॥६१॥ राज्ञः सुधन्वनः प्रापः नगरीं सजयन् दिशः॥ प्रत्युद्गम्य क्षितींद्रोऽपि विधिवत्तम पूजयत्॥ ६२॥सोभिनंद्या शिषाभूप मासीनः कांचनासने॥ तां सभां शोभयामास सुरभिर्युवनी मिव ।६३ सभासमीप विटपिश्रित कोकिलकूजितं॥ श्रुत्वाजगाद तद्व्याजा द्राजानं पंडिताग्रणीः॥ ६४॥ मलिनैश्चेन्न संगस्ते नीचैः काक कुलैः पिक॥ श्रुति दूषक निर्ह्रादैः श्लाघनीयस्तदा भवेः ॥६५॥षडभिज्ञानिशम्येमां वाचं तात्पर्य गर्भितां॥ नितरां चरण स्पृष्टा भुजंगा इव चुक्रुधुः॥ ६६॥ छित्वा युक्ति कुठारेण बुद्धसिद्धांत शाखिनं॥ सतद्ग्रंथेंधनैश्चीर्णैः क्रोधज्वाला मवर्द्धयत्॥ ६७॥ सासभा वदनैस्तेषां रोषपाटल कांतिभिः॥ बभौ बाला तपा ताम्रैः सरसीव सरोरुहैः॥६८॥ उपन्यस्यत्सु साक्षेपं खंडयत्सु परस्परं॥ तेषूद तिष्ठन्निर्घोषो भिंदन्निव रसातलं॥६९॥ अथः पेतुर्बुधेंद्रेण क्षताः पक्षेषु तत्क्षणं॥ व्यूढ कर्कश तर्केण तथागत धरा धराः॥७०॥ ससर्वज्ञ पदं विज्ञोऽसहमान इव द्विषां॥ चकार चित्र विन्यस्ता नेतान् मौन विभूषितां॥७१॥ ततः प्रक्षीण दर्पेषु बौद्धेषु वसुधाधिपं॥ बोधयन्बहुधा वेद वचांसि प्रशशंसस: ॥७२॥ बभाषेथ धराधीशो विद्यायत्तौ जयाजयौ॥ यः पतित्वा गिरेः शृंगा दव्ययस्तन्मतं ध्रुवं॥७३॥ तदा कर्ण्य मुखान्यन्ये परस्पर मलोकयन् द्विजाग्र्यस्तु स्मरन्वेदा नारुरोह गिरेः शिरः ७४॥ यदि वेदाः प्रमाणं स्युर्भूयात्काचिन्न मेक्षतिः॥ इति घोषयता तस्मान्न्यपाति स्फ महात्मना ७५॥अपिलोक गुरुः शैलात्तूलपिंड इवा पतत्॥ श्रुतिरात्म शरण्यानां व्यसनं नोच्छिनत्ति किम् ॥७६॥ दृष्ट्वा तमक्षतं राज्ञा श्रद्धां श्रुतिषु संदधे निनिंद बहुधात्मानं खलसंसर्ग दूषितं॥७७॥ सौगता स्त्वब्रुवन्नेदं प्रमाणं मत निर्णये॥ मणि मंत्रौषधै रेवं देहरक्षा भवे दिति॥८०॥ दुर्विधे-

रन्यथा नीते प्रत्यसेऽर्थेपि पार्थिवः॥ भ्रूकुटी भीकर मुखः संधासुग्रतरां व्यधात्॥ ॥ पृच्छामि भवतः किंचि द्वक्तुं न प्रभवंतिये॥ यंत्रोपलेषु सर्वांस्तान् घातयिष्याम्य संशयं॥ ॥ इति संश्रुत्य गोत्रेशो घटमाशी विषान्वितं॥ आनीयात्र किमस्तीति पप्रच्छ द्विज सौगतान्॥ ॥ वक्ष्यामहे वयंभूप श्वः प्रभातेऽस्य निर्णयं॥ इति प्रमाद्य राजानं जग्मुर्भू सुर सौगताः॥ ॥ततस्ते सौगताः सर्वे भुजंगोऽस्तीत्यवादिषुः॥ भोगीशा भोग शयनो भगवानिति भूसुराः॥ ॥ श्रुतभू सुर वाक्यस्य वदनं पृथिवी पतेः॥ कासार शोषण म्लान सारसश्रियमाददे॥ ॥ अथ प्रोवाच दिव्यावाक् सम्राज मशरीरिणी॥ नुदंति संशयं तस्य सर्वेषा मपि शृण्वतां॥ ॥ सत्यमेव महाराज ब्राह्मणा यदभाषिरे॥ माकृथाः संशयं तत्र भव सत्य प्रनिश्चयः॥ ॥श्रुत्वाऽशरीरिणीं वाणीं ददर्श वसुधाधिपः॥ मूर्तिं मधुद्विषः कुंभे सुधामिव सुरा धिपः॥ ॥ निरस्ताखिलसंदेहो विन्यस्ते नर दर्शनात्॥ व्यधादाज्ञां ततो राजा वधाय श्रुतिविद्विषां॥ ॥आसेतो रातुषाराद्रे बौद्धाना वृद्ध बालकं॥ न हंतियः स हंतव्यो भृत्यानित्य न्वशान्नृपः॥ ॥ इष्टोपि दृष्ट दोषश्चे द्वध्य एव महात्मनां॥ जननीमपिकिं साक्षात्रावधीद्भृगुनंदनः॥ ॥ हतेषु तेषु दुष्टेषु परिनस्तारको विदः॥श्रौतवर्त्मत मिस्रेषु नष्टेष्विव रविर्महः॥ ॥कुमारिल मृगेंद्रेण हतेषु जिन हस्तिषु॥ निष्प्रत्यूह मवर्द्धंत श्रुतिशारवाः समंततः॥ ॥(सर्ग १)

अर्थ- तदनंतर शिवाज्ञा झालेली मस्तकीं वंदन करून तो तारकासुराचा शत्रु षडानन संपूर्ण दिशारूप स्त्रियांस भट्टपाद अशा नांवानें भूषित करीत पृथिवीवर उत्पन्न होता झाला. आणि जैमिनीनें अरुणोदया प्रमाणें प्रकाशित केलेलें कर्मकांड सूर्या प्रमाणें विभागून स्पष्ट करिता झाला. भट्टपाद दिग्विजय करीत सुधन्वा राजाच्या नगरीस प्राप्त झाला असतां, राजा त्यास सामोरा जाऊन विध्युक्त त्याची पूजा करिता झाला. यानेंही त्यास आशीर्वादानें आनंदविलें व सुवर्णासनावर बसून सकल सभा अशी शोभायमान केली कीं;- जसें स्वर्गवन वसंतानें सुशोभित होतें. इतक्यांत असें झालें कीं;- तेथें सभेजवळच एक वृक्ष होता, त्यावर बसलेल्या कोकिल पक्ष्याचा शब्द श्रवण करून पंडितां मध्यें अग्रगण्य जो भट्टपाद तो त्या कोकिल मिषें करून राजास या प्रमाणें बोलला. हे कोकिल, श्रुति-

दूषक ह्मणजे कर्णकठोर शब्द करणारे जे नीच व मलिन कावळे त्यांचा संग जर तूं न करशील तर योग्यता पावशील. ( इकडे हे राजा श्रुतीला दोष लावणारे जे नीच व मलिन बौध्द त्यांचा संग न करशील तर योग्यता पावशील ) या प्रमाणें ती तात्पर्य गर्भित वाणी सर्व षड्भिज्ञ ह्मणजे बौद्ध श्रवण करून, शेंपटीवर पाय दिल्यानें भुजंग जसा खवळतो तसे क्रोधें करून संतप्त झाले. नंतर बुद्धाचा सिध्दांतरूप वृक्ष त्या व्रत भट्टपादानें युक्तिरूप कुऱ्हाडीनें तोडून, त्या मताचे जे ग्रंथ तद्रूप इंधनानें त्याच्या क्रोधज्वाला वृद्धिंगत होत्या झाल्या. क्रोधें करून बौद्धांचीं हीं तोंडें लाल झालीं आणि परस्परांचें खंडन करण्यांत जो शब्द निघाला तो रसातलास भेदिता झाला. शेवटीं इंद्राच्या वज्रप्रहारानें जसे पर्वतांचे पक्ष गळून पडतात, त्याच प्रमाणें तथागत जे बौध्द त्यांचा पक्ष खालीं पतन पावला ह्मणजे खंडित झाला. आणि ज्यांनीं आपणांस "सर्वज्ञः सुगतो बुद्धो" सर्वज्ञ ह्मणविलें, तो शब्द सहन न करणारा जो भट्टपाद त्यानें सर्व बौध्दांस चित्राप्रमाणें मौन धरायास लाविलें. नंतर सर्व बौध्द गर्वहत झाले असतां, वेदाची प्रशंसा करीत भट्टपादानें राजास बोध केला. तेव्हां राजा ह्मणाला महाराज, जय अथवा पराजय विद्येच्या न्यूनाधिक्यावर अवलंबून असल्या कारणानें आपण अधिक विद्वान् ह्मणून जय मिळविलात. पण येणें करून मताच्या खरे खोटेपणाचा निर्णय झाला नाहीं. यास्तव आपणा उभयतांत जो पर्वतावरून खालीं उडी टाकून मरण न पावेल त्याचें मत खरें असें मी समजेन. असें ऐकून बौध्द जैन वगैरे एकमेकांच्या तोंडांकडे टकमकां पाहूं लागले, परंतु कुमारिल भट्ट तत्काळ उठला, व सर्वां समक्ष उंच पर्वतावर चढून, जर वेद खरे असतील तर मला कांहीं एक होणार नाहीं, असें ह्मणून त्यानें पर्वताखालीं उडी टाकिली. व कापसाचा गोळा वरून खालीं पडला असतां त्यास जसें कांहीं लागत नाहीं त्या प्रमाणें तो व्यथारहित असा राजा व बौध्द वगैरे यांपुढें येऊन उभा राहिला. हें त्याचें कृत्य पाहून राजाचा विश्वास वेदावर बसला, व त्यानें दुष्ट जे बौध्द व जैन त्यांच्या समागमानें आपण मलिन झालों, अशा बद्दल आपली बहुत निंदा करून घेतली. या प्रमाणें अघटित गोष्ट झाली असतांही बौध्द व जैन ह्मणूं लागले कीं, मताचा निर्णय पर्वता वरून उडी टाकल्यानें झाला असें होत नाहीं; कारण मंत्र, मणि, व औषधि यांच्या योगानेंही ही गोष्ट सहज घडेल. असें त्या खलांचें भाषण ऐकून राजा इतका संता-

पला कीं, आतां जें मी पुसेन तें सांगितल्यास उत्तम. न सांगितल्यास मी एकंदर सर्वांस दगडाच्या यंत्रांत (घाण्यांत) घालून ठार मारीन, अशी त्यानें परम उग्र प्रतिज्ञा केली. नंतर त्यानें एका घागरींत सर्प घालून ती सभेंत आणिली, व हींत काय आहे तें सांगा ह्मणून सर्वांस प्रश्न केला. त्या वेळीं ब्राह्मण व बौध्द उद्यां सांगूं असें ह्मणून घरीं गेले. दुसरे दिवशीं सर्व सभेंत आले, त्यांत बौध्दांनीं घागरे यांत सर्प आहे असें सांगितलें. आणि ब्राह्मणांनीं शेषशायी भगवान् विष्णु यांत आहे असें ह्मटलें. तें ब्राह्मणाचें वाक्य ऐकून राजा सुकलेल्या कमला प्रमाणें म्लान झाला; कारण घटांत सर्पच आहे हें त्यास ठाऊक होतें. इतक्यांत आकाशवाणी झाली कीं, राजा चिंता करूं नकी. ब्राह्मण ह्मणतात त्याच प्रमाणें घटांत विष्णुमूर्ति आहे, यास्तव संशय न करितां घट उघडून पहा, व आपली प्रतिज्ञा सत्य कर. त्या वरून राजानें घट उघडिला आणि पाहतो तों आंत शेषशायीची मूर्ति खरीच आहे. मग लागलीच त्यानें रामेश्वरा पासून हिमालय पर्वता पर्यंत जे बौध्द व जैन होते, त्या सर्वांस लहान मूल किंवा वृध्द न ह्मणतां सर्वांस ठार मारण्याची आज्ञा केली. व असें सांगितलें कीं, जो यांत हयगय करील त्यास मी स्वतः मारीन. कोणी ह्मणेल कीं, जे बौद्ध व जैन, राजास गुरूप्रमाणें पूज्य होते, त्यांस राजानें ठार मारणें अन्याय होय. तर असें समजावेंकीं, दोषि हा थोरांस वध्यच समजला पाहिजे. मग तो गुरु किंवा इष्ट कोणी ही असो; पहा परशुरामानें आपल्या आईस देखील बापाच्या आज्ञे वरून मारायास सोडलें नाहीं. सारांश कुमारिल भट्टरूप सिंहानें हस्तिस्थानापन्न जे बौध्द व जैन त्यांचा निःपात करून वेदमार्ग विस्तृत केला. व अल्पच काळानें स्वलोकीं परत गमन केलें. त्या विषयीं आह्मीं वर लिहिलेंच आहे.

तात्पर्य इतकेंच कीं,- कुमारिल भट्टास बौध्द व जैन वादभयानें व देहांत शिक्षेच्या भयानें इतके भिऊं लागले कीं,- तो त्यास हा आपला प्रत्यक्ष काळच होय असें समजूं लागले.

**कुमारिलस्वामि**— काश्मीराकडील कवि. तंत्रवार्तिक ग्रंथाचा कर्ता. (बुल्ह० शोध०)

**कुरुजांगल देश**— हा देश हिमालयांत कुरुदेशाच्या उत्तरेस आहे. (प्रा०न०) सहरामपुर तें यांतील शहर होय. भागवता मध्यें हा देश कुरुदेशाच्या पश्चिमेस सांगितला आहे.

**कुरुंदवाड**— हें संस्थान कृष्णा व पंचगंगा या दोन नद्यांच्या संगमावर नृसिंहवाडी-

जवळ आहे. येथें कुरुंदवाडकर पटवर्धन राहतात.

**कुरुपांडवदेश**– याची राजधानी हस्तिनापुर. कुरुदेश यासच नांव आहे.

**कुरुक्षेत्र**– कौरव पांडवांची युद्धभूमि, यांतच विनशान तीर्थ वायव्येस आहे.

**कुर्ग**– हल्लीं यास कोडगू ह्मणतात. हा केरल देशांत असून कावेरी नदीचा उगम यांतून आहे.

**कुलशेखर**– साधु. (ना. भ. ग्रं.) पहा.

**कुलूकभट्ट**– पूर्वमीमांसा व मनुस्मृति या दोन ग्रंथांचा टीकाकार. ( बुल्ह० शोध.)

**कुवलयपुर**– हाल्लीं यास कोल्हापुर ह्मणतात.

**कुवलयानंद**– अपय्या दीक्षितकृत संस्कृत ग्रंथ.

**कुशस्थली**– हिला हल्लीं द्वारका ह्मणतात.

**कुशीनदी**– कौशिकी नदीचें हल्लींचें नांव. ही नेपाळांतून निघून राजमहाल शहराजवळ गंगेस मिळाली आहे.

**कुसुमपुर**– पुष्पपुर अथवा पाटलीपुत्र शहराचें नांव. चिनयी लोक यास कुसुमोपुलो ह्मणतात.

**कूर्मदास**– भक्तविजयांतील १६व्या अध्यायांत याचें चरित्र आहे. त्यावरून असें कळतें कीं, हा पैठण येथील राहणारा जातीचा ब्राह्मण होता. हा जन्मल्या दिवसापासून पांगळा व थोंटा असे. म्हणून याच्या मनांत पंढरीस जाऊन पडावें असें आलें. पुढें हा कार्तिकी एकादशीस पंढरीस जाण्याच्या हेतूनें खुरडत खुरडत निघाला. परंतु नशा चालण्यानें याच्यानें एका कोसाहून अधिक जाववत नसे. अशा रीतीनें जातां जातां कार्तिक शुद्ध दशमीस लऊळ म्हणून करमाळे तालुक्यांत त्याच्या आग्नेयी दिशेस एक गांव आहे तेथें येऊन पोंहोंचला. तेथून पंढरपुर नऊ कोस आहे. तेव्हां यानें पाहिलें कीं, आतां एकादशी करितां आपलें जाणें पंढरीस होत नाहीं. म्हणून मग यानें मनांत देवाची प्रार्थना केली, आणि भक्तिपूर्वक वारकऱ्यां बरोबर देवास निरोप सांगून धाडिला कीं, कृपा करून येथें येऊन मला दर्शन द्यावें. या निरोपा प्रमाणें असें सांगतात कीं यास देवानें दर्शन दिलें. याची समाधि हल्लीं लऊळ येथें आहे. यास होऊन गेल्यास किती वर्षे झालीं तें कांहींच महिपति बावांनीं ग्रंथांत दाखविलें नाहीं. (भक्तवि. अध्या. १६)

**कृतंजय**– कलियुगांत जे सूर्यवंशी राजे होऊन गेले त्यांतील बर्हिनामक राजाचा

हा मुलगा व रणंजय राजाचा बाप होता. (राजमा०)

**कृतविलास**– गुणोपासक मताचा पुरुष. हा मुख्य शंकराचार्यांच्या वेळीं होता. आचार्यांनीं याचें मत खंडित करून यास शुद्धाद्वैत मार्गास कसें लाविलें तें चरित्र आनंदगिरीनें आपल्या शंकर विजयांत एकुणचाळिसाव्या प्रकरणांत लिहिलें आहे.

**कृत्तिवास**– हा बंगालि कवि काशीदास कवीचा मित्र होता. महाभारत व रामायण यांचें भाषांतर यानेंच केलें. (बुल्ह० शोध०)

**कृत्यारत्नावली**– धर्मशास्त्र विषयावर रामचंद्र भट्टानें केलेला ग्रंथ.

**कृपापात्र**– केवलाद्वैत वाद कुलिश नामक ग्रंथाचा कर्ता. (बुल्ह० शोध०)

**कृष्ण**– आंध्रभृत्य राजांतील पहिला राजा जो बली त्याचा भाऊ. हा त्याच्या मागें गादीवर बसला. (राजमा०).

**कृष्णगोपीसंवाद**– शांतिदास कविकृत गुजराथींत.

**कृष्णचरितामृत**– मानभाव मताचा जो मूळ कृष्णभट त्याचा ग्रंथ.

**कृष्णचंद्रराज**– नडियाद येथील राजा. (बुल्ह० शोध).

**कृष्णचैतन्य**– साधु. (ना० भा० ग्रं० पहा.).

**कृष्णदर्शनबुद्धि**– मुख्य जे पहिले शंकराचार्य त्यांच्या शिष्यांतील एक सन्यासी.

**कृष्णदास**– हिंदुस्थानांत होऊन गेलेला भगवद्भक्त. (ना० भ० ग्रंथ) पहा.

**कृष्णदाससोनार**- साधु. (ना० भ० ग्रंथ) पहा.

**कृष्णदेव**– कृष्णदेव रायलू तोच.

**कृष्णदेवरामरायलू**– कृष्णदेव रायलूचा पुत्र.

**कृष्णदेवरायलू**– नृसिंह देवाचा मुलगा, व विद्या नगरचा राजा. हा शालिवा० १४४६ मध्यें होता. याचा बाप मेल्यावर हा गादीवर बसला. हा मोठा जयसंपादक व विद्येस उत्तेजन देणारा असे. अप्परसु अथवा तिम्मरसु जवळून यानें नीतिशास्त्राचें ज्ञान संपादिलें होतें. बहुधा सर्व तैलंगण आणि कर्नाटक याच्या ताब्यांत होतें असें ह्मणतात. याचें लक्ष्य तैलंगी कवितेकडे फार असे ह्मणून, यानें आलसानी पेदन्नानें केलेल्या स्वारोचिष मनुचरित्रावर सुक्तमाला नांवाची टीका लिहिली, तींत राज्य चालविण्याचे नियम व राजाचे धर्म यांचा संग्रह आहे. दुसरा एक रसमंजरी नांवाचा याचा ग्रंथ आहे, तो शृंगारपर आहे, असें ह्मणतात. याशिवाय मेकल चरित्र व सकल कथासार हे दोन ग्रंथ यानेंच केलेले आहेत. हा राजा आपल्या वयाच्या चाळिसाव्या वर्षी विद्यानगर येथेंच मरण पावला. कृष्ण-

देवराम रायलू तो याचा पुत्र असून याच्या मागें गादीवर बसला. ( कविच० ).

**कृष्णधूर्जटी–** सिद्धांत चंद्रोदय ग्रंथाचा कर्त्ता.

**कृष्णप्रभाववर्णन–** गुजराथी भाषेंत लालदास कविकृत.

**कृष्णप्रसाद–** गुजराथी भाषेंत मुक्तानंद कविकृत.

**कृष्णबावा–** उत्तर हिंदुस्थानांतील साधु. ( ना. भ. ग्रं. ) पहा.

**कृष्णंभट्ट–** पदार्थरत्नमंजूष ग्रंथाचा कर्त्ता.

**कृष्णंभट्टजोशी–** राक्षस भुवनाच्या पूर्वेस असणाऱ्या शेंबे गांवचा वतनदार गोपाळपंत कुळकरणी व जोशी त्याचा हा पुत्र. मानभाव मत या पासून निघालें. त्या विषयीं दंतकथा अशी सांगतात कीं,– यास वेताळाची अतिशय भक्ति असे, आणि त्या मुळें यास त्याचा साक्षात्कारही होता. एकदां यास वेताळ ह्मणाला, तुला जें इच्छित असेल तें माग. त्या वरून यानें मी लोकांस कृष्णासारखें दिसावें असें मागितलें. तेव्हां वेताळानें यास एक गुगुद देऊन ह्मटलें, हा जों पर्यंत तुझ्या डोक्यावर असेल तों पर्यंत तूं कृष्णाच असा लोकांस दिसशील; परंतु हा डोक्या वरून काढतांच पूर्ववत् दिसूं लागशील. यास्तव हा संभाळ, व विचारानें चाल असें सांगून वेताळ अदृश्य झाला.

पुढें यानें कुळकरण्याचें व जोशीपणाचें काम भाऊबंदांच्या गळ्यांत घातलें. व आपण त्यांतून मोकळा होऊन वरप्रदाना प्रमाणें कृष्ण होऊन लोकांच्या दृष्टीस हळु हळू पडूं लागला. ही गोष्ट चोंहीकडे प्रसिद्ध झाल्यानें गांवचे व आससंताद्भागच्या प्रदेशांतले लोक दर्शनास येऊं लागले. व कित्येक स्त्रीपुरुषांनीं अनुग्रह घेतले. त्यांत यानें थोडें जपून चालावें तें न चालतां याच्या कृष्णारूपास ज्या अनुग्रही स्त्रिया भुलल्या, व संभोग इच्छूं लागल्या त्यांच्या मनकामना यानें निर्धास्तपणानें रासक्रीडेच्या थाटानें पुरवून बहुत द्रव्यही संपादन केलें. सारांश याचा अनुग्रह घेण्या विषयीं स्त्री पुरुषांच्या उड्या पडतां पडतां हें याचें प्रकरण पैठण शहरांतही हळु हळु शिरलें.

ही गोष्ट फुटत फुटत हेमाद्रिपंताच्या ( हेमाडपंताच्या ) कानावर गेली. तेव्हां त्यासही आश्चर्य वाटून, त्याच दिवशीं त्यानें त्याचें इष्ट दैवत गणपति होतें त्याची प्रार्थना करून त्यास वरील गोष्ट पुसली. तेव्हां गणपति हेमाडपंतास त्या गोष्टीचें सर्व मूळ व मर्म सांगून अदृश्य झाला असतां, हेमाद्रिपंतास या गोष्टीचा पराकाष्ठेचा राग आला. व त्यानें लागलीच एक कारकून कृष्णंभ-

ट्टास पैठणास घेऊन येण्या साठीं शेंबे गांवास पाठविला. कारकुन चतुर होता,ह्म-णून त्यानें मोठ्या नम्रतेनें प्रार्थना करून युक्तीनेंच कृष्णंभट्टास पैठणास नेलें,व पंतास नेऊन भेटविलें. पंतांनीं त्याचें कृष्णरूप पाहून त्याचा मोठा आदर सत्कार केला. व स्नान भोजन आज येथेंच व्हावें ह्मणून विनंति केली. ती कृष्णंभट्ट मान्य करीना. कारण डोचीवरील मुगुट स्नान करतानां कादावा लागेल, व तो कादतां-च आपलें भांडवल फुटेल याचें त्यास भय पडलें.

शेवटीं होय नाहीं अशा प्रकारें उभयतांचें भाषण होतां होतां,हेमाद्रिपं-ताच्या नेत्रसंकेता वरून कारकुनानें एका एकीं याच्या डोचीवरील मुगुट उचल-ला. तो उचलतांच कृष्णंभट्ट मूळच्या रूपानें दिसूं लागला. असें पाहून हेमाद्रि पंतानें त्यास कैदेंत ठेविलें. नंतर ज्या बायका, व जे पुरुष याचे अनुयायी हो-ते. त्या सर्वांस त्यानें पैठणास धरून आणवून विचार केला कीं, या सर्वांस मा-रणें योग्य नाहीं. ह्मणून मग त्यानें कारकुनास आज्ञा करून कृष्णंभट्ट व त्याचे अनुयायी सर्व स्त्रिया पुरुष, या सर्वांचे पांच पाट कादून व सर्वांस काळीं व-स्त्रें नेसवून हद्दपार केलें. (पूर्वी काळें वस्त्र अपमानाचें चिन्ह समजत असत.) तोच हा सांप्रत दिसत असलेला मानभावाचा पंथ होय.

हल्लीं चांगल्या जाणत्या मानभावांस पुसतां ते ह्मणतात कीं, आम्ही कृष्णाचा भाऊ बलराम त्याचे संप्रदायी आहों. कारण बलराम नीलवस्त्रें वा-परीत असे, व नीलांबर असें त्यास असलेलें नांव अमरकोशांत प्रसिद्ध ही आ-हे. तेंच चिन्ह आमचें आहे म्हणून आमचें मत खरें आहे. या लोकांचें मत का-य आहे, व मानभाव शब्दाचा अर्थ काय या विषयीं हकीगत आहे ती ये-णें प्रमाणें :-

मानभाव ह्मणतात आमचें खरें नांव महानुभाव आहे. या पंथाची प्र-वृत्ति महाराष्ट्र देशांत असून, विशेषें करून वराडांत फार आहे. यांतील मुख्यां-स महंत असें ह्मणतात. यांचे मुख्य मठ पांच आहेत. त्यांचीं ठिकाणें;- ऋ-द्धपुर, कारंजें, दर्यापुर, फलटण, आणि पैठण. या शिवाय बाकी वगैरे उप-मठ आहेत ते निराळे. मठांचीं नांवें, नरमठ, नारायण मठ, ऋषिमठ, प्रवरमठ, आणि प्रशांत मठ येणें प्रमाणें आहेत. एका महंताच्या हाता खालीं पुष्कळ मानभाव असतात. एक महंत समाधिस्थ झाल्यावर, त्याच्या शिष्यांतून सर्वा-नुमतें जो योग्य ठरेल त्यास त्याच्या गादीवर बसवितात. महंतास पालखी

मोरचेल, चवरी, शिक्का वगैरे सर्व राजचिन्हें असतात.

मानभाव पंथांत गृहस्थाश्रम आणि सन्यासाश्रम असे दोन आश्रमआहेत. सन्यासाश्रमांतील स्त्री पुरुषांस केशवपन जरी आहे, तरी त्यांस लग्न करण्याची इच्छा असतां त्यांतल्या त्यांतच तें करण्यास प्रत्यवाय नाहीं. गृहस्थाश्रमांतील स्त्रीपुरुषांस वपन नाहीं, काळ्या वस्त्रा ऐवजीं मात्र पांढऱ्या वस्त्रास एक काळें ठिगळ असावें लागतें.

ह्या पंथाचा मुख्य आचार्य कृष्णंभट्ट होता. ह्मणून त्यासच कृष्ण समजून त्याच्या मूर्तीची उपासना मानभाव करतात, व कृष्णचरितामृत जो त्यानें केलेला ग्रंथ त्यास फार मानतात. या शिवाय हे लोक दत्तात्रेयालाही भजतात. यांच्यांत जैन लोकां प्रमाणेंच हिंसेचा निषेध आहे. तरी दसऱ्याच्या दिवसांत गांवामध्यें पशुवध होतो म्हणून, जैन लोक गांव सोडीत नाहींत. पण हे लोक नऊ दाहा दिवस पर्यंत पालें देऊन रानांतच राहावयास जातात. इतका यांचा कडक नियम आहे.

यांच्या भोजनांत एकवाढ असते आणि भोजनास बसतांना कृष्णनामाचा गजर आरंभीं करून भोजनास बसणें, हा एक त्यांचा नियम असतो. यांचा लग्नविधि असा आहे कीं;- ज्यास लग्न करणें असेल त्यानें आपली झोळी जी मानभावीण त्यास आवडेल तिच्या झोळीवर ठेवावी. ती तिनें तशीच राहूं दिल्यास त्याचें लग्न ठरतें. न राहूं दिल्यास नाहीं. लग्न ठरल्यावर निरनिराळ्या आंथरुणावर परंतु जवळ जवळ वधुवरांनीं निजावें. मग महंता समक्ष वरानें श्रीकृष्णाचा गडबड गुंडा आला असें ह्मणावें. त्यास वधूनें खुशाल येऊंद्या असें ह्मणतांच, वरानें लोळत तिच्याकडे जावें ह्मणजे उभयतांचें लग्न झालें.

मानभाव लोक इतर धर्मांच्या लोकांस आपलीं धर्म मतें सांगत नाहींत. त्यांचीं पुराणें ह्मटलीं ह्मणजे गीता, लीलानिधि, व लीलामृतसिंधु, हीं आहेत. त्याशिवाय रुक्मिणी स्वयंवर, बाललीला, गोपी विलास आदिकरूनही लहान लहान ओंवीबद्ध ग्रंथ आहेत. यांच्या ग्रंथाची लिपी निराळ्याच संज्ञेची असते. व ते ती मानभावी दीक्षा घेणारा शिवाय इतरांस सांगत नाहींत.

मानभावांत ज्ञानोबा, निवृत्ति, सोपान, मुक्ताई, अशीं नांवें आपणांस ठेऊन कित्येकांनीं अभंगही लिहिले आहेत. व ते सर्व प्रायः डोळे, नाक, कान, दाबून जो लखलखाट दिसतो त्याच्या वर्णनपर आहेत. त्या वरून या मतांत षण्-

मुखी मुद्रेनें पाहणें याचें प्राधान्य दिसून येतें.

या मताची प्रवृत्ति शालिवाहन शके ११६५ मध्यें हेमाद्रिपंत पेंडणास चंद्रसेन राजाचा कारभारी असतां झाली असें ह्मणतात. आणि जर ही गोष्ट खरी असेल, तर आज या मतास उत्पन्न होऊन पावणेसातशें वर्षें झालीं आहेत असें म्हटलें पाहिजे. ह्मणजे हें मत ज्ञानेश्वराच्या पूर्वीं सुमारें पाउणशें वर्षें निघालें होतें असें दिसून येतें. ही माहिती आह्मांस एका वृद्ध मनुष्याकडून मिळालेली आहे ती जशाची तशीच येथें लिहून वाचकांस सादर केली आहे.

**कृष्णंभट्ट याज्ञवल्की**— हा ब्राह्मण विठोबाचा भक्त होऊन गेलेला आहे.

**कृष्णमिश्र**— हा जातीचा कान्यकुब्ज ब्राह्मण मोठा विद्वान् शके १२०० मध्यें होता. व प्रबोधचंद्रोदय ह्मणून जें संस्कृत भाषेंत नाटक आहे तें यानेंच केलेलें आहे. (बु॰ शो॰).

**कृष्णमूर्ति**— हा तैलंग जातीचा ब्राह्मण शिष्ट वारु कुळांतील होता. मद्रासेकडे कोडा तालुक्यांतील रामचंद्रपुर येथील हा राहणारा असे. तैलंगींत यक्षानंद नांवाचें नाटक आहे तें यानें रचिलें. हा शालिवाहन शकाच्या १७२५व्या वर्षी असल्याचें अनुमान आहे. (कविच॰)

**कृष्णाराम**— हा गुजराथी ब्राह्मण कधीं व कोठें झाला तें कळत नाहीं. कलिकाल वर्णन ह्मणून जी एक गुजराथींत कविता आहे ती मात्र याची आहे, इतकेंच कळतें. (काव्य॰ गु॰).

**कृष्णाराम महाराज**— अमदाबाद येथील राहणारा, हा जातीचा मेवाडा ब्राह्मण होता. शिक्षा नांवाचा ग्रंथ गुजराथींत असलेला यानें केलेला आहे. हा शके १७६९ मध्यें होता. (काव्यदो॰ गु॰).

**कृष्णालीला**— रेवाशंकर कविकृत गुजराथींत.

**कृष्णालीलामृत**— महिपति बावा ताराबादकर यानीं मराठींत केलेला ओंवीबद्ध ग्रंथ.

**कृष्णासरस्वती**— यादवेंद्र सरस्वती यांचे शिष्य, व नरसोबाच्या वाडीचे जे प्रसिद्ध नृसिंह सरस्वती त्यांचे हे गुरु होते. यांनीं शंकराचार्यांच्या उपदेश साहस्रीवर संस्कृत टीका लिहिली आहे.(सद्गुमा॰).

२– गंगाधर सरस्वतीच्या सात शिष्यांतील एक.

**कृष्णस्वामि**— अव्यय वृत्तिनामक ग्रंथाचा कर्ता. (बुल्ह॰ शोध॰)

**कृष्णाजी आपा**– हे नीलकंठ अध्या नामक एका आराध्य ब्राह्मणाचे शिष्य, व जयराम स्वामि वडगांवकर त्यांचे गुरु होते. हे कोंकणस्थ ब्राह्मण परम अंतर्निष्ठ असून यांचें उपनांव अभ्यंकर होतें. असें रामदास चरित्रांत लिहिल्या वरून समजतें. (वृद्ध०मा०).

**कृष्णाजीपंत**– समर्थ रामदास स्वामींचे मूळपुरुष. हे शालिवाहन शके ८८४ मध्यें गोदातीरीं राहावयास आले. हे मूळचे बेदर येथील राहणारे होत. समर्थांचे वडील सूर्याजी पंत ते यांच्या पासून २२ वे पुरुष होते. (राम० चरि०).

**कृष्णानदी**– हिचा उगम धोम महाबळेश्वर येथें आहे. व ही पूर्वसमुद्रास मिळाली आहे. ही नदी कोल्हापुराच्या पूर्वेस अठरा कोसांवर आहे. व ही वांई वगैरे क्षेत्रां वरून कर्नाटकांत व तैलंगणांत गेली आहे.

**कृष्णाबाई**– जयराम स्वामि वडगांवकर यांची आई.

**कृष्णाश्रय**– वल्लभाचार्यकृत संस्कृत ग्रंथ.

**केकयदेश**– पंचनद अथवा पंजाबाच्या ईशान्येकडे असणारा देश. आमच्या प्राचीन कोशांत याची राजधानी गिरिव्रज आहे; परंतु त्या ठिकाणीं (प्रा० न०) राजगृह लिहिलेलें आढळतें.

**केकावली**– मयूर कविकृत मराठी भाषेंत.

**केतुमतन**– आयल भास्करकृत तेलंगी भाषेंतील ग्रंथ.

**केदारनाथ**– हिमालयांत आहे. यास बदरीकेदार अथवा बदरीनाथ असेंही म्हणतात. हा उत्तर अक्षांश सुमारें ३१° व पूर्वरेखांश ८०° वर आहे.

**केनोपनिषत्**– याचर श्रीमच्छंकराचार्यांचें भाष्य आहे.

**केयूरबाहू**– काश्मीरचा राजा. लिंगाच्या कवीनें याचें चरित्र तेलंगी भाषेंत लि-(हिलें आहे.

**केरलदेश**– हिंदुस्थानाच्या पश्चिमेकडील घांटाजवळचा देश. हा म्हैसुराच्या पश्चिमेस आहे.

**केवलाद्वैतवादकुलिश**– कृपापात्र कविकृत वेदांत विषया वरील ग्रंथ.

**केवलकुबाजी**– साधु. (ना० भ० ग्रं०) पहा.

**केवळपुरी**– अमदाबाद येथील गोसावी. हा कवि होता. (काव्यदो० गु०).

**केवळराम**– साधु. (भ० मा० ग्रं०) पहा.

**केशवमिश्र**– तर्कपरिभाषा ग्रंथाचा कर्ता. (मि० बुल्ह० शोध०)

**केशवकवि**– गुजराथींत यानें लिहिलेलें अधिकमास वर्णन प्रसिद्ध आहे. परंतु ग्रा-

ला कधीं व कोठें राहात असे त्या विषयींचा शोध ना हीं. (काव्यदो॰गु॰).

**केशवदास–** साधु होऊन गेलेला आहे. (नाभा॰ भक्त॰)

**केशवभट्ट–** वल्लभाचार्यांचा धाकटा भाऊ.

**केशवस्वामि–** रामदास पंचायतनांतील एक प्रख्यात साधु. हा महाराष्ट्र ब्राह्मण महान् भगवद्भक्त व अंतर्निष्ठ होता. हा मोठा निस्पृह व स्पष्टवक्ता असे. काशिराज स्वामि ते याचे गुरु परम योग्य असून हाही गुरुभक्त तसाच होता. यानें केलेल्या पदां वरून जागोजाग गुरुभक्ति दिसून येते. मराठी भाषेंत एकादशी चरित्र ओंवीबद्ध आहे तें यानें रचिलें. शके १५५० मध्यें हा असल्याचें आढळतें. याच्या पदांचा मासला कळण्या करितां खालीं दोन तीन पदें दिलीं आहेत. (रामदा॰ च॰).

पद १.

सांडुन व्यसन कामाचें॥ आठवि गुरुरूप रामाचें ॥ महिमान हें हरिनामाचें मुक्त करिल तुज नेमाचें॥ ध्रु॰॥ भव हा भुजंग नाहींरे॥ व्यर्थ भुलशी काईरे॥ भाव धरीं गुरुपायींरे॥ तारिल तो अपायीं रे॥ सां॰॥१॥ मानस वाचा कायिकरे॥ निश्चय माझा ऐकरे॥ दिसनें तिनुकें मायिकरे॥ बोले केशव नाइकरे॥२॥

पद २.

सद्गुरु वचन घर केलें॥ मागिल पुढील सर्व गेलें॥ जीव तेची शिव झाले॥ तन्मय होऊनियां ठेले॥ ध्रु॰॥ फाटकें तुटकें नेसतों मी॥ मन मानेल तेथें बसतों मी॥ वेडा वेडासा दिसतों मी॥ परी ब्रह्मच गिळून बसतों मी॥ स॰॥१॥ कामक्रोध जाळियला॥ माया मोह त्यागियला॥ केशवस्वामि रंगला॥ गुरुपदासि जडियेला॥२॥

पद ३.

भव नेणों भव नेणों॥ सर्वही ब्रह्मचि जाणों॥ भ॰॥ ध्रु॰॥ वंदोनियां गुरुराया॥ केली देशोधडि हे माया॥ भ॰॥१॥ सांडोनि द्वैत पसारा सारा॥ केला ब्रह्म सनातनीं थारा॥ भ॰॥२॥ जाणीव नेणीव गेली॥ केशव स्वामीची संगत घडली॥ भव॰॥३॥

याच्या कीर्तनांत एकदां सुंठ साकर प्रसाद वांटला जावा, असें असतां बचनाग व साकर श्रोत्यांस वांटली गेली; परंतु भगवत्कृपेनें त्या पासून कोणास इजा झाली नाहीं. अशा प्रकारच्या याच्या चमत्कारिक गोष्टी पुष्कळ आहेत. परंतु त्यांत एक

खुबीदार गोष्ट आहे ती येणें प्रमाणें:-

एकदां समर्थ रामदास स्वामि, रंगनाथ स्वामि, जयराम स्वामि, आनंदमूर्ति व स्वतः हा, असें पंचायतनचें पंचायतन कृष्णेपार जाण्यास निघालें. पुढें कृष्णेच्या कांठीं सर्वजण येऊन पाहतात तों तिला पूर आलेला आहे. मग कसें करावें अशा विचारांत सर्व असतां, सगळ्यांचा संकेत ठरला कीं, आप आपल्या सिद्धि सामर्थ्यानें सर्वांनीं पलीकडे जावें. ही गोष्ट सर्वांस मान्य होऊन प्रथम समर्थांनीं मारुतीचें स्तवन केलें, त्या बरोबर मारुतीनें समर्थांस उचललें व अलग नेऊन पलीकडल्या कांठीं ठेविलें. याच क्रमानें रंगनाथ, जयराम, व आनंदमूर्ति आपआपल्या उपास्य देवतेच्या बळानें पार जाऊन, तेथून चौघेही यास लवकर ये ह्मणून हांका मारूं लागले. यानें आलोंच असें उत्तर करून सांगडवाल्यास हांक मारिली, व त्यास ह्मणाला मला पलीकडे पोहोंचीव. सांगडवाला पैसा घेईन ह्मणाला. तेव्हां हा ह्मणाला मी गरीब ब्राह्मण आहें व मजजवळ कायत्या एवढ्या दमडीच्याच कवड्या आहेत, पैसा मुळींच नाहीं. असता तर दिला असता. असें ऐकून सांगडवाल्यानें त्या दमडीच्या कवड्यांवरच यास सांगडीवर बसवून नदीपार नेऊन उतरिलें.

पलीकडे उतरतांच हा जाऊन त्या चौघांत मिळाला; परंतु सांगडीवर बसून हा आलीकडे आला हें सर्वांनीं पाहिलें होतें ह्मणून, यास त्याचें कारण पुसण्यास इतरांनीं समर्थांस संज्ञा केली. हा सांगडी वरून कां आला, त्याचें कारण समर्थांच्या ध्यानांत येऊन चुकलेंच होतें. व यानें या गोष्टी वरून आम्हांस चकविलें हेंही त्यांस समजलें होतें. तथापि सर्वांस कळलें पाहिजे कीं; यानें असें कां केलें, ह्मणून समर्थांनीं पुसलें, केशवा आलास? महाराज आलों. असें यानें उत्तर करितांच पुनः कसा आलास ह्मणून बुध्या पुसलें. तेव्हां एका दमडीवर आलों म्हणून यानें उत्तर दिलें. तें ऐकतांच याचा अभिप्राय तत्क्षणींच सर्वांच्या ध्यानांत आला. तो असा कीं;- तुमचें सामर्थ्य ह्मणजे दमडीचा माल. त्या वरून यानें आपणांस ही चांगली सूचना दिली. म्हणून सर्वांनीं त्याची वाहवा केली. व त्यास आनंदानें आलिंगन वगैरे देऊन नंतर सर्वजण जिकडे जावयाचें होतें तिकडे निघून गेले. ही गोष्ट रामदास चरित्रांत नाहीं हें जरी खरें आहे, तरी ती आमच्या गुरूनीं आम्हांस सांगितली होती आणि त्या वरून ती आह्मीं येथें लिहिली आहे.

या गोष्टींत तात्पर्य, सिद्धिसामर्थ्य केवळ तुच्छ होय. त्यावर आपण सिद्ध आहों असें साधूनें कधींही मानूं नये, व लोकांनींही समजूं नये. सिद्धाचें मुख्य लक्षण स्वात्मानुभव होय. इतक्यावर सामर्थ्य असलेंच तर त्याची योजना यःकश्चित कार्याकडे करूं नये. अस्तु याची समाधि हल्लीं कलबुर्ग्यास आहे. मात्र हा समाधिस्थ कधीं झाला तो काळ केवळ निश्चित कळत नाहीं.

**केशवाचार्य–** रामानुजाचार्य याचा बाप.

२– विष्णुस्वामीच्या गादी वरील पुरुष जो ज्ञानदेव त्याचा शिष्य. हा ज्ञानदेव निवृत्तीचा भाऊ नव्हे.

**केसरीनाथ–** हे उद्बोध नाथाचे शिष्य, व शिवदिन बापाचे गुरु होत. (ब्रह्म मा०)

**केळदी–** बेदनूर प्रांतांतील एक गांव.

**केळदीबसवप्पानाईक–** केळदी संस्थानचा राजा. हा सुमारें शालिवाहन १६०० मध्यें होता. यानें शिवतत्त्वरत्नाकर नांवाचा ग्रंथ केलेला आहे, व त्यांत अनेक कला व विद्या यांचें वर्णन आहे. हा यानें रचलेला ग्रंथ संस्कृत भाषेंत आहे (क०

**कैयट–** वाक्यपदीय ग्रंथाधारें पतंजलीच्या महाभाष्याचा टीकाकार. हा शके ७५०च्या सुमारास होता. मम्मट याचाच भाऊ होय. याच्या वेळेस काश्मीर येथें अजितापीड राजा होता. (बुल्ह० शोध०).

**कोंकणदेश–** आमच्या प्राचीन कोशांत शूर्पारक म्हणून जो देश लिहिला आहे तोच. प्राचीन नकाशांत शूर्पारक नांवाचें एक शहरही लिहिलेलें आहे. प्रभासपरगण्याच्या दक्षिणेकडील व हैव प्रांताच्या उत्तरेकडील पश्चिम समुद्र कांठींचा हा प्रदेश होय.

**कोडगू–** कुर्ग प्रांत हा केरल देशांत आहे. याचें शहर याच नांवाचें आहे.

**कोंडभट्ट–** वैयाकरण भूषण नामक संस्कृत ग्रंथाचा कर्ता. (बुल्ह० शोध०).

२– पदार्थ दीपिकानामक ग्रंथाचा कर्ता. (बुल्ह० शोध०)

**कोंडवीडु–** याचें नांव कौंडिन्यपुर. हें शहर तैलंगणांत आहे. अनंभट्टानें न्यायशास्त्राचा अभ्यास येथील विद्यालयांत केला होता.

**कोन्नुरु–** तैलंगणांत जो एलोर प्रांत व किल्ला आहे त्या जवळचा एक गांव.

**कोरमंडलकिनारा–** चोळमंडळ किनारा शब्द पहा.

**कोरल–** तेरुवेल्लुवर यानें तामिळ भाषेंत रचलेला ग्रंथ. याचें एलीस नामक साहेबानें इंग्रजींत भाषांतर केलें आहे. (कविच०).

**कोरांग**— महाकुल महानिष्ठ राजाचा धाकटा भाऊ, व दुराचरणी अनुलेचा नवरा. हा विषप्रयोग घडून तिच्याच हातून मरण पावला होता. (ग्यारे॰ इं॰ कोश.)

**कोलंबो**— सिंहलद्वीपांतील मुख्य शहर. याचे उ॰ अ॰ सु॰ ७° व पूर्वरेखांश ८०° आहेत.

**कोल्हापुर**— कुवलयपुर तेंच. हें शहर साताऱ्याच्या दक्षिणेस सुमारें तीस कोसांवर आहे. याचे उ॰ अ॰ सु॰ १७° व पूर्व रे॰ ७४° आहेत. कोलापुर हा प्रांत आहे. व हा समुद्राच्या सपाटी पासून सुमारें[१] १८०० फूट उंचीवर आहे. येथें हाल्लीं राजा आहे. व तो शिवाजी महाराजांचा वंशज आहे.

**कोल्हभट्ट**— साधु. (ना॰ भ॰ ग्रं॰) पहा.

**कोसलदेश**— गोंडवणाच्या उत्तरेकडील देश. यांतील शहर मणिपुर.

**कोंडिन्यपुर**— कोंडवीडू शहर तेंच.

**कौटिल्य**— चाणक्य म्हणून नंदराजास मारणारा ब्राह्मण होऊन गेला, त्यासच हें दुसरें नांव होतें.

**कौशांबीनगरी**— ही नगरी प्रयागाच्या पूर्वेस असून हिचे उ॰ अ॰ सु॰ २६ व पू॰ रे॰ ८१ आहेत. (प्राची॰ हिं॰ नका॰).

**कौशिकीनदी**— हिला हल्लीं कुशी नदी ह्मणतात.

**कौस्तुभ**— व्याकरण शास्त्रावरील ग्रंथ.

**क्रौंचविद**— मन्मथोपासक मताचा पुरुष. हा मूळच्या शंकराचार्यांच्या वेळेस होता. आचार्यांनीं याच्या मताचें खंडन केलेलें आहे; तें आनंदगिरीच्या शंकर विजयांतील एकतिसाव्या प्रकरणांत पहावें.

**खडकी**— औरंगाबादेचें पहिलें नांव.

**खंडप्रशास्तिवृत्ति**— विनयाग्नि कविकृत.

**खंडेराव**— गाइकवाडाच्या गादीवरील पुरुष. यानें शाके १७७८ पासून १७९१ पर्यंत पंधरा वर्षे राज्य केलें.

**खंडेराव होळकर**— मल्हाररावाचा मुलगा. व अहल्या बाईचा नवरा. हा बाप असतांच मरण पावला. मालीराव तो याचा मुलगा होता.

**खंबायत**— गुजराथेंतील एक परगणा.

**खरकशिंग**— रणजीतशिंग लाहोरचा राजा त्याचा पुत्र. हा आपल्या मृत्यूनेंच मरण (पावला.

---

[१] कोलापुराचें सविस्तर वर्णन रा॰ रा॰ बाळाजी प्रभाकर मोडक यांनीं फारच नामी लिहिलें आहे त्यांत या प्रांता विषयीं व शहरा विषयीं उत्तम माहिती दिली आहे यास्तव वाचकांनीं तो इतिहास पहावा.

**खरड्याची लढाई**.— देशावर खरडें हा एक गांव आहे. व तो हल्लीं जामखेड तालुक्यांत आहे. येथें एक गढी आहे. निजाम अल्ली व पेशवे यांमध्यें येथें एक मोठी लढाई सवाई माधवरावाच्या कारकिर्दींत शके १७१७ त झाली होती. तींत निजामाचा पराभव झाला, व तेव्हां पासून तो पेशव्यांस चौदा लक्ष रुपये प्रतिवर्षीं खंडणी देऊं लागला.

**खशदेश**— उत्तरेस. याचें मुख्य शहर यार्केड. ८कांहीं हिसारा शहर आहे.

**खांडववन**— कुरुक्षेत्रालगत हस्तिनापुराच्या पश्चिमेस असणारें वन. यांत हषद्वतीच्या·

**खानखान**— अकबर बादशाहा जवळ जे राज्यकारभार चालविणारे चार प्रधान होते त्यांतील एक. हा यवन होता तरी संस्कृत पढला असल्या मुळें विद्वान् व कवि होता. एकदां हा एका पंडितास भेटायास गेला असतां, त्यानें यास "म्लेच्छक्षयोस्तु" असा कर्णकठोर आशीर्वाद दिला. तेव्हां यानें "म्लेच्छक्षय इत्यत्र पंचमी तत्पुरुष एवास्तु." असें म्हटलें. म्हणजे पंडितानें 'म्लेच्छांचा क्षय असो' असें म्हटलें असतां, यानें 'म्लेच्छा पासून क्षय असो.' या प्रमाणें उत्तर दिलें. त्या वरून त्याचें याचें सख्य झालें.

पुढें यानें एक समस्या, पंडितानें पूर्ण करावी म्हणून अर्धा श्लोक येणें प्रमाणें म्हटला. " सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात्." यावर पंडितानें असें उत्तर केलें;-" चलित श्चकित श्छन्नः प्रयाणे तव भूपते."- याचा अर्थ.- हे सचिव, तुझ्या राजाची स्वारी निघाली म्हणजे 'सहस्रशीर्षा' जो शेष तो चलित म्हणजे कंपित होतो. 'सहस्राक्ष' म्हणजे इंद्र चकित होतो, आणि 'सहस्रपात्' म्हणजे सूर्य धुळीनें आच्छादित होतो. असें हें पंडितानें दिलेलें उत्तर ऐकून खानखान हा फार संतुष्ट झाला, व त्यास पुष्कळ द्रव्य देऊन निघून गेला.

कविचरित्रांत ही खानखानाची भेट इलेश्वरोपाध्यायांशीं झाल्याचें लिहिलें आहे. परंतु उपाध्यायांस व खानखानांस अंतर सुमारें सातशें वर्षांचें असल्यामुळें ही गोष्ट दुसऱ्या कोणी पंडिताची असणें अवश्य आहे.

**गंगकवि**— अकबर बादशाहा जवळचा नामांकित भाट व कवि. पूर्वीं राजे लोकांजवळ बंदीजन असत, त्यांचें काम राजाची स्वारी वगैरे निघाली असतां त्यांनीं त्याची स्तुति करावी. त्याच कामावरील गंगभाट होता. अकबरा पर्यंत हिंदुराजांचे रिवाज सर्व अमलांत असत, म्हणून गंगभाटाची नेमणूक व त्याचें त्याकडे काम पिढीजाद चालत आलेलें कायम होतें.

एकदां अशी गोष्ट झाली कीं,- बादशाहा रात्रीं आपल्या महालांत असतां राणीते-थें आली. त्या वेळेस तिच्या वेणीची एक बट तिच्या स्तनावर पडली होती. ती काळी भोर बट गोर वर्ण स्तनावर लोंबत असलेली पाहून, व त्या योगानें राणीचें स्वरूप अत्यंत खुललेलें अवलोकन करून, बादशाहास पराकाष्ठेचा आनंद झाला. तो इतका कीं, त्या आनंदभरांत त्याच्या तोंडा वाटे-"शंभुके पूजन नागन आयी" ह्मणजे शिवलिंग स्थानापन्न जो स्तन त्याची पूजा करण्या करितां नागीणस्थानापन्न केंसांची काळी भोर बट आली काय ? अशीं अक्षरें निघालीं.

दुसरे दिवशीं बादशाहा दरबारांत येतांच, त्यानें रात्रीस ह्मटलेलें वाक्य सहज ह्मटल्या सारखें ह्मणून बिरबलाकडे पाहिलें. बिरबलानें गंगभाट समोर उभा होता त्याकडे पाहून उत्तर देण्यास सुचविलें. तेव्हां त्यानें हें पुढील कवीत ह्मटलें:-

> श्रीपतके मनरंजन कारन राधिकनें शृंगार बनायो ॥ हेमर भूखन अंबर कानन कंठ विरेखं मुक्ताफल छायो॥ शीस छुटी लट आनपरीभरु वांही लगी कुचसों लपटायी॥ कहे नर गंग सुन शाह अकब्बर शंभुके पूजन नागन आयी॥१॥

कृष्णाचें मन संतुष्ट करण्या करितां राधेनें शृंगार केला. तो असा कीं, कान, गळा इत्यादिकांत सोनें व मोत्यें यांचे अलंकार घालून ती उत्तम वस्त्र नेसलेली, त्या वेळीं मस्तका वरील वेणीची लड खालीं सुटलेली होती. व तिनें स्तनांस लपेटिलें होतें. तीच नागीण शिवपूजेस आली. या प्रमाणें यानें राधेच्या वर्णनानें बादशाहास उत्तर दिलें असतां, त्यास तें विपरीत वाटलें, व लागलीच त्यानें यास किल्ल्यावर टाकण्यास हुकूम दिला.

आपण उत्तर दिलें यांत बादशाहास राग यावा असें कांहींच नसतां, त्याची मर्जी खफा झाली असें पाहून, गंगभाटास आश्चर्य वाटलें. व या प्रसंगीं त्यानें मला बंदिशाळेंत टाकण्याचा हुकूम दिला हाही अविचार केला, ह्मणून यानें दुसरें कवीत ह्मटलें तें असें:-

> जहां गंग तरंग प्रवाह चले तहां कूपकों नीर पियो न पियो॥ ज्याके हरदें भगवान बसे तहा औरकों नाम लियो न लियो॥ कर्म सुजोग सुपात्र मिले कुपात्रकूं दान दियो न दियो॥ कहे नर गंग सुनशाह अकब्बर गवांरसे स्नेह कियो न कियो॥२॥

भावार्थ– जेथें गंगेचा प्रवाह भरपूर वाहात चालला आहे, तेथें आडाचें पाणी पिऊन न पिऊन व्यर्थ; ज्याच्या अंतःकरणांत भगवान् प्रगट आहे त्यानें इतरांचें नांव घेऊन न घेऊन व्यर्थ; दान देण्यास सुपात्र मिळाल्यावर तें कुपात्रास देऊन न देऊन व्यर्थ; आणि याच प्रमाणें मूरवांशीं केलेला स्नेहही करून न करून व्यर्थ. इतकें बोलून बादशाहाचा व सर्व दरबारचा निरोप घेतांना यानें या प्रमाणें म्हटलें, व सर्वांस राम राम करून तेथून बादशाहाच्या हुकुमा प्रमाणें किल्यावर गेला.

कभी न गांडू रण चढे कभी न बाजे चंग॥ सकल सभाकों राम राम बिदा होत कवि गंग॥१॥

या गोष्टी वरून हा मोठा स्पष्टवक्ता होता असें दिसून येतें. पुढें असें झाल्यें आहे कीं, कांहीं एका प्रसंगानें याचा पुत्र संमन भाट त्यानें बादशाहाची मर्जी संतुष्ट केली. त्या वरून बादशाहानें यास बंदमुक्त केलें. (दृष्टमा॰).

**गंगाकीर्ति–** कोलापूर येथील राहणारा हा महालक्ष्मीचा उपासक होता. पहिल्या शंकराचार्यांची व याची भेट होऊन त्यांनीं याचें मत खंडित केलें. (आ॰शं॰प्र॰२०) प॰

**गंगाग्वालभक्त–** (ना॰भ॰ग्रं॰) पहा.

**गंगादेवी–** हिला गंगांबा असेंही ह्मणत. विज्जलराजाचा प्रधान जो बलदेव त्याची ही मुलगी. आणि लिंगाईत धर्माचा स्थापक जो बसव त्याची बायको.

**गंगाद्वार–** हिमालयांत आहे. गोदावरीच्या उगमस्थळासही म्हणतात. परंतु मुख्य भागीरथीच्या उगमस्थळास हें खरें नांव आहे.

**गंगाधरकवि–** हा मूळ ओरिसा प्रांतांतील राहणारा होय; परंतु लहानपणींच यानें तैलंगणांत जाऊन तेथील एका नामांकित घरगुती शाळेंत तेलंगी भाषेचा अभ्यास केला. हा चांगला नीतिमान् व धार्मिक असे. बालनराय नांवाच्या एका लिंगाईत धर्मी राजानें यास आपल्या पदरीं आश्रय दिला होता ह्मणून यानें रचलेल्या काव्यांतून लिंगाइतांच्या गोष्टी फार आलेल्या आढळतात. हा मरण पावला त्या वेळेस राजास व त्याच्या प्रजेस त्याच्या विषयीं अतिशय दुःख झालें असें सांगतात. याचा काळ समजला नाहीं. (कविच॰)

**गंगाधरपंडित–** जंबूसर येथील राहणारा हा पंडित जातीचा ब्राह्मण होता. भास्कराचार्यकृत लीलावती ग्रंथावर यानें अमृतसागरा नांवाची टीका लिहिली आहे.

**गंगाधरपंत–** समर्थ रामदास स्वामींचे हे वडील बंधु, व सूर्याजीपंताचे ज्येष्ठ पुत्र होत. यांचें जन्म शके १५२७ मध्यें विश्वावसुनामक संवत्सरीं मार्गशीर्ष वद्य १२ चे

दिवशीं आंब या गांवीं झालें होतें. हे मोठे रामोपासक व गृहस्थ धर्मानें वागणारे असत. हे अद्वैत ज्ञानांत पुरे होते. कित्येकांच्या मतें रामदास स्वामींचे ज्ञानगुरु हेच होते; कारण समर्थांनीं लिहिलेल्या सद्गुरूच्या आरतीतील शेवटल्या कडव्यांत "सद्गुरुप्रसादें सुगम उपाव ॥ रामीं रामदासा फळला सद्भाव ॥" या प्रमाणें ह्मटलें आहे, यावरून सुगमोपाय ग्रंथा विषयींचा सद्भाव ग्रंथकर्त्यासच फलद्रूप झाला असें ग्रंथकर्त्याचे ह्मणेलसें संभवत नाहीं. जो ग्रंथ जो कोणी करतो तो आपल्यासच फलद्रूप व्हावा ह्मणून करीत नाहीं, इतरां करितां करितो यास्तव हीआरती समर्थांनींच केलेली खास असून गंगाधरपंत हेच त्यांचे ज्ञानगुरु असेंच दिसून येतें.

यांनीं रचलेलेल्या सुगमोपाय ग्रंथांतील वेंचे खालीं दिले आहेत ते वाचकांनीं पहावे, व यांच्या वाणीची प्रौढी त्यांवरून ध्यानांत आणावी.

> सांख्य वैष्णव पूर्व मीमांसक ॥ शैव पाशुपत संन्यासी स्नातक ॥ जंगम गाणेश बौद्ध चार्वाक ॥ शाक्त कौलादि सर्वही ॥९९॥ मत्त मातंग पाखंड खंडन ॥ शांकर दिग्विजयी पंचानन ॥ तेणें वज्रसूचि वज्रनखीं विदारून ॥ दाकिलीं चंड बंड गंडें ॥ १०० ॥ असोत ते संत वेषी असंत जाण जेंसे गुळगुळे गुळपाषाण ॥ अथवा बहुरूपींचे जे ब्राह्मण ॥ काय पूजूं येतील. ॥ १०१ ॥ जयाशीं दिग्भ्रम निश्चयाचा हट ॥ बळेंची चालिला चुकोनी वाट ॥ तयाचा संग धरितां शेवट ॥ विश्रांति कीं अपभ्रंश? ॥ १०२ ॥ ह्मणोन इहीं लक्षणीं विनिर्मुक्त ॥ महानुभावी नित्य मुक्त सल्लक्षणीं परम संयुक्त ॥ त्याच्यासंगें मनोजय ॥ १०३ ॥ (प्र० ३ )

यांची समाधि शके १५९९ पिंगलनामक संवत्सरीं फालगुन वद्य १३चे दिवशीं मौजे दहींफळ परगणें शिवळी येथें झाली. यांच्या मागें यांस दोन पुत्र होते. त्यांत एकाचें नांव रामचंद्र व दुसऱ्याचें श्यामजी होतें. यांफळ येथें जें संस्थान आहे त्याचा अधिकार यां पासून सात पिढ्या पर्यंत यांजकडेसच होता. हाल्लीं मात्र दत्तक सुरू झाला आहे.

यांच्या चमत्काराच्या गोष्टीही रामदास चरित्रांत कांहीं काहीं लिहिल्या असून एकनाथ स्वामींनीं यांस व समर्थांस अगदीं लहान असतां पाहिलें होतें. शिवाजी राजानेंही यांचें दर्शन एकवार येऊन घेतलें होतें. यांस समर्थ श्रेष्ठ अशा नांवानें नेहेमीं बोलत, ह्मणून सर्व मंडळी तेंच नांव घेऊन परस्परांशीं संभाषणें

करीत. (रामदा० चरित्र). २– श्रीमत्परमहंस नारायणतीर्थ ऊर्फ हंसराज स्वामि त्यांच्या वडिलांचें नांव.

**गंगाधरभट्ट–** प्रसिद्ध वल्लभाचार्य त्यांचा हा पणजा. गणेशभट्टाचा बाप. व नाराय-(णभट्टाचा पुत्र.

**गंगाधर यशवंत–** याचें उपनांव चंद्रचूड. हा अहल्या बाईच्या वेळेस तिचा दिवाणहोता. हा दावडी लिंबगांवचा राहणारा होय.

**गंगाधर शास्त्री–** हा विद्वान् ब्राह्मण गाइकवाडांकडून पेशव्यांकडे वकिलीच्या नात्यानें आला होता. याचें उपनांव पटवर्धन होतें. व हा सभ्य मनुष्य होता. हा पुण्यास आल्यावर धाकट्या बाजीरावानें याशीं लटक्याच गोड गोड गोष्टी बोलून, युक्तीनेंच यास पंढरपुरास नेलें. व तेथें शके १७३७ युवा नामक संवत्सरीं मारेकऱ्यांकडून ठार मारविलें. (हिंदु० हस्त० इति०)

**गंगाधरसरस्वती–** नरसोबाच्या वाडीकडे व गाणगापुराकडे प्रसिद्ध होऊन गेलेले नृसिंह सरस्वती, ज्यांस लोक दत्तात्रेयाचा साक्षात् अवतारच समजतात त्यांचा हा शिष्य. गुरुचरित्र म्हणून जो ओंवीबद्ध ग्रंथ मराठी भाषेंत आहे तो यानें केलेला आहे. हा संस्कृतांतही चांगला असे, व यास सात शिष्य होते. त्यांचीं नांवें येणें प्रमाणें:– पहिला बालसरस्वती. २ कृष्णसरस्वती. ३ उपेंद्र सरस्वती. ४ माधवसरस्वती. ५ सदानंद सरस्वती. ६ ज्ञानज्योती सरस्वती. ७ सिद्धेंद्र सरस्वती. (गुरुमा०)

**गंगानाथ–** गौतमन्याय पढलेला व त्या मताचा मोठा आग्रही पंडित. पहिल्या शंकराचार्यांच्या वेळेस हा होता. आचार्यांचा व याचा वाद होऊन त्यांत त्यांनीं यास जिंकलें होतें. याच्या मतांत परमाणु हा नित्य मानला आहे. परंतु आचार्यांनीं परमाणूस उत्पत्ति असल्याचें सिद्ध करून –" यज्जन्यं तदनित्यं " म्हणजे उत्पत्ति होण्यास जें योग्य तें अनित्य नाशवंत होय असें यास सांगून–"अधीत्य गौतमीं विद्यां शार्गालीं योनिमाविशेत्॥" म्हणजे गौतमकृत जी विद्या ती पढून जो कोणी वृथा वाद करील तो कोल्ह्याच्या योनींत प्रवेश करील. असें म्हटलें. त्यावरून यानें त्या मताचा दुराग्रह सोडिला. (आनं० शंक० प्रक० ४१).

**गंगांबा–** बसवाची बायको. गंगादेवी हें तिलाच दुसरें नांव होतें.

**गंगाबाई–** नारायणराव पेशव्याची बायको. नारायणरावास मारेकऱ्यांकडून आनंदीबाईनें ठार मारविलें, त्या वेळेस ही गरोदर होती. म्हणून कारभारी मंडळींनीं हिला, राघोबा दादाची मुलगी दुर्गाबाई तिला बरोबर देऊन पुरंदरावर ठेविलें. पुढें ती प्रसूत झाली. तीच तिला पुत्र झालेला सवाई माधवराव होता.

गंगाबाईस झालेल्या मुलाचा, राघोबास संशय येऊं नये हेंच दुर्गाबाईला बरोबर देण्याचें कारण होय.

**गंगालहरी**— जगन्नाथराय पंडित कृत संस्कृत भाषेनें गंगेची स्तुति. या स्तोत्राचे श्लोक ५२ आहेत. ही स्तुति केव्हां व काय कारणानें झाली त्या विषयीं जगन्नाथराय शब्द पहा. यावर वामन पंडितानें मराठी मध्यें समश्लोकी टीका केलेली आहे.

**गंगाष्टक**— संस्कृतांत श्लोक बद्ध श्रीमच्छंकराचार्य कृत. (३ॅ० व ध्रू० ने० ७१ आ०

**गंगोत्री**— गंगाद्वार तेंच. हें हिमालयावर कुरुजांगल देशांत आहे. याचे उ० अ० सु०

**गजपतिप्रतापरुद्र**— कलिंग देशाचा हा राजा शालिवाहनाच्या १५व्या शतकांत होता. कदंब नांवाचा एक नामांकित कवि याचा दिवाण असे. हा राजा संस्कृतांत मोठा निपुण होता. यानें आपल्या राज्यांत न्याय करण्या विषयीं मोठी सुधारणा केली होती. व त्या विषयावर सरस्वती विलास नांवाचें संस्कृतांत एक कायद्याचें पुस्तक रचिलें होतें. कामशास्त्र विषयावरही याचा एक ग्रंथ आहे.(क०)

**गजेंद्रगड**— पश्चिम घांटावरील घोरपड्यांचा गांव. हा कोलापुराच्या दक्षिणेस सुमारें वीस कोसांवर आहे.

**गजेंद्रविजयचंपु**— साकल्यमाला नामक कवीनें गजेंद्र मोक्षावर रचलेला संस्कृत चंपु. (हे. (प्रा० हिं० नका०)

**गंडकदेश**— गंडकी नदीच्या तीरचा प्रदेश. हा नेपाळ व मलयभूमि यांच्या मधें आ-

**गंडकीनदी**— हिचा उगम हिमालयांतून आहे. हिला शालिग्रामी नदी असेंही नांव आहे. कारण शालिग्रामशिला हिजमध्यें उत्पन्न होतात. (प्रा० हिं० नका०)

**गंडीकोटा**— निज़ाम सरकारच्या राज्यांतील एक गांव.

**गडेमंडळ**— गुजराथेंत एक परगणा आहे.

**गढडा**— काठेवाडांतील एक गांव.

**गणकुमार**— सहा प्रकारच्या गाणपत्यांतील हरिद्रागणपतिमताचा पुरुष. हा पहिल्या शंकराचार्यांच्या वेळेस होता. (आ० शं० प्र० १६) पहा.

**गणपतराव**— गाइकवाडाच्या गादीवरील पुरुष. यानें शके १७७१ तागाईत १७७८पावेतों सात वर्षें राज्याधिकार केला.

**गणपतराव मेहेंदळे**— पेशव्यांचा एक नामांकित ब्राह्मण सरदार. हा पानपतच्या लढाईंत शके १६८२ मध्यें मेला. याचे वंशज हालीं पुण्यांत आहेत.(द० पु०

**गणपतिबावा**— रत्नागिरी कडील शिरगांवचे राहणार. म्हसकर उपनावाचे सि-

**गणपतिवर्णन**– अमृतराय कृत मराठींत कटाव.

**गणपुर**– एक क्षेत्र. हाहीं कोठें आहे तें समजत नाहीं. गाणगापुर असेल तर नकळे. येथें पहिल्या शंकराचार्यांचें गमन व तेथील गाणपत्यानें त्यांनीं केले-लें खंडन. (आ० शं० प्र० १४) पहा.

**गणासबंधर**– हा कवि जातीचा द्रविड ब्राह्मण होता. चिदंबरा जवळ शाली नाम-क गांवीं याचें जन्म झालें होतें. हा लहानपणींच विद्या शिकून मोठा विद्वान् झाला होता. यानें जैन लोकांशीं जे वाद केले ते सर्व तेवरम नामक ग्रंथ रचू-न त्यांत लिहून ठेविले आहेत. हा कधीं होता त्या विषयीं शोध लागत नाहीं. (कविच०).

**गणिकानंद**– हा मोठा गणिती होता. शालिवाहनाच्या १४व्या शतकांत याचें जन्म-झाहलें होतें. संस्कृत भाषा यास चांगली येत होती म्हणून याणें गणित विष-यावर एक ग्रंथ लिहून त्यास आपलें नांव दिलें. याच्या ग्रंथाची प्रसिद्धि लोकां त हळु हळू झाली असें सांगतात. (कविच०)

**गणिताध्याय**– भास्कराचार्यांनीं केलेला जो सिध्दांतशिरोमणी ग्रंथ त्यांतील तिसरा अध्याय तो. यांत ग्रहगणिताचा विचार सांगितला आहे.

**गणेशदेरा**– (ना० भ० ग्रं० पहा). हा एक भगवद्भक्त होऊन गेलेला आहे.

**गणेशदैवज्ञ**– भास्कराचार्यांच्या मागून झालेला ज्योतिषी ब्राह्मण. हा शके १४५० मध्यें होता. पंचांगें करण्यास उपयोगीं असा जो लघुचिंतामणि नांवा-चा ग्रंथ तो यानें केला. शिवाय पंचांगगणितोपयोगी सारणीकोष्टक तेही याचेंच आहेत. या सारणींस चालन नसल्या मुळें त्या वरून वर्तविलेल्या गणितांत हा-हीं बराच फेर पडत आहे. (सद्गुमा०).

**गणेशनाथ**– घाटावर सारसें उज्जनी म्हणून गांव आहे तेथें हा राहात असे. हा जातीचा कानफाट्या गोसावी भगवद्भक्त, विरक्त, व कवि होता. शिवाजी राजानें एकदां यास निजण्या करितां मऊ गादी करून दिली असतां, तिजवर यानें बराच्या एवढाले दगड पसरले. व नंतर त्यावर निद्रा केली. दुसऱ्या दिवशीं शिवाजीनें येऊ-न पाहिलें तों गादीवर दगड आंथरले आहेत. त्यांचें कारण त्यानें यास पुसतां यानें गाढ झोंप न येण्या साठीं असें केलें म्हणून उत्तर दिलें. त्या वरून शिवाजीस याच्या वैराग्याचें आश्चर्य वाटून तो कांहीं न बोलतां परत गेला. (भक्तवि० अ० ५५) पहा.

**गणेशभट्ट**– गंगाधर भट्टाचा मुलगा, वत्सर भट्टाचा बाप, व प्रसिद्ध वल्ल० चा० पणजा.

**गणेशमानसपूजा**— श्रीमच्छंकराचार्यकृत संस्कृत भाषेंत गणतीची मानस पूजा.

**गदा**— बाळंभट्ट पायगुंडे यांनीं परिभाषेंदु शेखरावर लिहिलेली संस्कृत व्याख्या.

**गदाधरदास**— भगवद्भक्त व साधु.(ना. भ. ग्रं.)पहा.

**गदाधरभट्ट**— एक सत्पुरुष. (ना. भ. ग्रं. पहा).

**गदाधरी**— न्यायशास्त्र विषयक गदाधर पंडित कृत ग्रंथ.

**गंधर्वपुर**— गाणगापुर हल्लीं ह्मणतात. जनार्दन स्वामींनीं जी आरती त्यांचे गुरु नृसिंह सरस्वती यांच्यावर लिहिली आहे तींत हा उल्लेख आहे.

**गमसार**— ओरिसा प्रांतांत हें एक संस्थान आहे. येथील राजा उपेंद्रभान यानें मूळ ओरिसा भाषेंत कविता करण्यास आरंभ करून ती चाल प्रचारांत आणिली. ही चाल शालिवाहनाच्या पंधराव्या शतकांत चालू झाली असा सुमार आढळतो. (बु० शो०)

**गया**— हें क्षेत्र मगध देशांत आहे. हें राजगृहाच्या नैर्ऋत्येस व पाटलीपुत्र नगराचे दक्षिणेस आहे. याचे उत्तर अक्षांश सुमारें २५ व पूर्व रेखांश ८५ आहेत.

**गरिकपाद**— तर्कसंग्रह ग्रंथाचा कर्ता जो अनंभट्ट त्याची हा गांव जन्मभूमि होय.

**गरुडपंचाशती**— संस्कृतांतील वेदांताचार्यकृत ग्रंथ.

**गर्ग**— बौध्दधर्मी एक राजा. —२एक ज्योतिषि ब्राह्मण सुमारें २५०० वर्षां मागें होऊन गेला; परंतु हा कृष्णाचा कुलोपाध्याय असें पश्चिमेकडील लोक ह्मणतात, तें सर्वथैव खोटें होय. — ३ मंत्राच्या ग्रंथाची परीक्षा करण्यास जे काश्मीर येथें ३०पंडित जमले होते त्यांतील एक.

**गर्गश्रीकांतमिश्र**— साकारसिद्धिनामक ग्रंथाचा कर्ता. हा विष्णुस्वामीचा शिष्य होता. (बुल्ह० शोध०).

**गळतारखेडें**— द्रविड देशांतील गांव. येथें रामानुजाचार्यांचा मठ आहे.

**गाजीउद्दीन**— निजाम उलमुलखाचा वडील मुलगा. हा दिल्लीस कांहीं अधिकारावर होता,ह्मणून निजाम मरतांच नाशिरजंग याचा धाकटा भाऊ गादीवर बसला. पुढें दिल्लीहून गाजीउद्दीन हैदराबादेस येत असतां निजाम अल्लीची आई म्हणजे याची सावत्र आई औरंगाबादेस होती तिनें यास मेजवानीस बोलावून व अन्नांत विष घालून ठार मारिलें. (हिंदु० ह्रा० इति०).

**गाजीपुर**— मत्स्यदेशाची राजधानी जें मत्स्यपुर त्याचें हल्लींचें नांव. हें प्रयागाच्या ईशान्येस व पाटलीपुत्र नगराच्या वायव्येस आहे. याचे उ० अ० सु० २६ व पू० रे० ८४ आहेत.— २ कलिंग देशांतील एक शहर याचे उ० अ० १८ व पू० रे० ८४ आहेत.

**गाणगापुर–** कृष्णा नदीचे कांठचें क्षेत्र.

**गांधारदेश–** कंधारदेश हल्लीं ह्मणतात. याची राजधानी तक्षशिला.

**गायकवाडाचेंघराणें–** या घराण्याचा मूळपुरुष दमाजी गायकवाड हा होय. खंडेराव दाभाडे सेनापति त्याचा हा सरदार होता. हा मरण पावल्यावर याच्या मागें याचा जनकोजी ह्मणून भाऊ होता, त्याचा मुलगा पिलाजी तो अधिकार करूं लागला. परंतु तो दुर्मरणानें लवकर मेल्या मुळें त्याचा थोरला मुलगा दमाजी तो अधिकारी झाला. याला सयाजी, गोविंदराव, माणकोजी आणि फत्तेशिंग असे चार पुत्र होते. पुढें हा दुसरा दमाजी मेल्यावर सयाजी हा राज्याधिकारी झाला. हा वेडसर होता व त्या मुळें याचा अगदीं धाकटा भाऊ फत्तेशिंग हा कारभार पहात असे. पुढें फत्तेशिंग माडी वरून पडून मरण पावल्या मुळें सयाजीच्या मागें त्याचा सावत्र भाऊ गोविंदराव तो अधिकारी झाला. कारण माणकोजी हाही मेला होता. या गोविंदरावास आनंदराव, फत्तेशिंग व सयाजी असे तिघे औरस पुत्र असून, कान्होजी वगैरे दासीपुत्र होते. गोविंदरावाच्या मागें त्याचा थोरला मुलगा आनंदराव तो गादीवर बसला, व त्याचा भाऊ फत्तेशिंग तो कारभार पाहूं लागला. गंगाधरशास्त्री पटवर्धन तो या आनंदरावाच्याच कारकीर्दींत पेशव्यांकडे आला होता. कांहीं दिवसांनीं आनंदराव व फत्तेशिंग दोघेही मरण पावले, व सयाजी गादीचा अधिकारी झाला. सयाजीनें बरींच वर्षें गादीचा उपभोग घेतला. यास गणपतराव, खंडेराव, आणि मल्हारराव असे तीन मुलगे होते. सयाजी निवर्तल्यावर त्याचा वडील मुलगा गणपतराव तो गादीवर बसला. त्याच्या मागें खंडेरावास गादी मिळाली. आणि खंडेरावाच्या मागें मल्हारराव अधिकारी झाला. त्या मल्हाररावास स्वतःचें शाहाणपण तर मुळींच नव्हतें. तशांत परस्त्रीचा नाद फार असून लबाड लोकांची संगत होती. त्या मुळें त्यावर इंग्लिशांच्या रेसिडेंटास विषप्रयोग केल्याचा आरोप येऊन, तो पदच्युत झाला. हल्लीं खंडेरावाची बायको जमना बाई हिच्या मांडीवर इंग्लिशांनीं दत्तक मुलगा देऊन त्याचें नांव सयाजी ठेविलें आहे. व सर. टी. माधवराव यांस मुख्य दिवाण नेमून त्यांजकडून राज्यव्यवस्थेचा बंदोबस्त चालविला आहे. या प्रमाणें ही हकीगत शके १६३२ पासून १८०१ पावेतों या घराण्याची आहे. (हिंदु० छापी० इति०)

**गिझनी–** शहर. याचे उत्तर अक्षांश ३५ व पूर्वरेखांश ६९ आहेत.

**गिरनारपर्वत–** काठेवाडांत जो जुनागड आहे त्याचें एक शिखर. यावर पहिल्या बु-

ह्याची समाधि आहे.

**गिरिजाकुमार—** गिरिजापुत्र शब्द पहा.

**गिरिजापुत्र—** साहा प्रकारच्या गाणपत्यांतील महागणपति मताचा उपासक. हा पहिल्या शंकराचार्यांच्या वेळेस होता. हा आचार्यांचा शिष्य झाला. (आनं० शं० प्रक० १५) पहा. गणपति पंचायतन पूजा व तत्संबंधी मार्ग पुढें आचार्यांनीं याजकडून स्थापित करविला. (आनं० शंक० प्रक० ७१) पहा.

**गिरिजाबाई—** एकनाथ स्वामींची स्त्री. ही महापतिव्रता होती.

**गिरिधर—** प्रसिद्ध वल्लभाचार्यांचा नातु व विठ्ठलनाथाचा मुलगा. संप्रदायप्रदीप नांवाचा ग्रंथ यानें केला. (कविच०)

२— गुजराथी कवि; कोठें व कधीं झाला व जातीचा कोण होता तें कळत नाहीं. माम महाकाली चरित्र ग्रंथ याचा आहे इतकाच शोध लागतो. (काव्य० गु०)

**गिरिधरग्वाल—** नाभाजीच्या भक्तमाल ग्रंथांत असलेला साधु.

**गिरिधरलाल—** हा जातीचा गुजराथी नागर ब्राह्मण होता. याचें जन्म शके १६०० मधलें होतें. हा मोठा कृष्णभक्त होता, व राधेच्या वेषानें कृष्णमूर्तिपुढें नृत्यकीर्तन असे. हा जातीनें कवि असल्या मुळें, याची कबीन कुंडरिया इत्यादि रूपानें पुष्कळ कविता प्रसिध्द आहे. एकदां याचा नृत्य करण्याचा साज कोणी धट्टेखोर लोकांनीं लपविला असतां, यास कसें करावें अशी चिंता उत्पन्न झाली. तेव्हां असें सांगतात कीं;- एका एकीं सर्व लोकां समक्ष याच्या पुढें भरजरी साज येऊन उतरला, व तो यानें अंगावर घालून देवा पुढें नृत्य केलें. तेव्हां पासून याची कीर्ति वाढली. (कविच०)

**गिरिव्रज—** आमच्या प्राचीन कोशांत हें शहर मगध देशाची राजधानी म्हटली आहे; परंतु त्याच्या किंचित् वायव्येस हल्लीं राजगृह शहर आढळतें. (प्राची० हिंदु० नका०) या शहराचे उत्तर अक्षांश सुमारें २५ व पूर्व रेखांश ८५ आहेत. पाटली पुत्र (पाटणा) याच्या दक्षिणेस हें शहर आहे.

२— केकय देशाची राजधानी. (प्राचीन को० पहा). मगध देशांतील या शहरानें नांव जसें प्राचीन नकाशांत दाखविलें आहे, तसें याचें येथें दाखविलें नाहीं. राजगृह इतकेंच लिहिलें आहे. त्या वरून कांहीं काळा पूर्वी यास राजगृह नांव चालत होतें असें स्पष्ट दिसून येतें. या शहराचे उ० अ० सु० ३३ व पू० रे० ७५ आहेत.

**गिरीशनाटक—** इलेश्वरोपाध्यायकृत संस्कृत नाटक. यांत त्यांनीं श्रीशैलमल्लिका-

र्जुन याचा विवाह वर्णिला आहे.

**गीतगोविंद**— जयदेव स्वामींनीं रचलेला अष्टपद्यारूप ग्रंथ. हा ग्रंथ विक्रमादित्याच्या सभेंत गात असत. यावर कमलाकराची टीका आहे. (बुल्ह० शोध.)

**गीताभाष्य**— भारता मध्यें भीष्मपर्वी जी श्रीकृष्णार्जुन संवादरूप गीता आहे. तिजवर शुध्दाद्वैत वेदांतपर श्रीमच्छंकराचार्यांनीं केलेलें भाष्य. हें भाष्य मूळअसून यांतीलच भाष्याचीं वचनें घेऊन विशिष्टाद्वैत वेदांतपर दुसरें भाष्य रामानुजाचार्यांनीं लिहिलें आहे. (तील एक.

**गीताभिधानकोश**— रामसार येथील राजा उपेंद्रभान यानें रचलेल्या दोन काशां-

**गीतामाहात्म्य**— दयाराम कविकृत गुजराथींत.

**गीतार्णव**— दासोपंतकृत मराठींत ओंवीबध्द भगवद्गीतेवर लिहिलेली टीका.हिची संख्या एक लक्ष आहे.,व ज्ञानेश्वरीच्या मागून ही टीका झालेली आहे. कारण दासोपंत एकनाथ स्वामींच्या वेळचे होते.

**गीतावली**— हिंदुस्थानी भाषेंत तुळशीदास कृत.

**गीर्वाणपदमंजरी**— भट्टोजी दीक्षित यांच्या वरदराज भट्ट नामक शिष्यानें रचलेला संस्कृत ग्रंथ. (आहे.

**गुजराथ देश**— सौराष्ट्र देशाचेच नांव. गायकवाडाच्या राज्याच्या नैर्ऋत्येस हा

**गुंजामाली**— एक साधु. (नाभा. भक्त. ग्रं. पहा)

**गुंडोजीबावा**— हा एक पुरुष नामांकित साधु होऊन गेलेला आहे. हा काणव होता. व यास होऊन गेल्यास पन्नास वर्षे झालीं आहेत. तुकारामाच्या अभंगां पैकीं चौदा अभंग व दर अभंगा मागून एकेक अशीं चौदा भजनें मात्र ह्मणायाचीं असा याचा संप्रदाय अजून चालू आहे.

**गुणमंगल**— क्षपणिकाच्या बापाचें नांव. (क्षपणिक) शब्द पहा.

**गुणाढ्य**— बृहत्कथा नामक ग्रंथ प्रथमतः पैशाची भाषेंत इसवी सनाच्या दुसऱ्या शतकांत यानें रचिला. पुढें त्याचें संस्कृतांत भाषांतर सोमदेवानें केलें व त्याचें नांव कथासरित्सागर ठेविलें. (बु० शो०).

**गुत्ती**— म्हैसुर प्रांतांतील गांव.

**गुप्त**— एक कवि. विशेष वृत्त आढळलें नाहीं.

**गुरुगोविंद**— नानकाच्या गादीवरील आठवा पुरुष. तेघ बाहादराचा शिष्य.याचा शिष्य वंदा गुरु. या गोविंद शिंगाची शीख लोकांत मोठी मान्यता होती.यानें

जन्म शके १५२८ मध्यें झालें होतें, व यानें धर्मपुस्तक सुधारल्यावर याचा अंतकाळ शके १५९९त झाला. याची समाधि नांदेड येथें आहे. (दृढू मा० व बुल्ह० शोध०)

**गुरुचरित्र—** हा ग्रंथ मराठी भाषेंत ओंवीबद्ध आहे. यांत नृसिंहसरस्वतीचें वर्णन केलें आहे. व तें त्यांचे शिष्य गंगाधरसरस्वती ह्यानीं लिहिलें आहे. याचे अध्याय ५२ आहेत.

**गुरुमहिमा—** प्रीतमदासकृत गुजराथी भाषेंत.

**गुर्जरदेश—** गुजराथ देश तोच. (ली.

**गुलामवंश—** शके १२२८ तागाईत १२३० पावेतों दोन वर्षें या वंशानें दिल्लीची बादशाही के-

**गूढार्थदीपिनी—** सदाशिव पंडितानें केलेला ग्रंथ. हा संस्कृत भाषेंत आहे.

**गूढार्थप्रकाशिका—** भास्कराचार्यकृत गणिताध्याय व गोलाध्याय यांवरील रंगनाथ पंडितकृत टीका.

**गैनीनाथ—** निवृत्तिनाथाचे गुरु.

**गोकर्णक्षेत्र—** पश्चिम समुद्रतीरचें क्षेत्र. याचे उत्तर अ० सु० १४॰ व पूर्व रे० ७४॰ आहेत.

**गोकुलनाथ—** प्रसिध्द वल्लभाचार्यांचा नातु व विठ्ठलनाथाचा चौथा मुलगा.

**गोग्रानदी—** विदेहदेशाचें नगर मिथिला ज्यास हाल्लीं तिरहूट ह्मणतात त्या जवळून वाहणारी जी देविका नदी तिचें सांप्रतचें नांव.

**गोंड—** गोंडवणांतील लोक.

**गोंडवण—** तापी व पयोष्णी नदी यांच्या पूर्वेकडील प्रदेश. यांतून महानदी वाहते.

**गोणाई—** प्रसिद्ध जो साधु नामदेव त्याची आई.

**गोदावरीनदी—** हिचा उगम त्र्यंबकेश्वरापासून असून ही पूर्वसमुद्रास मिळाली आहे.

**गोनर्ददेश—** गोनर्दनदीच्या तीरचा प्रदेश.

**गोनर्दनदी—**

**गोपा—** शुद्धोदन राजाचा पुत्र जो दुसरा बुद्ध त्याची बायको. ही दंडपाणी शाक्याची मुलगी होती. (ललि० वि०)

**गोपालभक्त—** साधु (नाभा० भक्त० ग्रं०) पहा. (कुलोत्पन्न होता.

**गोपालभट्ट—** भवभूति कवीचा आजा व नीलकंठाचा बाप. हा डंबरनामक ब्राह्मण

**गोपालराजा—** वीरसेन वंशीय राजा. युधिष्ठिर शकाच्या सुमारें २०९६व्या वर्षी याची राज्यकारकीर्द आरंभली. यानें राज्य ३८ वर्षें २ महिने २५ दिवस केलें. याच्या कारकीर्दीच्या सुमारें पंधराव्या वर्षी महाप्रख्यात कुमारिलभट्ट जन्मला, व त्यानें जैनमताचा समूळ धुवा उडविला. (हिंदुस्था० हस्त० इति० व जैन ग्रंथ०)

**गोपाळदास**— वल्लभमताचा एक पुरुष. यानें वल्लभाख्यान नांवाचा ग्रंथ लिहिलेला आहे. — २ हा एक गुजराथी कवि होता. यानें वेदांतपर केलेलीं पदें आहेत.(काo

**गोपाळपंत**— नाझरें येथील कुळकरणी. यादवराव, रंगनाथ, व विठ्ठलराव या तिघां भावांचा बाप. यासच पुढें सन्यास घेतल्यावर निज्ञानंद असें नांव पडलें. प्रसिद्ध जे पूर्णानंद स्वामि त्यांचा हा शिष्य. व शिवराम स्वामींचा गुरुबंधु होता. (वृ·मा·)

**गोपाळबावा**— हा एक आलीकडे भगवद्भक्त व कवि होऊन गेला. हा जातीचा देशस्थ वाजसनी ब्राह्मण टेंबू ह्मणून गांव आहे तेथील राहणारा असे. याची समाधि शके १७७५ मध्यें कऱ्हाड येथें झाली. यांनीं केलेलीं पदें कोठें कोठें आढळतात. शिवाय ओंवीबद्ध ग्रंथ वेदांत दीपिका आहे. हे भूमानंद स्वामींचे शिष्य होते. (वृद्धमा०) — २ वांईस होऊन गेलेले प्रसिद्ध साधु. हे जातीचे कोंकणस्थ ब्राह्मण असून प्रायः अजगर वृत्तीसारखे होते असें सांगतात. (वृद्धमा०).

**गोपिकाबाई**— रास्त्यांची कन्या व बाळाजी बाजीराव ऊर्फ नाना साहेब पेशवे यांची स्त्री. विश्वासराव, थोरले माधवराव, व नारायणराव यांची आई.

**गोपीचंद्रराजा**— गौडबंगाल्यांतील कांचनपुरचा राजा. हा त्रैलोक्यचंद्र राजा व विक्रमादित्याची धाकटी बहीण मैनावती त्या उभयतांचा पुत्र. याचा बाप त्रैलोक्यचंद्र मरण पावल्यावर, त्याच्या मागें हाच त्याच्या गादीवर बसला. औमानामक राजकन्या ती याची पट्टराणी होती. ही शिवाय याला १२०० लग्नाच्या स्त्रिया व १६०० उपस्त्रिया असत. गोपीचंद्र हा रूपानें इतका सुंदर व नाजूक होता ह्मणून सांगतात कीं,- याच्या आईनें एके वेळीं दाळलेल्या दुःखाश्रूंच्या थेंबानीं, याच्या अंगास स्पर्श करितांच त्यावर तरारून फोडच आले. ही गोष्ट पुढें सांगण्यांत येईल.

त्रैलोक्यचंद्र राजा मरण पावल्यावर मैनावतीनें विचार केला कीं, राज्यचालविण्याची काळजी गोपीचंद्र शाहणा असल्या मुळें आपणास नाहीं. त्याअर्थी आतां आपण आपलें पारलौकिक हित साधावें, ह्मणून प्रख्यात सिद्धपुरुष जालंदरनाथ त्यांस, तिनें शहरांत आणून त्यांचा अनुग्रह घेतला, व त्यांची सेवा करूं लागली. हा नित्याक्रम बरेच दिवस चालला असतां, तें वर्तमान औमास (गोपीचंद्राच्या पट्टराणीस) कळून, तिला त्या विषयीं विपरीत भान झालें. व तिनें तें एके वेळीं राजास कळविलें. त्यांत तिनें त्यास असें दर्शविलें कीं, हा अपशब्द लोक आपणांस देतात. त्या वरून आईस न पुसतां, संतापानें गोपीचंद्र महाला बाहेर आला. व लागलीच त्यानें फारसें कोणास कळूं न देतां, जालंदर नाथास

एका खळींत लीद भरून तींत पुरून टाकिलें.

ही गोष्ट झाली त्या वेळेस जालंदरनाथांचा शिष्य कानीफनाथ त्यांजवळ नसून तो तीर्थयात्रेस गेला होता. व मैनावतीसही हें वर्तमान मुळींच कळलें नव्हतें. ह्मणून ती नित्य क्रमाप्रमाणें गुरुदर्शनास गेली, आणि राहत्या जाग्यावर ते नाहींत असें पाहून तिनें बहुत शोक केला. शेवटीं तिनें शोक आटपून आपल्या मनाशीं इत्यर्थ ठरविला कीं, मी सेवा करण्यांत कांहीं तरी चुकल्यें असेन, आणि त्याच कारणामुळें नाथ हे माझी उपेक्षा करून गेले असतील; परंतु गोपीचंद्रा विषयीं तिच्या मनांत तिळमात्रही संशय आला नाहीं.

मैनावती प्रत्यहीं गुरुदर्शन घेऊन व त्यांचें चरणतीर्थ प्राशन करून, भोजन करीत असे. तें तिचें तीर्थ अंतरल्या दिवसापासून, तिनें अन्न वर्ज्य केलें. केवळ दूध पिऊनच तिनें प्राणांचें रक्षण चालविलें. या गोष्टीस पुष्कळ दिवस लोटले असतां, एकदां हिनें गोपीचंद्रास स्नान करितांना माडीवरून पाहिलें. त्यावरून तिला आपल्या नवऱ्याच्या सुंदर कांतीची आठवण होऊन, व तसाही पुरुष मृत्यूनें ग्रासिला ही गोष्ट मनांत येऊन, याचाही परिणाम केव्हां तरी असाच होणार, ह्मणून अनिवार रडें आलें. तेच अश्रूंचे थेंब तिनें हातानें झाडलेले याच्या अंगावर पडून फोड[1] आले. त्यावरून यानें आईस रडण्याचें कारण विचारिलें असतां तिनें मनांत आलेली खरी खरी गोष्ट यास सांगितली. ती ऐकून हा ह्मणाला, देह अमर होण्यास साधन आहे कीं नाहीं? हिनें उत्तर केलें, जर माझे गुरु जालंदरनाथ येथें असते तर ते, ही गोष्ट करण्यास समर्थ होते. असें हें तिचें बोलणें ऐकून गोपीचंद्र उगाच राहिला, व जालंदरनाथास स्वतः त्यानेंच पुरविलें होतें ह्मणून लज्जा पावून मुकाट्यानेंच कांहीं न बोलतां दरबारांत निघून गेला; परंतु ती गोष्ट त्याच्या मनास लागून, आपण केलेलें कृत्य चांगलें नाहीं, असें त्यास पक्कें समजलें.

या गोष्टीस कांहीं दिवस लोटले असतां, कानीफनाथाची तीर्थयात्रा समाप्त होऊन तो आपले गुरु कोठें आहेत त्याचा शोध करीत फिरत जातां जातां, गोरक्षनाथाची व त्याची मार्गांत भेट होऊन परस्परांचा आदेश आदेश झाला. (आदे-

---

१. वर सांगितलेली फोड येण्याची गोष्ट कोणी अघटित समजूं नये. पेशव्यांचे सरदार प्रसिद्ध हरिपंतनाना फडक्यांचे चिरंजीव बाबूराव असेच नाजूक असत. कांडी इतक्याउंच रुजाम्यांतील रुवा मधली कापसाची सरकी एके वेळीं त्यांच्या पायांस बोंचल्यावरून मस्तंतर पाहतां रुजाम्यांतून खरोखरीच सरकी निघाली ही गोष्ट पुष्कळ जुन्या लोकांस माहीत आहे. मल्हारनिल्हे फडके श्री॰ सवाई माधवरायांचे जिवलग मित्र होते.

श या शब्दानें नाथपंथांत नमन करण्याची चाल आहे ) नंतर सुख समाधानाच्या-वगैरे गोष्टी उभयतांच्या झाल्यावर, एकमेकांनीं एकमेकांस तुह्मी आतां कोणी कडे चालला ह्मणून पुसलें. कानीफनाथानें, जालंदरनाथांस शोधण्यास निघालों ह्मणतांच, गोरक्षनाथ ह्मणाला, मत्स्येंद्रनाथास शोधण्यास मीही निघालों आहें. परंतु कोठें शोध लागत नाहीं. तेव्हां कानीफ ह्मणाला, तुमचे गुरु स्त्रीराज्यांत सांपडलेले तुम्हांस माहीत नाहींत, हें मोठें आश्चर्य आहे. गोरक्ष बोलला जसे तुमचे गुरु गोपीचंद्रानें लिदींत पुरलेले तुह्मांस ठाऊक नाहींत तसेंच हें. सारांश एकमेकांस आप आपल्या गुरूचें ठिकाण कळलें असतां, गोरक्ष स्त्रीराज्याकडे चालता झाला, व कानीफ कांचनपुरास आला.

कानीफनाथ शहरांत आले असें मैनावतीस कळतांच, त्याच्या दर्शनास तत्काळ ती गेली. आदेश झाल्यावर, तिनें जालंदरनाथ कोठें आहेत म्हणून पुसलें. कानीफ ह्मणाला, तुझ्या मुलानें त्यांस लिदींत पुरलें असें ऐकिल्या वरून मी येथें आलों, व ही गोष्ट खरीही आहे. असें ऐकून मैनावतीस आश्चर्य व दुःख दोन्ही होऊन तिनें कानिफास प्रार्थना करून ह्मटलें, जर अशी गोष्ट आहे, तर त्याचा अपराध क्षमा होऊन त्यावर अनुग्रह करणें आपणाकडे आहे. कानीफ ह्मणाला तुझाच पुत्र असल्या मुळें उपाय नाहीं; परंतु दुसरा कोणी असता तर त्यास मी अगदीं क्षमा केली नसती. सारांश पुत्रा विषयीं अभय मागून व आदेश करून मैनावती परत महालीं आली.

इकडे कानीफनाथानें आपल्या शिष्यांस आज्ञा केली कीं,– तुह्मी राजवाड्यांत जा, आणि गोपीचंद्रराजास मी येथें आल्याचें कळवून सांगा कीं, तुला जीविताची इच्छा आहे कीं नाहीं ? असेल तर जालंदरनाथांस लवकर लिदींतून काढ, नाहीं तर फुकट नाश पावशील. शिष्यांनीं त्या प्रमाणेंच राजास कळवितांच तो पराकाष्ठेचा घाबरला, व तसाच मैनावतीकडे (आईकडे) येऊन तिजजवळ त्यानें झालेला अपराध सांगून आतां माझें संरक्षण कर, ह्मणून विनंति केली. मैनावती ही स्त्री मोठ्या थोर मनाची होती, तशांत गुरुकृपेनें समाधानी असून, तिनें पूर्वींच याच्या रक्षणाची काळजी केली होती, ह्मणून यास ह्मणाली भिऊं नकोस, इतकें बोलून ती त्यास घेऊन कानीफनाथाकडे गेली व त्यांच्या पायांवर यास घातलें.

नंतर कानीफनाथानें याचा पुष्कळ निषेध करून म्हटलें. मूर्खा, बायको-

च्या नादीं लागून तूं फार अनुचित कर्म केलेंस. असु. आतां सांगतों असें कर कीं, सोनें, रुपें, तांबें व लोखंड या चार धातूंचे चार पुतळे तुझ्या आकृती एवढाले हुबेहूब तयार करीव, ह्मणजे मी तुझ्या वांचण्याचा यत्न करीन. त्या प्रमाणें गोपीचंद्रानें पुतळे तयार करविले असतां जेथें जालंदरनाथांस लिदींत पुरलें होतें, तेथें त्यानें ते आणविले. आणि गोपीचंद्रास जवळ उभें करून कानीफानें गुरूस तीन वेळ आदेशपूर्वक नमन करून, मी कानीफ आहें अशी जालंदरनाथांस प्रार्थना केली. तेव्हां आंतून ध्वनि निघाला कीं, सुखी ऐस. त्या वरून त्यानें पुनः तीन वेळ आदेश केला, तो जालंदरनाथांनीं ऐकून त्यास पुसलें. कानीफ, अरे तुज बरोबर आणखी कोण आहे ? कानीफ ह्मणाला, महाराज, गोपीचंद्र आहे. नाथांनीं तें ऐकतांच ह्मटलें. तो दुष्ट जळून भस्म होवो, त्या बरोबर सोन्याचा केलेला एक पुतळा जळून जाऊन राख होऊन पडला.

असें होतांच कानीफानें पुनः आदेश केला. तेव्हां आंतून पूर्ववत् शब्द निघाला कीं, तुज बरोबर आणखी कोण आहे ? त्यानें, गोपीचंद्र राजा आहे असें उत्तर देतांच, तो दुष्ट जळून भस्म होवो, असा शब्द आंतून निघाला. व त्या बरोबर दुसरा रुप्याचा पुतळा जळून जाऊन राख होऊन भूमीवर पडला. याच प्रमाणें तिसरा पुतळा जळतांच गोपीचंद्र भ्याला, व कानीफास ह्मणाला, आतां माझें संरक्षण करा. कानीफनाथ ह्मणाले राजा, भिऊं नकोस, असें बोलून पुनः त्यानें तीन वेळ आदेश केला असतां, अरे आणखी कोण आहे? असें आंतून जालंदर नाथांनीं पुसलें. कानीफानें गोपीचंद्र आहे असें उत्तर देतांच नाथ ह्मणाले, अरे अजून गोपीचंद्र आहे ? बरें तर तो अमर होवो. इतकें ऐकून गोपीचंद्र निर्भय होऊन कानिफास त्यानें वंदन केलें, व मोठ्या हर्षानें जालंदरनाथास बाहेर काढिलें.

जालंदरनाथ बाहेर निघाले तेव्हां गोपीचंद्रानें असें पाहिलें कीं;– ज्यांच्या अंगास लिदीचा बिलकुल स्पर्श झाहला नव्हता व कांति सुवर्णा सारखी देदीप्यमान होती. पुढें नगरांत मोठा उत्साह झाला व मैनावतीस पुत्र वांचला असें पाहून परम हर्ष झाला. नंतर गोपीचंद्रास वैराग्य उत्पन्न होऊन, त्यानें योगदीक्षा घेतली. व लागलीच सर्व स्त्रियांच्या वगैरे घरोघर भिक्षेस जाऊन त्या शोक करूं लागल्या असतां त्यांचें युक्तीनेंच समाधान करून, गुरुसमागमें तीर्थयात्रेस गमन केलें. (नाथली॰ अध्याय १८, १९, २०) पहा.

**गोपीचंद्राख्यान**— महीपति कविकृत.

**गोपीनाथ**— प्रसिद्ध वल्लभाचार्यांचा वडील मुलगा व विठ्ठलनाथाचा वडील भाऊ. याचा व याच्या धाकट्या भावाचा गादीच्या मालकी विषयीं बापाच्या मागें तंटा लागून, त्याचा निवाडा करून घेण्या करितां किती एक महिने पर्यंत दोघेही बादशाहाकडे दिल्लीस जाऊन बसले होते. त्यांत निवाडा होण्या पूर्वींच हा तेथें मरण पावला, व याच्या भावास ऐतीच गादीची मालकी मिळाली. (कविच०)

**गोपीनाथदीक्षितओक**— हा वेदशास्त्र संपन्न विद्वान् ब्राह्मण जातीचा कोंकणस्थ तैत्तिरीय हिरण्यकेशी होता. हा जरी काशीस राहात असून तेथें याचा वाडा व वंशज आहेत. तरी याचें पुणें येथें नेन्यांच्या घांटावर नदीच्या कांठीं घर आहे व तेथें याचे मुख्य वंशज आहेत. याचे वडील मोठे विद्वान असून त्यांस काशींतील विद्वज्जनां कडून असा अधिकार मिळाला होता कीं, काशींत व तिच्या आसपासच्या प्रदेशांत कोठेंही यज्ञ होवो आध्वर्यव त्यांनीं करावें.

एकदां असें झालें कीं, थोरले दीक्षित बाहेरगांवीं यज्ञास गेले असतां, श्री क्षेत्रीं एक यज्ञ उपस्थित झाला. तेव्हां क्षेत्रस्थांस अशी चिंता पडली कीं, आतां कसें करावें. कारण मुलगा आहे पण तो लहान आहे. पुढें सर्वांनीं विचार केला कीं, ही गोष्ट त्यांच्या घरीं कळवावी. आणि मग काय करणें तें करावें. ह्मणून संभावित संभावित चार पांच मंडळी जमून यांच्या घरीं आली. व यास सर्वांनीं पुसलें दीक्षित, असें असें यज्ञाचें प्रकरण आलें आहे, तुमचे वडील तर येथें नाहींत. तेव्हां काय विचार? यानें उत्तर केलें मी कर्म चालवीन. आपण काळजी करूंनये. पुढें मंडळी गेली, व यानें समग्र यज्ञाचा प्रयोग रात्रीं एकवार पाहून ठेविला, कारण संहिता हा पढलाच होता.

दुसऱ्या दिवसा पासून यज्ञास आरंभ झाला. त्यांत यानें सर्व कर्म चार पांच दिवस पर्यंत यथासांग चालविलें. साहाव्या दिवशीं थोरले दीक्षित घरीं आले, व मुलगा घरांत नाहींसा पाहून कुटुंबास पुसूं लागले कीं, गोपीनाथ कोठें गेला? तिनें यज्ञ चालविण्यास गेला असें सांगितलें तें ऐकून त्यांस वाटलें कीं मुलगा लहान असून त्यानें तो प्रयोग सुध्दां कधीं पाहिला नाहीं. तेव्हां तो यज्ञ चालवील तरी कसा? तथापि जाऊन पाहूं असें ह्मणून यज्ञ होत होता तेथें जाऊन आड उभे राहून पाहूं लागले तों, अस्खलित कर्म चाललें आहे; तेणें करून संतोष पावून मग सर्व मंडळीच्या दृष्टीस पडले. त्या ब-

रोबर सर्वांच्या मुखांतून यावें यावें असा एकच ध्वनि झाला, व सर्वांनीं सांगितलें आपलें पुण्य बलवत्तर ह्मणूनच हें पुत्ररत्न आपणास लाधलें. दीक्षित ह्मणाले यांत मजकडे कांहीं नाहीं. मुख्यत्वें करून ही कृपा गजाननाची असूनआपला सर्वांचा आशीर्वाद आहे. संस्कार रत्नमाला हा ग्रंथ यानें केलेला असून तो सर्वमान्य आहे. त्या ग्रंथा वरून हा शाके १६०५ मध्यें विद्यमान होता असें दिसून येतें. (वृद्धमा०).

**गोपीनाथपंत**— अफझूलखानाचा कारभारी. शिवाजीनें यास वश करून घेऊन खानास मारल्यावर हिंवरें गांव जहागीर करून दिलें. प्रसिद्ध सखाराम बापू बोकील तो ह्याचाच वंशज होता.

**गोपीनाथभट्टी**— गोपीनाथ दीक्षित कृत जो संस्कार रत्नमाला नामक ग्रंथ त्यासच कोणी ह्मणतात.

**गोमंत अथवा गोमंतक**— पश्चिमसमुद्र कांठचें शहर. यास हल्लीं गोंवें ह्मणतात. हें दक्षिण दिशेच्या दक्षिण हद्दीस आहे. (चा बाप· (राजमा०)

**'गोमतीपुत्र**— आंध्रभृत्य राजांतील २४ वा राजा. शिवस्वातीचा पुत्र व पुरीमान् राजा·

**गोमतीपुर**— अमदाबादेजवळचा गांव.

**गोरखपुर**— शरयू नदीच्या उत्तर तीरा पासून बरेंच दूर असणारें शहर. येथें गोरखाची गादी आहे. याचे उत्तर अक्षांश सुमारें २६ व पूर्व रेखांश ८४ आहेत. येथें गोरक्षनाथाचें पूर्वी एक मोठें भव्य देवालय होतें, तें अल्लाउद्दीन बादशाहानें मोडून त्यावर मशीद बांधली. नंतर पुनः नाथसंप्रदायिकांनीं मशीद मोडून देऊळ बांधलें. शेवटीं तेंही देऊळ औरंग जेबानें मोडून मातब्यान मशीद बांधली. त्यावरून संप्रदायी यानीं ती जागाच सोडून दिली, व दुसरीकडे देऊळ बांधिलें, तें हल्लीं कायम असून गोरखपुराच्या पश्चिमेस कांहीं अंतरावर आहे. या देवळाच्या दक्षिणेस एक महादेवाचें व एक मारुतीचें अशीं दोन देवालयें आहेत. या शिवाय परसांत नाथलोकांच्या पुष्कळ समाधीही आहेत. (कविच०)

**गोरक्षकल्प**— हा ग्रंथ संस्कृत भाषेंत गोरक्षकानें केलेला आहे. यांत जो औषधिकल्प सांगितला आहे, तो त्यांत लिहिलेल्या रुती प्रमाणें गुरुपरंपरा शुध्द केला असतां, केंस पांढरे कधींच नहोणे, दांत कायम राहणें, जरा न येणें, व दीर्घकाल वांचणें इत्यादि गोष्टी साधतात.

**गोरक्षगीता**— गोरखाचा व अवधूताचा येथें संवाद आहे. ही गीता संस्कृत असूनहि-ला कोणी कोणी अवधूत गीता असेंही ह्मणतात. ही गीता गोरक्षकृतच आहे असें ह्मणतात.

**गोरक्षनाथ**— अयोध्ये पासून कांहीं अंतरावर जयश्री नांवाचें नगर होतें. तेथें वि-जयध्वज राजाच्या वेळीं सद्बोध नांवाचा एक ब्राह्मण आपल्या सद्वृत्तिस्त्रीसहि-त रहात असे. ब्राह्मण सदाचार संपन्न व घरच्या सुखी असून त्याची स्त्रीही पतिव्रता होती. या उभय स्त्री पुरुषांस प्रपंचांत उणें काय तें संतति मात्र न-व्हती. एकदां असें झालें कीं, मत्स्येंद्रनाथ फिरत फिरत त्या नगरास आले, व प्रतिदिवशीं भिक्षेस जाण्याच्या क्रमा प्रमाणें या ब्राह्मणाच्या घरीं त्यांची फेरी प-डली. या वेळीं ब्राह्मण घरीं नव्हता. स्त्री मात्र होती तिनें त्यांची ती सुंदर कां-ति व भव्य दीक्षा पाहून झटकन् भिक्षा आणिली, व ती त्यांस वाढून नमस्कार केला; परंतु या वेळीं संततीच्या अभावानें तिचें मुख मत्स्येंद्रनाथांस म्लान दि-सल्या वरून, त्यांनीं दयेनें तिला त्याचें कारण सहजीं पुसलें. कीं, बाई तूं उदास कां? तेव्हां सद्वृत्ति हात जोडून ह्मणाली, महाराज, मला प्रपंचाची अनुकूलता असावी तशी सर्व आहे, मात्र उणें ह्मणून एवढेंच कीं, संतति मात्र नाहीं. त्या-वरून झोळींतील भस्म त्यांनीं काढून अभिमंत्रित केलें. आणि सद्वृत्तीस देऊन ह्मणाले, हें तूं भक्षण केलें असतां तुझे मनोरथ पूर्ण होतील, इतकें बोलून ते निघून गेले.

मत्स्येंद्रनाथ निघून गेले, इतक्यांत तिच्या शेजारीं राहणाऱ्या कित्येक मैत्रि-णीं तेथें आल्या, त्यांजवळ सद्वृत्तीनें सिद्धानें भस्म दिल्याची गोष्ट सांगितली.ती ऐकून त्यांनीं तिला तें भस्म न खाण्या विषयीं सांगून कारण दाखविलें तें असें, हे जोगी कानफाटे मोठे कैंटाळी असतात, हे बायकांस असेंच भस्म देतात व तें तिनें खाल्लें कीं, लागलीच ती कुत्री होऊन त्यांच्या मागें जाते. मग दिवसभर ते तिला कुत्रीच ठेऊन रात्रीस पुनः बायको करितात, व तिचा उपभोग घेतात. अ-सु. तूं भस्म खाल्लें नाहींस हें चांगलें केलेंस, तर आतां तें चुलींत टाकून दे. व पु-नः असें कोणी तुला कांहीं दिल्यास घेत जाऊं नकोस. ही मैत्रिणींनीं सांगित-लेली गोष्ट ऐकून सद्वृत्ति भ्याली, व तिनें तें भस्म चुलींत मात्र न टाकितां, गायीं-च्या शेणाचा खरवडा सांचविण्याची खांच होती तींत टाकून, नवऱ्यास झालेली गोष्ट तो कदाचित् रागें भरेल या भयानें त्यास न कळवितां उगीच राहिली.

या गोष्टीस बारा वर्षें लोटलीं, व मत्स्येंद्रनाथांची स्वारी पुनः या शहरांत येऊन भिक्षा मागत फिरतां फिरतां एका एकीं सद्वृत्तीच्या आंगणांत 'अलक्ष्य' असा शब्द उच्चारून उभी राहिली. त्या बरोबर घराची खूण पटून त्यांस स्मरण झालें कीं, याच घरच्या बाईस आपण भस्म दिलें होतें. ह्मणून हाक मारून विचारूं लागले बाई, मुलगा खुशाल आहेना? हा त्यांचा शब्द ऐकतांच ब्राह्मण बाहेर आला; परंतु सद्वृत्तीच्या पोटांत धस्स होऊन तिला बाहेर येण्यास भय वाटूं लागलें. तें वाटण्याचें कारण इतकेंच कीं, हा जोगी पुनः येऊन ज्या अर्थीं मुलगा खुशाल आहेना ह्मणून पुसत आहे, त्या अर्थीं माझें घर त्यानें खचित ओळखलें असून, मी त्या पुढें गेल्यें, व त्यानें मुलगा कोठें आहे ह्मणून पुसलें, तर त्यास काय सांगूं !!

ब्राह्मण बाहेर येतांच त्यानें मत्स्येंद्रनाथांस नमस्कार करून तो भिक्षा आणण्यास पुनः घरांत जाऊं लागला, असें पाहतांच त्या बाईचा नवरा हाच असला पाहिजे, असें तर्कानें मत्स्येंद्र नाथांनीं जाणिलें, व त्यास हाक मारून पुसलें तुझी बायको आणि मुलगा खुशाल आहेना? ब्राह्मण परतून हात जोडून बोलला. महाराज आह्मी दैवहीनांस अजून मुळींच संतति झाली नाहीं; तेव्हां पुत्र कोठून असेल? बायको मात्र खुशाल आहे. मत्स्येंद्र बोलले असें कसें होईल? आमचा प्रसाद व्यर्थ जाणें नाहीं. ब्राह्मणास हे पूर्वीं आल्याचें वर्तमान मुळींच ठाऊक नव्हतें ह्मणून, त्यानें बायकोस बाहेर हाक मारिली. व पुसलें हे काय म्हणतात. त्या वरून नाथांस व आपल्या नवऱ्यास नमस्कार करून मागील सर्व वर्तमान तिनें त्यांस सांगून तें भस्म मी न खातां राखवड्यांत टाकिलें म्हणून सांगितलें.

या प्रमाणें मत्स्येंद्रनाथ तिचें बोलणें ऐकून व किंचित् क्रोधाविष्ट होऊन तिला ह्मणाले भस्म जेथें टाकिलेंस ती जागा आह्मांस दाखीव. तिनें ती दाखवितांच नाथांनीं 'अलक्ष्य' ह्मणून तेथें जाऊन हाक मारिली. तों आंतून - आदेश - असा शब्द निघून लागलीच बारा वर्षांचा मुलगा बाहेर आला, व तो नाथांस नमस्कार करून हात जोडून पुढें उभा राहिला. त्यास पाहून लागलीच त्यांनीं त्यास बरोबर घेऊन तीर्थयात्रेस गमन केलें, तोच हा गोरक्षनाथ होय.

सिद्धानें प्रसादपूर्वक दिलेला मुलगा त्यास आपण अंतरलों ह्मणून सद्वृत्तीस व तिच्या नवऱ्यास अनिवार वाईट वाटलें; परंतु उपाय काय? दैवानें दिलेलें कर्मानें नेलें. असें ह्मणून तीं उभयतां स्वस्थ बसलीं. इकडे गोरक्ष गुरु-

प्रसादानें मोठा सिद्ध पुरुष बनला. पुढें त्यानें मत्स्येंद्रनाथाची प्रार्थना करून आपल्या आई बापांस दुसरा पुत्र कृपा करून द्यावा म्हणून विनंति केली. त्या वरून त्यांस पुत्र झाला, व त्याचें नांव गोरक्षानें सांगितल्या प्रमाणें त्यांनीं नाथवरद असें ठेविलें.

एकदां गोरक्ष भिक्षेस गेला. तेथें एका बाईनें त्याच्या मधुकरींत वडा वाढलेला मत्स्येंद्रनाथांस फार आवडला असें पाहून दुसऱ्या दिवशीं त्याच बाईच्या घरीं जाऊन वडा मागूं लागला. बाई ह्मणाली आज वडा कोठला आणूं? काल केला होता म्हणून वाढला. यानें सांगितलें वडा घेईन तेव्हांजाईन. हा त्याचाआग्रह पाहून बाई ह्मणाली तूं आपला एक डोळा काढून जर मला देशील तर वडा देईन. इतकें ऐकतांच, यानें डोळा काढून तिजपुढें ठेविला. तो पाहून बाई घाबरली व तिनें भयानें लवकर लवकर वडा तळून त्यास भिक्षा घातली. भिक्षा घेऊन गोरक्ष गुरूजवळ आला, तेव्हां गुरूंनीं डोळ्यास काय झालें म्हणून पुसलें. यानें झालेलें वर्तमान सांगतांच ते ह्मणाले काय तरी लबाड आहेसरे! बरें दुसरा डोळा आह्मांस दे पाहूं? त्या बरोबर यानें तोही काढून यां पुढें ठेविला. त्या वरून मत्स्येंद्रनाथ संतुष्ट होऊन, त्यांनीं त्याच्या दोन्ही डोळ्यांवर तीर्थ शिंपडलें, व ते पूर्ववत् केले.

यानें मत्स्येंद्रनाथांस सिंहलद्वीपांत जाऊन तेथील राणी पासून सोडवून आणिलें. तिचा पुत्र तिला सजीव करून दिला. हा भर्तृहरीच्या वेळेस होता. तो वृत्तांत भर्तृहरीच्या नांवावर दिला आहे. या प्रमाणें संक्षेपांत हें गोरक्षाचें चरित्र समजावें. (नाथली० अध्या० ३, ४, ५.)

गोरक्ष हा विद्वान् व कवीही होता. यानें गोरक्षकल्प, गोरक्ष शतक, गोरक्ष सहस्रनाम, व गोरक्षगीता, इत्यादि ग्रंथ संस्कृतांत लिहिले. या शिवाय तीन हजार श्लोकांचा विवेकमार्तंड नामक ग्रंथ याच्याच नांवावर आढळतो. चर्पटीनाथ इत्यादि याचे शिष्य बहुत होते. गोरखपुर तर यानेंच वसविलें. आणि तेथें कांहीं काळानें गादी स्थापून तीवर आपला भाऊ नाथवरद त्याची त्यानें स्थापना केली. याच्या सिद्धते विषयीं नाथलीलांमृतांतील पांचव्या अध्यायांत येणें प्रमाणें लिहिलेली ओंवी आढळते:—

असो योगसाधन पाताळीं॥ गोरक्षास साधलें ते काळीं॥ नंतर येऊन भूमंडळीं॥ चिरंजीव स्थिति पावला॥ २०॥ नटळे ज्याचें निमिषोन्मे-

- ष॥ अधोगति नसे श्वासास॥ पृथिवीस न स्पर्शतां ज्याचा वास॥ आणि छायापानही नव्हेची॥२१॥

सारांश यास योगसिद्धि पुरी साधली होती. नाथपंथी लोकांस शिखासूत्र असून ते आपणांस सन्यासी ह्मणवितात. या पंथांत ब्राह्मण, क्षत्रिय, आणि वैश्य या-सर्वांचा सारखा समावेश होतो. (नाथली॰ व कविच॰)

२— निवृत्तिनाथाचा गुरु गैनीनाथ, तो ज्याचा शिष्य तो एक गोरखनाथ. हा पहि-ल्या गोरक्षाच्या पुष्कळ मागून झाला होता असें ह्मणतात.

**गोरक्षशतक**— गोरक्षनाथकृत संस्कृत ग्रंथ.

**गोरक्षसहस्रनाम**— गोरक्षनाथकृत.

**गोराकुंभार**— बालेघांटावर तेरढोंक ह्मणून गांव आहे तेथील हा राहणाराहोय. हा केवळ तेथील उपरी राहणारा नसून वतनदार होता. कविचरित्रांत याचा गांव सांवंतवाडी लिहिला आहे; परंतु ती ग्रंथकाराची नजरचूक झालेली आहे. ज्ञानेश्वराच्या वेळेस हा होता. यावरून शके १२०० मध्यें याच्या असण्याचा सं-शय करणेंच नको. भगवद्भक्तींत हा पुरा असून सर्व संतमंडळांत वयानें पोक्त असल्या मुळें, यास सर्व मंडळी गोरोबा काका अथवा नुसतीच काका म्हणून हाक मारीत. ज्या प्रमाणें हा भगवद्भक्त होता तसाच निस्पृह व स्पष्टवक्ताही असे.

एकदां असें झालें कीं, कार्तिकी करितां सर्व संत मंडळी पंढरीस एकत्र जमली. तींत निवृत्तिनाथांनीं असें पाहिलें कीं, आपल्या मंडळींत गुरूस शरण झाला नाहीं असा एक नामदेव मात्र आहे. तर ही गोष्ट आज यास उमजवावी अशा हेतूनें त्यांनीं गोरा कुंभाराकडे पाहून ह्मटलें. काका, आपल्यास कच्च्या व पक्क्या मडक्याची परीक्षा असेलच; कारण आपला तो धंदाच पडला. गोरोबा-नें त्यांचा तत्काळ आशय ओळखून ह्मटलें, होय, होय; तें माझें नित्याचेंच का-म आहे. त्यावर निवृत्तिनाथ ह्मणाले, बरें तर मग परीक्षेस आरंभ करा.

हें बोलणें सर्वांसि उमजलें. मात्र यांतील रहस्य नामदेवास कांहींच कळलें नाहीं; ह्मणून वेड्या सारखा पहात आहे तों, मडकीं घडायाचें था-पटणें गोरा कुंभारानें एक दोन असामींच्या डोयीवर मारलेंसें करून चटकन् येऊन नामदेवाच्या डोक्यावर हांटलें. त्या बरोबर नामदेव ओरडून काका हें का-य शहाणपण? असें बोलला. त्या बरोबर हें मडकें कच्चें हो कच्चें. या प्रमाणें

गोरा कुंभार बोलतांच सर्व मंडळी खदखदां हंसूं लागली. तेणें करून नामदेवास तो अपमान सहन न होऊन, लागलीच तो त्या मंडळांतून उठून गेला. या पुढें झालेली गोष्ट नामदेवाच्या नांवावर पहावी. यांत सारांश हाच कीं, गोराकुंभार हा अशा प्रकारचा निर्भीड होता.

एकदां हा डोळे झांकून भजन करीत मडक्यांचा चिखल तुडवीत असतां याची बायको चिखलाच्या जवळच मूल ठेऊन पाण्यास गेली. त्यांत तें मूल रांगत रांगत चिखला पर्यंत जाऊन याच्या पायांखालीं तुडवलें, गेलें, व मरण पावलें. हें यास भान नसून, बायको पाण्याहून आल्यावर तिला तें दिसलें.त्यावरून तिनें अतिशय शोक मांडला. तो ऐकून हा सावध झाला, व यानें तिचें बहुतां प्रकारें समाधान केलें; परंतु तिचा शोक उणा होईना. शेवटीं हा तिला मारायास धांवला असतां ती ह्मणाली माझ्या अंगास हात लावाल तर खबरदार, तुह्मांस पांडुरंगाची शपथ आहे. तेवढ्या वरून यानें तिला हात लावणें सोडलें, तें अगदींच सोडलें.

पुढें याच्या बायकोस विचार पडला कीं,– आतां काय करावें? एक पोर होतें तें जाऊन शिवाय हा अंगास हात लावीत नाहीं, त्या मुळें पुढें संतति होण्याचाही उपाय खुंटला; ह्मणून तिनें ही गोष्ट आईबापांस सांगितली, व आपली धाकटी बहीण लग्न करून यास देवविली. लग्न झाल्यावर सासरा सहजीं इतकेंच ह्मणाला जांवई बाबा, पहिली प्रमाणेंच हिला वागवा बरें! या बोलण्या प्रमाणें यानें दुसरीला तशीच वागविण्याचा निश्चय करून तिलाही हात लावणें वर्ज्य केलें.

दोघींलाही हा हात लावीत नाहीं असें झाल्यावर एकदां त्यांनीं एकमत करून रात्रीं हा निजला असतां, दोघी दोहों बाजूंस निजल्या. व याचे दोनी हात आप आपल्या अंगावर ठेऊन घेतले. ते यानें जागा झाल्यावर पाहून त्यांकडून पांडुरंगाची शपथ मोडली गेली ह्मणून दुसरेच दिवशीं तोडून टाकविले. या प्रमाणें यानें केलेलें पाहून याच्या उभय स्त्रियांस पराकाष्ठेचें दुःख झालें, पण करितात काय? तळमळत तशाच निरुपाय होऊन उगाच बसल्या.

पुढें हा पंढरीस कार्तिकमासीं गेला. व नामदेवाचें कीर्तन चाललें असतां तें श्रवण करण्यास जाऊन बसला. त्या वेळीं नामदेवानें सर्वांस सां-

गितलें कीं;- सर्वांनीं राखी बाजवून हातांच्या पताका कराव्या. तेव्हां असें सांगतात कीं, यास आपल्या थोंट्या हातांचें भान न राहून पताका करण्या करितां यानें हात वर केले, व त्याच वेळेस याच्या हातांचे पंजे पूर्ववत् झाले. मेलेलें मूलही असेंच एका प्रसंगीं जीवंत करून पांडुरंगानें स्वतः याच्या शपथेची भीकळीक केली. यानें केलेले अभंग पुष्कळ प्रसिद्ध असून पुढें हा पंढरपूर येथेंच मरण पावला. (भ० वि० अ० १७).

**गोराकुंभाराचेंचरित्र**—उध्दव चिद्घन यांनीं मराठींत ओंवीबद्ध लिहिलेलें चरित्र.

**गोलाध्याय**— भास्कराचार्यकृत सिध्दांतशिरोमणि ग्रंथांतील चौथा अध्याय. यांत ग्रहगणिताच्या उपपत्ति सांगितल्या आहेत.

**गोवर्ध्दन कवि**— कातंत्र कौमुदीचा कर्ता. (बुल्ह० शोध).

**गोवर्ध्दन मठ**— शंकराचार्यांचा जगन्नाथ येथें असलेला स्थापित मठ. येथील संन्यासी वन आणि अरण्य या दोन नांवांचे व ब्रह्मचारी चैतन्य नांवाचे ह्मणवितात. विद्यारण्य याच मठाकडील होता.

**गोवर्ध्दनाचार्य**— हा संस्कृत भाषेचा कवि सप्तशती नामक ग्रंथाचा कर्ता. ही सप्तशती देवीसंबंधीं नव्हे असें समजावें.

**गोंवळकोंडा**— निजाम हैदराबादे जवळचा किल्ला. येथें निजामाचा खजिना असतो.

**गोविंद कवि**— या कवीची भरभर तेलंगणांतील कोणत्या राजाच्या वेळेस झाली तें कळत नाहीं. मात्र याचा अभ्यास तेथील शाळांत होऊन, याची तेलंगी व्याकरणांत पुरी माहिती असल्या विषयीं प्रख्याति होती. यानें इंदुमति स्वयंवर नांवाचा एक ग्रंथ रचिला. या शिवाय द्रविड देशांतील देवालयांचें वर्णनही लिहिलें. हा मध्यार्जुन येथें मेला ह्मणून सांगतात. (कविच०). (ल्ह० शो०)

२— मंख कवीच्या ग्रंथाची परीक्षा करण्यास जमलेल्या तीस पंडितांतील एक.(बु-

**गोविंदचंद**— कनोज येथील राठोर राजा. याचा वकील सुहल, काश्मीरच्या राजा जवळ होता. हा राजा शके १०४२पासून १०६६पावेतों २४ वर्षे राज्य करीत होता. (बुल्ह० शोध०)

**गोविंददास**— हा गुजराथी कवि कधीं व कोठें झाला तें कळत नाहीं. मात्र याचीं पदें प्रसिद्ध आहेत. याच नांवाचा दुसराही एक गुजराथी कवि होऊन गेला. त्यानें राधेच्या हाराचें वर्णन लिहिलें आहे. (काव्यदो० गु०).

**गोविंदपंत**— आपे गांवचे कुळकरणी व निवृत्तिनाथांचे आजे.

**गोविंदपंत गानू—** अहल्या बाईचा खासगीकडील विश्वासु कारभारी.

**गोविंदपंत बुंदेले—** पेशव्यांचा सरदार. याच्या बापाचें नांव बाळाजीपंत शके१६८२ मध्यें पानपतच्या लढाईंत हा मरण पावला. याचें उपनांव खेर असून हा कऱ्हाडा ब्राह्मण होता. थोरल्या बाजीरावा जवळ हा शागीर्द असे. छत्रसाल राजा कडून बाजीरावास बुंदेल खंडांतील ३१ लक्ष्यांची जहागीर मिळाली असतां पेशव्यानें यास हुशार जाणून तेथील सुभेदारी देऊन पाठविलें. व तेव्हां पासून यास बुंदेले आडनांव पडलें. (हिंदु० हस्तलि० इति०).

**गोविंदभक्त—** साधु (नाभा० भ० ग्रं०)पहा. (रू० (मा०शा०वि०)

**गोविंद भगवत्पाद पूज्य—** गौडपादाचार्यांचे शिष्य, व पहिल्या शंकराचार्यांचेगु-

**गोविंदराय—** वल्लभाचार्यांचा नातु. विठ्ठलनाथांच्या सात मुलांतील एक.

**गोविंदराव दुसरा—** गायकवाडांतील एक पुरुष. यानें १७१५ तागाईत १७२२ पावेतों सात वर्षे राज्याधिकार केला.

**गोविंदराव पहिला—** यानें शके १६९५ तागाईत १६९६ पावेतों एक वर्ष गायकवाडी राज्याचा अधिकार केला.

**गोविंदस्वामि—** साधु पुरुष. (नाभा० भक्त० ग्रं०)पहा.

**गोविंदा—** नामदेवाच्या चार मुलांतील एक.

**गोविंदानंद—** कोणी एक संन्यासी. विशेष आढळलें नाहीं.

**गोंवें शहर—** येथें फिरंगी लोकांचा (पोर्तुगाल लोकांचा) अंमल आहे. त्यांचा अधिकारीही तेथें असतो. याचें जुनें नांव गोमंतक. याचे उ० अ० सु० १५ व पूर्वरे० ७४ आहेत. येथील कायदे कडक असून जुलमी आहेत. व येथें जबरीनें बाटविलेलीं ब्राह्मणाचीं पुष्कळ कुळें आहेत.

**गोसावी—** समर्थ रामदास स्वामींच्या स्फुट ग्रंथां पैकीं एक. यांत साधु लोक ज्या अनेक प्रकारच्या करामति करितात व त्यांवर साधुत्व मिरवितात त्यांचें खंडन केलेलें आहे. हा ग्रंथ ओंवीबद्ध मराठी भाषेंत असून सुमारें ६० ओंव्यांचा आहे. यांतील वेंचे रामदास स्वामि या नांवावर पहा.

**गोसावीजीमहाराज—** वल्लभाचार्यांचे चिरंजीव विठ्ठलनाथ. त्यांचें प्रतिष्ठा नांव.

**गोसावीनंदन—** निरंजन स्वामींचे शिष्य. यांनीं केलेलीं पदें पुष्कळ प्रसिद्ध आहेत. (नवनू०).

**गौडपादाचार्य—** व्यासपुत्र शुकाचार्यांचे साक्षात् शिष्य, व गोविंद पादाचार्यांचेगु-

रु. मूळचे श्रीमच्छंकराचार्य त्यांचे हे परम गुरु, महान् ज्ञानसंपन्न व योगीही०

**गौडबंगाला**— बंगाल्याचे जे दोन भेद आहेत, त्यांतील कलकत्याकडील बंगाला तो. ढाका बंगाला तो दुसरा समजावा.

**गौडब्रह्मानंद**— महा विद्वान् संन्यासी. गौडब्रह्मानंदी ग्रंथ याचाच आहे. वाचस्पति मिश्रकृत जो कल्पतरु त्यावर यांची व्याख्या आहे. (बुल्ह० शो०).

**गौडब्रह्मानंदी**— श्रीमच्छांकर वेदांतपर गौडब्रह्मानंद यांनीं केलेला ग्रंथ.

**गौतम**— न्यायशास्त्र कर्ता ऋषि. यास अक्षचरण किंवा अक्षपाद असें नांव आहे. हा फार जुना आहे. २– दुसऱ्या बुद्धाच्या सात नांवांतील एक.

**गौतमसूत्रपंचाध्यायी**— हा गौतमकृत ग्रंथ न्यायशास्त्र प्रकरणीं मूळसूत्रांच्या वर्णनपर आहे.

**गौतमी**— दुसऱ्या बुध्दाची मावशी. मायादेवीची बहीण. मायादेवी मेली असतां हिनेंच सर्वार्थ सिद्धास वादविलें. (ल० बि०).

**गौतमीय धर्मशास्त्रवृत्तिमिताक्षरा**— हरदत्त कविकृत.

**गौरीकांत**— विवादार्णवभंजन ग्रंथाचा कर्त्ता. हा ग्रंथ धर्मशास्त्र विषयक आहे. याचें वेदांत प्रकरणावर आनंदलहरी भाष्यही आहे. (बुल्ह० शोध.)

**ग्रंथराज**— नानकमताचा ग्रंथ. याचा कर्त्ता अर्जुनमल्ल असून, हा ग्रंथ सु० शाके १५२२ मध्यें झाला. (बुल्ह० शो०).

**ग्वालभक्त**— साधु० (नाभा० भक्त० ग्रं०) पहा.

**ग्वालेर**— शिंदे सरकारची राजधानी. हें उ० अ० स० २७° व पू० रे० ७८° वर आहे. येथें शिंदे राज्य करीत आहेत.

**घटखर्पर**— विक्रम सभेंतल्या नऊ पंडित रत्नांतील साहावें पंडित रत्न. घटखरपर काव्याचा कर्त्ता.

**घटखर्परकाव्य**— घटखर्पर पंडितानें केलेलें काव्य. हें काव्य कोणी कालिदासकृत ह्मणतात; परंतु तें खोटें आहे. यावर अभिनव गुप्ताची टीका आहे.

**घटखर्परकुलकवृत्ति**— घटखर्पर काव्यावर अभिनवगुप्तानें लिहिलेल्या टीकेचें नांव.

**घटप्रभा**— ही एक नदी आहे. व ती गाडहिंग्लज पेट्यांतून वाहात गेली आहे.

**घंटय्यकवि**— तैलंगणांत एक देवता आहे. तिचें नांव याच्या आई बापांनीं ठेविल्यामुळें यास हें नांव होतें. याचें अध्ययन संपल्यावर यानें काशीखंडांतील सुराभांडेश्वराचें आख्यान तेलंगी भाषेंत काव्यरूपानें लिहिलें. या आख्यानाचे पांच अध्याय आहेत. हा कवि कधीं होता तें कळत नाहीं. मात्र आपल्याच गांवीं मर-

ण पावला असें ह्मणतात. (कविच०).

**घंटापथ**— पंचमहा काव्यांवरील संस्कृत भाषेंत लिहिलेली टीका. ही पेद्दीभट्टानें करून त्यावर त्यानें मल्लीनाथाचें नांव घातलें; कारण मल्लीनाथ वडील असून गुरूपासून जो प्रसाद झाला त्याचा वास्तविक अधिकारी तो असतां त्या संधींत तो घरीं गेल्या मुळें तोच प्रसाद पेद्दीवर झाला होता. (पेद्दीभ० श०पहा.).

**घनश्याम**— वल्लभाचार्यांचा नातू. व विठ्ठलनाथाच्या सात पुत्रांतील पांचवा.

**घनाक्षरी**— मोरोपंती मराठी भाषेंतील कविता. वामनाचीही घनाक्षरी कविता आ- [हे.

**घर्घरनद** — हा निषध देशांतून वहात आहे.

**घारापुरी**— मुंबई पासून सुमारें चार कोसांवर असणारें बेट. याचा घेर अदमासें साडेतीन कोस आहे. जमिनीच्या सपाटी पासून याची उंची पांचशें हात आहे. येथें कोरींव लेणें असून, त्यांत कोरींव खांब सुमारें २६ आहेत. सभामंडपाच्या मध्यभागीं दत्तात्रेयाचीं तीन मुखें इतकीं मोठीं आहेत कीं, तीं कवेंत मावणार नाहींत. येथें दत्ताच्या मस्तकावर जो मुगुट कोरला आहे, त्याचें काम तारीफ करण्या सारखें आहे. दत्ताच्या डाव्या बाजूस पुढील अंगाकडे शिवालय आहे. त्यास चार दरवाजे असून एकेकावर दोन दोन शिवगण आहेत. व तो एकेक गण सुमारें चौदा विती उंच आहे. हें बहुतेक काम छिन्नभिन्न झालेलें आढळतें. (ग्यारि० इं० कोश.).

**घेलाव्यास**— हा अमदाबाद येथील राहणारा जातीचा त्रवाडी मेवाडा ब्राह्मण होता. हा शके १७७७ मध्यें होता. सामळभट्ट ह्मणून जो गुजराथी कवि होता त्याचा हा शिष्य असे. यानें गुजराथी भाषेंत साठोदरा ब्राह्मण जातीचें वर्णन लिहिलें आहे. (काव्यदो०गु०).

**घोष**— शौंग अथवा संग राजे दाहा त्यांतील एक. पुलिंदाचा पुत्र, व वज्रमित्राचा बा- (प. (राजमा.)

**घोषवसु**— घोष राजा तोच.

**चकोरराजा**— आंध्रभृत्य राजांतील बाविसावा राजा. या वंशांतील तेरा राजे होऊन गेल्यावर मध्यंतरीं आठ राजे परस्पर सख्खे भाऊ असावेत. राजे होऊन गेले, त्यांच्या मागून लागलीच हा झाल्या मुळें यास भागवतांत नववा राजा ह्मटलें आहे. याच्या मागें शिवस्वाति गादीवर बसला. (राजमा०).

**चक्रपाणि**— भानुदासाचा पुत्र. सूर्योपंताचा बाप, व एकनाथाचा आजा.

२– प्रसिद्ध जो चांगदेव त्यासही ह्मणतात.

**चक्रपाणिदीक्षित**— दशकुमारचरित शेष ह्मणून दशकुमार चरिताचा शेवटचा भाग रचणारा एक पंडित. (निबं॰मा॰). [चा बाप.

**चक्ररथराजा**— जंबू नगरचा राजा. भर्तृहरि, विक्रमादित्यादिक भावंडाच्या आई-

**चक्रव्यूहवर्णन**— गुजराथी भाषेंत रघुनाथदास यानें केलें.

**चक्रापाकवि**— हा कवि जातीचा तैलंग ब्राह्मण होता. नेलुरु प्रांतांत देटु म्हणून गांव आहे, तेथें हा राहात असे. कालहस्ति (कालास्ती) येथील जमीनदार बंगारु याच मनिडु त्याच्या वेळीं ह्मणजे शके १६२५ मध्यें हा होता. याचें वय १६ वर्षांचें असतांच हा कविता करूं लागला. असें सांगतात कीं, हा रामोपासक असे. व त्याच्याच प्रसादानें याला कविताशक्ति प्राप्त झाली. जें भाषण हा सहज बोले तें श्लोकबद्ध व यमकबद्ध असे. वरील जमीनदाराच्या कानावर ही याची कीर्ति कांहीं दिवसांनीं गेली, व त्यावरून त्यानें यास भेटायास बोलाविलें; परंतु याची स्त्री गरोदर असल्या मुळें, व घरीं एक गाय होती तिची खटपट करण्यास घरांत दुसरें कोणी माणूस नसल्या मुळें, त्या वेळेस याचें जाणें झालें नाहीं.

कांहीं दिवसांनीं असें झालें कीं, हा आपल्या गांवाहून दुसऱ्या एका खेड्यास चालला असतां याच मनिडूची व याची अकस्मात मार्गांत गांठ पडली. व त्यानें यास ओळखून तेथेंच कित्येक प्रश्न केले. त्यांचीं उत्तरें यानें कविताबद्ध इतकीं नामींदिलीं कीं, तीं ऐकून तो जमीनदार फार संतुष्ट झाला. नंतर त्यानें यास सांगितलें कीं, आपण कृपा करून माझ्या दरबारीं यावें, व रामचंद्राच्या स्तुतिपर शंभर स्तोत्रें करावीं. त्या प्रमाणें हा कांहीं दिवसांनीं त्याच्या दरबारीं गेला व त्याच्या मनोगता प्रमाणें यानें शंभर स्तोत्रें करून दिलीं. तीं पाहून जमीनदार खुष होऊन काय पाहिजे तें मागा, असें यास बोलला. यानें ८० शेर जोंधळे मागितले; परंतु जमीनदार सज्जन असल्या मुळें, त्यानें यास कांहीं इनाम वर्षासनादाखल करून देऊन यास याच्या गांवीं पोंचविलें. हा आपल्या वयाच्या साठाव्या वर्षीं मरण पावला असें ह्मणतात. (कविच॰)

**चंडमारुति**— रामानुजाचार्यकृत संस्कृत ग्रंथ.

**चंडिकाशतक**— बाणभट्टानें शंभर श्लोकांनीं केलेली देवीची स्तुति. हें शतक रचण्याचें कारण असें सांगतात कीं, याचा मेहुणा मयूरभट्ट होता त्याला कुष्ठरोग झाला असतां, त्यानें सूर्याचें स्तवन शंभर श्लोकांनीं केलें. त्या सूर्यप्रशस्ति शतकाच्या योगें सांगितलेल्या व्याधी पासून तो बरा झाला. असें पाहून बाणभ-

ह्यानेंही आपण असेच बरे होऊं किंवा नाहीं हें पाहण्या करितां बुध्द्या आपलेहा-तपाय तोडून घेतले. व सदरीं लिहिलेल्या शतकानें देवीची स्तुति केली. ती बरोबर त्याचे हातपाय पूर्ववत् झाले. (निबंधमा०).

**चंडीकुचपंचाशती**— लक्ष्मणाचार्य कविकृत संस्कृत भाषेंत.

**चंडीरामबाबा**— हा वाजसनी (यजुर्वेदी) ब्राह्मण होता. सिद्ध पुरुषांत याची गणना आहे. हा मूळचा अकोल्याचा कुळकरणी, व रघुनाथ भटजींचा शिष्य. यांची समाधि व मठ खेडास आहे. यांची समाधि झाल्यास आज सुमारें २५वर्षे झालीं आहेत.

**चंडूपंडित**— नैषध काव्यावर नैषधीय दीपिका करणारा. (बुल्ह० शोध०)

**चंडेश्वर**— विवादरत्नाकर ग्रंथाचा कर्त्ता.

**चतुरसाबाजी**— हा ब्राह्मण मूळचा विजापूरचा राहणारा अकबर बादशाच्या पदरीं असे. हा गृहस्थच परंतु विद्वान् होता. एकदां अकबरानें यास सांगितलें कीं, पांडवांच्या भारता प्रमाणें माझें भारत तयार कर. तेव्हां बरें आहे असें ह्मणून हा घरीं गेला. पांच सहा महिन्यांनीं बादशाहानें यास पुसलें, कां भारत तयार झालें कीं नाहीं? यानें सांगितलें थोडी विनंति करायाची आहे, यास्तव आपण एकटे असलां ह्मणजे बरें. त्यावरून बादशाहानें यास एकांतीं बोलाविल्यावर,हा म्हणाला आमच्या भारतांत द्रौपदीस पांच भ्रतार वर्णिले आहेत तसे येथेंही असले पाहिजेत, व तेवढेच त्यांत लिहिणें राहिले आहेत. त्यांचीं नांवें कळलीं कीं, लागलीच ग्रंथ आणितों. बादशाहा ह्मणाला असें असेल तर मग आमचें भारत लिहूं नको. त्यावरून कोणी लेंकानें लिहिलें आहे असें मनांत ह्मणून हा बादशाहाची परवानगी घेऊन आपल्या घरीं गेला. (हब्द्मा०).

**चतुरोनभक्त**— नाभाजीच्या भक्तमाल ग्रंथांत लिहिलेला साधु.

**चतुर्धराचार्य**— हा जातीचा देशस्थ आश्वलायन ब्राह्मण मूळचा कोंपरगांव येथील राहणारा. यानें भारतावर टीका लिहिली आहे. हाल्लीं याचे वंशज काशीस आहेत. यास होऊन गेल्यास सुमारानें तीनशें वर्षे झालीं असें लोक बोलतात.

**चतुर्भुजदास**— (नाभा० भ० ग्रं०) पहा. हा साधु होता.

**चतुर्भुज राजा**— (नाभा० भ० ग्रंथ). पहा. हा भगवद्भक्त होता.

**चतुःश्लोकीभागवतटीका**— ही टीका मराठींत ओंवीबद्ध एकनाथ स्वामीनीं केलेली आहे.

**चंदनदास**— राक्षस नांवाचा जो नंदराजाचा प्रधान त्याचा मित्र. हा मोठा नामांकित द्रव्यवान् सावकार होता. (ग्यारे॰ इं॰ कोश.)

**चंदना**— भागलपुराजवळची नदी.

**चंदरास**— दीपविजयनामक जतीनें गुजराथी भाषेंत केलेला रास. (काव्य॰गु॰).

**चंदीचंदावर**— तंजावरासच लोकांत ह्मणण्याची रूढी आहे. [शिखर.

**चंद्रगिरि**— कर्नाटकांतील एक शहर. २– उत्तरकिरात प्रदेशांतील हिमालय पर्वताचें

**चंदूलाल**—मुनीर उलमुलुख निजामाचा दिवाण त्याचा हस्तक. हा कायस्थ खत्री होता. (हिंदु॰ छा॰ इति॰).

**चंद्रगुणा**— नामांकित जो कुमारिल भट्ट अथवा भट्टपाद त्याची आई.

**चंद्रगुप्त**— हा जातीचा शूद्र होता. याच्या बापाचें नांव दशरथ असल्याचें भागवत स्कंध बारा यावरील टीके वरून समजून येतें. चाणक्य ह्मणून जो ब्राह्मण होता त्यानें शेवटल्या नंदास मारून यास राज्यावर बसविलें. कारण नंद राजाच्या सरदारांत हा प्रमुख असून, चतुर व चाणक्याशीं स्नेहभावानें वागणारा असल्या मुळें त्याचा परममित्र होता.

बाळशास्त्री जांभेकर यांनीं जो हिंदुस्थानाचा संक्षिप्त इतिहास इंग्रजी वरून मराठींत लिहिला आहे, त्यांत ते असें लिहितात कीं, या राजा जवळ ग्रीक लोकांचें सैन्य चाकरीस होतें. शिकंदर बादशाहाच्या एक्या सरदाराचा वकील मेगास्थिनीस नांवाचा याजवळ होता. व ती असण्याचा काळ इसवी सनापूर्वी ३२४ वर्षांच्या सुमारांतला होता. ग्रीक लोकांच्या ग्रंथांत याचें नांव सांद्रकोट्स लिहिलें आहे. व थोरला शिकंदर बादशाहा ह्मणजे (अलेक झांडर धीग्रेट) त्यास हा भेटण्यास गेला होता, असें प्रोफेसर उइल्सन् वगैरे इंग्लिश ग्रंथकार यांचें मत आहे; असें ग्यारेट साहेब लिहितात; परंतु त्या सर्व गोष्टी भागवत वगैरे पुराणाशीं व जैन लोकांच्या ग्रंथांशीं ताडून पाहतां, अगदीं विरूद्ध अशा दिसून येतात.

जैन लोकांच्या ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं, युधिष्ठिर शकाच्या १६९३ च्या वर्षी प्रमाथि नामक संवत्सरीं चैत्र शुद्ध १ रविवारीं चंद्रगुप्तास राज्याभिषेक झाला. यानें २२ वर्षें राज्य केलें. व युधिष्ठिर शक १७१५ प्लवनामक संवत्सरीं तो मरण पावला. त्या वरून या राजास होऊन गेल्यास बत्तिसशेंवर वर्षें झालीं आहेत. अर्थात् हीं ३२०० व वरील इंग्लिश पंडितांनीं ठरविलेलीं बावीसशें

या दोहोंत एक हजार वर्षांचें अंतर असल्या मुळें इंग्लिशांनीं सांद्रकोट्स तोच चंद्रगुप्त होय, असा केलेला निर्णय बरोबर नाहीं. असें स्पष्ट समजून येतें. हा राजा मरण पावल्यावर याचा पुत्र वारिसार गादीवर बसला. चंद्रगुप्तादिक दाहा राजे हे मौर्य ह्मटलेले आहेत. वर लिहिलेल्या चंद्रगुप्ताच्या काळा विषयीं (चाणक्य) शब्द पहा.

**चंद्रचूड**– चर्पटीनाथाचें मूळ नांव.

**चंद्रपुर**– चित्रकूट पर्वता जवळचें नगर, येथें क्षपणिकाचें जन्म झालें होतें.

**चंद्रप्रभु**– चोवीस तीर्थकरांतील आठवा. (तीर्थकर) श०प०.

**चंद्रभट्ट**– दौलताबाद येथील राहणारा ब्राह्मण. एकनाथ स्वामींनीं प्रथमतः चीचतुःश्लोकी भागवतावर मराठींत ओंवीबद्ध टीका लिहिली ती याच्याच घरीं बसून लिहिली.

**चंद्रभागा**– चिनाब ह्मणून जी पंजाबांतील नदी तिचें मूळचें नांव.

२– पंढरपुरा जवळ असणारी भीमा नदी तिलाही ह्मणतात.

**चंद्रविज्ञ**– आंध्रभृत्य राजांतील शेवटचा अथवा तिसावा राजा. यासच लोमर्धी नामांतर होतें. हा विजयराजाचा पुत्र होता, व येथून आंध्रभृत्य राजांची कारकीर्द संपली. (राजमा०)

**चंद्रसेन**– पैठण येथें असणारा राजा. हा शालिवाहन शके ११२५ मध्यें तेथें राज्य करीत होता. व याचा राज्यकार चालविणारा प्रधान हेमाद्रिपंत (हेमाडपंत) असे. (वृद्धमा०)

**चंद्रसेनजाधव**– धनाजी जाधवाचा मुलगा. याच्या बापाच्या मागें शाहुराजानें यास सेनापति केलें. आणि बाळाजी विश्वनाथास पूर्ववत् याच्या हाताखालीं दिलें. परंतु हा तन्हेचाच मनुष्य असल्या मुळें, बाळाजी विश्वनाथास न पुसतां कित्येक कामें करूं लागला. व त्या मुळें तीं बिघडूं लागलीं. तेव्हां शाहूनें यास खरपूस ताकीद दिली. ह्मणून हा रुसून रंभाजी निंबाळकरासहित निजामाकडे जाऊन त्याच्या चाकरीस राहिला. (हिंदु० इ०)

**चंद्रांगदचरित्र**– व्यंकटपति राजानें केलेलें काव्य. चंद्रांगद हा निषध देशाच्या राजाचा पुत्र होता.

**चंद्राचार्य**– पाणिनीचें व्याकरण अगदीं लोपल्या प्रमाणें झालें असतां, दक्षिण दिशेकडे असणाऱ्या पर्वत प्रदेशीं, कोणी विद्वानानें लिहून ठेविलेलें व्याकरण,

ज्यानें शोधून काढिलें व वसुरातास दिलें तो. (सरलाप्र०)

**चंद्रापीड**— काश्मीरचा राजा. हा सुबालाच्या मागून गादीवर बसला. शालिवाहनाचें ११वेंशतक अखेर. (बुल्ह० शो०)

**चंद्रालोक**— जयदेव कविकृत ग्रंथ.

**चंद्रालोकटीका**— ही एकाच नांवाची टीका दोघांनीं केलेली आहे. त्यांत पहिली प्रद्योतन भट्टकृत व दुसरी पायगुंडे कृत.

**चंद्रिकापरिणय**— माधवराय कविकृत तैलंग भाषेंत.

**चन्नबसव**— लिंगाईत धर्माचा स्थापक जो प्रख्यात बसव त्याचा हा भाचा होता. बसवाची बहीण नागलंबिका तिचा पुत्र. बसवानें काढलेला जो नवा वीरशैवधर्म, त्याची यानें पूर्णपणें स्थापना केली. या चन्नबसवा विषयीं एक नवें पुराणच एका कवीनें केलेलें आहे. व तें बसव पुराणाहून स्वतंत्र आहे. त्यांत बावन्न वें पन्नाव्या अध्यायांत यानें सिद्धरामास सांगितलेल्या भविष्याचें वर्णन येणें प्रमाणें आहे:- बसव हा, शालिवाहन शकाच्या ७०७ व्या वर्षी रक्ताक्षिनामक संवत्सरांत फाल्गुन शुद्ध ११ बुधवारीं संगमेश्वर लिंगामध्यें अदृश्य होईल. राजा मला बसवाच्या जागेवर नेमील. हलेज व मधुवेज या लिंगाइतांचा छळ राजानें करून त्यांस मारिलें असतां, जगदेव, बोम्मीदेव, व मालेय, हे तीन मशालची राजास मारतील. व ते लागलीच कैलासास जातील. इतक्यांत मी लिंगाइतांस उळिवी येथें पाठवीन. आह्मीं कल्याण शहर सोडूं, व बिज्जल राजाचा जांवई आमचा पाठलाग करील. पुढें आमचें त्याचें युद्ध होऊन तो आमच्या हातीं सांपडेल. पुनः निलंबिकेच्या विनवणी वरून आह्मी त्यास व त्याच्या सैन्यास जिवंत करून, यापुढें पुण्यमार्गानें चालत जा, लिंगाइतांचा छळ करूं नको. असा उपदेश करून सोडूं. तोच पुढें साठ वर्षें राज्य करील. त्याच्या मागून तुर्क लोक ७७० वर्षें राज्य करतील. ते कल्याण शहर मोडून कलबुर्गा शहर आपली राजधानी करतील. तुर्कांचा अंमल बसवाच्या मागून साठ वर्षांनीं होईल. कल्याण येथील दोन भट गमलापुर गांव वसवितील. त्या वेळेस होयशलवंशी राजे दक्षिणेंत राज्य करतील, व वेलापुर येथें विष्णूचें देऊळ बांधितील. अनिगिंडीचे (अनागोंदीचे) राजे हंपी जवळ विजयानगर नांवाचें शहर वसवितील. नंतर लिंगाईत धर्म वाढविण्यासाठीं अनेक साधु पृथ्वीवर उत्पन्न होतील. या पुढें बसंतराग राजा होईल. व तो तुर्क लोकांचा पराभव करील. तेव्हां तुर्क लोक हा देश सोडून जातील. हाच

बसंतराग पुनः कल्याणशहर वसवील. मी चन्नबसव त्याचा प्रधान होऊन, बसव त्याचा सेनापति होईल. व लिंगाईत धर्म पुनः चोहींकडे स्थापन होईल इत्यादि.

या भविष्या प्रमाणें काय घडून आलें, त्याचा विचार असा आहे. प्रथम शालिवाहन शक ७०७ बसवाच्या अदृश्य होण्याचा काळ लिहिला आहे तोच मूळारंभीं चुकीचा आहे; कारण, जर बसव विजल राजाचा आश्रित होता हें खरें आहे, तर विजल राजा शके १०७७ मध्यें असल्या मुळें त्याच वेळेस बसव होता. दुसरें, ७०७मध्यें रक्ताक्षि संवत्सर मुळींच नव्हता क्रोधन संवत्सर होता. तिसरें, चन्नबसव कधींच प्रधान झाला नाहीं. व बसवही सेनापति झाला नाहीं. चौथें, विजल काव्यांत विजल राजास बसवानें विष घालून मारिलें म्हणून लिहिलें आहे. मशालचीनीं मारिल्याचें नांव मुळींच नाहीं. पांचवें, विजलाचा जांवई चन्नबसवाच्या हातीं सांपडून मेला नाहीं, व तो पुनः जीवंतही झाला नाहीं. साहावें, विजलाच्या जांवयानें राज्य केल्याचें प्रत्यंतर आढळत नाहीं. सातवें, होयशाळ राजे त्या वेळेस होतेच ह्मणून हें भविष्यच ह्मणतां येत नाहीं. आठवें, लिंगाईत धर्म वाढविणारे साधु झाले असतील तर असतील; पण धर्माची वृद्धि झाल्याचें चिन्ह दिसत नाहीं. नववें, वसंतराग राजा झाला नाहीं, व त्यानें तुर्क लोकांचा पराभव केला नाहीं. दाहावें, कल्याण शहर अजून आहे तसेंच आहे. (महा० व कर्ना० इति०).

**चन्नबसवपुराण–** यांत चन्नबसवाचें व त्याच्या कृत्यांचें वर्णन आहे. हें पुराण, विरूपाक्ष नामक कवीनें वार्धिक शतपदी वृत्तांत शके १५८५मध्यें लिहिलें. कोणी पंधराशें सत्याहत्तर मध्यें लिहिलें आहे असें सांगतात.

**चंपकमार–** वामन चूडामणि पांड्ये असें ज्या राजास ह्मणत असत, त्यासच हें दुसरें नांव होतें. आमच्या मतें हा राजा पांड्य देशाचा असेल, व त्या वरून त्यास पांड्ये हें उपनांव पडलें असेल. याच्या विषयीं विशेष माहिती कांहीं आढळत नाहीं, एकच मात्र गोष्ट आढळते ती ही कीं, या राजाच्या सभेंत एके प्रसंगीं सेतेकर कवि आला असतां, त्यास उद्देशून यानें इतर पंडितांस असा प्रश्न केला कीं, माझ्या स्त्रीच्या केंसांस जो सुगंध आहे, तो स्वाभाविक आहे कीं, कृत्रिम (कृतीचा) आहे? आणि याचें उत्तर यथार्थ जो सांगेल, त्यास हजार रुपयांचें बक्षीस हें मी खांबास बांधून ठेविलें आहे, तें मिळेल. याचें उत्तर सेतेकरास झालें नाहीं. परंतु धामगनाम-

---

१. रा॰रा॰ बाळाजी प्रभाकर मोडक यांनीं केलेल्या कोल्हापुर व कर्नाटक प्रांताच्या इतिहासांतील एकशें सत्तेचाळीस व एकशें अठ्ठेचाळीस पृष्ठें पहा.–

क ब्राह्मणानें, तो सुगंध स्वाभाविक आहे, असें यथार्थ उत्तर राजास देऊन तें बक्षीस घेतलें. (कविच०).

**चंपकारण्य—** हें अरण्य मगध देशांतील होय. प्रसिद्ध पहिला बुध्ध, व प्रख्यात वल्लभाचार्य, या दोघांचें हें जन्मस्थळ होतें.

**चंपानगरी—** अंगदेशाची प्राचीन राजधानी. या जागीं हाल्लीं भागलपूर आहे. येथें बौद्ध लोकांचीं लेणीं आहेत असें ह्मणतात. (ग्यारे इं० कोश.)

**चंबळानदी—** कोणी हिला चामला ह्मणतात; परंतु हिचें मूळचें नांव चर्मण्वती होय.

**चरक—** वैद्यशास्त्र विषयाचा आचार्य. हा जुनाट आहे असें वृद्ध लोक बोलतात.

**चरणदास—** यानें संस्कृत शिवस्वरोदयाचें हिंदुस्थानींत दोहोरेबद्ध भाषांतर केलें आहे.

**चरणव्यूह—** वेद व त्याच्या शाखा यांच्या वर्णना विषयीं ग्रंथ.

**चरमगुरुमंजरी—** ओंवीबद्ध मराठींत वामनानें केलेला ग्रंथ. यांत वेदांत विषय आहे.

**चर्पटपंजरी—** पहिल्या शंकराचार्यांनीं केलेला एका वृद्ध व्याकरण पढणारास उपदेश.

**चर्पटयोगीश्वर—** एक साधु पुरुष. याचें विशेष चरित आढळत नाहीं.

**चर्पटीनाथ—** गोरक्षनाथाचा शिष्य. हा निषध देशाचा राजा सुदर्शन व त्याची स्त्री लीलावती, त्यांचा पुत्र होता, ह्मणून जातीचा क्षत्रिय होता. जलक्रीडा करीत असतां हा पाण्यांत बुडाल्या वरून, गोरक्षनाथांनीं यास त्यांतून माघारें आणून जिवंत केलें. त्या वरून राज्य सोडून हा त्यांचा शिष्य झाला, व मोठा योगी बनला. याचें मूळचें नांव चंद्रचूड होतें. (नाथलीं०)

**चर्मण्वतीनदी—** हल्लीं हिला चंबळा नदी ह्मणतात. हिची उत्पत्ति कशी झाली ती आमच्या प्राचीन कोशांत पहावी.

**चाक्रलोक—** हे एका जातीचे लोक आहेत. हिंदुकुश पर्वता पासून सिंधुनदीच्या मुखापर्यंतचा जो प्रदेश त्यांत यांची वस्ती पूर्वी असल्या विषयीं ग्रंथांतून आढळांत येत्ये. (ग्यारे० इं० कोश).

**चांगदेव—** महाराष्ट्र देशांत देशभाषेनें कविता करणारे जे साधु व कवि होऊन गेले, त्या सर्वांत हा पहिला होता. या वरून असें समजावें कीं, हा मुकुंद राजाच्याही आधींचा होता. आजपर्यंत प्राय: अशी समजूत होती कीं, मराठी भाषेंतील आद्य कवि मुकुंदराज होत; परंतु ती आलीकडेस पुष्कळ बदलली आहे. एकनाथ स्वामींनीं तर भागवताची टीका लिहितांना हा आद्य कवि समजून यास नमन केलें आहे. त्या वरून असें दिसून येतें कीं, यानें केलेले कांहीं ग्रंथही असावेत. एक-

नाथांनीं नमन केलें आहे, तें येणें प्रमाणें:-

> वंदूं प्राकृत कवीश्वरु॥ निवृत्ति प्रमुख ज्ञानेश्वरु॥ नामदेव चांगदेव वटे-
> श्वरु॥ ज्यांचें भाग्य थोरु गुरु कृपा॥१॥ ज्यांचे ग्रंथ पाहतां॥ ज्ञान हो-
> य प्राकृतां॥ तयाचे चरणीं माथा॥ निजात्मता निजभावें.॥२॥

महीपति बावांनीं याची उत्पत्ति वर्णिली आहे ती अशी,- स्वर्गामध्यें मरुद्गण नांवा-चे देव आहेत. त्यांस एके काळीं कांहीं कारणा वरून इंद्राचा शाप झाला कीं, तुह्मां-स मृत्युलोकीं, जन्म घडेल. तेव्हां त्यांनीं उःशापा विषयीं प्रार्थना केली. इंद्र बोलला पुढें पृथिवीवर ज्ञानेश्वर प्रभृति देवांश प्रकट होणार आहेत. त्यांचें तुह्मांस दर्श-न व अनुग्रह झाला ह्मणजे तुह्मी स्वर्गास परत याल. त्या वरून मरुद्गण पृ-थिवीवर आले.

मरुद्गण पृथिवीवर येतांच त्यांनीं मनुष्याचीं रूपें धारण केलीं; आणि ता-पी व पयोष्णी या नद्यांच्या संगमांतील कर्दळी वनांत संचार केला. त्याकाळीं ज्यांस ज्यांस हा दृष्टीस पडला त्यांस त्यांस याच्या रूपाचें आश्चर्य होऊन, हा कोणी तरी देवांश आहे असें त्यानीं मानिलें. व याच्या रमणीय आणि दिव्य कांतीवरून (चांगला देव) याचा संक्षेप चांगदेव करून, त्या नांवानें याची सर्वत्र प्रसिद्धि केली.

लोक असें ह्मणतात कीं, हा समाधि लाऊन योग बलानें शंभर शंभर व-र्षें पर्यंत बसे. व शंभर वर्षें भरलीं कीं, बाहेर उठून येऊन एक वर्षभर बाहेर रा-हून पुनः समाधि लाऊन घेई. या प्रमाणें यानें तेरा वेळ करून, चौदाव्या खेपे-स ह्मणजे त्या शतकाच्या समाप्तीस जो हा बाहेर आला तो पुनः समाधि लाऊन बस-ला नाहीं. वरील गोष्टी विषयीं महीपति बावांनीं आपल्या भक्तविजयाच्या २२व्या अ-ध्यायांत या प्रमाणें लिहिलें आहे.

> शतवर्षें भरतां जाणा॥ पुढती करिती काल वंचना॥ पुनरपि आणून दे-
> हभाना॥ कौतुकें नाना दाखवी॥१॥ एक सहस्र चार शतें वरी॥ चांगदेव
> वांचले याचि परी॥ कीर्ति प्रगटली देशांतरीं॥ उपमा दुसरी असेना॥२॥
> चौदाशें वर्षांत साचार॥ चौदा वर्षें क्रमिलीं बाहेर॥ तितुकींही स्थळें भि-
> न्नाकार॥ पृथिवी वरी असती॥३॥

या प्रमाणें, हा चौदाशें चौदा वर्षें वांचला होता. चौदाव्या शतकाच्या अंतींच्या ह्म-णजे बाहेर राहण्याच्या वर्षांत, ज्ञानेश्वरानें रेड्याच्या मुखें वेद बोलविल्याची की-

र्ति ऐकली. त्या वरून असें सांगतात कीं, त्यानें प्रथम पत्र पाठविलें तें, कोरें असल्या वरून मुक्ताबाईनें इतकेंच ह्मटलें कीं, चौदाशें वर्षें वांचून अजून हा कोराच आहे. ह्मणजे अध्यात्मज्ञानशून्य आहे. कोरें पत्र आलें त्याचें कारण असें; ज्ञानेश्वरादिक भावंडें वयानें आपणां पेक्षां लहान आहेत, ह्मणून यांस तीर्थरूप लिहितां येत नाहीं. बरें चिरंजीव ल्याहावें तर ज्ञानवृद्ध आहेत. सारांश हा पुढें वाघावर बसून व हातांत सर्पाचा चाबूक घेऊन, ज्ञानेश्वराच्या भेटीस निघाला. हें वर्तमान ज्ञानेश्वरास कळलें त्या वेळेस तो सकाळीं भावंडांसहित एक्या पडक्या भिंतीवर ऊन खात बसला होता. चांगदेव जवळ आला असें पाहून ज्ञानेश्वरानें भिंत चालविली. व सर्व भावंडें अशा प्रकारें त्यास सामोरीं गेलीं. ही भिंत अजून अळंदीस गांवा बाहेर आहे. जनाबाईनें या विषयीं असें ह्मटलें आहे.

सांगा देव कां न होती ॥ निर्जिव चालविली भिंती ॥ १ ॥ अभंग.

चांगदेव सजीवावर बसून आला होता, व हीं मुलें निर्जीवावर बसून येत आहेत, असें पाहून तो वाघा खालीं उतरला. व गर्वहत होत्साता लोटांगण घालीत त्यांजवळ आला. या विषयीं तुकारामानें या प्रमाणें ह्मटलें आहे:-

उपजत ज्ञानी हें वर्म जाणुनी ॥ आले लोटांगणीं चांगदेव १ अ०

चांगदेवास नमस्कार करतांनां पाहून, ज्ञानेश्वर भावंडांसहित भिंतीखालीं उतरला. आणि सर्वांनीं त्यास आलिंगनें दिलीं, नंतर परस्पर संभाषणें झालीं, व कांहीं काळानें त्यास अध्यात्म विद्येचा अनुग्रह झाला, तो चांगदेव पांसष्टी ह्मणून पांसष्ट ओंव्यांचा ज्ञानदेवाचा ग्रंथ आहे त्यांत स्पष्ट आहे.

आतां, चांगदेवास चांगावटेश्वर नांव पडलें, त्याचें कारण असें आहे. चांगदेवाचे शिष्य अरुण गांवचे राहणारे दोघे भाऊ होते. ते कधीं कधीं चांगदेवास तापी नदीवर स्नानासाठीं नेत असत. नेण्याचें कारण असें कीं, मार्गांत चालतांनां वगैरे चांगदेव घरीं येत पर्यंत डोळे मिटून चालत. एकदां असें झालें कीं, चांगदेव स्नान करून आसनावर येऊन बसले. तरी उभयतां बंधूंस पार्थिवा करीतां माती आणावयाची तिचें स्मरणच राहिलें नाहीं. पुढें जेव्हां चांगदेवांनीं पुसलें. अरे, पार्थिवाची माती कोठें आहे? त्या बरोबर दोघांसही स्मरण झालें, व त्यांनीं तेथेंच वाळूत एक वाटी उपडी घालून ह्मटलें. महाराज, आज या स्थळीं ऐतेंच स्वयंभू शिवलिंग असल्या कारणानें आह्मी माती आणिलीनाहीं,

त्या वरून चांगदेवांनीं बरें आहे ह्मणून, पालथ्या घातलेल्या वाटीचीच शिवलिंग समजून पूजा केली. तेणें करून असें झालें कीं, वाटी चाकूंन पक्की होऊन तिचें खरोखरीच शिवलिंग झालें. तेव्हां पासून त्या लिंगास वटेश्वर नांव पडलें. व चांगदेवाकडून शिवलिंग झाल्या मुळें लोकांमध्यें चांगदेवाची चांगा वटेश्वर या नांवानें प्रसिद्धि झाली.

ज्ञानेश्वरी ग्रंथ होऊन सुमारें साहाशें वर्षें होत आलीं आहेत. त्या पूर्वीं चांगदेव चौदाशें वर्षें असल्यास, त्याचें पृथिवीवर येणें विक्रम शका पूर्वीं कांहीं काळ झालें होतें, असें ह्मणणें भाग येतें. सारांश हा पुरुष दोन हजार वर्षां पूर्वींचा असून चांगा केशवदास हें याचें रूपांतर होतें असें ह्मणतात. या विषयीं (चांगा केशवदास) शब्द पहा. (भक्तविजय अ॰२२).

**चांगदेव पांसष्टी—** हा प्राकृत ओंवीबद्ध ग्रंथ ६५ ओंव्यांचा आहे. यतो ज्ञानेश्वरानें केलेला असून, त्यांत चांगदेवांस अध्यात्म विद्येचा उपदेश आहे.

**चांगाकेशवदास—** चांगदेव तापी नदीच्या तीरीं असतां, नारायण डोह येथील एक कुळकर्णी सुधोपंत, सहकुटुंब त्यांची सेवा करूं लागला. त्यांत त्याचा हेतु होता कीं, आपणास चांगदेवा सारखा पुत्र असावा. परंतु हा हेतु त्यानें उघड केला नव्हता. एके काळीं त्यानें चांगदेवाची सुप्रसन्न मर्जी पाहून विनंति केली कीं, आपणा प्रमाणें मला पुत्र असावा, अशी माझी इच्छा आहे. असें ऐकून चांगदेवांनीं तुझी इच्छा सफळ होईल असें ह्मटलें. या गोष्टीस थोडेच दिवस लोटले न लोटले तों सुधोपंताची स्त्री गरोदर झाली. पूर्ण मास होतांच पुत्र झाला. व त्याचें नांव त्यांनीं चांगदेव ठेविलें. कारण तो त्यांस चांगदेवाच्या वरप्रदाना वरून झाला होता. व रूपानेंही चांगदेवा प्रमाणेंच असे.

इकडे असें झालें कीं, मूळचे चांगदेव अदृश्य होऊन स्वर्गास गेले. वरूपांतरानें प्रकट झालेले चांगदेव, दिवसें दिवस वाढत जाऊन मोठे झाले. यानेंच कांहीं काळा नंतर नारायण डोह येथें, केशवराजाची मूर्ति स्थापिली, व तिची सेवा करूं लागला. त्या योगानें लोक यास चांगा केशवदास असें ह्मणूं लागले. हाही चांगदेवा प्रमाणेंच मोठा सिद्धपुरुष निपजला.

एकदां चांगा केशवदास पुणतांवें येथें असतां, कोणी वाजसनी ब्राह्मण पोटीं पुत्रसंतति नसतां मरण पावल्या वरून, त्याची विधवा स्त्री, पतीच्या अस्थि घेऊन काशीस जाण्यास निघालेली येथें मुक्कामास उतरली. तेव्हां तिला

तेथें कळलें कीं, येथें कोणी नामांकित सिद्ध पुरुष आले आहेत. त्या वरून ति-
च्या मनांत त्यांचें दर्शन घ्यावें असें येऊन ती तिकडे गेली; परंतु लोकांच्या अति-
शय गर्दी मुळें तिला यांचें दर्शन घेण्यास वाव होईना. तथापि तशाच गर्दीत
कांहींशी लोकांची पातळाई झालेली पाहून तिनें जाऊन यांस नमस्कार केला, व
यांनींही तिला "पुत्रवती भव," असा आशीर्वाद दिला. तो ऐकून ती तेथें तशीच
स्तब्ध होऊन उभी राहिली.

पुढें सर्व मंडळी निघून गेली. तरी ती बाई उभी आहेच, असें पाहून, यां-
नीं बाई कां उभी राहिलीस ? ह्मणून तिला पुसलें. तिनें आपली सर्व हकीकत व
झालेला आशीर्वाद निवेदन करितांच, यांनीं सांगितलें तुझ्या नवऱ्याच्या अस्थि
कोठें आहेत? त्या इकडे घेऊन ये. तिनें त्या यांजवळ नेतांच यांनीं त्यांवर उदक प्रो-
क्षण केलें. व तें उदक तिला प्यावयास सांगून कांहीं काळ येथेंच राहा, म्हणून आ-
ज्ञा केली.

त्या उदक प्राशना पासून असा चमत्कार झालेला सांगतात कीं, ती बाई गरो-
दर होऊन, दाहाव्या महिन्यांत पुत्रास प्रसवली. कांहीं काळानें मुलगा मोठा झा-
ला, असें पाहून यांनीं त्या बाईस ब्राह्मणांकडून पावन करवून मुलाची मुंजही कर
विली. याच समारंभांत ब्राह्मण भोजनाच्या समयीं, भाताचा तोटा येईल असें
मंडळींनीं यास कळविल्या वरून, यांनीं मुलाकडून भांड्यांतील सर्व भात पराती-
त लवंडवून वाढायास सांगितला. व तो तसें केल्यानें सर्वांस पुरला. तेव्हां पासू-
न त्या मुलाचें उपनांव भातलवंडे पडलें, तें अजून त्याच्या वंशास चालत आहे.

याची दुसरी गोष्ट अशी सांगतात कीं, बेदरच्या यवनानें एके वेळीं पंढरीस
येऊन गांवास पराकाष्ठेचा उपद्रव दिला. आणि विठ्ठल मंदिरास लागून एक म-
शीद बांधली. पुढें तो गेल्यावर सर्व ब्राह्मण यास शरण आले. त्या वरून बेदरा-
स जाऊन बादशाहास भेटावें असें मनांत आणून, हा तेथें गेला. तों त्याच वे-
ळीं बादशाहाची आवडती राणी मरण पावून तिचा उत्तर विधि होण्याची सिद्ध-
ता आहे असें यानें ऐकिलें. म्हणून मग विलंब न करितां तत्काळ राजवाड्यां-
त हा गेला. व बादशाहास ह्मणाला तुला जर राणी पाहिजे असेल तर पंढर-
पूरची मशीद काढ. त्या वरून त्यानें मशीद काढविली, व काढवितांच त्याची
बायको जिवंत झाली. या सिद्ध पुरुषाची समाधि पुणतांबें येथें असून तिला-
च कित्येक लोक चांगदेवाची समाधि असें ह्मणतात; परंतु ती त्याची नसून याची

आहे असें समजावें. (भक्तवि॰अ॰२२)

**चांगावटेश्वर–** चांगदेवासच पडलेलें नांव.

**चाणक्य–** गांधार देशाची (कंदाहाराची) राजधानी तक्षशिला तेथील हा राहणारा जातीचा ब्राह्मण होता. यानें तीन वेदांचें अध्ययन केलें होतें असें ह्मणतात,याशिवाय हा राजनीतींतही प्रवीण होता.असें सांगतात. पश्चिमेकडील लोकांच्यामतें याचें जन्म इसवी सना पूर्वीं सुमारें चौथ्या शतकांत झालें, ह्मणजे आज याचें जन्म झाल्यास त्यांच्या मतें सुमारें बावीसशें वर्षें झालीं आहेत. परंतु हें मत पुष्कळ ग्रंथांशीं विरुद्ध असल्या कारणानें खरें नाहीं, ह्मणून असें समजावें कीं, याचें जन्म झाल्यास आज ३२०० शांवर वर्षें झालीं आहेत. या विषयीं स्कंदपुराण व भागवत स्कंध १२ अध्याय पहिला व दुसरा वगैरे यांत येणें प्रमाणें आढळतें:–

> ततोपि हि सहस्रेषु दशाधिक शतत्रये॥ भविष्यं नंदराज्यंच चाणक्यो यान् हनिष्यति॥ इतिस्कंदपुराणं॥ ॥नवनंदान् द्विजः कश्चित् प्रपन्ना नुद्धरिष्यति॥ तेषामभावे पृथिवीं मौर्या भोक्ष्यंति वै कलौ सएव चंद्र गुप्तंवै द्विजो राज्येऽभिषेक्षति॥ भागवत स्कंध १२ वा.

या मध्यें जो श्लोक आह्मी प्रथम लिहिला आहे, त्यावर पाणिनि वैयाकरण हा कधीं झाला, त्याची उत्पत्ति वगैरे सांगतांना सिद्धांत कौमुदीच्या (सरला नामक व्याख्येच्या) पूर्वार्द्धांतील प्रस्तावनेंत, कलकत्ता येथील संस्कृत विद्यालयांतीलव्याकरण शास्त्र विषयाचे प्रोफेसर तारानाथ तर्कवाचस्पति यांनीं सुमारें बारावर्षां मागें जी व्याख्या लिहिली तीच आह्मीं आजच्या चालू काळास अनुसरून अंकांमध्यें मात्र फेरफार करून येथें घेतली आहे.

> "द्विसहस्रेषु, द्विसहस्र वर्षमध्ये निर्द्धारण सप्तमी, दशाधिक शतत्रये
> "स्थिते सतीति शेषस्तथा च नवत्यधिक षोडश शत वर्षेषु कलेर्गते
> "ते ष्वित्यर्थ लाभः । नंदराज्य मित्यस्य नंदानां राज्य मित्यर्थः उत्त-
> "रपदे पानिति बहुवचन निर्देशात् । तस्मादुक्त १६९० मित वर्ष वि-
> "योगे ३२९० मित वर्षाः सांप्रतं नंदराज्यस्य परमावधि कालादतीता
> "इत्यनुमीयते। तेषांच राज्यकालो भागवते शतवर्ष इति वक्ष्यते।
> "तस्मादितः पूर्वं प्रागुक्त वर्ष पर्यंतं नंदराज्य मासीत्ततश्चंद्रगुप्तरा-
> "ज्यं। अन्येपि । ततोपि त्रिसहस्रेषु दशाधिक शतत्रये इति स्कांदे

"पाठं प्रकल्प्य, त्रिसहस्र वर्ष मध्ये दशाधिक शतत्रये स्थिते सतीति
" व्याख्याय २६९० मित वर्षेषु कलेर्गतेषु नंदराज्य मासीत्ततः शत वर्षा-
"ते चंद्रगुप्त राज्यमिति व्याख्यायंते। एतच्च यद्यपि इंग्लंडीय भाषे-
"तिहास ग्रंथानुसारी। तथापि भागवत विरोध भिया प्रमाण परतंत्रैर्ना-
"द्रियते इत्यवधेयम्॥

अर्थ– दोन हजारांत तीनशें दहा वजा केल्यानें बाकी सोळाशें नव्वद राहतात.ही युधिष्ठिर शकाची गतवर्ष संख्या आज कलीचीं गत वर्षें ४९८० यांत वजा घातलीं असतां, नंदराज्याचा ३२९० परमावधि काल होतो. यांत त्यांचीं शंभर वर्षें राज्यकेल्याची संख्या मिळविल्यानें ३३९० वर्षें होतात. येथपर्यंत नंदराज्य होऊन गेल्यास झालीं. सारांश पूर्वोक्त १६९० वर्षां पर्यंत नंदराज्य होतें: नंतर पुढें चंद्रगुप्ताचें राज्य झालें.

कित्येकांनीं– द्विसहस्रेषु असा स्कंदपुराणांतील मूळचा पाठ आहे तो स्वकल्पनेनें बदलून, त्या ठिकाणीं त्रिसहस्रेषु असा नवा पाठ कल्पिला आहे. व त्यांतून ३१० वजा घातल्यानें २६९० वर्षें ठरविलीं आहेत. हीं वर्षें आज कलीचीं गत वर्षें ४९८० यांत वजा करून बाकी राहिलीं वर्षें २२९० हा नंद व चंद्रगुप्त यांचा असण्याचा काळ कल्पून एकदम हजार वर्षें गडप करून टाकिलीं आहेत. परंतु हा पाठभेद भागवताशीं विरुद्ध असल्या कारणानें जरी इंग्रजी इतिहासास अनुसरून आहे, तरी प्रमाण परतंत्र त्यास्तव अनादरणीय आहे.

दुसरें जैन लोकांच्या ग्रंथांत स्पष्ट असें लिहिलें आहे कीं, चाणक्यानें नंदराजास मारून युधिष्ठिर शक १६९३ प्रमाथीनामक संवत्सरीं चंद्रगुप्तास राज्यावर बसविलें. अर्थात् हा शक वरील १६९० शीं अगदींच जवळ असल्या कारणानें उघड सिद्ध होतें कीं, चाणक्य व चंद्रगुप्त यांस होऊन गेल्यास आज सुमारें तेहेतीसशें वर्षें झालीं आहेत.

असो. असें सांगतात कीं, चाणक्याचा बाप मरण पावल्यावर त्याला घरांत वडील काय ती एक आई मात्र राहिली होती. ती वृद्ध असतां तिची यानें चांगली सेवा केली. या वरून हा मातृभक्त चांगला होता, असें उघड दिसून येतें. हा पुढें राज्याच्या धालमेलींत शिरला. नंदराजाचा व याचा प्रथम चांगला स्नेह जडला; परंतु पुढें काय झालें असेल तें असो, त्याच नंदाशीं याचें पराकाष्ठेचें वैमनस्य पडलें. त्यावरून यानें चिरडीस जाऊन प्रतिज्ञा केली

कीं, नंदास राज्यभ्रष्ट करीन, त्या दिवशीं शेंडी बांधीन. असें ह्मणून ती मोकळी सोड-ली. पुढें याची प्रतिज्ञा लवकरच सिद्धीस गेली. ती अशी कीं, नंदराजा याच्या हा-तून मारला जाऊन यानें आपला मित्र चंद्रगुप्त त्यास राज्यावर बसविलें. (ग्पा०)

**चातुर्यगुणग्राहक—** निष्कुळानंदकृत गुजराथी भाषेंतील ग्रंथ.

**चांदबराई—** लाहोर येथील राहणारा जातीचा भाट होता. व अजमीर येथील पृथ्वीराय राजाच्या पदरीं असे. यास कित्येक चांदभाट अशा नांवानेंही ओळख-तात. (बुल्ह० शोध०)

**चांदबोधला—** हकीगत सांपडली नाहीं. मात्र हा साधु होता इतकेंच समजलें आहे.

**चांदभाट—** चांदबराई तोच. [ बंधूचा हल्लीं वंश आहे.

**चाफळ—** हा गांव साताऱ्यापासून चौदा कोसांवर आहे. येथें समर्थ रामदास स्वामींच्या

**चामलानदी—** चंबळा नदी तीच. अशा प्रकारचें नांव जैन ग्रंथांत आढळतें.

**चारुचर्या—** धर्मशास्त्र विषयावर क्षेमेंद्र कवीनें केलेला ग्रंथ.

**चार्वाक—** कलियुग लागल्यावर, युधिष्ठिर शकांत जे साहा नास्तिक झाले त्यांतील हा पहिला असल्यामुळें यास नास्तिक शिरोमणि असें नांव सायण माध-वानीं सर्वदर्शन संग्रहांत लिहिलें आहे. क्षपणिक तोही याचाच समकालीन हो-ता. त्याचा वृत्तांत त्याच्या नांवावर आह्मी दिला आहे. याच्या विषयीं या प्रमाणें ह्म-टलें आहे:—

> आदौ लोकायत मत प्रकाशन महा पटुः॥ वेद बद्धं महा मार्गं खं-डितुं यत्नमातनोत्॥१॥ ततो बौद्धा मुक्त कच्छा स्ततो जैना दिगंबराः श्वेतांबराश्च त इति नास्तिका बहु रूपिणः॥२॥ नास्ति वेदो दितो लोक इति येषां मतिः स्थिराः॥ नास्तिकास्ते तथास्तीति मतिर्येषांत आस्ति-काः॥३॥ अवैदिक प्रमाणानां सिद्धांतानां प्रदर्शकाः॥ चार्वाकाद्याः ष-ड्विधास्ते ख्याता लोकेषु नास्तिकाः॥४॥ (आर्य वि० सुधा०).

या श्लोकांचा अर्थ आह्मी अर्हत शब्दावर लिहिला असल्यामुळें येथें इतकेंच सांगतों कीं, हा देहालाच आत्मा ह्मणणारा देहात्मवादी होता. याच्या मतांत अर्थआ-णि काम असे पुरुषार्थ काय ते दोन होते. अर्थ ह्मणजे द्रव्यादि पदार्थांचें हरए-क प्रकारें संपादन करणें, व काम म्हणजे मैथुनादिकां पासून सुख प्राप्त करू-न घेणें. अशा प्रकारच्या सर्व लोक प्रसिद्ध गोष्टींचाच यानें प्रसार केल्या मुळें, याला लोकायत असें दुसरें अन्वर्थक नांव प्रसिद्ध आहे. लोकायतां विषयीं भा-

ध्यादिक ग्रंथांत येणें प्रमाणें ह्मटलेलें आढळतें:—

> कूटस्थादि शरीरांत संघातस्यात्मतां जगुः॥ लोकायताः पामराश्च प्रत्यक्षा भास माश्रिताः॥ १॥ श्रौती कर्तुं स्वपक्षंते कोशमन्न मयं तथा॥ विरोचनस्य सिद्धांतं प्रमाणं प्रति जज्ञिरे॥ २॥

अर्थ— देह व्यापी जो चैतन्यरूप परमात्मा त्याला कूटस्थ असें ह्मटलेलें आहे. तो आदि धरून अंतीं शरीरा पर्यंत जो सर्व संघात त्याला, प्रत्यक्ष आभासाचा आश्रय करणारे जे पामर लोकायत, ते आत्मा असें बोलते झाले. आणि आपला पक्ष श्रुतिसिद्ध आहे असें ठरविण्या साठीं (अन्नं ब्रह्मेति व्यजानात्) असा जो विरोचन दैत्याचा अविचारानें झालेला सिद्धांत, तो या प्रत प्रमाण आहे, ह्मणून जाणते झाले. (प्राचीन कोशांतील विरोचन शब्द पहा.)

चार्वाक कधीं जन्मला व मरण पावला वगैरे विषयीं जैन लोकांच्या ग्रंथांत असें लिहिलें आहे:—

> चार्वाकस्य महज्जन्म उच्यते तच्छृणुष्वहि॥ अवंति देशे क्षिप्राया श्चामल्याः पुण्यसंगमे॥ शंखोद्धारे महा क्षेत्रे मध्यान्हे रविवासरे॥ ब्रभोत्तरे तथा राधे राकायांच शुभे दिने॥ शून्यंच ऋतवः स्कंद वदनानिच वामतः॥ मेलनं शक पर्यायो धर्मराजस्य धीमतः॥ प्रभवे वत्सरे शुद्धे प्रादुर्भावो विजानिहि॥ इंदुकांतः पिता यस्य माता यस्यास्ति स्रग्विणी॥ पुष्करेतु गिरौ यज्ञे मासे भाद्रपदे शुभे॥ द्वादश्यां कृष्णपक्षेतु त्रिसंधौ चंद्र वासरे॥ श्रीमुखो वत्सरो ज्ञेयो दक्षिणार्केन संयुतः पांडवस्य शाके तस्य चार्वाकस्य महात्मनः॥ पंचत्वं प्राप्त कुणपं समाप्ति मगमत्तदा॥ ऋतुर्मनुज नेत्रेच ऋषीणां मेलनं कुरु॥ स एव अवधिर्ज्ञेयो चार्वाकस्य महात्मनः॥ इति

अर्थ— अवंती देशांत क्षिप्रा नदी व चामला नदी यांच्या संगमीं शंखोध्दार नामक क्षेत्र आहे. तेथें कलियुगाचीं अथवा युधिष्ठिर शकाचीं साहाशें साठ वर्षे गेल्यावर, ६६१ व्या वर्षी प्रभव संवत्सर चालला असतां उत्तरायणांत वैशाख शुध्द पौर्णिमा रविवारीं मध्यान्ह समयास चार्वाकाचें जन्म झालें. याच्या बापाचें नांव इंदुकांत व आईचें स्रग्विणी होतें.

पुढें पुष्कर तीर्थी यज्ञनामक गिरीच्या ठायीं भाद्रपद शुद्ध द्वादशी सोमवारीं श्रीमुख संवत्सर असतां युधिष्ठिर शकाचीं ७२६ वर्षे गेल्यावर ७२७वे

वर्षी दक्षिणायनांत चार्वाक मरण पावला. या वरून यास होऊन गेल्यास आज श्रेचाळीसशें वीस वर्षे झालीं आहेत असें स्पष्ट होतें.

सर्व दर्शन संग्रहांत माधवाचार्यांनीं याचें मत काय आहे त्या विषयीं येणें प्रमाणें लिहिलें आहे:-

> अत्र चत्वारि भूतानि भूमिवार्यनलानिलाः ॥ चतुर्भ्यः खलु भूतेभ्य श्चैतन्य मुपजायते॥ किण्वादिभ्यः समेतेभ्यो द्रव्येभ्यो मदशक्ति- वत्॥ अहं स्थूलः कृशोऽस्मीति सामानाधिकरण्यतः॥ देहः स्थौ- ल्यादि योगाच्च स एवात्मा नचापरः॥ मम देहोऽयमित्युक्तिः सं- भवेदौप चारिकीति॥

अर्थ— पृथिवी, आप, तेज आणि वायु हीं चार भूतें परस्पर संयोग पाऊन दे- हाच्या रूपानें परिणाम पावलीं ह्मणजे त्यांत ऐतेंच जीवचैतन्य उत्पन्न होतेंज- शीं किल्येक द्रव्यें संयोग पावलीं ह्मणजे त्या पासून मद्य होतें. अथवा पान सु- पारी चुना, कात हे एकत्र मिळाल्यानें तांबडा रंग उत्पन्न होतो. त्याच प्रमाणें जीव चैतन्य ह्मणून कांहीं निराळें आहे असें नाहीं. चार भूतांचा जो परस्पर सं- योग त्याचें नांव जीवचैतन्य, आणि वियोग तो त्याचा नाश होय. सारांश प्र- त्यक्ष चैतन्ययुक्त जो देह हाच आत्मा, असें चार्वाकाचें ह्मणणें आहे. कारण मी स्थूल, मी कृश असा प्रयोग हें यास प्रत्यक्ष प्रमाण आहे. आतां माझा देह असा जरी प्रयोग होतो, आणि त्या वरून माझा असें ह्मणणारा कोणी तरी निराळा असेलसें वाटतें, तरी तो प्रयोग राहूचें शिर या म्हणण्या प्रमाणेंऔ- पचारिक आहे. कारण राहु तोच शिर असें. सर्व लोक प्रसिध्द आहे.

आतां द्रव्यसंपादन आणि स्त्रीसंभोग यां पासून होणाऱ्या सुखास दुःख- मिश्रितता आहे, यास्तव अर्थ आणि काम हे पुरुषार्थ नव्हेत, तर असें कोणी ह्मणूं नये.

> त्याज्यं सुखं विषय संगम जन्म पुंसां दुःखोपसृष्टमिति मूर्ख विचा- रणैषा॥ व्रीहीन् जिहासति सितोत्तम तंडुलाढ्यान् कोनामभोस्तुष कणोप हितान् हितार्थी॥

अर्थ- धान्य घेऊं गेलें असतां, त्या समागमें भूस येतें; किंवा मत्स्यादिकां समा- गमें कंटक इत्यादि येतात, ह्मणून जसा कोणी धान्य व मत्स्य टाकीत नाहीं, त- र भूस व कंटक यांचा त्याग करून सुखार्थी सुख्यार्थ ग्रहण करून सुखोप-

भोग घेतो. त्याच प्रमाणें द्रव्य आणि स्त्रीसंभोग, यांतील दुःखाचा त्याग करून शाहाणे आहेत ते सुख मात्र घेतात. मूर्ख प्रमाणें दुःखभीतीनें सुख टाकीत नाहींत. पहा बरें, धान्यास उपद्रव देणारे पशू आहेत म्हणून, किंबा अन्न मागणारे मधुकरी आहेत म्हणून त्या भयानें कोणी शेत पेरीत नाहींत व पाक करीत नाहींत काय ? तर धान्य पेरितात आणि पाकही करितात. या प्रमाणें हीं उदाहरणें प्रत्यक्ष सिद्ध असतां जो कोणी दुःखभयानें सुख टाकितो तो पशूच जाणावा.

अग्निरुष्णो जलं शीतं शीतस्पर्शस्तथा निलः॥ केनेदं चित्रितं तस्मात् स्वभावात्तद्व्यवस्थितिः॥

अर्थ— देहोत्पत्तीस कर्माची अपेक्षा नाहीं; कारण कर्म आहे अशा विषयीं प्रत्यक्ष प्रमाण नसून तें केवळ अनुमान सांध्य आहे. अनुमान प्रमाण हें तर मुळींच मिथ्या आहे. तर मग जगत् कसें उत्पन्न होईल? हें एक आणि दुसरें, एक रोगी, एक निरोगी, व एक दरिद्री, एक श्रीमान् असें कां ? याचें उत्तर असें आहे कीं, जगाची उत्पत्ति व त्यांतील वैचित्र्य हीं स्वाभाविकच आहेत. म्हणजे स्वभावें करूनच तीं तशीं उत्पन्न झालीं आहेत. जसा अग्नि हा सहज उष्ण व पाणि आणि वायु सहज शीतल आहेत त्या प्रमाणें.

न स्वर्गो नापवर्गो वा नैवात्मा पारलौकिकः॥ नैव वर्णाश्रमादीनां क्रियाश्च फलदायिकाः॥ १॥ अग्निहोत्रं त्रयो वेदा स्त्रिदंडं भस्म गुंठनं॥ बुद्धि पौरुष हीनानां जीविका धातृ निर्मिता॥२॥ पशुश्चेन्निहतः स्वर्गं ज्योतिष्टोमे गमिष्यति॥ स्वपिता यजमानेन तत्र कस्मान्न हिंस्यते॥ ३॥ मृतानामपि जंतूनां श्राद्धंचेत्तृप्ति कारणं॥ गच्छतामिह जंतूनां व्यर्थं पाथेय कल्पनं॥ ४॥ स्वर्गस्थिता यदा तृप्तिं गच्छेयुस्तत्र दानतः॥ प्रासादस्योपरिस्थाना मत्र कस्मान्न दीयते॥ ५॥ यावज्जीवेत्सुखं जीवेदृणं कृत्वा घृतं पिबेत्॥ भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः॥ ६॥ यदि गच्छेत् परं लोकं देहादेष विनिर्गतः॥ कस्माद्भूयो न चायाति बंधुस्नेह समाकुलः॥ ७॥ ततश्च जीवनो पायो ब्राह्मणैर्विहितस्त्विह॥ मृतानां प्रेत कार्याणि नत्वन्य द्विद्यते क्वचित् ॥ ८॥ त्रयो वेदस्य कर्तारो भंडधूर्त निशाचराः॥ जर्फरी तुर्फरीत्यादि पंडितानां वचः स्मृतं॥ ९॥ अश्वस्यात्रहि शिश्नंतु पत्नी ग्राह्यं

प्रकीर्तितं॥ भंडैस्तद्वत्परंचैव ग्राह्य जातं प्रकीर्तितं॥१०॥ मांसानां खादनं तद्वत् निशाचर समीरितं॥

अर्थ— परलोक नाहीं, परलोकीं गमन करणारा आत्मा नाहीं, व तेथें सुखही नाहीं. वर्णाश्रमांच्या क्रियां पासून कांहीं फल होतें असें ह्मणतात; परंतु त्यांत कांहीं हांशील नाहीं. कोणी ह्मणेल जर हें कांहींच नाहीं, तर मोठ मोठे विद्वान् द्रव्यसाध्य व कष्टसाध्य, वेदोक्त अग्निहोत्र, यज्ञ इत्यादि कर्में करण्यास कसे प्रवृत्त होतात? तर असें समजावें कीं, जे बुद्धिहीन व पौरुष ह्मणजे पराक्रम हीन पुरुष आहेत, त्यांस हा जीवनोपाय आहे. दुसरें कांहीं नाहीं. कारण वेदच मुळीं भंड, धूर्त आणि निशाचर ह्मणजे थट्टेखोर, ठक आणि राक्षस यांनीं केले असल्या मुळें त्यांतील कर्में तशींच आहेत. यज्ञांत पशु मारला असतां, जर त्यास स्वर्ग प्राप्त होतो, तर असें करण्या पेक्षां यजमानानें पित्यासच कां मारूं नये? श्राद्धानें पितरांची तृप्ति आहे ह्मणावी तर, गांवास जाणारानें बरोबर फराळाचें ओझें वागवावें यांत हांशील काय? घरीं मुलानें श्राद्ध करावें ह्मणजे झालें. जर येथें अन्नादिक दान केलेलें स्वर्गस्थ पितरांस पावतें, तर घराच्या खालच्या मजल्यांत केलेलें दान वरच्या मजल्यांतल्यास पोहोंचावें तसें कां घडत नाहीं? देहाहून भिन्न आत्मा परलोकास जर गेलाच आहे तर तो बंधु इत्यादिकांच्या स्नेहास्तव त्यांस कां कधीं येऊन भेटत नाहीं? यास्तव जीव आहे तों पर्यंत खुशाल खावें प्यावें. व वेळेस कांहीं नसलें तर बेलाशक ऋण काढून तूप प्यावें. ऋणाचें भय बिलकुल बाळगूं नये. कारण भस्म झालेला देह पुनः जन्मास येतनाहीं. आणि जन्मच नसल्या कारणानें, ऋण फेडण्याची पंचाईतही नाहीं. सारांश घोड्याचें शिश्न जसें पत्नीस ग्राह्य हें वाक्य थट्टेचें आहे, तशाच वेदामधील गोष्टी असून मांस भक्षण करण्यास राक्षस मात्र शिकवितील, दुसरे कोणी शिकविणार नाहींत. तस्मात् परलोक प्राप्तीच्या आशेनें जे कोणी येथें सध्याकष्ट सोशितात ते कंटकां दिकां पासून होणाऱ्या वेदनां प्रमाणें नरक दुःखच अनुभवितात. सारांश प्रत्यक्ष जें कष्टरूप दुःख, याचेंच नांव नरक, स्त्रीसंभोगादिक जें सुख तेंच स्वर्ग, प्रत्यक्ष प्रमाण तेंच प्रमाण, लोक प्रसिद्ध जो राजा, तोच परमेश्वर, आणि देहपात हाच मोक्ष. याहून स्वर्ग, नरक, ईश्वर, अनुमानादिक प्रमाणें व मोक्ष दुसरे नाहींत. या प्रमाणें शुक्राचार्य तपश्चर्येस गेले असतां बृहस्पतीनें त्यांचें रूप धारण करून दैत्यांच्या बुद्धीस मोह होण्यासा-

ठीं, विरोचन सिद्धांताचें पुष्टीकरण केलें व त्यांस जें मत शिकविलें त्या मताचा अनुयायी जो चार्वाक त्याचें हें वरील ह्मणणें आहे. (सर्व द० सं०).

या प्रमाणें सर्वदर्शन संग्रहा मध्यें, माधवाचार्यांनीं गद्यपद्य रूपानें चार्वाक मताचा जो अनुवाद केला, त्यांतील अभिप्राय आह्मी येथें थोडक्यांत लिहिला. त्याच प्रमाणें बौद्ध व जैन हे ही उभयतां चार्वाक मता विषयीं काय ह्मणतात तेंही कळावें ह्मणून त्यांतील वाक्यें वाचकांस सादर करितों.

पुण्यजनैर्दुष्कृतिभिर्वेदवादः प्रवर्तितः ॥ निषेध विधिमार्गोंहीं कोणपैं रचितो पुरा ॥ नत्यस्ति तेषां प्रामाण्यं श्रुतीनां शास्त्र कर्मणाम् कर्मश्चोपासना ज्ञाना दपवर्गो भवेध्रुवं ॥इत्यादि वंचकैर्धूर्तैः कथितं नच पंडितैः ॥ वेदवादस्य प्रामाण्यं मन्यंते मनुजाःखराः॥ कृत्वा यज्ञेषु जीवानां हननं पुण्यकारकं॥ देहांते स्वर्ग माप्नोति लिशुर्विप्रा ब्रुवंतिते॥ तस्मादादौ यज्ञकर्त्ता पशुः स्थानेषु योजयेत्॥ वृथा यज्ञेषु हननं पशूनां दीन चेतसां॥ कुर्वंति ब्राह्मणा मूर्खाः पलभक्षण तत्पराः॥ धिषणश्च प्रयत्नेन निषेध कृतवान् पुरा॥ देहांते सर्व जंतूनां मुक्तिस्या दिति निश्चयः॥ अयत्नेन भवेज्जन्म तथामोक्षो भवेध्रुवं॥ जरा मरण जन्मादि संसारो वर्तते यदि॥ तर्हिनक्षत्य भिज्ञानं जंतूनां किं न वर्तते॥ तस्मात्सर्वं त्यजेत्कार्यं कर्तव्यं मनसा मुदा॥ यस्मात्सुखं लभेन्नित्यं पुरुषार्थः सउच्यते॥ चार्वाकक्षपणीकाभ्यां वादेन निर्जिता मही॥ वेद वादस्य मिथ्यात्वं एवंच प्रतिपादित मिति॥ (जैन ग्रंथ).

याचा अर्थ वर लिहिला त्या हून भिन्न नाहीं, ह्मणून लिहिणें नको. अशा प्रकारचें हें मत बौद्धांस संमत नसल्या मुळें बुद्धानें याचें एकांशीं खंडन केलें आहे, तें आह्मीं पुढें बुद्ध पहिला त्याच्या नांवावर दाखविलें आहे; यास्तव तें तेथें पहावें.

**चिंचवड**— हा गांव पुण्याच्या उत्तरेस पांच कोसांवर पवना नदीच्या कांठीं आहे. येथें मोरया गोसावी नांवाचे एक सिद्ध पुरुष सुमारें तीनशें वर्षां मागें होऊन गेले त्यांचे वंशज राहतात. हे सर्व मूळ पुरुषा पासून गणपतीचे उपासक आहेत. (तुका० गाथा).

**चिंतामणिकवि**— रसमंजरी परिमल नामक संस्कृत ग्रंथाचा कर्त्ता. (बु० शोध. )

२– हा कवि कधीं व कोठें झाला तें कळत नाहीं. मराठी भाषेंत ध्रुवाख्यानावर याच्या दिंड्या आहेत. यानें;– "सूर्यवंशीं उत्तानपाद राजा॥ रूपवंती तयासि दोन भाजा॥" असें लिहिलें तें बरोबर नाहीं. कारण, हा राजा स्वायंभू मनूचा पुत्र असल्या मुळें सूर्यवंशांतला मुळींच नाहीं. आमच्या प्राचीन कोशांतील (उत्तानपाद) शा० पहा.

चिंतामणिदेव– प्रसिद्ध मोरया गोसांवीं त्यांचे पुत्र. हे तुकाराम्यच्या वेळेस होते, व त्यांची याची भेट होती. (राम० क०)

चिद्घनस्वामि– अचल बावांचे शिष्य. यांचें विशेष वृत्त आढळलें नाहीं.

चित्तप्रबोध– प्रसिद्ध वल्लभाचार्य कृत ग्रंथ.

चिद्विलास– भगवत्पादपूज्य श्रीमच्छंकराचार्यांच्या शिष्यांतील एक सन्यासी.

चित्सुखाचार्य– वर प्रमाणेंच.

चित्सुधा– वामनपंडित कृत मराठींत श्लोक बध्द असलेला ग्रंथ.

चिन किलिच खान– मीर कमरुद्दिन ज्यास निजाम उल्मुलुख असें प्रसिद्ध नांव होतें तोच. याचें जन्म शके १५६६ मध्यें झालें होतें. यानें आपल्या गादीची जागा हैदराबाद येथें शके १६४२ मध्यें केली व तेथें राहिला. याच्या वंशास निजामशा असें नांव आहे. (हिंदु० छा० इति०)

चिन्नवीरन्ना– कोंडवीडू येथील राजा अन्नाचे मारेड्डी त्याच्या वेळीं हा कवि होता. याचें जन्म तेनाली प्रांतांत झालें होतें. व हा पिल्लल मरिवारु कुळांत जन्मलेला जातीचा तैलंग ब्राह्मण असे. याला लहानपणापासून विद्येची अभिरुची असल्या मुळें यानें आपला सर्व काळ विद्याभ्यासांत घालवून लवकरच राजाच्या दरबारांत कविपद मिळविलें. पेद्दवीरन्ना जो याचा वडील भाऊ होता, तो जरी याच्या प्रमाणें विद्वान् नव्हता तरी त्यानें आपला सर्व काळ दुराचरणांत गमाविला असे. असें असतांही, भावाच्या योग्यते वरून त्याचीही प्रतिष्ठा राजदरबारांत असे. राजास जरी याची खरी योग्यता माहीत नव्हती, तरी दरबारांतील सर्व मंडळीस तो केवळ जडभारती असल्याची पक्की माहिती होती.

एकदां असें झालें कीं, राजानें सहजीं पेद्दवीरन्नास म्हटलें. अहो, प्राचीन कवीनीं जी गोष्ट हातीं घेतली नाहीं, अशा अभिनव विषयावर कांहीं काव्य रचून आणा, तेव्हां असा ग्रंथ रचणें केवढें दुर्घट काम आहे, हें मनांत न आणितां, यानें एकदम राजास म्हटलें. थोड्याच दिवसांत आज्ञा झाल्या प्रमाणें ग्रंथ तयार करून आणिलों. इतकें बोलून तो दरबारांतून घरीं आला, परं-

तु चिंतेंत पडला कीं, आतां पुढें काय करावें. मग त्यानें ही गोष्ट आपल्या भावजयीस सांगून तिला ह्मटलें, सदरहू ग्रंथ करून देण्या विषयीं तूं आपल्या नवऱ्यास युक्तीनें कळीव. त्यावरून तिनें ती गोष्ट नवऱ्यास कळविली. तेव्हां तो ह्मणाला त्याला कांहीं चिंता करूं नको म्हणून सांग. परंतु एक कर कीं, मुदत भरण्याच्या पूर्वी तीन दिवस अगोदर मला आठवण करण्याची त्यास सूचना दे. त्या प्रमाणें तिनें हा निरोप तिचा दीर पेद्दी यास कळविला.

पुढें मुदत भरत आली तेव्हां पेद्दीनें भावजयीस स्मरण दिलें. तिनें लागलीच नवऱ्यास सूचविलें. त्यावरून यानें बायकोस सांगितलें कीं, आज आपल्या घरांतील एक खोली झाडून सारवून तयार कर, आणि तींत चौरंग मांडून व त्यावर कोरे कागद, शाई, व सोन्याची लेखणी ठेऊन, सभोंवत्या चार समया तेल वाती घालून तयार करून ठेव. त्या वरून तिनें ती सर्व तर्तूद केली. नंतर रात्रीचें जेवण होतांच हा त्या खोलींत गेला. आणि त्यानें इष्टदेवतेची प्रार्थना केली. त्या बरोबर सरस्वती प्रगट होऊन चौरंगावर येऊन बसली. आणि ग्रंथ लिहूं लागली. ती अरुणोदय होई पर्यंत तिनें ग्रंथाचे पांच सर्ग लिहून तयार केले. पांचच श्लोक समासीचे लिहिणें राहिले होते. इतक्यांत, चिन्नवीरन्ना आपला भाऊ खोलींत काय करतो म्हणून पाहण्या साठीं पेद्दीनें दाराच्या फटींतून डोंकाविल्या मुळें, श्लोक पुरे न होतां सरस्वती अदृश्य झाली. असें पाहून यानें ते पांच श्लोक पुरे केले. आणि तो ग्रंथ बायकी जवळ देऊन त्याला कळविण्यास सांगितलें कीं, यावर तूं आपलें नांव घाल व राजास नेऊन हा ग्रंथ नजर कर. तोच ग्रंथ पंच डब्बु या नांवानें तैलंगणांत प्रख्यात आहे. सारांश आपल्या भावाची देवता भक्ति, व तो ग्रंथ पाहून पेद्दीभट्टास अतिशय आनंद झाला. नंतर तो त्यानें राजास नजर केल्यावरून राजा फार खुष झाला. व त्यानें त्याची मोठी वाहवा केली. तेव्हां पासून लोकांस त्याची मोठी ख्याति झाली. (कविच०).

**चिन्ह चिंतामणि**– निष्कुलानंदकृत ग्रंथ गुजराथी भाषेंत.

**चित्रकूट**– एक लहानसा पर्वत व त्या खालचें पयोष्णा नदीच्या कांठचें शहर.

**चित्रभानु**– बाणभट्टाच्या बापाचें नांव.

**चित्रमीमांसा**– अपय्यादीक्षितकृत अलंकार विषया वरील संस्कृत ग्रंथ.

**चित्ररथ**– युधिष्ठिर वंशीय कलियुगांतील राजा. यानें ७७ वर्षें ७ महिने व सात

दिवस राज्य केलें. याच्या राज्यकारकीर्दीच्या अखेरी पर्यंत कलियुगाचीं ह्मणजे युधिष्ठिर शकाचीं ६६० वर्षे ४ महिने व १४ दिवस गत झाले होते. व चार्वाक नांवाचा नास्तिक उत्पन्न झाला होता. या राजाच्या बापाचें नांव निमित्तचक्र आणि यास पुत्र होता, त्याचें नांव कविरथ होतें. (हिंदु० हस्त० इतिहा० व जैन ग्रंथ).

**चिदंबरकोरु**– चिदंबरेश्वर देवावर, माणिक्य व्यासर यानें केलेलें तामिळ भाषेंत कविता रूपानें स्तवन.

**चिदंबरदीक्षित**– हा सिद्ध पुरुष काण्व ब्राह्मण होता. मलप्रभेच्या तीरीं नवलगुंद नामक गांवीं हा राहात असे. हा धाकल्या बाजीरावाच्या कारकीर्दींत होता. (हट्ट मा०).

**चिदंबरपुर**– हें नगर कावेरी नदीच्या दक्षिणतीरीं कुंभकोण आणि त्रिचनापल्ली यांच्या मध्यें द्रविड देशांत आहे. येथें जें महादेवाचें नामांकित लिंग आहे, त्यास आकाशलिंग असें नांव आहे. तथापि देवास चिदंबरेश्वर असें ह्मणण्याची फार रूढी आहे. या विषयीं आनंदगिरीनें आपल्या शंकर विजयांत ही असेंच लिहिलें आहे.-" ततः सर्वात्मको देव श्चिदंबर पुराश्रितः ॥ आकाश लिंग नाम्नातु विख्यातोभून् मही तले॥" भगवत्पाद पूज्य श्रीमच्छंकराचार्य पहिले त्यांची हें नगर जन्मभूमि होतें. (आनं० शंक० व जैन ग्रंथ.)

**चिदंबरेश्वर**– चिदंबर येथें जें शिवलिंग आहे, व ज्यास आकाशलिंग ही संज्ञा आहे, त्याचें नांव. या देवाची सेवा आपल्या कामाक्षी स्त्रीसह वर्तमान, सर्वज्ञ नांवाच्या एका कुलीन ब्राह्मणानें बहुत दिवस केल्या वरून त्यास विशिष्टा अशा नांवाची एक कन्या झाली, तीही याच देवास भजत असून प्रख्यात जे पहिले शंकराचार्य त्यांची आई होती. (आ०शंक०).

**चिदस्थिमाला**– वैद्यनाथ कविकृत शब्देंदु शेखरावरील संस्कृत व्याख्या.

**चिदानंद**– राजश्यामलोपासक एक वाममार्गी शाक्त. (आनं० शंक० प्र० २२) पहा.

**चिनाबनदी**– पंजाबांतील नद्यां मध्यें प्रसिद्ध जी चंद्रभागा नदी तिला हल्लीं ह्मण.

**चिमणाकवि**– अकुलनेर येथील राहणारा हा कवि जातीचा देशस्थ वाजसनी ब्राह्मण होता. हा गृहस्थ असून यानें कांहीं काळ पर्यंत कोडतांत सनदी वकिलीचें काम केलें होतें. नारायण तीर्थ ऊर्फ हंसराज स्वामि, त्यांचा यानें कांहीं कालानें अनुग्रह घेऊन वकिलीचें काम सोडलें, व कीर्तन करूं लागला. यास गाण्या-

चें आंग व कविता शक्ति दोनीही अवगत होतीं. स्वामींच्या शिष्य मंडळींत याची गणना तिसरी होती. यानें हंसपद्धति नांवाच्या ग्रंथाचीं आठ अष्टकें ग्रंथ सुमारें पांच हजार लिहिला आहे, व त्यांत गुरुपरंपरा वर्णिली आहे. यानें स्वामींवर आरती लिहिलेली खालीं लिहिली आहे, तींत याचें नांव स्पष्ट आढळतें

> जय जय जय जय आरति सद्गुरु नारायण हंसा ॥ आरति ओंवाळितांचि देहबुद्धि तुरे सहसा ॥ ध्रु० ॥ माया विपिनीं बहु जिव भ्रमले उमजेना कोणा ॥ व्यवहारें सुख दुःख कष्टफळ भोगिती नाना ॥ या तळमळीची सद्गुरु लागीं आली बहु करुणा ॥ म्हणुनि समर्थ व्यक्ति धरोनि उपदेशिती ज्ञाना ॥ जय० ॥ १ ॥ दर्शन मात्रें अधिकारातें पावती सकळ ॥ व्यतिरेकानें निजरूप दाऊन तोडिती भवजाळ ॥ तेंचि अन्वयें पाहतां विरती सर्वही तळमळ ॥ यास्तव निजपद कमळीं लोळे चिमणेंसें बाळ ॥ २ ॥ जय० ॥

याचें जन्म शके १७३५ मध्यें अकुळनेरास झालें होतें. हा शके १७९४ मध्यें बेगम पुऱ्यास समास झाला; कारण तेथेंच याचा मठ आहे. याचें मूळचें नांव व्यंकोबा असें समजतें.

**चिमणाजी बल्लाळ**– बाळाजी विश्वनाथ पंतप्रधान ऊर्फ पेशवे यांचा धाकटा मुलगा. याचें जन्म शके १६१९ त झालें होतें. बाजीराव बल्लाळाचा हा धाकटा भाऊ होता. व यास गुजराथी लोक चिमणा राजा म्हणत. हा मोठा शूर पुरुष होऊन गेला. आपल्या भावास मदत करण्यास हा मोठा तत्पर असे, त्या मुळें बाजीराव जो याचा वडील भाऊ तो यास आपला जीवप्राण समजे. याच्या बायकोचें नांव रखुमाबाई असून सदाशिवराव भाऊ तो याचाच पुत्र होता. हा शके १६६२ मध्यें बाजीरावाच्या मागून नऊ महिन्यांनीं मरण पावला. (हिंदु० छा० इति०)

**चिमणाजी रघुनाथ**– रघुनाथ बाजीराव ऊर्फ दादा साहेब त्यांच्या औरस दोन पुत्रांतील धाकटा.

**चिमासीसाती**– तिमच्या सातीचा बाप.

**चिरकीर्ति**– सिद्धोपासक मताचा पुरुष. (आनं० शंक० प्रक० ४९).

**चिरंजीवभट्ट**– विवनमोदतरंगिणी ग्रंथाचा कर्ता. (बुल्ह० का० शोध०)

**चिलंब्रम**– या नांवाचा तैलंगणांतील एक गांव

**चीनदेश**– हिंदुस्थानाच्या ईशान्ये कडील देश. येथील लोक बौद्धधर्मी आहेत. याचें मुख्य शहर पिकीन नांवाचें आहे.

चुरवल– अभिनव गुप्ताच्या बापाचें नांव.

चेतवणी– द्वारको भगत कृत गुजराथी भाषेंतील कविता. (हिं·न·)

चेदीदेश– अलाहाबादेच्या नैर्ऋत्य दिशेकडील देश. यांतून तमसा नदी वाहते. (प्रा·

चेनराईपत्तन– हें शहर म्हैसूर प्रांतांत आहे. येथें जैनांच्या चोवीस तीर्थकरांच्या मूर्ति असून त्या पाहण्या सारख्या आहेत असें सांगतात. (ग्यारे· इं· कोश·).

चैतन्यचरणामृत– बंगाली भाषेंतील ग्रंथ. याचा कर्ता कविकंकण होय.

चैतन्यस्वामि– बंगाल्यांत शके १५०० मध्यें होऊन गेलेला नामांकित सन्यासी. (बु·शो·)

चोखामेळा– पंढरपुरचा वतनदार जातीचा अतिशूद्र होता; परंतु विठोबाचा एकनिष्ठ भक्त असे. शके १२०० मध्यें हा नामदेवाच्या किंचित् अगोदर होता असें दिसतें. कारण जनाबाईनें एक अभंग याच्या विषयीं लिहिला आहे तो येणें प्रमाणें:–

जातीहीन चोखामेळा॥ त्याला भक्तीचा कळवळा॥१॥ त्याचा झाला म्हणियारा॥ राहे घरीं धरी थारा ॥२॥ देव जेवी नचा घरा॥ त्याचा भक्तिभाव खरा॥३॥ देव बाटविला तेणें॥ हांसे जनी गाय गाणें॥ ४ ॥

गांवांत मेलेलीं गुरें ओढून गांवा बाहेर न्यावीं हें याचें काम होतें. याला देव गुरें ओढूं लागे व याच्या घरीं जेवी, त्या मुळें देवास यानें बाटविलें असा याच्यावर आरोप येऊन ब्राह्मणांनीं सरकारांत फिर्याद केली. तिची चौकशी होऊन सदरची गोष्ट खरी आहे अशी अधिकाऱ्याची खात्री झाल्यावर, त्यानें यास बैलाच्या पायीं बांधून मारण्याचा हुकूम केला. त्या वेळेस असें सांगतात कीं, त्या संकटांतून देवानें यास सोडविलें. पंढरपुरास महाद्वारा पुढील नामदेवाच्या पायरी जवळ डाव्या बाजूस याच्या समाधीचा दगड आहे. (भक्तवि· अ·२३).

चोरकवि– जयदेवानें कित्येक कवि वर्णितानां याच्या विषयीं या प्रमाणें म्हटलें आहे,–" यस्याश्चोरश्चिकुर निकरः कर्णपूरो मयूरो, भासो हासः कविकुल गुरुः कालिदासो विलासः॥ हर्षो हर्षो हृदय वसतिः पंच बाणस्तु बाणः; केषां नैषा कथय कविता कामिनी कौतुकाय १" अर्थ– ज्या कविता कामिनीचा चोर कवि हा केश पाश, मयूर कवि कर्णभूषण, भास हा हास्य, कालिदास विलास, हर्ष चित्ताचा आल्हाद, आणि बाण हा जिच्या हृदयांत संचार करणारा साक्षात् पंचबाण म्हणजे मदन, ती कोणाच्या मनास कौतुक करीत नाहीं? तर करिते असा भाव.

चोलदेश– द्रविड देशाच्या पश्चिमेकडील देश. (प्रा· न·) याच्याच संबंधानें हिंदुस्था-

त्याच्या पूर्वसमुद्र किनाऱ्यास चोलमंडल ह्मणतात. (कारमांडल) हा शब्द चोलमंडलाचा अपभ्रंश आहे.

**चोलमंडल**— हल्लीं नकाशांत कारमांडेल असें नांव आहे.

**चोळीमहेश्वर**— नर्मदेच्या कांठीं असणारें शहर. याचें जुनें नांव माहिष्मती. मंडनमिश्र येथेंच राहात होता.

**चौंडाशहर**— याचा पत्ता आह्मांस बरोबर लागला नाहीं.

**चौरंगीनाथ**— रुद्रपुरच्या भुलेश्वर राजाच्या ज्येष्ठ स्त्रीचा पुत्र. याच्या सावत्र आईनें याची आई याच्याच वेळीं गरोदर असतां, तिला नवऱ्याकडून अरण्यांत सोडविलें होतें. व तेथें ती प्रसूत झाली असतां प्रधानाकडून याचे दोनी हात व दोनी पाय तोडवून, यास सप्तशृंगाच्या अरण्यांत सोडून देवविलें होतें. पुढें याच्या दैवानें असें सांगतात कीं, यास मत्स्येंद्रनाथ भेटून याचे हातपाय पूर्ववत् झाले. व हा त्यांचा शिष्य झाला. (नाथली० अ० ६).

**चौरपंचाशिका**— चोरकविकृत संस्कृत ग्रंथ.

**चौरी**— कुंतल देशींच्या परमदीदेव राजाची कन्या.

**चौरीसुरत पंचाशिका**— बिल्हण कविकृत ग्रंथ. यांत बिल्हणाचा व चौरी राजकन्येचा स्नेह झाल्या मुळें परमदी राजानें यास फांशीची शिक्षा योजिली. त्या वेळेस वाटेनें जातानां यानें केलेला हा ग्रंथ. या ग्रंथावरून राजानें याची शिक्षा माफ केली.

**चौऱ्यांशी वैष्णवांची कथा**— वल्लभ मतांतील नामांकित चौऱ्यांशी वैष्णवांचें वर्णन.

**चौसष्टपदी**— निष्कुळानंदकृत गुजराथी भाषेंतील कविता ग्रंथ.

**छत्रसालराजा**— बुंदेलखंडांतील राजा. मोंगलांचा सरदार महंमदखान बंगष याच्यावर चालून आला असतां थोरल्या बाजीरावानें त्या संकटांतून यास सोडविलें. त्यावरून यानें बाजीरावास तिसरा पुत्र मानून ३१ लक्षांची जहागीर दिली. (हिं० इ०)

**छंदक**— शुद्धोदन राजाचा पुत्र जो सर्वार्थसिद्ध नामा बौद्ध त्याचा हा सारथि. (ललितवि० परिवर्त १५)

**छंदःशास्त्र**— छंदःशास्त्रावर बोपदेव पंडितानें लिहिलेला संस्कृत ग्रंथ.

**छंदोमंजरी**— रामजोशी कविकृत मराठी भाषेंत रचलेला पद्यरूप ग्रंथ.

**छोटामल्हारराव**— होळकराच्या गादीवरील एक पुरुष. तुळजाबाईच्या मागून हाच गादीवर बसला. यानें शके १७४० तागाईत १७५४ पावेतों चौदा वर्षे अधिकार

केला. व १७५५त मरण पावला. (हिंदु० ला० इति०)

**जगज्जीवनस्वामि**— अमदाबादेजवळ असणाऱ्या राजपुर गांवचा राहणारा ब्राह्मण संन्यासी. हा शके १६३७ मध्यें होता. हा शांकर शुद्धाद्वैत मताचा असे. यानें ज्ञानसूळ, ज्ञानगीता, आणि नरबोध असे तीन ग्रंथ गुजराथी भाषेंत लिहिले आहेत.(काव्यदो० गुज०).

**जगच्चंद्रिका**— बृहज्जातकावर उत्पलभट्टानें लिहिलेली संस्कृत टीका.

**जगदीशबावा**— एक साधु. (नाभा० भक्त०) [पहा.)

**जगदेव**— बसवाच्या तीन मशालचींतील विजलराजास मारणारा मनुष्य. (बसवश०

**जगदेवमिश्र**— शब्दावलोक ग्रंथाचा कर्ता. (बुल्ह० शोध०)

**जगद्दूर**— मालती माधव नाटका वरील टीकाकार. (बुल्ह० का० शोध०) [र्ता.(बु०शो०)

**जगधर**— बालबोधिनी, स्तुतिकुसुमांजली व अपशब्द निराकरण या तीन ग्रंथांचा क-

**जगन्नाथ**— सारप्रदीपक ग्रंथाचा कर्ता. (बुल्ह० शोध०)

**जगन्नाथकवि**— हा कवि तैलंगणाच्या उत्तरभागीं राहात असे. याचें जन्म एका प्रख्यात कुळांत झालें होतें. राजनीती विषयीं यानें तेलंगी भाषेंत पुष्कळ ग्रंथ लिहिले. भारता मध्यें भीष्मपर्वांत जे राजधर्म सांगितले आहेत, त्यांचें यानें तेलंगींत भाषांतर केलें आणि त्या मुळें यास बहुत राजांकडून आश्रय मिळाला होता. हा कवि कोणत्या काळीं होता त्या विषयीं शोध लागला नाहीं. (कविच०).

**जगन्नाथतर्कपंचानन**— विवाद भंगार्णव ग्रंथाचा कर्त्ता. (बुल्ह० शोध०)

**जगन्नाथदास**— प्रसिद्ध जो तुळशीदास त्याचा गुरु. (तुळशीदास शा० प०)

**जगन्नाथदेव**— हिंदुस्थानाच्या पूर्वकिनाऱ्यास ओरिसा प्रांतांत जी जगन्नाथपुरी आहे तेथील देव तो. हा देव कृष्णाच आहे असें ह्मणतात. व यास पाय नाहींत असें सांगतात. कृष्णा निजधामास गेल्यावर त्या देवाची स्थापना इंद्रद्युम्नराजानें केल्या विषयीं लोकवार्ता आहे. बंगाला वगैरे ठिकाणीं याचीं देवळें पुष्कळ आहेत. व त्यांचा खर्च ज्यांनीं ज्यांनीं तीं बांधलीं त्यांकडून चालतो. खुद्द जगन्नाथास लोकांनीं अनेक देणग्या दिलेल्या आहेत. त्याच्या उत्पन्नांत देवाचा खर्च भागतो. वर्षांत देवाचे होणारे मोठे उत्साह दोन आहेत. त्यांतील एकाचें नांव स्नानयात्रा व दुसऱ्याचें नांव रथयात्रा. पहिला उत्साह ज्येष्ठ महिन्यांत व दुसरा आषाढांत होतो.

जगन्नाथास कृष्णाची मूर्ति असून शिवाय त्याचा भाऊ बलराम व बही-

ण सुभद्रा यांच्याही दोन मूर्ति आहेत. देवाच्या तैनातीस ३९०० पुजारि सहकुटुंब आहेत. व ते वेळच्या वेळीं देवाचें स्नान नैवेद्य वगैरेची व्यवस्था उत्तम राखितात. कळवंतिणी ज्यांस देवदासी ह्मणतात, त्या वेळच्या वेळीं येऊन देवापुढें नृत्य गायन करितात. रथ यात्रेंत रथावर वर सांगितल्या प्रमाणें तीन मूर्ति असतात. त्या रथास सोळा चाकें व दोन लांकडी घोडे असतात. हजारों मनुष्यें हा रथ ओढीत नेऊन पुनः जाग्यावर परत आणितात. (ग्यारे० इं० कोश०).

जगन्नाथपुरी– जगन्नाथ देवाचें नगर. याच्या आसमंताद्भागींची दाहा दाहा कोस पर्यंतची भूमि पवित्र मानिली आहे. याचे उत्तर अक्षांश सुमारें २०° व पूर्व रेखांश ८७ आहेत. येथें शंकराचार्यांचा गोवर्द्धन नांवाचा मठ आहे.

जगन्नाथ बावा– ऋषीश्वर अथवा ऋषिभक्त नामक एका स्वामींचा शिष्य. शंकराचार्यकृत वाक्य सुधेवर याची मराठी भाषेंत ओंवी बद्ध लहानशी टीका आहे.

जगन्नाथरायपंडित– हा संस्कृत भाषेचा नामांकित कवि जातीचा तैलंग ब्राह्मण होता. वेगीनाड कुळांत जन्मलेला पेरुभट्ट तो याचा बाप असे. याच्या आईचें नांव लक्ष्मी होतें. या विषयीं यानें रसगंगाधर ग्रंथांत या प्रमाणें लिहिलें आहे:—

पाषाणादपि पीयूषं स्यंदते यस्य लीलया॥ तं वंदे पेरुभट्टाख्यं लक्ष्मीकांतं महा गुरुं॥१॥ यावरून पेरुभट्ट याजवळच यानें अध्ययन केलें होतें. पेरुभट्ट पाषाणापासूनही अमृतस्राव करविणारा इतका सरस विद्वान् होता. हें जें आह्मी लिहिलें त्याशीं कविचरित्रकारांचें मत अगदीं भिन्न आहे. असो. तैलंगणांत सुगंडा ह्मणून शहर आहे तेथें हा राहात असे. अकबर बादशाहाच्या वेळीं ह्मणजे शालिवाहनाच्या पंधराव्या शतकांत हा होता. न्यायशास्त्र, मीमांसा, व अलंकार यांमध्यें हा इतका प्रवीण होता कीं, हा लवकरच चांगला कवि झाला. पुढें हा कर्नाटकच्या राजाच्या भेटीस गेला; परंतु याच्या इच्छे प्रमाणें तेथें याच्या गुणाची चाहा झाली नाहीं. म्हणून यानें झालेल्या अपमानाचें कविता रूपानें वर्णन करून तें राजास दाखविण्याचा यत्न केला; पण तोही याचा यत्न सिद्धीस गेला नाहीं.

शेवटीं हा त्रासून तेथून निघून जयपुरास गेला, व तेथें यानें असणाऱ्या पंडितांस त्यांच्या त्यांच्या विषयांत जिंकून मोठी प्रतिष्ठा मिळविली. पुढें हा तेथेंच राहिला आणि शहरांत एक संस्कृताची शाळा स्थापून यानें अनेक शास्त्रांत अनेक विद्यार्थी तयार केले.

या संधींत दिल्ली येथें अशी गोष्ट घडली होती कीं,- बादशाहाच्या पदरीं एक मोठा विद्वान् काजी होता. त्यानें मुसलमानांचा धर्म खरा असें स्थापण्याच्या उद्देशानें देशोदेशीं फिरून व अनेक पंडितांस जिंकून वादांत पराजित केलें. ही गोष्ट ब्राह्मणांनीं जगन्नाथरायास कळविल्या वरून त्यानें ब्राह्मणां पाशीं एक वर्षाच्या मुदतीची बोली केली. आणि वर्षा नंतर त्यास जिंकीन म्हणून सांगितलें. पुढें यानें एक वर्षांत फारशी भाषा शिकून, व मुसलमानी धर्माचीं तत्वें समजून घेऊन, त्या काजी बरोबर प्रसिद्धपणानें वाद केला. त्यांत काजी पराभव पावला असतां, जगन्नाथ रायानें बादशाहास सांगितलें कीं, मुसलमानांचा धर्म मुसलमानांनींच आचरावा. इतरांनीं आचरूं नये. त्या वरून बादशाहाची मर्जी याच्यावर अत्यंत सुप्रसन्न झाली, व त्यानें यास आपल्या पदरीं ठेविलें, तेणें करून याचा मोठा लौकिक वाढला.

जगन्नाथराय रूपानें देखणा पुरुष असून विषयीही अतिशय असे. ही गोष्ट बादशाहाच्या कन्येच्या कानावर गेल्यानें तिनें यास एकदां जाळी वाटे निरखून पाहिलें. त्यांत असें झालें कीं, यास वारंवार पाहण्याचें तिला मनस्वीच वेड लागलें, इतकी ती या विषयीं मोहित झाली. पुढें लग्न करावें तर अशाच पुरुषाशीं करावें. असें तिच्या मनांत येऊन ती गोष्ट तिनें युक्तीनेंच आपल्या आईस कळविली. त्या मुलीचें नांव लवंगी असें होतें. व ती रूपानें व गुणांनीं चांगली असून, तिला सोळावें वर्ष असल्या कारणानें ती ऐन तारुण्य दशेंत आली होती. एकदां बादशाहास तहान लागल्या वरून, त्यानें तिला पिण्या करितां पाणी आणावयास सांगितलें. या वेळीं जगन्नाथ राय बादशाहा जवळ बसला होता. इतक्यांत बादशाहाच्या हुकुमा प्रमाणें लवंगी मस्तकावर उदकाचा कलश भरून घेऊन तेथें आली. व बादशाहा जगन्नाथराया बरोबर बुधबळें खेळत असल्या कारणानें ती मर्यादेनें उभी राहिली. बादशाहानें तिला आलेली पाहून पंडितांस म्हटलें पंडितजी, हिजवर एक श्लोक आतांचे आतांच करावा. त्यावरून जगन्नाथ रायानें तिजवर हा पुढील श्लोक केला.

इयं सुस्तनी मस्तक न्यस्त कुंभा, कुसुंभारुणं चारु चेलं दधाना ॥
समस्तस्य लोकस्य चेतःप्रवृत्तिं, गृहीत्वा घटे न्यस्य यातीव भाति १

अर्थ- ही उत्तम स्तनवती तुझी कन्या, कुसुंभानें रंगविलेलें चांगलें वस्त्र नेसली आहे, आणि मस्तकावर कुंभ घेऊन उभी असतां मला वाटलें जणूं सर्वलो-

कांच्या चितवनीनें आकर्षण करून व त्या घरामध्यें भरून जात आहे.

हा श्लोक ऐकून व तो उशीर न लावतां केला ह्मणून बादशाहाची मर्जी प्रसन्न झाली. व त्यानें इच्छेस येईल तें माग, असें यास ह्मटलें. तेव्हां पंडित या प्रमाणें बोलले:-

नयाचे गजालिं न वा वाजिराजिं न वित्तेषु चित्तं मदीयं कदाचित्॥
इयं सुस्तनी मस्तकन्यस्त कुंभा लवंगी कुरंगी दृगंगी करोतु॥ १॥
यवनी नवनीत कोमलांगी शयनीये यदि लभ्यते कदाचित्॥ अवनी तलमेव साधुमन्ये न वनी माघवनी विनोद हेतुः॥ २॥

अर्थ:- जगन्नाथ पंडित ह्मणतो, राजा, मी तुझे गजसमुदाय, किंवा अश्वसमुदाय यांची याचना करीत नाहीं; तसेंच द्रव्याच्या ठिकाणीही माझें चित्त नाहीं; परंतु ही मस्तकावर कुंभ धारण करणारी तुझी हरिणलोचना कन्या, ती माझा अंगीकार करो. ही नवनीता प्रमाणें कोमल अंगाची यवनी, कदाचित् मला प्राप्त झाली तर, इंद्राच्या नंदन वनापेक्षां या भू लोकींचेंच सुख मी विशेष मानीन.

हें पंडिताचें मागणें ऐकून बादशाहा खिन्न झाला; परंतु वचन गेल्या मुळें कुंठित झाला असतांही, त्यास युक्ति सुचून तो पंडितास ह्मणाला ठीक आहे. आमची मुलगी आह्मी तुह्मांस देतों, पण तुह्मी आह्मां बरोबर भोजन केलें पाहिजे. असें ऐकून ब्राह्मण्य नष्ट झालें तरी चिंता नाहीं, परंतु राजकन्या मिळो असें मनांत आणून जगन्नाथरायानें बादशाहाची गोष्ट कबूल केली. त्या वरून बादशाहाचा व राणीचा विचार ठरून, त्यानीं लवंगीचें लग्न जगन्नाथराया बरोबर लाविलें.

या गोष्टी वरून जगन्नाथ रायास ब्राह्मणांनीं जाती बाहेर टाकिलें. परंतु राजाश्रया मुळें त्याच्या सर्व गोष्टी निभल्या, व तो बहुत वर्षे पर्यंत यवनीसह वर्तमान सुखानें नांदला. कांहीं काळानें पंडितरायास वैराग्य उत्पन्न झालें व तो यवनीसहित काशीस जाऊन राहिला.

असें सांगतात कीं, एकदां हा यवनीस पलंगावर जवळ घेऊन आपल्या बाऱ्यांत निजला असतां, अपय्या दीक्षित याच्याकडे गेले, व यास दिवसा दहव्या गाढ झोंप लागली आहे असें पाहून व हाव निजला आहे असें न जाणल्या सारखें करून या प्रमाणें बोलले;- किं निःशंकं शेषे शेषे वयसि त्वमागते मृत्यौ इतका शब्द ऐकतांच हा जागा झाला, व तत्काळ पलंगा खालीं उतरला. असें

पाहून व जगन्नाथा तूं आहेस काय? असें ओळखल्या सारखें दाखवून ह्मणालेः- अथवा सुखं शयीथाः निकटे जागर्त्ति जान्हवी भवतः॥- याचा अर्थ असा कीं, तूं आपल्या अवशिष्ट वयांत मृत्यु अगदीं जवळ प्राप्त झाला असतां, निःशंक कसा नि- जतोस? नंतर पुनः ह्मणतात, पंडितराया, खुशाल नीज. कारण, तुझ्या साठीं भागीरथी सर्वदा जागत आहे.

जगन्नाथराय काशींत येऊन राहिल्यावर, तेथील विद्वानांच्या मनांत त्यास शुध्द करून घ्यावयाचें होतें; परंतु जगन्नाथ रायाचें ह्मणणें पडलें कीं, यवनी सहित शुद्ध करून घ्याल तर मी प्रायश्चित्त घेईन. त्या वरून तो विचार तसाच रा- हिला. पुढें एके दिवशीं यवनीस जवळ घेऊन पंडितराय भागीरथीच्या कांठीं ब- सले, व त्यांनीं तिची स्तुति आरंभिली. तेव्हां दर श्लोकास एकेक पायरी भागीर- थीचें पाणी चढत जाऊन बावन्नावा श्लोक संपतांच भागीरथीनें यास प्रत्यक्ष दर्शन दिलें. व यवनी सह वर्तमान याचा उद्धार केला. ही गोष्ट सर्वजन विश्रुत आहेच.

यानें ग्रंथ केले ते येणें प्रमाणें,- पहिला रसगंगाधर, हा अलंकार शास्त्रा- वरील मोठा वादी ग्रंथ आहे. दुसरा तीन शतकांचा भामिनी विलास, तिसरा कुच मर्दिनी. यांत भट्टोजी दीक्षिताच्या प्रौढ मनोरमेचें खंडन आहे. हें त्याच्या नां- वावरूनच स्पष्ट समजतें. चवथा अश्वधाटी, आणि पांचवा गंगालहरी. (कवि- च० व हृद्‌ मा०).

**जंगम**— साहा शैवां मधील तिसऱ्या भेदाचे शैव. पहिल्या शंकराचार्यांनीं यांस वादां- त जिंकून शुद्धाद्वैत मता प्रमाणें यांनीं चालावें असें केलें होतें. यांचा बाणा हृ- दयावर त्रिशूळ व मस्तकीं शिवप्रतिमा धारण करावी असा असे. (आनं० शंक०)

**जगमित्रनागा**— हा परळी वैजनाथ येथील रहिवासी ब्राह्मण. मोठा वैराग्यशी- ळ व भगवद्भक्त होता. याला सर्व ग्रामस्थांनीं मिळून उत्साह वगैरे करितां दिले- ली जमीन एका यवनअधिकाऱ्यानें जप्त करून यास सांगितलें कीं, तूं जगमित्र ह्मणवितोस, तर एक वाघ रानांतून धरून आण. ह्मणजे तुझें नांव सार्थ आहे अ- सें मी समजेन. त्या वरून यानें एक वाघ रानांतून आणिला, व यवन अधिका- ऱ्याच्या दारीं उभा केला. तें याचें अघटित कर्म पाहून यवन भ्याला, व लागली- च त्यानें जमिनीची सोडचिठी यास दिली असें म्हणतात. (भक्तवि० अध्या०१९).

**जतेजोभगत**— काठेवाड प्रांतांतील अमरेली नांमक गांवचा हा राहणारा असून जातीचा

भाट शालिवाहन १७६५ मध्यें होता. यानें केलेलीं गुजराथी भाषेंत पुष्कळ पदें आहेत. (काव्यदो॰गु॰).

**जनकराज**— मंख कवीच्या ग्रंथाचे परीक्षक जे तीस पंडित त्यांतील एक. (बुल्ह॰शो॰)

**जनकोजी**— शिंदे घराण्यांतील पुरुष, राणोजीचा मुलगा. यानें शके १६८१ नागाई-त १६८३ पर्यंत दोनच वर्षें राज्याधिकार केला. याच्या मागें महादजी शिंदा राज्याधिकारी झाला. हा पानपतच्या लढाईंत मेला. (हिंदु॰इति॰).

२– राणोजीचा वडील मुलगा जयाजी त्याचा पुत्र. हाही पानपतच्या लढाईंत मेला. (हिंदु॰ इति॰).

३– हल्लींचे भगीरथराव त्यांसही हें नांव आहे.

**जनजसवंत**– हा एक मोठा सावकार होता. याची रामभक्ति प्रखर असल्या विषयीं मोठी ख्याति होती. आलेल्या अतिथीस व साधुसंतांस अन्न, वस्त्र, व द्रव्य देण्यांत याची छाती मोठी होती. यास पांच मुलगे असत. ते मोठे झाल्यावर त्यांस हें बापाचें करणें आवडेनासें झालें, ह्मणून त्यांनीं राजाकडे फिर्याद केली कीं, आमचा बाप साधुसंतांस यथेच्छ अन्न, वस्त्र व पैसा वांटितो, तर यास देहांत शासन करून सर्व द्रव्य आपण घ्यावें. आणि मर्जी प्रमाणें त्यांतून कांहीं आह्मांस द्यावें. राजा दुष्टच होता ह्मणून, त्यानें ही फिर्याद मनास आणिली. व सावकाराची जबरीनें मोट बांधून त्यास एका नदीच्या मोठ्या डोहांत बुडविलें. परंतु रामानें कांसव होऊन त्यास पाठीवर घेऊन तारिलें. असें पाहून राजानें या पाशीं झालेल्या अपराधाची क्षमा मागितली, व याच्या पुत्रांस शिक्षा दिली. (भक्तवि॰ अ॰३६). यास डोहांत बुडविलें त्या वेळचें याचें हिंदुस्थानी भाषेंतलें पद आहे तें असें:–

> रामजीसों प्रीत बांधी जो न होय सो होयरे॥ ध्रु॰॥ कंबल ल्याने मोट बांधी नीर जहां भरपूररे॥ तहां रघुपति कूर्म होकर राखलीनो पीछरे॥ १॥ रामजी॰॥ इ॰–

**जनमेजय**— युधिष्ठिर वंशीय कलियुगांतील राजा. हा परीक्षिन् राजाचा पुत्र होता. यानें हस्तिनापूर येथें बापाच्या मागें चौऱ्यांयशीं वर्षें व साहा महिने राज्य केलें. व त्या वेळेस कलियुगाचीं १७८ वर्षें ३ महिने व २५ दिवस इतका काळ गेला होता. याच्या मागें याचा पुत्र शतानीक तो राजा झाला. याच्या कारकीर्दींत सर्पसत्र झालें होतें. (राजमा॰)

जनाबाई– ही शूद्र जातीची स्त्री नामदेवाच्या घरीं दळण, कांडण, वगैरे सेवा करणारी त्याची दासी होती. हिची मूळ गोष्ट अशी आहे कीं, कोणी शूद्र आपल्या स्त्रीसह वर्तमान कार्तिकीच्या यात्रे करितां पंढरीस आला असतां त्यानें ही आपली मुलगी बरोबर आणिली होती. गोपाळकाला झाल्यावर तो शूद्र गांवाकडे परत जाण्यास निघाला, तेव्हां ही परत जाईना. ह्मणून हिला परत नेण्या विषयीं त्यानें आपली होती तितकी पराकाष्ठा केली. शेवटीं ही येत नाहीं असें पाहून, तो हिला देवाच्या महाद्वारा पाशीं सोडून गांवाकडे चालता झाला.

पुढें हिचें अनाथ जाणून नामदेवानें पालन केलें. त्या वरूनही त्याच्याच घरीं राहूं लागली. नामदेवाच्या संगतीनें त्याचें भजन पूजन पाहून ही विठोबाची भक्त झाली. हिनें भक्तिभावानें देव आपला इतका ऋणी केला होता ह्मणून सांगतात कीं;- तो हिला दळूं व कांडूं लागे, व हिच्या घरीं भोजनही करी. एकदां पहांटेस देव हिला दळूं लागला आणि तें पुरें होतांच देवळांत गेला. परंतु दळतानां गळ्यांतील जडावांच्या पदकांचा हार काढून ठेवलेला तेथेंच राहिल्यामुळें, कांकड आरतीच्या वेळीं तो गळ्यांत नाहीं असें पाहून पुजाऱ्यांनीं चोंहोंकडे चौकशी केली. त्यांत हार हिच्या आंथरुणांत निघाला त्यावरून हिला सुळावर चढवावी असा सरकारचा हुकूम झाला. व सुळावर चढवूं लागले असतां, हिनें देवाचा धांवा केल्या वरून सुळाचें पाणी झालें. ( भक्तवि० अ० २१ ).

हिनें लग्न मुळींच केलें नव्हतें. नामदेवानें स्वतः आपण व घरचीं तेरा माणसें मिळून जे अभंग लिहिले त्या चौदा माणसां शिवाय ही एक पंधरावी त्यांत होती. हिचे अभंग फारच प्रेमळ आहेत.

हिनें देवास खंडोबा करून त्यास नवस केल्याचा एक अभंग केला आहे त्यांत हिनें मागितलेल्या गोष्टींचा पारमार्थिक अर्थ आहे. तो अभंग येणें प्रमाणेंः-

खंडेराया तूज करितें नवस॥ मरूं देरे सासू खंडे राया॥ १॥ सासू मेल्या वरी तुटेल आसरा॥ मरूं दे सासरा खंडेराया॥ २॥ सासरा मेलीया होईल आनंद॥ मरूं दे नणंद खंडे राया॥ ३॥ नणंद मरतां होइन मोकळी॥ गळां घालिन झोळी भंडाराची.॥ ४॥ जनी ह्मणे खंडो भवघे मरूं दे॥ एकटी राहूं दे पायां पाशीं॥ ५॥

या अभंगा वरून हिला विषयसुख तुच्छ झालें होतें; परंतु देव एक व आपण एक एवढें द्वैतभान राहिलें होतें, असें स्पष्ट दिसून येतें.

**जनार्दनस्वामि**– हा देशस्थ आश्वलायन ब्राह्मण खानदेशांतील चाळीस गांवचा देशपांड्या होता. हा शांकरमतानुयायी असे. याची गणना साधुमंडळांत आहे. दौलताबाद येथील यवन अधिकाऱ्याचा हा कारभारी होता. गाणगापुर येथें जे नृसिंह सरस्वती होते, व ज्यांस लोक दत्तात्रेयाचा अवतार समजत त्यांचा हा शिष्य होता. या पासून पुढें याचें नांव चालविणारे तिघे शिष्य परम गुरुभक्त निपजले. त्यांत पहिला एकाजनार्दन (एकनाथ स्वामि) दुसरा रामाजनार्दन आणि तिसरा जनीं जनार्दन येणें प्रमाणें होते. यांचे गुरु जे नृसिंह सरस्वती त्यांजवर यांनीं रचलेली आरती फार चमत्कारिक चालीची आहे, तीहल्लीं नृसिंहवाडीस प्रत्यहीं म्हणण्याचा पाठ आहे. (वृद्धमा०).

**जनितानंद**– सिद्धोपासकांतील एक पुरुष. (आनं० शंक० प्रक० ४९) पहा.

**जनींजनार्दन**– याचें खरें नांव जनार्दन होतें. हा जनार्दन स्वामींचा शिष्य, व जातीचा वाजसनी ब्राह्मण मूळचा बीड येथील राहणारा असे. याची समाधि भूम येथें मोंगलाईंत आहे. नाना फडणवीस यांच्या बेलबागेंतील विष्णू पुढें गाण्याची जी गवयाची नेमणूक आहे त्या जाग्यावर जे मार्तंडबाबा नांवाचे पूर्वी गवई होते, ते याचेच वंशज होते. (वृद्धमा०)

**जनोबापंडित**– एक साधु होऊन गेलेला आहे.

**जनोबाभट**– पेशव्यांच्या दफ्तराकडील एक नामांकित कारकून. जातीचा कोंकणस्थ ब्राह्मण होता. यानें मोडीच्या अक्षरांत एक फारच नामी वळण काढलेलें प्रसिद्ध आहे. याच्या मुलाचें नांव मोरोपंत भट असें होतें. जमाखर्ची लिहिण्यांत या अक्षराची मोठी तारीफ आहे. परंतु हल्लीं इंग्रजींत त्याची चहा नाहीं. (वृ०मा०)

**जबलपूर**– माळव्यांतील एक शहर आहे. याचें उत्तर अ० २४॰ व पूर्व रे० ८०॰ आहेत.

**जंबुकेश्वर**– त्रिचनापल्ली पासून अर्ध कोसावर असणारें महादेवाचें स्थान. येथील देवास आपोलिंग असें म्हणतात. (आपोलिंग) श०प०).

**जंबुनगर**– विक्रमादित्य, भर्तृहरि, इत्यादि भावंडांची आई जी सुशीला तिच्या बापाचें राजधानीचें नगर. हें नकाशांत सांपडत नाहीं. जंबूसर असेल तर नकळे.

**जंबूसर**– खंबायताच्या आखाता जवळचें शहर.

**जमखिंडी**– मुधोळाच्या उत्तरेस आहे. येथें जमखिंडीकर पटवर्धन राहतात.

**जयंत**– तत्त्वचंद्र नामक व्याकरण ग्रंथाचा कर्त्ता. २– काव्य प्रकाशा वरील टीकाकार व न्यायकलिका आणि न्यायमंजरी या दोन ग्रंथांचा कर्त्ता. (बुल्ह० शोध०)

**जयनारणभक्त**– साधु० (नाभा० भ० ग्रंथ० पहा.

**जयत्पाळराजा**– वीरबल्लाळ राजाचा पुत्र. नृसिंह राजाचा नातु, व विष्णुवर्द्धनराजाचा पणतु. आज्याचें नांव नातवास ठेवण्याच्या चाली प्रमाणें याचें नांव नृसिंहच होतें, असें असतां जयत्पाळ कसें च कां पडलें तें कळत नाहीं. याच्या नांवाशीं व विवेकसिंधूंतील ओंव्याशीं मात्र मेळ या प्रमाणें दिसून येतो. विवेकसिंधु पूर्वार्द्ध प्रकरण ७ ओंवी ५४ ,५५ ,५६ यांत असें आहे.

> मजश्वास निमेषाचा श्रम ॥ तेथें कायसा या ग्रंथाचा उद्यम ॥ परी फळला मनोधर्म ॥ सदैवाचा ॥ नृसिंहाचा बल्लाळ ॥ त्याचा कुमर जयत्पाळ तेणें करविला गदारोळ ॥ ग्रंथरचनेचा ॥ भगीरथाचेनि दैव योगें ॥ विश्वसुखात होय गंगे ॥ तैसें जयत्पाळाचेनि प्रसंगें ॥ जग सुखिया होय.

रा० रा० बाळाजी प्रभाकर भीडक, यांनीं केलेल्या कर्नाटक प्रांताच्या इतिहासांतील एकशें पन्नासाव्या पृष्ठांत जी त्यांनीं बल्लाळ राजांची वंशावळ दिली आहे, त्यांतील नृसिंह आणि बल्लाळ हे दोघे बापलेंक वरील ओंव्याशीं तंतोतंत जमल्यावरून बल्लाळ राजाचा पुत्र जो नृसिंह तोच जयत्पाळ राजा मुकुंदराजांचा शिष्य खचित असावा, असें आमचें मत कायम झालें. आणि त्यावरून शालिवाहन शके अकराशें तेहतीस मध्यें हा राजा राज्यावर असल्या मुळें त्याच वेळेस मुकुंदराजहोनें यांत भगदीं संशय करणें नको.

असें सांगतात कीं, या राजास ब्रह्मविचार फार आवडत असे, ह्मणून तो येईल त्या साधूचा सन्मान करून त्यास तो विचार पुसे, व त्यांस ह्मणे कीं, घोड्यावर बसतांना एका रिकबींत पाय घालून दुसरींत घाली घाली तों मला ब्रह्मसाक्षात्कार करून द्या. ही गोष्ट कोणाच्यानेंही याच्या प्रत्ययास आणून देववेना, ह्मणून यानें बरेच साधु बंदींत घातले. तें वर्तमान मुकुंदराजास कळून तो या राजाकडे आला, व त्यानें याच्या प्रतिज्ञे प्रमाणें यास समाधि लाविला.

पुढें मुकुंदराजांनीं समाधींतून यास सावध केलें. त्या वरून हा त्यांचा शिष्य झाला असतां त्यानें केलेल्या कित्येक प्रश्नांचीं उत्तरें जीं मुकुंदराजांनीं दिलीं तोच ग्रंथ विवेकसिंधु नांवानें सर्व प्रसिद्ध आहेच. (दृन्हूमा०)

**जयदेव कवि**– हा कवि बाणभट्ट, मयूर इत्यादि कवींच्या मागून झालेला समजावा. यानें आपणा पूर्वीं होऊन गेलेल्या कवीं विषयीं येणें प्रमाणें लिहिलें आहे.

यस्या श्चोरश्चिकुरनिकरः कर्णपूरो मयूरो भासो हासः कविकुलगुरुः कालिदासो विलासः॥ हर्षो हर्षो हृदयवसतिः पंचबाणस्तु बाणः केषां नैषा कथयकविता कामिनी कौतुकाय.– याच्या अर्थाविषयीं (चोर शब्द पहा). २–लक्ष्मणसेन राजाच्या पदरचा कवि. याच्या बापाचें नांव रामदेव, व आज्याचें नांव भोजराज होतें. यानें चंद्रा लोक व तत्त्वचिंतामणि हे दोन ग्रंथ केले. ( बुल्हर० शोध० )

**जयदेवमिश्र**– हा कवि काश्मीरांकडील होता. व यानें शब्दावलोक नांवाचा व्याकरणविषयावर ग्रंथ रचिला. ( बुल्ह० का० शो० ).

**जयदेवस्वामि**– हा संस्कृत भाषेचा कवि जातीचा कान्यकुब्ज ब्राह्मण व मोठा भगवद्भक्त होऊन गेला. लहानपणीं गुरूजवळ अध्ययन करीत असतां, पंधरा दिवसांचा पाठ एकदमच हा घेई. त्यामुळें यास पक्षधरमिश्र असें नांव पडलें होतें. जगन्नाथ क्षेत्रा जवळ किंदुबिल्व नांवाच्या गांवीं याचें जन्म झालें होतें. विद्वान् होऊन हा वयांत आल्यावर कविता करूं लागला. यानें प्रथम प्रसन्नराघव नांवाचें सप्तांकी नाटक रचिलें. याच्या कवितेंत कोमलता, शृंगार, व करुण रसपूर्ण आहेत. शिवाय शब्दालंकार व अर्थालंकार यांचीही साधणूक चांगली आहे. वरील नाटकाच्या रचने वरून याचें लक्ष्य अर्थालंकाराकडे विशेष असल्याचें समजून येतें. या नाटकांत सीता स्वयंवरा पासून रावणवध होऊन रामास राज्याभिषेक होई पर्यंत कथाभाग आहे.

याचा दुसरा ग्रंथ गीतगोविंद हा गद्यपद्यात्मक आहे, व त्यांत कृष्णाचा विलास वर्णिलेला आहे. असें सांगतात कीं, जयदेव हा ग्रंथ लिहीत असतां, एकदां एके ठिकाणीं राधेचें वर्णन योग्य रीतीनें कसें लिहावें तें यास सुचेना. ह्मणून हा तो विषय तसाच ठेऊन स्नानास गेला. इतक्यांत तें वर्णन श्रीकृष्णानें स्वतः तेथें प्रगट होऊन पुरें केलें. पुढें याचें नित्यकर्म होऊन भोजन झाल्यावर हा येऊन पाहतो तों, तो विषय पुरा झालेला आहे. त्यावरून यास अतिशय विस्मय झाला. गीतगोविंद ग्रंथ विक्रमादित्याच्या सभेंत गात असत; त्यावरून या कवीस होऊन गेल्यास दोन हजार वर्षें झालीं आहेत. सांप्रत हा ग्रंथ सर्व देशांत गाइला जात आहे. तरी कर्नाटकांत जसा मनोवेधक गातात, तसा इतर देशांत कोठेंच गाइला जात नाहीं.

याच्या वेळीं जगन्नाथपुरी येथें सात्विक नांवाचा राजा राज्य करीत होता. त्यानें याच्या गीतगोविंद ग्रंथाची कीर्ति ऐकून, त्याच तोडीचा एक ग्रंथ स्वतः लि-

हिला. व त्याच्या पुष्कळ प्रति लेखकांकडून लिहून तो आपल्या सर्व राज्यांत वांटून आज्ञा केली कीं;- याचा पाठ सर्वांनीं करावा; परंतु लोक गीतगोविंद जसा प्रीतीनें ह्मणत तसा राजाचा ग्रंथ कोणी ह्मणेनात. तें राजास कळून तो एकदां जयदेवाकडे आला व त्यास ह्मणूं लागला, तुझा ग्रंथ जसा लोक मानितात तसा माझा कां मानीत नाहींत? जयदेव ह्मणाला, महाराज यास मी काय करावें? राजा ह्मणाला आतां असें करूं कीं, दोन्ही ग्रंथ देवा पुढें ठेऊं. आणि ज्याचा ग्रंथ देव मान्य करील त्याचा लोकांत प्रचार चालवूं. या गोष्टीस जयदेवानें रुकार देतांच, त्याच रात्रीस राजानें दोन्ही ग्रंथ देवापुढें ठेविले. व आपल्या हातानें देवद्वारास कुलुपें लाऊन व तेथें बळकट पहारा ठेऊन, किल्या पुजाऱ्यां जवळ न देतां, त्या तो आपणा बरोबर घेऊन आपल्या महालांत गेला. पुढें पहांटेस राजा, जयदेव व पुजारी वगैरे मंडळी तेथें जमली. राजानें कुलपें काढिलीं, आणि पाहूं लागला तों जयदेवाचा ग्रंथ मात्र देवाजवळ आहे. आणि आपला मुळींच नाहीं. त्यावरून त्यास अतिशय विस्मय झाला. पुढें उजाडलें असें पाहून आपल्या ग्रंथाचा शोध करूं लागला. तों, तो आवारांत चोहोंकडे विसकटून पडला आहे. त्यांश या गोष्टी वरून राजास पराकाष्ठेचा खेद झाला. व आतां वांचून तरी काय कर्तव्य आहे ह्मणून देवापुढें उपास करून त्यानें प्राण देण्याचा निश्चय केला. जयदेवानें अशी राजाची खिन्नता पाहून देवाची स्तुति केली. व त्याच्या ग्रंथांतील कांहीं श्लोक देवाच्या आज्ञे वरून आपल्या ग्रंथांत घालून त्याचें समाधान केलें. या गोष्टी वरून राजास बरें वाटलें, व तेव्हां पासून तो जयदेवाशीं मित्रभावानें वागूं लागला इतकेंच नव्हे तर त्यानें त्यास आपल्या दरबारीं आश्रयही दिला.

ग्रंथाच्या संबंधानें जयदेवाचा लौकिक आधीं होताच, तशांत देवाची त्यास मान्यता पडल्या पासून तर तो अधिकच वाढला. त्यावरही आणखी त्याची वृद्धि होण्यास कारण झालें तें असें कीं, जगन्नाथ येथें एक अग्निहोत्री ब्राह्मण रहात असे. त्यास पद्मावती नांवाची एक कन्या फारच सुरूप होती. ही कन्या मनुष्यास देण्या पेक्षां देवास अर्पण करावी, हें चांगलें. असा त्याचा निश्चय झाल्यावर सांगतात कीं, देवानें त्यास दृष्टांत दिला. आणि आज्ञा केली कीं, ही तुझी कन्या तूं जयदेवास दे, व ती त्यास दिल्यानें मलाच अर्पण झाली असें समज. त्यावरून ब्राह्मणानें ती कन्या मोठ्या संतोषानें जयदेवास लग्न करून दिली.— पद्मावतीचें जयदेवाशीं लग्न झाल्या पासून राणी तिला कधीं

कधीं कर्मणुकी साठीं आपल्या महालीं बोलावून नेऊं लागली. असा क्रम बरेच दिवस चालत असतां राणीचा भाऊ मरण पावून त्याची बायको सती जाण्यास निघाली. तेव्हां राणी त्या समारंभा करितां पद्मावतीस समागमें घेऊन तिकडे गेली. पुढें तो समारंभ यथासांग कडेस लागल्यावर भावजयीची स्तुति करीतती बोलली कीं याचें नांव पातिव्रत्य. हें राणीचें बोलणें ऐकून इतर बायकांनीं खरें- च खरेंच असें ह्मणून माना डोलविल्या; परंतु पद्मावती एक अक्षरही त्या बद्दल न बोलतां उगीच राहिली असें पाहून, राणी तिला ह्मणाली तूं कांहींच बोलत नाहींस याचें कारण काय? पहा बरें असें पातिव्रत्य व असें धारिष्ट पतिव्रते वांचून कोठें तरी दृष्टीस पडेल काय? खरोखर पाहिलें असतां, मज प्रमाणें तुलाही या गोष्टीचें आश्चर्य वाटावें तें जेव्हां तुला वाटलें नाहीं, तेव्हां या विषयीं तुझ्या मनांत काय असेल तें खरें खरें मला सांग. पद्मावती ह्मणाली बाईसाहेब, या गोष्टीचें कारण आपण मला इतका आग्रह करून पुसूं नये, व मीही तें सांगूं नये. राणी ह्मणाली इतकें गुप्त कारण यांत कोणतें आहे कीं, तें तूं मशीं चोरावेंस. तर निःशंक बोल. अनमान करूं नको. या प्रमाणें राणीचा आग्रह पाहून पद्मावती ह्मणाली आपली भावजय पतिव्रता व धारिष्टाची खरी, परंतु मला असें वाटतें, पतीचें मरण ऐकतांच जिचें प्राणोत्क्रमण होतें तिलाच सती असें ह्मणावें. इतकीं अक्षरें पद्मावतीच्या तोंडून निघालेलीं ऐकतांच, राणीसबाईस वाटून ती आपल्या महालांत निघून गेली. व पद्मावती तिचा निरोप घेऊन आपल्या घरीं आली.

कांहीं काळानें अशी गोष्ट घडून आली कीं, राजा जयदेवास बरोबर घेऊन शिकारीस गेला. ही संधी पाहून राणीच्या मनांत पद्मावतीचें भाषण सलतच होतें. ह्मणून तिनें असें केलें कीं, एका विश्वासु मनुष्यास आपणाकडे बोलावून घेऊन त्यास सांगितलें. उद्यां मी व पद्मावती दोघी बोलत बसलों असतां, तूं- घाबरल्या सारखा एका एकीं येऊन असें बोल कीं, काल सरकार शिकारीस गेले तीन त्यांनीं एक मोठा वाघ मारिला. तथापि त्या घायाळ वाघानें मरतां मरतां सरकारावर झडप घातली, ती चुकविण्या साठीं सरकारा आड जयदेव झाले, व दुर्दैवानें मरण पावले. राणीच्या शिकवणी प्रमाणें घोकून ठेवलेलें तें बनावट वर्तमान त्यानें दुसऱ्या दिवशीं हुबेहूब येऊन तसेंच सांगितलें. तें ऐकतांच पद्मावतीनें भुईवर आंग टाकून तत्काळ प्राण सोडिला. अ-

शी गोष्ट झालेली पाहतांच, राणीस 'दे माय धरणी ठाव' असें होऊन ती शोक करूं लागली. व आतां राजास काय सांगावें हा विचार येऊन पडला. कर्मधर्मसंयोगानें त्याच दिवशीं राजा जयदेवासह वर्तमान वाड्यांत आला. व अंतःपुरांत जाऊन पाहती तों राणीकडून मोठा अन्याय घडला आहे, ह्मणून तो तिला दुष्टे हें काय केलेंस असें ह्मणाला, व आतां त्या अपेशाच्या पायीं जीव द्यावा हेंच बरें असा त्यानें निश्चय केला. ही गोष्ट जयदेवास कळून तो राजवाड्यांत आला. व राजाचें निवारण करून स्त्रीच्या प्रेताजवळ बसला. पुढें त्यानें अष्टपद्यागाण्यास आरंभ केला. त्या इतक्या मधुर व करुणरसभरित गायिल्या कीं- आजू बाजूस उभ्या राहिलेल्या सर्व लोकांस त्या ऐकून अतिशय गहिंवर येऊन त्यांच्या नेत्रावाटे अश्रुधारा वाहूं लागल्या. सारांश आठवी अष्टपदी सरतांच पद्मावतीनें डोळे उघडले व पतीस पाहून तिला अतिशय आनंद झाला. राजा व राणी हींही आनंदलीं. जयदेव स्त्रीस घेऊन सुखानें आपल्या घरीं आला.

या वरील गोष्टीपासून जयदेवाची कीर्ति फारच पसरली, व त्यास दुसऱ्या एका राजानें साधु जाणून आपल्या शहरास नेलें. व कांहीं दिवस जवळ ठेऊन घेऊन पुष्कळ द्रव्य देऊन सन्मानानें मार्गस्थ केलें. त्या वेळीं मार्गांत यास चोरांनीं गांठून याचें द्रव्य नष्ट नेलेंच, शिवाय याचे हात पाय तोडून यास रानांत सोडून ते निघून गेले. पुढें यास ते पुनः फुटले इत्यादि गोष्टी भक्तविजयाच्या दुसऱ्या अध्यायांत आहेत. त्या पाहणें असतील त्याणीं तेथें पाहाव्या. हल्लीं कलिंग देशांत श्रीकृष्णाचा वार्षिक उत्साह होत असतो. त्या वेळीं याच्या अष्टपद्या गाऊन सारी रात्र जागरण करण्याची तेथें चाल आहे. सर विलियम जोन्स यांनीं त्या अष्टपद्यांचें भाषांतर इंग्रजींत अक्षरशः केलेलें आहे. व तें चांगलें उतरलें आहे असें आमच्या ऐकण्यांत आलें आहे. (भक्तवि० अ०२ व इन्डु माहि०).

**जयद्रथ**— हा कवि काश्मीराकडील होता. महामहेश्वराचार्य आणि राजान अशीं ही यास नांवें होती. हा जयरथ कवीचा भाऊ, व कल्हणाच्या मागून झाला होता. हरचरित्रचिंतामणि नांवाचा ग्रंथ संस्कृतांत आहे तो याचाच होय. (बुल्ह० काश्मी० शोध०)

**जयपाळ**— शके ९२३ मध्यें लाहोर येथें हा राजा होता. सुलतान महमूद यानें हिंदुस्थानावर प्रथम स्वारी केली व निजमधील लढाईंत याचा पराभव करून व यास कैद करून पुढें सोडून दिलें. तो अपमान यास सहन न होऊन यानें

अभिकाष्ठें खाऊन प्राण दिला. मुकुंद राजाचा शिष्य हाच असें आजपर्यंत आह्मीं समजत होतों; परंतु विवेक सिंधू वरून व मिस्तर मोडक यांच्या इतिहासावरून हा बल्लाळवंशी नव्हे, अशी आमची खात्री झाली. शिवाय हा राजा पंजाबी भाषा बोलणारा होता, ह्मणून मराठी भाषेंत असलेला विवेक सिंधु याकरितां झाला हेंही संभवत नाहीं. ( हिंदु॰ छा॰ इति॰)

**जयपूर—** हें शहर मेवाडांत आहे. येथील राजे आपणास कच्छवाह ह्मणवितात. रामानुजाचार्यांची येथें गादी व मठ आहे. ( वृद्ध भा॰).

**जयमंगल—** उत्कल व तैलंगण यांच्या मध्यसंधीस असणारा गांव. प्रसिद्ध जोषट्टपाद अथवा कुमारिल भट्ट त्याची जन्मभूमि हा गांव होता. हल्लीं यास काय ह्मणतात तें कळत नाहीं. व नकाशांतही हें नांव सांपडत नाहीं. (जैनग्रंथ.)

**जयमलजी—** राजा. हा भगवद्भक्त होता. ( ना॰ भ॰ ग्रं॰) पहा.

**जयरथ—** तंत्रालोक विवेक, व अलंकारसर्वस्वाकर अलंकार विमर्षिणी नामक टीका, असे दोन ग्रंथ याचे आहेत. (बुल्हर॰ का॰ शोध.)

२— प्रत्यभिज्ञाविवेक ग्रंथाचा कर्त्ता. हा शालिवाहनाच्या तेराव्या शतकांत होता. याच्या बापाचें नांव शृंगार अथवा शृंगारक होतें. हा स्वतः व याचा बाप, राजराज नामक राजाच्या पदरीं होते. कल्याणभट्ट ह्मणून जो एक विद्वान् पुरुष होता त्याचा हा शिष्य असे. (बुल्ह॰ शोध.).

**जयराम—** कामंदकीय नीतिसारावरील टीकाकार. (बुल्ह॰ शोध.).

**जयरामगोसावी—** समर्थ रामदास स्वामींच्या शिष्यांतील एक. हा बत्तीसशिराळ्याचा राहणारा होता. (रामच॰)

**जयराम स्वामि—** कात्राबाद मांडवगण येथील देशपांडे भिकाजीपंत त्यांचा हा मुलगा, ज्ञातीचा देशस्थ आश्वलायन ब्राह्मण होता. याचें उपनांव केसर होतें. याचा बाप वारल्यावर याची आई कृष्णाबाई याला बरोबर घेऊन यात्रे करितां पंढरीस गेली, व ती यथासांग झाल्यावर गांवाकडे परत जाण्यास निघाली. तेव्हां यानें सांगितलें कीं,-मी परत येत नाहीं. त्यावरून ती तेथेंच राहिली. पुढें यानें गोपाळपुऱ्यांत राहून कांहीं अनुष्ठानास आरंभ केला. याचें अनुष्ठान चाललें असतां मध्यंतरीं कृष्णाबाईचा काळ झाला. तिचें उत्तर कार्य झाल्यावर कांहीं दिवसांनीं याचें अनुष्ठान समाप्त झालें. समाप्तीच्या दिवशीं रात्रीं प्रहांटेच्या सुमारास यास स्वप्नांत पांडुरंगाचें दर्शन घडून इच्छित मागण्यास आ-

ज्ञा झाली. तेव्हां यानें ब्रह्मविद्यानुग्रह प्रसाद द्यावा अशी प्रार्थना केली. पांडुरंगानें सांगितलें साताऱ्या जवळ वडगांव आहे तेथें तूं जा. आणि कृष्णाजी आपाअभ्यंकर ह्मणून जे सत्पुरुष आहेत त्यांस शरण हो. ह्मणजे तुझे मनोरथ पूर्ण होतील. त्या वरून हा वडगांवास आला व कृष्णाजी आपांची मनोभावें करून त्यांजवळ सेवा करीत राहिला.

पुढें आपांनीं याचा अधिकार उत्तम आहेसा जाणून यास महावाक्याचें विवरण सांगितलें. व आज्ञा केली कीं, याचें दृढीकरण रामदासास माझा निरोप सांगून त्याच्या संगतीनें कर. कांहीं दिवसांनीं आपा समाधिस्थ झाले. असें पाहून हा रामदास स्वामींच्या भेटीस गेला, व त्यांस आपांचा निरोप कळविला. त्या वरून त्यांनीं त्यांची आज्ञा शिरसा मान्य करून यास जवळ ठेऊन घेतलें, व याचें उणें असलेलें सर्व पुरें केलें.

हा पुढें इतका पुरा झाला कीं, याची गणना समर्थांच्या पंचायतनांत झाली. व याचा लौकिक व संप्रदाय पुष्कळ वाढला. याची समाधि शके १५९४मध्यें भाद्रपद वद्य ११ रोजीं वडगांव येथें झाली. याचा जन्म शक आह्मांस आढळला नाहीं. याचीं पदें वगैरे थोडीशी कविता प्रसिद्ध आहेच. शिवाय औंधीबद्दल एक शांतिपंचीकरणही यांचें सर्वत्र प्रख्यात आहे. (रामदा॰ च॰)

**जयरामात्मजतनय–** गोविंद गोसावी इंदापुरकर सज्जन रंजन अशा नांवानें प्रसिद्ध आहेत. त्यांचा हा कवि पणतू, व टेंभुरणीकर सदाशिव माणकेश्वर याचा गुरु होता. (वृद्ध मा॰).

**जयशिंग–** जयपूरचा राजा. याचा व थोरल्या बाजीरावाचा अतिशय स्नेह होता.

**जयशिंगवंश–** निनावी वंशांतील शेवटचा राजा महानंद. त्यास जयशिंगानें मारिलें. व आपण राजा झाला. त्या सुध्दां त्याच्या बारा पुरुषांनीं इंद्रप्रस्थ (दिल्ली) येथें राज्य केलें. पैकीं दोन पुरुषांनीं विक्रम संवताच्या १३५ वर्षांच्या भरती पुरतें राज्य सुमारें ३२ वर्षें केल्यावर बाकीच्या दाहांनीं शालिवाहन शकांत सुमारें १०२ वर्षें राज्य केलें. त्या सर्व राजांचीं नांवें व राज्य कारकीर्दीचीं प्रत्येकाचीं वर्षें खालीं लिहिल्या प्रमाणें आहेत:–

| | नांवें. | वर्षें | महिने | दिवस. |
|---|---|---|---|---|
| विक्रमसंवतांत. | जयसिंग | १८ | ४ | १० |
| | सल्लु राजा | १४ | ० | १० |
| | | ३२ | ४ | २० |

शालिवाहन शकांत.

| नांवें. | वर्षे. | महिने. | दिव. | नांवें. | वर्षे. | म. | दि. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| शूरसेन. | १५ | ७ | १२ | हरिसेन. | १२ | ० | २५ |
| जाधवसेन. | ११ | ५ | ३ | ब्रह्मसेन. | ८ | ११ | ५ |
| देवसेन | १० | १ | ५ | नारायणसेन | ६ | ० | १८ |
| भूसेन | ५ | १० | ५ | लक्ष्मीसेन. | १६ | ७ | १५ |
| कल्याणसेन | ४ | ८ | २१ | दामोदरसेन. | ११ | ५ | १६ |
| | ४७ | ८ | १६ | | ५५ | १ | १९ |

१०२..१०..५

(हिं. ह. इ.).

हा जो काळ वर लिहिला आहे याचें प्रत्यंतर दिल्लीचें राजघराणें या शब्दावर पहाः-

**जयश्रीनगर**- अयोध्ये जवळ पूर्वी असलेलें एक नगर.

**जयसिंहराजा**- गुजराथचा राजा. याच्याच मागें याच्या गादीवर कुमारपाळ बसला. (आर्यवि. सुधा.) २- शालिवाहनाच्या सुमारें १२व्या शतकांत काश्मीर येथें असलेला राजा. (बुल्ह. शोध.)

**जयाजी**- राणोजी शिंद्याच्या मागला शिंदे घराण्यांतील पुरुष. राणोजीचा मुलगाच. यानें शके १६७२ पासून १६८१ पर्यंत ९ वर्षे राज्याधिकार केला. (हिंदु. इति.).

**जयादित्य**- यासच कोणी जयापीड म्हणतात.

**जयापीड**- हा काश्मीर येथील राजा. हा शके ७०१ तागाईत ७३५ पर्यंत होता. जयादित्याचा दिवाण जो वामन तो या जवळच असेल, व काशिकावृत्ति या दोघांनीं मिळून केली असेल, तर हाच जयादित्य म्हणणें वांकडें होणार नाहीं. असें एका इंग्लिश ग्रंथकाराचें म्हणणें आहे. (बुल्ह. शोध.)

**जलभेद**- वल्लभाचार्य कृत संस्कृत ग्रंथ.

**जलचिड**- सह्याद्रि घांटमाथ्या लगतचा भास्कराचार्याच्या जन्मभूमीचा गांव.

**जलालपुर**- शाकल्य अथवा संगल देशांतील शहर. याचे उ. अ. ३२° व पू. रे. ७३° आहेत.

**जलालुद्दीन**- हा पुरुष गिलची अथवा खिलजी वंशाचा होता. हा शके १२१० मध्यें दिल्ली येथें बादशाहा होता. (हिंदु. छा. इ.).

**जलोकराजा**- इसवी सना पूर्वी २२० वर्षा मागील काश्मिराकडील राजा. (बु. का. शो.)

**जल्हण**- राजपुरी येथील राजाचा मंत्री. हें शहर काश्मीर देशांत आहे. हा मंत्री विद्वान् व कवि होता. मंखाच्या ग्रंथाची परीक्षा करण्यास अलंकारानें जे तीस पंडित बोलाविले होते, त्यां मध्यें हा होता. (बु. शो.).

**जसवंत**- हिंदुस्थानांतील साधु.

**जम्बुस्वामी**– साधु. (ना. भ.) ग्रं. पहा.

**जहानगीर**– दिल्लीच्या बादशाहांतील एक. अकबराचा मुलगा जो सेलीम त्यासच हें प्रसिद्ध नांव होतें. हा शके १५२७ मध्यें गादीवर बसला. व १५४९ मध्यें मरण पावला. याचाच मुलगा शाहाजहान होय. प्रसिद्ध नूर जहान हिचा पहिला नवरा वाघाबरोबर शस्त्रा वांचून युद्ध करून मरण पावला. तीच पुढें याची राणी झाली. (हिंदु॰ इति॰).

**जांगलदेश**– हिमालयांत आहे. जैन ग्रंथांत अहिछत्रा नगर राजधानी याची असें लिहिलें आहे. [ यांकडे होता.

**जाटलोक**– लाहोराकडील लोक. यांचा राजा सुरजमल्ल पानपतच्या लढाईंत पेशा-

**जातुकर्णी**– भवभूति कवीची आई.

**जानकीपरिणय**– रामभद्र दीक्षित कृत संस्कृत नाटक.

**जानाजी**– शाहामुनीचा आजा. अमाईचा नवरा.

**जानोजीविश्वनाथ**– बाळाजी विश्वनाथाचा थोरला भाऊ. यास हप्शानें भोतांत घालून समुद्रांत बुडविलें होतें, म्हणून त्याच भीतीनें बाळाजी विश्वनाथानें श्रीवर्धन सोडिलें. (हिं॰ इ॰) [ य.

**जांब**– हा गांव गोदावरीच्या कांठीं आहे. रामदास स्वामींची हा गांव जन्मभूमि ही-

**जालंदरनाथ**– शिवपार्वती विमानांत बसून क्षीर समुद्राकडून फिरत फिरत येत असतां क्षार समुद्रांत एक लहान बालक तरतांना त्यांनीं पाहिलें. त्यास पार्वतीनें दयें करून विमानांत घेतलें. पुढें त्यावर शंकरानीं अनुग्रह केला, व पृथिवीवर राहण्याची आज्ञा केली. तोच हा पुढें मोठा सिद्धपुरुष झाला. नाथलीलामृताच्या दुसऱ्या अध्यायांत याचें सविस्तर वर्णन आहे. व त्यांत हा शेषाचा अवतार असें म्हटलें आहे. प्रसिद्ध कानीफनाथ व गोपीचंद्र राजाचीआई मैनावती हीं उभयतां याचीं शिष्य होतीं. (नाथली॰)

**जिजाबाई**– तुकारामाची दुसरी बायको. ही भारी नापट होती.

**जिन**– भगवत्पाद श्रीमच्छंकराचार्य दिग्विजय करीत फिरत असतां पूर्णसमय नांवाचा एक क्षपणक त्यांस येऊन भेटला. व म्हणूं लागला महाराज, जिन म्हणजे– "जीतिपदवाच्यस्य जीवस्य नेतिपदेन न पुनर्भवः तस्माज्जन्मशून्या वयं जैनाः – या त्याच्या शुष्क मताचें आचार्यांनीं खंडन केलेलें आहे. (आ-नं॰ शंक॰) प्रकर॰ २७ पहा.

**जिनेंद्र**– काशिकावृत्ति व पंजिका याचा कर्ता. (जैनग्रंथ.)

**जिनेंद्रबुद्धि**– हा जैन कवि शके १२०० मध्यें होता. न्यास हा ग्रंथ यानें केलेला आहे. बोपदेवाच्या ग्रंथांत याचें नांव आढळतें. हा वराहमूल हस्कपुर येथें रहात असे. (बुल्ह० शो०).

**जीवदशा कदाव**– अमृतराय कृत मराठी भाषेंत. [हे.काव्य.)

**जीवन कवि**– हा गुजराथी कवि संवत् १८०० मध्यें होता. शिक्षा हा ग्रंथ याचा आ-

**जीवन तनय**– हा महाराष्ट्र ब्राह्मण होता. याचीं पदें मात्र आढळतात. परंतु कधीं होता तें कळत नाहीं.

**जीवन्मुक्तिप्रकरण**– हें विद्यारण्य स्वामींनीं केलेलें संस्कृतांत आहे. हें पंचदशी झाल्यावर शेवटीं झालें.

**जीवराज शेट मुशाफरी**– गुजराथी भाषेंत जीवरामभट्टकृत. यांत जीव संसारांत आला ही मुशाफरी कल्पून वर्णन केलें आहे.

**जीवरामभट्ट**– धोळका येथील राहणाराऔदीच्य टोळकिया गुजराथी ब्राह्मण. हा संवत् १८०० मध्यें होता. यानें जीवाची मुशाफरी वर्णन केली आहे. (का.दो.गु.)

**जुनागड**– हें संस्थान गुजराथेंत पोरबंदराच्या आग्नेयीस आहे.

**जुनाट पुरुष**– समर्थ रामदास स्वामिकृत मराठींत ओंवीबद्ध ग्रंथ. यांत परब्रह्म हा पुरुष कल्पून माया त्याची कन्या कल्पिली आहे. व तिचा खेळ तें हें जग असें प्रतिपादन केलें आहे.

**जुन्नर**– शिवनेरी किल्या खालची पेंठ. ही पेंठ शहरा सारखीच आहे. खेडाच्या उत्तरेस व पुण्याच्या ईशान्येस पुण्या पासून ती सुमारें वीस कोसांवर आहे; लोलिंबराज कवीची ही जन्मभूमि होय. येथें डोंगरांत लेण्याद्रि नांवानें गणपतीचें कोरीव लेणें चांगलें आहे. [ हें नांव चालतें.

**जेलमनदी**–पंजाबांत ज्या मोठ्या पांच नद्या आहेत त्यांतील वितस्ता नदीस हल्लीं

**जैत्रपाळ**– विक्रमादित्याचा पुत्र. (विक्रमादित्य शब्द पहा.)

**जैनमतभंजन**– कुमारिलभट्टकृत जैनमत खंडनपर ग्रंथ. [ला ग्रंथ.

**जैनेंद्र व्याकरण**– पहिल्या बुद्धानें व्याकरण विषयावर शब्दैक नोल्ला नामक केले-

**जैमिनी**– पूर्वमीमांसा ग्रंथाचा कर्ता. यांत कर्मेंकरूनच मोक्ष असें प्रतिपादित केलें आहे. हा बादरायण व्यासांचा शिष्य होता.

**जैमिनीसूत्रभाष्य**– कुमारिलभट्टकृत एक. व दुसरें शबरस्वामिकृत.

**जोगाईचें आंबें**– हें क्षेत्र बेनगंगेच्या कांठीं आहे. यास कोणी नुस्तें आंबेंही ह्मणतात. येथें डोंगरांत एका दुर्गम कड्यावर मुकुंद राजाची समाधि आहे. ती समाधीची जागा इतकी संकुचित आहे कीं,– तेथें परकाष्ठा तीन माणसें बसतील. (स्वतःची माहिती).

**जोगापरमानंद**– हा ब्राह्मण बारशी येथील राहणारा मोठा सूर्योपासक होता ; याचा प्रत्यहींचा नेम सूर्यास सातशें नमस्कार घालायाचा असे. एकदां एक सावकार यास कोरा पीतांबर देऊं लागला, व यानें मला नको ह्मणून सांगितलें तरी बळेंच तो यास नेसविला. त्या पासून याच्या नमस्कारास पराकाष्ठेचा व्यत्यय येऊं लागला. तेव्हां यानें एका शेतकऱ्यास बोलावून सांगितलें कीं, हा पीतांबर मी तुला देतों पण असें कर कीं, दोन अपेट बैल (आंडन बडविलेले) आण, त्यांच्या मानेवर जूं घाल, जुंवास बळकट दोरखंड लावून त्याला माझे पाय बांध. आणि बैलांस आसुडानें वरचेवर इतकें मारीत चल कीं, ते मला फरकटत ओढीत खूप उधळतील. शेतकऱ्यानें ही गोष्ट कबूल करवेना, परंतु एवढें काम न बजाविल्यांत मोठा किंमतदार पीतांबर हातचा जातो. ह्मणून त्यानें याची गोष्ट कबूल केली, व रानोमाळ यास यानें सांगितल्या प्रमाणें फिरविलें. अंग चांगलें रक्तबंबाळ होऊन मऊ झाल्यावर यानें सांगितलें आतां पुरे कर. नंतर शेतकऱ्यानें यास सोडिलें. व यानें बोली प्रमाणें त्यास पीतांबर दिला. या प्रमाणें यानें पीतांबर नेसलेल्या देहास शासन करून पुनः आपला पूर्वक्रम निर्वेध चालविला. (भ० वि० अ०२०).

**जोतपूर**– हें शहर मेवाडांत आहे. येथील रजपूत राजे आपणांस राहदोर क्षत्रिय ह्मणवितात.

**जोनराजपंडित**– राजतरंगिणी ग्रंथाच्या कल्हणानें लिहिलेल्या पुढील वृत्तांताचा कर्त्ता. हा कल्हणाच्या मागून दोनशें वर्षांनीं झाला होता. किरातार्जुनीय, व श्रीकंठचरित्र यांवर याची टीका आहे. (बुल्ह० शोध.)

**जोशीमठ**– श्रीमच्छंकराचार्यांचा बद्रिकेदार येथील मठ. गिरि, पर्वत, आणि सागर हे तीन सन्यासी व आनंदनांवाचा ब्रह्मचारी येणें प्रमाणें या मठाकडील होत.

**ज्योतिर्विदाभरण**– हा संस्कृत ग्रंथ कालिदासकृत ह्मणतात. परंतु हा वराहमिहीरकृत असावा, असें आमचें मत आहे. कारण विक्रम सभेंत ज्योतिःशा-

रूवेत्ता वराहमिहीरच नामांकित होता. हा ग्रंथ संवत् २४ व्या वर्षी झाल्याचें त्यांत आढळतें.

**ज्योतिषार्णव**— कदंब कविकृत ग्रंथ. (२कदंब)शा०पहा.

**झांशी**— हें बुंदेल्यांचें संस्थान. हल्लीं खालसा झालें आहे.

**टांकळी**— समर्थ रामदास स्वामींचे पहिले शिष्य उद्धव गोसावी. त्यांच्या मठाचा व समाधीचा गांव. हा गोदावरीच्या कांठीं नासिका पासून सुमारें एका कोसावर आहे.

**टेटू**— तैलंगणांतील नेलुरू प्रांतामधील गांव.

**टेंबू**— प्रतिनिधीच्या जहागिरी पैकीं एक गांव. हा कऱ्हाडा पासून सुमारें दोन कोसांच्या आंत आहे, व त्या जवळून कृष्णा नदी वाहात आहे.

**ठाणें**— उत्तर कोंकणांतील एक जिल्ह्याचें ठिकाण, व शहर.

**डैबोई**— गुजराथेंतील एक गांव.

**डांकूर**— गुजराथेंतील एक क्षेत्र. येथें कृष्णाची नामांकित मूर्ति आहे.

**डुंगरबारोट**— गुजराथेंत असणाऱ्या विजापूरचा राहणारा एक भाट. हा संवत्‌अठराशें पंचाणणव मध्यें होता. हा कवि असे. (काव्य० गु०).

**डोमगांव**— समर्थ रामदास स्वामींचे दुसरे शिष्य कल्याण गोसावी त्यांच्या मठाचा व समाधीचा गांव. हा शीना नदीच्या कांठीं मोंगलाईंत आहे, व येथून परंडा किल्ला सुमारें दीड कोसावर आहे. [जै.पं.]

**तंगणदेश**— हा हिमालयांत आहे. [कृष्णांत येतें.

**तगरशहर**— हें शहर अशोक राजानें वसविलेलें पैठणाच्या पूर्वेस होतें,असें ऐ.

**तंजावर**— हें शहर द्रविड देशांत कुंभकोणाच्या दक्षिणेस आहे. तंजोर यासच ह्मणतात. कोणी चंदीचंदावरही ह्मणतात. शिवाजीचा सावत्र भाऊ व्यंकोजी तो येथील राजा होता. व त्याचे वंशज अजून येथें आहेत.

**तंती**— जैनांच्या चोवीस तीर्थंकरांतील सोळावा. (तीर्थंकर)शब्द पहा.

**तंत्रवार्त्तिक**— कुमारिल स्वामिकृत मीमांसा प्रकरणा वरील ग्रंथ. याची श्लोकसंख्या सुमारें साडे छत्तीसशें आहे. (बुल्ह० शोध.)

**तंत्रालोकविवेक**— जयरथ कविकृत संस्कृत ग्रंथ.

**तत्त्वचंद्र**— जयंत कविकृत संस्कृत व्याकरणावर ग्रंथ.

**तत्त्वचिंतामणि**— संस्कृत भाषेंत न्यायशास्त्रावर जयदेव कृत ग्रंथ.

**तत्त्वचिंतामण्यालोक**— तत्त्वचिंतामणी वरील जगदेव मिश्रकृत संस्कृत व्याख्या.

**तत्त्वझाडा**— वेदांत निरूपण विषयक गद्यात्मक ग्रंथ. हा मराठी भाषेंत आहे, व तो हंसराज स्वामींनीं रचला आहे. याची संख्या अजमासें दोन हजार येईल.

**तत्त्वत्रयनिरूपण**— वरदाचार्यकृत संस्कृत ग्रंथ. यांत १ चित् १ अचित् आणि एक ईश्वर या तीन तत्त्वांचें निरूपण केलें आहे, व विष्णु हाच जगत्कारण असें प्रतिपादन केलें आहे.

**तत्त्वदीपनिबंध**— वल्लभाचार्यकृत संस्कृत ग्रंथ.

**तत्त्वबोधिनी**— प्रौढ मनोरमेवर ज्ञानेंद्र सरस्वती कृत मोठी टीका.

**तत्त्वविवेक**— मध्वाचार्यकृत ग्रंथ. [त.

**तत्त्वसंग्रहदीपिका**— शितिकंठ कविकृत ग्रंथ. यास शितिकंठी असेंही ह्मणता-

**तत्त्वाजीवा**— एक साधु. (नाभा० भक्त०) ग्रंथ पहा.

**तत्त्वानुसंधान**— माधव सरस्वतीकृत वेदांत विषया वरील संस्कृत ग्रंथ.

**तथागत**— बौद्ध मतानुसारी पुरुष विशेष. २— बुद्धास नांव.

**तमसानदी**— चेदी देशांतून वहात जाणारी नदी.

**तरंगिणी**— संस्कृत भाषेंत मधुसूदन कविकृत ग्रंथ.

**तर्कदीपिका**— आनंदानुभवकृत संस्कृतांत न्यायावरील ग्रंथ.

**तर्कपरिभाषा**— न्यायावर केशवमिश्रकृत ग्रंथ.

**तर्कभाष्य**— रामानुजाचार्यकृत तर्कशास्त्र संबंधानें न्यायावरील ग्रंथ.

**तर्कशास्त्र**— जैनाचार्य हेमचंद्र पंडित कृत.

**तर्कसंग्रह**— अनंभट्टकृत न्यायावर. [बाप.

**तलक**— आंध्रभृत्य राजांतील अकरावा राजा. हालेयाचा पुत्र. व पुरुषभीरूचा

**तक्षशिला**— गांधार किंवा कंधार देशाची राजधानी. ग्रीक लोकांच्या ग्रंथांत हिला तक्षिला ह्मटलेलें आहे. हिचे उत्तर अक्षांश सुमारें ३४° व पू० रेखांश ७४° आहेत.

**तक्षिला**— तक्षशिला.

**ताटीचे अभंग**— मराठी भाषेंत मुक्ताबाईनें केलेले. या प्रत्येक अभंगांत शेवटीं "ताटी उघडा ज्ञानेश्वरा" असें आलेलें आहे.

**तांडमंडल**— कांचीस कोठें कोठें ह्मटलेलें आढळतें.

**तातचार्य**— ह्या कवीचें जन्म कांची येथें झालें होतें. हा द्वैतमती माध्व होता. याचा उदय शालिवाहनाच्या १५व्या शतकांत झाला. हा मोठा परोपकारी असे. लोकांचीं लग्नें करण्याच्या कामीं हा इतका झटे कीं, प्रसंगीं त्या प्रीत्यर्थ पदरचा

पैसाही खर्च करी. व या परोपकारीक कृत्या मुळें यास लोक कन्यादानी ह्मणत. सात्विक ब्रह्मविद्याविलास नांवाचा ग्रंथ द्वैत वेदांतपर यानें केलेला आहे, व त्यां-त द्वैताचें प्रतिपादन केलेलें आहे. चंद्रगिरि येथील राजा व्यंकटपति रायलु; त्याचा वंशपरंपरेनें हा कुलगुरु होता. स्मार्तांचा तिरस्कार करणें, व शिवनिंदा करणें, एवढा दुर्गुण याच्या अंगीं जबर असल्या मुळें, अपय्या दीक्षितांशीं याचा मोठा द्वेष असे. दीक्षितांशीं वाद करून त्यांस वादांत जिंकावें, व त्यांचा अपमान करावा, ये विषयींची याला भारी खुमखुमी होती; ह्मणून यानें बु-ध्या खटपट करून तो प्रसंग राजसभेंत घडवून आणिला. परंतु त्यांत यास यश न येतां, अपय्या दीक्षितांनीं यास जिंकलें. या गोष्टी वरून यानें दीक्षितां-वर मारेकरी घातले, व त्यांत ते वांचले ही गोष्ट आह्मीं त्यांच्या नांवावर लिहि-लीच आहे.

पुढें असें झालें ह्मणून सांगतात कीं, याची बायको मोठी पतिव्रता होती. हा बाहेर गेला ह्मणजे याची वाट पहात तिनें दारांत उभें राहावें असा तिचा नेम असे. एकदां ती दारांत उभी असतां कांहीं लबाड लोकांनीं तिला येऊन अ-सें सांगितलें कीं, तुझा पति कांहीं अपघातानें आतांच मरण पावला. तें ऐक-तांच तिचे प्राण तेथल्या तेथेंच जाऊन, ती मरून खालीं पडली. हें वर्तमान या-स कळून तो घरीं आला, व तिला मेलेली पाहून याचेही प्राण तत्काळ निघून गेले. याचें व याच्या बायकोचें हें चमत्कारिक प्रेम व मरण ऐकून ग्रामस्थांस अतिशय आश्चर्य व दुःख झालें. (कवि॰चरि॰).

२– कृष्णा रायलूचा कुळगुरु.

**तादरी**– द्रविड देशांतील एक गांव. येथें रामानुजाचार्यांचा मठ वगादी आहे. या गा-दीचें नांव तिंगळ आहे.

**तानसेन गवई**– हा पुरुष जातीचा गौडब्राह्मण होता. याचीं आई बापें गरीब अ-सल्या मुळें हा गुरें राखीत असे. एकदां असें सांगतात कीं, हा गुरें चार-णीस लाऊन झाडा खालीं निजला असतां, पृथिवीवर कोणी संचार करणा-ऱ्या गंधर्वानें यास पाहिलें. व त्या बरोबर त्याच्या मनांत यास गायन कलेंत निपुण करावें असें आलें. मग तो फकिराच्या वेषानें या पुढें येऊन, यास त्यानें एका झाडाचा पाला खावयास दिला. तेणें करून याचा आवाज अत्यं-त सुस्वर होऊन रागरागिण्यांचें ज्ञान यास सहज स्फुरद्रूप झालें. तेव्हा या-

रून हा नामांकित गवय्या झाला. हा प्रथम उज्जनीच्या राजाच्या पदरीं होता. त्या जवळून अकबरानें यास मागून घेतलें. हल्लीं गवय्या लोकांत याची इतकी मान्यता आहे कीं, ते याचें नांव निघतांच कान पिरगाळून घेऊन यास नमन करीत असतात.(बृहद् माहिती.)

**तानाजी मालुसरा**– शिवाजी राजाचा एक मराठा सरदार.

**तानोर**– दक्षिणे कडील एक प्रांत. [ इच्याच कांठीं आहे.

**तापीनदी**– ही खानदेशांतून वाहात पश्चिमसमुद्रास मिळाली आहे. बऱ्हाणपुर

**तामिळभाषा**– मद्रासे पासून सिंहलद्वीपा पर्यंत जी भाषा लोक बोलतात ती. द्रविड भाषेंतून ज्या पांच भाषा उत्पन्न झाल्या त्यांतील ही एक होय.

**ताम्रपर्णीनदी**– पश्चिम घांटातून निघून तिनवल्ली प्रांतांतून वहात चाललेली नदी.

**ताम्रलिप्तनगर**–जैन लोकांच्या ग्रंथांत हें नगर वंग ह्मणजे बंगाल देशाची राजधानी ह्मटलें आहे. हल्लीं या जागीं मिदनापूर शहर आढळतें.

**तारचंद्रोदय**– संस्कृत ग्रंथ. हा वैद्यनाथ कवीनें लिहिला.

**तालक**– तलक शब्द पहा.

**तालाकटदेश**– तालिकोटाच्या भोंवतालचा प्रदेश असें कित्येक ह्मणतात. भारता मध्यें तर हा देश कोंकणास लगत आहे म्हणून सांगितलें आहे.

**तालीकोट**– हें शहर कृष्णेच्या कांठीं विजापुराच्या पूर्वेस आहे. याचे उत्तर अक्षांश सुमारें १७° व पूर्वरेखांश ७७° आहेत.

**ताहाराबाद**– राहुरी तालुक्यांतील गांव. हा नगरा पासून सुमारें १८ कोस आहे. प्रसिद्ध कवि महीपति बावा त्यांचा वतनदारीचा हा गांव होय.

**तिक्कनसोमयाजी**– हा कवि इतिहास वेत्ता जातीचा ब्राह्मण होता. नेलुरू प्रांतांतील पोत्तुरु गांवीं याचें जन्म झालें. याचा उदय शालिवाहनाच्या १२व्या शतकांत झाला. यानें कविराट् नामक ब्राह्मणा जवळ संस्कृत भाषेचें अध्ययन केलें. तेलंगी भाषेंत तर हा चांगलाच प्रवीण होता. असें सांगतात कीं; मानसिंग राजाच्या आज्ञे वरून भारताच्या अठराही पर्वांचें भाषांतर यानें तेलंगींत इतकें जलद लिहिलें कीं, राजानें प्रसन्न होऊन यास पुष्कळ जमीन इनाम दिली. त्या उत्पन्नावर यानें अनेक यज्ञ करून वरील नांव मिळविलें. कृ॰

**तिंगळ**– तादरी येथील रामानुजांच्या गादीचें नांव.

**तिनवल्ली**– दक्षिण दिशेकडील ताम्रपर्णी नदी लगतचा प्रांत.

**तिबेटदेश**— आर्य लोकांचा मूळचा प्रदेश. हा हिमालयाच्या उत्तरभागीं आहे. आर्यविद्या सुधाकर ग्रंथांत त्याचे कर्ते ह्मणतात कीं, याचें मूळचें नांव त्रिविष्टप (भौमस्वर्ग) त्याचा अपभ्रंश तिबेट होय.

**तिमय्यासाती**— राजमहेंद्री येथील राहणारा हा कविजातीचा तैलंग होता. याच्या बापाचें नांव चिमासीसाती व आज्याचें नांव बक्कल्ल गोरय्या होतें. कन्यकापुराण नांवाचा जो तेलंगी भाषेंत ग्रंथ आहे तो यानेंच केलेला आहे. (कविच०).

**तिमिराजा**— कलियुगांतील युधिष्ठिर वंशीय राजा. दूर्व राजाचा पुत्र व बृहद्रथाचा बाप. यानें ४८६१०८२९ इतका काळ पर्यंत राज्य केलें. व त्या वेळेस कलियुगाचीं एकंदर वर्षे १३९४६१६१६ इतकीं झालीं होतीं. याच्या राज्य कारकीर्दीच्या सुमारें ४२व्या वर्षी दुसरा बुद्ध मेला. (राजमा० व जैं. ग्रं.)

**तिम्मरसू**— अप्परसू कवीसच या नांवानें कोणी कोणी ह्मणत.

**तिरभुक्ति**— तिरहूट शहर तेंच.

**तिरहूट**— विदेह देशाची राजधानी मिथिला तिचें हल्लींचें चाललेलें नांव. या जवळ गोग्रा नदी आहे. व हें सुमारें उत्तर अक्षांश २६ आणि पूर्वरेखांश ८७ यांवर आहे. (प्रा. हिं. नका.)

**तिरुपति**— व्यंकटाचल अथवा ज्यास गिरि असें लोक ह्मणतात तें क्षेत्र. येथें देव व्यंकटेश आहे. मद्रास शहर याच्या आग्नेयीस आहे. व हें क्षेत्र तैलंगणांत आहे. येथील अधिकारी बैरागी आहे.

**तिरुमलनाईक**— मधुरा शहरचा राजा. अय्या दीक्षित याचाच दिवाण होता.

**तिष्य**— कोरांगराजाचा पुत्र. यास याची आई दुराचरणी अतुला तिनें नवऱ्यासज्या प्रमाणें विष घालून मारिलें, तसेंच मारिलें. (ग्या० इं० कोश.)

**तीर्थंकर**— जैन लोकांत झालेले चोवीस साधु. त्यांचीं नांवें येणें प्रमाणें आहेत:— १ ऋषभ, २ अजित, ३ संभव, ४ अभिनंदन, ५ सुमति, ६ पद्मप्रभु, ७ सुपार्श्व, ८ चंद्रप्रभु, ९ पुष्पदंत, १० सिताल, ११ श्रेयांश, १२ वसुपूज्य, १३ विमल, १४ अनंत, १५ धर्म, १६ शंती अथवा शांती, १७ कुंथु, १८ अर, १९ मालि, २० मणिसुव्रत २१ नमि, २२ नेमी, २३ पार्श्वनाथ आणि २४ वा महावीर ह्मणजे वर्द्धमान स्वामि. (प्रव० शारो०) हे सर्व तीर्थंकर अर्हंताच्या मागें सुमारें हजार वर्षांत होऊन गेलेले आहेत.

**तीर्थसंग्रह**— साहेबरामकृत संस्कृत भाषेंत तीर्थवर्णन संग्रह.

**तुकयाबंधु**— तुकारामाचा धाकटा भाऊ कान्होबा त्यानें, तुकाराम परलोकास गेल्यावर

जे अभंग लिहिले त्यांत असलेलें नांव.

**तुकाराम**— पंढरपुरच्या पांडुरंगाच्या भक्तमंडळांत हा एक मोठा प्रख्यात भगवद्भक्त होऊन गेला. हा जातीचा शूद्र, व वडिलांपासून वाणीपणाचा धंदा करणारा असे. याचें जन्म देहू येथें शालिवाहन शके १५३० मध्यें झालें. याच्या पूर्वजांचें वृत्त येणें प्रमाणें आढळतें कीं, याचा मूळपुरुष विश्वंभर होता. तो विठोबाचा मोठा भक्त असे. व महिन्याच्या महिन्यास पंढरीस वारीस जाणें हा त्याचा मोठा नेम होता. हल्लीं देहूस जें विठोबाचें देऊळ आहे. तें त्याच्याच वेळेस बांधलें गेलें होतें.

विश्वंभराच्या बायकोचें नांव अमाई होतें, व हरि आणि मुकुंदा हे त्यासशेन पुत्र होते. विश्वंभर मरण पावल्यावर त्याच्या बायकोनें आपल्या दोघां मुलास वारी करण्याचा उपदेश केला; परंतु त्यांचें चित्त प्रपंचांत अतिशय असल्या मुळें त्यानीं तिचा उपदेश अमान्य केला. व कोणी एका राजाच्या लष्करांत मोठा अधिकार मिळविला. पुढें आपआपल्या बायकांस व आईस त्यांनीं तिकडेनेलें. आणि तिकडेसच सुखानें प्रपंच करीत राहिले. या प्रमाणें बरेच दिवस पर्यंत चाललें असतां, त्या दोघांसही एकदां राजा बरोबर परचक्रावर जाण्याचा प्रसंग आला. व कर्मधर्म संयोगानें उभयतांही लढाईंत पडून मरण पावले.

हें वर्तमान अमाईस कळतांच तिला अनिवार शोक झाला. त्यांत एक सून ह्मणजे मुकुंदाची बायको ती तर नवऱ्या बरोबर सतीच गेली, व दुसरी माय गरोदर होती ह्मणून राहिली. नाहीं तर तिचाही मानस तसाच होता. पुढें अमाई सुनेस घेऊन सर्व चीजवस्त सुध्दां देहूस आल्यावर, सून बाळंतीण होऊन तिला मुलगा झाला. त्याचें नांव तिनें विठोबा ठेविलें; परंतु तो मोठा झाला नाहीं तोंच अमाई एका एकीं मरण पावली.

विठोबा मोठा झाल्यावर आई पासून त्याला आपल्या वडिलांची वगैरे सर्व हकीकत कळली. ह्मणून त्यानें पुनः वारी चालू केली, व भजन पूजनांत आपला काळ घालवीत प्रपंच करूं लागला. पुढें विठोबाचें लग्न झालें, व कांहीं काळानें त्यास पदाजी नांवाचा पुत्र झाला. त्या पदाजीस पुढें शंकर झाला. शंकराचा कान्होबा, कान्होबाचा बोल्होबा आणि बोल्होबास कनकाई पासून सावजी, तुकाराम व कान्होबा असे तीन पुत्र झाले. या तिघांत सावजी जो वडील तो विरक्त असल्या मुळें व धाकटा लहान असल्या मुळें, बोल्होबानें मधला मुलगा तुकाराम त्याच्या अंगावर प्रपंचाचा सर्व भार घातला. या वेळेस त्याचें वय

सारें तेरा वर्षांचें होतें.

तुकारामाच्या अंगावर जरी प्रपंचाचें ओझें पडलें तरी आईबाप जिवंत असल्यानें एकादें काम काज अडलेंच तर तो तें त्यांस पुसून करी. त्यामुळेंत्यास त्याचें कांहींच जड भारी वाटत नसे. या प्रमाणें यानें चार वर्षां पर्यंत प्रपंच मोठ्या छातीनें थाटला. इतक्यांत याच्या सत्राव्या वर्षी याचीं आई बापें मरण पावलीं. वडील भावाची बायको मेल्यानें तो तीर्थयात्रेस निघून गेला. व यास असलेला संतु नांवाचा मुलगा तोही मरण पावला त्या योगानें तुकारामास एकदम अंगावर आभाळ कोसळल्या सारखें वाटून त्याचा अगदीं धीरच सुटला. तरी न डगतां तसाच त्यानें प्रपंच चालविला; परंतु पुढें पुढें महागाई इतकी वाढली कीं, चाऱ्या वांचून याच्या पदरचीं सर्व गुरें ढोरें मेलीं इतकेंच नव्हे, तर असलेल्या माणसांस वेळेस ओली कोरडी भाजी भाकरही मिळेनाशी झाल्या कारणानें याची थोरली बायको आधींच दमेकरीण असलेली, थोड्याच दिवसांत अन्न अन्न करून मेली. या वेळेस यानें वय एकवीस वर्षांचें होतें. सारांश अखेरीस हा, याची दुसरी कर्कशा बायको जिजा बाई, आणि धाकटा भाऊ व त्याची बायको, येणें प्रमाणें माणसें शिलक राहिलीं.

व्यापार करण्यास जवळ पैसा नाहीं, व खेपा करण्यास बैल नाहींत. म्हणून तुकाराम कांहीं दाणे मजूरी हारवल ठरवून कोणाचें शेत राखणें वगैरे काम पतकरून निर्वाह करूं लागला; परंतु दिवसें दिवस त्याच्या वृत्तींत उदासीनपणा इतका वाढत चालला कीं, नामदेवाचे अभंग, व कबिराचीं पदें, यानें पुष्कळ पाठ केलीं. ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत व अमृतानुभव यांचीं पारायणें चालू केलीं, व राहिलेल्या वेळांत कोणाचें काम करून निर्वाह चालवूं लागला. तुकारामाचें लोकांकडे जें येणें होतें तें वसूल करण्याचें तर त्यानें अगदींच सोडून देऊन शिवाय त्या बद्दलचे त्या जवळ असलेले रोखे इंद्रायणींत बुडवावे असें त्यानें मनांत आणिलें; परंतु धाकटा भाऊ म्हणूं लागला तुम्ही असें करतां खरें, पण माझी वाट काय! त्या वरून तुकारामानें निम्मे रोखे त्यास देतांच तो वेगळा राहिला असें पाहून, आपल्या वांट्याचे रोखे त्याणें सर्व इंद्रायणींत बुडवून टाकिले, व निखालस मोकळा होऊन आपला काळ भजनांत घालवूं लागला.

एकदां एक शेतकरी येऊन यास म्हणाला, तुकाराम शेट, तुम्हीं उगीच दे-

बळांत वगैरे भजन करीत जे बसतां, ते जर माझ्या शेतावर बसाल, तर तुमचें भजनचें भजन होऊन माझेंही शेत राखलें जाईल. या बद्दल मी तुह्मांस राशीवर अदमण दाणे देईन. ही गोष्ट यानें कबूल करतांच शेतकऱ्यानें यास शेतावर नेऊन बसविलें, व आपण खेप करण्यास परगांवीं निघून गेला. इकडे शेतास दाणा भरत चालला होता, त्या मुळें त्यावर पांखरें येऊन पडलीं. तेव्हां यानें विचार केला कीं, भुकेलेल्या पांखरांस हांकणें नीट नाहीं, यास्तव यांनीं खाऊन राहील तें राहील, असें ह्मणून उगाच राहिला. त्या योगानें पांखरांनीं शेताचा खरांटा करून सोडिला.

थोड्याच दिवसांनीं शेताचा मालक खेपेहून आला, आणि पाहतो तर शेतांत दाणा ह्मणून मुळींच राहिला नाहीं. त्या वरून तुकारामाची व त्याची पुष्कळ बोलाचाली होऊन तें भांडण चावडीवर आलें. या पंचाइतीस गावांतील लोकही जमले. नंतर त्यांनीं उभयतांचा मजकूर ऐकून घेऊन शेतकऱ्याचें दोन खंडीचें नुकसान झाल्याचें समजल्यावर, तितक्या दाण्यांचा पैका आकारून, त्या बद्दलचा रोखा तुकारामा कडून लिहवून शेतकऱ्यास देवविला. परंतु पुढें असा चमत्कार झाल्याचें सांगतात कीं, राशीवर शेतांत सत्रा खंडी दाणा उतरला. तो पाहून शेतकऱ्याच्या तोंडास पाणी सुटून, तो तुकारामास रोखा परत देण्यास कबूल झाला. पण गांवकऱ्यांनीं झालेला ठराव फिरणार नाहीं असें सांगून त्यास दोनखंडी दाणे दिले. व रोखा परत घेऊन तुकारामास दिला. नंतर राहिलेले पंधरा खंडी दाणे महादाजी पंत देशपांड्या ह्मणून एक प्रामाणिक गृहस्थ होता. त्याजकडे भरून ठेवविले, ते तुकारामानें पोटास न खातां त्याच्या पैशांत त्यानें वडिलांनीं बांधलेल्या देहू येथील विठोबाच्या देवळाचा जीर्णोद्धार केला.

पुढें तुकाराम कीर्तन करूं लागला. एकांतांत बसणें झाल्यास देहूपासून सुमारें दोन कोसांवर भांबनाथाचा डोंगर आहे, तेथें जाऊन बसूं लागला. सारांश प्रपंचाकडे पाहणें दिवसें दिवस यानें इतकें सोडलें कीं, घरीं बायको व मुलें यांचा निर्वाह कसा होतो, त्याची काळजी टाकिली. व आठ आठ दिवस घरींही येईनासा झाला. त्या मुळें बायको निरुपाय होऊन, ती मोलाचें काम करून आपला व मुलांचा निर्वाह करूं लागली. आणि यासही हा असेल तेथें कधीं कधीं वाढून नेऊन पोहोंचवूं लागली. महीपति बावांनीं याचें चरित्र भक्तवि-

जयाच्या अठ्ठेचाळीस व एकुणपन्नास अध्यायांत लिहिलें आहे. त्यांत याचा वृत्तांत सविस्तर लिहिला आहे, ह्मणून ज्यांस तो समग्र पाहणें असेल, त्यांनीं तो ग्रंथच पाहवा. या प्रमाणें भजन पूजनांत काळ घालविणें, कथा कीर्तन करणें, एकादशीचें व्रत पाळणें, पंढरीस वारीस जाणें, इत्यादि नियमानें हा वागत असतां, यास कविता करण्याची आज्ञा झाली, ती विषयीं यानें लिहिलें आहे, तें असें:—

## अभंग.

नामदेवें केलें स्वप्नामाजी जागें॥ सवें पांडुरंगें येऊनीयां॥१॥ सांगितलें काम करावें कवित्व॥ वाउगें निमित्त बोलों नको॥२॥ माप टाकीं सळ धरिली विठ्ठलें॥ थापटोनी केलें सावधान॥३॥ प्रमाणाची संख्या सांगे शतकोटी॥ उरले शेवटीं लावी तुका॥४॥

यानें एकंदर अभंग किती लिहिले, त्यांची संख्या एके ठिकाणीं या प्रमाणें आहे.

वेदाचे अभंग केले श्रुतिपर॥ द्वादश सहस्त्र संहितेचे॥१॥ निरुक्त निघंट आणि ब्रह्मसूत्र॥ अवतार सहस्त्र उपग्रंथ॥२॥ अभंग ते कोटी भक्तिपर केले॥ ज्ञानपर केले नितुकेची॥३॥ पंचाहत्तर लक्ष वैराग्य वर्णिलें॥ नाम तें गाइलें नितुकेंची॥४॥ साठी लक्ष केला बोधक जनासी वर्णिलें रूपासी नितुकेंची॥५॥ द्वादश सहस्त्र आत्मबोध केला॥ अनुभव घेतला एक सर्व॥६॥ चौतीस सहस्त्र लक्ष कोटी पांच॥ सांगोनियां साच तुका गेला॥७॥

भक्तविजयाच्या ९व्या अध्यायांत जी संख्या लिहिली आहे त्या बद्दलच्या ओंव्या येणें प्रमाणें आहेत:—

चाळीस लक्ष चौऱ्याण्णव कोटी॥ नव लक्ष लवीत आलें शेवटीं॥ मग नामदेव आला वैकुंठीं॥ स्वकीय इच्छें करोनियां॥३९॥ एकावन्न लक्ष पांच कोटी जाणे॥ शेष राहिले यांचें बोलणें॥ तें तूं वदें प्रसाद वचनें॥ सप्रेम जीवन मी देतों॥४०॥

अभंगांत लिहिलेल्या कडव्या कडव्यांतील संख्येची बेरीज घेतली, तर ती पांच कोटी, सत्तर लक्ष, पस्तीस हजार येते, असें असून अभंग कर्ता शेवटल्या कडव्यांत पांच कोटी एक लक्ष चौतीस हजार अशी संख्या लिहितो, ह्मणून हा अभंग खुद्द तुकारामाचा असेलसें आह्मांस वाटत नाहीं. महीपति बावांनीं लिहिलेली संख्या, तीतर ते ह्मणतात कीं;- स्वतः देवानें तुकारामास स्वप्नांत येऊन सांगितली. तेव्हां निश्चि

त संख्या कोणती, तिचा निर्णय वरील दोन्ही प्रमाणांवरून होत नाहीं. आतां तिसरें एक प्रमाण आढळतें तें असें:— तुकाराम ज्या वेळेस स्वर्गास जाण्यास निघाला त्या वेळचे त्यानें केलेले कांहीं अभंग आहेत त्यांतील एका अभंगांत त्यानें संख्या लिहिली आहे ती येणें प्रमाणें:—

चार कोटी एक लक्षाचा शेवट॥ चौतीस सहस्र स्पष्ट सांगितलें॥१॥ सांगितलें इतुकें कथोनियां गेला॥ बारा अभंगांला सोडूं नका॥२॥ सोडूं नका तुह्मां सांगितलें वर्म॥ भवपाश कर्म चुकतील॥३॥ चुकतील याता याती विठोबाची आण॥ करितां पठण जीवें भावें॥४॥ जीवें भावें करितां होईल दर्शन॥ प्रत्यक्ष सगुण तुका ह्मणे॥५॥

ही या अभंगांतील संख्या तर वरील दोहों प्रमाणां वरून पुष्कळ भिन्न असल्यामुळें नामदेवाच्या शतकोटी अभंगां पैकीं अभंग झाले होते किती, व यानें शतकोटींची भरती करण्यास बाकी लिहिले किती, त्यांचा कांहींच निर्णय होत नाहीं.— वरील अभंगां वरून, नामदेवाचे होणें राहिलेले अभंग तुकारामानें सर्व पूर्ण केले हाही निर्णय होत नाहीं; कारण या विषयीं बोरवनकर तुकारामाचे वंशज निराळाच वृत्तांत सांगतात. ते ह्मणतात कीं, नामदेवाचे बाकी होणें अभंग तुकारामा कडून सर्व पुरे झाले नाहींत. एक लक्ष पंचवीस हजार अभंग होणें राहिले असतांच तुकारामाचें आयुष्य सरून तो स्वर्गास गेला. व पुनः तेंच नांव धरून आणि ब्राह्मण कुळांत जन्मास येऊन त्यानें ते अभंग निःशेष कडेस लाविले. सारांश तुका विप्र हा तुकारामाचाच अवतार होता, व त्यानें मात्र सर्व अभंग कडेस लाविले, असें त्यांचें ह्मणणें आहे. ही गोष्ट बोरवनकरांची ह्मणजे खुद्द तुका विप्राच्या वंशजांची व आमची गांठ पडल्यांत आम्हांस कळून आली. तात्पर्य कीं, अजून हा शोध अपुराच राहिला आहे.

आतां तुकारामानें लिहिलेल्या अभंगां विषयीं, कित्येकांचें ह्मणणें असें आहे कीं, त्याचे कांहीं अभंग त्याला गुरूपदेश होण्या पूर्वीं ह्मणजे स्वात्मबोधा पूर्वीं झाले आहेत. व कांहीं नंतर झाले आहेत त्यां विषयीं ते निवड दाखवितात ती अशी आहे:— (१)

मज नाहीं तुझ्या ज्ञानाची ते चाड॥ घेतां वाटे गोड नाम तुझें॥१॥ नेणतें लेंकरूं आवडीचें तान्हें॥ बोलतों वचनें आवडीनें॥२॥ भक्ति नेणें कांहीं वैराग्य तें नाहीं॥ घातला विठाई भार तुज॥३॥ तुका ह्मणे

नाचें निर्लज्ज होउनी॥ नाहीं माझे मनीं दूजा भाव॥४॥ ॥२॥ सुंदर तें ध्यान उभा विटेवरी॥ कर कटावरी ठेवूनियां॥१॥ तुळशी हार गळा कांसे पीतांबर॥ आवडे निरंतर हेंची ध्यान॥२॥ मकर कुंडलें तळपती श्रवणीं॥ कंठीं कौस्तुभ मणी विराजीत॥३॥ तुका ह्मणे माझें हेंची सर्व सूख॥ पाहिन श्रीमुख आवडीनें॥४॥ ॥३॥ म्हणे विठ्ठल ब्रह्म नव्हे॥ त्याचें बोल नायकावे॥१॥ मग होका कोण्ही एक आदि करून ब्रह्मादिक॥२॥ नाहीं विठ्ठल जया ठावा॥ तोही डोळां न पाहावा॥३॥ तुका ह्मणे नाहीं॥ त्याची भीड मज कांहीं॥४॥ ॥४॥ नको ब्रह्मज्ञान आत्मस्थिति भाव॥ मी भक्त तूं देव ऐसें करीं॥१॥ ध्रु०॥ दावीं रूप मज गोपिका रमणा॥ ठेवीन चरणा वरी माथा॥२॥ पाहोनि श्रीमूख देइन आलिंगन॥ जीवें निंबलोण उतरीन॥३॥ पुसतां सांगेन हितगूज मात॥ बैसोनि एकांत सुख गोष्टी॥४॥ तुका ह्मणे याशीं न लावीं उशीर॥ माझें अभ्यंतर जाणोनीयां॥५॥ ॥५॥ आणिकाची स्तुति आह्मा ब्रह्महत्या॥ एका वांचोनी त्या पांडूरंगा॥१॥ ध्रु०॥ आम्हां विष्णुदासां एक विध भाव॥ न ह्मणों या देव आणीकाशी॥२॥ शत खंड माझी होईल रसना॥ जरी या वचना पालटेन॥३॥ तुका म्हणे मज आणिका संकल्पें॥ अवघींच पापें घडतील॥४॥

या प्रमाणें "जेणें विठ्ठल मात्रा घ्यावी॥ तेणें पथ्य सांभाळावी" "आह्मी नामाचे धारक॥ नेणों प्रकार आणीक॥" "मुखीं नाम हातीं मोक्ष॥ ऐशी साक्ष बहुतांची॥" इत्यादिक अभंग गुरूपसत्ति पूर्वींचे होत. हेंच पारडें पुढें कसें उलटलें तें पहाः—

(१)

तीर्थी धोंडा पाणी॥ देव रोकडा सज्जनीं॥१॥ मिळालिया संत संग॥ समर्पितां भलें अंग॥२॥ तीर्थीं भाव फळे॥ येथें आनाड तें वळे॥३ तुका ह्मणे पाप॥ गेलें गेल्या कळे ताप॥४॥ ॥२॥ सद्गुरु वांचूनी सांपडेना सोय॥ धरावे ते पाय आधीं आधीं॥१॥ आपणा सारिखें करिती तात्काळ॥ कांहीं काळ वेळ नलगे त्यांशीं॥२॥ लोह परिसाची न साहे उपमा॥ सद्गुरु महिमा अगाधची॥३॥ तुका ह्मणे कैसे आंधळे हे जन॥ गेले विसरून खऱ्या देवा॥४॥ ॥३॥ सत्य गुरु रायें कृपा मज केली॥ परी नाहीं घडली सेवा कांहीं॥१॥ सांपडविलें वाटे जातां

गंगास्नाना॥मस्तकीं तो जाणा ठेविला कर॥२॥भोजना मागती तूप पावशेर॥पडिला विसर स्वप्ना माजी॥३॥कांहीं कळे उपजला अंतराय॥म्हणोनीयां काय त्वरा झाली॥४॥ राघव चैतन्य केशव चैतन्य॥ सांगितली माळिकेची खूण सांगितली॥५॥बाबाजी हें आपुलें सांगितलें नाम॥ मंत्र दिला रामकृष्ण हरि॥६॥ माघ शुद्ध दशमी पाहूनी गुरुवार॥ केला अंगीकार तुका ह्मणे॥७॥ (४)

देवाशीं तुकारामाचें अगदीं एकेरीवर येऊन बोलणें.

क्षीर सागरींच्या पुंडा॥ गांठ पडली गांव गुंडा॥१॥कोण तुह्मा हिमाइती॥ त्याची पुरवीन ख्यानी॥ २॥ विद्या थोडी ब्रीद फार॥ बादी करी कारभार॥३॥ आह्मीं नरकाशी जातां॥काय येईल तुझ्या हाता॥४॥ तुका ह्मणे कान्हा॥ क्रिया नष्टा नारायणा॥५॥

जर आह्मीं क्रियानष्ट आहों, तर मग आह्मांकडे कशाला आलास? असें ह्मणाल तर ऐका:- (५)

भक्ति ऋण घेतलें माझें॥चरण गाहाण आहेत तुझे॥१॥ तुझ्या नांवाचें आहे खत॥ चाल करूं पंचाईत॥२॥ व्याज मुद्दल एक करीं॥ माझा हिशेब देई हरी॥३॥ तुका ह्मणे पंढरि राजा॥साक्षि आहे सद्गुरु माझा॥४॥

मनाचें आकलन यावर:- (६)

मन बोळी मना॥ बुद्धि बुद्धी क्षण क्षणा॥१॥ मीच मज राखण झालों ज्यानें तेथेंचि धरिलों॥२॥ जें जें जेथें उठी॥ तें तें तया हातें कुटी॥३॥ खांजणी भांजणी॥तुका साक्ष उरला दोन्ही॥४॥

ज्ञान प्रशंसा:- (७)

ब्रह्मरस घेई काढा॥तेणें पीडा वारेल॥१॥ पथ्यनाम विठोबाचें॥ आणिक वाचे न सेवीं॥२॥ भव रोगा ऐसें जाय॥ यम काय क्षुल्लक॥३॥ तुका ह्मणे नव्हे बाधा॥ आणीक कदां भूतांची॥४॥ ॥८॥ अणूरेणीया थोकडा॥ तुका आकाशा एवढा॥१॥ गिळुनी सांडिलें कलेवर॥ भव भ्रमाचा आकार॥२॥ सांडिली त्रिपुटी॥ दीप उजळला घटीं॥३॥ तुका ह्मणे आतां॥ उरलों उपकारा पुरता॥४॥ ॥९॥ रज्जु सर्पाकार॥ भासयेलें जगडंबर॥१॥ ह्मणोनि आठवितों पाय॥ घेतों आलाय बलाय॥२॥ दृश्य द्रुमाकार लाणी॥ केलों सर्व स्वामी धणी॥ ३॥

तुकीं तुकला तुका॥ विश्वीं भरोनी उरला देखा॥४॥ ॥१०॥ ब्रह्म रस गोडी तयाचीं फावली॥ वासना मुराली सकळ ज्याची॥१॥ नाहींत्या विटाळ अखंड सोंवळा॥ उपाधी वेगळा आणि वेच्या॥२॥ मन हें निश्चळ झालें एके ठायीं॥ तया उणें काई निज सुखा॥३॥ तींच पुण्यवंत पर-उपकारी॥ प्रबोधिती नारी नर लोकां॥४॥ तुका ह्मणे त्यांचे पायीं पाय पोस॥ होउनीयां वास करिन तेथें॥५॥

येणें प्रमाणें "मी देह ह्मणतां ब्रह्महत्या कोटी॥" "धन्य तोचि जगीं जाणा राज योगी" इत्यादिक अभंग तुकारामास सद्गुरूपासून यथार्थ बोध झाल्या नंतरचे होत. सारांश याच्या अभंगाचे दोन प्रकार मानणें हें आह्मांसही बरें दिसतें.

तुकारामाचें वैराग्य मोठें कडकडीत होतें. तो इतका निस्पृह असे कीं, खऱ्या खऱ्या गोष्टींत तो कोणाचीही बिलकुल भीड धरीत नसे. वेदास व ब्राह्मणांसतो अतिशय श्रेष्ठ आणि प्रमाण मानी; या वरून शूद्र जातींत असा अद्भुत पुरुष कलि-युगांत झालाच नाहीं, व पुढेंही होणार नाहीं, असें निःसंशय आमचें मत आहे.ही जी आह्मी याची स्तुति केली ती उगीच नाहीं, या विषयीं हे खालीं लिहिलेले अ-भंग पहा:-

( १ )

धर्म रक्षावया साठीं॥ करणें आटी आह्मांसी॥१॥ वाचा बोलों वेद नीति करूं संतीं केलें तें॥२॥ न बाणतां स्थिति अंगीं॥ कर्म त्यागी लंड तो॥३ तुका ह्मणे अधम त्याशीं॥ भक्ति दूषी हरीची॥४॥

ब्राह्मण प्रशंसाः- ( २ )

माझा स्वामि तुझी वागवितो लात॥ तेथें मी पतित काय आलों॥१ ती-र्थें तुमच्या चरणीं जाहालीं निर्मळ॥ तेथें मी दुर्बळ काय वाणूं॥२॥ तुका ह्मणे तुह्मीं देवां द्विज वंद्य॥ मी तो काय निंद्य हीन याती॥ ३ ॥

शुष्क वेदांती यांस बोधः- ( ३ )

मांडे पुऱ्या मुखें सांगों जाणें मात॥ तोंडीं लाळ हात चोळी रिते॥१॥ ऐशियाच्या गोष्टी फिक्या मिठें वीण॥ रुचि नेदी अन्न चवी नाहीं॥ ध्रु०॥ बोलों जाणें अंगीं नाहीं शूरपण॥ काय तें वचन जाळावें हो॥२॥ तुका ह्मणे बहु तोंड जें बाचाळ॥ लेंग तेंची मूळ लटिक्याचें॥३॥

( ४ )

शिकल्या बोलाचे सांगतील वाद॥ अनुभव भेद नाहीं अंगीं॥ १ ॥

पंडित हे ज्ञानी करितील कथा॥ न मिळती अर्था निज सूखा॥ २॥ तुका-
ह्मणे जैसी लांचा साठीं ग्वाही॥ देती परी नाहीं ठाची वस्तु॥ ३॥

मध्व वल्लभादिकांच्या अनुयायांस तुकारामानें केलेला बोधः—

हरिहरां भेद॥ नाहीं करूं नये वाद॥ १॥ एक एकाचे हृदयीं॥ गोडी-
साकरेच्या ठायीं॥ २॥ भेदकासीनाड॥ एक वेलांटीच आड॥ ३॥ उजवे
वाभांग॥ तुका ह्मणे एकचि अंग॥ ४॥ (६)

शाक्त व ह्यांचे महा शाक्त इत्यादिकांस बोधः—

ऐका कलीचें महिमान॥ असत्याशीं रिझले जन॥ पापा देती अनुमो-
दन॥ करिती हेळण संतांचें॥ ध्रु०॥ गीता लोपली गायत्री॥ चमत्कार
चालिला मंत्रीं॥ अश्वापरी स्वकुमरी॥ विक्रा करिती ब्राह्मण॥ १॥ मद्य-
पानाची शीराणी॥ नवनीता न पुसे कोणी॥ केळवल्या व्यभिचारिणी॥ दै-
न्यवाण्या पतिव्रता॥ २॥ वेद शास्त्रार्थ लोपले॥ धर्म ब्राह्मणीं सांडिले॥ शू-
द्रादिकांची पाउलें॥ पुढें सरलीं धर्मार्थ॥ ३॥ सन्याशांनीं सोडिला धर्म॥ क्ष-
त्रियांनीं टाकिला नेम॥ वैश्य आचरती कर्म॥ पतन पडे ज्याचेनी॥ ४॥ अ-
गा वैकुंठ नायका॥ काय पाहाशी कौतुका॥ कलिनें गांजियेलें लोकां॥
तुका हाका मारीतसे॥ ५॥

चार्वाक इत्यादि नास्तिकांस बोधः— (७)

जीव तोची देव भोजन ते भक्ति॥ मरण ते मुक्ति पारवांड्याची॥ १॥ पिं-
डाच्या पोषणीं नागवले जन॥ लटिके पुराण वेद केले॥ २॥ मना आला
तैसा करिती विचार॥ ह्मणती संसार नाहीं पुन्हा॥ ३॥ आपुल्या मनीं-
चें करीती पारवांड॥ जनामध्यें भांड पोट भरी॥ ४॥ तुका ह्मणे पाठी उ-
डती यमदंड॥ पाप पुण्य लंड न विचारिती॥ ५॥

कर्म, उपासना आणि ज्ञान या त्रिकांडाची व्यवस्थाः—

यज्ञ भूतांच्या पाळणा॥ भेद कार्या आणि कारणा॥ पावावया उपास-
ना॥ ब्रह्मस्थानीं प्रस्थान॥ १॥ एक पंथी पडिलें भागीं॥ फळ बीजाची ये
अंगीं॥ धन्य तोची जगीं॥ आदि अंत सांभाळी॥ ध्रु०॥ अवश्यक तो शे-
वट॥ मागें अवघी खट पट॥ चालों जाणें वाट॥ ऐसा विरळा एखादा
॥ २॥ तुका होवोनि निराळा॥ क्षरा अक्षरा वेगळा॥ पाहे निगम कळा
सद्गुरूच्या प्रसादें॥ ३॥ — याचा अर्थ कठीण आहे ह्मणून लिहितों:—

"अन्नाद्भवंति भूतानि पर्जन्या दन्न संभवः॥ यज्ञाद्भवति पर्जन्यो य-
ज्ञः कर्म समुद्भवः॥ कर्मब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षर समुद्भवम्॥"

या श्लोकांत सांगितल्या प्रमाणें— यज्ञभूतांच्या पाळणा,— येणें करून तुकारामानें कर्माचा विनियोग सांगितला. आता उपासनेचा विनियोग सांगतो:—कार्य कारणाचा ह्मणजे जीवाचा आणि ईश्वराचा जो भासलेला भेद त्या भेदा मुळें उपासना उभी झाली, ह्मणजे ती करणें प्राप्त झाली. ही उपासना ज्ञानकांडावर आरूढ होण्यास ह्मणजे ब्रह्मस्थानीं पावण्यास प्रस्थान होय. मुळीं जें एक ब्रह्म तें जीवेश्वर रूपानें ।वेभागीं पडलें. कसें तर जसें फळ आणि बीज. ह्मणून आदि अंत ह्मणजे ईश्वर आणि जीव किंवा देव आणि भक्त यांस संभाळील. ऐक्य दृष्टीनें संरक्षण करील तोच धन्य. सारांश उपासना ह्मणजे ब्रह्मस्वरूप जें महा नगर तेथें जाण्या साठीं, आपल्या घरांतून अंगप्रस्थानानें निघून, दुसऱ्या कोणेकाच्या घरीं जाऊन राहण्या प्रमाणें प्रस्थान आहे. तुकाराम ह्मणतो. अर्थात् कर्म व उपासना या दोहोंचा शेवट ज्ञान. किंवा देव आणि भक्त यांचा शेवट एक ब्रह्म, तो शेवट साधणें अवश्यक होय. यामागलीं ती सर्व खटपट असें समजून, वाट चालूं जाणणारा क्वचित् एकादा विरळा आहे. वाट चालूं जाणणारा ह्मणजे अंग प्रस्थानानें ज्या स्थळीं जो गेला तो जसा तेथून निघून पुढें जाण्याची वाट धरितो, तेथेंच थांबून राहात नाहीं. तसें उपासकानें पुढें चालूं जाणावें. हाल्लींचे उपासक प्रायः तसें करूं जाणत नाहींत. एकादा जाणतो. ह्मणून एकादा विरळा असें तुकारामानें ह्मटलें आहे. व अभंग पुरा केला आहे. या प्रमाणें याच्या अभंगां विषयीं सांगणें होतें तें आह्मीं सांगितलें. आतां याच्या अभंगां पासून विशेष काय झालें तें सांगतों. प्रथम तर याच्या अभंगांनीं नामदेवाचे अभंग बहुधा मागें पडले. दुसरें, यानें ज्या भगवद्भक्तानें नांव आपल्या अभंगांत लिहिलें तोच खरा भगवद्भक्त किंवा संत इतर नाहींत, ही एक समजूत वारकऱ्यांत विलक्षण वाढली. ती अजून आहे तशीच आहे.

तुकारामाच्या वेळेस साळोजी व मळोजी दोघे शूद्र परस्पर भाऊ होते. ते उभयतांही भगवद्भक्त असत; परंतु त्यांस काय वाटलें असेल तें असो. त्यांनीं पुष्कळ अभंग स्वतः रचून ते तुकारामाच्या नांवानें लोकांत चालू केल्याचें तुकारामाच्याच खेदप्रदर्शक वाक्या वरून दिसून येतें. तें वाक्य असें आहे:-"साळो

मळो हरीचे दास ॥ यानीं अवघा केला नास ॥" व " विकेल तेथें विका ॥ माति गांव ठे उन बुका ॥ इत्यादि॥ ॥" सारांश या भानगडी मुळें वारकऱ्यांत दुफळी झाली आहे. ह्मणजे देहूकर आणि वासकर असे त्यांत हल्लीं दोन पक्ष उभे झाले आहेत. वासकरांनीं साडेचार हजार अभंगांचा एक गाथा निवडून एवढेच अभंग ह्मणावे या शिवाय ह्मणूं नयेत, व ते अनेक प्रकारच्या चाली न लावतां ह्मणावे असें ठरविलें आहे. ही गोष्ट देहूकर व अळंदीकर मानीत नाहींत. ही भानगड उत्पन्न होण्यास पेशवाईच्या अखेरीस घाटावर वासी ह्मणून गांव आहे. तेथील राहणारा मल्लाप्पा बावा नांवाचा एक लिंगाईत वाणी मोठा प्रसिद्ध वारकरी होऊन गेला तो होय, हें जनविश्रुतच आहे. नुकतेच होऊन गेलेले प्रसिद्ध भाऊ काटकर हे वासकर मंडळी पैकीं होते. हे जरी वीर वैष्णव असत तरी अद्वैत निरूपण करण्यांत यांची हातवटी चांगली होती, असें आह्मांस दिसून आलेलें आहे.

तुकारामानें चमत्कार दाखविल्याच्या गोष्टी, लोकांत व भक्तविजय ग्रंथांत पुष्कळ प्रसिद्ध आहेत. याचा छळही पुष्कळच झालेला आहे. तरी त्यानें आपली शांतवृत्ती व भगवद्भक्ति कायम राखिली. त्या मुळें जरी कित्येक ब्राह्मण याच्या भक्तीस लागले तरी यानें कोणास उपदेश ह्मणून केलाच नाहीं; कारण शूद्रानें, ब्राह्मणास उपदेश देणें हा अविधि होय असें हा पूर्ण समजत होता. याच्या मागें अभंग ह्मणूं लागणारे मुख्य चौदा असामी होते, ते रामेश्वर भट्ट, कोंड भट्ट, गंगाधर मवाळ, संताजी तेली इत्यादिक प्रसिद्ध आहेत.

याच्या भेटीस शिवाजी राजाही आला होता. व त्यानें यास पुष्कळ द्रव्यही दिलें होतें; परंतु यानें त्यांतील एका पैशासही स्पर्श केला नाहीं. याची कीर्तन करण्याची शैली फारच चांगली होती ह्मणून शिवाजी राजा याच्या कीर्तनास नेहेमी येई. यास काशी, भागीरथी, आणि गंगा अशा तीन मुली, व महादेव, विठोबा आणि नारायण असे तिघे मुलगे होते. यांत धाकटा नारायण बावा गर्भांत असतांच तुकाराम परलोकवासी झाल्या मुळें मागून जन्मला होता. हा नारायण बावा पुढें चांगला निपजून कीर्तनही उत्कृष्ट करूं लागला. तें त्याचें कीर्तन शिवाजीनें ऐकिल्यावर व त्याची भक्ति पाहिल्यावर त्यास त्यानें चार गांव इनाम करून दिले.

तुकारामाच्या स्वर्गास जाण्याच्या गोष्टी दोन तीन प्रकारच्या लोकांत प्रसिद्ध आहेत; परंतु विश्वसनीय गोष्ट कोणतीच दिसत नाहीं. कोणी ह्मणतात, तो

पंढरपूर येथें चंद्रभागेंत गुप्त झाला. कोणी ह्मणतात त्याचें शरीर इंद्रायणींत विरघळून पाणी होऊन पाण्यास मिळालें. कोणी ह्मणतात तो देहा सुद्धां स्वर्गास गेला. आणि कोणी ह्मणतात तो काशीस गेला व तेथून सदेह स्वर्गास गेला. यांत देहासुद्धां स्वर्गास जाणें हें तर होणेंच नाहीं. या विषयीं आमच्या प्राचीन कोशांतील त्रिशंकु राजाचें वृत्त वाचकांनीं पहावें.

तुकाराम फाल्गुन वद्य द्वितीया शके १५७१ विरोधि संवत्सरा मध्यें परलोकीं गेला, त्या वेळेस त्याच्या वयास ४१ वें वर्ष होतें. याच्या गमन काळीं आकाशांत हजारों विमानें आलीं. अप्सरा व गंधर्व गायन करूं लागले. दुंदुभी वाजूं लागल्या. व अशा समारंभानें तो स्वर्गास गेला ह्मणून सांगतात. याची योग्यता वारकरी लोक ज्ञानदेवा बरोबर किंबहुना अधिकही समजून व यास नामदेवाचा अवतार असें जाणून ज्ञानदेव तुकाराम असें भजन करीत करीत, शेवटीं नुस्तें तुकाराम, तुकाराम, तुकाराम ह्मणून कीर्तन अथवा भजन समाप्त करितात (भक्तवि० अध्या० ४८ व ४९) ह्.

**तुकाविप्र**— हा ब्राह्मण मूळ रहिमतपुरचा कुळकर्णी मोठा भगवद्भक्त होऊन गेला. याचे वंशज हाल्लीं बोरबन येथें राहतात. बोरबन हें सातार प्रांतांत कृष्णेच्या कांठीं आहे. तुकारामाचे अपुरे राहिलेले सवालक्ष अभंग यानें पूर्ण केले असें याचे वंशज सांगतात. तुका नांव घालण्यानें अभंगांचा घोंटाळा होईल तो न व्हावा म्हणून यानें अभंगाच्या शेवटीं घातलेल्या आपल्या तुका नांवा पुढें विप्र हीं अक्षरें जोडिलीं. व तेव्हां पासून तुकाविप्र हें याचें नांव प्रसिद्ध झालें. (वृन्दमा०).

**तुकोजीराव**— अहल्या बाई असतांच तिच्या अनुमतानें होळकर गादीचा झालेला अधिकारी. यानें शके १७०७ पासून १७१९ पावेतों बारा वर्षें पर्यंत अधिकार केला. काशीराव व मल्हारराव हे यास औरस पुत्र होते. शिवाय विठोजी व यशवंतराव हे दोघे दासीपुत्र असत.

२— हरिहरराव होळकराच्या मागून शके १७६४ मध्यें झालेले गादीचे अधिकारी. हे सर्व प्रकारच्या चांगल्या कामांत दक्ष असून हल्लीं विद्यमान आहेत. यांस दोन पुत्र आहेत, व तेही चांगले शाहाणे आहेत असें ऐकतों. (हिंदु० छापी० इतिहास.)

**तुंबरभगवान्दास**— एक साधु. (नाभा० भक्त० ग्रंथ पहा).

**तुरंगनाथ**— जैमिनी मतावलंबी एक पूर्वमीमांसक. यास आचार्यांनीं वारांत जिंकलें होतें. (आनं० शं० प्रकर० ४४) पहा. हा काशींत राहात असे.

**तुळजापुर**— हें एक प्रसिद्ध क्षेत्र मोंगलाईंत आहे. येथें देवीचें मुख्य स्थान आहे. देवी-

ची मूर्ति गंडकीच्या काळ्या पाषाणाची आहे. व तिचें ध्यान फार सुंदर आहे. तुळजापूर हा गांव बारशी पासून सोळा कोस असून, यांतील देवीचे पुजारे भोपे अशा नांवानें प्रसिद्ध रद्द्र आहेत. श्री मच्छंकराचार्य या स्थळीं गेले होते. त्या वेळेस त्रिपुरकुमार इत्यादिक शक्तिउपासकांशीं त्यांचा वाद होऊन त्यांत त्यांनीं येथील शाक्तांस जिंकलें होतें. आनंदगिरीच्या शंकर विजयांत तुळजापुरास भवानीपूर म्हटलें आहे. आह्मीं तुळजापुरास गेलों होतों, व येथील स्थिति सर्व डोळ्यांनीं पाहिली. परंतु खरोखरी हें स्थान पाहून आह्मांस आनंद झाला नाहीं. येथील आचार विचार फार घाणेरेपणाचे आहेत. प्रत्येक ब्राह्मणाच्या घरांत एक स्मार्त, एक तप्तमुद्रा घेतलेला वैष्णव, व एक शाक्त असतो. तो या तीन प्रकारच्या यात्रे पैकीं, आप आपल्या यजमानाचें उपाध्येपण करतो. येथील देवीची मूर्ति मात्र मनोवेधक आहे, ह्मणून कांहींसें गाभाऱ्यांत बरें वाटतें. ही देवी पौषाच्या आरंभा पासून माघशु०१५ पर्यंत सतत दीड महिना पलंगावर निजल्ये, त्या मुळें ती सिंहासनावर नसल्या कारणानें पूजा व यात्रा बंद असते.

**तुळजाबाई**— होळकर घराण्यांतील यशवंत रावाच्या मागून जी त्याची दासी राज्यकारभार करणारी झाली ती शके १७२९ मध्यें हिचा खून झाला; म्हणजे परगणलोकांनीं भरपूर क्षिप्रा नदींत ढकलून देऊन हिला ठार मारिलें.

**तुळशी**— हा जातीचा सारस्वत ब्राह्मण, गुजराथेंतील कुंतल पूरचा राहणारा संवत् सोळाशें चवदा मध्यें होता. यानें गुजराथी भाषेंत ध्रुवाख्यान कविता बद्ध लिहिलें आहे. (काव्य०गु०).

**तुळशीकृत रामायण**— हें कवितावद्ध रामायण हिंदुस्थानी भाषेंत तुळशीदासानें रचिलेलें फारच उत्कृष्ट आहे. यांत उपमा, उत्प्रेक्षा, व अलंकार चांगलेच साधले आहेत. हा ग्रंथ शके १६०९ मध्यें झाला.

**तुळशीदास**— उत्तर हिंदुस्थानांत चित्रकूटा जवळ हाजीपुर नांवाचा गांव आहे, तेथें याचें जन्म झालें. गौडब्राह्मणांत सरवरिया ह्मणून एक शाखा आहे, त्यां जातीचा हा ब्राह्मण होता. याच्या बापाचें नांव आत्माराम पांड्ये असे. रामायणावरील तुळशीदासाची कविता उत्कृष्ट उतरल्या मुळें त्यास लोक वाल्मीकीचा अवतार मानितात. याच्या बापानें याचा व्रतबंध केल्यावर, या कडून बारा वर्षें पर्यंत ब्रह्मचर्य व्रत करवून वेदाध्ययन करविलें. पुढें याचें अध्ययन समाप्त झालें. व यास एका ब्राह्मणानें आपली कन्या लग्न करून दिली. याच्या बायको-

चें नांव देविममता होतें, व ती फार साध्वी स्त्री होती. याची व याच्या बायकोची पराकाष्ठेची प्रीति असे. पुढें तीच प्रीति यास वैराग्य उत्पन्न होण्यास कारण झाली, आणि त्या योगानें हा निःसीम रामभक्त निपजला.

तुळशीदास अतिशय स्त्रीलंपट असे. त्यानें बायकोस क्षणभर न पाहिल्यास त्याला अगदीं चैन पडत नसे. एकदां असें झालें कीं, कांहीं कामानिमित्त आठ पंधरा दिवस परगांवीं जाण्याचा प्रसंग आला. म्हणून हा तिकडे गेला. या गोष्टीस पांच सहा दिवस लोटतात तों, देविममतेचा बाप तिच्या घरीं येऊन,व जांवई घरांत नाहीं अशी संधि पाहून त्याच्या आईस म्हणाला, कृपा करून आठ दिवस मुलीस माहेरीं पाठवाल तर तिच्या सर्वांस भेटी होतील. आठ दिवस होतांच तिला आणून पोंचती करीन. या गोष्टीस आत्माराम पंत पाध्ये यानें अनुमोदन दिल्या वरून तो मुलीस घेऊन आपल्या गांवीं गेला. हा गांव हांजीपुरापासून सुमारें कच्चा दोन कोसांवर होता.

इकडे देविममता माहेरीं गेल्यावर, हा चार पांच दिवसांनीं घरीं आला, व येतांच बायको माहेरीं गेल्याचें यास कळलें. पुढें रात्रींचें जेवण झालें, व सर्व माणसांची निजानीज झाली. तसाच हाही आपल्या खोलींत जाऊन निजला. परंतु यास कांहीं केल्या झोंप येईना. तेव्हां आपल्याच मनाशीं कांहीं बोलून हळूच कोणास कळूं न देतां जो खोलींतून घराबाहेर निघाला तो त्यानें नडक सासुरवाडीचा रस्ता धरला. सुमारें मध्यरात्र उलटून गेल्यावर, हा त्या गांवीं पोहोंचला. पुढें कांहीं खुणा याच्या ध्यानांत होत्या, त्यांवरून यानें सासऱ्याचें घर शोधून काढिलें.परंतु दारें बंद असल्या कारणानें घरांत कसें जावें, त्या विषयींची यास मोठी पंचाईत येऊन पडली. इतक्यांत घरा भोंवतें फिरतां फिरतां, माडी वरून खालीं भुईपर्यंत एक मोठा सर्प लोंबतां याच्या दृष्टीस पडला. परंतु अंधारा मुळें तो सर्प आहे असें यास काममदानें न उमजून हा मोठा दोरच आहे असें यास वाटलें. म्हणून हा त्यास धरून माडीवर चढून गेला. व तेथें खिडकीच्या फळ्या वाजवूं लागला. त्या योगानें तेथें निजलेली याची बायको जागी झाली. व खिडकी उघडून पाहत्ये तों यास तिनें ओळखलें. तेव्हां तत्काळ तिनें दिवा लाऊन यास आंत घेतलें. व पलंगावर बसवून पुसूं लागली कीं, येण्यास इतका उशीर कां लागला. यानें झालेलें वर्तमान तिला सांगितल्यावर तीस आश्चर्य वाटून, पुनः तिनें पुसलें, वर कसे आलां ? दोरास धरून आलों असें हा बोलल्यावर तिला पहिल्यापेक्षांही

अधिक विस्मय होऊन हातांत दिवा घेऊन खिडकी पाशीं आली, व पाहते तों मोठा काळा साप लोंबत आहे. त्यास पाहतांच तिच्या पोटांत धस्स झालें. नंतर लागलीच झटकर खिडकी लाऊन आंत येऊन, पहिल्यानें यास भिरची खावयास दिली, व थोडी साकरही दिली. त्यांची रुचि यानें तिखट व गोड सांगितल्यावर तिचा जीव खालीं पडला. मग ती यास ह्मणाली. प्राणसख्या, आज मोठें अरिष्ट टळलें. आपण दोर ह्मणून ज्यास धरून वरती चढून आला तो तर भयंकर सर्प आहे. थोडक्यांत चुकलें नाहीं तर भलतेंच झालें असतें. अहो, एवढें साहस कधींही करीत जाऊं नये. इतकें चित्त मजकडे जें ठेवितां, तेंच जर ईश्वराकडे ठेवाल तरकांहीं सार्थक तरी होईल. त्या वरून यास वैराग्य होऊन यानें सर्व व्यवहार सोडिला. व अयाचित वृत्तीनें निर्वाह करीत जो रामभजनांत रंगला, तो कांहीं काळानें मोठाच नामांकित साधु बनून लोकांत प्रख्यातीस आला.

अयाचित वृत्तीनें रामाची भक्ति करीत असतां एक चमत्कार असा झालेला सांगतात कीं, हा ज्या ठिकाणीं नित्यशः बहिर्दिशेस जात असे तेथें नें कृत्य उरकल्यावर जें बाकी पाणी भांड्यांत राही तें हा एका दगडावर ओतून परत येई. हा याचा नेम सतत बारा वर्षें चालल्यानें तेथें असलेला एक पिशाच्च तें पाणी पिऊन तृप्त होत गेलेला, पुरें बारावें वर्ष सरतांच यास प्रत्यक्ष झाला, व यास पाण्याची हकीकत सांगून ह्मणाला, मी तुजवर प्रसन्न झालों आहें. तर तुला काय इच्छा असेल तें माग. हें ऐकून तुळशीदास ह्मणाला मला रामाचें दर्शन करीव. पिशाच्च ह्मणाला, मजकडून ही गोष्ट होणें दुर्घट आहे; परंतु मी तुला मारुतीची भेट करून देतों, ह्मणजे तो तुझें हें काम करील. पुढें यास मारुतीची भेट होऊन, त्याच्या द्वारें रामदर्शनही झालें.

शके १५८५त याची व दिल्लीचा बादशाहा शहाजहान त्याची भेट झाल्यानें कविचरित्रांत लिहिलें आहे; परंतु याचें जन्म शके १५७८ मध्यें झालें असल्या मुळें त्या वेळेस हा सात वर्षांचा होता, व शहाजहान राज्यावर मुळींच नव्हता, ह्मणून ही गोष्ट मुळींच संभवत नाहीं. मथुरा वृंदावनांत नाभाजीची मात्र यास भेट सत्राव्या शालिवाहन शतकाच्या आरंभास झाली होती. याच्या पंक्तीस नित्यशः हजारों ब्राह्मण जेवीत. त्या योगानें याचा मोठा लौकीक वाढला. याच्या मठांत चोरी करण्यास आलेल्या चोरांस हातांत धनुष्य बाण घेऊन रामानें स्वतः पाहांट पर्यंत अडवून धरिल्या मुळें ते पश्चात्ताप पावून याचे शिष्य झाले. एका

सावकारास मुलाची आस्था असून त्यास झालेल्या मुलीचा यानें मुलगा केला. इत्यादि चमत्काराच्या गोष्टी याच्या पुष्कळ आहेत. त्या ज्यांस पाहणें असतील त्यांनीं भक्तविजय ग्रंथाच्या तिसऱ्या अध्यायांत पहाव्या.

तुळशीदासाचा गुरु जगन्नाथदास असे. तुळशीदास त्याच्या बरोबर अनेक तीर्थें व क्षेत्रें हिंडून परत काशीस आल्यावर त्यानें शके १६०९ मध्यें रामायण केलें. तेंच तुळशीकृत रामायण या नांवानें प्रसिद्ध आहे. हें रामायण यानें रचिलें त्या वेळेस याचें वय ३१ वर्षांचें होतें व त्या वरून याचें जन्म शके १५७८ मध्यें झालें होतें असें उघड दिसून येतें. रामगुणावली, गीतावली, व विनयपत्रिका हेही ग्रंथ याचेच आहेत. या शिवाय पदें, दोहरे, चोपायी, इत्यादिकही याची कविता पुष्कळ प्रसिद्ध आहे.

हा काशींत असतां यानें तेथें एक सीताराम मंदिर व त्याजवळ एक मठ बांधिला, तो तेथें अद्यापि आहे. हा शके १६२४ मध्यें औरंगजेबाच्या कारकीर्दींत समाधिस्थ झाला. कविचरित्रांत जहानगीर बादशाहाच्या वेळेस याचा परलोकीं वास झाल्याचें लिहिलेलें चुकून लिहिलें गेलें आहे. (भक्तवि० अ० ३).

**तेगीबाहादर**— तेघ बाहादर.

**तेघबाहादर**— नानकाच्या गादीवरील पुरुष जो हरगोविंद त्याचा शिष्य. यास अलमगीर बादशाहानें दिल्ली येथें ठार मारिलें. या वरून हा शके १६९० मध्यें स्वास होता.

**तेजकंठ**— कोंकण देशाचा राजा अपरादित्य. त्याजकडून हा काश्मीर येथें असलेला त्याचा वकील. काश्मीरचा राजा जयसिंह असल्या पासून सुशल राजा पर्यंत हा तेथें होता. आणि त्या वरून हा शालिवाहनाच्या अकराव्या शतकाचें उत्तरार्ध लागल्यावर तेथें स्वास असल्याचा संशय करणें नको. हा वकील उत्कृष्ट विद्वान् असल्या मुळें मंख कविकृत श्रीकंठचरित्र हें कसें उतरलें आहे, त्याची परीक्षा करण्यास ग्रंथकर्त्याचा भाऊ जो अलंकार त्यानें जमा केलेल्या तीस पंडितांत हा एक परीक्षक होता. (बुल्ह० का० शोध०)

**तेनालरामलिंग**— हा कवि शालिवाहनाच्या पंधराव्या शतकांत तेनाली खेड्या मध्यें ईश्वर प्रगट बारू नामक ब्राह्मणकुळांत जन्मला होता. कृष्णा रायलू राजाच्या दरबारांत जे प्रख्यात आठ कवि होते त्यांत हा होता ह्मणून म्हणतात. यानें भट्टपालक्या नांवाच्या राजा जवळील कवीं पैकीं एका जवळ राहून संस्कृत भाषा व तेलंगी भाषेचें व्याकरण यांचा अभ्यास केला होता. यास कविता करायास येऊं लागल्यावर हा कृष्णदेव रायलूच्या भेटीस गेला; परंतु हा पराकाष्ठेचा थट्टे-

बाज, नकल्या, आणि खोडकर सर्वांस माहीत असल्या मुळें राजा पर्यंत याची दाद कोणी लावीना. त्या मुळें निरुपाय होऊन शेवटीं यानें भूमंडली नांवाची एक राणीची दासी होती, तिचें आर्जव करून व राणीवर केलेलें कवित्व तिजजवळ देऊन राणीकडून राजा पर्यंत आपली दाद लावविली. त्या वरून राजानें यास बोलावून घेऊन कविमंडळांत आश्रय दिला.

कवींत याची गणना होऊन यास राजाश्रय मिळाल्यावर यानें पांडुरंग माहात्म्य नांवाचें एक रसाळ काव्य रचिलें. परंतु दुसऱ्याची थट्टा करणें हा जो याच्या मध्यें दुर्गुण होता त्यांत याचें कांहीं बदललें नाहीं. त्या विषयीं एक गोष्ट अशी आहे कीं, ताताचार्य म्हणून एक राजाचा कुलगुरु अतिशय ज्ञातारा व भाविक ब्राह्मण होता. त्याचा नित्य प्रातःकालीं नेम असा असे कीं, बिछान्या वरून उठतांच डोळे झांकून प्रथम गायीच्या गोठ्यांत जावें आणि हातानें आधीं गोमय चांचपून नंतर डोळे उघडावे. त्याचें दर्शन झाल्यावर मग इतर पदार्थ पहावे. ही गोष्ट यास कळून एके दिवशीं पहाटेस उठून हा ताताचार्याच्या गायीच्या गोठ्यांत गेला. आणि गायीखालचें शेण एका बाजूस दूर करून त्या जागीं भला एक थोरला मनुष्याचा ताजा पोह आणून ठेवून तेथेंच एका कोंपऱ्यांत ताताचार्याची वाट पाहात दडून उभा राहिला. पुढें तो भाविक ब्राह्मण रोजच्या नेमा प्रमाणें गोठ्यांत डोळे मिटून आला. आणि चांचपूं लागला तों रपकन् त्याचे हात भरले. ते भरतांच हा तेथून मोठ्यानें खिदळून हंसतच बाहेर पडला. तेणें करून ताताचार्यास मरणप्राय दुःख झालें.

ही गोष्ट राजास कळतांच त्यास याचा पराकाष्ठेचा राग आला. व त्यानें लागलीच याचा शिरच्छेद करण्याची प्रधानास आज्ञा केली. प्रधानानेंही उशीर न लावतां यास धरून आणून मांगांच्या स्वाधीन केलें. तेव्हां मांग यास घेऊन अरण्यांत चालले असतां, यानें त्यांस बहुतां प्रकारें विनवून त्यांनीं आपणांस न मारावें असें केलें; परंतु त्यांनीं यास सांगितलें. आम्हीं तुला अगदीं न मारतां मोकळा सोडल्यास आम्हांस शिक्षा होईल. यास्तव आम्हीं तुला येथें पुरून जातों. त्यावर हा म्हणाला बरें तर मला पुरा परंतु कृपा करून माझें तोंड मोकळें ठेवा. तेव्हां त्यांनीं गळ्या इतकी खोल खांच खणून तींत यास पुरलें व दयेनें याचें तोंड मोकळें ठेऊन ते शहराकडे निघून गेले.

मांग याला खांचेंत पुरून गेल्यावर इकडे असें घडून आलें कीं, एक परीट

त्या वाटेनें चालला होता त्यानें यास पाहिलें. तो कुबडा होता व तो यास अशा-स्थितींत पाहून पुसूं लागला बाबारे, तूं कोण आहेस? व अशी तुझी अवस्था कां झाली? यानें उत्तर केलें. पूर्वी मी तुजसारिखाच कुबडा होतों; परंतु यांत पुरून घेतल्यानें आतां मी पहिल्या सारखा सरळ झालों आहें असें मला वाट-तें. यास्तव जर मला बाहेर काढशील तर माझें झालेलें स्थित्यंतर खरें कीं खो-टें तें मला पहायास सांपडेल. या गोष्टीचें परदास अत्यंत आश्चर्य वाटून व आ-पली स्थिति मनांत आणून त्यानें यास बाहेर काढिलें तों हा अगदीं सरळ झा-ला आहे असें त्यास दिसलें. मग तो यास ह्मणाला गड्या, मला जर यांत पुर-शील तर बरें होईल. त्या वरून यानें त्यास तेथें पुरलें. व विलंब न लावतां तेथू-न तो निघून गेला.

पुढें असें झालें कीं, अन्नावे मारेड्डी नांवाच्या एका राजा जवळ चांगल्या जातीचे दोन कंधारी घोडे आहेत असें कृष्णदेवानें ऐकून, त्यांतील एक आपणां-स मिळावा ह्मणून आपला वकील त्याकडे पाठविला. त्याचें त्यानें असें उत्तर पाठ-विलें कीं, माझ्या सभेंतील पंडितांची समस्या तुमच्या पंडितानें पूर्ण केल्यास घो-डा मिळेल. हा निरोप घेऊन वकील कृष्णदेवाकडे परत येत आहे तों ही बातमी तेनाल रामलिंगास कळून, तो परभारेंच त्या राजाकडे गेला. व त्याच्या पंडितां-ची समस्या पूर्ण करून नवीच त्यांवर आपली एक ठेऊन, घोडा व त्या राजा-चें बहुमानाचें पत्र घेऊन कृष्णदेवास येऊन भेटला. त्या वरून राजा फार सं-तुष्ट होऊन त्यानें याचा अपराध क्षमा केला. व हा जिवंत राहिल्याची विशेष चौ-कशी न करितां पुनः यास त्यानें सभेंत ठेविलें.

इतकें झालें तरी याचा थट्टा करण्याचा स्वभाव उणा झाला नाहीं. यानें पुनः एकवार, तुह्मांस छानदार एक बायको आणून देतों असें राजास सांगून-त्याच्या बिछान्यावर भली एक लांब धोंड आणून ठेऊन चकविलें. परंतु राजानें हा याचा स्वभावच होय असें समजून याच्या अपराधाची क्षमा केली.

कृष्णदेव राजाची कन्या मोहनांगी होती. तिनें मरीचिपरिणय नावाचें स्व-तः रचलेलें नाटक राजापुढें वाचावें असें मनांत आणून त्यास विनंति केली-कीं, आज्ञा होईल तर वाचीन. परंतु तेनाल रामलिंग शिवाय करून बाकीचे मा-त्र सर्व पंडित त्या वेळेस आपणा जवळ सभेंत असावेत. त्या वरून राजानें बरें आहे असें म्हणून नाटक वाचण्याचा समारंभ करविला. त्यांत यास बोलाविलें

नाहीं. ही गोष्ट यास कळतांच आतां काय करावें म्हणून हा विचार करूं लागला. शेवटीं यास युक्ति सुचून ऐन नाटक वाचण्याचा रंग भरला आहे इतक्यांत कुळंबिणीच्या वेषानें हा राणीच्या दासींत शिरून सभेंत गेला. व राजकन्या नाटक वाचीत असतां त्या मधील पात्रांचे अभिनय यानें तेथें सभासदांच्या मात्र दृष्टीस पडावेत अशा बेतानें इतके हास्यरसोत्पादक केले कीं, त्यांस हंसूं आवरेनासें होऊन एकदम सर्व खदखदां हंसले. तें पाहून मोहनांगी अतिशय रागावून अंतःपुरांत गेली. राजास हीही गोष्ट पुढें कळली. म्हणून हा आतां मात्र खचित शिक्षा होईल असें समजून तेथून जो पळाला तो पुनः इकडे न येतां कलिंग देशाच्या राजाच्या आश्रयास जाऊन राहिला. (कवि॰चरि॰).

**तेनाली**– तैलंगण देशांतील एक गांव.

**तेरढोंक**– सांवतामाळ्याची जन्मभूमि. हा गांव पंढरपुराजवळ घांटावर आहे.

**तेरूवेल्लुवर**– प्रख्यात जी अव्हेयर तिचा भाऊ. हा कवि होता. मैलापुर येथील वेलूवर नामक पुरुषानें यास वाढविलें. तेथें हा चांगला विद्वान् झाला. पुढें वयांत आल्यावर मधुरा शहरास गेला. व तेथील वेदशेखर राजाच्या दरबारांतील एकूणपन्नास पंडितांस जिंकलें. फार तर काय, सेतेकर म्हणून जो त्यांत एक प्रमुख पंडित होता. तोही याच्या पुढें पराभूत झाला. हा नीच जातीचा असतांही यास तामिळ विद्यालयांत येऊं देत इतकेंच नव्हे. तर तेथें याचा मोठा सत्कार ही करीत. व्यालुवर कोरल म्हणून जो ग्रंथ यानें तामिळ भाषेंत केला आहे, त्यांत यानें मानवी प्राण्याच्या आयुष्यांतील निरनिराळ्या स्थितीचें उपदेश रूपानें श्लोकबद्ध असें क्रमवार वर्णन केलें आहे. या ग्रंथाची प्रसिद्धि सर्व दक्षिण हिंदुस्थानभर आहे. व तामिळ भाषेंत जे ग्रंथ आहेत त्या सर्वांत याची रचना सर्वोत्कृष्ट मानलेली आहे. एलिस साहेबांनीं याचें इंग्रजींत भाषांतर केलें आहे. वेलूवर यानें यास वाढवून विद्या शिकविल्या मुळें याच्या नांवा पुढें त्याचें नांव जोडलें असावें असें दिसतें. असें सांगतात कीं, नीतिविषयपर याची कविता पुष्कळ असून यानें आपल्या इतर भावंडां प्रमाणेंच लग्न केलें नव्हतें. (कवि॰च॰)

**तेरूवेलुरू**– मद्रासे कडील एक गांव. [शा॰प॰

**तेलंगी भाषा**– द्रविड भाषे पासून उत्पन्न झालेल्या पांच भाषांतील एक (द्र॰भा॰)

**तेवरम**– हा ग्रंथ केरळी भाषेंत आहे. व तो गणासबंधर नामक कवीनें केलेला आहे. यांत जैन लोकांशीं जे त्याचे वाद झाले त्यांचें त्यानें सविस्तर वर्णन केलें आहे.

तेहरानशहर– पारसीक ह्मणजे इराण देश त्याचें मुख्य शहर. याचे उत्तर अक्षांश सुमारें ३५ व पूर्वरेखांश ५० आहेत.

तैत्तिरीयभाष्य– सुरेश्वराचार्य ह्मणजे मंडनमिश्र तत्कृत तैत्तिरीय उपनिषदावरील भाष्य.

तैमुरलंग– दिल्ली येथें यानें शके १३२० मध्यें स्वारी करून स्वदेशीं गेला. नंतर याच्या मागून इब्राहीम लोदी हा बादशाहा जाहला.

तैलंगणदेश– चोल देशाच्या उत्तरेकडील देश. प्राचीन नकाशा वरून आंध्र देश याहून निराळा असल्याचें दिसून येतें. परंतु हाल्लीं याच नांवा खालीं आंध्रदेश मोडतो. प्राचीन नकाशांत याचें खरें नांव त्रिलिंग देश असें आढळतें; परंतु हें नांव पडण्यास कारण काय झालें तें कळत नाहीं. त्रिलिंगाचा अपभ्रंश तैलंग एवढें मात्र सयुक्तिक दिसून येतें. (ग्यारे०). [आहे.

तैलंगणदेशवर्णन– हा ग्रंथ संस्कृत भाषेंत आहे, व तो इलेश्वरोपाध्यायांनी केला

तोटकाचार्य– शंकराचार्यांचा शिष्य. (माध० शंक० वि०).

तोडरानंद– व्यवहार सौख्य नामक संस्कृत ग्रंथाचा कर्ता. (बुल्हर० का० शोध०)

•तोरणा– दक्षिण देशांतील एक किल्ला. २– गुजराथेंतील एक गांव.

तौत– काश्मीराकडील जो अभिनव गुप्त त्याचा अलंकार शास्त्र संबंधाचा गुरु. काव्य कौतुक, व धर्मोत्तमा विनिश्चय टीका, हे दोन ग्रंथ याचे आहेत. (बु० का० शो०)

तौतुक– इंदुराज कवीचा आजा. (बु० का० शो०)

तौल्वदेश– हा मलयवर म्हणजे मलबार किनाऱ्यास आहे. येथें द्रविड भाषे पासून उत्पन्न झालेली तौल्व (तुळवी) भाषा बोलतात. [णतात.

त्रिकांडलेश– विश्वनाथ कविकृत संस्कृत ग्रंथ. हा वेदांत विषयावर आहे असे ह्म-

त्रिकांडशेष– पुरुषोत्तम राजकृत संस्कृत छंदोबद्ध कोश.

त्रिगद्य– रामानुजाचार्य कृत संस्कृत ग्रंथ. यांत विष्णुगद्य, श्रीरंग गद्य व शरणगद्य अशीं तीन प्रकरणें आहेत.

त्रिचनापल्ली– कावेरीच्या कांठीं तिच्या दक्षिण तीरास हें शहर आहे. यास मध्यरंग असें लोक बोलतात. तंजावर याच्या किंचित् आग्नेयीस जवळच आहे. व कुंभकोण पूर्वेस परंतु दूर आहे. [ख्याख्या.

त्रिपथगा– राघवेंद्राचार्य गजेंद्र गडकर यांनीं परिभाषेंदु शेखरावर लिहिलेली

त्रिपुर– पूर्व किशान देशांतील शहर. याचे उत्तर अक्षांश सुमारें २४ व पू० रे० ९१ आहेत.

त्रिपुरकुमार– भवानीपुर म्हणजे तुळजापुर येथील शक्त्युपासक. श्रीमच्छंकरा-

चार्यांनीं याचें मन खंडित केलें असतां हा त्यांचा शिष्य झाला होता. (आ० शं० म-कर० १९) पहा. पुढें दिग्विजय समाप्त झाल्यावर आचार्यांनीं यास सन्यास देऊन या कडून वेदांसीं अविरुद्ध असें शक्तिमत स्थापविलें. (आ० शं० वि० प्र० ७०) पहा.

**त्रिपुरदहन**— रविसूनुकृत काव्य.

**त्रिंबकराव दाभाडे**— थोरल्या बाजीरावाची व याची लढाई झाली. तींत हा मेला. हा सेनापती दाभाड्याचा मुलगा होता. (हिं० छा० इं०).

**त्रिंकराव मामा पेठे**— हा थोरल्या चिमणाजी आपाच्या सासुरवाडीकडील पुरुषम्-सून शाहाणा होता. आणि त्याच कारणा मुळें थोरले माधवराव याला सन्मानार्थ मामा म्हणत. रघुनाथ रावास दिवाणगिरींतून काढिल्यावर तें काम हा पहात असे. (हिंदु० छा० रनि०).

**त्रिलिंगदेश**— हल्लीं यास तैलंगण म्हणतात. प्राचीन नकाशांत याच्या ईशान्येस कलिं-ग देश लिहून त्याच्या वायव्येस आंध्र देश लिहिला आहे.

**त्रिलोचन बावा**— एक साधु पुरुष. (भक्तवि०).

**त्रिविक्रम**— नलचंपु व मदालसा चंपूचा कर्त्ता. (बु० का० शो०).

**त्रिविष्टप**— तिबेट देशाचें जुनें नांव. असें आर्यविद्या सुधाकर कर्ते म्हणतात.

**त्रिंशत्ध्यान**— रामानुजाचार्य कृत संस्कृत ग्रंथ.

**त्रिशला**— महावीर म्हणजे वर्द्धमान स्वामि जो जैनांचा चोविसावा तीर्थंकर त्याची आ-ई. ही सिद्धार्थ नामक राजाची स्त्री. (प्रव० शारो०).

**त्रिषष्टिशिलाका पुरुषचरित्र**— हेमचंद्रकृत संस्कृत ग्रंथ.

**त्रैलोक्य**— हा एक विद्वान् ब्राह्मण मीमांसक होता. मंख कवीनें केलेला जो श्रीकंठच-रित्र नांवाचा ग्रंथ, त्याच्या परीक्षेस जे काश्मीर येथें तीस पंडित जमले होते त्यांत हा होता. (बु० का० शो०).

**त्रैलोक्यचंद्र**— गौड बंगाल्यांतील कांचनपुरचा राजा. गोपीचंद्र राजाचा बाप व वि-क्रमादित्याची बहीण मैनावती तिचा हा नवरा होता. (नाथलीला०).

**त्रोटकाचार्य**— श्रीमच्छंकराचार्यांच्या शिष्यांतील एक सन्यासी. याचें नांव आनंद-गिरीच्या शंकर विजयांत आहे. व त्यांत यास तोटकाचार्य म्हटलें आहे.

**त्र्यंबकभट्ट**— त्र्यंबकी व्याख्येचा कर्त्ता. ही व्याख्या व्याकरण विषयावर आहे.

**त्र्यंबकराज**— हा एक ब्राह्मण नामांकित वैद्य होऊन गेला. हा विद्वान् व पद्महस्त असल्या मुळें यास लोक धन्वंतरी असें म्हणत. याच्या हातून शेंकडों लोकांचे

असाध्य रोग बरे झाले. यानें अनेक प्रकारचे नवे नवे औषधी कल्प अनुभवून योजून त्यांवर त्र्यंबकी नांवाचा एक ग्रंथ रचिला. व तो आपल्या स्त्रीस पढविला. त्याचें कारण हेंच कीं, यास पुत्रसंतति नव्हती. त्र्यंबकी ग्रंथ जसा यानें स्त्रीस पढविला त्याच प्रमाणें रसायनें व मात्रा सिद्ध करण्याच्या कृतीही शिकविल्या. असें सांगतात कीं, त्र्यंबकराज मरण पावल्यावर त्याच्या स्त्रीनें वैद्यक्रिया बहुत दिवस पर्यंत उत्कृष्ट रीतीनें केली. व पैसाही कोणाचा घेतला नाहीं. एकदां तिच्या दैवयोगानें असें झालें म्हणून म्हणतात कीं, तिनें कांहीं रसायन सिद्ध करण्याकरितां दोन मण तांब्याचा रस करविला असतां, त्यांत अकस्मात् कांहीं वनस्पतीचा योग घडून येऊन त्याचें सर्व सोनें झालें. त्र्यंबकराज हा कोलापुरास राहात असे. व त्यास होऊन गेल्यास अडीचशें वर्षें झालीं असें म्हणतात. ही जर गोष्ट खरी असेल तर हा शालिवाहन शके १५५०त होता, असें म्हणण्यास शंका करणें नको.

**त्र्यंबक शास्त्री**– हा विद्वान् ब्राह्मण रायदुर्ग येथील राहणारा शांकरमतानुयायी स्मार्त असे. न्यायशास्त्र हा याचा मुख्य बाणा होता. यानें प्रतिज्ञे निशीं एका वैष्णव महा पंडितास पेशवाई मध्यें वादांत जिंकून त्या कडून भस्म लाविलें होतें म्हणून सांगतात. भाष्यभानुप्रभा हा ग्रंथ याचा अद्वैत मतावर आहे. हा शके १७४४ मध्यें वारल्याचें खास ऐकिवांत येतें. (दु० मा०)

**त्र्यंबकी**– त्र्यंबकराज वैद्यकृत ग्रंथ.

**त्र्यंबकेश्वर**– नासिका पासून सुमारें १० कोसांवर असणारें महादेवाचें स्थान. याची गणना बारा ज्योतिर्लिंगांत आहे. गोदावरी नदीचा उगम येथल्याच पर्वतापासून आहे. येथील देवालय नानासाहेब पेशव्यांच्या कारकीर्दींत बांधण्यास आरंभ होऊन थोरल्या माधवराव साहेबांच्या वेळेस तयार झालें. पुढें अर्चा करावी तों वाजसनी ब्राह्मणांनीं दक्षिणद्वार आमचें असा तंटा घातला. त्याचें निराकरण त्यांनीं रामशास्त्री यांस पुसलें. तेव्हां शास्त्री बाबानीं सांगितलें कीं, वाजसनी शाखा व तैत्तिरीय शाखा यजुर्वेदांतर्गत खऱ्या. परंतु तैत्तिरीय शाखा मुख्य यजुर्वेद होय. अशा विषयीं श्रुतिप्रमाण आहे; आणि यात कारणास्तव दक्षिणद्वार तैत्तिरी यांचें आहे. त्या निर्णयास अनुकूल अशा अनेक मोठ मोठ्या ठिकाणच्या विद्वानांच्या संमति आल्या. व त्या प्रमाणें अर्चा व्हावी तों कांहीं राजकारण उपस्थित होऊन ती झाली नाहीं. पुढें तीच अर्चा सदरील ठरलेल्या नियमा प्रमाणें धाकट्या बाजीरावानें सिद्धीस नेली.

**थानेसरी जगन्नाथ**– एक साधु. (नाभा० भक्त० ग्रंथ०) पहा.

**थोरले बाजीराव**– बाजीराव बल्लाळ शब्द पहा.

**थोरले माधवराव**– माधवराव बल्लाळ शब्द पहा.

## द.

[णनात.

**दंडक देश**– गोदावरीचा सर्व दक्षिण प्रदेश. कोणी हा प्रदेश नर्मदे पासून असल्याचें स्म-

**दंडपाणि**– युधिष्ठिर वंशीय कलियुगांतील राजा. वहीनराचा पुत्र. व निमिराजाचा बाप. यानें ४८ वर्षे ७ महिने व ४ दिवस इतका काळ राज्य केलें. याच्या कारकीर्द समाप्ती पर्यंत एकंदर कलियुगाचीं वर्षे १७४५९१०६२ इतकीं झालीं होतीं. व याच वेळेस अशोक राजा गादीवर बसला होता. (हिंदु० ह० इ०).

२– दुसऱ्या बुद्धाचा सासरा व गोपेचा बाप.

**दंडीकवि**– हा ज्ञातीचा कोण होता, याचीं आई बापें कोण, व त्यांचीं नांवें काय होतीं, आणि हा राहात असे कोठें या विषयीं कांहीं बरोबर ठिकाण लागत नाहीं. परंतु पुढील वृत्तांता वरून हा ज्ञातीचा ब्राह्मण व अवंती किंवा तिच्या आसपासचा राहणारा असावा असें वाटतें. कारण माधवकृत शंकर विजयांत याचें नांव बाणभट्ट व मयूर कवि यांच्या बरोबरीनें अवंतीच्या नामोल्लेख पूर्वक लिहिलेलें आढळतें. त्या विषयींचें वृत्त येणें प्रमाणें आहे. विद्या शंकर भारती नांवाचे शंकराचार्य दिग्विजय करीत असतां अवंती नगरीस आले. नंतर तेथें त्यांनीं भास्कर नामक एका दुर्मताभिमानी महा पंडितास वादांत जिंकलें. ती गोष्ट यास कळल्यावर हाही त्यांकडे वादार्थ आला. व त्यांत पराभव पावला. त्या प्रकरणीं पंधराव्या सर्गांतील १४०।१४१ श्लोकांत या प्रमाणें लिहिलें आहे:–

> इति भास्करदुर्मते (भिन्नेते भगवत्पाद कथा सुधा प्रसस्ने॥ घनवार्षिक वारिवाह जाले विगते शारद चंद्र चंद्रिकेव॥ १४०॥ स कथाभि रवंतिषु प्रसिद्धान् विबुधान् बाण मयूर दंडि मुख्यान्॥ शिथिलीकृत दुर्मताभिमाना न्निज भाष्य श्रवणोत्सु कांच कार॥१४१॥

अर्थ– भास्कर पंडितास जिंकलें असतां श्रीमच्छंकराचार्यांची कथारूप सुधा विस्तारावत पावती झाली. जसे वर्षाकालींचे घनमेघ नाहींसे झाल्यानें शरत्कालींच्या चंद्राचें चांदणें प्रकट होतें, त्या प्रमाणें त्या कथांनीं अवंती देशांत प्रसिद्ध प्रसिद्ध जे जे बाण, मयूर, दंडी प्रमुख दुर्मताभिमानी पंडित ते हतदर्प झाले. व त्या योगानें शंकराचार्य हे त्यांच्या ठायीं भाष्य श्रवणाची उत्कंठा उत्पन्न करिते झाले.

वरील वृत्तांतावरून दुसऱ्या नामांकित शंकराचार्यांच्या दिग्विजयकाळीं जर दंडी कवि असेल, तर तो शालिवाहन शकाच्या ४६०व्या वर्षी होता, असें ह्मणण्यास बाध नाहीं; परंतु त्या वेळेस बाणभट्ट व मयूर असल्याचा जो श्लोकांत उल्लेख आहे, तो मात्र संभाव्य नाहीं. कारण निबंधमालाकारानीं जो बाणभट्टा विषयीं एक पृथक् निबंध लिहिला आहे त्यांत त्यांनीं सप्रमाण असें दाखविलें आहे कीं, तो शके ५७२ मध्यें हयात होता. अर्थात् दंडी हा बाणभट्टा पूर्वी ११२ वर्षे होता, असें ह्मणण्यास अगदीं संशयच करणें नको.

आमच्या इकडील कवींची अशी चाल आहे कीं, त्यांनीं दोन चार प्रसिद्ध प्रसिद्ध कवि ऐकिले पुरेत, मग ते केव्हां कां झाले असेनात. एका मालिकेंत गोंविलेच ह्मणून समजावें. या विषयीं ही खालीं लिहिलेली गोष्ट पहा.

कोणे एके काळीं सुंदर तरुण स्त्रीचें रूप धरून साक्षात् सरस्वती ही, एका मोठ्या रस्त्यावर भुईवर चेंडू आपटून झेलणें हा खेळ करीत प्रगट झाली. तेव्हां दंडी, भवभूति, व कालिदास या तिघांनीं तिला पाहिलें. त्या वेळीं प्रथम दंडी या प्रमाणें बोलला.

एकोऽपि त्रय इव भाति कंदुकोऽयं कांतायाः करतलरागरक्तरक्तः॥
भूमौ तच्चरणनखांशुगौरगौरः खस्थः सन्नयनमरीचिनीलनीलः १

भवभूति ह्मणाला:-

विदितं ननु कंदुक ते हृदयं प्रमदाधरसंगमलुब्ध इव॥ वनिताकरतामरसाभिहतः पतितः पतितः पुनरुत्पतसि॥१॥

कालिदास ह्मणाला:-

पयोधराकारधरोहि कंदुकः करेण रोषादभिहन्यते मुहुः॥ इतीव नेत्राकृतिभीतिमुत्पलं स्त्रियः प्रसादाय पपात पादयोः॥१॥

पहिल्या श्लोकाचा अर्थ असा कीं, चेंडू एक असतांही तीन ठिकाणीं तीन प्रकारचा भासतो. म्हणजे जेव्हां तिच्या हाता जवळ येतो तेव्हां तांबडा, क्षणमात्र भूमीवर असतां पायांच्या नखप्रभेनें पांढरा, आणि मध्यें असतां डोळ्यांच्या नीलप्रभेनें निळा असा भासमान होतो.

दुसऱ्या श्लोकांतील अर्थ:- हे कंदुका, तुझा अभिप्राय मी जाणला. या स्त्रीच्या अधरोष्ठास आपण लागावें ह्मणजे त्याचें चुंबन करावें. हा लोभ मनांत धरून तुला ती आपल्या करकमलानें वारंवार खालीं हापटीत असतांही तूं पुनःपुनः वर उडतोस.

तिसऱ्या श्लोकाचा अर्थ- या चेंडूनें हिच्या स्तनाचा आकार धारण केला. म्हणून ही त्यास रागानें खालीं हापटल्ये आहे. व याच कारणामुळें तिच्या मस्तकावरील कमलास धाक पडला कीं, आपणही हिच्या डोळ्यांची शोभा चोरली आहे, तेव्हां नजाणो ती हिला कळल्यास आपलीही हीच दशा होईल. ह्मणून तें तिच्या पायांच पडलें- आहे कीं काय? असें वाटतें.

वरील तिन्ही श्लोकांवरून तिघांचीही कल्पना व रचनाशक्ति वाखाणण्यासारखी खरी; यांत संशय नाहीं. परंतु तिघांची समकालिनता यावरून झालीच असें- मात्र ह्मणणें असंभाव्य आहे. वर जो आह्मीं दंडीचा काळ दाखविला, त्यावरून तो कोणत्याच कालिदासाच्या वेळेस नव्हता. कारण विक्रमसभेंतील कालिदासाच्या पूर्वी १४७५ वर्षें होऊन गेला होता. व भोजसभेंतील कालिदासाच्या मागून ४४४ वर्षांनीं झाला होता ह्मणून " कविर्दंडी कविर्दंडी कविर्दंडी न संशयः॥ अहं रंडे अहं रंडे त्वमेवाहं न संशयः॥ "१॥ हेंही वाक्य दंडीची व भोज कालिदासाची समकालिनताच दाखवितें असें कांहीं नाहीं. असें पहा कीं, जर दुसरा कालिदास देवीचा उपासक असल्या कारणानें त्यास देवी प्रत्यक्ष होऊन - कवि असा दंडीच, कवि असा दंडीच, कवि असा दंडीच होऊन गेला असें बोलली असेल, तर मी कोण मी कोण म्हणून त्यानें पुसलें असतां तूं मीच होस असें देवीचें उत्तर दंडी मेला असला तरी त्याच्या मागून बहुत काळानेंही होण्यास अशक्य तें कोणतें?

सारांश दंडी कधीं होता व तो सामान्यतः कोणत्या प्रदेशांत राहात असे त्याचें आम्हीं निरूपण केलें. आतां त्याचा प्रसिद्ध ग्रंथ कोणता तो सांगतो. याचा प्रसिद्ध ग्रंथ ह्मटला म्हणजे दशकुमार चरित (दाहा राजपुत्रांची कथा) होय. त्यांतील विस्तार ज्यांस पाहणें असेल, व "दंडिनः पदलालित्यं" म्हणजे पदलालित्य असें एक दंडीचेंच. त्या विषयींचें चातुर्यही ज्यांस पाहणें असेल त्यांणीं रा. रा. विष्णुकृष्ण चिपळूणकर यांनीं जो दंडी विषयीं निबंध लिहिला आहे तो पहावा म्हणजे त्यांत त्यांस सर्व कांहीं सांपडेल. व विल्सन् साहेबांनीं दंडी नांवावरून तो सन्यासी होता अशा केलेल्या कल्पनेचें खंडनही मिळेल. याचा दुसरा ग्रंथ काव्यादर्श आहे म्हणूनही ऐकतों.

**दत्ताजी शिंदा**– राणोजी शिंद्याचा मुलगा. हा पानपतच्या लढाईंत मेला. (हिं० छा० इ०)

**दत्तात्रेय गोसावी**– समर्थ रामदास स्वामींचे शिष्य कल्याण गोसावी त्यांचे कनिष्ठ बंधु. यांचा मठ सातान्याजवळ शिरगांवीं आहे. हे समर्थांचेच शिष्य होते. व गृहस्थ ध-

मनिें वागणारे असत. (राम० चरि०)

दत्तात्रेय भट्ट– पद्यरूपानें मराठी भाषेंत ओंवीबद्ध अमृतार्णव नामक ग्रंथाचा कर्त्ता.

दत्तोपाध्याय– हा कवि काश्मीरा कडील राहणारा होय. समयप्रदीप नांवाचा ग्रंथ याचा आहे. (बुल्ह० का० शोध०) [त. (सू० मा०)

दन्री– पाटलीपुत्र नगराचें नांव. कोणी सात नद्या एकत्र मिळालेल्या स्थानासही म्हणता-

दधिमंथन– हें प्रकरण भागवतांपैकीं आहे. यावर वामनपंडिताची टीका आहे.

दमाजी गायकवाड– हा सेनापति दाभाड्यांचा सरदार. शके १६४२त मरण पावला. याचे पुत्र पिलाजी व महादजी.

२– पिलाजीचा वडील मुलगा. हा शके १६९०त मेला. याला सयाजी, गोविंदराव, माणकोजी, व फत्तेशिंग असे चार पुत्र होते. (हिंदु० छा० इ०)

दयाराम– डबोई गांवचा राहणारा जातीचा साठोदरा गुजराथी ब्राह्मण संवत् १९०१मध्यें होता. यानें राधा विलास, दानलीला, बाललीला, रासलीला, गीता माहात्म्य, भक्तिपोषण आणि सतसय्या इतके ग्रंथ गुजराथी भाषेंत लिहिले आहेत. (काव्यदो०).

दयाशतक– संस्कृतांत वेदांताचार्यकृत. [णतात.

दरद देश– कांपिल्य नगराच्या आसमंतातचा प्रदेश. पांचाल देश तो हाच. असें जैन म्ह-

दर्भकराजा– शिशुनागवंशीय राजा. अजातशत्रु राजाचा पुत्र व अजेय राजाचा बाप. (रा०)

दलदा– बुद्धाच्या कुत्र्याचा डावा दांत. हा सिंहलद्वीपांत पुरला आहे, व त्यावर थडगें बांधलें आहे. या थडग्यास बौद्ध लोक फार मानितात. (ग्या० सा० इं० कोश०)

दलपत– अमदाबाद येथील राहणारा जातीचा गुजराथी नागर ब्राह्मण. हा संवत् १८८७ मध्यें होता व यानें कांकरेजी देवीचें वर्णन गुजराथींत लिहिलें आहे. (काव्यदो० गु० ).

दलपति– काश्मीर देशीय कवि. नृसिंह प्रसाद तीर्थसार नांवाचा ग्रंथ याचा संस्कृतांत आहे. (बुल्ह० काश्मी० शोध०).

दशकुमारचरित– दंडी कवीनें संस्कृत भाषेंत केलेला ग्रंथ. परंतु याचा आरंभ दुसऱ्या कोणी कवीनें केला होता, असें म्हणतात. व शेवटही तिसऱ्यानेंच केला आहे. याचे उच्छ्वास आठ आहेत.

दशकुमारचरितशेष– चक्रपाणिदीक्षितकृत. संस्कृत भाषेंत.

दशकुमारचरित संक्षेप– अपय्यादीक्षित कृत संस्कृत भाषेंत.

दशनामसन्यासी– १ तीर्थ २ आश्रम ३ वन ४ अरण्य ५ गिरि ६ पर्वत ७ सागर ८ सरस्वती ९ भारती आणि १० पुरी असे दाहा संन्यासी ते. यांत शारदा मठ म्हणजे द्वारका

तेथील तीर्थ व आश्रम असे सन्यासी दोन. गोवर्द्धन मठ म्हणजे जगन्नाथ तेथील वन आणि अरण्य असे सन्यासी दोन. जोशी मठ म्हणजे बद्रिकेदार तेथील गिरि, पर्वत व सागर असे सन्यासी तीन. आणि शृंगेरी मठ म्हणजे दक्षिणेकडील मठ तेथील सरस्वती, भारती, आणि पुरी असे सन्यासी तीन. मिळून एकंदर सन्यासी दाहा. श्लोक :- तीर्थाश्रम वनारण्य गिरि पर्वत सागराः॥ सरस्वती भारतीच पुरी नाम यते र्दश॥ १॥ या शेवटच्या तिहींत इंद्र सरस्वती आणि आनंदसरस्वती असे मात्र सरस्वती संन्यास्यांचे दोन भेद आहेत.

वरील सन्यास्यां पैकीं वन, अरण्य, गिरि, पर्वत, सागर आणि पुरी यांनीं कित्येक शूद्र शिष्य केले. नंतर त्या शूद्रांनीं वैराग्यानें सन्यास दीक्षा गुर्वाज्ञे वांचून धारण केली. म्हणून त्यांस पारवंडी सन्यासी नांव पडलें. तेच हल्लीं भ्रष्ट सन्यासी गोसावीं प्रसिद्धच आहेत. आलीकडे आलीकडे खरे सन्यास्यांस दंड बाळगण्याचें सुटल्या मुळें गोसावीही आम्ही सन्यासीं म्हणून भ्रष्टकार करूं लागले आहेत.

**दशबल**— अमरसिंहानें अमर कांडांत जीं बुद्धाचीं नांवें लिहिलीं आहेत त्यांतील एक. दशबल शब्दाचा अर्थ असा कीं, दाहा प्रकारचें बळ ज्याच्या अंगांत आहे तो. या विषयींचा श्लोक असा आहे :—

दानं शीलं क्षमा वीर्यं ध्यान प्रज्ञा बलानिच॥ उपायः प्रणिधि र्ज्ञानं दश-
१ २ ३ ४ ५ ६ ७ ८ ९ १०
बुद्ध बलान्विते ति॥

**दशमस्कंधटीका**— बहिरंभट्ट पिसा यानें मराठी भाषेंत लिहिलेली ओंवीबद्ध टीका. ती ही टीका सुमारें पाऊण लक्षा जवळ जवळ आहे.

**दशमस्कंध सार**— गुजराथी भाषेंत रेवाशंकर कवीनें दशम स्कंधाचें लिहिलेलें सार.

**दशरथ**— चंद्रगुप्ताचा मूळ पुरुष. हें नांव भागवत द्वादश स्कंधाच्या टीकेंत आहे.

**दशारण्य**— हें बुंदेल खंडांत उ० अ० २४° व पू० रे० ८०° या सुमारावर प्राचीन नकाशांत आहे.

**दशार्ण देश**— दशारण्याच्या आसमंतातचा प्रदेश. [तक म्हटलेलें आहे.

**दशार्ण पश्चिम**— पश्चिमेकडील दशार्ण देश. याचें मुख्य शहर जैन ग्रंथांत मार्तिकाव-

**दशावतार चरित**— इच्छाराम कविकृत गुजराथी भाषेंत.

**दशावतार वर्णन**— क्षेमेंद्र कविकृत संस्कृत भाषेंत.

**दशावतार स्तुति**— वेदांताचार्यकृत संस्कृतांत. [गांव नाशिका जवळ आ०

**दसक पंचक**— समर्थ रामदास स्वामींचे पहिले शिष्य उद्धव गोसावी. त्यांचा हा मूळ

**दहींफळ**— रामदास स्वामींचे ज्येष्ठ बंधु गंगाधर पंत त्यांच्या समाधींचा गांव. हा गो-

दावरीच्या कांठीं असणाऱ्या जांबे जवळ आहे.

**दक्षिण कोसल देश**:- अयोध्या राजधानीचा देश.

**दादू नरसू काळे**— हा ब्राम्हण मोठा शहाणा होता. दुर्गादेवी दुष्काळाच्या वेळेस यानें मोठी खटपट केली. व लोकांस वांचवून पुढेंही त्यांच्या उपयोगीं पडला. हा मोंगलाचा मुत्सद्दी होता.

**दादूपिंजारी**—हा हिंदुजातीचा पिंजारी काश्मीरचा राहणारा होता. यानें विष्णुभक्तीचा मार्ग जो लोकांस शिकविला त्यास दादूपंथ नांव आहे. याच्या अनुयायांस लोक दादूपंथी म्हणतात. हे कपाळावर प्रायः तिलक करीत नाहींत. परंतु चार कोंपरे साधलेले अशी एक उभी टोपी डोक्यास घालून मागल्या बाजूस तिला एक फरारा सोडितात, आणि त्या वरून हे दादूपंथी असे ओळखतां येतात. (ग्यारे०) हा कधीं जन्मला व कधीं मेला त्या विषयीं पक्का शोध लागत नाहीं. परंतु सामान्यतः इतकें च कळतें कीं, शालिवाहनाच्या पंधराव्या शतकाच्या उत्तरार्धांत हा होता. हा वैष्णव खरा; परंतु शांकरमतानुयायी होता. त्या विषयीं यानें वेदांतपर विचारसागर ग्रंथ हिंदुस्थानी भाषेंत केला आहे तो पहा. सुंदर नामक एक नामांकित साधु. तो याचा शिष्य होता. (ग्यारे० इंग्लि० कोश) व (इन्डु मा०).

**दादोजी कोंडदेव**—शाहाजीचा कारभारी ब्राह्मण व शिवाजी राजाचा शिक्षक. हा मोठा नीतिमान् होता.

**दानलीला**— दयाराम कविकृत गुजराथी भाषेंत.

**दामशेटी**— हा जातीचा शिंपी पंढरपूरचा राहणारा असे. प्रसिद्ध जो नामदेव त्याचा [ हा बाप होता.

**दामाजीपंत**—पंढरपुराजवळ मंगळवेढें ह्मणून गांव आहे, तेथील हा ठाणेदार होता. ही याची नेमणूक बेदरच्या बादशाहाकडून होती. ऐकण्यांत पक्कें असें येतें कीं शके १५५१ मध्यें हा मंगळवेढें येथें होता. आणि त्या वेळेस बेदरास महमूदशाहा ब्राह्मणी नांवाचा बादशाहा गादीवर असे. हा मूळचा राहणारा कोठला तें कांहीं बरोबर कळत नाहीं, परंतु हा आपल्या वयाच्या सोळाव्या वर्षीं बेदर येथें बादशाहाच्या पदरच्या एका अधिकाऱ्याजवळ कारकुनीच्या नात्यानें चाकरीस राहिला. तेथें यानें चौदा वर्षें पर्यंत काम चांगलें व प्रामाणिकपणानें केलें. त्या वरून याच्या यजमानानें बादशाहाजवळ याची शिफारस केली. ती वरूनच यास मंगळवेढ्याच्या ठाणेदारीचें काम मिळालें. व तेंही यानें इमानें इतबारें वीस वर्षें पर्यंत केलें.

हा स्नानसंध्या व देवतार्चन प्रत्यहीं मोठ्या भक्तिभावानें करी. याची विठोबावर-ही मोठी भक्ति असे. पुढें पुढें तर असें सांगतात कीं, यानें पंढरीची वारीही धरि-ली. प्रत्यहीं पहांटेस उठून एकाग्र मनानें चार घटिका भजन करून नंतर हा आ-पला व्यवसाय करी. हा काळ पर्यंत याची निष्ठा ईश्वराच्या ठिकाणीं कशी आहे तो लोकांस कळली नव्हती. मात्र हा भला, दयाळू व प्रामाणिक आहे इतकेंच यास लोक समजत.

एकदां पंढरपुर परगण्यांत अनावृष्टी मुळें दुष्काळ पडला. व धान्य अतिश-य माहाग झालें. त्या मुळें लोकांचे फार हाल होऊं लागल्यानें ते अन्नासाठीं चोहों-कडे भटकत फिरूं लागले. एके वेळीं दामाजीपंत नित्य विधि उरकून वैश्वदेव क-रीत आहे तों, एक ब्राह्मण येऊन मला भोजनास द्या असें म्हणूं लागला. तेव्हां या-नें, यावें असें ह्मणून त्यास भोजनास घेतलें. पुढें सर्व पदार्थ वाढून झाल्यावर दा-माजीपंत ब्राह्मणासह भोजनास बसला. अर्धेंसें भोजन होत आहे तों, दामाजीपं-त ब्राह्मणास म्हणाला भटजी, सावकाश होऊं द्या बरें. काय लागेल तें मागूनघ्या इतके शब्द ऐकतांच त्यास जें रडें आलें तें कांहीं केल्या त्याचें त्यालाच आवरेना. अ-सें पाहून दामाजीपंतानें पुसलें. महाराज, हें आपण काय करितां ? आपणावर कां-हीं संकट गुजरलें आहे कीं काय ? ब्राह्मणाचा गळा दाटून आल्या मुळें त्याच्यानें उत्तर देववेना. तरी इतकेंच म्हणाला महाराज काय सांगूं ? घरीं बायको व दोन तीन मुलें आज तीन चार दिवसांचीं उपाशीं आहेत. मीही तसाच उपाशीं होतों परंतु आपण कृपा करून भोजनास घेतलें ह्मणून अन्नास मिळालों. त्या वरून दामाजीपंतानें सांगितलें इतकेंच ना ? कांहीं चिंता करूं नका. आपलें भोजन स्व-स्थ होऊं द्या. भोजन होतांच आपल्या बायको मुलां करितां धान्य देईन. त्याव-रून ब्राह्मणास धीर येऊन तो मग स्वस्थपणें जेवला.

भोजन झाल्यावर दामाजी पंतानें बोलल्या प्रमाणें ब्राह्मणास सुमारें एक वर्षाच्या बेगमीचें धान्य देऊन रवाना केलें. ब्राह्मण पंढरपुरचा होता, म्ह-णून तो घरीं पोहोंचतो तों सर्व गांवांत ती गोष्ट फुटली. व ती वरून प्रायः स-र्व पंढरपुर धान्य मागण्या करितां मंगळवेढ्यावर दामाजीपंताकडे लोटलें. हें वर्तमान यास कळतांच आतां काय करावें, त्याची यास मोठी चिंता पडली. नं-तर रात्रीं याच्या बायकोचा व याचा विचार होऊन, प्राण गेला तरी पतकरला. परंतु ब्राह्मणांस धान्य द्यावयाचें असा निश्चय ठरला. दुसऱ्या दिवशीं यानें

रात्रीं निश्चय ठरल्या प्रमाणें सरकारी कोठारांतील धान्य ब्राम्हणांस वांटून त्यांस मार्गस्थ केलें. परंतु मुजुमदारानें तावडतोब ही खबर बादशाहास कळविल्या वरून बेदराहून यास धरणें आलें.

यास नेण्यास आलेला जमादार याला सलाम करून बोलला. पंडतजी,आपल्यास हुजूर घेऊन यावें असा सरकारचा हुकूम आहे. तेव्हां येण्याची मर्जी कशी काय आहे? यानें उत्तर केलें. सरकारच्या हुकुमा बाहेर आमची मर्जी नाहीं. परंतु तुम्हांस मागणें इतकेंच आहे कीं, एकवार पंढरीस जाऊन देव दर्शन करून मग निघावें असें मनांत आहे. यास्तव सांगाल तर जाऊन येतों. असें ऐकून जमादार स्वतः भला मनुष्य होता. ह्मणून त्यानें विचार केला कीं, हा गृहस्थ सरकारच्या पदरीं पुष्कळ दिवस आहे, व सज्जनही आहे. त्या अर्थीयास नाहीं म्हणणें बरोबर नाहीं. असें जाणून बरें आहे जाऊन यावें. असें बोलल्या वरून दामाजीपंत पंढरीस गेला. व देवदर्शन करून देवाचा व क्षेत्रांतील ब्राह्मणांचा निरोप घेऊन ह्मणाला. आतां लोभ असूं द्यावा. पुनः दर्शन घडतें न घडतें; कारण अशा अशा कारणानें हुजूरचें बोलावणें आलें आहे. त्या वरून ब्राह्मणांस अतिशय वाईट वाटून त्यांनीं ईश्वराची प्रार्थना केली, व सर्वांनीं आपण खुशाल आवें दैव आपली उपेक्षा करणार नाहीं. असा आशीर्वाद देऊन यास निरोप दिला.

नंतर मंगळवेढ्यांस येऊन दामाजीपंत जमादारा बरा बर बेदरास जाण्यास निघाला. वाटेनें चालला असतां तिसऱ्या दिवशीं स्नानसंध्येच्या वेळीं त्यानें गीतेच्या पोथींत रुपयास एक पायली धान्य या भावानें सातशीं खंडीचा पैका पावल्या बद्दल, व तो विठ्या माहारानें आणून दिल्या बद्दल बादशाकडील पावती पाहिली. ती वरून आश्चर्य पावून हें झालें कसें, म्हणून विचार करीत असतां, बादशाहाचें मनाई पत्र जमादारास येऊन पोंहोंचलें कीं, दामाजी पंतास मंगळवेढ्यास परत जाऊं द्यावें. त्या वरून जमादार यास म्हणाला महाराज, हुजूरचा या प्रमाणें हुकूम आला आहे तर आतां आपण परत जावें. त्या वरून दामाजी मंगळवेढ्यास परत आला. व जमादार बेदरास गेला. बादशाहाकडे ज्या महारानें पैका भरला तो देव होता. त्याचें महार जाती प्रमाणें मराठी बोलणें, त्याच्या गळ्यांतील काळा दोरा इत्यादि वर्णन अमृत रायानें इतकें सरस लिहिलें आहे कीं, तें ऐकून ईश्वराची लीला अगाध आहे असें वाटतें. असो पुढें दामाजी पंतानें

चाकरीचा राजिनामा दिला. व एकदां बादशाहास भेटून आमरण पर्यंत पंढरीस ज्ञाऊन राहिला. (भक्तवि० अ० ४०).

**दामाजी पंताची रसद**– अमृतराय कृत.

**दामोदर**– काश्मीरा कडील एक सरकारी कामदार. हा विद्वान् होता म्हणून मंखककवीच्या ग्रंथाची परीक्षा करण्यास जे तीस पंडित बोलाविले होते, त्यांत होता (बु० २– कंसवध नाटकाचा कर्त्ता जो एक पंडित तो (बुल्ह० का० शो०).

**दामोदरदास**– हा गुजराथी वाणी व प्रसिद्ध वल्लभाचार्यांचा पहिला शिष्य.

**दामोदरदेव**– हा रत्नागिरी कडील राहणारा ज्ञातीचा कऱ्हाडा ब्राह्मण कवि होता म्हणून सांगतात; परंतु याची कविता कोणती, व हा होता कधीं त्याचा आम्हांस ठिकाण लागला नाहीं. मात्र याचें उपनाव नवाटे होतें, इतकें कळलें आहे. (ह्०)

**दार्वदेश**– पंजाबांतील पांच नद्यां पैकीं, विनस्ता नदीच्या कांठीं असणारें उरासा शहर. याच्या आसमंतातचा प्रदेश तो. असें प्राचीन नकाशा वरून दिसतें.

**दासबोध**– समर्थ रामदास स्वामि यांनीं मराठी भाषेंत केलेला ओंवीबद्ध ग्रंथ. याचे दशक वीस आहेत: व एकेका दशकांत दाहा दाहा समास मिळून एकंदर सं० मास २०० आहेत. हा ग्रंथ आरंभीं मात्र फारच सुलभ आहेसा दिसतो. परंतु पुढें पुढें बराच कठिण आहे. हा कधीं लिहिला त्याचा शक यांत चमत्कारिक रीतीनें आढळतो. त्या विषयीं दशक सहा मधील समास चौथा ओंवी सात, आठ, ही मध्यें असें म्हटलें आहे:—

> चार सहस्र सातशें साठीं॥ इतुकी कलियुगाची राहटी॥ उरल्या कलियुगाची गोष्टी॥ ऐशी असे.॥७॥ चारी लक्ष सत्तावीस सहस्र॥ दोनशेंचाळीस संवत्सर॥ पुढें पुढें अन्योन्य वर्ण संकर॥ होणार आहे.॥८॥

अर्थ:– हा ग्रंथ झाला त्या वेळेस युधिष्ठिर शकाचीं म्हणजे कलियुगाचीं ४७६० वर्षें गत झालीं होतीं. व शेषकलियुग ४२७२४० वर्षें राहिलें होतें. या वरून विशेष पाहणें तो असा:– जर दासबोध ग्रंथ ४७६० त झाला आहे व आज गत कलीचें वर्ष ४९८० वावें आहे. तर उघड दिसतें कीं, हा ग्रंथ होऊन २२० वर्षें झालीं आहेत व हींच २२० वर्षें आज चालू शालीवाहनाचें वर्ष १८०१ यांत वजा दिलीं असतां शालिवाहन शके १५८१ मध्यें हा ग्रंथ झाला असें स्पष्ट दिसतें. हा ग्रंथ रामदास स्वामींनीं सांगितला व कल्याण गोसावी यांनीं लिहिला. त्या विषयीं आम्हीं कल्याण गोसावी या नांवावर लिहून दाखविलेंच आहे. याची ग्रंथसंख्या सु० ८००० आहे.

**दासोपंत**— हा जातीचा ब्राह्मण जोगाईच्या अंब्यांचा राहणारा मोठ्या पदवीचा कामदार होता. नृसिंह सरस्वती ह्मणून जे प्रख्यात संन्यासी होऊन गेले त्यांचा हा शिष्य,व जनार्दन स्वामींचा गुरु बंधु असे. हा भगवद्भक्त व मोठा वैराग्यशील होता. यानें गीतेवर मराठी ओंवीबद्ध टीका गीतार्णव नांवाची फार मोठी केलेली आहे. याच्या कवितेचा मासला कळण्या साठीं येथें त्याचा खेळिया लिहिला आहे:—

जळ नाहिं स्थळ तेथें कमळणी आहे चहुं शिंगांचीं गाय रे॥ नवां माजि दाहावें मुनि जन यत्नीं कमळिं कमळ सांग काय रे॥ अग्निविण जळते त्रिभुवन पोळे शिखा पंचविध तया रे॥ जाणशिल जरि नरि साधनचि न घडे कळल्या भेदा खायरे॥१॥आहेच तुझें तुजपाशींरे खेळिया सोडुनांच मुक्त होशीरे॥ध्रु०॥ तिहीं स्थळिंचिं पांच बाळकें आलीं नागविंच हिंडुं लागलींरे॥आइ ना बापना कोणिच नाहीं रुदन करूं लागलीं रे॥ आप आपणाशीं जाणुन वेगळें भांडाया उदीत झालीं रे॥पांचाचा भाग पांचास देउन अवघिं समान केलीं रे॥ आहेच०॥२॥पांचांच्या भाग एकवट होतां घटु हा निर्माण झालारे॥ तया घटां मधें अश्वत्थ पाहिला पेरिल्या विन ऊगवलारे॥तया द्रुमा वरि खग दोन बसले पारध्यानें फांस टाकिलारे॥ एक बद्ध एक मुक्तचि झाला ब्रह्मांड फोडुन गेलारे आहेच०॥३॥ एकाशि पाप पुण्य एकाशिं तें नाहीं पाहे एकाकडे एकरे खालच्यानें वरचा गिळुन टाकिला भगें भोगी सुखरे॥ तिसरा तरी तोकाहिंच नेणे जरा मरण चिन्मुखरे॥ दिगंबरा तुझ्या पायां लागतां दोहीं चा निरास एकरे॥ आहेच तुझें तुज पाशीं रे खेळिया सोडनांच मुक्त होशीरे४

याचा मरण शक १५३६ असें ऐकण्यांत येतें. (वृद्ध मा०).

**दाक्षी**— पाणिनि ह्मणून जो वैयाकरण होऊन गेला त्याची आई.

**दिगंबर**— अर्हत अथवा जैन यां मध्यें जे श्वेतांबर आणि रक्तांबर असे दोन भेद आहेत, त्यांतील दुसऱ्या भेदाचे लोक ते. यांच्या मतांत आत्मा मध्यम परिमाणाचा मानिलात. म्हणजे लहान किंवा मोठा जेवढा देह तेवढाच आत्मा. या विषयीं असें आढळतें.

दिगंबरा मध्यमत्व मा हुरापाद मस्तकं॥ चैतन्य व्याप्ति संदृष्टे रानखाग्र श्रुते रपि॥ सूक्ष्मनाडी प्रचारस्तु सूक्ष्मैः रवयवै र्भवेत्॥ स्थूल देहस्य हस्ताभ्यां कंचुक प्रति मोकवत्॥ न्यूनाधिक शरीरेषु प्रवेशोपि गमागमौ

आत्मांशानां भवेत्तेन मध्यमत्वं सुनिश्चितं॥ (पंचदशी)

**दिलीपसिंग**—रणजितसिंगाच्या मुलगा. यानें धर्मांतर केलें आहे. व शीख घराण्यास कलंक लाविला आहे असें लोक बोलतात.

**दिल्लीचें राजघराणें**—युधिष्ठिर वंशांतील आठवा राजा निमिचक्र हस्तिनापुर येथें राज्य करीत असतां, भागीरथीस पूर येऊन तें शहर वाहून गेल्या मुळें, त्यानें आपली गादी कौशांबी नगरास नेली. त्या वेळेस युधिष्ठिर शकाचें सुमारें ५९३वें वर्ष होतें. ही गादी तेथें सुमारें १२७१ वर्षें होती. व तेवढ्या काळांत चित्ररथ राजा पासून क्षेमक (लक्ष्मीदेव) राजा पर्यंत युधिष्ठिर वंशीय बेवीस पुरुषांनीं तेथें राज्य केलें. त्या तीस राजांचीं नांवें, युधिष्ठिर राजा या शब्दावर लिहिलीं आहेत. व प्रत्येकानें किती किती वर्षें राज्य केलें तेंही विल्हेवारीच्या क्रमानें त्या त्या नांवावर लिहून ठेविलें आहे. यांनीं राज्य १८५३ वर्षें ४ महिने व १२ दिवस केलें.

क्षेमक म्हणजे लक्ष्मीदेव यास त्याच्या वीरसेन प्रधानानें मारून, कौशांबी नगरांतून गादी काढिली. व ती इंद्रप्रस्थ (दिल्ली) येथें आणून आपण राज्य करूं लागला. वीरसेना पासून पृथिवीपाळ राजा पर्यंत पुरुष दाहा झाले. व त्यानीं राज्य एकंदर ३४७ वर्षें १० महिने व २७ दिवस केलें. (वीरसेन) श॰ प॰

वीरसेन वंशांतील शेवटला राजा पृथिवीपाळ यास त्याच्या नरहरिनाथ नामक वजिरानें मारिलें. व दिल्ली येथें आपण राज्य करूं लागला. या वंशांत नरहरिनाथा सुद्धां सोळा राजे झाले. व त्यांनीं ४०५ वर्षें ४ महिने व १६ दिवस राज्य केलें. (नरहरिनाथवंश) शब्द पहा.

नरहरिनाथ वंशांतील शेवटचा राजा विक्रम त्यास मित्रपाळ नामक त्याच्या प्रधानानें मारिलें. व आपण इंद्रप्रस्थ (दिल्ली) येथें राज्य करूं लागला. हे राजे एकंदर मित्रपाळा सुद्धां सोळा झाले होते. व या सर्वांनीं राज्य एकंदर सुमारें ३१२ वर्षें तीन महिने १८ दिवस केलें. (मित्रपाळ) शब्द प॰).

मित्रपाळ वंशांतील शेवटला राजा विक्रमपाळ यास अहीर जातीच्या कोणी प्रधानानें मारिलें व आपण इंद्रप्रस्थ (दिल्ली) येथें राज्य करूं लागला. हे अहीर राजे आठ झाले होते. व त्यांनीं एकंदर राज्य सुमारें १२५ वर्षें व १७ दिवस केलें. (अहीर राजे) श॰ प॰

सूरचंद्र राजाच्या राज्यकारकीर्दीच्या अखेरीस उज्जयिनी येथें विक्रमादित्य राजानें आपला संवत् चालू केला. त्या मुळें सर्वत्र संवत् चालू होऊन युधिष्ठिर

शक अगदीं बुडाला. या वेळेस सूरचंद्र निपुत्रिक असल्यामुळें तो मरण पावतांच दिल्ली येथें एक पुरुष राज्य करूं लागला. त्याचें नांव आढळत नाहीं. याच्या सुध्दां आठ पुरुषांनीं सुमारें एकशें दोन वर्षें, सात महिने, दाहा दिवस राज्य केलें. या आठ राजांचीं नांवें व त्यांच्या राज्य कारकीर्दीचीं वर्षें, निनावी राजवंश या शब्दावर दिलीं आहेत.

निनावी राजाच्या वंशांतील शेवटला राजा महानंद. त्यास बंगाल्याकडून आलेल्या कोणी एका जयशिंगनामक पुरुषानें मारिलें. व आपण इंद्रप्रस्थ (दिल्ली) येथें राज्य करूं लागला. या सुद्धां याच्या बारा पुरुषांनीं तेथें राज्य केलें. त्यांत दोन पुरुषांनीं दक्षिणेस विक्रम संवत् बंद होई पर्यंत ३२ वर्षें ४ महिने २० दिवस, व बाकीच्या दाहांनीं शालिवाहन शकाच्या आरंभापासून सुमारें एकशें दोन वर्षें दाहा महिने पांच दिवस राज्य केलें. (जयशिंग वंश) श॰ प॰).

या पुढें उत्तरेकडून माधवसिंग आला व त्यानें जयशिंग वंशांतील शेवटला राजा दामोदर सेन यास मारून, इंद्रप्रस्थ (दिल्ली) येथें साहा पुरुष पर्यंत ८८ वर्षें ४ महिने राज्य केलें. (माधवशिंग) श॰ प॰

माधवशिंगाच्या वंशांतील शेवटचा राजा नरहरशिंग यास धीरधर राजानें मारून आपण इंद्रप्रस्थ (दिल्ली) येथें राज्य केलें. या धीरधरा सुध्दां नववा पुरुष विक्रमचंद्र या पर्यंत ९ पुरुषांनीं एकंदर २७४ वर्षें ५ म॰ २९ दि॰ राज्य केलें. (धीरधर) श॰ प॰

धीरधर वंशांतील शेवटला राजा विक्रमचंद यास पूर्वेकडून आलेल्या पृथिवीपाळ राजानें ठार मारिलें व दिल्ली येथें आपण राज्य करूं लागला. आम्हांस जो जुना इतिहास एका गृहस्थाच्या हातचा मोडी अक्षरांत लिहिलेला मिळाला आहे, त्यांत पृथिवी पाळाच्या वंशांत पांच पुरुष राज्य कर्ते झाले, असें लिहिलें आहे. व त्यांची राज्यकारकीर्द सुमारें १०६ वर्षांची सांगितली असून, पांचवा पुरुष पृथुराज (पिठौरा राजा) वर्णिला आहे. त्या वरून शालिवाहन शतक साहावें आरंभतांच पृथुराज यवन लोकांच्या हातीं सांपडून मारला गेला असें होतें; परंतु शालिवाहन शके ५९५ पर्यंत हिंदुस्थानांत धर्माभिमानानें किंवा राज्य लोभानें मुसलमान लोक आल्याचें मुळींच दिसून येत नसून बाळशास्त्री जांभेकर यांनीं जो हिंदुस्थानाचा संक्षिप्त इतिहास लिहिला आहे त्यांत त्यांनीं स्पष्ट असें लिहिलें आहे कीं, पृथुराज हा गोरीवंशीय शाहाबुद्दिन याच्या हातून शके १११५ मध्यें म्हणजे बाराव्या शतकाच्या आरंभीं मारला गेला. या दोन लेखांत सहा शतकांचा फेर असल्यामुळें आ-

म्हांस असें दिसून येतें कीं, मधल्या साहा शतकांत पृथिवी पाळाच्या वंशांत आ-णखी सुमारानें दाहा बारा तरी पुरुष झाले असावेत. व शेवटीं पृथुराज झा-ला असावा. व त्यांची एकंदर राज्य कारकीर्द शालिवाहन शकाचीं ७०९ वर्षे ३ महिने व २६ दिवस इतकी असावी. या वरून आणखीं असेंही स्पष्ट होतें कीं, यु-धिष्ठिरा पासून पृथुराजा पर्यंत हिंदु राजांची बादशाही ४२९४ वर्षे पर्यंत म्हणजे सुमारें त्रेचाळीसशें वर्षे पर्यंत भरत खंडांत (हिंदुस्थानांत) निर्वेध चालली होती. (हिंदुस्थानचा हस्तलि० इति०)

### या पुढें दिल्ली येथें यवन बादशाहीस आरंभ झाला, त्याचीं नांवें व राज्य कारकीर्दीचे काळ यणें प्रमाणें:-

| नांव. | शक. | नांव. | शक | नांव | शक. |
|---|---|---|---|---|---|
| सुलतान महमूद-हिंदु- | | खुसरू ... ... ... | १२४३ | बाबर | १४४८ |
| स्थानावर पहिली स्वारी | | ग्यासुद्दीन तघलख.. | १२४३ | हुमायून दुसरा ... ... | १४५२ |
| करणारा .. .. .. | ९२३. | युना खान ... ... ... | १२४७ | शीर शाहा ... ... | १४६४ |
| महंमद गोरी .. .. | ११०८ | फिरुजुद्दीन ... ... | १२७३ | सलीमशाहा ... ... | १४६६ |
| गुलाम वंश .. .. .. | ११२८ | ग्यासुद्दीन तघलख दुस० | १३१० | महंमद शाहा ... ... | १४७५ |
| कुतुबदीन .. .. .. | ११२८ | अबुबखर ... ... ... | १३११ | अकबर शाहा ... ... | १४७८ |
| आरामशाहा .. .. .. | ११३२ | नासरुद्दीन ... ... ... | १३१२ | जहानगीर ... ... ... | १५२७ |
| अलतमष शाहा .. .. | ११३३ | हुमायून-यानें दीडम | | शाहाजहान ... ... ... | १५५० |
| रुकनुद्दीन .. .. .. | ११५८ | हिना राज्य केलें.. .. | | औरंगजेब ... ... ... | १५८० |
| रजिया बेग .. .. .. | ११५८ | महमूद तघलख ... ... | १३१६ | मोअज्जीम ... ... | १६३० |
| मवजुद्दीन ... ... | ११६१ | दौलत खान लोदी ... | १३३४ | जहानदर ... ... ... | १६३४ |
| अल्ला उद्दीन मसाऊद .. | ११६३ | खिझर खान ... ... | १३३६ | फरुकशीर ... ... ... | १६३५ |
| नासरुद्दीन .. .. .. | ११६७ | सय्यद मुबारीक ... ... | १३४३ | महंमद शाहा ... ... | १६४१ |
| ग्यासुद्दीन .. .. .. | ११८८ | सय्यद महंमद .. .. .. | १३५७ | अहंमदशाहा ... ... | १६७० |
| कैकुबाद .. .. .. | १२०८ | सय्यद अल्ला उद्दीन ... | १३६६ | अलमगीर ... ... ... | १६७६ |
| जलालुद्दीन .. .. .. | १२१० | बहिलोल खान लोदी ... | १३७२ | शाहा अलम ... ... | १६८१ |
| अल्ला उद्दीन .. .. .. | १२१७ | शिकंदर शाहा ... ... | १४१० | इतके पुरुषांनीं दिल्ली | ००० |
| मुबारीक .. .. .. .. | १२३९ | इब्राहीम ... ... ... | १४३८ | येथें बादशाही केली. | ००० |

हा शेवटला नामधारी बादशाहा शालिवाहन शके १७२५ मध्यें मरण पावला. येथून पु-
ढें दिल्लीची बादशाही बुडाली. यावरून युधिष्ठिर शकाच्या ४२९४ वर्षां पासून ४९०४
पावेतों म्हणजे ६१० वर्षे पर्यंत बादशाही चालली होती असें समजावें. (हिं० छा० इ०).

**दिल्लीशहर**— याचें जुनें नांव इंद्रप्रस्थ. हें भिरत शहराच्या नैर्ऋत्येस यमुनेच्या कांठीं आ-
हे. याचे उत्तर अक्षांश सुमारें २९° व पू० रे० ७७° आहेत. युधिष्ठिराच्या वंशांतील त्या
सुद्धां सात पुरुषांनीं असीमकृष्ण राजा पर्यंत हस्तिनापूर येथें सुमारें पांचशेंसा-
त वर्षें राज्य केल्यावर तें शहर भागीरथीस पूर येऊन वाहून गेलें. म्हणून निमि-
चक्र राजानें कौशांबी नगरांत गादी आणिली ती क्षेमक राजा म्हणजे लक्ष्मीदे-
व या पर्यंत सुमारें १३५० वर्षें तेथें होती. पुढें लक्ष्मी देवास त्याच्या वीरसेन ना-
मक प्रधानानें मारिलें. व तो कौशांबींतून गादी काढून ती दिल्ली येथें स्थापून
राज्य करूं लागला. तेव्हां पासून हें शहर राजधानी झालें. तें मुसलमानी रा-
ज्याची समाप्ति होई पर्यंत होतें. (हिं० ह० इ०).

**दिवाकर**— भास्कर कवीचा बाप. (बु० का० शो०). २— आचारार्क ग्रंथाचा कर्ता.

**दिवाकरपंत**— काशींत राहणारा एक विद्वान् गृहस्थ. हा शुद्धाद्वैत शांकर मताचा हो-
ता, असें दिसून येतें. त्या विषयीं आम्हांस याचें एक पद सांपडलेलें खालीं लि-
हिलें आहे:—

> मी मेलों अमर झालों ॥ सुखानें पिऊन धालों ॥ ध्रु० ॥ रोग मजला झा-
> ला विवेक ॥ वैद्य आणिला अविवेक ॥ तेणें मात्रा दिधली शोक ॥ ते
> मज नाहीं लागली ॥ मी मेलों० ॥ १ ॥ देह माझा झाला प्रेत ॥ कर्मेंद्रि-
> यें त्याला नेत ॥ प्रपंच स्मशानीं निक्षेप ॥ दुःख चिता रचियेली ॥ मीं मे-
> लों० ॥ २ ॥ लिंग देह घटःस्फोट ॥ सोहं भावें बोंब स्पष्ट ॥ जीव पुत्र तो नि-
> श्चेष्ट ॥ येऊन पडला त्या माझी ॥ मी मेलों० ॥ ३ ॥ ज्ञान दिवाकरीं घेउनी
> देह प्रेतस्थळीं लाउनी ॥ स्वजन तेथें अवलोकुनी ॥ जाती आपुल्याला
> स्थाना ॥ मी मेलों० ॥ ४ ॥

अर्थ:- अमर होणें म्हणजे न मरणें असें सर्वानुभव सिद्ध असतां, तुम्ही मीं मेलों
असें म्हणून अमर झालों म्हणतां हें कसें ? असें कोणी म्हणेल त्यास उत्तर अहो
ऐका. मला विवेक रोग लागला असतां तो नीट करण्यास अविवेक वैद्य आला.
त्यानें शोक ही मला मात्रा दिली. ती मला न लागल्यानें मी मेलों व विवेक जब-
र पडला म्हणून अमर झालों. कारण विवेकाचा परिणाम तोच आहे. मग यांत

वांकडें तें काय ? इत्यादि.

दिवाकरभट्ट– हा सूर्योपासक पहिल्या शंकराचार्यांच्या वेळेस होता. व याशीं आचार्यांचा वाद होऊन त्यांनीं यास वादांत जिंकल्या मुळें हा त्यांचा शिष्य झाला. (आनं॰ शां॰ वि॰ प्रकर॰ ६९).

दीन कृष्णदास– ओरिसा प्रांतीं राहणारा व रसकल्लोळ ग्रंथाचा कर्ता. (बु॰ की॰ शो॰).

दीपरत्नाकर– हा ग्रंथ मराठी भाषेंत ओंवीबद्ध आहे. चांगदेवाच्या शिष्यपरंपरेंत झालेल्या कोणी पुरुषानें हा केला असें ऐकण्यांत येतें. यांत समर्थ रामदासस्वामींची शिष्य वेणूबाई तिचें नांव प्रसंगानुसार आलें असल्या मुळें हा ग्रंथ सुमारें एकशें पंचाहत्तर वर्षांचे आंतला आहे असें दिसतें.

दीपविजय– बडोदें येथील राहणारा एक जनी. हा संवत् १९०३ मध्यें होता. व यानें चंद्रास नांवाचा एक ग्रंथ गुजराथी भाषेंत लिहिला आहे. (काव्य॰ गुज॰).

दीप्तस्वामि– पूर्वमीमांसा शास्त्राचा व्याख्याकार जो शबरस्वामि त्याचा बाप (बु॰ का॰ शो॰)

दुआब– दोआब शब्द पहा.

दुप्पट– तैलंगणांतील एक प्रांत.

दुरह्मा– दुप्पट प्रांतांतील एक गांव.

दुर्गा– बंगाल्यांतील प्रसिद्ध देवि. हिची जी महा पूजा होते तिला दुर्गापूजा म्हणतात. पूजेस नरबलि लागतो असें सांगतात. (वृद्ध मा॰).

दुर्गादास– कविकल्पद्रुम म्हणून जो बोपदेवाचा ग्रंथ व्याकरणांतील संस्कृत धातूंवर आहे, त्यावर धातुदीपिका नांवाची जी टीका ती यानें केलेली आहे. हा जातीचा ब्राम्हण होता. (बुल्ह॰ शोध॰).

दुर्गादेवीचा दुष्काळ– हा शके १३१८ नागाईत १३३० पर्यंत ह्मणजे बारा वर्षें होता. या दुष्काळास हें नांव पडण्याचें कारण कळत नाहीं.

दुर्गाबाई– राघोबा दादा पेशव्याची व आनंदी बाईची कन्या. ही बारामती करांच्या घरीं दिली होती. आपल्या आईबापांनीं नारायण रावास मारिलें तें कृत्य हिला आवडलें नाहीं. म्हणून हिनें उभयतांची पराकाष्ठेची निर्भर्त्सना केली. अशी ही स्पष्टवक्ती होती. (वृद्ध मा॰)

दुर्दमन– युधिष्ठिर वंशीय कलियुगांतील राजा. सोमक राजाचा पुत्र. व वहीनराचा बाप. यानें ५४ वर्षें व दाहा महिने राज्य केलें. आणि त्या वेळेस एकंदर कलियुगाचीं वर्षें सुमारें १६५० झालीं होती.

**दुर्वासयात्रा**– अमृतरायानें केलेला मराठी भाषेंत कटिबंध. [आहे.

**दूतांगदनाटक**– हें एक हनुमान कविकृत आणि दुसरें सुभटकृत संस्कृत भाषेंत

**दूर्वराजा**– युधिष्ठिर वंशीय कलियुगांतील राजा. नृपंजय राजाचा पुत्र. व तिमीराजाचा बाप. यानें ५२ वर्षें ४ महिने व ४ दिवस राज्य केलें. व त्या वेळेस कलीचीं एकंदर वर्षें सुमारें १३४५ गेलीं होतीं. श्रावस्ती येथें जो दुसरा बुद्ध होऊन गेला त्या वेळेस हा राजा कौशांबींत राज्य करीत होता. (राजमा०) व (जैनग्रंथ.)

**देवका**– प्रसिद्ध वल्लभाचार्यांची नात. विठ्ठलनाथ यांची चौथी मुलगी.

**देवगड**– याचें जुनें नांव देवगिरि. हा किल्ला आहे. व अशोकराजानें हा युधिष्ठिर शकाच्या १७५० व्या वर्षी बांधिला. या वेळेस युधिष्ठिर वंशांतील निमिराजा कौशांबींत राज्य करूं लागला होता. मुसलमान राजे झाल्या पासून यास दौलताबाद असें नांव चालत आहे. याचे उत्तर अक्षांश सुमारें २०° व पूर्वरेखांश ७६° आहेत.

**देवगिरि**– देवगड तोच.

**देवताबावा**– साधु.

**देवतीर्थ**– मलयानंद स्वामींचे शिष्य. व हंद सरस्वती यांचे गुरु. (ह०-मा०)

**देवदत्त**– पाटना येथील वेरकुंभाचा शिष्य. (ग्या०को०).

**देवनाथ**– आरत्या, भूपाळ्या, इत्यादि कर्ता एक कवि.

**देवपुर**– कौशांबी नगरी जवळचें शहर.

**देवभूति**– शौंग अथवा संग राजांतील भागवत राजाचा पुत्र. हा संग राजांतील शेवटचा राजा होता. वसुदेव काण्व नांवाच्या याच्या प्रधानानें यास मारिलें व आपण राजा झाला. ही गोष्ट अशोक राजा गादीवर बसला व मग घडली. (राजमा०).

**देवमामलेदार**– यशवंत महादेव हा शब्द पहा.

**देवशर्मा**– अवंती नगरच्या सुमंत ब्राह्मणाचा बाप. यानें छत्तीस वर्षें पर्यंत देवीचें आराधन केलें असतांही ती यास प्रसन्न झाली नाहीं. तेव्हां असें सांगतात कीं, तिची प्रसन्नता यास विक्रमादित्यानें करून दिली. (नाथली०).

**देवानंद**– कांठेवाड प्रांतांतील मुळी या गांवचा राहणारा कवि. हा संवत् १९०४ मध्यें होता. व यानें गुजराथींत शिक्षा वगैरे कविता लिहिली. (का० गुज०).

**देवानांप्रियतिष्य**– सिंहलद्वीपाचा राजा. हा इसवी सना पूर्वी ३०७ वर्षें होता. असें ग्यारेट साहेब ह्मणतात. हा पहिल्यानें वैदिक धर्माचा होता. पुढें बौद्धधर्मी झाला. व अशोक राजा प्रमाणेंच यानें बौद्ध धर्म विस्तृत केला. (ग्यारे० कोश.)

**देवापंडा**– साधु. (नाभा० भक्त० ग्रं०) पहा.

**देविकानदी**– अयोध्ये जवळ असणाऱ्या शरयू नदीसच म्हणतात.

**देविदास**– संस्कृतांत राजनीति ग्रंथाचा कर्त्ता. हा काश्मीराकडे राहात असे.

२– गुजराथेंतील सोजंत्रा गांवचा राहणारा गांधर्व. हा संवत् १६१८ मध्यें होता. यानें गोकुळ, मथुरा, वृंदावन इत्यादि ठिकाणची कृष्णलीला गुजराथींत वर्णिली आहे. (काव्यदो० गुज०). [नाहीं.

३–व्यंकटेश स्तोत्राचा कर्त्ता. हा कोठला कोण व कधीं होता त्याचा ठिकाण लागत

**देविममता**– प्रसिद्ध साधु जो तुळशीदास त्याची बायको.

**देविमानसपूजा**– श्रीमच्छंकराचार्यकृत. यांतील संस्कृत श्लोक वेगवेगळ्या छंदाचे सुमारें ६० आहेत. त्यांतील एक मासला.

> रुचिर कुच तटीनां नास्य काले नटीनां॥ प्रति गृह मथ तत्र प्रत्यहं मा-
> दुरासन्॥ धिमिकिटि धिमि धिध्धि धिध्धि धिध्धि धिधिध्धि॥ क्षिगिकिटि
> धिगि थथ्थ थ्थय्य थय्येति शब्दाः॥

**देविवर्णन**–गुजराथी भाषेंत. शंभुनाथ कृत एक, सांकळेश्वर कृत एक, आणि भावदास कृत एक. [तुकारामजन्मला.

**देहू**– हा गांव पुण्या पासून नऊ कोसांवर इंद्रायणीच्या कांठीं आहे. येथें प्रख्यात

**देहेगांव**– सातार प्रांतांतील एक गांव. येथील पाटलानें रामदास स्वामींस न ओळखून शेतांतील हुर्डा खाल्ल्या बद्दल मारिलें. त्या बरून शिवाजी राजानें त्यास शिक्षा द्यावी म्हणून बोलाऊं पाठविलें असतां समर्थांस तें वर्तमान कळून त्यांनीं शिवाजीस सांगितलें राजा, पाटलाचा अपराध फारच मोठा आहे; या स्तव त्यास शिक्षा मोठीच केली पाहिजे. यास्तव आम्हीं सांगूं ती शिक्षा त्याला दे बरें! नंतर पाटलास समोर आणवून सांगितलें. शिवबा, यास एक पागोटें व एक बनात पांघरीव. आणि शेत यास इनाम करून दे, म्हणजे झालें. ही शिक्षा ऐकून सर्वांस आश्चर्य वाटलें, व शिवाजीनें निरुपाय होऊन शेत त्यास इनाम करून दिलें. तें त्याच्या वंशजांकडे अजून चालत आहे, म्हणून म्हणतात. (रामदा० चरि०).

**दैठण**– हा गांव घोडनदी (शिरूर तालुक्यांत) आहे. एकनाथ स्वामींचे शिष्य निंबराज बावा ते येथील राहणारे होत. हल्लीं पंढरपुरास यात्रेंत गोपाळकाल्याचा मान यांच्या वंशजांकडे आहे.

**दोनशें बावन्न वैष्णवांची कथा**– वल्लभ मतांच्या वैष्णवांचा ग्रंथ.

दोआब– भागीरथी आणि यमुना या दोन नद्यांमधील जो अंतर्वेदी नांवाचा प्रदेश तो.

दोरासमुद्र– द्वारसमुद्र शब्द पहा.

दौलतरावशिंदा– माहादजी शिंद्याचा पुतण्या, व बायजा बाईचा नवरा. यानें शके१७१६ पासून १७४९ पावेतों गादीचा उपभोग घेऊन पुढें मरण पावला. याच्या पाठीमागें बायजा बाईनें मुकुटरावास दत्तक घेऊन आपण राज्यकारभार चालविला.(हिं०इ०)

दौलताबाद– देवगडाचें चालू नांव.

द्युमत्सेन– मागध वंशीय शमराजाचा पुत्र. व सुमतीचा बाप. (राजमा०)

द्रविडदेश– मद्रासेपासून दक्षिणे पर्यंत लांबीचा प्रदेश तो.

द्रविडभाषा– द्रविड देशांत चालणारी भाषा. सांप्रत दक्षिणेकडे तामिळ, तेलंगी, कानडी, मलाई आणि तौल्व; येणें प्रमाणें ज्या पांच भाषा बोलतात त्या हिजपासून उत्पन्न झालेल्या होत. (प्यारे० इं० को०).

द्रौपदीवस्त्रहरणकटाव– अमृतरायकृत मराठीत.

द्रौपदी स्वयंवर वर्णन– गुजराथी भाषेंत शिवदासकृत.

द्वारकानगरी– आनर्त देशाची प्राचीन राजधानी. ही पश्चिम समुद्रा मध्यें गुजराथेंत आहे. हिचे उत्तर अक्षांश सुमारें २२ व पूर्वरे० ६९ आहेत. जैन ग्रंथांत ही सुराष्ट्र देशाची राजधानी म्हटली आहे.

द्वारकेश– नित्यकृत्य नामक ग्रंथाचा कर्ता. (काव्यदो०गु०).

द्वारकोभगत– हा मेवाडा ब्राह्मण अमदाबाद येथील राहणारा होय. हा संवत्१८०० मध्यें होता. व यानें चेलवणी वगैरे ग्रंथ गुजराथी भाषेंत केलेले आहेत. (का०गु०).

द्वारसमुद्र– कर्नाटकांत असणारें नंदीदुर्गाच्या पश्चिमेकडील वीस कोसांवरील शहर. व बल्लाळ राजांची राजधानी. याचे उत्तर अक्षांश सुमारें १३ व पूर्वरे० ७६ आहेत. प्राचीन नकाशांत याच्या उत्तरेस हरिहर लिहिलें आहे.

द्विरूपकोश– हा कोश संस्कृतांत आहे व तो महेश्वर भट्टानें केलेला आहे.

द्वैतमत– मध्वाचार्याचें मत तें. याच्या मतीं दृश्यभासात्मक वस्तुजात सर्व सत्यच आहे. म्हणजे पारमार्थिकच आहे. शंकराचार्यांनीं पारमार्थिक सत्ता ब्रह्मास मात्र मानिली आहे. भासमान पदार्थी त्यांच्या मतें प्रातिभासिक सत्ता व दृश्यपदार्थी व्यावहारिक सत्ता आहे. व्यावहारिक सत्ता म्हणजे व्यवहारा पुरतीच सत्यता असा अर्थ समजावा. "नेहनानास्तिकिंचन" "यदृष्टं तन्नष्टं" इत्यादि. श्रुत्याधारें "चक्षुर्वैसत्यं" ही श्रुति व्यावहारिक होय, असें आचार्यांनीं ठरविलेलें असून, म-

ध्याचार्यांच्या मतें ही श्रुति पारमार्थिक आहे. म्हणून हें मत आचार्यांच्या मताशींच केवळ उलट आहे इतकेंच नव्हें. तर व्यासादिकांच्याही मताशीं अगदी उलटच आहे.

**धनंजय**– तिसऱ्या बुद्धाचा बाप. (जैनग्रंथ.).

**धनंजय कवि**– हा काश्मीरा कडील राहणारा होता. संस्कृता मध्यें नाममाला कोश तो यानेंच केलेला आहे. कोणी त्यास धनंजय कोश असेंही म्हणतात.(बु. का. शो.)

**धनंजयकोश**– धनंजय कवीनें केलेला नाममाला कोश तो.

**धनंजयविजय**– कांचन कवीनें केलेलें धनंजयविजय (अर्जुनविजय) वर्णन.

**धनदास**– हा कवि कोठें होता व कधीं होता तें कळत नाहीं. मात्र यानें अर्जुनगीता लिहिली इतकेंच आढळतें. परंतु ती कोणत्या भाषेंत त्याचाही थांग नाहीं. (काव्य०).

**धननंद**– नऊ नंदांतील शेवटचा नंदराजा. हा पाटलीपुत्र (पाटना) येथें राज्य करीत होता. युधिष्ठिर शकाच्या १६९२ व्या वर्षी चाणक्यानें ज्यास मारिलें तो हाच होय; यानें एका नदींत खडक कोरून त्यांत आठ कोट रुपये गुप्त ठेविले होते. हेच रुपये पुढें दैवयोगानें अशोक राजास सांपडले. व त्यावर त्यानें बौद्ध धर्माचीं हजारों कामें केलीं. ग्यारेट साहेब आपल्या इंग्रजी कोशांत असें लिहितात कीं, हा नंद कालाशोक राजाच्या १० पुत्रांतील कनिष्ठ होता. परंतु महापद्म नांवाचा जो पहिला नंद त्याला कालाशोक असें नांव असलेलें आह्मांस कोठेंच अजून आढळून आलें नाहीं. दुसरें, नंदराजे काय ते सारे नऊ हें इतिहास प्रसिद्ध असतां कालाशोक व त्यास पुत्र दाहा मिळून अकरा नंद जे त्यांनीं दाखविले त्याला कांहींच प्रमाण दिसत नाहीं.म्हणून महापद्मनंद व त्याचे पुत्र आठ मिळून नंद नऊ हाच प्रसिद्ध इतिहास आम्हीं प्रधान धरिला आहे.(वृ. भा.) व (ग्या. को.)

**धनपति**– माधवकृत शंकरविजयाचा टीकाकार.

**धनाजाट**– भरतपूरच्या राजाचा भाट. हा कवि होता. (वृ. भा.)

**धनाजी जाधव**– शाहु राजाचा सेनापति. मोंगल याला अतिशय भीत असत. बाळाजी विश्वनाथ व आबाजी पंत पुरंदरे हे याजवळ दोघे कारकून होते. चंद्रसेन जाधव तो याचाच मुलगा होता. (हिंदु० छा० इति०).

**धनेश्वरचरित्र**– मध्य मुनीश्वर कृत मराठी भाषेंत. यांत चाकणे जवळच्या महादेवानें एका मुलास कोणी बळी देत असतां त्याचें रक्षण केल्याचें चरित्र आहे.(वृ. मा.)

**धनेश्वर दैवज्ञ**– भास्कराचार्यांच्या लीलावती ग्रंथावर लीलावती भूषण नामक टीकेचा कर्ता. (वृद्ध माहिती)

धन्वंतरि– विक्रमादित्य राजाच्या सभेंत जीं नऊ पंडितरत्नें त्यांतील हा एक कविरत्न हो-ता. हा महा विद्वान् व पद्महस्ती, असा नामांकित वैद्य असे. पंडित रत्ना विषयींअ-सें आढळतें:–

धन्वंतरिः क्षपणकामरसिंह शंकु वेताल भट्ट घट खर्पर कालिदासाः
ख्यातो वराह मिहिरो नृपतेः सभायां रत्नानिवै वररुचि र्नवविक्रमस्य

अर्थ:- १ धन्वंतरि २ क्षपणक ३ अमरसिंह ४ शंकु ५ वेतालभट्ट ६ घटखर्पर ७ का-लिदास ८ वराहमिहिर आणि ९ वररुचि येणें प्रमाणें विक्रम सभेंतील हे नऊ पंडित समजावेत.

धमिल्लुरास– हा रास वीर विजय नामक जतीनें केलेला आहे.

धरणीधरकाशिनाथ– वैयाकरण सर्वस्व नामक संस्कृत मधील ग्रंथाचा कर्ता. हा-कधीं होता व कोठें राहात असे. त्या विषयीं शोध लागला नाहीं. (बु॰ का॰ शो॰)

धर्म– जैन लोकांच्या चोवीस तीर्थकरांतील पंधरावा. (प्रव॰ शारो॰).

धर्मकीर्ति– हा एक मोठा बौद्धमती ग्रंथकार होऊन गेलेला आहे.

धर्मगुप्तमिश्र– अजून शोध लागला नाहीं. परंतु हा ब्राह्मण व कवि होता, इतकेंच ख-रें आहे. (बुल्ह॰ का॰ शो॰).

धर्मदास– विदग्धमुखमंडन नामक संस्कृत ग्रंथाचा कर्ता. यानें आपल्या ग्रंथांत बाण-भट्टा विषयीं असें लिहिलें आहे. श्लोक:- रुचिर स्वर वर्णपदा रसभाव वती जगन्मनो हरति ॥ तत्किं तरुणी ? नहि नहि वाणी बाणस्य मधुर शीलस्य॥ – अ-र्थ:- जिचा स्वर चांगला, वर्ण ह्मणजे रंग चांगला, पद चांगले, आणि जी रसिक असल्या मुळें जगताचें मन हरण करिते (इकडे) जिच्यांतील स्वर, वर्ण, पदें आ-णि रसिकता चांगली असल्या मुळें जी जगताचें मन हरण करिते ती कोणरे तरु-णी कीं काय? तर नाहीं नाहीं. बाण कवीची वाणी होय. या वरून हें पद्य द्व्यर्थी आहे हें उघड असून, हा कवि बाणभट्टाच्या मागून झाला होता असें स्पष्ट दिस-तें. (बाणनि॰).

धर्मराज– अमरसिंहानें अमर कोशांत जीं बुद्धाचीं नांवें आरंभीं लिहिलीं आहेत त्यां-तील एक. परंतु यां विषयीं आमच्या ऐकण्यांत एक चमत्कारिक गोष्ट आली आहे ती अशी:- भागवत प्रसिद्ध जो महा ज्ञाता ऋषभ देव, त्याला बौद्ध सर्वज्ञ असें-ह्मणतात. त्या ऋषभदेवाची बाह्य दीक्षा मात्र घेऊन वागणारा जो अर्हत राजा तो सुगत. नंतर बुद्धीला आत्मा मानणारा असा बुद्ध उत्पन्न झाला. त्या बुद्धाचे

धर्मराज, तथागत, समंतभद्र आणि भगवान् असे जे चार शिष्य त्यांतील हा पहिला शिष्य होय. पण हें असंभाव्य दिसतें. अमरामधील श्लोक तर असा आहे.

सर्वज्ञः सुगतो बुद्धो धर्मराजस्तथा गतः॥ समंत- भद्रो भगवान् मारजि- ल्लोक जिज्जिनः॥१॥

**धर्मराजाध्वरी**— हा तैलंग ब्राह्मण संथन कालेश्वराचा राहणारा, शालिवाहन शके १३०० मध्यें होता. वेदांत परिभाषा हा संस्कृत ग्रंथ यानें केलेला आहे. (वृन्दू मा०).

**धर्मसंप्रदायदीपक**— आनंद कवीनें संस्कृतांत केलेला धर्मशास्त्र विषयावर ग्रंथ.

**धर्मसंहिता**— रामानुजाचार्यांनीं केलेला ग्रंथ. यांत त्यांच्या संप्रदायिकांनीं कसें चालावें त्याचें सविस्तर कथन केलें आहे.

**धर्मसिंधु**— काशीनाथोपाध्याय कृत. धर्मशास्त्र विषयावरील ग्रंथ.

**धर्मसूत्र**— मागधराजा. सुव्रत राजाचा मुलगा, व शमराजाचा बाप- (राजसा०).

**धर्माख्यान**— मुक्तानंद कृत गुजराथींत.

**धर्माब्धि**— महेश्वरोपाध्याय कृत. धर्मशास्त्र विषयावरील ग्रंथ.

**धर्मामृत**— मुक्तानंद कृत ग्रंथ गुजराथी भाषेंत.

**धर्मोत्तमा विनिश्चयटीका**— तौत कविकृत ग्रंथ. यावर आनंद वर्धनाची व्याख्या आहे.

**धवलगिरि**— उत्तर किरात प्रदेशांतील हिमालयाचें शिखर.

**धातु तरंगिणी**— हर्षकविकृत संस्कृत व्याकरण विषयावर

**धातुदीपिका**— कवि कल्पद्रुम ग्रंथावरील दुर्गादास कृत टीका.

**धातुपर्याय**— हेमचंद्र जैनपंडित कृत संस्कृत धातूं वरील ग्रंथ.

**धातुपाठ**— बोपदेव पंडित कृत एक, व क्षीरस्वामिकृत एक. असे दोन ग्रंथ निरनिराळे [आहेत.

**धातुपाठप्रदीप**— मैत्रेय रक्षित कृत संस्कृत धातूं विषयीं ग्रंथ.

**धामग**— हा रुद्र ब्राह्मण सुंदरेश्वर नामक महादेवाचा भक्त होता. यास त्याचा साक्षात्कार असे. चंपकमार राजानें आपल्या स्त्रीच्या केंसास जो सुगंध आहे तो स्वाभाविक कीं कशाचा असें पुसलें असतां, सैतेकरास सांगतां न आलेलें उत्तर यानें सांगितलें. त्या वरून राजानें संतुष्ट होऊन लाविलेलें बक्षीस यास दिलें. (कविच०).

**धामणगांव**— बोधल्या बावाचा राहण्याचा गांव. हा देशावर आहे.

**धार**— धारानगरी.

**धारवाड**— कर्नाटकांत बेळगांवच्या दक्षिणेस हें शहर आहे. याचे उ. अ. सु. १५° व पू. [रे. ७५° आहेत.

**धारानगरी**— हें शहर माळव्यांत आहे. येथें शके ९०४ मध्यें भोजराजा राज्य करीत

होता. हल्लीं येथें पवार वंशांतील राजा आहे. हें शहर उ० अ० सु० २३ व पूर्व रेखांश ७६ यांवर आहे.

**धारूर**– हा गांव व किल्ला मोंगलाईंत निजामाच्या राज्यांत आहे. उद्धवचिद्घन म्हणून जो प्रख्यात साधु होऊन गेला, तो येथें राहात असे.

**धावककवि**– भास नामक कवीचें दुसरें नांव.

**धावडशी**– हा गांव सातान्याच्या उत्तरेस आहे. येथें भार्गवराम बावा यांचे एक नामांकित साधु होऊन गेले. थोरले बाजीराव यांचे जे परमहंस गुरु तेही येथेंच असत. परंतु ते भार्गवराम बावा यांच्या आधीं येथें होते कीं मागून तें कळत नाहीं. (इ॰गा॰)

**धीरजआख्यान**– निष्कुलानंदकृत गुजराथी भाषेंत.

**धीरधीर राजा**– माधवशिंगाच्या वंशांतील शेवटचा राजा नरहरसिंग यास धीरधीरानें मारिलें. व आपण दिल्ली येथें राज्य करूं लागला. या धीरधीरा सुद्धां विक्रमचंदा पर्यंत नऊ राजांचीं नांवें व त्यांच्या राज्यकारकीर्दीचीं वर्षें खालीं लिहिल्या प्रमाणें आहेत.

| नांवें. | वर्षें | महिने | दिवस. | नांवें | वर्षें. | महि. | दिव. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| धीरधीर राजा. | २३ | ७ | ० | राजा जीवन. | २२ | २ | २५ |
| राजासेन. | २२ | १० | ९ | उदाई शिंग. | २७ | ४ | २९ |
| राजा लालजी. | ३५ | २ | ८ | राजा कुलानंद. | २२ | ३ | ८ |
| राजा महाजी. | २० | ३ | ९ | राजा विक्रमचंद. | १३ | २ | ६ |
| हरिनाथ. | २८ | ५ | २५ | इत्यादि. | ० | ० | ० |
| | १२९ | ४ | २१ | | ८५ | १ | ८ |

एकंदर वर्षें २१४.. ५म० २९ दि०.

येणें प्रमाणें या राजांनीं शालिवाहन शकांत दिल्ली येथें राज्य केलें. या विषयीं दिल्लीचें राजघराणें यावर पडनाळा पहा.

**धीरशिवभट्ट**– हा एक गौतमन्याय पढलेला ब्राम्हण भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्यांच्या वेळेस होता. आचार्य दिग्विजय करीत फिरत असतां, त्यांशीं यांचा वाद होऊन त्यांत त्यांनीं यास जिंकलें. पुढें;– "अधीत्य गौतमीं विद्यां शार्गालिं योनिमाविशेत्॥" हें श्लोकार्द्ध म्हणून म्हटलें. ही गौतमन्याय विद्या पढून कोल्ह्याच्या योनीस प्राप्त होणें तुला योग्य नाहीं. त्यावरून तो उमजला. व अभिमान सोडून आचार्यांस शरण झाला. (आनं॰शंक॰प्रक॰४२)पहा.

**धीराभगत**– बडोदेशाहींत सांवळी गोठडा येथें संवत् १८०४ मध्यें हा भाट जातीचा पुरुष कवि होऊन गेला. याचीं गुजराथींत पदें वगैरे पुष्कळ कविता आहे. (काव्य॰गु॰)

**धुंडीराव बाजी**– यास नानासाहेब ह्मणतात. बाजीराव रघुनाथ याच्या दत्त पुत्रांतील हा वडील असें लोक सांगतात. हा सर्व प्रकारच्या गुणांनीं युक्त व मोठा शूर असून शिवाय स्पष्ट वक्ताही असल्या मुळें बाजीरावही यास वचके. इसवी १८५७ सालीं बंगालच्या शिपायांनीं बंड केलें, त्यांत त्यांनीं याचा धाकटा भाऊ रावसाहेब यास घेरिलें. आणि आमचा मुख्य हो, नाहीं तर तुला मारूं, अशी धमकी दिली. त्या मुळें निरुपाय होऊन तो त्यांत सांपडला गेला. पुढें इंग्लिशांनीं नानासाहेबास पत्र लिहिलें कीं, जर रावसाहेबांस तुह्मीं आमच्या स्वाधीन कराल, तर तुमच्या वडिलांची नेमणूक तुह्मांकडे पूर्ववत् चालवूं. या वर नानासाहेबानें उत्तर दिलेलें असें सांगतात कीं, तुमच्या मनांत आमची नेमणूक चालविणेंच असती तर आमचे वडील मरून सात वर्षें झालीं. इतक्या कालांत कां चालविली नाहीं? अस्तु. माझा भाऊ बंडखोर नाहीं. तें तुमच्या शिपायांनीं केलेलें असून त्यास त्यांनीं जबरदस्तीनें अडकविलें आहे. इतक्यावर तें त्यानेंच केलें असें म्हणाल तर तो व मी भिन्न नाहीं. असें समजून मलाही तसेंच म्हटलें तरी बेहेतर आहे. परंतु त्यास मी तुमच्या हवालीं करावें हें मला योग्य नाहीं. अशा प्रकारच्या शूर पुरुषाचा इतिहास ऐकण्यांत येतो. हा जर सत्य असेल तर बंडवाला नानासाहेब असें जे म्हणणारे ते लोक म्हणायास मात्र मनुष्य आहेत इतकेंच समजायाचें.

**धोंडोपंत गोखले**– बापु गोखले यांचे चुलते. हे पेशव्यांकडून कर्नाटकांत सर सुभेदार होते. धोंडी वाघानें यांस दग्यानें मारिलें. (हिंदु॰ खा॰ इति॰). [कील होता.

**धोंडोपंत पुरंदरे**– थोरल्या बाजीरावाचा दिल्ली येथें बादशाहाच्या दरबारीं हा पुरुष व-

**धोळका**– गुजराथ प्रांतांतील एक परगण्याचा गांव.

**ध्रुवचरित्र**– मराठी भाषेंत अमृतरायकृत एक व दुसरें चिंतामणि कविकृत दिंडी रूपानें एक. [दास कृत एक.

**ध्रुवाख्यान**– गुजराथी भाषेंत. तुळशीकृत एक. कालिदास कृत एक. आणि रघुनाथ-

**ध्रुवाद राजा**– वीरसेन वंशीय नववा राजा. याची कारकीर्द युधिष्ठिर शक सुमारें २१३४ या वर्षीं आरंभली होती. यानें ३५ वर्षें ४ महिने २४ दिवस राज्य केलें. भगवत् पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्य याच्या कारकीर्दीच्या सुमारें २४ व्या वर्षीं द्रविड देशांत चिदंबर येथें जन्मले होते. (हिंदु॰ हस्त॰ इति॰) व (जैन ग्रंथ॰).

**ध्वनिगाथापंजिका**– संस्कृत भाषेंत रत्नाकर कविकृत.

**ध्वनिशास्त्रटीका**– रत्नाकर कविकृत संस्कृत भाषेंत.

**ध्वन्यालोक**–– ध्वनिशास्त्रावर आनंदवर्द्धनकृत संस्कृत ग्रंथ.

**ध्वन्यालोकलोचन**— ध्वन्यालोका वरील अभिनवगुप्ताची संस्कृत टीका. या टीकेस सहृदयालोक असेंही दुसरें नांव आहे.

## न.

**नगर**— अहमदनगर शब्द पहा.

**नंजनगुडी**— म्हैसूर प्रांतांतील गांव.

**नंजननाटक**— नंजन देवा विषयीं लक्ष्मीनारायणाप्पा यानें रचलेलें नाटक.

**नडियाद**— ओरिसा प्रांतांतील एक परगण्याचा गांव.

**नंददास**— एक साधु. ( नाभा० भ० वि० ग्रं० ) पहा.

**नंदन**— मंख कवीनें केलेला ग्रंथ जो श्रीकंठचरित्र त्याची परीक्षा करण्यास काश्मीर येथें जमलेल्या तीस पंडितांतील एक. हा शांकरमतानुयायी ब्रह्मवादी होता. ( बुल्ह० काश्मीरा० शोध. )

**नंदनववा**— धननंद नांवाचा शेवटला नंद. हा चाणक्याच्या हातून युधिष्ठिर शकाच्या १६९२ व्या वर्षीं मारला गेला. ( राज० व जैनग्रंथ ).

**नंदबत्तिशी**— हा ग्रंथ गुजराथी भाषेंत सामळभट्टानें केला आहे. यांत विषय काय आहे तो आह्मांस समजला नाहीं.

**नंदराजयशोभूषण**— नंदराज वादियर नांवाच्या राजावर लक्ष्मीनारायणाप्पानें रचलेलें काव्य. याचे पांच अंक आहेत. हें यानें केलेलें काव्य संस्कृतभाषेंत आहे.

**नंदराजवादियर**— शालिवाहनांच्या आठव्या शतकांत म्हैसूर येथें होता राजा तो. (क०)

**नंदराजे**— हे राजे एकंदर नऊ होऊन गेले. यांत मूळ नंद राजा महापद्म नांवाचा होता व त्याला आठ पुत्र होते. यांत वडील पुत्राचें नांव सुमाल्य होतें. या नऊ नंदांनीं मिळून एकंदर राज्य १०० वर्षें केलें. नंदराजांची राज्य कारकीर्द कधीं संपली त्याविषयीं आह्मीं चाणक्य शब्दावर लिहिलें आहे. यास्तव तेथें पहावें. ( राजमा० ).

**नंदालअपय्या**— सालू तिमण्णा नामक राजपुत्र तोच.

**नंदीदुर्ग**— कर्नाटकांतील शहर. याचे उत्तर अक्षांश १३ व पूर्वरेखांश ७८ आहेत.

**नंदीवर्द्धन**— पांच प्रद्योत राजांतील शेवटचा राजा. यास याच्या शिशुनाग प्रधानानें मारिलें. व आपण राजा झाला. नंदीवर्द्धन हा राजक राजाचा पुत्र होता. ( राजमा० ).

२–शिशुनाग वंशांतील नववा राजा. अजेय राजाचा पुत्र. व महानंदी जो शेवटचा दहावा राजा त्याचा बाप. ( राजमा० ).

**नन्नयभट्ट**— हा कवि ब्राह्मण होता. शालिवाहन शकाच्या ९९९ व्या वर्षीं राजा नरेंद्र जो

राजमहेंद्री शहरचा राजा त्याच्या वेळेस हा होता. यानें प्रथमतः लहानपणीं वेदाध्ययन करून नंतर शास्त्राभ्यास केला. याज्ञिक क्रियेंत हा चांगला निष्णात असे. व याची धर्माचरणाकडे अत्यंत श्रद्धा असल्या मुळें यानें स्वतः सोमादिक यज्ञही केले होते. यानें एक तेलंगी भाषेचें व्याकरण केलें. व त्यास आंध्रकौमुदी असें नांव दिलें. असें म्हणतात कीं, या ग्रंथा वरून याचें प्रगल्भ ज्ञान व विद्वत्ता उत्कृष्ट दिसून येते. यानें नारायण भट्ट नामक एका तेलंग ब्राम्हणाच्या साह्यानें महा भारताच्या पहिल्या दोन पर्वांचें तेलंगींत जें भाषांतर केलें तें फारच उत्कृष्ट झालेलें आहे. पुढें यानें तिसऱ्या पर्वास आरंभ केला. इतक्यांत हा मरण पावल्या मुळें तें तसेंच राहिलेंलें मोठ्या प्रयासानें बालसरस्वतीनें कडेस लाविलें. (कवि०).

नमी– जैन लोकांच्या चोवीस तीर्थकरांतील एकविसावा. (प्र० शा०). [हे.

नरगुंद– हा गांव कर्नाटकांत आहे. येथें पूर्वी संस्थान होतें, तें हाली खालसा झालेंआ-

नरमाधवदास– हा मोठा भगवद्भक्त होऊन गेला. असें सांगतात कीं, प्रारब्धयोगानें यास अतिसाराचा रोग झाला असतां याचीं घाणेरीं पांघुरणें धुणें वगैरे सर्व खटपट देवानें केली. हा ज्ञातीचा ब्राह्मण होता. व आंवढ्या नागनाथ येथील राहणारा असे.. (वृद्धमा०) व (भक्तवि०)

नरवरराजा– (नाभा० भक्त०) पहा.

नरवाहन– (नाभा० भक्त०) पहा.

नरसभूपालेय– भट्टमूर्ति यानें केलेलें तेलंगी भाषेंतील काव्य.

नरसीमेहता– हा नागर ज्ञातीचा गुजराथी ब्राह्मण उत्तम भगवद्भक्त होता. शालिवाहनाच्या १६व्या शतकांत हा होता. व जुनागड येथें राहात असे. मुंज झाल्यावर याचीं आई बापें निवर्तलीं. भक्तविजयांत याचें वर्णन चार अध्यायानीं महीपतिबावांनीं वर्णिलें आहे. त्या वरून असें दिसतें कीं, हा मोठा शिवभक्त होता. महीपतिबावांनीं प्रथमाध्यायांत याचें जन्म कसें झालें तें लिहून यावर शिवाचा प्रसाद कसा झाला तें वर्णिलें आहे. दुसऱ्या अध्यायांत शंकरानें यास वृंदावनांत नेलें व तेथें कृष्णाची रासक्रीडा दाखविली. तिसऱ्यांत याचें लग्न वर्णिलें आहे, व तें भगवंतानें कसें साजरें केलें तो सर्व प्रकार दाखविला आहे. आणि चवथ्यांत हा आपल्या लेंकीच्या घरीं तिच्या गर्भाधान समारंभास गेला असतां, दुर्जनांनीं हा दरिद्री म्हणून याचा छळ केला. त्यांत जी कापडाची याद अहेराकरितां त्यांनीं केली ती प्रमाणें स्वतः श्रीकृष्णांनीं कापडाचें दिंड आणून तो समारंभ सांग केला.

व दुर्जनांस लाजविलें. हें लिहून यानें एका पांथस्थ ब्राह्मणास द्वारकेंत कृष्णावर सातशें रुपयांची हुंडी लिहून दिल्या प्रमाणें तेथें देवानें त्या पांथस्थास ते रुपये दिले याचें वर्णन केलें आहे.

यानें रासमंडळ म्हणून गुजराथी भाषेंत फारच सुरस ग्रंथ लिहिला आहे. त्यांत श्रीकृष्णाची रासक्रीडा वर्णिली आहे. (भक्तवि०).

**नरसीमेहत्याच्या मुलीचें लग्न–** याचें वर्णन निर्भयराम कवीनें गुजराथी भाषेंत कविता बद्ध केलें आहे.

**नरसीमेहत्याची हुंडी–** हें वर्णन गुजराथी भाषेंत कविता बद्ध प्रेमानंद कवीनें लिलें आहे.

**नरसिंहगुप्त–** लक्ष्मण गुप्ताचा बाप. (बुल्ह० शो०).

**नरसोजीबावा–** याचें वर्णन आढळलें नाहीं.

**नरसोबाचीवाडी–** नृसिंहवाडी नांवाचें हें एक क्षेत्र पंचगंगा व कृष्णा या दोन नद्यांच्या संगमांत आहे. श्रीपाद श्रीवल्लभ म्हणून जे सिद्ध पुरुष झाले, व ज्यांस लोक दत्तात्रेयाचा प्रथमावतार समजतात ते येथें झाले होते. या क्षेत्रास कुरुंदवाड फारच लगत आहे. नृसिंह सरस्वती जे गाणगापुरास होऊन गेले त्यांची समाधि येथें आहे.

**नरहरिनाथवंश–** वीरसेन वंशीय शेषटला राजा पृथ्वीपाळ त्यास यानें मारून दिल्ली येथें आपण राज्य करूं लागला. यांत नरहरिनाथा सुद्धां सोळा राजे झाले. त्यांचीं नांवें व राज्य कारकीर्दीचीं वर्षें खालीं लिहिल्या प्रमाणें आहेत.

एकंदर राज्यकारकीर्दीचीं ४०५ व. ४ म. १६ दिवस.

| राजांचीं नांवें. | वर्षें | महि० | दिव. | राजांचीं नांवें. | वर्षें | म० | दि० |
|---|---|---|---|---|---|---|---|
| नरहरिनाथ··· | १५ | १० | ८ | हरगोण | ३५ | ५ | १० |
| बिहारी गजर··· | २७ | ७ | १५ | नांव सांपडत नाहीं. | १७ | ० | ११ |
| हिमपाळ | २० | २ | १३ | नांव सांपडत नाहीं. | २३ | ५ | २७ |
| महाबकराजा | ३५ | ४ | १ | राजा अरुण पाळ. | १३ | ७ | २९ |
| अभीरपाळ | ३५ | ८ | ७ | राजा उदीत कलि. | ३५ | २ | २० |
| जयसाळ | २८ | ११ | १० | राजा नरबळ | २३ | ११ | २४ |
| माणिकचंद्र | २८ | ८ | १० | राजा भूपति | १० | ९ | २ |
| कामचंद्र | २९ | ७ | २१. | राजा विक्रम | २२ | ९ | १८ |
| | २२१ | ११ | २५ | | १८३ | ४ | २१ |

या प्रमाणें हे राजे इंद्रप्रस्थ (दिल्ली) येथें झाले. यांचा कारकीर्दीचा काळ पडताळून पाहणें

तो ( दिल्लीचें राजघराणें ) याचर लिहिलेल्या वर्णनांत पाहावा.

**नरहरिसोनार**– भक्तविजयाच्या विसाव्या अध्यायांत याचें चरित्र असें आहे. हा जातीचा लिंगाईत सोनार अगदीं एकनिष्ठ शिवभक्त होता. कारागिरीच्या कामांत हा चांगला प्रवीण असल्या मुळें पंढरी येथें राहात असे. परंतु विठोबाचें दर्शन घेणेंलांबच असो; पण देवळाचा कळस सुद्धां पाहायाचा नाहीं इतका याचा आग्रह होता. एकदां असें झालें कीं, कोणी श्रीमान् गृहस्थ पंढरीस आला. त्याच्या मनांत देवास सोन्याचा कडदोरा करायाचा होता. तें काम कोणता सोनार चांगलें करील म्हणून त्यानें तेथें चौकशी केली, तेव्हां लोकांनीं याचें नांव सांगून व्रतही याचें कसें आहे तें सांगितलें. तें ऐकून गृहस्थ गरजू असल्या मुळें याजकडेस आला. व यास त्यानें आपला मनोदय कळविला. त्या वरून यानें कंबरेचें मेज आणून द्या म्हणजे कडदोरा करून देतों म्हणून सांगितलें. पुढें मेज आणून दिलें व यानें त्या मेजा बरोबर कडदोरा तयार केला तो देवास लेऊन पाहतां बोटभर उणा येऊं लागला. यानें बोटभर पुनः वाढवून देतांच बोटभर लांब होऊं लागला. शेवटीं मी केलेलें काम कधींही अधिक किंवा उणें भरायाचें नाहीं, असें असतां असें कसें झालें? त्याचें यास आश्चर्य होऊन, हा डोळे बांधून देवळांत गेला व मूर्ति चांचपूं लागला तों याच्या हातास शिवलिंग लागलें. त्या वरून यानें डोळे सोडले. आणि पाहतो तर समोर विठ्ठल मूर्ति आहे. सारांश, यानें कडदोरा कंबरेस घालतांच बरोबर बसला. आणि तेव्हां पासून याच्या मनांत असणारी शिव विष्णू विषयींची भेदबुद्धि ती नाहींशी झाली. यानें केलेले कित्येक अभंग आहेत. ( भक्त॰ अ॰ २० ).

**नर्मदानदी**– ही गोंडवणांतील अमरकंटका पासून निघून पश्चिमसमुद्रास जाऊन मिळाली आहे. हिला रेवा असेंही दुसरें नांव आहे.

**नलचंपु**– त्रिविक्रम कविकृत.

**नलदमयंतीस्वयंवर**– नैषध काव्याच्या आधारानें हें आख्यान मराठी भाषेंत श्लोकबद्ध रघुनाथ पंडितानें केलेलें आहे.

**नलोदय काव्य**– याचा कर्ता कालिदास म्हणतात; परंतु हें काव्य त्याचें नव्हे म्हणतात.

**नलोपाख्यान**– प्रेमानंद कृत गुजराथी भाषेंत, व मयूर कविकृत मराठी भाषेंत.

**नवद्वीप**– कलकत्ता शहराचें पूर्वीं असलेलें दुसरें नांव.

**नवनाथ**– नाथसंप्रदायांत नवनाथ व चौऱ्यांशीं सिद्ध सांगितले आहेत त्यांतील नऊ नाथ ते;– प्रकाशनाथ, २ विमर्शनाथ, ३ आनंदनाथ, ४ ज्ञाननाथ, ५ सत्यानंदनाथ, ६ पूर्णा-

नंदनाथ, ७ स्वभावानंदनाथ, ८ प्रतिभावानंदनाथ, आणि ९ सुभगानंदनाथ (ना. ली.)

**नवनीत गणपति**– साहा प्रकारच्या गणपतींतील चौथा. (आनं० शंक० प्रक० १८) पहा:-

**नवरत्न**– वल्लभाचार्यकृत संस्कृत ग्रंथ.

**नवलक्षधनुर्धरस्वामि**– प्रतापरुद्र राजास दुसरें नांव. (कू. मा.)

**नवलक्षसाळ्या**– जोगापरमानंद तोच. याचें उपनांव साळी होतें असें म्हणतात. (ज्ञ-

**नवान्हिकी**– शब्दकौस्तुभ ग्रंथांतील हल्लीं उपलब्ध ग्रंथ आहे तो. हा भट्टोजी दीक्षितांच्या एक लक्ष ग्रंथा पैकीं नऊ हजार संख्येचा आहे.

**नवीन मतविचार**– हरिराम कविकृत वेदांत विषया वरील संस्कृत ग्रंथ. यांत अनादि जुन्या मताहून नव्यानिघालेल्या मताची परीक्षा करण्याचा विचार सांगितलाआहे असें ऐकण्यांत येतें.

**नहर**– महाबलेश्वर डोंगरावरील पेंठ. येथील हवा फार थंड व निरोगी आहे. कसाही रोगी असो, त्याची प्रकृति येथील अनेक प्रकारच्या वह्यांच्या सुवासानेंच अर्धी बरी होते. येथें उन्हाळ्यांत हजारों लोक जाऊन राहतात. याच्या पश्चिम बाजूस प्रतापगड असलेला या वरून दिसतो. प्रतापगडास जाणारे लोक महाडास जाण्याकरितां खालीं जो पारघाट उतरावा लागतो तोच उतरून तेथें जातात. नहरापासून सुमारें दीड कोसावर महाबलेश्वर नामक महादेवाचें स्थान असून तेथून कृष्णा नदी निघाली आहे. इंग्रजी अंमल झाल्यावर हवा खाण्या साठीं ही जागा मलकम साहेबानें वसविली. आणि ती वरून हिला मालकम पेंठ असें म्हणूं लागले. तें नांव हल्लीं कागदोपत्रींही चालू आहे.

**नाग**– मंख कवीच्या ग्रंथाचे परीक्षक जे तीस पंडित त्यांतील एक. हा मोठा वैयाकरण व अलंकार शास्त्रज्ञ होता. (बु० का० शो०)

**नागपुर**– वऱ्हाडांतील भोंसल्याचें मुख्य राजधानीचें शहर. हल्लीं येथील राज्य खालसा झालेलें आहे.

**नागराज**– शृंगार शतक ग्रंथाचा कर्त्ता. (बु० का० शो०). [चीआई.

**नागलंबिका**– लिंगाईत धर्माचा स्थापक जो बसवें त्याची दुसरी बहीण. चन्नबसवा-

**नागानंद नाटक**– श्रीहर्षकृत.

**नागेशभट्ट**– खालचा शब्द पहा.

**नागोजीभट्ट**– हा व्याकरण शास्त्रावरील प्रख्यात ग्रंथकार शालिवाहनाच्या १६ व्या शतकांत जन्मला. याचें वृत्त शेखर ग्रंथाच्या आरंभीं असें आहे. याच्या बापाचें नां-

व शिवभट्ट व आईचें नांव सती होतें. शृंगवेरपूर येथील रामराजा त्याच्या आश्रया-स हा होता. त्या विषयीं यानें श्लोक लिहिला आहे तो येणें प्रमाणें:—

पातंजल महाभाष्ये कृतभूरि परिश्रमः॥ शिवभट्ट सुतो धीमान् सती
देव्यास्तु गर्भजः॥ शृंगवेर पुराधीशा द्रामतो लब्ध जीविकः॥१॥ ७॥

नाऊ नामक विद्यालयांतील ग्रंथांत याचें आयांतर वृत्त येणें प्रमाणें लिहिलेलें आ-ढळतें. यानें लहानपणीं वेदाध्ययन करून मग यांडीक शिकला. आणि त्यावर निर्वा-ह करूं लागला. पुढें असें झालें कीं, त्यावर याचा निर्वाह नीट होईना. म्हणून हा कृष्णा-तीरीं वांईस आला. व तेथील विद्यालयांत पढूं लागला. तेथें यानें काव्यानें व इतर ग्रंथांचें अध्ययन केल्यावर हा काशीस गेला. त्या वेळेस याच्या वयास चाळिसावें वर्ष होतें. तरी यानें व्याकरण शास्त्राकडे अतिशय लक्ष देऊन भट्टोजी दीक्षितांचे सर्व ग्रंथ मन लाऊन अवलोकन केले. पुढें यानें मंत्रशास्त्राचा अभ्यास केला. व वयाच्या पंन्नासाव्या वर्षीं मार्कंडेय पुराणांतील सप्तशतीवर टीका लिहिली. या-प्रमाणें झाल्यावर, पतंजलीच्या महाभाष्यावर यानें पतंजलीसूत्रवृत्ति या नांवा-ची व्याख्या लिहिली. यानें व्याकरण व इतर शास्त्रें यांवर मोठाले ग्रंथ लिहिले, व ते सर्व हल्लीं उपलब्ध आहेत, त्यांचीं नांवें अशीं आहेत.

भाष्यप्रदीपोद्योत हा याचा पहिला ग्रंथ. कैयटाच्या टीकेसहित व्याकरण महाभाष्यावर टीकारूप आहे. याची ग्रंथ संख्या तीस हजार आहे. लघुशब्देंदु शेखर हा याचा दुसरा ग्रंथ कौमुदीवरील टीकारूपानें आहे व त्याची संख्या अ-ठरा हजार आहे. या ग्रंथांचा पूर्ण व्यासंग करणारांस व्याकरण शास्त्रांत पां-डित्य करण्याची शक्ति येऊन भाष्यामधील गूढ अभिप्राय चांगले समजूं ला-गतात. तिसरा ग्रंथ बृहच्छब्देंदुशेखर याची संख्या तीन हजार आहे. या म-ध्यें सिद्धांत व वादोपयोगी कोटिक्रम विशेष आहे. चौथा ग्रंथ प्रायश्चित्तें दुशेखर. हा धर्मशास्त्रावर आहे. व याची संख्या बेवीसशें आहे. पांचवा ग्रंथ परि-भाषेंदुशेखर. यांत व्याकरण शास्त्रोपयोगी परिभाषा असून त्याची संख्या पंध-राशें आहे. साहावा ग्रंथ लघुमंजूषा. हा व्याकरण शास्त्राच्या अर्थविचारा वि-षयीं आहे. व याची संख्या आठ हजार आहे. सातवा ग्रंथ बृहन्मंजूषा यांत वि-षय लघुमंजूषे प्रमाणेंच आहे. परंतु पांडित्य पुष्कळ असून याची संख्या पंच-वीस हजार आहे. आठवा ग्रंथ लघुशब्दरत्न हा मनोरमेवर व्याख्यारूप आहे. व याची संख्या बारा हजार आहे. नववा ग्रंथ बृहच्छब्दरत्न हाही मनोरमेवर-

च आहे; परंतु पांडित्य पुष्कळ असून ग्रंथसंख्या पंचवीस हजार आहे. दाहावा ग्रंथ आशौचनिर्णय. हा धर्मशास्त्र प्रकरणावर आठशें संख्येचा आहे. यांत मृताशौच म्हणजे सुतक आणि जननाशौच सुएर हे कसे धरावेत त्यांचा निर्णय आहे.

या प्रमाणें हा प्रख्यात कवि, उत्तरहिंदुस्थानांत जें शृंगवेरपुर आहे. तेथील राम राजाच्या आश्रयास होता. व त्या वेळेस वरील सर्व ग्रंथ यानें लिहिले. हा आपल्या वयाच्या बासष्टाव्या वर्षी श्रीकाशीक्षेत्रीं मरण पावला असें ह्मणतात. (क)

नाची— इलेश्वरोपाध्यायांची मधली मुलगी. हिचा नवरा ही लहान असतांच परलोकीं गेला. वयांत आल्यावर हिला चांगलें समजूं लागलें असतां वैधव्याचें दुःख वाटूं लागलें. व संसार सुखाची आणि संततीची समूळ आशा नाहींशी झाल्या मुळें, प्राणत्याग करण्याचा प्रथम हिनें निश्चय केला; परंतु आत्म हत्येंत दोष आहे असें हिनें बापाच्या तोंडून ऐकिलें होतें म्हणून, आपलें अवशिष्ट आयुष्य शास्त्राभ्यासांत घालवावें असें शेवटीं हिनें मनांत आणिलें; परंतु बुद्धि तीव्र होण्यास काय करावें, या विषयीं ती विचार करीत असतां, बापाच्या तोंडून हिनें एकदां सहजीं ज्योतिष्मती (मालकांगोणी) नांवाच्या कल्पाची गोष्ट ऐकिली. पुढें आपण काय करणार तें बापास कांहीं एक कळूं न देतां घरांत ज्योतिष्मतीचें तेल तयार होतें तें पोटभरस तवर तिनें प्राशन केलें. त्या मुळें थोडे तास लोटले नाहींत तों हिच्या अंगाचा इतका दाह झाला कीं, तो हिला न सोसून त्या योगानें ती अतिशय घाबरी झाली. पुढें आतां काय करावें हें शेवटीं तिला कांहीं सुचेनासें होऊन हिचा पित्तवायु अतिशय भडकला. व हिनें दारीं विहीर होती तींत उडी टाकिली.

या गोष्टीस बराच वेळ झाला व नाची घरांत कां कोठें दृष्टीस पडत नाहीं, म्हणून उपाध्यायांनीं घरांतील मनुष्यांस पुसलें. कारण ती तारुण्याच्या भरांत आली असल्यामुळें ते तिला फार जपत असत. व आपल्या दृष्टी वेगळी फारवेळ ठेवीत नसत. शेवटीं घरांतील माणसें तिला शोधून दमलीं, व त्यांनीं उपाध्यायांस ती घरांत कोठें नाहीं, म्हणून कळविलें. तेव्हां ते अतिशय घाबरले. व स्वतः उठून घराच्या आवारांत तिला चोहोंकडे हांका मारूं लागले. त्या हांका विहिरींत नाचीच्या कानीं पडल्या. व ती पाण्यांत असल्याच्या योगानें थोडी शुद्धीवर आली होती म्हणून तिनें त्यांस आंतून ओ दिली. त्यावरून ते विहिरीच्या कांठीं गेले. त्यांस पाहून तिनें झालेली गोष्ट सर्व कळविली. तेव्हां ते म्हणाले बरें तर, आणखी थोडा वेळ अशीच पाण्यांत राहा. मग तुला वरती काढूं. इतकें बोलून स्वस्थपणानें विद्यार्थ्यांस पाठ देत बसले. या गोष्टीस बराच वेळ

झाला. व तिच्या अंगाचा दाह अगदीं शांत झाला. असें तिच्या सांगण्या वरून आणून तिला त्यांनीं बाहेर काढिलें.

त्या दिवसा पासून नाचीची बुद्धि अत्यंत तीव्र झाली. व अल्पच काळांत शास्त्रांतील अनेक विषयांत ती इतकी पारंगत झाली कीं, त्यांवर ती व्याख्यानेंही देउं लागली. पुढें थोड्याच दिवसांनीं तिनें एक नाटक संस्कृत भाषेंत रचिलें. त्यांत तिनें आपलें जन्म झाल्या दिवसा पासून वैधव्य व विद्याभ्यास येथपर्यंत सविस्तर वर्णन-वीररस प्रधान फारच उत्कृष्ट लिहून बापास दाखविलें. तें त्यांस पसंत होऊन त्यांनींत्या नाटकास नाची नाटक असें नांव दिलें.

कांहीं दिवसांनीं हिच्या मनांत तीर्थयात्रा करण्या विषयीं येऊन तिनें बापास पुसलें, त्यावरून त्यानें तिची रवानगी केली. हिनें काशी मथुरा इत्यादि पवित्र स्थळींच्या सर्व यात्रा केल्या. त्यांत हिला कोठें कोठें पंडितां बरोबर भाषण करण्याचेही प्रसंग आले. व त्यांमध्यें हिला यशही आलें. ही दिल्ली, जयपूर, इत्यादि शहरांत ही गेली होती. तेथें हिच्या गुणावर हिला तेथील राजांनीं अनेक बक्षिसें दिलीं. तीं सर्व घेऊन ही परत बापाकडे आली. आणि आणिलेलीं बक्षिसें सर्व हिनें बापा पुढें ठेविलीं. तेणें करून त्यास अतिशय आनंद झाला. (कविचरि०)

**नाचीनाटक**— इलेश्वरोपाध्यायांची मधली मुलगी नाची तिनें रचलेलें आपल्या वृत्तांताचें नाटक.

**नाझरें**— प्राकृत भाषेचा कवि श्रीधर त्याच्या वडिलोपार्जित वतनाचा गांव. हा पंढरपुरा पासून सुमारें सोळा कोस आहे.

**नाड्यविद्यालय**— हें विद्यालय कोठें होतें तें कळत नाहीं. यांत नागोजी भट्टानें कांहीं [काळ अध्ययन केलें होतें.

**नाथद्वार**— हा गांव मेवाडांत आहे. वल्लभाचार्यांनीं गोवर्द्धन पर्वता वरील मूर्ति येथें च आणून स्थापिली.

**नाथलीलामृत**— मत्स्येंद्रनाथ, गोरक्षनाथ, इत्यादि नाथपंथी पुरुषांचें मराठी भाषेंत ओंवीबद्ध चरित्र. याचा कवि भैरवनाथ म्हणून कोणी ब्राह्मण नाथपंथी होता. हा ग्रंथ त्यानें नर्मदेच्या उत्तरतीरीं बिरप नांवाच्या क्षेत्रांत संवत् १७७० म्हणजे शके १६३५ मध्यें लिहिला. असें त्याच ग्रंथाच्या शेवटीं लिहिलें आहे. यांत भर्तृहरी, विक्रम, गोपीचंद्र इत्यादिकांचींही चरित्रें आहेत. याचे अध्याय एकंदर २९ आहेत. व ग्रंथ संख्या सुमारें चार हजार आहे.

**नाथवरद**— सद्बोधनामक ब्राह्मणाचा मुलगा. गोरक्षनाथाचा भाऊ. गोरक्षानें प्रा-

र्थना केल्या वरून मत्स्येंद्रनाथांच्या वरप्रदानानें हा झाला होता. गोरखपूरच्या गादीवर यासच पुढें गोरक्षनाथानें बसविलें होतें. (नाथली०).

नादिरशाहा– हिंदुस्थानांत शके १६६१ मध्यें स्वारी करून स्वदेशीं गेला. (हिंदु० छा० इति०)

नांदेड– हें शहर निजामाच्या मुलखांत गोदावरीच्या उत्तर तीरास आहे. याच्या पश्चिमेस सुमारें पंधरा कोसांवर पूर्णा नदी गोदावरीस मिळून त्यांचा संगम झाला आहे. शीख लोकांचा गुरु प्रख्यात गुरुगोविंद त्याची येथें समाधि आहे. (बुकूमा०).

नानक– हा शीख नांवाच्या एक्या नव्या धर्माचा उत्पादक पुरुष जातीचा क्षत्रिय होता. पंजाबांत बिया नदीच्या कांठीं रामपुर म्हणून गांव आहे तेथें याचें जन्म शालिवाहन शके १३९१ मध्यें झालें होतें. याजवळ द्रव्य पुष्कळ होतें. परंतु हा धर्माच्या कामांत अगदीं अज्ञाण होता असें दिसतें; कारण जर यास वैदिक धर्माचीं मूल तत्वें चांगलीं अवगत असतीं तर यानें हसन दर्वेष नामक एक्या फकिराचा उपदेश घेऊन मुसलमानी धर्म अंगीकारिला नसता. बरें तो धर्म स्वीकारल्यावर मग तरी त्यावर यानें विश्वास ठेविला काय? तर तेंही झालें नाहीं. शेवटीं हा दोहोंकडूनही भ्रष्ट झाल्या मुळें यानें तिसराच एक पंथ काढिला. व निरर्थक हिंदूंत दुफळी केली. सारांश धर्मांतर करणें तें मोठ्या विचारानें केलें पाहिजे. यानें जरी मुसलमानी धर्म स्वीकारिला होता तरी सुंता वगैरे संस्कार करून घेतला नव्हता असें म्हणतात.

यानें जो नवा धर्म काढिला तो नानकपंथ या नांवानें प्रसिद्ध आहे. यांतील लोक आपणांस शीख म्हणवितात. शीख हा शब्द शिष्य शब्दाचा अपभ्रंश आहे. आणि त्यावरून आणखीही एक असें दिसून येतें कीं, नानकास वंश मुळींच नसल्या मुळें शिष्यपरंपरेनें याची गादी व पंथ चालू झाला असावा.

याच्या पंथांत जातिभेद नाहीं. त्या मुळें यास पाहिजे त्या जातीचा शिष्य करितां येई. लेना व मर्दाना हे दोघे याचे मुख्य शिष्य होते; परंतु ते जातीचे कोण त्यांचा पत्ता नाहीं. असें सांगतात कीं, मर्दाना यास बरोबर घेऊन हा मक्केस गेला होता. व तेथें मुसलमानांनीं पालथी घातलेली विष्णूची मूर्ति यानें पुनः उभी केली. हा शके १४६१ मध्यें आपल्या वयाच्या सत्तराव्या वर्षीं मरण पावला. कविचरित्रांत असें लिहिलें आहे कीं, हा आपलें मत १३५५ त लोकांस सांगूं लागला. परंतु ही गोष्ट याच्या जन्मशका वरून पाहतां छत्तीस वर्षें अगोदर होण्याजोगें संभाव्य नाहीं. कबिराची आणि याची भेट मुळींच झाली नाहीं. त्या बद्दल आम्हीं कबीर शब्दावर लिहिलेंच आहे.

दोहरे, साक्या, व पदें इत्यादि रूपानें याची कविता पुष्कळ प्रसिद्ध आहे. त्यांतील एक पद मासल्या करितां खालीं लिहिलें आहे.

दान करो गरिबीसे बाबा ॥ मगरूरीसे धोका हैं ॥ ध्रु० ॥ चार खूटकी जागीर हमकूं तोटा नहिं कुच खानेकूं ॥ तुमकूं हुशार करना करकर घरघर फिरतें भिछाकूं ॥ १ ॥ तुमकूं हमकूं सब दुनियाकूं पालनवाला जूदा हैं तूं कहेगा मैं दाता हूं माल कहांसे लाया हैं ॥ २ ॥ चेतन सबसे ऊंचा बाबा खावे पीवे आरामसे ॥ शाल दुशाला जोरू लडके भुलना नहि गज बाजीसे ॥ ३ ॥ भुलजावेतो भिछा नमिले नहिं लंगोटी मिलने कीं ॥ जमदूतोंका सोटा सीरपर बात भली नहिं होने कीं ॥ ४ ॥ कहे नानक सुन मेरे भाई हुशार होना अछा हैं ॥ नहि माने तो खुषि है तेरी हमसे ची क्या परवा हे ॥ ५ ॥ दान करो गरिबीसे बाबा मगरूरीसे धोका हैं ॥

याच्या मागें याच्या गादीवर अगडशाहा हा बसला. त्या मागून क्रमानेंच अमेरदास रामदास, अर्जुनमल्ल, हरगोविंद, तेगीबाहादर, गुरु गोविंद आणि बंदागुरु येणें प्रमाणें गादी चालविणारे झाले. व शेवटीं रणजितशिंग हा त्या गादीवर बसला.

कित्येक लोकांच्या मतें नानकपंथ गोरखपंथांतून निघाला असें आहे. परंतु तें मत सर्वांशीं खोटें समजावें. कारण गोरखपंथी लोकांशीं नानकानें वाद करून गोरख मत खंडित केलें. आणि गोरखमता नांवाची एक जागा होती ती हिराऊन घेऊन तिचें नांव नानकमता ठेविलें असें माहितगार लोक म्हणतात. (कविच०).

नानकविलास– नानकानें केलेला ग्रंथ.

नानार्थरत्नमाला– हा ग्रंथ उरगप्पा दंडनाथ यानें केलेला आहे.

नानाफडणवीस– बाळाजी जनार्दन भानू याचें प्रतिष्ठा नांव. (बाळाजी जनार्दन) शा०प.

नानाभगत– हा जातीचा लेउवा कुणबी अमदाबाद येथें राहात असे. हा कवि होता परंतु कधीं होता त्याचा मात्र ठिकाण नाहीं. (काव्य० गु०).

नानासाहेब– पेशवे घराण्यांतील बाळाजी बाजीराव व धुंडीराव बाजी, या दोघांचें प्रतिष्ठा नांव.

नाभाजी– हा कवि जातीचा डोंब होता. याची हकीगत अशी आढळते कीं, हा आपल्या आई बापां पासून जन्मांध उपजला. व ज्या ठिकाणीं राहात असे तेथें दुष्काळ पडल्या मुळें यास त्यांनीं याच्या पांचव्या वर्षीं अरण्यांत सोडून दिलें. याच्या आईनें यास सोडते वेळीं म्हटलें, मुला येथें बसून खेळ मी आतां येतें. त्या वरून हा तेथें राहिला; परंतु तें अरण्य आहे असें यास कळलें नाहीं. पुढें यास बराच वेळ झा-

त्या मुळें भूक लागून हा आईस हांका मारूं लागला, आणि ती ओ देत नाहीं असें जाणून शेवटीं रडूं लागला.

इतक्यांत त्या वाटेनें अग्रदास आणि कील या नांवांचे दोन पुरुष महान् भगवद्भक्त चालले होते त्यांनीं यास पाहिलें. व हा कोणी अनाथ आहे असें जाणून दयेनें यास पुसलें, मुला, तूं येथें कां? यानें आई मला येथें खेळ म्हणून ठेऊन गेली, तीअजून आली नाहीं. असें सांगतांच त्यांस कळलें कीं, यास कोणी तरी सोडून दिलेलें आहे. मग ते ह्मणाले मुला, तुझ्या आई बापांनीं तुला सोडून दिलें आहे, असें आम्हांस वाटतें; कारण ज्या जाग्यावर तूं आहेस हें केवळ अरण्य आहे. असु. तर तूं आम्हां बरोबर चल. यानें म्हटलें महाराज, मला दिसत नाहीं, तेव्हां मी कसें यावें! त्या वरून हा जन्मांध आहे असें जाणून त्यांतील कीलानें कमंडलूंतील पाणी काढून कृपेनें याच्या नेत्रांस लाविलें. व तें लावतांच यास डोळे आले. मग हा त्यांज बरोबर त्यांच्या मठांत गेला.

पुढें थोड्याच दिवसांनीं हा जातीचा डोंब (महार) आहे, असें अग्रदास व कील या दोघांस कळल्या वरून त्यांनीं यास मठाच्या आवारांत एक झोंपडी बांधून दिली. आणि तेथें राहण्याची आज्ञा करून शिष्यांस सांगून ठेविलें कीं, यास प्रत्यहीं सांज सकाळीं पात्रांतील शेषान्न देत जावें. त्या प्रमाणें क्रम चालला असतां सिद्ध पुरुषांचा प्रसाद सेवीत गेल्यानें, सत्कथा श्रवणानें, व साधुसंतांस वंदन केल्यानें याची बुद्धि निर्मळ झाली.

कांहीं काळानें अग्रदासाच्या आज्ञे वरून यानें हिंदुस्थानी भाषेंत संतचरित्र लिहिलें. तें भक्तमाल अशा नांवानें प्रसिद्ध आहे. या भक्तमाले वरून असें दिसून येतें कीं, जेवढे म्हणून प्रतिमा पूजनें करून सगुण साक्षात्कारास पावले, तेवढेच कायते भक्त. इतर आत्मज्ञानी भक्त नव्हेत. व याच कारणा मुळें, निवृत्तिनाथ व मुकुंदराज[1] इत्यादिकांचीं नांवें याच्या भक्तमालेंत नाहींत. महीपति बावांनीं जो भक्तविजय ग्रंथ लिहिला तो याच्याच आधार धरून लिहिला असें ते म्हणतात. परंतु त्यांनीं आत्मज्ञानी वगळले नाहींत. नाभाजी हा कधीं होता त्या विषयीं इतकेंच आढळतें कीं, याची व तुळशीदासाची भेट शालिवाहनाच्या सत्राव्या शतकाच्या आरंभीं झाली होती ह्मणून आज यास होऊन गेल्यास सुमारें दोनशें वर्षें होत आलीं आहेत. (भ. मा.)

---

१. मुंबई इलाख्यांतील विद्याखात्याचे डायरेक्टर यांनीं थोड्या दिवसां मागें जी नवनीताची नवी आवृत्ति छापविली आहे तींत मुकुंदराज वगैरेंस गाळिलें आहे. त्याचें कारण हेंच आहे कीं काय तें नकळे; पण डायरेक्टर तर निराकाराचे उपासक आहेत असें असतां हें कसें झालें असेल तें असो!

**नामतीर्थ**– भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्य झाले. त्या वेळेस जे साहा प्रकारचे वैष्णव होते त्यांतील कर्महीन मताचा वैष्णव तो. (आ. शं. प्र. १०) पहा.

**नामदीपकुवरी**– भक्तमालिकेंतील स्त्री. (नाभा. भक्त.) पहा.

**नामदेव**– पंढरपूरचा राहणारा दामशेटी नांवाचा शिंपी, त्यास चंद्रभागेंत वाहात येऊन सांपडलेला मुलगा. याचें जन्म कबिरा प्रमाणेंच शिंपल्यांतून झाल्याचें लोक सांगतात. व कबीर जसा शुकाचा अवतार तसाच हा उद्धवाचा अवतार म्हणून म्हणतात. याचें जन्म शालिवाहन शकें १२०० मध्यें झालें होतें. याचा बाप दामशेटी, व त्याची बायको गोणाई. हीं उभयतां विठोबाचीं परम भक्त असत. त्याच वळणा प्रमाणें हाही मोठा भक्त निपजला.

दामशेटीचा नित्यनेम असा होता कीं, राउळांत जाऊन देवाची पूजा करावी. आणि देवास नैवेद्य समर्पण करून, तो घरीं घेऊन येऊन भोजन करावें. एकदां दामशेटी गांवास जाऊं लागला. व जातांना तो नामदेवास सांगून गेला कीं, रोज देवळांत जात जा. व देवाची पूजा करून नैवेद्य समर्पण झाल्यावर मग घरीं येऊन भोजन करीत जा. इतकें सांगून तो परगांवीं गेला असतां त्याच दिवशीं नामदेव नैवेद्य घेऊन देवाच्या पूजे करितां देवळांत गेला. आणि पूजा झाल्यावर त्यानें नैवेद्य देवापुढें ठेविला; परंतु तो देव खात नाहीं असें पाहून यानें हात जोडून देवास विनंति केली. आपण माझ्या बापानें आपणांस अर्पण केलेला नैवेद्य नित्य खातां असें असून आज मी आणलेल्या नैवेद्याचा अंगीकार होत नाहीं याचें कारण काय? तर असें न करितां नैवेद्य स्वीकारावा. मी लेंकरानें आणिला म्हणून अनादर करूं नये. तरी देव तो नैवेद्य ग्रहण करीत नाहीं, व कांहीं बोलत नाहीं असें पाहून, यास फारच वाईट वाटलें. मग हा देवास म्हणाला, पांडुरंगा, जर आपण नैवेद्य खाणार नाहीं तर मी येथेंच प्राणत्याग करीन. असें म्हणून देवापुढें मस्तक आपटणार तों विठ्ठलमूर्ति जेऊं लागली. त्यावरून यास आनंद झाला. व हा रिकामें ताट घेऊन घरीं आला.

हा घरीं येतांच आईनें पुसलें अरे ताट रिकामें कां! नैवेद्य काय झाला.? यानें देवानें खाल्ला म्हणून सांगतांच ती याच्यावर संतापून म्हणाली, मेल्या देव कसचा नैवेद्य खातो. तूंच खाऊन देवाचें नांव लटकें सांगतोस. पण बाळा असें करूं नये. घरधनी आज इतकीं वर्षें झालीं नैवेद्य नेतात, पण देवानें तो एक दिवस देखील खाल्ला नाहीं. नामदेव म्हणाला. आई, तूं उगीच रागाऊं नको. खोटें घालत

असेल तर मजबरोबर देवळांत चल, आणि प्रत्यक्ष पहा. त्या वरून हें पोर आहे, याच्या बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. असें समजून यास जेऊं घालून ती आपण जेवली.

असा क्रम आठ दाहा दिवस चालत असतां दामशेटी घरीं आला. येतांच त्या- नें बायकोस पुसलें, नाम्या देवाच्या पूजेस नित्य जात होता कीं नाहीं? तिनें जात होता म्हणून सांगितलें. पण मेला नैवेद्य काय करीत होता कोण जाणे. मी पुसलें असतां देवानें खाल्ला म्हणून मला बोलला. तें त्याचें बोलणें मी कांहींच मनावर घेतलें नाहीं.

बायकोनें सांगितलेली गोष्ट ऐकून दामशेटीस प्रथम आश्चर्य वाटलें; परंतु नाम्या लबाड बोलायाचा नाहीं, ही त्याची पक्की खात्री होती, म्हणून दुसऱ्या दिवशीं त्यानें देवळांत नैवेद्य घेऊन जाण्यास नामदेवासच सांगितलें. व आपण त्याच्या मा- गून गेला; कारण देव नैवेद्य कसा खातो हें त्याच्या मनांत पाहायाचें होतें. बापाच्या सांगितल्या प्रमाणें नामदेव देवळांत गेला. व पूजा करून नैवेद्य ग्रहण करा म्हणू- न देवास म्हणूं लागला; परंतु देव त्या दिवशीं नैवेद्य खाईना. तेव्हां नामदेव बोलला कां, नैवेद्य खायचा आहे कीं नाहीं? का पहिल्या दिवसा साररवें करूं? त्या वरून दे- वानें नैवेद्य भक्षण केला. व तो स्वतः दामशेटीनें पाहिला. सारांश नामदेव हा को- णी सामान्य पुरुष नव्हे, असें त्या दिवसा पासून दामशेटी समजूं लागला. व त्याचे योगानें त्यास व त्याच्या बायकोस कांहीं दिवसांनीं देवाची प्रत्यक्षता झाली.

एकदां नामदेव चंद्रभागेवर स्नानास गेला असतां त्याच्या मनांत कविता क- रावी असें येऊन त्यानें एकदम शतकोटी काव्याच्या संकल्पाचें उदक सोडिलें. तेव्हां देवानें यास म्हटलें तूं हा अघटित संकल्प आतां कोणत्या रीतीनें सिद्धीस नेणार? नामदेव बोलला संकल्प करून तर चुकलों आहें. आतां सिद्धीस नेणें तुजकडे आहे.

कांहीं दिवसांनीं नामदेवाचें लग्न झालें. व त्यास एका पाठीमागें एक, नारा- यण, महादेव, गोविंदा, आणि विठोबा असे चार पुत्र झाले. पुढें त्यांचींही लग्नें झा- लीं. त्याच लाडाई, गोडाई, येसाई, आणि साकराई अशा याच्या चौघी सुना, नाऊबाई बहीण, व निंबाई त्याची मुलगी होती. येणें प्रमाणें मनुष्यांची व्यवस्था पाहून देव नामदेवास बोलला. तूं व तुझी बायको राजाई, तुझा बाप व तुझी आई गोणाई, तुझे चौघे मुलगे व त्यांच्या चौघी बायका आणि तुझी बहीण व मुलगी मिळून एकंदर म- नुष्यें चौदा. या शिवाय थोडी बहुत तुझी कुणबीण जनी. या सर्वांनीं शतकोटि का- व्य कडेस लावावें. सर्वत्रांस स्फूर्ति देणें व अभंग लिहिणें तें मजकडे लागलें. या प्रमाणें आज्ञा होतांच सर्वांनीं काव्यरचनेस आरंभ केला.

नामदेव व त्याच्या घरचीं इतर मनुष्यें यांनीं जी कविता केली तिचें नांव अभंग असें पडलें. याच्या पूर्वीं अभंग हें पद्य मुळींच कोणास ठाऊक नव्हतें. म्हणून अभंग पद्याचा मूळ आचार्य नामदेवच ठरला पाहिजे. आतां अभंग हें पद्य पाहूं गेलें तर तें साडेतीन चरणी कित्येक ओव्यांचा एकत्र समुदाय म्हणण्यास चिंता नाहीं. म्हणण्याची चाल मात्र निराळी. मग यांतूनच दुसऱ्या तऱ्हा निघाल्या. त्या विषयींचें उदाहरण त्या खालच्या दोन ओंव्या पहा.

कृष्णा राहेंरे उगला ॥ नाहिंतर सांगेन त्या बागुला॥ घुसळणाशीं उशीर झाला ॥ रवी सोड गोविंदा ॥ १ ॥ पहिला बागूल बोलती ऐसा॥ नामजयास म्हणती मासा ॥ शंख वधोनी सहसा ॥ चारी वेद आणिले॥ २॥ इत्यादि ओंव्या अक्का॥

पुढें नामदेवानें या साडेतीन चरणांचीं दोन अर्धें करून व म्हणण्याची चाल बदलून ज्या कित्येक ओंव्या एकत्र केल्या व शेवटीं नांव घातलें त्याचें नांव अभंग झालें. तेंच खालीं पहा.—

कृष्णा राहेंरे उगला नाहिंतर सांगेन त्या बागुला॥ घुसळणाशीं उशीर झाला रवी सोड गोविंदा ॥ १ ॥ पहिला बागुल बोलती ऐसा नामजयास म्हणती मासा॥ शंख वधोनी सहसा चारी वेद आणिले ॥ २ ॥ इत्यादि

वरील अभंगांतील एकेका कडव्यांत छत्तीस पर्यंत सुमारें अक्षरें असल्या कारणानें याहून अभंगाचें कडवें नामदेवानें संक्षिप्त केलें व त्यास आधार ज्ञानेश्वरींतील साडेतीनचरणी ओंवीचा घेतला. ज्ञानेश्वरीच्या पहिल्या अध्यायांतील आरंभींची ओंवी, खालीं लिहिली आहे ती पहा.

ओं नमोजी आद्या ॥ वेदप्रतिपाद्या ॥ जयस्वसंवेद्या ॥ आत्मरूपा ॥ १ ॥

याचीं दोन अर्धें केल्यास या प्रमाणें एक अभंगाचें कडवें होतें.

ओंनमोजीआद्या वेदप्रतिपाद्या ॥ जयस्वसंवेद्या आत्मरूपा ॥ १ ॥

यास उदाहरण अन्य ग्रंथांतील आहे. तें येणें प्रमाणें.— अध्यात्मरामायण अयोध्याकांड अभंग १० वा.

राघव सद्गुणी बैसे राज्यासनीं॥ कैकेयी ऐकोनी सुखावली ॥ १ ॥ बोले मग तीशीं कायगे जल्पसी ॥ अन्यथा अपैसी मद्दा नष्टे ॥ २ ॥ श्रीरघुनंदन माझा प्राण पूर्ण॥ भय त्या पासून कदां नोहे ॥ ३ ॥ सुखस्थानीं कैसें भय सूचवीशी ॥ न बोलें वाणीशीं पुन्हा ऐसें ॥ ४ ॥ सकळां पैं प्रीय मज रघुराय ॥ द्वैत

नातें भय मुळीं तेथें॥५॥हंसदास म्हणे दासी लागीं तिनें॥ गौरविलें धनें प-
ग बहु॥६॥

वर जी ज्ञानेश्वरींतील ओंवी लिहिली आहे तींत पुढें नामदेवानें असें केलें कीं, पहिल्या दोन चरणांत क्रमानेंच- आद्या आणि प्रतिपाद्या, अशा असलेल्या यमकांतून, आद्या या ठिकाणीं दुसरीं अक्षरें आलीं तरी चिंता नाहीं. प्रतिपाद्या एवढें मात्र कायम ठेविलें. आणि तिसऱ्या चरणांतील- स्वसंवेद्या- हें ओंवींतील मूळ यमक त्याचा, तिसरा व चौथा चरण मिळवून अभंगांतील कडव्याचें दुसरें अर्ध करतांनां अनुप्रास केला आहे. या विषयीं खालीं लिहिलेला अभंग पहा.

माझे मनोरथ पूर्ण कीजे देवा॥ केशवा माधवा नारायणा॥१॥ नाहीं नाहीं
मज आणीक सोयरा॥ न करीं अव्हेरा पांडुरंगा॥२॥अनाथाचा नाथ हो-
शी तूं दयाळ॥ किती वेळोवेळ प्रार्थूं आतां॥३॥ नामा म्हणे जीव होतो का-
सावीस॥ केली तुझी आस आतां तरी॥४॥

आम्हीं वरती सांगितलेली गोष्ट, या अभंगा वरून वाचकांच्या स्पष्ट ध्यानांत येईल.ती अशी कीं, मनोरथ, आणि देवा, मज आणि सोयरा, नाथ आणि दयाळ, तसाच जीव आणि कासावीस, यांचें यमक साम्य नाहीं. मात्र पहिल्या अर्धांतील यमकाचा दुसऱ्या अर्धांतील अनुप्रासाशीं मेळ ठेवून नामदेवानें धडका काम चालविलें आहे. ज्ञानेश्वरीची ओंवी जी वर लिहिली आहे तींत तीन चरणांचीं नेमकीं साहा साहा अक्षरें असून चौथ्या चरणाचीं चार मिळून एकंदर अक्षरें बेवीस आहेत. याचीं दोन अर्द्धें करतांना पहिल्या अर्द्धाचीं अक्षरें बारा, व दुसऱ्याचीं दाहा होऊन अभंगाचें कडवें सिद्ध होतें. या आमच्या म्हणण्यास वर लिहिलेल्या नामदेवाच्या अभंगाशीं मेळ आहे कीं नाहीं तो पहा. सारांश अभंगाचीं कडवीं ओंवींतून मूळ निघालीं हें सांगण्यास जो आम्हीं येथें आरंभ केला होता त्याची सिद्धता झाली.

या पुढें नामदेवानें प्रत्येक कडव्याच्या अर्द्धांत अक्षरें आठ आठ किंवा क्वचित् एकाद्यांत नऊ अथवा दाहा याचींत अशी अभंगाची एक नवी तऱ्हा काढिली. तिचें उदाहरण हें खालीं लिहिलें आहे तें पहा.

हेंचि देवाशीं मागत॥ चरण सेवा अखंडित॥१॥ वास द्यावा पंढरीचा॥ स-
दा संग हरिदासांचा॥२॥ नामा म्हणे कमळापति॥ हेंचि द्यावें पुढती पुढ-
ती॥३॥ (२)

देह जावो अथवा राहो॥ पांडुरंगीं माझा भावो॥१॥ चरण न सोडीं सर्वथा

आण तुझी पंढरिनाथा॥२॥वदनीं तुझें मंगळ नाम॥ हृदयीं अखंडित प्रेम ॥३॥नामा म्हणे केशव राजा॥ केला पण चालविं माझा॥४॥

याच चालींत दुसरी तऱ्हा आहे ती येणें प्रमाणें:-

भाव बळें विष्णुदास॥ नाहीं नास पावत॥१॥योग भाग्यें घरा येती॥ सर्व शक्ति चालत॥२॥ पित्याचें जें काय धन॥ पुत्रा कोण वंचील॥३॥ तुका म्हणे कडे बैसों॥ तेणें असो निर्भय॥४॥

यांनीलच तिसरी तऱ्हा अशी कीं, कधीं कधीं पहिल्या अर्धाचीं अक्षरें साहा असायाचीं. उदाहरण–

नम्र झाला भूतां॥ तेणें कोंडिलें अनंता॥१॥ हेंचि शूरत्वाचें अंग॥हारीं आणिला श्रीरंग॥२॥ अवघा झाला पण॥ लवण सकळां कारण॥३॥तुका म्हणे पाणी॥पानळपणें नव्हा हाणी॥४॥

या प्रमाणें नामदेवानें काढिलेल्या अभंगांच्या प्रकारांचें प्रतीक घेऊन त्याच्या चौदा माणसांनीं व त्यानें मिळून एकंदर पंचाण्णव कोटि अभंग लिहिले. व बाकीचे पुढें तुकारामानें पुरे केले. अशी लोकांत प्रख्याति आहे.

नामदेवाच्या अभंगाचे प्रकार दोन आहेत. म्हणजे त्याचे कित्येक अभंग गुरूप्रसत्ती पूर्वींचे आहेत. व कित्येक गुरूपसत्ती नंतरचे आहेत. त्याचीं उदाहरणें क्रमानेंच खालीं दिलीं आहेत तीं पहा.

सर्व सुख आहे भीवरेचे तीरीं॥ आमुची पंढरी कामधेनु॥१॥ प्रेमामृत दुभे सदां संत जनां॥ वोसंडत पान्हा नित्य नवा॥२॥ धर्म अर्थ काम मोक्ष चारी स्तन॥ दोहोणार धन्य पुंडलीक॥३॥ भक्तीचें मेळवण भावाचेनि बळें॥ देखोनीयां बोळे अधिकाधिक॥४॥ जियेचें दुभतें नित्य नवें वाढे॥ पंढरी पहुडे पूर्वपुण्यें॥५॥ भाग्यवंत नामा तें क्षीर लाधला॥ प्रेमें वोसंडला गर्जे नामें.॥६॥

( २ )

माझें मज कळे माझें मज कळे॥माझें मज कळे प्रेम सुख॥१॥ न करिं तूझें ध्यान नव्हगे ब्रह्मज्ञान॥माझी आहे खूण वेगळीच॥२॥ न करीं तुझी स्तुति न वाखाणीं कीर्ति॥ धरिली ते युक्ति वेगळीच॥३॥ न करीं काया क्लेश इंद्रियां निरोधु॥ मज आहे बोधु वेगळाची॥४॥ नामा म्हणे नाम गाईन निर्विकल्प॥ येशी आपें आप गिवसीन॥५॥

येथें गुरूपसत्ती नंतरचे अभंग सांगण्या पूर्वीं, आधीं यास गुरूस शरण आण्यास नि-

मित्त काय झालें तें सांगणें अवश्यक आहे, यास्तव अगोदर तें सांगतों. मागें आह्मी गोरा कुंभाराचें चरित्र लिहितांना असें सांगितलें आहे कीं, गोरा कुंभारानें याच्या डोईवर थापटणें मारिलें असतां, सर्व संतां देखत हा झालेला याचा अपमान यास सहन झाला नाहीं. म्हणून हा रागा रागानें तेथून उठून गेला. त्या पुढील गोष्ट अशीकीं, हा तेथून निघाला तो नीट देवळांत आला. आणि मोठ्यानें गळा काढून देवा समोर रडत बसला. तेव्हां देव यास प्रत्यक्ष होऊन व याचा अभिप्राय जाणला असतांही बुध्या न जाणल्या सारखा दाखवून बोलला नाम्या, अरे रडतोस कां! झालें काय? तेव्हां नामा बोलला, आजपर्यंत आपली सेवा केली, तिचें फळही मला मिळालें, तें कोणतें पुसाल तर सर्व संत मंडळीनीं मला कच्चा ठरविलें. त्या अर्थीं आतां मी येतों. लोभ आहे तसाच मात्र असूं द्यावा. इतकें बोलून पुनः मोठ्यानें रडूं लागला. देवास या गोष्टीनें आश्चर्य होऊन त्यानें पुसलें. अरे तूं येतों म्हणून निरोप मागितलास त्यास तूं जाणार कोठें? नामदेव ह्मणाला मी जीव देणार! देव बोलला शाबास नाम्या. वाः !! अरे तूं इतका मूर्ख आहेस असें मला ठाऊक नव्हतें. अरे पहा, भाषण तर असलें करतोस. आणि कच्चा म्हटलें त्याचा खेद मानून रडत बसतोस तेव्हां तुला काय म्हणावें? परंतु मी तुला खरेंच सांगतों. संत म्हणाले तें खोटें नाहीं. तूं कच्चाच होस. यांत अगदीं संशय नाहीं. तुला वाटत असेल मी तुजबरोबर गोष्टी सांगतों, तसाच जेवतों. पण हें खरें नाहीं; कारण माझें खरें स्वरूप तें याहून अगदीं निराळें आहे. व तें श्री गुरूस शरण गेल्या शिवाय कळायाचेंही नाहीं. या प्रमाणें देवाचें निर्भीड भाषण ऐकून नामदेव वचकला, आणि शुद्धीवर येऊन म्हणाला. महाराज, आपण ह्मणतां त्या अर्थीं मी कच्चा असेन; परंतु आतां गुरु कोणता पाहूं? त्यास त्रैलोक्य गुरु जे आपण त्या आपणच मजवर कृपा करावी. देवानें सांगितलें तसें होणें अशक्य आहे. यास्तव तूं बारशीस जा, आणि तेथें विसोबा खेचर आहे, त्यास शरण हो. म्हणजे तुझें कार्य सिद्ध होईल.

तंतर देवाची आज्ञा घेऊन, नामदेव त्याच पावलीं घरीं न जातां निघाला तो बारशीस आला. गांवांत गेल्यावर त्यानें कोणा एकास विसोबा खेचर कोठें राहतात म्हणून पुसलें. त्यानें त्या महादेवाच्या देवळांत जा म्हणून सांगतांच हा तेथें गेला. व पाहूं लागला तों तो अगदीं म्हातारा असून लोळत पडला आहे. शिवाय त्याचे पाय महादेवाच्या पिंडीवरही पडले आहेत. हें पाहून नामदेवास शंका आली कीं, माझ्या सारख्यास हा असला गुरु. असु. दैव आपलें. देवानेंच पाठविलें, त्या अर्थीं आंत गेलें

पाहिजे. नंतर आंत जाऊन ह्मणाला, अहो महाराज, उठून नीट बसा. व पिंडीवर आपले पाय पडले आहेत ते आवरून घ्या. विसोबा ह्मणाला, बाबारे, मी म्हातारा असल्यामुळें मला शक्ति नाहीं; यास्तव तूंच ते उचलून एकीकडे ठेव. नामदेवानें तसें करतांच पाहतो तों पुनः त्याच्या पायां खालीं दुसरें शिवलिंग आहे. मग मालक्यान नामदेवानें पाय उचलले व ते तिसरीकडे ठेविले. तरी पुनः पायां खालीं तिसरें शिवलिंग आहेच. असें पाहून नामदेव विस्मित झाला. आणि देवानें ज्याकडे मला पाठविलें तोच हा योग्य पुरुष होय. असें पूर्णपणें समजून त्याच्या चरणांवर त्यानें मस्तक ठेविला.

विसोबा खेचर डोळे उघडून व यास नमस्कार करीत आहे असें पाहून म्हणाला अरे तूं कोण आहेस? व मला नमस्कार करितोस त्याचें कारण काय? नामदेव हात जोडून ह्मणाला महाराज, मला नामा म्हणतात व मी पंढरपुरचा राहणारा असून देवानें मला आपणांकडे पाठविलें आहे. विसोबा म्हणाला, बरें तर सेवा करीत जवळ राहा. म्हणजे ज्या उद्देशानें तुला देवानें मजकडे पाठविलें आहे, तो तुझा उद्देश सिद्धीस जाईल. त्या वरून नामदेव हर्ष पावून कित्येक महिने त्या जवळ सेवा करीत राहिला-असतां श्रवण, मनन, व निदिध्यास यांच्या योगानें पूर्ण ब्रह्मविद्या पावला.

याच प्रमाणें आणखी कांहीं महिने यानें तेथें राहून सेवा केल्यावर, विसोबा खेचरानें यास पूर्ण आशीर्वाद देऊन पंढरीस जाण्याची आज्ञा दिली. तेव्हां हा तेथून निघाला. व निघतांना यानें बहुतां प्रकारें गुरूचें स्तवन केलें. आणि मागील पायीं पंढरीचा मार्ग धरिला. पहिल्या मुक्कामास येऊन एका धर्मशाळेंत उतरल्यावर, यास याच्या ओळखीच्या एका मनुष्याची गांठ पडली. त्यानें यास ओळखून विचारिलें, कां नामशेट, इकडे कोणीकडे गेलां होतां? यानें उत्तर केलें बारशीस गुरुदर्शनार्थ गेलों होतों. तेव्हां तो म्हणाला अहो, देव तुमच्याशीं बोलतो, तुमच्या हातें जेवतो, व तुमच्यावरत्याची पूर्णकृपा, त्याच प्रमाणें तुमचाही त्याच्या चरणीं दृढभाव, असें असतां गुरुदर्शनास गेलों होतों म्हणतां, तेव्हां त्या त्रैलोक्य गुरूहून थोर असा तुह्मांस आणखीही कोणी गुरु आहे काय? मला वाटतें, तुमची पहिली निष्ठा अगदीं बदलली व आलीकडे तुम्हांस कांहीं तरी भ्रम झाला आहे. त्यावर नामदेव म्हणाला अहो ऐका:-

## अभंग.

पाषाणाचा देव बोलेचिना कधीं॥ हरी भव व्याधि केवी घडे॥१॥ दगडाची मूर्ति मानिला ईश्वर॥ परी तो साचार देव भिन्न॥२॥ दगडाचा देव इच्छा पुरवीत॥ तरी कां भंगत आघातानें॥३॥ पाषाण देवाची करिती जे भक्ति

सर्वस्वा मूकुनी मूदपणें॥४॥ प्रस्तराचा देव बोलत भक्तानें॥ सांगते ऐकते मूर्ख दोघे॥५॥ ऐशाचें महात्म्य जे का वर्णिताती॥ आणि म्हणविती तेणें भक्त॥६॥ परंतु ते जन पामर जाणावे॥ त्यांचे नायकावे बोल कांहीं॥७॥ धोंडा घडोनियां देव त्याचा केला॥ आदरें पूजिला वर्षे बहु॥८॥ नरी तो उतराई होय केव्हां काई॥ बरवें ह्रदयीं विचाराहें॥९॥ धोंडा पाण्यावीन नाहीं देव कोठें॥ होतां सान मोठें तीर्थ क्षेत्र॥१०॥ द्वादशीचे गांवीं जाहला उपदेश॥ देवावीन ओस स्थळ नाहीं॥११॥ तो देव नामया ह्रदयीं दाविला॥ खेचरानें केला उपकारु हा॥१२॥

या प्रमाणें नामदेवाचें भाषण ऐकून ओळखीच्या मनुष्यास विलक्षण चमत्कार वाटला. आणि तो पुनः यास म्हणाला. अहो, पण देवानें तुमच्या हातचा नैवेद्य खाल्ला वगैरे ज्या गोष्टी आह्मीं ऐकिल्या व तुमचाही त्या योगानें लौकीक वाटला त्या सर्व खोट्याच कीं काय? नामदेव ह्मणाला, बाबारे, त्या सर्व खोट्या नाहींत व खऱ्याही नाहींत. तो कांहीं एक भावनेचा विलक्षण प्रकार आहे. ऐकणारा म्हणाला हें तुमचें बोलणेंच मला उमजलें नाहीं; वास्तव खऱ्या कशा नाहींत व खोट्याही कशा नाहींत त्यांचें मनांत बिंबेल असें स्पष्टीकरण करा. नामदेव बोलला ऐका. कानांत कधीं कधीं घांट वाजते हें तुह्मांस कधीं अनुभवास आलें आहे काय? ऐकणारा ह्मणाला होय. बरें तर तो घंटानाद खरा कीं खोटा? खरा म्हणाल तर प्रत्यक्ष घांट वाजतां दिसत नाहीं. खोटा म्हणाल तर नाद ऐकूं येतो, म्हणून त्याच्या अनुभवाची प्रतीति संशयरहित आहे. वास्तव जसें हें तसेंच तें. इतकें ऐकून तो मनुष्य निरुत्तर झाला. व पाहांटेस आपल्या मार्गास लागला. इकडे नामदेव निघाला तो पंढरीस येऊन पोहोंचला.

दुसऱ्या दिवशीं नामदेव स्नान करून देवाच्या पूजे साठीं देवळांत गेला. परंतु त्याची भावना पूर्वीच्याहून आतां अगदीं निराळी होती. म्हणजे पूर्वी देवास जसा परिच्छिन्न बुद्धीनें पहात होता तसें या वेळेस याचें पाहणें नव्हतें. तर सर्वत्र अवघा एक देवच असें याचें पाहणें होतें. येथें शंका अशी होईल कीं, जर असेंच होतें तर देवळांत जाण्याचें कारण काय? तर असें आहे. "पूर्वी ज्याचें दास्य केलें, त्याचें स्वामित्व प्राप्त झालें, पुढें त्याचें महत्व रक्षिलें, तरी तें थोरपणचि" म्हणून या दास बोधांतील वचना प्रमाणें पाहतां नामदेवाचें करणें अनुचित असें म्हणतां येत नाहीं. नंतर नामदेवानें देवापुढें कीर्तन केलें त्यांत आरंभीं अभंग ह्मटला तो येणें प्रमाणें.

"नाचूं कीर्तनाचे रंगीं॥ ज्ञानदीप लाऊं जगीं॥१॥ सर्व सांडुनी माझाई॥ वा-
"चे विठ्ठल रखुमाबाई॥२॥ परेहून परतें घर॥ तेथें राहूं निरंतर॥३॥ सर्वा-
"नें जें अधिष्ठान॥ तेंचि माझें रूप पूर्ण॥४॥ अवघी सत्ता आली हाता॥ना-
"नामयाचा स्वेच्छरि दाता॥५॥

पुढें नामदेवानें कीर्तन केलें त्यांत इतका रंग भरला कीं, असा पूर्वीं याच्या कीर्तनांत कधींच भरला नव्हता. सारांश, याचें हें कीर्तन ऐकून, संत मंडळीस पराकाष्ठेचा आनंद झाला. व सर्वांनीं याची वाहवा केली. भक्तविजयाच्या चौथ्या अध्यायांत याच्या चमत्काराच्या वगैरे गोष्टी अनेक आहेत; परंतु त्या समग्र येथें आम्हांस घेतां येत नाहींत. तथापि ज्यांस त्या पाहण्याची इच्छा असेल त्यांनीं तो अध्याय पाहावा.

नामदेवाचे अभंग अगदीं साधे व प्रेमळ आहेत. याची समाधि पंढरपुर येथें देवाच्या महाद्वारा जवळ शके १२६८ मध्यें झाली. व त्या स्थळीं जी हल्लीं चढतांना पहिली पायरी लागते तिला नामदेवाची पायरी अशी प्रसिद्धीही आहे. वारकरी लोक देवाची पायरी नाम-होय, असा अर्थ करून तो लोकांस भक्तिपुरःसर सांगत असतात. या प्रमाणें गुरूप सत्ती नंतरचे अभंग आह्मीं येथें सांगून हें चरित्र पुरें केलें आहे.

**नाममाला**– धनंजय कवीनें केलेला संस्कृत कोश.

**नामसंग्रहमाला**– अपय्या दीक्षितांनीं केलेला संस्कृत कोश.

**नामसुधा**– भागवता पैकीं वामनकृत मराठी भाषेंत वर्णिलेलें नाममहात्म.

**नामापाठकी**– कान्हो पाठक यानें मराठी भाषेंत छंदोबद्ध केलेला ग्रंथ. याचे अध्याय एकशें वीस आहेत.

**नारदीयपंचरात्र**–नारद पंचरात्र नामक मूळ ग्रंथावर रामानुजाचार्यांनीं लिहिलेली संस्कृत व्याख्या.

**नारायण**– काण्व राजांतील एक. भूमिमित्राचा पुत्र. व सुशर्मा राजाचा बाप. (रा. मा.)

२– नामदेवाच्या चौघां मुलांतील एक. (क. च.)

३– तुकारामाच्या तिघां मुलांतील धाकटा. तुकाराम देवलोकास गेल्यावर याचें जन्म झालें होतें. तुकारामांच्या मुलां मध्यें हाच पुढें नामांकित होऊन योग्यतेस आला होता. ( तुका॰ गाथा॰).

**नारायणतीर्थ**– संस्कृत सांख्यचंद्रिका ग्रंथाचा कर्त्ता. (बुल्ह॰ शोध॰).

२– हंसराज स्वामि हा शब्द पहा.

**नारायणदास**– एक साधु. (ना. भ. ग्रंथ पहा).

**नारायणदीक्षित-** अपय्या दीक्षितांच्या बापाचें नांव.

**नारायणदीक्षितपाटणकर-** हे खेड रत्नागिरि येथील राहणारे शांडिल्य गोत्री कोंकणस्थ ब्राह्मण होते. हे स्वकर्म तत्पर व मोठे मैथीरु असत. यांची गणना साधु पुरुषांत आहे. असें सांगतात कीं, हे प्रथमतः सहकुटुंब कोंकणांतून देशांत आले. व गंगातीरीं पैठणास राहून यानीं तपश्चर्या केली. ती वरून यांजवर गुरुकृपा होऊन यांस सगुण साक्षात्कार झाला. पुढें औरंगाबादे जवळ सातारें म्हणून एक लहानसें खेडें आहे. तें एकांतास चांगलें वाटल्या वरून हे तेथें भिक्षावृत्ति करून अग्निसेवा करीत राहिले. व भिक्षेंत मिळालेल्या अन्नांत कोणत्याही यातीचा अतिथि असो, त्याचा अन्नदानानें संतोष करूं लागले. तेणें करून यांची कीर्ति हळु हळू चोहींकडे पसरली.

दीक्षितांच्या कुटुंबाचें नांव लक्ष्मीबाई होतें. व तीही पतीच्या मनोगतास अनुकूळ अशी वागणारी महान साध्वी होती. तिला दीक्षितां पासून वासुदेव दीक्षित व बाळकृष्ण दीक्षित असे दोन पुत्र झालेले तेंही योग्यतेनें पित्या प्रमाणेंच होते. या दोघांत पहिले ज्येष्ठ व दुसरे कनिष्ठ होते.

यांच्या चमत्काराच्या गोष्टी बऱ्याच आहेत. त्यांत एक अशी आहे कीं, एकदां दीक्षित कनिष्ठ चिरंजीवांस समागमें घेऊन द्वारकेस गेले असतां, तेथें त्याची मुंज झाली. त्या वेळेस साक्षात् श्रीकृष्णानें मुलास भिक्षा म्हणून आपल्या पूजेची सोन्याची झारी दिली. या शिवाय एकदां श्रीकृष्णमूर्ति पाळण्यांत निजलेली असतां उडून यांच्या हाता समीप आल्या वरून ती यांनीं ओंझव्यांत घेतली. त्या वरून द्वारकेंत यांचा मोठा लौकिक झाला. त्यावर यांनीं तेथें आणखी दोन लक्ष ब्राह्मणांस अन्नदानही केलें. मग तर हे फारच प्रसिद्धीस आले.

हल्लीं दीक्षितांचीं अन्नसत्रें व सदावर्तें काशी, काय गांव, व सातारें या तीन ठिकाणीं आहेत. तेथें कोणीही अन्न मागणारा केव्हांही येवो त्यास अन्न मिळतें. एकदां यांची काशी मधील अशी गोष्ट सांगतात कीं, कोणे एके वेळीं तिसरा प्रहरच्या सुमारास बरेच ब्राह्मण दीक्षितांकडे येऊन भोजन मागूं लागले. तेव्हां दीक्षित त्यांस बरें म्हणून व साहित्य सिद्ध करून पाहतात तों स्वयंपाक करण्यास कोणी मिळेना. तेव्हां आतां काय करावें म्हणून चिंता करीत आहेत तों, एक भव्य व वृद्ध स्त्री येऊन म्हणाली मी स्वयंपाक करितें. आपण स्वस्थ असावें. सारांश पुढें तिनें स्वयंपाक करून सर्व ब्राह्मणांस तृप्त केलें. व आपण परत गेली; परंतु स्वयंपाक करतांनां तिनें नाकांतील नथ

काढून एका कोनाड्यांत ठेविलेली तशीच विसरून तेथें राहिली. ती दीक्षितांस मुळीं-च ठाऊक नव्हती.

दुसऱ्या दिवशीं अन्नपूर्णेच्या देवळांतील पुजारी पाहतात तों देवीच्या ना-कांत नथ नाहीं. त्या वरून त्यांनीं पुष्कळ शोध केला. परंतु ठिकाण लागेना. शेवटीं त्यांस असा दृष्टांत झाला कीं, काल मी दीक्षितांच्या घरीं स्वयंपाकास गेलें होतें, ते-थे अमुक कोनाड्यांत मी नथ काढून ठेवलेली आहे. ती तुह्मीं तेथें जाऊन घेऊन यावी. त्या वरून पुजारी सकाळीं दीक्षितांच्या घरीं गेले. व दृष्टांता प्रमाणें कोना-ड्यांतील नथ दीक्षितांस पुसून घेऊन आले. तेव्हां दीक्षितांस कळलें कीं, काल स्व-यंपाकास आलेली वृद्ध स्त्री साक्षात् अन्नपूर्णा होती.

बाळाजी विश्वनाथ प्रथम कोंकणांतून देशावर आले. त्या वेळेस दीक्षितांचा लौ-कीक त्यांच्या कानीं गेला. व त्यांनीं यांची भेट व दर्शन घेऊन आशीर्वाद संपादिला. हल्लीं पेशव्यांकडून व इतर सरकारांकडून दीक्षितांच्या वंशाकडे त्यांनीं त्यांनीं दिले-ल्या सर्व जहागिरी चालू आहेत. दीक्षित हे काशी येथें कार्तिक शुद्ध १४ शके १६७० मध्यें कैलासवासी झाले.

दीक्षितांच्या वंशवृक्षाचा विस्तार आमच्याकडे त्यांच्या वंशजांकडून आला आहे. तो सवडी सारखा देण्याचें करूं.

**नारायणबावा**– साताऱ्याकडे होऊन गेलेले प्रख्यात सत्पुरुष. ज्ञानसागर, शांतिसागर इ-त्यादि यांनीं सात ग्रंथ केलेले आहेत. हे विष्णुबावा ब्रह्मचारी यांचे परम गुरु होते.

**नारायणभट्ट**– वेणीसंहार नामक संस्कृत नाटकाचा कर्त्ता.

२– नारायणभट्टी नामक संस्कृत ग्रंथाचा कर्त्ता.

३– प्रसिद्ध वल्लभाचार्य त्यांचा भिपणजा.

**नारायणभट्टी**– आश्वलायन सूत्राच्या ब्राह्मणांचा याज्ञीक विषयावरील ग्रंथ. हा नारा-यण भट्टानें केलेला संस्कृतांत आहे.

**नारायणभक्त**– साधु. ( नाभा. भ. ग्रंथ ) पहा.

**नारायणराव**– पंत प्रधानाच्या ( पेशव्यांच्या ) घराण्यांत हा एक पुरुष त्या अधिकाराव-र होऊन गेला. बाळाजी बाजीराव ऊर्फ नाना साहेब त्यांचा हा तिसरा मुलगा होता. विश्वासराव पानपतच्या लढाईंत मेल्या मुळें, त्याहून धाकटा त्याचा भाऊ म्हणजे या-चा मधला भाऊ थोरला माधवराव तो राज्याधिकारी झाला. परंतु तोही क्षयरोगानें लवकरच मरण पावल्या मुळें पेशवाईचा अधिकार यास मिळाला. या वेळेस शालि-

वाहन शकाचें १६९४ वें वर्ष होतें. व त्या वेळेस याचें वयही विशीच्या सुमारास होतें.हा आठ महिने गादीवर होता. पुढें यास याचा चुलता रघुनाथराव त्याच्या बायकोनें मारेकऱ्यांकडून ठार मारविलें. ही एवढी अघटित गोष्ट होण्यास नाना फडणीसाची पेशाची कारकसर पाहणें कारण झाली असें ह्मणतात. म्हणजे थोरल्या माधवरावाच्या कारकीर्दीत नागव्या तरवारींच्या तीनशें स्वारांचा पहारा प्रहरा प्रहरानें बदलणारा शनवार वाड्या भोंवता रात्रंदिवस असे. तो माधवराव मरतांच नाना फडणीसानें बंद केला.व त्यामुळें हा अनर्थ घडून आला. हा मरण पावला त्या वेळेस याची बायको गंगाबाई गरोदर होती. तिला जो पुढें पुत्र झाला त्याचें नांव सवाई माधवराव होतें. (हिं·छा·व ह·३०).

**नारायणाचार्य–** संकल्प सूर्योदय नामक नाटकाचा टीकाकार· (बुल्ह॰ शोध·)

**नासीक–** गोदावरीच्या कांठीं असणारें क्षेत्र. याच्या व पंचवटीच्या मधून गोदावरी वाहात आहे. याचें उत्तर अक्षांश सुमारें १९ व पू॰ रे॰ ७३ आहेत. यास जनस्थान असेंही ह्मणण्याची रूढी आहे.

**नास्तिक–** वेदोक्त परलोकादिकांस जो मानीत नाहीं तो. "अवैदिक प्रमाणानां सिद्धांतानां प्रदर्शकाः॥ चार्वाकाद्याः षड्विधास्ते ख्याता लोकेषु नास्तिकाः॥१॥"

**निःकिंचन–** साधु· (ना·भ·ग्रं·)पहा.

**निगडी–** रंगनाथ स्वामींच्या समाधीचें स्थळ. हें सातारा इलाख्यांत परळी पासून सुमारें [ कोसावर आहे.

**निगमसार–** मराठी भाषेंत वामनानें केलेला ओंवीबद्ध ग्रंथ. हा वेदांत प्रकरणीं आहे.

**निगमसावित्र–** महा सरस्वतीचा उपासक.(आनं॰ शंक॰प्रक॰२१)पहा. हा पहिल्या शंकराचार्यांच्या वेळेस होता.

**निजवार्ता–** वल्लभाचार्यांच्या मताचा ग्रंथ.

**निजानंदस्वामि–** प्रसिद्ध रंगनाथ स्वामीचे वडील जे गोपाळपंत त्यांचें सन्यास घेतल्या नंतरचें नांव. हे पूर्णानंद स्वामींचे शिष्य, शिवराम स्वामींचे गुरुबंधु. व रंगनाथ स्वामींचेच पुढें गुरूही झाले.

**निज़ामउल्मुलुक–** निज़ाम घराण्याचा मूळ पुरुष कमरुद्दीन तो. याचें जन्म शके १५९६ त झालें होतें. हा १६३५ मध्यें गादीवर बसला. व शके १६७० मध्यें बऱ्हाणपुर येथें बयाच्या १०४ व्या वर्षी मरण पावला. यास पुत्र साहा होते. (निज़ामाचें घराणें शा·पहा.)

**निज़ामहैदराबाद–** हें शहर दक्षिणेस तैलंगणांत आहे. येथें निज़ामाचे वंशज राज्याधिकारी आहेत. याचे उत्तर अक्षांश सुमारें १७ व पू· रे· ७८ आहेत. या लगत महिषी नांवाची नदी वाहते. तिला हल्लीं फार करून मुसी म्हणतात. प्राचीन नकाशा वरून या-

चें नांव महिषासुर नगर पूर्वी होतें असें दिसून येतें. यास लगत जो किल्ला आहे त्यास गोवळकोंडा असें म्हणतात.

**निजामाचें घराणें**– या घराण्याचा मूळ पुरुष मीर कमरुद्दीन म्हणजे चिनकिलिचखान हा होता. यास निजाम उल्मुलुख हा किताब पुढें मिळाला. कारण फिरूकशेर नांवाचा दिल्ली येथील बादशाहा त्याचा हा वजीर होता. याचें जन्म शके १५६६ मध्यें झालें होतें. हा हैदराबादेस येऊन राहिल्यावर थोरल्या बाजीराव साहेबांशीं कांहीं कारणानें याचें युद्ध झालें. त्यांत याचा पराभव झाल्या मुळें यानें त्याशीं शके १६६० मध्यें तह केला. निजाम उल्मुलुख बऱ्हाणपुर येथें शके १६७० मध्यें मरण पावला. व त्या वेळेस त्याचें वय १०४ वर्षांचें होतें. यास गाजी उद्दीन, नाशिर जंग, सलाबत जंग, निजाम अल्ली, महंमद शरीफ आणि मीर मोंगल असे साहा पुत्र होते. यांत पहिले दोघे एकाच बायकोचे असून बाकीचे चौघे निरनिराळ्या बायकांचे होते.

निजाम उल्मुलुख याच्या मागें त्याचा थोरला मुलगा गाजी उद्दीन दिल्लीस कांहीं मोठ्या अधिकारावर होता, म्हणून हैदराबाद येथें नाशीरजंग गादीचें काम चालवूं लागला. परंतु शके १६७६ मध्यें त्यास कडपा येथील नबाबानें ठार मारिल्या मुळें सलाबतजंगानें गादीवर बसावें तों निजाम उल्मुलुखाच्या मुलीचा मुलगा मुजफरजंग यानेंच गादी बळकाविली. त्या मुळें तो मारेकऱ्यांच्या हातून ठार मारला गेला. पुढें सलाबत जंग १६७४ मध्यें गादीवर बसला. त्याच सालीं गाजी उद्दीन दिल्लीहून हैदराबादेस येत असतां निजाम अल्लीच्या आईनें त्यास मेजवानीस बोलावून विषप्रयोगानें औरंगाबाद येथें ठार मारिलें. ही गोष्ट ऐकून सलाबतजंग निर्विघ्न राज्य करूं लागला. व निजाम अल्ली त्याचा कारभार पाहूं लागला.

पुढें निजाम अल्लीनें युक्तीनें सलाबत जंगास कैदेंत टाकून शके १६८४ मध्यें मारिलें. व आपण गादीचा उपभोग करूं लागला. ही गादी यास शके १६८५ मध्यें मिळाली. याच्या कारकीर्दीत शके १७१७ त खरड्याची लढाई झाली. तींत याचा पराभव झाला. हा राज्य करीत असतां मुनीर उल्मुलुख व चंदुलाल हे कारभार पहात असत. निजाम अल्लीस आठ मुलगे होते व तो आपल्या वयाच्या शंभराव्या वर्षी शके १७२५ मध्यें मरण पावला.

निजाम अल्ली मरण पावल्यावर त्याचा थोरला मुलगा शिकंदरजाहा तो गादीवर बसला. व पंचवीस वर्षें राज्य करून आपल्या वयाच्या ५९ व्या वर्षी शके सत्राशें एकावन्न मध्यें मरण पावला. पुढें त्याचा पुत्र नासीर उदवला तो राज्य करूं

लागला. तोही शके १७७९ त मरण पावला असतां त्याचा पुत्र अफझूल उदवला गादीचा अधिकारी झाला. हा बारा वर्षे गादीचा उपभोग घेऊन शके १७९१ मध्यें आपल्या वयाच्या ४३ व्या वर्षी मरण पावला. नंतर मीर मेबूब शके १७९१ मध्यें दोन वर्षांचा असतां गादीवर बसला. व तो हल्लीं विद्यमान असून सर. सालरजंग हे त्याच्या दिवाणगिरीचें काम पाहात आहेत. येणें प्रमाणें ही हकीगत शके १६५४ पासून १८०१ पर्यंत निजाम घराण्याची आहे. (हिंदु० छा० इनि०).

निजाम सरकारचा मूळ पहिला दिवाण अज़ीम उल उमराव, त्याच्या मागून मीर अलं, पुढें त्याचा जांवई मुनीरुल्‌मुलुख. मुनीरुल मुलुक हा नांवाचा मात्र दिवाण होता. परंतु सर्व कारभार चंदूलाल पाहात असे. चंदूलाल मेल्यावर सराजिन मुलुक दिवाण झाला. त्याच्या मागें समस्कूल उमराव दिवाण झाला. व त्याच्या मागें हल्लीं सर. सालर जंग आहेत. सालरजंग हे निजाम सरकारचे पिढीजाद अमीर होत. (हैद० ये० लै० मा०)

**नित्यकृत्य**– वल्लभाचार्यांच्या मताचा ग्रंथ. याचा कर्ता द्वारकेश कवि.

**निधिवास**– नगर जिल्ह्यांत नेवासें म्हणून जें गांव आहे त्याचें जुनें नांव. या नांवाचें कारण असें सांगतात कीं, कुबेरानें कोणे एके वेळीं येथें आपले द्रव्याचे निधि आणून ठेविले होते. व त्यावरून याचें हें नांव पडलें.

**निनावी राजवंश**– अहीर राजाच्या वंशांतील शेवटला म्हणजे आठवा राजा सूरचंद्र हा निपुत्रिक मरण पावल्या मुळें विक्रम संवताच्या आरंभीं इंद्रप्रस्थ (दिल्ली) येथें एक राजा झाला, त्या सुद्धां त्याच्या वंशाचीं नांवें व राज्यकारकीर्दींचीं वर्षें खालीं लिहिल्या प्रमाणें आहेत:–

रकम १०२ व. ७ म. १० दि.

| नांवें. | वर्षें. | महि. | दिव. | नांवें. | वर्षें | महि. | दिवस |
|---|---|---|---|---|---|---|---|
| निनावी राजा ... ... ... | २० | २ | १७ | भावती गोविंद ... ... | १ | ० | ० |
| सूरचंद्र ... ... ... | १४ | ९ | १४ | त्रिमल भावनी ... ... | ७ | ५ | १९ |
| भीमचंद्र ... ... ... | १६ | ३ | १ | पूर्णप्रेम ... ... ... | ७ | ७ | १९ |
| गोविंदचंद्र ... ... ... | २१ | ७ | १२ | राजा महानंद ... ... | १३ | ७ | १८ |
| | ७२ | १० | १४ | | २९ | ८ | २६ |

या प्रमाणें या वंशांतील राजांनीं एकशें दोन वर्षें, सात महिने १० दिवस राज्य केलें. याचा मेळ दिल्लीचें राजघराणें या शब्दावर पहा.

**निपटनिरंजन**– हा जातीचा गौडब्राह्मण दौलताबाद येथें राहात असे. हा कवि व भगवद्भक्त होता. हा मोठा स्पष्टवक्ता असे. याची कविता हिंदुस्थानी भाषेंत आहे. या-

स होऊन गेल्यास सुमारानें अडीचशें वर्षें झालीं आहेत. कविचरित्रांत याची व कबिराची भेट झाली होती, असें लिहिलें असून, त्यांत एक गोष्ट अशी लिहिली आहेकीं, एकदां कोणी वाण्याची बाई दळीत असतां जात्यांत गेलेल्या दाण्याचें पीठ होतांनां पाहून कबीर रडूं लागला. तेव्हां यानें त्यास कां रडतोस ? म्हणून पुसलें. त्यानें सांगितलें कीं, जात्यांतील दाणे जसे पीठ होऊन जात आहेत तसाच मी संसार चक्रांत सांपडल्या मुळें केव्हां तरी रगडला जाणार म्हणून रडत आहें. त्यावर यानें असें सांगितलें कीं, ज्या दाण्यांनीं खुंट्याचा आश्रय केला ते जसे पीठ होत नाहींत. तसाच जो सद्गुरूचा आश्रय करितो त्यासही भय होत नाहीं. परंतु ही गोष्ट दुसऱ्या कोणाची असली पाहिजे. कारण कबीर याच्या पूर्वीं पुष्कळ वर्षें होऊन गेला होता. याच्या कवितेचा मासला हा खालीं दिला आहे:–

जोग जुगुत कर देखे ॥ ध्यानकूं धर देखे ॥ करमकू कर देखे ॥ कुच भी भयो नहीं. ॥१॥ स्नान संध्या कर देखे ॥ देवपूजा कर देखे ॥ पवन शीस चढादेखे ॥ बालभी उखाडो नहीं ॥२॥ काशी रामेसर फिर देखें ॥ द्वारका जगन्नाथ देखे ॥ अजोध्या मथुरा देखे ॥ देव तो मिला नहीं ॥३॥ तनमो खाक चढाई जटा दाढी भी बढाई ॥ नींबकी पात खाई ॥ ज्यांर भी भयो नहीं ॥४॥ कहे निपट निरंजन लाल ॥ मिले जब सद्गुरु दयाल ॥ तब एक पलखमो उजाल सब खलक भर अलख दिखायो ॥५॥

( २ )

पवनका समाले तोल ॥ सूरजका करे हिंडोल ॥ पृथिवीका करे मोल ॥ ऐसो कोन नर हे ॥१॥ पथ्थरका काते सूत ॥ बांझको बढावे पूत ॥ घट अंदर बोले भूत ॥ वाको कोन परहे ॥२॥ ध्रुवकू चलावे राह ॥ बिजलीसें करे ब्याह सागरको नीर अठाव ॥ भरपूर भर रही हैं ॥३॥ कवन दिन कवनरात ॥ कौन वाकी तात मात ॥ निपटा तो कह्या ज्ञान ॥ ये बनावे सो तेरा गुरु हैं ॥४॥ ७

**निपाताव्ययोपसर्ग–** हा ग्रंथ व्याकरण विषयक क्षीरस्वामीकृत संस्कृतांत आहे.

**निंबराजबावा–** हा देशस्थ आश्वलायन ब्राह्मण एकनाथ स्वामींचा शिष्य दैठण येथील राहणारा असे. पंढरपुरास यात्रेच्या शेवटीं जो गोपाळकाला होतो तो यांनीं करावा, असा यांचा तेथें मान आहे. यांस कांहीं उत्पन्न असून यांचे वंशज हल्लीं दैठण येथें आहेत.

**निमखारमिश्री–** नैमिषारण्यास जैन लोकांच्या ग्रंथांत असलेलें नांव.

**निमानंद**— ह्या गुजराथी कवीचीं कृष्णवर्णनपर कित्येक पदें आहेत; परंतु हा कधीं व कोठें होता त्याचा थांग लागत नाहीं. (काव्य० गुज०).

**निमि**— युधिष्ठिर वंशीय कलियुगांतील राजा, दंडपाणि राजाचा पुत्र, व क्षेमकाचा बाप:- अशोक राजा युधिष्ठिर शके १७९१त मेला असतांही हा कौशांबींत राज्य करीत होताच. (राजमा०)

**निमिचक्र**— युधिष्ठिर वंशीय कलियुगांतील राजा. असीम कृष्णाचा मुलगा, व चित्ररथाचा बाप. याच्या कारकीर्दींत भागीरथीस मोठा पूर येऊन हस्तनापुर शहर वाहून गेलें असतां यानें आपली गादी कौशांबी येथें आणिली. व तेथें राज्य करूं लागला. यानें राज्य सुमारें शाहत्तर वर्षें केलें. व त्या वेळेस कलियुगाचीं एकंदर वर्षें सुमारें पांचशें ब्यायशीं झालीं होतीं. येथपर्यंत वैदिक धर्म सुरळीत चालला होता. पुढें याच्या पुत्राच्या कारकीर्दींत चार्वाक उत्पन्न झाला. व त्यानें नास्तिक मतांची प्रवृत्ति केली. (राजमा० व जैनग्रंथ०)

**निरंजन**— रामाचरणाच्या एका पंथाचें नांव.

**निरंजन स्वामि**— कन्हाड येथें राहणारे गणपति उपासक. समर्थ रामदास स्वामींचे शिष्य. (रामचरि०) [ बाप. (रा. मा.)

**निरमित्र**— जरासंध वंशीय कलियुगांतील राजा. अयुतायूचा पुत्र. व सुनक्षत्र राजाचा

**निरक्षदेश**— लंका नांवाचें द्वीप व नगर तें. येथें अक्षांश शून्य असल्यामुळें यास असें नांव आहे. हें शहर मध्यरेषेवर आहे. कित्येक अज्ञ लोक सिंहलद्वीप तीच लंका असें म्हणतात. परंतु सिंहलद्वीपांतील कोलंबो शहर, व स्वतः सिंहलद्वीप मध्यरेषेच्या उत्तरेस उ० अ० सु० ७ं यांवर आहे. म्हणून त्यास निरक्ष देश म्हणतां येत नाहीं. लंकेपासून उज्जयिनी शहर २२॥- ३० साडेबावीस अक्षांशावर म्हणजे पृथिवीच्या परिधीच्या १६व्या भागावर आहे, असें भास्कराचार्यांचें मत आहे. या विषयीं त्यांनीं सिद्धांत शिरोमणि ग्रंथांत येणें प्रमाणें लिहिलें आहे:—

"निरक्ष देशात्क्षिति षोडशांशे भवेदवंती गणितेन यस्मात् ॥ तदंतरं षो-
"डश संगुणं स्याद्भूमान मस्माद्बहु किं तदुक्तं ॥"१॥ अर्थ स्पष्टच आहे.

**निरालंब**— या नांवाचा कोणी शून्य वादी. हा पहिल्या शंकराचार्यांच्या वेळेस त्यांजवळ येऊन या प्रमाणें बोलला.

"मृगतृष्णांभसिस्नातः खपुष्प कृत शेखरः॥ एषवंध्या सुतो याति-
"शशशृंग धनुर्धरः॥१॥ तं दृष्ट्वा देव भावेन प्रणम्य शिरसा भृशम् ॥

"आगतोस्मि यतिश्रेष्ठ नवांकित महं द्रुतं"॥२॥

अर्थ– मृगजलांत स्नान करून आकाशांच्या पुष्पांचा तुरा धारण करणारा, व सशाच्या शिंगा-चें धनुष्य धारण करणारा हा वंध्यापुत्र येत आहे, त्यास मी देव समजून व वारंवार मस्त-कें करून नमस्कार करून हे यतिश्रेष्ठ आपणाकडे लवकर आलों आहें. शंकराचार्यांनीं याचें हें भाषण ऐकून त्याचें खंडन केलें आहे. (आनं॰ शंक॰ प्र॰ ३६).

**निरालंबोपनिषत्**– श्रीमच्छंकराचार्यकृत. यांत ब्रम्ह म्हणजे काय? इत्यादिक एकुणतीस प्रश्न व त्यांचीं उत्तरें आहेत. याच्यावर अमृतार्णव नांवाची मराठींत ओंवीबद्ध टीका सु-मारें तीन हजार कांहीं वरती आहे.

**निरीश्वर सांख्य**– हें कपिलाचार्यकृत आहे. "सांख्या निरीश्वराः केचित् केचिदीश्वर देवताः" या मतांत ईश्वर मानीत नाहींत. सांख्य म्हणजे काय? ये विषयींची व्याख्या आम्हीं त्या-शब्दावर दिली आहे. या मताचा कोणी वादी शंकराचार्यांच्या वेळेस होता. (आनं॰ शां-कर॰ प्रक॰ ४॰ पहा).

**निरोधलक्षण**– वल्लभाचार्यकृत संस्कृत ग्रंथ.

**निर्गुणध्यान**– समर्थ रामदास स्वामिकृत मराठींत ओंवीबद्ध स्फुट ग्रंथ.

**निर्णयकौस्तुभ**– विश्वेश्वर कविकृत संस्कृत भाषेंत.

**निर्भयराम**– पिटकन गांवचा राहणारा ज्ञातीचा चातुर्वेदी मोढ. गुजराथी ब्राह्मण. हा सं-वत् १९०८ मध्यें होता. यानें नरसी मेहत्याच्या मुलीचें लग्न गुजराथींत कविता बद्ध लिहिलें आहे. (काव्यदो॰ गु॰).

**निर्मल**– हा एक गांव वसई जवळ आहे. तेथें विद्याशंकर भारती नांवाचे शंकराचार्यांचीं समाधि आहे.

२–याच नांवाचा हा दुसरा गांव नांदेडाच्या किंचित् पूर्वेस गोदावरीच्या उत्तरतीरीं आ-हे. या स्थळीं आह्मी शके १७९१ मध्यें ब्रह्मसत्र केलें होतें.

**निलंबिका**– बसवाची बहीण जी पद्मावती तिची मुलगी.

**निंबादित्य**– साधु. (नाभा॰ भक्त॰ ग्रंथ पहा).

**निवृत्तिनाथ**– पुण्या पासून सुमारें आठ कोसांवर इंद्रायणीच्या कांठीं अळंदी म्हणून गां-व आहे तेथें याचें जन्म शालिवाहन शकाच्या ११९२ व्या वर्षी प्रमोद संवत्सरीं झालें. याच्या बापाचें नांव विठ्ठलपंत. व आईचें रखुमाबाई होतें. ज्ञानदेव, सोपान, आणि मुक्ताबाई हीं तिघेंजणें याचीं धाकटीं भावंडें होतीं. व हा ज्ञातीचा वाजसनी ब्राम्ह-ण होता.– या सुद्धां याच्या भावंडांची उत्पत्ति भक्तविजय ग्रंथाच्या आठव्याअध्या-

यांत महीपति बावांनीं येणें प्रमाणें लिहिली आहे:– पैठणा जवळ गोदावरीच्या तीरीं असणाऱ्या आपेगांवचा कुळकरणी गोविंदपंत नांवाचा कोणी गृहस्थ होता. त्याची बायको निराबाई होती. तिला त्या पासून एक पुत्र झाला. त्याचें नांव विठ्ठलपंत होतें. विठ्ठलपंताची मुंज झाल्यावर तो तीर्थ यात्रा करण्या साठीं निघाला. व कांहीं दिवसांनीं फिरत फिरत अळंदीस आला. तेथें शिधोपंत नांवाचा कोणी गृहस्थ-सुखवस्तु सहकुटुंब राहात असे. त्यास एक कन्या होती. व ती उपवर झाली होती म्हणून तो तिच्या लग्नाच्या विचारांत होता. त्यास व विठ्ठलपंतास एके दिवशींच असा दृष्टांत झाला कीं, यानें आपली मुलगी विठ्ठलपंतास द्यावी, व ती विठ्ठलपंतानें वरावी. त्या वरून शिधोपंताचें व विठ्ठलपंताचें बोलणें होऊन लग्न ठरलें. व शिधोपंतानें विठ्ठलपंताच्या आई बापांस आपेगांवाहून अळंदीस आणून आपली मुलगी विठ्ठलपंतास लग्न करून दिली. तिचें नांव सासू सासऱ्यांनीं रखुमाई असें ठेविलें.

शिधोपंतास एकुलती एकच ही मुलगी होती. म्हणून त्यानें गोविंदपंतास विनंति केली कीं, मला दुसरें कांहीं मूल नाहीं. या करितां आपण चिरंजिवांस थोडे दिवस येथें कृपा करून ठेवावें. त्या वरून गोविंदपंत बरें आहे म्हणून सहकुटुंब आपेगांवास निघून गेला. सुमारें चार पांच महिने या गोष्टीस झाल्यावर विठ्ठलपंत कुटुंबासहित आपेगांवास आला. व आई बापांस भेटून बापाचें वृत्तीचें काम संभाळून प्रपंच करूं लागला. या प्रमाणें थोडीं वर्षें झालीं तों असें जाहलें कीं;– गोविंदपंत व निराबाई हीं उभयतां कैलासवासी झालीं. तेणें करून विठ्ठलपंत उदास झाला. व त्यानें कुळकरण्याचें काम भाऊबंदांच्या गळ्यांत घालून कुटुंबास घेऊन अळंदीस येणें केलें. विठ्ठलपंत अळंदीस आल्यावर तेथें बरेच दिवस सुखानें राहिला. कारण त्याचा सासरा शिधोपंत घरचा खाऊन पिऊन सुखी होता; परंतु थोड्या दिवसांनीं तोही वारला. त्या मुळें त्यास पुनः उदासी भास झाली. व अळंदी येथें त्यास करमेनासें झालें. तथापि तसेच दिवस लोटीत असतां एकदां त्यानें बायकोस-सन्यास घेण्याची आज्ञा मागितली. परंतु ती तिनें दिली नाहीं. कारण अजून तिला या पासून मूल झालें नव्हतें. या प्रमाणें कांहीं दिवस लोटल्यावर विठ्ठलपंतानें तिला एकदां काव्यानें मोघम असें पुसलें कीं, मी गंगास्नानास जातों. त्यावर तिनें सहज बरें आहे म्हटलें. तेवढ्या वचनावर तो तेथून निघून काशीस गेला. व रामानंद स्वामीं पासून सन्यास दीक्षा घेऊन वेदांताचें श्रवण मनन करीत सुखानें कालक्रमण करीत राहिला.

इकडे आपला पति स्नानास गेला तो गेलाच असें पाहून रखुमाबाईस अनिवार दुःख झालें; परंतु उपाय नाहीं असें जाणून तिनें पिंपळाची सेवा धरिली. या गोष्टीस सुमारें बारा वर्षें होत आलीं. तों असें घडून आलें कीं, रामानंद स्वामि आपल्या सर्व शिष्यांसहवर्तमान दक्षिणेकडील यात्रा करण्यास निघालेले अळंदी येथें मुक्कामास उतरले. त्यां बरोबर संन्यास घेतलेला विठ्ठलपंतही होता. त्यास पिंपळाची सेवा करतांनां रखमाबाईनें सहजीं पाहिलें. नंतर त्यास पुरें ओळखल्यावर ती, रामानंदस्वामींच्या दर्शनास जाऊन व त्यांस नमस्कार करून म्हणाली. महाराज, विठ्ठलपंताकडे बोट करून मी यांची प्रत्यक्ष स्त्री असतां आपण यांस सन्यास दिलात हें कसें? असें ऐकतांच स्वामींनीं विठ्ठलपंताकडे पाहिलें. त्या बरोबर तो मान खालीं घालून मुकाट्यानें राहिला. असें पाहतांच स्वामी समजले कीं, ही बायको याचीच खरी होय.

नंतर स्वामींनीं विठ्ठलपंतास आज्ञा केली कीं, तुला बायको असून तूं ती नाहीं म्हणून आह्मांस सांगितलेंस. बरें तें असो, तिला तुजपासून संततिही झाली नाहीं. तर आतां आमच्या आज्ञेनें तुला येथें राहणें प्राप्त आहे. तों पर्यंत आह्मी दक्षिण यात्रेहून जाऊन येतो. व जातांनां पुनः तुला बरोबर घेऊन जाऊं. या प्रमाणें सांगून स्वामि गेले असतां विठ्ठलपंता पासून रखमा बाईस दोन दोन वर्षांच्या अतरानें एकामागून एक अशीं चार मुलें झालीं. त्यांत निवृत्ति, ज्ञानेश्वर, सोपान हे तिघे मुलगे होते. व मुक्ता बाई ही एक मुलगी होती. मुक्ताबाई झाली इतक्यांत रामानंद स्वामी यात्रा करून परत आले. व ते विठ्ठलपंतास समागमें घेऊन परत काशीस गेले.

पुढें मुलगे मोठाले झाले असें पाहून, रखमाबाईनें अळंदींतील ब्रह्मवृंदांची प्रार्थना केली कीं, या मुलांच्या मुंजी आपण कराव्या. तेव्हां ब्राह्मणांनीं सांगितलें हीं मुलें सन्यास्यापासून झालेलीं असल्या मुळें यांच्या मुंजी आह्मास आमच्या मनानें करतां येत नाहींत. या स्तव तूं पैठणास जा, आणि तेथील ब्राह्मणांचें यांच्या मुंजी करण्या विषयीं आह्मांस पत्र आण. म्हणजे आम्ही मुंजी करूं. त्या वरून रखमा बाई मुलांस घेऊन पैठणास गेली. व सर्व ब्रह्म वृंदांस तिनें मोठ्या नम्रतेनें मुलांच्या मुंजी विषयीं प्रार्थना केली. परंतु ब्राह्मणांनीं सांगितलें बाई, यांच्या मुंजीस कांहीं शास्त्राधार नाहीं, त्या मुळें आमचा निरुपाय आहे. या प्रमाणें सभ्य सभ्य ब्राह्मणांनीं उत्तर सांगून ते सर्व आप आपल्या घरीं गेले असतां जेहलकट स्वभावाचे ब्राह्मण तेथें अवशिष्ट राहिले होते त्यांनीं मुलांचीं नांवें रखु-

मा बाईस पुसून घेतली. व त्यावर अनेक प्रकारच्या टीका केल्या. शेवटीं एक परवाल वाला आपली परवाल हल्याच्या पाठीवर घालून नदीवर चालला होता. त्यास त्यांनीं आलीकडे बोलावून घेऊन मुलांस पुसलें, गड्ये हो, या रेड्याकडून जर तुम्ही वेद बोलवाल तर तुमच्या मुंजी आह्मीं करूं. त्या वरून असें सांगतात कीं, ज्ञानेश्वर पुढें झाला; व त्यानें रेड्यामुखें वेद बोलविला.

ही गोष्ट पुष्कळांच्या प्रचीतीस आल्या वरून, यांच्या मुंजी करण्यास ब्राह्मण तयार झाले. परंतु निवृत्तीनें सांगितलें. आतां आह्मांस कर्मबंधन नको. आपण मुंजी करतों म्हणाला एवढ्यानेंच आह्मी कृतार्थ झालों. असें ह्मणून परवालवाल्यास रेड्याची किंमत देऊन तो त्या पासून त्यांनीं विकत घेतला. व अळंदीस येण्यास परत निघाले. वाटेंत अळें नामक गांवीं रेडा मरण पावल्या वरून त्यास त्यांनीं तेथें समाधि दिली. व निवृत्ति हा सर्व भावंडें व आई या सर्वांसह वर्तमान अळंदीस आला.

पुढें निवृत्तीनें नाथसंप्रदायी कोणी गैनीनाथ नांवाचे सिद्ध पुरुष होते त्यांस निमित्तमात्र गुरु करून अध्यात्मविद्या संपादिली. व ती सर्व भावंडांस उपदेशिली. ह्मणून ज्ञानेश्वर इत्यादिकांचा हाच वडील भाऊ असून गुरूही होता. ज्ञानेश्वरानें तर अनुभवामृताच्या प्रकरणांत असें म्हटलें आहे:—

"परी गा श्रीनिवृत्ति राया॥ हातातळीं सुखविलें तुया॥ तें निर्वाणची
"मियां॥ कां न भोगावें?॥" १॥

यानें केलेल्या अभंगांतील एक दोन येथें दाखवितों:—

"नेणों पैं द्वैत अवघेंची अद्वैत॥ एकरूप मात करूं आह्मीं॥ १॥ अवघा-
"चि श्रीहरि नांदे घरोघरीं॥ दिसे चराचरीं ऐसें केलें॥ ध्रु॰॥ सेवावे चरण
"गुरुमूर्ति ध्यान॥ गैनी संपन्न ब्रह्मरसें॥ २॥ निवृत्ति चोखडा ब्रह्मरसु उप-
"डा गुरुरूपें निवाडा निवडीला॥ ३॥" (२)

"जेथें पाहे तेथें व्यापिलें अनंतें॥ तयावीण रितें कोण स्थळ॥ १॥ गगनें
"वीण ठावो नाहीं जैसा रिता॥ तैसा या अच्युता वीन कांहीं॥ ध्रु॰॥ तेथें मा-
"झ्या चित्ता करीं रहीवासु॥ न करीं उदासु ऐशी यातें॥ २॥ निवृत्तीनें मन
"वेधिलें चरणीं॥ नामाची निशाणी अखंडित॥ ३॥

या अभंगांतील व ज्ञानदेवाच्या हरिपाठाच्या अभंगांतील भाषे वरून ज्ञानेश्वरीची भाषा कशी असली पाहिजे होती हें उघड आहे. अस्तु. निवृत्ति हा आपल्या वयाच्या अठ्ठाविसाव्या वर्षीं शके १२२० विलंबी संवत्सरीं त्र्यंबकेश्वर येथें पौषवद्य ११ चे दिवशीं स-

माधिस्थ झाला. त्या मुळें त्या दिवशीं तेथें प्रतिवर्षी यात्रा भरत असते. याचा वृत्तिबोध नांवाचा एक ओंवीबद्ध ग्रंथ असल्याचें ऐकिवांत येतें. व हा शिवांशानें जन्मला होता, अशीही लोकवार्ता आहे.

**निवृत्तिराम**— समर्थ रामदास स्वामींची शिष्य वेणूबाई तिनें केलेला वेदांत विषयावर मराठी भाषेंत ओंवीबद्ध ग्रंथ. हा सुमारें पांच हजार असून शके १६०० मध्यें झाला असें ऐकतों. परंतु आमच्या पाहण्यांत नसल्या मुळें या विषयीं येथें आम्हीं विशेष लिहूं शकत नाहीं. हा ग्रंथ मिरजेस तिच्या मठांत हल्लीं आहे.

**निश्चलदास**— यांचे दोहरे विचार सागराच्या मंगलाचरणावर वगैरे हिंदुस्थानी भाषेंत [आहेत.

**निषधदेश**— या देशांत घरघर नांवाचा नद आहे. व भनूर नांवाचें मोठें शहर आहे.

**निषादपूर्व**— हा देश प्रयागाच्या पश्चिमेस आहे. यांतही मारवाड देशांत असल्या प्रमाणें कालंजर पर्वत आहे. (प्रा०न०).

**निष्कुळानंद**— काठेवाडांत गढडा गांवचा राहणारा कवि. संवत् १८७७ मध्यें होता. भक्तचिंतामणि, यमदंड, वचनविधि, कल्याणनिर्णय, शिक्षापत्री, अर्जीविनय, हरिस्मृति, हरिचरण, स्नेहगीता, हृदयप्रकाश, चिन्हचिंतामणि, मनगंजन, चौसष्टपदी, सारसिद्धि, हरिबाळगीता, पुरुषोत्तम प्रकाश, चातुर्य गुणग्राहक, धीरज आख्यान आणि भक्तिनिधि इतके याचे ग्रंथ गुजराथींत आहेत.

**निळोबा बावा**— एक साधु.

**नीतिकल्पतरु**— हा ग्रंथ संस्कृत भाषेंत क्षेमेंद्र कवीनें केलेला आहे.

**नीतिपातल**— आपग्गा कवियित्रीकृत तामिळ भाषेंतील ग्रंथ.

**नीतिशतक**— भर्तृहरिकृत संस्कृत भाषेंत जीं तीन शतकें आहेत त्यांतील एक.

**नीतिशास्त्र**— तामिळ भाषेंत आपग्गा कवयित्रीकृत ग्रंथ.

**नीलकंठ**— भवभूति कवीचा बाप. २– मृच्छकटिक नाटकाच्या शेवटच्या १० व्या भागाचा क- [र्ता.

**नीलकंठपंडित**— समय मयूख नामक संस्कृत ग्रंथाचा कर्त्ता. (बुल्ह०का०शो०).

**नीलकंठभट्ट**— शंकर मंदार सौरभ ग्रंथाचा कर्ता.

**नीलकंठविजय**— अप्यादीक्षित कृत संस्कृत भाषेंत चंपु.

**नीलकंठशास्त्रीथत्ते**— हा महापंडित ब्राह्मण वांई येथील राहणारा होय. हा जातीचा कोंकणस्थ ब्राह्मण होता. व याचा मुख्य बाणा व्याकरणाचा असे; तरी यांनीं न्याय शास्त्रादि विषयांत अनेक विद्यार्थी तयार केले. यांच्या विद्यार्थ्यांत मेरुशास्त्री गोडबोले, मोरेश्वर शास्त्री साठे, कृपाशास्त्री द्रविड, त्र्यंबक शास्त्री शालिग्राम, विनायकशास्त्री दि-

वेकर इत्यादिक प्रमुख होते. बाळाजीपंत दादा नातु यांची कन्या ती यांची सून होती. यां-
चे चिरंजीव म्हणजे बाळाजीपंत दादांचे जांबाई नारायण शास्त्री हल्लीं काशींत असून त्यां-
चे चिरंजीव पुणें येथें विद्यमान आहेत. (सल्लूमा०). [हे. (बु० का० शो०)

**नीलकवि**– हा कवि काश्मीराकडील होय. नीलमत पुराण नांवाचा याचा ग्रंथ संस्कृतांत आ-

**नीलमतपुराण**– नील कविकृत ग्रंथ. या ग्रंथाच्या आधारावर पुढें राजतरंगिणी ग्रंथ झा-
ला. नीलमत पुराण हें मूळ ईसवी सना पूर्वी २२० वर्षें अशोक राजाच्या कारकीर्दींत झा-
ले. (बुल्ह० का० शो०).

**नृचक्षु**– कलियुगांतील युधिष्ठिर वंशीय राजा. मेधावी राजाचा पुत्र व सुखीनल राजाचा बाप.
यानें सुमारें ५६ वर्षें राज्य केलें. व त्या वेळेस कलियुगाचीं सुमारें नऊशें अठ्ठ्याऐशीं
वर्षें गत झालीं होतीं. याच्या राज्याच्या कारकीर्दींत युधिष्ठिर शक नऊशें बारा मध्यें
बौद्धावतार झाला होता. व तो झाल्यावर याची कारकीर्द सुमारें १६ वर्षें होती. असें जै-
नलोकांच्या ग्रंथा वरून दिसून येतें. (राजमा० व जैन ग्रंथ०)

**नृपंजय**– कलियुगांतील युधिष्ठिर वंशीय राजा. मेधावी राजाचा पुत्र व दूर्व राजाचा बाप
यानें सुमारें ५१ वर्षें राज्य केलें. व त्या वेळेस युधिष्ठिर शकाचीं सुमारें १२९३ वर्षें गत
झालीं होतीं. (राजमा०).

**नृसिंहतीर्थ**– ईश्वर तीर्थाचे शिष्य. यांचे शिष्य विद्या तीर्थ होते. (सल्लूमा०).

**नृसिंहदेव**– वीर बल्लाळ राजाचा बाप (महा० व० कर्ना० इति०). [ना.

२– वीर बल्लाळाचा पुत्र जयत्पाळ राजा त्यासही म्हणत. हाच मुकुंदराजाचा शिष्य हो-

**नृसिंहदेवरायल्लू**– कृष्णदेव रायल्लूचा बाप. हा शके १४३० मध्यें होता. (कविच०).

**नृसिंहदैवज्ञ**– भास्कराचार्यकृत गणिताध्याय व गोलाध्याय यावरील दुसरा टीकाकार.

**नृसिंहप्रसादतीर्थसार**– दलपति कविकृत धर्मशास्त्र विषयक संस्कृत ग्रंथ.

**नृसिंहवाडी**– नरसोबाची वाडी तीच.

**नृसिंहसरस्वती**– कृष्ण सरस्वतीचे शिष्य व गंगाधर सरस्वती, जनार्दन स्वामी आणि
दासोपंत या सर्वांचे गुरु. हे गाणगापुर येथें असत. यांस दत्तात्रेयाचा दुसरा अव-
तार म्हणून लोक समजतात. याची समाधि नरसोबाच्या वाडीस आहे. (नृ० मा०)

**नृसिंहाश्रम**– भेदाधिकार नामक संस्कृत ग्रंथाचा कर्ता. हा कवि काश्मीराकडे राहात
असे. (बुल्ह० का० शोध०). नीचें शहर काठमांडु आहे.

**नेपाळदेश**– हा देश हिमालयांत आहे. येथील राजा हिंदु क्षत्रिय असून त्याचें राजधा-

**नेमि**– जैनाच्या चोवीस तीर्थकरांतील बाविसावा. (प्र० शा०).

**नेलरू**– तैलंगणांतील एक प्रांत.

**नेवासें**– हा गांव प्रवरा नदीच्या कांठीं नगर जिल्ह्यांत आहे. येथें श्रीमोहनीराज नामक प्रसिद्ध देव आहे. ज्ञानेश्वरानें लिहिलेला ज्ञानेश्वरी ग्रंथ तो येथें तयार झाला. याचें जुनें नांव निधिवास क्षेत्र होय.

**नेहरवाला प्रांत**– हा प्रांत गुजराथेंत आहे. कुमारपाल राजाचें पूर्णपत्तन (पट्टना) शहर तें या प्रांतांतीलच होय.

**नैमिषारण्य**– कुरुदेशाच्या दक्षिणेकडील वन.

**नैषधकाव्य**– श्रीहर्ष कविकृत संस्कृत काव्य. यांत नलराजाची कथा आहे.

**नैषधव्याख्या**– मल्लीनाथ कविकृत संस्कृत भाषेंत ही पेद्दीभट्टानें तयार करून त्यावर आपला भाऊ मल्ली याचें नांव घातलें असें सांगतात.(पेद्दीभ० श० पद्दा०)

**नैष्कर्म्यसिद्धि**– हा ग्रंथ संस्कृतांत आहे. व तो मंडनमिश्र (सुरेश्वराचार्य) यांनीं केलेला आहे.

**न्याय**– हें एक शास्त्र आहे. हें मुख्यत्वें करणारा गौतम ऋषि होय. व म्हणून यास गौतमन्याय म्हणतात. यांतच कांहीं विशेष आहे. त्यास वैशेषिक नांव असून, कणादन्याय असें म्हणतात.

**न्यायकंदलिका**– श्रीधर कविकृत न्यायविषयावर असलेला संस्कृत ग्रंथ.

**न्यायकलिका**– जयंत कविकृत न्यायशास्त्र विषयक ग्रंथ.

**न्यायकुसुमांजलिकारिका**– उदयनाचार्यकृत न्यायशास्त्र विषयावरील संस्कृत ग्रंथ.

**न्यायमंजरि**– जयंत कविकृत न्यायविषयक ग्रंथ.

**न्यायमाला**– जैमिनि सूत्रांच्या बारा अध्यायांवर माधवाचार्यकृत व्याख्या.

**न्यायरत्न**– रघुनाथ शास्त्री पर्वते यांनीं न्यायावर लिहिलेला संस्कृत ग्रंथ.

**न्यायसारपंजिका**– वासुदेव कविकृत न्यायशास्त्र संबंधीं संस्कृत ग्रंथ.

**न्यायामृत**– रामानुजाचार्यकृत न्यायविषयक संस्कृत ग्रंथ.

**न्यास**– जिनेंद्रबुद्धिनामक एका जैनानें केलेला न्यायविषयावर संस्कृत ग्रंथ.

**न्यासदशक**– वेदांताचार्यकृत संस्कृत ग्रंथ.

## प.

**पंचकामाक्षी**– ही एक प्रसिद्ध देवी आहे. हिचें स्थान शिवकांचींत आहे.

**पंचगंगा**– कांसारी, भोगावती, जयंती, गोमती, आणि ब्राम्ही. अशा पांच नद्या मिळून जी नदी ती. ही कृष्णेस नृसिंहवाडी जवळ मिळाली आहे. (म० व० क० इ०)

पंचडब्बु– हा एक पांच प्रकरणांचा ग्रंथ आहे. याच्या उत्पत्ती विषयीं (चिन्नवीरन्ना) शब्द पहा.

पंचतंत्र– विष्णुशर्मा ब्राह्मणानें रचलेला संस्कृत ग्रंथ. याचे श्लोक ५५२५ आहेत. (बुल्ह० का० शी०) हा महिलारोप्य नगरच्या राजपुत्रांस बोध करण्या साठीं त्यानें रचिला. हा कधीं लिहिला त्या विषयीं आधार सांपडत नाहीं. तरी असें वाटतें कीं, शालिवाहन शकारंभीं किंवा त्या-ही पूर्वीं हा लिहिला गेला असावा; कारण याचा संक्षेप जो हितोपदेश त्याच्या प्रसि-द्धी वरून जर त्याचें भाषांतर शके सुमारें ४७५ मध्यें झालें. तर याचा जुनाटपणा स-हजच सिद्ध आहे.

पंचदशी– हा शब्दाद्वैत वेदांतपर संस्कृत भाषेंत एक ग्रंथ आहे. यांत पांच विवेक, पांचदी-प व पांच आनंद मिळून पंधरा प्रकरणें आहेत. व याच कारणास्तव यास पंचदशी नांव आहे. हा ग्रंथ जरी विद्यारण्य स्वामींच्या नांवावर मोडतो तरी भारती तीर्थ आ-णि विद्यारण्य या दोघांनीं हा रचलेला आहे. पंचदशीचा टीकाकार रामकृष्ण पंडित त्यानें मंगल लिहितानां "नत्वा श्री भारतीर्थ विद्यारण्य मुनीश्वरौ " असें लिहिलें असल्यामु-ळें वरील गोष्ट निश्चयात्मक होते.

पंचनद देश– यास हल्लीं पंजाब म्हणतात. पंचनद हें नांव पडण्याचें कारण यांतून शत-द्रू, विपाशा, इरावती, चंद्रभागा आणि वितस्ता अशा पांच नद्या वाहतात, हेंच आहे. प्रा-चीन लोक यास पांचाल देश म्हणतात.

पंचपादिका– हा शब्दाद्वैत वेदांतपर ग्रंथ संस्कृत भाषेंत सनंदनाचार्यकृत आहे.

पंचरात्रमत– साहा प्रकारच्या वैष्णवां पैकीं हें चौथें मत. (आनं० शंक० प्रकर० ८) पहा.

पंचरात्रमतखंडन– अपय्या दीक्षितकृत संस्कृत भाषेंत.

पंचसमासी– समर्थ रामदास स्वामीकृत स्फुट ग्रंथां पैकीं एक. हा मराठी भाषेंत ओंवीबद्ध असून याचे समास पांच आहेत. आणि त्या मुळेंच हें नांव पडलें आहे.

पंचायुधस्तोत्र– वेदांताचार्यकृत संस्कृत ग्रंथ.

पंचिका– जिनेंद्रकृत हा ग्रंथ संस्कृत भाषेंत आहे.

पंचोपाख्यान– पंचतंत्रांतील संस्कृताचें मराठींत केलेलें भाषांतर. यांत पंचतंत्रा प्रमाणें-च मित्रलाभादिक पांच तंत्रें अथवा प्रकरणें आहेत.

पंजाबदेश– पंचनद शब्द पहा. [भाऊ पटवर्धन.

पटवर्धन घराणें– शोध करून लिहिण्यांत येईल. या घराण्याचा मूळ पुरुष परशरामपंत

पटु– हा कवि काश्मीराकडील राहणारा होता. मंख पंडितानें केलेल्या ग्रंथाची परीक्षा कर-ण्यास जे काश्मीर येथें तीस पंडित अलंकारातें जमविले होते, त्यांत हा होता. (बु० शो०)

**पंढरपुर**– भीमा नदीच्या कांठीं असणारें एक क्षेत्र. येथें विठोबा नांवाचा एक मोठा नामांकित देव आहे. प्राय: पांच साहाशें वर्षांत जे भगवद्भक्त होऊन गेले ते याच्या भक्तीनें प्रख्यातीस आले.

**पंढरीस्तुति**– मोरोपंतानें केलेली मराठींत कविताबद्ध पंढरीची स्तुति ती.

**पतंजली**– योगशास्त्रप्रणेता ऋषि. याच्या शास्त्रास सेश्वर सांख्य म्हटलेलें आहे. हा कृष्ण द्वैपायन व्यासाच्या पूर्वीं होऊन गेलेला आहे. कारण व्यासांनीं उत्तर मीमांसा सूत्रांत याच्या योग सूत्राचें एके ठिकाणीं खंडन केलें असल्याचें आढळून येतें.

२– गोनर्द देशांत याच नांवाच्या नदीच्या तीरीं कोणी तप करणाऱ्या ब्राह्मणाच्या अंजलीपासून याचें पतन झाल्या मुळें यास हें नांव पडलें असें ह्मणतात. याच्या विषयीं-व्याख्या शाकंध्वादि सूत्राच्या संबंधानें शेखर नामक ग्रंथा मध्यें आढळून येते. भर्तृहरीनें आपल्या वाक्यपदीय ग्रंथांत याच्या विषयीं जें लिहिलें आहे तें असें आहे.

प्रायेण संक्षेप रुची नल्पविद्या परिग्रहान्॥ संप्राप वैयाकरणान् संग्रहे ऽस्तमुपागते ॥१॥ कृते ऽथ पातंजलिना गुरुणा तीर्थ दर्शिना ॥ सर्वेषां न्याय बीजानां महाभाष्ये निबंधने ॥२॥ अलंघ्य गाधे गांभिर्या दुत्तान इव सौष्टवान्॥ तस्मिन्नकृत बुद्धीनां नैवावस्थित निश्चयः॥३॥ यःपतंजलि शिष्येभ्यो भ्रष्टोव्याकरणागमः॥ कालेन दाक्षिणात्येषु ग्रंथमात्र व्यवस्थितः॥४॥ तदेव सुत्सन्न कल्पो जातो व्याकरणागमः॥ पर्वतादागमं लब्ध्वा भाष्य बीजानु सारिभिः॥५॥ सनीतो बहुशाखत्वं चंद्राचार्या दिभिः पुनः॥ न्याय प्रस्थान मार्गांस्तानभ्यस्य स्वंच दर्शनं ॥६॥प्रणीतो गुरुणास्माकमयमागम संग्रहः॥ भ्रष्टस्याम्नाय सारस्य वैयाकरण गामिनः॥७॥ मूलभूत मवाप्याथ पर्वतादागमं स्वयम्॥ आचार्य वस्करातेन न्यायमार्गान्विचिंत्यच॥८॥ प्रणीतो विधिवच्चायंमम व्याकरणागमः॥ मयापि गुरु निर्देशात् भाष्याम्नाया विलुसये॥ कांडत्रयक्रमेणायं निबंधः परिकीर्तितः॥९॥

अर्थ– कालवशें करून लोक आळशी झाले असतां, पाणिनि, कात्यायनादिकांच्या ग्रंथांचा अनादर व लोपसंभव अवलोकन करून पतंजलीनें सूत्र व वार्तिक यांच्या व्याख्यांचा ज्या मध्यें समावेश आहे असा जो संग्रह ग्रंथ, तदुक्त संपूर्ण न्याय दाखविणारें असें त्यावर महाभाष्य निर्माण केलें. तथापीही लोकांच्या अज्ञानामुळें व आळसामुळें पाणिनीय व्याकरण लोपल्या प्रमाणें होऊन तें दक्षिणेकडील लोकांत केवळ पुस्तकरूपानेंमात्र राहिलें होतें. व तें तरी पर्वतामधील एका प्रदेशांत रावण नांवाच्या कोणी

विद्वानानें लिहून ठेविल्या मुळेंच राहिलें. नाहींतर राहिलें नसतें. तेंच पुढें चंद्राचार्यवसु-रात या पंडितांस प्राप्त होऊन त्यांतील वसुरातानें मला (भर्तृहरीला) तसेंच अन्य किती-एक शिष्यांस पढविलें. त्यावर मग मी गुरुआज्ञेनें कारिका करून त्या कारिका ग्रंथा-चें नांव वाक्यपदीय असें ठेविलें. हाच वाक्यपदीय ग्रंथ पुढें हेलाराज व पुंजराज या दोघां पंडितांनीं व्याख्याद्वारा चांगला प्रगट केला. (सरलाप्र.)

भाष्यकार पतंजलि कधीं झाला त्या विषयीं वरील गोष्टी वरून या प्रमाणें दिसू-न येतें. प्रथमतः याचें भाष्य प्रधान धरून भर्तृहरीनें कारिका लिहिल्या. म्हणून पतंजलि भर्तृहरीच्या पूर्वींचा असून त्यानें आपल्या भाष्यांत एके ठिकाणीं "सभा राजमनुष्य पूर्वा" असें वचन लिहून त्यावर चंद्रगुप्त सभा अशी व्याख्या दिली असल्या मुळें हा चंद्रगुप्ताच्या नंतरचा म्हणजे मागला असें उघड सिद्ध होतें. आणि त्यावरून यास होऊन गेल्यास सुमारें २५०० वर्षें खास झालीं आहेत. (तारानाथ तर्कवाचस्-पति यांच्या सरलानामक संस्कृत प्रस्तावनेंतील उतारा.)

पतंजलिसूत्रवृत्ति– नागोजी भट्टकृत पतंजलि महाभाष्यावरील टीका.

पतियाळा– याचें जुनें नांव एकचक्रा नगर. (जैनग्रंथ.)

पत्रावलंबन– वल्लभाचार्यकृत संस्कृत ग्रंथ.

पद्धति– शार्ङ्गधर कविकृत ग्रंथ.

पदाजी– प्रसिद्ध जो तुकाराम त्याच्या पूर्वजांतील एक. विठोबाचा मुलगा, व शंकराचा बाप.

पदार्थदीपिका– कोंडभट्टकृत संस्कृत ग्रंथ.

पदार्थरत्नमंजूष– कृष्णंभट्टकृत संस्कृत ग्रंथ.

पद्मनाभ– काश्मीराकडील कवि. भुवनेश्वरी नामक स्तोत्राचा कर्ता. (बुल्ह० शोध.)

२–कबिराचा शिष्य; हा रामभक्त होता. यानें नामस्मरण बलानें कित्येक लोकांच्या व्याधि दूर केल्याच्या गोष्टी भक्तविजयाच्या २४ व्या अध्यायांत आहेत. हा काशींतच राहात असे.

पद्मपादाचार्य– भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्य यांचा हा एक मुख्य शिष्य होता. हा आनंदगिरि असा आचार्यांचा शिष्य असून ते दिग्विजय करीत फिरत असतां त्यां बरोबर असे, तसाच हाही असे. आनंदगिरीनें याच्या विषयीं आपल्या शंकर विजयांत एवढेंच लिहिलें आहे कीं;– भगवान् शंकराचार्य काशीमध्यें असतां म-णिकर्णिकेच्या तीरीं साहा हजार शिष्यांच्या मध्यें बसून त्यांस आपण केलेल्या ब्र-ह्मसूत्रांवरील भाष्याचा पाठ देत बसले आहेत. इतक्यांत व्यास तेथें आले त्यांनीं

वृद्ध ब्राह्मण वेषानें आचार्यांस या प्रमाणें पाहून कित्येक शिष्यांस हे कोण आहेत म्हणून पुसलें. तेव्हां शिष्यांनीं उत्तर दिलें त्याचें आनंदगिरीनें असें वर्णन केलें आहे:-

॥ गद्य ॥

एवमशेषमतनिबर्हणं कृत्वा। दिनमणौ मध्यंदिनगते मणिकर्णिकातीरे सिद्धासनलालसे परमगुरौ। भगवान्व्यासः किलस्थविरब्राह्मण इव समागत्य। षट्सहस्र शिष्य समेतं प्रमथाधिवृतमीशमिव आचार्यं दृष्ट्वा कोऽयमित्याक्षिपत्। शिष्यास्तं मायावेषधारिणमिदमूचुः।

॥ श्लोक ॥

शृणु वृद्ध परानंद गुरुः शंकर नामकः॥ सेतु प्रभृति देशेषु मतध्वंसमथाचरन् ॥१॥ भाष्यं कृत्वा ब्रह्मसूत्र तात्पर्यार्थ विनिर्णयम्॥ अद्वैतार्थावबोधेन शिष्यान्कृत्वा विवेकिनः॥ २॥ जयत्येव हि गंगाया स्तीराविर्भूत चंद्रवत्॥ इत्यादि॥

याचा अर्थ संक्षेपतः वरती आलाच आहे. सारांश तो ब्राह्मण असें उत्तर ऐकून शिष्यसंघ उल्लंघन करून आचार्यांसमीप आला. व त्यांस त्यानें पूर्वपक्ष केला. त्याचें आचार्यांनीं उत्तर दिलें असतांहीं ब्राह्मण आग्रहास पडून तें उत्तर ऐकेना. म्हणून आचार्यांनीं शांतपणानें ती गोष्ट त्यास तीन च्यार वेळां समजून सांगितली. तरीही ब्राह्मण आपला आग्रह सोडीत नाहीं असें पाहून त्यास म्हणाले, अरे ब्राह्मणा, तूं चांगला विद्वान् असून इतका वृद्ध झालास तरी व्यासांचा वास्तविक अभिप्राय समजत नाहींस तेव्हां तुला काय म्हणावें ? असें बोलून-" आग्रहेण जल्पतो वृद्धस्य कपोल ताडनमाचकार" दुराग्रहानें बोलणाऱ्या त्या वृद्ध ब्राह्मणाच्या तोंडांत एक चपराक चांगली सपाटून देऊन शिष्यांस आज्ञा केली कीं, यास ओढा व दूर घालवून द्या. त्या वेळेस हा पद्मपाद आचार्यांस विनंति करून या प्रमाणें बोलला:-

श्लोक.

शंकरः शंकरः साक्षात् व्यासो नारायणः स्वयं॥ तयोर्विवादे संजाते किंकरः किं करोम्यहम् ॥१॥

अर्थ उघडच आहे कीं, आपण शंकर साक्षात् शंकर आहां, आणि व्यास साक्षात् नारायण आहेत. या आपल्या उभयतांचा वाद चालला असतां मी किंकर काय करूं ? या प्रमाणें यानें केलेल्या भाषणा वरून आचार्य समजले कीं, हा वृद्ध ब्राम्हण व्यास आहे. त्या वरून त्यांनीं त्यास क्षमा मागितली आहे. इत्यादि वृत्तांत शंकराचार्य पहिले या नांवावर आहे; यास्तव तो तेथें पाहावा.

माधव पंडितानें जो दुसरा शंकरविजय लिहिला आहे त्यांत त्यानें यास विष्णूचा अंश म्हटलें आहे. तो श्लोक असा आहे:- "कमला निलयः कलानिधेर्विमलाख्याद्‌जनिष्ठ भूसुरात्॥ भुवि पद्मपदं वदंतियं सविपद्येन विवादिनां यशः ॥१॥" (सर्ग ३ श्लोक २) याचा अर्थ, लक्ष्मीचें निवास स्थान आणि संपूर्ण कलांचें भांडार असा जो विष्णु तो विमल नामक ब्राह्मणा पासून उत्पन्न झाला. त्यासच या पृथिवीवर पद्मपाद असें लोक बोलते झाले. यानें वाद्यांचें यश विपत्तींसहित हरण केलें. हा आचार्य भक्त इतका एकनिष्ठ होता कीं, एकदां हा आचार्यांच्या दर्शनास निघाला असतां वाटेंत पाहतो तों नदी भरली आहे. तीस यानें न जुमानतां पाण्यावर पावलें टाकीत निघाला. तेव्हां याच्या दर एक पावलास कमळ उत्पन्न होऊन त्यानें याचें पाऊल झेलूनधरिलें व यास आचार्यांचें दर्शन झालें तेव्हां पासून याचें नांव पद्मपाद पडलें.

माधव पंडितानें शिवगुरुपुत्र जो शंकर तो शंकराचार्यांची पदवि पावला असतां त्याच्या शिष्यमंडळांत हा व इतर शिष्य यांची गणना केलेली चुकीची आहे. कारण विश्वजित् ब्राह्मणाचा पुत्र जो शंकर तो मुख्य व नामांकित पहिला शंकराचार्य असून त्याचा शिष्य हा पद्मपाद असें आनंदगिरीनें प्रत्यक्ष पाहून लिहिलें आहे. आणि त्या वरून यास होऊन गेल्यास आजमितीस अठ्ठाविसशांवर वर्षें झालीं आहेत. (शंकराचार्य पहिले हा शब्द पहा).

**पद्मपुर**- भवभूति नामक कवीची जन्मभूमि. यास कोणी बेदर म्हणतात. परंतु आम्हांस हें पादशाहापुर असेलसें वाटतें.

**पद्मप्रभु**- जैनाच्या चोवीस तीर्थंकरांतील साहावा.

**पद्मराजकवि**- मंखकवीच्या ग्रंथाची परीक्षा करण्यास जे काश्मीर येथें तीस पंडित जमले होते त्यांतील पंडित. (बुल्ह॰शोध॰). (ल्हे॰ शोध॰)

**पद्मराजा**- पांपुरनामक शहर वसविणारा राजा. हा सायण माधवाच्या पूर्वीं होता.(बु-

**पद्मविजय**- हा एक जती अमदाबादचा राहणारा शके १७४५ मध्यें होता. याची गुजराथींत कांहीं कविता आहे. (काव्यदो॰).

**पद्मा**- ही एक ब्राह्मणाची स्त्री दुसऱ्या बुद्धाच्या वेळेस होती. (ललितवि॰).

**पद्मावती**- पहिल्या बुद्धाची आई. या विषयींचा श्लोक (बुद्ध पहिला) या नांवावर पाहा.

२: बौद्ध व जैन यांची देवी आहे ती. (स्वामि) श॰पहा.

३: प्रख्यात जयदेव स्वामीची स्त्री. ही महान् पतिव्रता होती. हिच्या विषयीं (जयदेव

४-लिंगाईत धर्माचा स्थापक जो बसव त्याची बहीण. व विजल राजाची बायको.

५-वल्लभाचार्यांचा दुसरा मुलगा विठ्ठलनाथ. त्याची धाकटी बायको. [न दिसते.

**पद्मावतीनगर**- हें उत्तर अक्षांश २६° व पूर्वरेखांश ८६° वर आहे. असें प्राचीन नकाशावरू

**पद्माक्षी**- भर्तृहरीची स्त्री. व मगध देशींच्या सिंहसेन राजाची कन्या. भर्तृहरीस मिळालेलें अजरामरत्वाचें फळ, त्यानें हिच्या जवळ ठेवायास दिलें असतां तें हिनें जारास दिलें. तें भर्तृहरीस कळून तो राज्य सोडून गेला व हिनें लाजेनें अरण्यांत जाऊन आपणास जाळून घेतलें. पुढें चर्पटीनाथांनीं हिला पुनः सजीव करून व हिचें पिंगला असें दुसरें नांव ठेऊन हीस भर्तृहरीच्या स्वाधीन केलें. आणि त्यास परत राज्यावर पाठविलें. (भर्तृहरी) शब्द पहा.

**पद्यामृतसोपान**-भास्कर कविकृत संस्कृत भाषेंत.

**पद्यावलि**- रूपगोस्वामीकृत संस्कृतांत.

**पन्हाळा**- कोल्हापुराकडे असणारा किल्ला, व त्या खालचा गांव. हा आर्या कविता करणारा जो प्रख्यात मोरोपंत त्याची जन्मभूमि.

**पंपा**-पंपानामक सरोवरा जवळचा गांव. प्रख्यात जे विद्यारण्य स्वामि ते या गांवचे राहणारे होते. या गांवाची गणना क्षेत्रांत आहे.

**पयस्विनी**- ही एक नदी दक्षिण देशांत आहे.

**पयोष्णीनदी**- चित्रकूटा जवळ असणारी नदी. [मिळाली आ॰

२-ही याच नांवाची दुसरी नदी गोंडवणांत आहे. व ही पश्चिमवाहिनी होऊन तापीस

**परभणी**- वराडांतील एक गांव. प्रख्यात नारायण तीर्थ ऊर्फ हंसराज स्वामि यांची जन्मभू॰

**परमतकालानल**- साहा प्रकारच्या शैवांतील भक्तनामक मताचा अग्रगण्य हा एक विद्वान् व महा दुराग्रही शैव होता. याची व इतर कित्येक शैवांची श्रीमच्छंकराचार्यांशीं गांठ पडली असतां परस्परांचीं जीं भाषणें झालीं त्यांचें वर्णन आनंदगिरीनें आपल्या शांकर विजयांतील पांचव्या प्रकरणांत येणें प्रमाणें लिहिलें आहे.

॥ गद्य. ॥

एवं लिंगादि धारण कारणे शिवमते निरस्ते ऽ प्याराध्याः केचन पीठार्चन निरताः। प्राण लिंग धारिणो निरवशेष भक्षकाः। फाले लिंगधारिणः शुभ्रविभूति भूषित सर्वांगाः। शिरः कंठ बाहुषु सहस्रमरिभित रुद्राक्षमाला भूषिताः। प्रतिपक्ष चंडभैरव विपक्षशूल भक्ताग्रगण्य परमत कालानलादयः श्री शांकराचार्य हक्षा इदमूचुः।

कस्त्वं सन्यासिन् मायावेष धारीव समागत्य षड्विध शैवाचारं सकल वेद प्रमाणं परित्यज्य विद्वेष वीरादीन् मतभ्रष्टान् कृत्वा गंतुमायतो भवसि। प्रतिपक्ष चंडभैरव माराध्यमत पद्मभास्करं मां विद्धि। अतस्तत नुर्नत दामो अभ्रुत इत्यादि प्रमाणेन तप्तत नोरेव मोक्ष फलश्रवणा ल्लिंगांकनं अवश्यं कर्त्तव्यं।

श्री शंकराचार्यै रिदमुच्यते। तप्त लिंगादि धारणं द्विजातिभिर्न कर्त्तव्यं। प्रमाणा भावात्। अतप्त तनुरित्यादिश्रुते रर्थस्तावदेवं वक्तव्यः नाग्निना तापो विवक्षितः किंतु तपसैव। तपश्च कृच्छ्र चांद्रायणादिकं। तदुक्तं बृहन्न रदीये

॥ श्लोक ॥

लिंगांकित तनुं दृष्ट्वा राजं चक्रांकित तथा॥ स्नानमेव तदाकार्य मथवा सूर्य मीक्षयेत्॥१॥ पुनश्च मार्कंडेयपुराणे.

ब्राह्मणानांच गायत्र्याः संवादो भून्महान्पुरा॥ अनसूयाः ति संघासाः पाखंडा- श्चेत्रा देवताः॥ वेदोक्त कर्महीनाश्च तांत्रिकाचार तत्पराः॥ यूयं कलौ भवंत्वेव मितितानाह सारुषा॥ अतः कलियुगे प्राप्ते भविष्यंति द्विजा धमाः॥ वेदार्थ हीनाः पाखंडा लिंग चक्रादि चिन्हिताः॥ ज्ञान कर्म पथात् भ्रष्टाः कामक्रोधादि पीडिताः॥ दुरात्मानः सत्य धर्म वर्जिताः शाप भोगिनः॥ कलौ त्रिंशत् सहस्राब्दे पूर्णे नष्टा भवंतिते॥ निःशेषतां गताः पश्चाद्वेदार्थानुचिंतकाः सत्यधर्म पराभूयो भविष्यंति न संशय इति॥

॥ गद्य ॥

यद्राजांकनं भृत्यस्ये त्युक्तं तदप्य सत्यं। राज्ञः एक छत्रादि चिन्हं वर्तते॥ तत्भृत्यस्य नास्त्येव। त्रिशूलाद्यायुधं देवो बिभर्ति। भक्तेनापि तद्यायुध धारणं कर्तव्य मिति भवद्भिरुक्तं। तद्याचेदयोमयं त्रिशूलादिकं धारयतां भारमात्रमेव। प्रयोजनं नत्वन्यत्। नास्त्येव तथाविध कार्य कारणतायां। किंच। नीलकंठ भुजंग भूषणादि चिन्हं देवस्यास्ति तदपि धारय। वृश्चिकादि विषमात्रेण म्रियमाणस्य मर्त्यस्य न कालकूट भक्षणे शक्तिरस्ति। रज्जु दर्शनेन सर्पभ्रांत्या पलाय मानस्य भुजंग भूषणता कथं युज्यते। तस्मात्पामर बुद्धिं विहाय लिंगाद्यंकनं परित्यज्य वेदोक्त कर्म समर्पणं भगवति कृत्वा। जीवेशयो रैक्यांश संधानं कुर्वन् दृढे तत्त्व ज्ञाने जन्ममरण प्रवाह कारण मूला ज्ञान निवृत्तो ज्ञानायां लिंगशरीर भंगद्वारा मुक्तो भवसीति परमाज्ञापितः भक्ताग्र-

गण्यस्तदनुचारिणश्च परमत कालानलादयः परम गुरुं श्री शंकराचार्यं नत्वा स्व बंधुपुत्र मित्रादिभिः सह त्यक्त लिंगाकाः सम्यगुपदिष्ट शुद्धाद्वैत वादिनो बभूवुः॥

अर्थ- या प्रमाणें लिंग धारण करण्यास हेतुभूत जें शैवमत त्याचा निरास केला-असतांही नंदीस परम दैवत मानून त्याची पूजा करणारे कित्येक आराध्य ब्राम्हण प्राणांची तृप्ति करणारे व पात्रावर वाढिलेलें अन्न किंचित् शेष न राहूं देतां सर्वभक्षण करणारे तसेंच वस्त्रांत शिवप्रतिमा गुंडाळून अंगावर धारण करणारे सर्वांगास शुभ्र भस्म लाऊन तेणें करून तें भूषित करणारे आणि मस्तक कंठ व बाहूंच्या ठायीं सहस्त्रावधि रुद्राक्ष माला धारण करणारे प्रतिपक्ष चंडभैरव, व विपक्षशूल भक्तमताग्रगण्य परमत काला नलादिक श्रीशंकराचार्यांप्रत अवलोकन करून त्यांस असें बोलते झाले.

तूं सन्यासी कोण आहेस? जो तूं मायाची वेष धारण केल्या प्रमाणें येथें येऊन व सकल वेदप्रमाणभूत षड्विध शैवांच्या आचाराप्रत दूषित करून, विद्वेषवीरादिक शैवांस त्यांच्या मतापासून भ्रष्ट करीत होत्साता जाण्यास सिद्ध झाला-स. परंतु प्रतिपक्ष चंडभैरवास व आराध्यमतरूप कमलाप्रत विकसित करणाऱ्या मज सूर्यास जाणून व जिंकून नंतर गमन कर. माझें तर मत असें आहे कीं, अतप्त तनु इत्यादिश्रुति प्रमाणांवरून जो तप्त तनु झाला त्यासच मोक्षफल ऐकण्यांत येत असल्या कारणानें लिंगांकन अवश्य करावें.

यावर श्रीशंकराचार्यांनीं उत्तर देत असें म्हटलें, अहो तप्तलिंगादि धारण हें, अप्रामाण्यास्तव द्विजांनीं कधींही करूं नये. अतप्त तनु इत्यादि श्रुतींचा अर्थ तप्त मुद्रांनीं तापणें असा नाहीं. तर तपें करून तापणें असा विवक्षित आहे. व तप म्हणजे कृच्छ्र चांद्रायणादि आचरण असा समजावा. या विषयीं बृहन्नारदीय ग्रंथांत तप्तमुद्रांवर दोष लिहिला आहे तो असा आहे.

लिंगांकित किंवा चक्रादिकांनीं अंकित जो पुरुष त्याचें दर्शन झालें असतांत्यास दर्शन झालें असेल त्यानें तत्काल स्नान करावें, अथवा सूर्यास अवलोकन करून त्या दर्शन जन्य दोषा पासून आपली शुद्धि करून घ्यावी. आणखी मार्कंडेय पुराणांत वेदोक्त कर्मांचा त्याग करून तंत्रोक्त आचारानें वागणाऱ्या ब्राह्मणांसशाप झाल्याचें वृत्त, ब्राह्मणांच्या व गायत्रीच्या संवाद द्वारा वर्णिल्याचें आढळून येतें, त्यांतही अर्थ असाच आहे. म्हणजे कलियुगांत तुम्हीं अधम असे ब्राम्हण व्हाल.

व तुमच्या तंत्रोक्त मताचा तीस हजार वर्षें पर्यंत प्रसार होऊन पुढें तुमचें मत ल-यास जाईल. सारांश अशा प्रकारचे जेवढे ब्राह्मण तेवढे सर्व गायत्रीचे शापित समजावेत.

पुनः शंकराचार्य बोलतात. राजाचीं जीं चिन्हें तीं सेवकांस असावीत असें तुह्मी म्हटलें तेंही खोटें आहे. कारण राजाचें एक छत्रादि चिन्ह सेवकास मुळींच नाहीं. आतां त्रिशूलादि आयुधें देव धारण करितो म्हणून तीं भक्तानेंही धारण करावीं-त असें तुमचें ह्मणणें. त्यास लोखंडाचा दहूल हातांत धारण करणाऱ्या तुम्हांस तें केवळ ओझें मात्र आहे. दुसरें कांहीं नाहीं.

हें असो. आणखी असें पहा कीं, देव आयुधें धारण करितो म्हणून जर तीं तुह्मीं धारण करितां तर देवा प्रमाणें नीलकंठ व भुजंगभूषण हींही धारण करा. परंतु नीलकंठादिक भूषणें फुकटचीं कोठें आहेत? विंचवाच्या विषानें मरणाऱ्या मनुष्यास कालकूट भक्षणाची शक्ति नाहीं. तसेंच रज्जूच्या दर्शनें करून भ्रांतीनें सर्प मानून भिऊन पळणाऱ्यास भुजंगभूषण कसें साजेल? म्हणून हे परमतकालनला ही मूर्ख बुद्धि टाकून व लिंगाद्यंकन सोडून देऊन वेदोक्तकर्म परमेश्वरीं अर्पण करीत होत्साता जीवेश्वरांचें ऐक्यानुसंधान दृढ धारण करण्यानें जन्ममरण प्रवाहास कारणीभूत जें मूलाज्ञान त्याची निवृत्ति झाली असतां, लिंगशरीरभंग (वासनानाश) द्वारा मुक्त होशील. अशा प्रकारें परम म्हणजे उत्कृष्ट रीतीनें आज्ञापिलेला भक्त मताग्रगण्य परमतकालानल व इतर शैव आपआपल्या अनुयायां सहवर्तमान परम गुरु श्रीमच्छंकराचार्य यांस नमस्कार करून आपले बंधु, पुत्र, मित्र इत्यादिकांसहित त्यक्तलिंग होत्साते चांगल्या प्रकारें उपदिष्ट जें शुद्धाद्वैत तत्पर होते झाले. हाच पुढें शुद्धाद्वैत मतास अनुसरून शैवमार्ग स्थापन करणारा झाला.

**परमदीदेव**— कलबुर्ग्या नजीकच्या कल्याणचा राजा. हा राजा शालिवाहनाच्या अकराव्या शतकांत तेथें राज्य करीत होता. यास चौरी नांवाची एक कन्या होती. ती बुद्धिवान् असल्या मुळें यानें तिला संस्कृत विद्या शिकविण्या साठीं काश्मीरच्या राजास लिहिलें कीं, एक चांगला पंडित पाठवून द्यावा. त्या वरून त्यानें बिल्हण कवीस याकडे पाठविलें. बिल्हण यास येऊन भेटल्यावर यानें मुलीस त्याच्या स्वाधीन केलें. पुढें बिल्हण तीस शिकवीत असतां ती चांगली विद्वान् झाली. व तिनें त्याशीं पुढें पति अशा भावानें स्नेह केला. ही गोष्ट राजास कळून त्यानें बिल्हणास फांशीची शिक्षा नेमिली. जेव्हां बिल्हणास फांशीं द्यावयास चालविलें तेव्हां राजा-

झे वरून सेवकांनीं त्यास राजकन्येच्या महालापाशीं आणिलें. व आतां पुढें नेणार इतक्यांत राजकन्या खिडकींत येऊन तिनें त्यास पाहिलें. ती बिल्हणाकडे पहात होती त्या वेळेस तिच्या स्तनांवरील पदर सरकलेला होता, त्या मुळें बिल्हणाची दृष्टि तिला पाहात असतां तिच्या स्तनावर होती. इतक्यांत तिनें पदर सांवरला असें पाहून बिल्हणास मी आहें कोठें व चाललों आहें कोठें याचें भान न राहून तिला म्हणाला. अग, अग, माझे डोळे तुझ्या स्तनांवरील पदरा खालीं सांपडलेना? अशा विषयीं त्यानें कविताही केली. तीच चौरी सुरतपंचाशिका प्रसिद्ध आहे. सारांश हें वर्तमान राजास कळून त्यानें बिल्हणास मुक्त केलें. (बुल्ह० शोध.)

**परमरहस्य**– हा एक मराठींत वेदांतपर ओंवीबद्ध ग्रंथ आहे. याचा कर्त्ता रेवणसिद्ध नांवाचा जंगम होता.

**परमरहस्यप्रकाशिका**– हा संस्कृत ग्रंथ पहिल्या बुद्धानें केलेला आहे.

**परमानंद**– एक भगवद्भक्त होता. (नाभा० भक्त०).

**परमामृत**– हा ओंवीबद्ध ग्रंथ वेदांतपर मुकुंदराजकृत आहे. याचीं लहान लहान चौदा प्रकरणें आहेत.

**परशुरामबावा**– हा जातीचा कोंकणस्थ ब्राह्मण होता. याचें उपनांव राजवाडे होतें. शिरगांवकर रामदासी लक्ष्मणबावा त्यांचा हा शिष्य असे. हा मोठा वैराग्यशील व कडकडीत ब्रह्मचारी होता, म्हणून याची गणना भगवद्भक्तांत आहे. याची गुरुभक्ति अप्रतिम होती, अशी लोकांत याची कीर्ति आहे. या सारखा भजन पूजनाच्या सारखा नियम ५५ वर्षें पर्यंत चालविणारा आमच्या आदळांत तर कोणी पुरुष अजून आलाच नाहीं. याची समाधि अयोध्येस आहे. हा धाकट्या बाजीरावाच्या कारकीर्दींत होता. व इंग्रजी अंमल होऊन सुमारें वीस वर्षें झालीं असतां याची समाधि झाली असें आह्मांस स्मरतें.

**परशुरामभाऊ पटवर्धन**– कर्नाटकांत जे पटवर्धन संस्थानी आहेत त्यांचा मूळपुरुष व पेशव्यांचा एक मोठा नामांकित सरदार.

**परशुराम मिश्र**– संस्कृतांत जो मधुराचंपु आहे त्याचा हा कर्त्ता, काश्मीराकडील राहणारा होता. (बुल्ह० शोध.)

**परशुरामराजा**– या नांवाचा एक राजा मलबार देशांत होऊन गेला. हा मोठा प्रतापी होता असें दिसतें. कारण यानें चालू केलेला शक अजून मलबार देशांत चालत आहे. विक्रम शकाच्या पहिल्या वर्षी याच्या शकाचें १२० वें वर्ष होतें. या वरून विक्रमा पूर्वीं हा एकशें वीस वर्षें होऊन गेला होता. शालिवाहनाच्या व याच्या

शकांत २५४ वर्षांचें अंतर आहे. म्हणजे आज शालिवाहनाच्या १८०१ व्या वर्षी याचे शकाचें २०५५ वें वर्ष आहे. कित्येक अल्पदृष्टीचे आलीकडील विद्वान् म्हणतातकीं, परशुराम अवतार तो हाच होय. व याच्या मागून राम,कृष्ण, हे अवतार झाले. अर्थात् रामकृष्णादिक अगदीं आलीकडले होत. परंतु हें त्यांचें म्हणणें ऐकून सोडून द्यावें अशाच योग्यतेचें आहे. (हिंदू माहिती.)

**परशुरामशक**– परशुराम राजाचा जो शक दक्षिणेकडे मलबार देशांत चालत आहेतो. युधिष्ठिर शकाच्या २९२५ व्या वर्षी हा शक चालू झाला.

**परिप्लव**– युधिष्ठिर वंशीय सुखीनल राजाचा पुत्र व सुनय राजाचा बाप. यानें सुमारें बासष्ट वर्षे राज्य केलें. व त्या वेळेस युधिष्ठिर शकाचीं ११११ वर्षे २महिने व ११दिवस इतकीं वर्षे गत झालीं होतीं. हा राज्य करीत असतां मगध देशांत प्रद्योत राजे राज्य करीत होते. आणि पहिला बुद्ध नुकताच मरण पावला होता. (राज.मा.),व हिं.

**परिभाषाप्रकाशिका**– वैद्यनाथ कविकृत संस्कृत ग्रंथ. व्याकरणावर.

**परिभाषावृत्ति**– सीरदेव कविकृत संस्कृत ग्रंथ. व्याकरण विषयावर.

**परिभाषेंदुशेखर**– हा संस्कृत ग्रंथ नागोजीभट्टकृत व्याकरण विषयावर आहे. यावर गदा,भैमी, मिश्री,त्र्यंबकी,त्रिपथगा, शांकरी इत्यादिक अनेक टीका आहेत.

**परिसाभागवत**– हा जातीचा ब्राह्मण पंढरपूरचा राहणारा होता. हा मोठा भगवद्भक्त असे. याचें मूळचें नांव काय होतें तें कळत नाहीं. हल्लीं जें नांव येथें दाखविलें आहे त्या विषयींच्या दोन गोष्टी दोन तऱ्हेच्या ऐकण्यांत येतात. कोणी म्हणतात हा सर्व लोकांस असें सांगत फिरत असे कीं, तुह्मीं भागवत परिसा ह्मणजे ऐका. व त्यावरून याचें असें नांव चालू झालें. कोणी ह्मणतात याजवळ परीस होता. व त्यावर हा आपला चरितार्थ चालवून भजन करी ह्मणून हें नांव पडलें. पुढें असें सांगतात कीं, नामदेवानें याजवळचा परीस घेऊन चंद्रभागेंत फेंकून दिला. आणि यास चांगला बोध करून सांगितलें कीं, जों पर्यंत मनांत द्रव्यलोभ आहे तों पर्यंत ईश्वर प्राप्ति होणें कठीण आहे. त्या वरून परीस गेल्याचा खेद टाकून प्रारब्धें करून निर्वाह करीत भजनांत काळ घालवूं लागला. (भक्त० वि० व हिंदू माहि.)

**परीक्षित् राजा**– युधिष्ठिर वंशीय कलियुगांतील राजा. युधिष्ठिराच्या मागून हस्तनापुरांत हाच गादीवर बसला. यानें ६० वर्षे १ महिना राज्य केलें. त्या वेळेस कलियुग लागून युधिष्ठिराच्या शकास शाहाण्णव वर्षे व एक महिना झाहला होता. याच्या मागें याचा मुलगा जनमेजय तो राजा झाला. परीक्षित् राजा ब्राह्मणाच्या

शापानें सर्पदंश होऊन मरण पावल्याची गोष्ट प्रसिद्ध आहेच. (राजभा०).

**पल्हवदेश–** जुन्या नकाशांत याचे उ० अ० ३५° व पू० रे० ६७° लिहिले आहेत. हा मद्रदेशाच्या पश्चिमेस आहे.

**पशुपति–** कारक परीक्षा नामक संस्कृत ग्रंथाचा कर्त्ता. हा कवि काश्मीराकडील राहणारा होता. (बुल्ह० शो०).

**पश्चिमआनर्त्त–** द्वारका राजधानीचा मुख्य देश. या नांवाची प्रसिद्धि हल्लीं नाहीं.

**पक्षधरमिश्र–** गीतगोविंदाचा कर्त्ता जयदेव. त्यास १५ दिवसांचा पाठ एकदम घेत गेल्यानें पडलेलें नांव.

**पांचालदेश–** द्रुपदराजाचा देश. "चंद्रभागा महानद्या स्तीरं प्राप्य सुखेनवै॥ पांचालस्य पुरं सम्यक् द्दष्ट्वा तस्मिन्प्रविशयह॥१॥" अर्थात् पंजाबांतील जी चंद्रभागा नदी तिच्या तीरचा हा प्रदेश होय. (जैनग्रंथ.)

**पाटनाशहर–** हें भागीरथीच्या कांठीं आहे. पाटलीपुत्र नगर तें हेंच.

२– याच नांवाचें दुसरें शहर गुजराथेंत आहे.

**पाटलीपुत्रनगर–** पाटना नामक शहर तेंच. हें मगध देशांत भागीरथीच्या कांठीं आहे. याचे उत्तर अक्षांश सुमारें २६° व पूर्व रेखांश ८५° आहेत. पुष्पपुर अथवा कुसुमपुर असेंही यास नांव होतें. इंग्लिश लोक यास पाली बोथ्रा म्हणतात. व कुसुमपुराच्या अपभ्रंशानें चिनई लोक कुसुमोपुलो म्हणतात. या शहरास पाटलीपुत्र असें नांव कां पडलें त्या विषयींचा इतिहास येणें प्रमाणें आढळतो.

दक्षिणदेशीं राहणारा कोणी एक ब्राह्मण आपलें सर्व कुटुंब घरीं ठेऊन तीर्थयात्रा करीत फिरत असतां हिमालयांत गंगाद्वारीं आला. व तेथील यात्रा संपवून कनखल तीर्थास गेला. त्या तीर्थाचा सर्व विधि करून आतां निघणार तों दैवगत्या अंगांत ज्वरांश उत्पन्न होऊन तो तेथें मरण पावला. हें वर्तमान कांहीं दिवसांनीं त्याच्या गांवीं गेल्यावर त्यास तीन पुत्र होते त्यांनां कळलें. त्यावरून त्यांनीं त्याचा उत्तरविधि केला. व मनांत विचार आणिला कीं, आतां विद्याभ्यास करण्या साठीं कोठें तरी बाहेर गेलें पाहिजे. असें ठरवून तिघेही आईस पुसून घराबाहेर पडले. पुढें एका गांवाहून दुसऱ्या गांवीं या प्रमाणें हिंडत असतां समुद्रकिनाऱ्या लगत चिंचणीनामक गांवीं आले. हा गांव कुमारस्वामीच्या स्थाना जवळ दक्षिणेस आहे. तेथें आल्यावर एका ब्राह्मणाच्या घरीं रात्रीं तिघेही वस्तीस राहिले. तो ब्राह्मण चांगला विद्वान् व सभ्य होता, आणि त्याचें नाव भोजक असें होतें.

त्यानें तिघांस त्यांची सर्व हकीगत पुसून घेऊन, तिघांचेंही आगत स्वागत उत्तम प्रकारें केलें. दुसऱ्या दिवशीं त्यानें तिघांस सांगितलें कीं, तुम्ही तिघे ज्या उद्देशानें घरून बाहेर पडलां आहां, तो तुमचा हेतु येथेंच सिद्ध झाल्यास कसें? तिघांनीं उत्तर केलें. महाराज मग काय पाहिजे. आह्मांस विद्या झाली म्हणजे झालें. पुढें तरी जाऊन काय कर्तव्य आहे? त्यावरून भोजास संतोष झाला. व तो तिघांस घरीं सहून घेऊन त्यांस त्यानें चांगलें विद्वान् केलें.

नंतर तिघे चांगले विद्वान् झाले असें पाहून व आपल्यास तीन मुलीं शिवाय दुसरें कांहीं मूल नाहीं असें मनांत आणून हेंच आपल्यास पुत्रस्थानीं समजून त्यानें आपल्या तिघी मुली त्या तिघांस दिल्या. त्या मुळें तिघेही आपल्या आई सन्निध्दां तेथेंच राहिले. या प्रमाणें ते तिघे तेथें बराच काळ पर्यंत राहिले; परंतु पुढें देशांत दुष्काळ पडल्या मुळें त्यांस गांव सोडणें प्राप्त झालें. म्हणून द्रव्य मिळविण्याच्या हेतूनें त्यांनीं आप आपल्या बायकांस तेथेंच ठेऊन दूर देशीं गमन केलें. ज्या वेळीं तिघे देशावरास निघाले त्या वेळेस मधल्याची स्त्री गरोदर होती. पुढें तिघेही गेल्यावर थोड्याच काळानें ती प्रसूत होऊन पुत्रास प्रसवली. परंतु दुर्भिक्षा मुळें त्या मुलाचें पोषण कोणाच्यानेंही होईना असें पाहून शिवपार्वतीनें त्याचें व त्याच्या इतर मनुष्यांचें मोठ्या प्रेमानें संरक्षण केलें. व यज्ञदत्तनामक ब्राह्मणाकडून त्याचें नांव पुत्रक असें ठेविलें.

हा पुत्रक मोठा दैववान् निपजला. व शिवपार्वतीच्या प्रसादानें त्यास एके काळीं कोणा एका ठिकाणीं अपरिमित द्रव्य सांपडलें त्या मुळें सर्व मनुष्यांचा निर्वाह उत्तम रीतीनें होऊं लागला. पुढें पुत्रकानें आपला बाप व दोघे चुलते या तिघांचा पुष्कळ शोध केला. परंतु ठिकाण लागत नाहीं असें पाहून अन्नसत्र घातलें, त्यांत एवढाच हेतु कीं, ते तिघे केव्हांना केव्हां तरी येथें येतील व आपणांस त्यांची भेट होईल. हा लौकिक चोहोंकडे पसरून तेथें हजारों ब्राम्हण येऊन जेऊन जाऊं लागले. त्यांत एके काळीं पुत्रकाचा बाप व दोघे चुलते फिरत फिरत सहजगत्या तेथें येऊन उतरले. व भोजन करून रात्रीं तेथेंच निजले. दुसऱ्या दिवशीं चिंचणी गांव हाच असें त्यांस समजल्या वरून त्यांनीं अन्नसत्राच्या मालका विषयींची चौकशी केली. त्यांत त्यांस सर्व संबंध समजून आला. परंतु हा पुत्र आह्मी येथें नसतां झाला कसा! व येवढी संपत्ति आली कोठून? याचा पुरा विचार न करितां त्यांनीं यास मुख्य कारण आपल्या स्त्रियांचा दुराचारच होय असें ठरवून

पुत्रकास मारण्याच्या हेतूनें युक्तीच्या वाटे रानांत आणवून मारेकऱ्यांच्या स्वाधीन केलें. व ते तिघेही निघून गेले.

आपण मारेकऱ्यांच्या हातीं सांपडलों असें पुत्रकानें पाहून त्यांची त्यानें प्रार्थना केली. व हातांत कांहीं मौल्यवान् जिन्नस होती ती त्यांस देऊन आपली सुटका करून घेतली. त्या वरून यास मारेकऱ्यांनीं सोडिलें व हा घरीं परत येण्यास निघाला. इतक्यांत वाटेंत यास दोन पुरुष परस्पर भांडतांनां दृष्टीस पडले. तेव्हां हा तेथें उभा राहून त्यांस पुसूं लागला. अहो तुह्मी दोघे कोण आहां ? व भांडतां त्याचें कारण काय? त्या वरून दोघे स्वस्थपणानें यास ह्मणाले. बाबारे ऐकून घे. आह्मी दोघे परस्परभाउ मयासुर दानवाचे पुत्र आहोंत. आमचें भांडण ही काठी, पेला, व पादुका त्या तीन जिनसां करितां आहे. त्या तीन जिनसांत असें काय विशेष आहे म्हणशील तर ऐक. त्या काठी पासून पाहिजे तो म्हणजे इच्छावा तो पदार्थ तत्काळ प्राप्त होतो. पेल्या पासून अपरिमित अन्न इच्छितांच उत्पन्न होतें. व पादुका पायांत घालतांच इच्छावें त्या स्थळीं जातां येतें. सारांश अशा त्या तीन जिनसा अपूर्व असल्या मुळें आह्मां दोघांत जो बलवान् असेल त्यानें त्या घ्याव्या म्हणून आह्मी भांडत आहों. असें ऐकून पुत्रक शाहाणा असल्या मुळें तो त्यांस ह्मणाला अहो, तुह्मी मारामारी करितां हें मला नीट दिसत नाहीं. यास्तव माझ्या मतें तुह्मी दोघांनीं धांवण्याची प्रतिज्ञा करावी. व धांवतां धांवतां दोघांतून जो पुढें जाईल त्यानें त्या जिनसा घ्याव्या. ही गोष्ट दोघांस मानली. व दोघेही त्या तीन जिनसा याच्या जवळ ठेऊन धांवूं लागले. नंतर ते बरेच दूर गेले असें पुत्रकानें पाहून पायांत पादुका घातल्या, व हातांत काठी आणि पेला घेऊन जो तेथून उडाला तो आपल्या गांवास न जातां एका अकरसिका नामक दूरच्या नगरांत जाऊन उतरला. त्याचें कारण याचा मूळगांव अगदीं जवळ असल्या मुळें तेथें आपण गेल्यास दैत्यपुत्र तेथें येतील ही त्यास भीति होती.

त्या नगरांत गेल्यावर त्यानें एका म्हातारीच्या घरीं बिऱ्हाड केलें आणि हें नगर कोणाचें आहे वगैरे चौकशी केली. तींत सहजरीत्या त्यास कळलें कीं, राजास पाटली नांवाची एक कन्या अप्रतिम सुंदर व शाहाणी आहे, तशांत ती उपवरही झाली आहे. या प्रमाणें जाणून पादुकांच्या बळानें तो तिच्या मंदिरांत एकाएकीं उतरला. तेव्हां त्यास तिनें आकाश मार्गानें आलेला पाहून व हा कोणी तरी अद्भुत पुरुष आहे असें जाणून त्याचा योग्य सन्मान केला. व त्यास जवळ ठेऊन घे-

नले. पुढें उभयतांचा स्नेह होऊन ही गोष्ट राजास कळण्या पूर्वी येथून उभयतांनीं निघावें असें पाटलीच्या मतें ठरतांच पुत्रक ह्या तिला घेऊन जो तेथून उडाला, तो-भागीरथीच्या तीरीं उतरला. नंतर काठीच्या बळानें त्यानें तेथें एक अत्यंत रमणीय नगर निर्माण करून प्रजाही निर्माण केल्या. आणि पेल्याच्या बळानें त्यांचें संरक्षण करून आपल्या बायकोचें व आपलें नांव एकत्र जुळून त्याचें नांव पाटली पुत्र असें ठेविलें.

सारांश पुढें यानें आपल्या कुटुंबाचीं सर्व मनुष्यें तेथें आणिलीं. व हा गांवीं नाहींसा झाला त्या विषयींचा तिकडे याच्या कारभाऱ्यानें शोध करून याच्या बापास व दोघां चुलत्यांस धरून ठार मारिलें होतें. त्यांस काठीच्या बळानें सजीव करून तो पुत्रक तेथें आनंदानें राज्य करूं लागला. (ग्यारे. इं. को.)

**पांडवप्रताप**– भारताचा सारांश घेऊन श्रीधर कवीनें मराठी भाषेंत रचलेला ओवीबद्ध ग्रंथ. याचे त्यानें चौसष्ट अध्याय केले आहेत.

**पांडुदास**– हा एक राजा काश्मीराकडे होऊन गेला. श्रीधर नांवाचा कोणी एक संस्कृ कवि तो याच्या आश्रयास होता. हा श्रीधर भागवत टीकाकार किंवा दुसरा कोणी त्याचा निर्णय आह्मांस कळला नाहीं. (बुल्ह० शोध.)

**पांडुरंगमहात्म्य**– हा ग्रंथ श्रीधर कविकृत ओंवीबद्ध मराठींत आहे.

२– तेनाल रामलिंग नामक कवीनें तेलंगी भाषेंत वर्णिलेलें पांडुरंगाचें महात्म्य.

**पांडुरंगस्तोत्र**– श्रीमच्छंकराचार्यांनीं केलेलें पांडुरंगावर संस्कृत स्तोत्र तें.

२– महीपति बावांनीं मराठींत केलेलें.

**पाणिनि**– उपवर्ष पंडिताच्या तीन शिष्यांतील एक. कात्यायन आणि व्याडी त्यांचा हा गुरु बंधु होता. हा शालातुर (लाहोर) येथें राहणाऱ्या एक्या ब्राह्मणाचा मुलगा असून याच्या आईचें नांव मात्र दाक्षी होतें इतकें आढळलें आहे. पाणिनि कधीं होता त्या विषयीं कलकत्ता येथील संस्कृत विद्यालयांतील व्याकरणशास्त्र विषयाचे प्रोफेसर तारानाथ तर्कवाचस्पति यांनीं सिद्धांत कौमुदीवर जी सरला नामक व्याख्या लिहिली आहे तिच्या पूर्वार्द्धांतील प्रस्तावनेंत येणें प्रमाणें लिहिलें आहे. त्यांत त्यांनीं प्रथमतः पाणिनि व्याकरणावरील महाभाष्य लिहिणारा जो पतंजलि त्याच्या विषयीं असें प्रतिपादन केलें आहे कीं, पतंजलि महाभाष्यकार हा भर्तृहरीच्या पूर्वींचा व चंद्रगुप्ताच्या मागचा होता. या प्रतिपादना विषयीं या कोशांतील द्वितीयार्थक (पतंजलि) शब्द पहा.

आतां पतंजलीच्या पूर्वी हा किती वर्षे झाला होता. तें दाखविण्या पूर्वी आधीं याचें इतिवृत्त कळविणें अवश्य जाणून तें लिहितों:- उपवर्ष पंडिताच्या तीन शिष्यांत हा होता. हें तर वरती लिहिलेंच आहे. त्या तिघांत हा मंदबुद्धीचा असल्या मुळें कोण्या एका प्रसंगीं एका सभेंत एका ब्रह्मचाऱ्यानें याचा पराभव केला.त्यावरून यास अतिशय खेद झाला. व त्या खेदानें हा अरण्यांत जाऊन शिवाराधनपूर्वक तप करूं लागला. कांहीं काळानें भगवान् शिव यास प्रसन्न होऊन त्यांनीं व्याकरणाचीं चौदा सूत्रें याला पढविलीं. तेणें करून हा प्राप्तविद्य झाल्यानें यानें त्या मूळ सूत्रांवर सूत्रपाठ, गणपाठ, धातुपाठ, आणि लिंगानुशासन अशा चार प्रकारांनीं युक्त नवें व्याकरणशास्त्र निर्माण करून तें आपल्या गुरूपुढें आणून ठेविलें. त्यांनीं तें पाहून अत्यंत संतोषित मनानें त्याचा आदर केला. व तें प्रसिद्धीस आणिलें.

पुढें त्यांनीं आपला दुसरा शिष्य कात्यायन त्यास व तिसरा शिष्य व्याडी यास आज्ञा केली कीं, यावर तुह्मी व्याख्या ल्याहा. त्या वरून कात्यायनानें त्यावर वार्तिकें लिहिलीं. व व्याडीनें संग्रह नांवाची व्याख्या लिहिली. या पाणिनीच्या मूळ सूत्रांस, कात्यायनाच्या वार्तिकांस व व्याडीच्या संग्रह नामक व्याख्येस धरून त्यावर पतंजलीनें भाष्य लिहिलें. पाणिनि व त्याचा ग्रंथ अष्टाध्यायी यांचा काळ कोणता त्या विषयीं पहिलें प्रमाण असें आहे. याज्ञवल्क्य स्मृतीवर मिताक्षरा नांवाची जी व्याख्या आहे तींत विज्ञानेश्वर योगी या प्रमाणें लिहितात. "पायादा चंद्रतारं जगदिद मखिलं विक्रमादित्य देवः" या वरून विज्ञानेश्वर योगी विक्रमादित्याच्या वेळेस होता हें सिद्ध होतें. त्यानींच व्यवहाराध्यायांत "व्यवहारान्नृपः पश्येद्विद्वद्भिर्ब्राह्मणैः सह॥" याची व्याख्या लिहितांनां 'सहयुक्तेऽप्रधाने' त्या अष्टाध्यायींतील अध्याय २ पाद ३ सूत्र १९ वें.येणें करून तृतीया झाली असें प्रमाण लिहिलें आहे. अर्थात् पाणिनी या पूर्वींचा होता. दुसरें प्रमाण. पाणिनि व्याकरणावरील महाभाष्यकार जो पतंजलि त्याच्या भाष्याधारें जर भर्तृहरीनें कारिका केल्या.तर त्यांवरून पतंजलि भर्तृहरीच्या पूर्वींचा व त्याच्याही आधींचा पाणिनि असें स्पष्ट होतें.

तिसरें प्रमाण. पाणिनीच्या सूत्रांवरील वार्तिककार जो कात्यायन तो नंदराजाचा सचिव होता. त्याच नंदास चाणक्यानें मारून चंद्रगुप्तास राज्य दिलें. तो काळ स्कंदपुराणांत भविष्या प्रमाणें असा आढळतो:—

ततोपि द्विसहस्रेषु दशाधिक शतत्रये॥ भविष्यं नंदराज्यंच चाणक्योयान् हनिष्यति॥

यावर वरील प्रोफेसरांनीं व्याख्या लिहिली आहे ती चाणक्य शब्दावर पहावी.

सारांश जर कात्यायन नंदराजाचा सचिव असून पाणिनीचा गुरुबंधु होता, तर वरती जो नंदराजाचा काळ लिहिला आहे त्या वेळचा कात्यायन व पाणिनि असल्यामुळें कात्यायनाप्रमाणें पाणिनीस होऊन गेल्यास बत्तीसशांवर वर्षे झालीं आहेत. या विषयीं अपवाद देणाऱ्या इंग्लिशमताचें सदर प्रोफेसरांनीं पाठभेद केल्याबद्दल जें खंडन केलें आहे तेंही येथेंच असलेलें पहावें.

**पादप्रकरणसंगति**– योगराज कविकृत संस्कृत भाषेंत.

**पादुकासहस्र**– वेदांताचार्यकृत संस्कृतांत. याचे श्लोक एक हजार आहेत.

**पानपत**– हा एक प्रसिद्ध गांव यमुना नदीच्या किनाऱ्या लगत आहे. याचे उत्तर अक्षांश सुमारें ३०° व पूर्वरेखांश ७७° आहेत. पेशवे व अफगाण लोक यां मध्यें जी लढाई शके १६८३ त झाली ती येथेंच झाली.

**पांपूर**– हें शहर पद्मराजानें शके ७६६ मध्यें सुमारें वसविलें. [शहर आहे.

**पारसीकदेश**– अफगाणीस्थानाच्या पश्चिमेकडील देश. याची राजधानी तेहेरान नांवाचें

**पाराजीपंत**– समर्थ रामदास स्वामींचे शिष्य कल्याण गोसावी त्यांचा मामा.

**पाराशरमाधवीय**– पाराशर सूत्रांवर माधवाचार्यांनीं केलेला संस्कृत ग्रंथ.

**पारिजातापहरण**– मुक्कुतिमण्णा यानें केलेलें तीन प्रकरणांचें काव्य. हें तामिळ भाषेंत आहे.

**पारीख भक्त**– एक भगवद्भक्त होता. विशेष आढळलें नाहीं. [बन्हू टीका आहे.

**पार्थभाग्य**– भारता पैकीं हें एक प्रकरण आहे. यावर मराठी भाषेंत वामनाची श्लोक

**पार्थसारथी मिश्र**– शास्त्रदीपिका नामक संस्कृत ग्रंथाचा कर्ता. हा कवि काश्मीराकडे राहात होता. (बु. का. शो.)

**पार्वतीपरिणय**– शिवपार्वतीच्या विवाहपर बाण कवीनें रचलेलें नाटक.

**पार्वतीबाई**– सदाशिव चिमणाजी ऊर्फ भाऊसाहेब यांची स्त्री.

**पार्श्वनाथ**– जैन लोकांचा तेविसावा तीर्थंकर. याची जन्मभूमि काशी नजीकचें बेलपुर असें ह्मणतात. हा महावीर तीर्थंकराच्या पूर्वी सुमारें २०० वर्षे झाला होता. (महावीर शब्द पहा). जैन ग्रंथांत याच्या विषयीं असें लिहिलें आहे कीं, शौद्धोदनी बुद्धाच्या शिष्यपरंपरेंत गौतमाचा शिष्य जो विद्यारत्नाकर त्याच्या शिष्यपरंपरेंतील

हा होता.

**पालकराजा**— प्रद्योतराजाचा पुत्र. व विशाखयूप राजाचा बाप. (प्रद्योतराजे ) शब्द पहा.

**पालीभाषा व लिपी**— मागधी भाषा व लिपी ती. संस्कृतांतून मागधी, पैशाची आणि शौरसेनी अशा निघालेल्या ज्या प्राकृत तीन भाषा त्यांतील एक.

**पाशुपतमत**— साहा शैवांतील एक प्रकारचें शिवोपासक मत.

**पिंगला**— भर्तृहरीची स्त्री पद्माक्षी तिनें अग्निकाष्ठें भक्षण करून देहत्याग केला असता चर्पटीनाथांनीं तिला पुनः सजीव करून हें नांव दिलें. व भर्तृहरीस हिच्या समवेत परत राज्यावर पाठविलें.

**पिंगलार्थप्रदीप**— लक्ष्मीनाथकृत संस्कृतांत.

**पिंगळ स्फुरण्णा**— हा कवि नियोगी शाखेचा तैलंग ब्राह्मण होता. कृष्णदेव रायाच्या राज्यांत हा मोठ्या उंच पदवीस चढला असे. तैलंगी भाषेच्या व्याकरणाची यास माहिती उत्तम होती. त्यामुळें लोक याला तैलंग भाषेचा आचार्यच समजत. यानें संस्कृतांत राघवपांडवीय नांवाचें काव्य रचिलें. तें द्व्यर्थ असून त्यांत रामायण व भारत यांतील कथेचें सर्व तात्पर्य यानें आणिलें आहे. या काव्याचीं प्रकरणें साहा आहेत. व असें काव्य रचणें मोठ्या बुद्धीचें काम आहे. (कविच.)

**पिटकन**— या नांवाचा एक परगणा व गांव गुजराथेंत आहे.

**पिठोराराजा**— पृथिवीराय राजासच लोक म्हणत असत.

**पितामहचरित्र**— हा ग्रंथ तैलंग भाषेंत आहे. अन्नयाचारी नामक कवि तो याचा कर्त्ता होता. यांत यानें सृष्टिकर्त्ता ब्रह्मदेवाचें वर्णन केलें आहे.

**पिपाजी राजा**— गडेमंडळ संस्थानचा रजपूत राजा. हा देवीचा मोठा एकनिष्ठ उपासक होता. एकदां असें सांगतात कीं, याच्या गांवीं कित्येक साधु आले. म्हणून यानें त्यांस घरीं भोजनास बोलविलें. आणि त्यांची स्वयंपाकाची वगैरे तर्तूद लाऊन आपण देवीच्या पूजेस बसला. पूजा होतांच देवीस नैवेद्य समर्पण करूं लागला तों ती यास म्हणाली साधुसंत जेवल्याखेरीज मी नैवेद्य घेणार नाहीं. त्यावरून देवीपेक्षां साधु मोठे असा याचा निश्चय झाला. व हा संतास शरण जाऊन त्यांस मजवर कृपा करा असें म्हणूं लागला. त्यांनीं रामानंदास शरण जा म्हणून सांगतांच स्त्रीस समागमें घेऊन व राज्य सोडून हा काशीस गेला, व रामानंदाच्या प्रसादानें कृतार्थ झाला. हा द्वारका इत्यादि ठिकाणीं पुष्कळ हिंडत असतां एकदां अरण्यांत यास वाघ भेटला. त्यास पाहून राणी पळाली. तेव्हां हा तिला ह्मणाला तूं पळतेस कां? जो परमात्मा सर्वव्यापी आहे

तोच त्याच्याही हृदयांत आहे. त्यावरून वाघ निघून गेला. हाच पुढें जन्मांतरीं जुनाग-ड येथें नरसी मेहता झाला. असें भक्तविजयांतील अध्याय २६ या मध्यें महीपतिबावां-नीं लिहिलें आहे.

**पिरली**— वेदमौळी नामक ब्राह्मणाचा पुत्र. वेदमौळी हा तामिळ जातीचा ब्राह्मण होता. तो मो-ठा सदाचार संपन्न व भविष्यवादी असल्या मुळें लोक त्यास सिद्धपुरुष असें समज-त. हा सुमारें दोन किंवा अडीच हजार वर्षां मागें होता, अशी जनवार्त्ता आहे. असें सां-गतात कीं, एके वेळीं रात्रींस वेदमौळी आपल्या आंगणांत उभा असतां त्यानें एक दे-दीप्यमान तारा आकाशांतून अकस्मात् तुटलेला आपल्या गांवांतील एका अंत्यजाचे घरावर पडतांना पाहिला. ती वेळ त्यानें ध्यानांत ठेवून सकाळीं उठतांच माहारवाड्यां-त शोध घेवविला कीं, काल रात्रीं कोणी नवें मूल जन्मास आलें आहे कीं काय? त्या-वरून शोध घेणारानें एका अंत्यजास त्याच वेळेवर एक मुलगी झाल्याचें त्यास ये-ऊन कळविलें. इतकें ऐकतांच वेदमौळी मनांत दचकला. कारण तो भविष्यवेत्ता असल्या मुळें, त्या मुलीचा विवाह आपल्या पुत्राशीं होणार असें त्यास समजलें.

नंतर तो विचार करूं लागला कीं, हा योग टाळण्यास उपाय काय करावा? ती मुलगी जन्मली त्या वेळेस पिरली बारा वर्षांचा होता. व त्यास त्या योगाची गुण-गुणही कळली होती. वेदमौळीनें पुढें असें केलें कीं, गांवांतील सर्व ब्राह्मणांस आप-ल्या घरीं बोलावून आणून सभा केली. आणि मोघम सर्वांस असें कळविलें कीं, का-लरात्रीं एका अंत्यजाच्या घरीं जी एक मुलगी जन्मली आहे तिच्या योगानें ब्राह्मणां-वर मोठें संकट येऊन गुजरणार आहे. तेव्हां पुढें कसें करायाचें! या प्रमाणें ब्राह्मणां-नीं ऐकून व हा प्रामाणिक असल्या मुळें याचें बोलणें प्रमाण समजून सर्वांनीं अंत्यजा-स बोलावून आणून सांगितलें कीं, तुला काल जी मुलगी झाली आहे तिची हानितूं सोसतोस कीं ब्राह्मणांस संकट यावें असें इच्छितोस? त्यानें हात जोडून सर्वांस म्हट-लें महाराज, ब्राह्मणांच्या हिता साठीं तिची हानि सोसण्यास मी राजी आहें. मात्र इत-केंच कीं, तिचा घात करण्यास आपण मला आज्ञा करूं नये. तर मी तिला आपले स्वा-धीन आणून करितों. नंतर आपणांस वाटेल तसें तिचें करावें. इतकें बोलून त्यानें क-न्या आणून ब्राह्मणांच्या स्वाधीन केली. व आपण आपल्या घरीं निघून गेला.

अंत्यजानें आणून दिलेल्या कन्येस ब्राह्मणांनीं पाहून विचार केला कीं, तिचा घात करणें अयोग्य आहे; यास्तव तिला पेटींत घालून नदींत सोडून द्यावें. मग ति-च्या दैवानें होणें असेल तें होऊ. या विचारास वेदमौळीचेंही अनुमत पडून, ब्रा-

म्हणांनीं एक पेटी आणिली. व तींत त्या मुलीस मोठ्या बंदोबस्तानें घालून कावेरी नदींत तिला त्यांनीं सोडून दिलें. ती मुलगी पेटींत घालतांना जसी सर्वांनीं पाहिली, तशीच पिरली तेथें उभा होता त्यानेंही पाहिली. परंतु याच्या पाहण्यांत विशेष असें होतें कीं, तिच्या मांडीवर आकृतिविशेषाचा असलेला सतेज तीळ याच्या लक्षांत जसा राहिला तसा कोणाच्याच राहिला नाहीं.

कन्या पेटींत घालून सोडलेली पेटी कावेरी नदींतून वाहात चालली असतां दूरदेशीं एका गांवाजवळच्या किनाऱ्यास लागली. तो किनारा ब्राह्मणमंडळीचा स्नान संध्या करण्याचा घाट होता. व त्या वेळेस कोणी एक विद्वान् ब्राह्मण तेथें संध्या करीत बसला होता. त्यानें पेटी पाहून तत्काळ ती मोठ्या आस्थेनें उघडली. व पाहतो तों एक नुकतीच जन्मलेली मुलगी तींत आहे. तिला पाहून त्यास आल्हाद जाहला. कारण, तो अनपत्य असून संततीची त्यास अतिशय उत्कंठा होती. सारांश ती मुलगी त्यानें मोठ्या प्रेमानें घरीं आणिली. व तिला चांगल्या रीतीनें वाढवून हौसेनें त्यानें तिला मुख्यत्वें करून नीतिशास्त्रांत प्रवीण केलें.

या प्रमाणें ती मुलगी तेथें वाढत असतां कांहीं काळानें पिरलीचा बाप वेदमोळी परलोकवासी झाला. त्यामुळें घरांतून बाहेर पडावें असें त्यास वाटलें. कारण, बापापासून झालेलें थोडें अध्ययन पुरें करावें असें त्याच्या मनांत होतें. मग त्यानें आपला गांव लवकरच सोडला. आणि अध्ययना करितां गांवोगांवीं फिरून पढविण्याजोग्या विद्वानांचा शोध आरंभिला. फिरतां फिरतां दैवयोगानें अशी गोष्ट घडली कीं, ज्या गांवीं व ज्या ब्राह्मणाच्या घरीं ती मुलगी वाढत होती त्याच्याच घरीं तो येऊन उतरला. ब्राह्मणानें पिरलीस मोठ्या आदरानें उतरण्यास जागा दिली, व त्यास चांगलें भोजन दिलें. नंतर दुसऱ्या दिवशीं त्याची विचारपूस करितां ब्राह्मणांस कळून आलें कीं, त्यास अध्ययनाची उत्कंठा आहे. व पिरलीसही कळलें कीं, तो ब्राह्मण चांगला विद्वान् असून त्याला पढविण्याची आवड आहे. सारांश. अशा कारणावरून पिरली त्या ब्राह्मणाच्याच घरीं राहून विद्याभ्यास करीत राहिल्यानें थोड्याच वर्षांत तो चांगला विद्वान् झाला.

पिरली तेथें अध्ययन करीत असतां त्याची बुद्धि व सदाचारसंपन्नता ब्राह्मणानें अवलोकन करून मनांत आणिलें कीं, आपपास पुत्र नाहीं. कायती एवढी सांपडलेली कन्या मात्र आहे. यास्तव ही यास देऊन याला घरजांवई करावा. ही गोष्ट त्यानें पिरलीस पुसली. तेव्हां तो म्हणाला मला आपण आज्ञा कराल ती मान्य आहे. यास्या-

च्या अनुमता वरून त्या ब्राह्मणानें ती मुलगी मोठ्या समारंभानें विवाहविधिपूर्वक पिरलीस दिली.

या गोष्टीस बराच काळ लोटला. व पिरलीची आणि त्याच्या बायकोची परस्परांवर मोठी प्रीति जडली. कारण विद्या वय आणि सदाचार या गुणांनीं तीं उभयतां एकमेकांस साजण्यासारखीं होतीं. या प्रमाणें चालतां चालतां, एकदां असें झालें कीं, पिरलीची बायको न्हाऊन कोरडें वस्त्र नेसत असतां पूर्वीं पाहिलेला तिच्या मांडीवरील तीच लखदिशीं एका एकीं त्याच्या दृष्टीस पडला. त्या बरोबर त्यास मागील गोष्टीची आठवण होऊन त्याच्या पोटांत धस्स झालें. परंतु खुणेसारख्या खुणा दुसऱ्या जागीं नसतातच असा नेम नाहीं. तशांत ज्याचे आपण जांवई आहों तो ब्राह्मणही सामान्य नाहीं. इत्यादि विचार त्याच्या मनांत येऊन, ती गोष्ट त्यानें त्या वेळेस मनांतून घालविली. यासही कित्येक महिने लोटले. तों एके वेळीं यास असा पत्ता लागला कीं, पेटींत घातलेली मुलगी जी कावेरी नदींत सोडून दिली तीच पेटी या ब्राह्मणांस सांपडून ही मुलगी त्यानें पाळिली, व तिशींच आपला विवाह झाला. त्यावरून आपल्या बापानें केलेल्या भविष्याची त्यास स्मृति होऊन आपल्या प्रियकर सासऱ्यास व बायकोस यानें या गोष्टीची कांहीं एक ओळख न देतां, आपण सर्वथैव भ्रष्ट झालों असें समजून दुःखें करून कोणास कळूं न देतां त्याच दिवशीं त्यानें देशांतरीं गमन केलें.

पिरली गेला तो आतां येईल घटकेनें येईल, अशी वाट पाहतां पाहतां तो दिवस निघून गेला. या प्रमाणें आठवडा गेला महिना गेला. तरी त्याचा ठिकाण नाहीं. असें पाहून त्याच्या बायकोनें अतिशय शोक आरंभिला. तसेंच तिच्या बापासही अतिशय दुःख झालें; परंतु तो वृद्ध असल्या मुळें त्याच्यानें जांवयाच्या शोधास जाववेना. व कन्येचाही शोक उणा होईना. या दोन कारणांवरून त्यानें मुलीस सांगितलें कीं, आतां तुझ्या नवऱ्याचा तूंच शोध लाव. मी तर मजकडून तुझें होईल तितकें बरें केलें. परंतु तुझ्या प्रारब्धास मी काय करावें? असें बापाचें बोलणें ऐकून ती त्याच्या आज्ञेनें नवऱ्याच्या शोधास निघून चालती झाली.

पिरलीची बायको जी निघाली ती गांवोगांव त्याचा शोध करीत चालली. या प्रमाणें जातां जातां त्याची व तिची एक्या गांवीं अकस्मात् गांठ पडली. तेव्हां तिनें त्याची पाठ न सोडतां त्यास बहुतां प्रकारें विनवून म्हटलें कीं, आपण घरीं चलावें; परंतु तो ऐकत नाहीं असें पाहून निरुपाय होऊन तो जिकडे जाईल तिकडे त्याच्या मागें ती हिंडूं लागली. अशा रीतीनें जरी तिनें त्याचा पिच्छा घेतला व कित्येक वेळां त्यागाचें कार-

ण विचारिलें तरी त्यानें तिला कधीं तूं म्हणजे अशी अशी आहेस. याबद्दल चकारशब्द बोलूनही दुखविलें नाहीं. या प्रमाणें हिंडतां हिंडतां एके दिवशीं तीं दोघें एका गांवीं रात्रीं मुक्कामास उतरलीं. तेथें निजल्यावर मध्यरात्रीं तिला झोंप लागली असें यानें पाहून तेथून मुकाट्यानेंच प्रयाण केलें. नंतर पहांटेस ती जागी होऊन पाहत्ये तों नवरा जवळ नाहीं म्हणून ती रडूं लागली. व सूर्योदय होतांच तेथून दुसऱ्या गांवीं जाण्यास निघाली. त्या गांवीं पोहोंचतांच तिला एक्या हिन्दू श्रीमान् गृहस्थानें पाहून विचारिलें मुली तूं कोठून आलीस? व अशी दीन कां आहेस? त्यावरून तिनें त्यास आपलें सर्व खरें वर्तमान सांगितलें. तें ऐकून त्या सज्जन गृहस्थास तिची दया येऊन त्यानें तिला धर्मकन्या म्हणून आपल्या घरीं नेलें.

पुढें सुमारें एक वर्षानें तो गृहस्थ मरण पावला. परंतु मरतांना त्यानें आपली सर्व जिंदगी मुलांस वांटून देतांना एक भाग हिच्या नांवाचा काढून तो लागलीच तिला देवविला. तो पाहून हिनें त्यावर एक अन्नसत्र घातलें. त्या मुळें शेंकडों लोक तेथें उतरण्यास येऊन जेऊन जाऊं लागले. या प्रमाणें अन्नसंतर्पण करीत व आपलें आयुष्य सदाचरणांत घालवीत तिनें बरेच दिवस लोटिले. असें होतां होतां त्याच अन्नसत्रांत एके दिवशीं फिरत फिरत तेथें पिरली येऊन जेवायास उतरला. तेव्हां तिनें इतर पांथस्था प्रमाणें याचाही सत्कार केला व यास भोजन दिलें. भोजन झाल्यावर पिरलीनें सहजगत्या आपण कोण वगैरे हकीकत पुसली. कारण यानें तिला मुळींच ओळखलें नव्हतें. त्यावरून तिनेंही यास न ओळखून आपली हकीगत सारांशानें त्यास कळविली. तीवरून यास तिची ओळख पटून व तिचा उत्तम आचार व पातिव्रत्य पाहून अतिशय गहिंवर आला. परंतु तो दाबून तिला ओळख न देतां तो तसाच निजावयास गेला.

नंतर तो पहाटेस उठून व गांठोडें खांद्यावर घेऊन निघाला असतां ती हा चांगला व विद्वान् मनुष्य आहे असें जाणून त्यास आपल्या दारापर्यंत पोंहोंचविण्यास आली. त्या वेळेस जें तिनें सत्काराचें भाषण केलें तें ऐकून यास जो हुंदका आला, त्या योगानें हा खालीं बसला. व गांठोडें भुईवर ठेवून तिला यानें एकदम ओळख दिली. व इतःपर तुला सोडून जाणार नाहीं असें वचन दिलें. नंतर तीं उभयतां सुखानें नांदूं लागून त्यांनीं तेथें बराच काळ कंठिला.

कांहीं दिवसांनीं पिरली पासून तिला अव्हेयर, आपग्गा, वालीज, आणि मुरग्गा अशा चार मुली, व तेरूवेलुवर, आधिकमॉन आणि कपिलर असे तीन मुलगे, मिळून

सात मुलें झालीं. परंतु तीं सर्व एकाच गांवीं झालीं नाहींत. जसजशीं हीं उभयतांहिं-डून व जें जें मूल जेथें जेथें उपजे तें तें त्या गांवा जवळच्या अरण्यांत सोडून यानीं पुढें चालतें व्हावें. अशा रीतीनें झालीं. याचें कारण पिरलीनें बायकोस कधींच सांगितलें नाहीं. व तिनेंही यास हें तुह्मी असें कां करतां? म्हणून पुसलें नाहीं. मात्र जें जें मूल जेथें जेथें नवरा सोडी तेथें वस्ती झाल्यास ती त्याकडे वारंवार जाऊन त्याचा समाचार घेई. व अनेक प्रकारें शोक करून परत येई. असें सांगतात कीं, ज्या ज्या मुला जवळ ती ज्या ज्या वेळेस शोक करीत बसे त्या त्या वेळेस त्यास वाचा फुटून तें तिचें असें समाधान करी कीं, ज्या समर्थ ईश्वरानें मला उत्पन्न केलें. तो माझें संरक्षण करण्यास शक्तिमान् आहे; यास्तव तूं शोक करूं नको. सारांश तीं सात मुलें वेगवेगळ्या जातीच्या घरीं मोठ्या चमत्कारानें वाढून त्यांचा तेथें सांभाळ झाला. ही हकीकत तामिळ भाषेंत कांडप्र नांवाच्या ग्रंथांत सविस्तर लिहिलेली आहे, असें कविचरित्रकारांनीं लिहिलेलें आहे. (कविचरित्र)

**पिलाजी गायकवाड**— जनकोजीचा मुलगा. दमाजी गायकवाडाचा पुतण्या. दमाजीच्या मागें हाच गादीचा अधिकारी झाला. यानें शके १६४२ पासून १६५३ पर्यंत गादीचा उपभोग घेतला. व पुढें मरण पावला. (हिंदु. छा. इति.)

**पीठोपासकमत**— पहिल्या शंकराचार्यांच्या पूर्वीं असलेलें मत. यांत नंदीची पूजा करणें प्रधान आहे. (आनं. शंक.)

**पीलूमत**— परमाणुवादाचें मत. म्हणजे परमाणु नित्य आहे असें मत. जसें "पृथिवीद्विविधा। नित्यानित्याच" "नित्या परमाणुरूपा अनित्या कार्यरूपा" या मताच्या वाद्याशीं श्री शंकराचार्यांनीं वाद करितांनां परमाणूंस उत्पत्ति आहे असें सिद्ध करून दाखवून "यज्जन्यं तदनित्यं" म्हणजे जें जें उत्पत्तीस योग्य तें तें अनित्य असें सांगून या मताचें खंडन केलें. (आनं. शंकर.)

**पुंडरीक**— हा जातीचा ब्राह्मण होता. व मोठा विद्वान्‌ही असे. जैनलोक असें म्हणतात कीं, युधिष्ठिर शक १७२४ मध्यें विद्यारत्नाकर नांवाच्या एका जैनपंडिताशीं याचा वाद होऊन त्यांत याचा पराभव झाला. व हा जैनधर्म स्वीकारून अहिंसा धर्मा प्रमाणें आचरण करूं लागला. हा वाद भीमरथीच्या तीरीं म्हणजे भीमा नदीच्या कांठीं असणाऱ्या लोहदंड क्षेत्रांत झाला. व त्यावेळेस चंद्रगुप्ताचा मुलगा, व अशोक राजाचा बाप वारिसार त्याची राज्यकीर्द होती. जर ही वर लिहिलेली गोष्ट खरी असेल तर या गोष्टीस आज गतकलीच्या ४९८० व्या वर्षी ३२५६ वर्षें झालीं आहेत. असें

म्हटलें पाहिजे. परंतु यास आणखी कांहीं प्रमाण मिळणें अवश्यक आहे. आणि तें मिळाल्यास, मग याचा निर्णय करणें न्यायाचें होणार आहे. इतकें आह्मांस येथें लिहिण्याचें कारण असें आहे कीं, युधिष्ठिर शक १७२५ विरोधकृत संवत्सरीं आषाढ शुद्ध ११ बुधवारीं त्या जैन पंडितानें जी मूर्ति स्थापिली तिच्या आकृतीचें वर्णन असें केलेलें आढळतें.

नेमिनाथस्य या मूर्ति स्त्रिषु लोकेषु विश्रुता॥ द्वौहस्तौ कटिपर्यायें—
स्थापयित्वा महात्मनः॥ १॥ मूर्तिस्तिष्ठति सासम्यक् जैनेंद्रेणाच पूजिता
अहिंसा परमं धर्मं स्थापयामासवैसच्च॥ युगैस्तु मनुजास्त्रीणि विप्र-
भूमिश्च वासके॥ मेलने धर्मराजस्य शकस्यच गतावधिः॥ आषादे शु-
क्लपक्षेतु एकादश्यां महातिथौ॥ बुधेच स्थापया मास विरोध कृतिवत्सरे॥ (जैनग्रंथ.)

हें वर्णन हल्लीं जी पंढरीस विठ्ठलमूर्ति आहे तिच्या आकृतीशीं जमतें. मात्र काळांचा मेळ पडत नाहीं. कारण नामदेवानें लिहिलेल्या आरतींत हा देव अठ्ठावीस युगांचा असून जैन स्मरिं साडेबत्तीसशें वर्षांचा ह्मणतात. म्हणून यास बलवत्तर असें दुसरें प्रमाणाच मिळालें पाहिजे. त्या शिवाय याचा निर्णय होणें नाहीं. सारांश पुंडरीक पंडित—'प्रल्हादनारद पराशर पुंडरीक'- या श्लोकांत लिहिलेला तोच हा असें तूर्त म्हणतां येत नाहीं.

पुंडलीक— पुंडरीक तोच.

पुंड्रदेश— मुर्शिदाबादेच्या आसमंतातचा प्रदेश हा होय. असें प्राचीन नकाशा वरून दिसतें.

पुणतांबें— याचें जुनें नांव पुण्यस्तंभ. हें गोदावरीच्या कांठीं आहे.

पुणें शहर— हें शहर महाराष्ट्र देशरूप वर्तुळाचा मध्यबिंदु मानलेलें आहे. हें पूर्वीं लहान कसबा होतें. बाजीराव बल्लाळ पेशवे यांच्या कारकीर्दी पासून यास चढती कळा आली. या जवळ मुळा व मुठा या दोन नद्यांचा संगम झालेला आहे. आणि हें सुमारें १९ उत्तर अक्षांश व ७४ पूर्वरेखांशांवर आहे. या शहरचा राजा कोंकणस्थ ब्राह्मण होता. म्हणून येथील भाषा, येथील रीत रिवाज, येथील पेहेराव व येथील आचार विचार वगैरेचें वळण, केवळ महाराष्ट्र देशांतच नव्हे, तर अन्यस्थळींही लोक मोठ्या आल्हादानें घेऊन आपली सुधारणा करीत. अशी याची योग्यता होती. परंतु धाकटे बाजीरावा पासून यास जी उतरती कळा लागली आहे तिची दिवसें दिवस वृद्धि आहे. आणि त्या मुळें ती योग्यता याची नष्ट झाली आहे. धाकट्या बाजीरावींत आरंभीं या शहरांत ब्राह्मण जातीच्या स्त्रियांमध्यें इतका विलक्षण व्यभिचार वाढला कीं, कु-

ळवंतिणी व कसबिणी यानीं सुद्धां त्यांचें दास्य करावें. याच गोष्टीस अनुकूळ असें पुढें इंग्रजी राज्य होऊन त्यांतील खुषीचा कायदा सुरू झाल्यानें जें त्यांस बळ आलें, तें तरआज इतकें अनिवार्य आहे कीं, कित्येक ब्राह्मण स्त्रियांस आपण कोणत्या वर्णाच्या आहों, कोणत्या कुळांत जन्मलों व आपण जें कर्म करितों त्यास आपल्या खालच्या वर्गाचे लोक किती निंद्य मानितात, याचें बिलकुल भान राहिलें नाहीं. हीच गोष्ट पुरुषांचीही झाली आहे. पूर्वीं कोणास रांड राखणें किंवा रांडेच्या घरीं जाणें म्हणजे पराकाष्ठेचें चोरून जावें लागे. व तसें करणारा पुरुषही पांच पंचविसांत एकादा असे. तो निर्बंध हल्लीं अगदीं सुटून जाऊन पुरुष इतके बेशरम झाले आहेत कीं, त्यांस त्या कामाची लज्जा म्हणून मुळीं राहिलीच नाहीं. तसेंच आपण कोणत्या कुळांतले, आपल्या वडिलांनीं कसकसे पराक्रम करून नांवलौकिक व जहागिरी वगैरे मिळविल्या, त्या गोष्टी चट सगळ्या गुंडाळून ठेऊन ऐत्या असलेल्या उत्पन्नाची सुद्धां त्यांस व्यवस्था राखण्याची अकल राहिली नाहीं. चोरी चाहाडी आणि खोटी शपथ वगैरे खुनापर्यंत कर्में हीं अतिशय वाढलीं आहेत. येथपर्यंत ही गोष्ट जुन्या लोकांची झाली. आतां नवीन लोकांची गोष्ट येणें प्रमाणें आहे :—

पेशवाईंत दारूकलालीचा मक्ता सरसालचा सुमारें वीस रुपयांपर्यंत होता. तो आज सालीना एक लाख रुपयांच्या वर जाऊन बसला, इतकी दारू पिणारांची संख्या वाढली आहे. आणि त्यामुळें शक्तिउपासकांस त्या लोकांपुढें निस्तेजता आलें आहे. व्यभिचार थोडासा माजी पडून तो पुनर्विवाच्या रूपानें पुढें सरकला आहे. वेदोक्त ईश्वरोपासना करणें बाजूस राहून इतर रीतीनें ती करण्या विषयीं ब्रह्मसमाजादिक अनेक गोड गोड व तरुण पंथ निघाले आहेत. वेदशास्त्राध्ययन (फलॉरिजेवर) जाऊन बसल्या कारणानें गोऱ्या विद्येनें पाय पसरून अघळपघळ ठाणें दिलें आहे. शेंकडों लोकांनीं आपला धर्म पुरा समजून न घेतां भ्रमिष्टपणानें व कित्येकांनीं पोट जाळण्याच्या हेतूनें धर्मांतर केलें आहे. सारांश पुणें व याच वर्गांतली मुंबई येथील लोकांचें कोणास प्रत्यक्ष वळण घेणें झाल्यास त्यानें वर लिहिलेल्या गोष्टींचें घ्यावें, ही स्थिति या नामांकित शहराची झाली आहे.

पुणे शहराच्या संबंधानें आम्हीं त्यांतील पेंठा व त्या कोणी वसविल्या इत्यादि सांगण्याचें सोडून हें सांगितलेलें अप्रासंगिक असें कोणी ह्मणेल तर त्याचें उत्तर असें आहे कीं, या शहराची पूर्वींची व हल्लींची स्थिति लोकांच्या नजरे पुढें आणून देऊन त्यांस चांगल्या वाईटाचा निर्णय करण्या जोगें करणें हें काम इतिहासहस्या

जर आह्मांकडे आलें आहे, तर तें न लिहिणें रास्त होणार नाहीं. जाणून तें येथें लिहिलें आहे. आणि याच कारणामुळें त्यास प्रासंगिकही आहे. तथापि तेंच पाहण्याची ज्यांची इच्छा असेल त्यांनीं पुणे शहराचें वर्णन पहावें.

**पुण्यराज**– भर्तृहरीच्या वाक्यपदीय ग्रंथावरील व्याख्याकार.

**पुण्यस्तंभ**– यास हल्लीं पुणतांबें म्हणतात.

**पुत्रक**– पाटलीपुत्र नगराची स्थापना करणारा ब्राह्मण. (पाटलीपु॰ श॰ पहा॰)

**पुनंपुनानदी**– गयेजवळ असणाऱ्या चंपकारण्यांतील नदी. हिच्या तीरीं पहिल्या बुद्धाचें जन्म झालें.

**पुरंजयराजा**– मगध देशाचा राजा जरासंध त्याच्या वंशांत झालेला कलियुगांतील राजा. विश्वजित् राजाचा पुत्र. यास रिपुंजय असेंही नांव आढळतें. याचा प्रधान शुनक नांवाचा होता. व त्यानें यास मारून आपल्या प्रद्योतनामक पुत्रास राजा केलें. ही गोष्ट युधिष्ठिर शकाच्या ११व्या शतकांत झाली. (राजमा॰).

**पुरंदरकिल्ला**– पुण्यापासून १० कोसांवर आहे. या खालीं वसलेल्या गांवास सासवड म्हणतात. येथें बाळाजी विश्वनाथ मूळ पेशवा व त्याचे कित्येक सरदार यांचे वाडे आहेत.

**पुरंदरविठ्ठल**– विठ्ठलपंत पुरंदरे नांवाचा हा गृहस्थ सासवडकर पुरंदरे यांच्या घराण्यांतील होता. यास कांहीं नेमणूक करनाटकांत होती म्हणून हा तिकडेच राहात असे. हा कानडी भाषेंत पदें वगैरे कविता करणारा नामांकित कवि होऊन गेला. यास होऊन गेल्यास सुमारें दीडशें वर्षें झालीं असें ह्मणतात. (इन्दुमा॰).

**पुरिमान्**– आंध्रभृत्य राजांतील पंचविसावा राजा. गोमति राजाचा पुत्र व मेदःशिरा राजाचा बाप. (राजमा॰).

**पुरी**– जगन्नाथपुरी ह्मणजे जगन्नाथ क्षेत्र त्यासच हें नांव आहे.

**पुरीबाई**– डांकुरा जवळ उमरेट नामक गांवची राहणारी ही बाई जातीची गुजराथीण होती. सीतास्वरूप वर्णन या नांवाची हिची कविता प्रसिद्ध आहे. हिचा काळ आह्मांस समजला नाहीं. (काव्यदो॰)

**पुरुषपरीक्षा**– विद्यापति कविकृत संस्कृत भाषेंत.

**पुरुषपुर**– पेशावर शहराचें जुन्या नकाशांत लिहिलेलें नांव.

**पुरुषभीरु**– आंध्रभृत्य राजांतील बारावा राजा. तलकाचा पुत्र. व सुनंदनाचा बाप. (रा॰)

**पुरुरवाचरित्र**– हा ग्रंथ तेलंगी भाषेंत अब्बन कवीनें केलेला आहे. याचे तीन भाग आहेत.

१. पुणें शहराचें वर्णन प्रसिद्ध विष्णु नृसिंह जोशी पुणें संस्कृत पाठशालेंतील ज्योतिष शास्त्राचे माजी गुरु यांचे चिरंजीव नारायण विष्णु जोशी यांनीं लिहिलें आहे.

त्यांमध्यें पहिल्यांत पुरूरवा राजाचें जन्म. दुसऱ्यांत राज्यव्यवस्था. आणि तिसऱ्यांत त्याचा विवाह येणेंप्रमाणें वर्णन आहे.

**पुरुषोत्तम**– कलिंगदेशांत कटक म्हणून जें शहर आहे तेथील हा राजा. शालिवाहनाच्या चवदाव्या शतकांत तेथें राज्य करीत होता. हा जातीचा ओरिसा क्षत्रिय असे. संस्कृत भाषेंत हा चांगला प्रवीण होता. व यानें शाळांतून संस्कृत पढणाऱ्या मुलां करितां पंडितांच्या साह्यानें हारावली, त्रिकांडशेष आणि एकाक्षरी असे तीन कोश रचिले. ते हल्लीं सर्वत्र प्रसिद्ध आहेत. (कविच०).

२– परिभाषा वृत्तीचा कर्ता. हा कवि काश्मीराकडे होऊन गेला. ( बुल्ह० शोध.)

**पुरुषोत्तमप्रकाश**– निष्कुळानंदकृत गुजराथी भाषेंतील ग्रंथ.

**पुरुषोत्तममहाराज**– एक भगवद्भक्त. (नाभा. भक्त. ग्रंथ.) पहा.

**पुरुषोत्तमसहस्रनाम**– वल्लभाचार्यकृत संस्कृत ग्रंथ. यांत कृष्ण जो पुरुषोत्तम त्याचीं सहस्र नांवें आहेत.

**पुलिंद**– शुंग अथवा संग राजांतील साहावा राजा. भद्रकाचा पुत्र व घोषराजाचा बाप. (रा. मा.)

**पुलिंददेश**– सोहागपुराच्या आसमंतातचा देश. (प्रा. म.)

**पुलिंदलोक**– अटक नदीकडील रानटी लोक.

**पुष्कर**– सूर्यवंशी कलियुगांतील राजा. सुनक्षत्र राजाचा पुत्र. व अंतरिक्ष राजाचा बाप. (रा. मा.)

**पुष्पदंत**– जैन लोकांच्या चोवीस तीर्थकरांतील नववा.

**पुष्पपुर**– पाटलीपुत्र नगराचें नांव. यास कोणी कुसुमपुर असेही म्हणतात.

**पुष्पमित्र**– शुंग अथवा संग राजांतील पहिला. हा मौर्य राजांतील शेवटला राजा बृहद्रथ त्याचा प्रधान होता. व त्यासच मारून पुढें आपण राजा झाला. (रा. मा.)

**पुष्पोत्तर**– जैनांनीं आकाशांत मानिलेला एक लोक.

**पुष्टिप्रवाहमर्यादा**– वल्लभाचार्यकृत संस्कृत ग्रंथ.

**पुष्टिमार्ग**– वल्लभाचार्यांनीं आपल्या संप्रदायाचें ठेविलेलें नांव. (मारपा.) शा. पहा.

**पूर्णपत्तन**– नेहरवाला प्रांतांतील शहर. येथें कुमारपाल नांवाचा पूर्वीं राजा होता (कु.

**पूर्णप्रज्ञ**– मध्वाचार्यांनें ज्या नांवानें आपलें द्वैतमत स्थापिलें त्याचें नांव. म्हणजे त्या मतास पूर्णप्रज्ञदर्शन असें नांव पडलें. (सर्वद. सं.)

**पूर्णभगवच्चरणसेवक**– भवानीचा उपासक (आनं. शंक. प्र. १९).

**पूर्वमीमांसा**– जैमिनीकृत कर्मकांडपर सूत्रें. याचे अध्याय १२ आहे. व यावर कुमारिल भट्ट आणि शबर स्वामी यांचीं भाष्यें आहेत.

**पूर्णसमय**– कालवादी मताचा एक क्षपणक याच्या विषयीं आनंदगिरीनें आपल्या शंकरविजयांतील प्रकरणांत असें लिहिलें आहे. हा श्रीमच्छंकराचार्यांकडे येऊन म्हणाला माझ्या मताची परीक्षा घ्या. त्या वरून आचार्यांनीं यास सांगितलें गडबड करूंनको. सध्या बरोबर ऐस. पुढें तुझें मत पाहूं. त्यावरून हा आचार्यां बरोबर सहा महिने हिंडत असतां एके दिवशीं यानें प्रार्थना करून असें म्हटलें:–

॥गद्य॥ "पूर्वोक्त क्षपणकः परमगुरुं नत्वा इदमाह॥ स्वामिन् भवदाश्रय-
"स्थेन मया षण्मास कालोऽनुभूतः। इतः परं मन्मत परीक्षां कुरुध्वं
"आचार्य आह. भवत्कर धृतस्य यंत्रस्य लक्षण मुक्त्वा शीघ्रं गच्छ। स आ-
"ह इदं किल गोल यंत्रं। तदंतर्वर्ति गोभू पिंडस्य नित्यमधः पतन शी-
"लस्यानुकूल वृत्त्या सर्व ग्रहर्क्ष मंडलोपेतं समांतर मनुगच्छति। आचा-
"र्य आह. आदौ कालो नित्य इतिचेत्संवत्सरः कालः "तस्मात्संवत्सरोऽ-
"जायतेति" श्रुत्या कालस्य जन्यत्वादनित्यत्वं। अन्यच्च पृथिवी नित्यम-
"धः पततीति यत्त्वया उक्तं तदप्रमाणं। सूर्यसिद्धांत वचनात्॥

अर्थः– आचार्य ह्मणतात तुझ्या हातांतील यंत्राचें लक्षण सांगून येथून लवकर चालता हो. तो म्हणतो. याला गोलयंत्र ह्मणतात. याच्या अंतर्वर्त्ती असणारा जो भूपिंड त्याला नित्य अधःपतन आहे. म्हणून त्याला अनुकूल असें सर्व ग्रहनक्षत्र मंडल समांतर गमन करितें. आचार्य ह्मणतात. आधीं काल नित्य आहे असें म्हणतोस त्यास संवत्सर म्हणजे काल आहे. आणि संवत्सरास उत्पत्ति आहे म्हणून श्रुति म्हणत आहे. अर्थात् उत्पत्ति धर्मामुळें काल अनित्य आहे. आतां पृथ्वी नित्य खालीं चालली आहे ह्मणतोस. परंतु हें तुझें बोलणें अप्रमाण आहे. कारण तें सूर्यसिद्धांताशीं विरुद्ध आहे. त्यावरून तो मुकाट्यानेंच निघून चालता झाला. (आनंदगि॰ शांक॰ प्रक॰ ४६). यानेंच पूर्वीं प्रकरण २७ यांत जिन शब्दाची व्याख्या केलेली तिचें दिग्दर्शन आह्मीं लिहिलेलें त्या विषयीं जिन शब्द पहा.

**पूर्णानंद**– एक भवानी उपासक.

**पूर्णानंदस्वामी**– शिवरामस्वामी व निजानंद स्वामी या उभयतांचे गुरु.

**पूर्वारंभ**– समर्थ रामदास स्वामीकृत ओंवीबद्ध स्फुट ग्रंथ. याची आरंभींची रचना प्रश्नोत्तरांसारखी असून चमत्कारिक आहे.

**पृथ्वीपाळ**– वीरसेन वंशीय शेवटला राजा. याची राज्यकारकीर्द युधिष्ठिर शक समारें २७६९ व्या वर्षीं आरंभली व यानें राज्य ३१ वर्षें ८ महिने १२ दिवस केलें. याच्या

राज्य कारकीर्दीच्या सुमारें चोथ्या वर्षीं कुमारिलभट्टानें अग्निप्रवेश केला. व एकवि-साव्या वर्षीं भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्य आपल्या वयाच्या ३२व्या वर्षीं म्हण-जे युधिष्ठिर शक २७१९ मध्यें सर्वत्र उत्तम प्रकारची धर्मस्थापना करून निजधामाप्रत पावले. सारांश हा राजा आचार्यांच्या मागें १० वर्षें होता. व हा मरण पावल्यावरया-चा वजीर नरहरिनाथ तो राज्य करूं लागला. (हिं० इ० इ० व जैन ग्रंथ.)

**पृथिवीपाळवंश**— धीरधीर वंशांतील शेवटचा राजा विक्रमचंद् त्यास यानें मारून दि-ल्ली येथें आपण राज्य करूं लागला. यांत पृथिवीपाळा पासून पृथ्वराज ऊर्फ (पिठो-रा राजा) त्या पर्यंत ज्यांनीं राज्य केलें त्यांचीं नांवें व राज्यकारकीर्दीचीं वर्षें खा-लीं लिहिल्याप्रमाणें आहेतः—

एकंदर ७०९ व. ३ म. २६ दि.

| राजांचीं नांवें. | वर्षें | म० | दि० | राजांचीं नांवें. | वर्षें. | म. | दि. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| पृथिवीपालराजा... ... | १४ | ७ | १७ | मध्यंतरींच्या राजांचीं नावें आंढळत नाहींत. | ६०३ | ० | ० |
| उज्जनपाल... ... ... | ११ | ६ | ११ | | | | |
| उदेपाल... ... ... | २७ | ३ | १४ | शेवटचा राजा पृथ्वराज ऊर्फ पिठोरा. | ३६ | ४ | २५ |
| चैनपाल. ... ... ... | १६ | ५ | १९ | | | | |
| | ६९ | ११ | १ | | ६३९ | ४ | २५ |

या प्रमाणें हे राजे दिल्ली येथें झाले. या विषयीं (दिल्लीचें राजघराणें) हा शब्द पहा.

**पृथिवीराज विजयटीका**— जोनराज कविकृत संस्कृत भाषेंत.

**पृथिवीराय**— अजमीर येथील पृथुराज चव्हाणनामक राजा तोच. हा दिल्ली येथील तुवार उपनामाच्या राजाच्या मुलीचा मुलगा होता. तुवार राजा निपुत्रिक होता. म्हणून त्याणें मरतांना यास दिल्लीच्या राज्याचा अधिकारी केलें. त्या मुळें तुवार आणि चव्हाण या दोन्ही वंशाचा मुख्य पुरुष एकच झाला. चांदबराई ज्यास चां-दभाट म्हणत. तो याच राजाच्या पदरीं होता. (हिं० छा० इ०)

**पृथ्वराजचव्हाण**— पृथिवीराय तोच. यासच पिठोरा राजा असेंही म्हणत. यानें हिंदीभा-षेंत पृथुराजरसन नांवाचा ग्रंथ लिहिला. या राजास शाहाबुद्दीन यानें शके ११११५ मध्यें ठार मारिलें. व अजमीर आणि दिल्ली येथील हिंदुराजांची बादशाही निर्मू-ळ केली. सारांश दिल्लीच्या गादीवरील शेवटचा हिंदुराजा हा होता. व याच्या म-रणानें हिंदूंचीं गादी मोडली जाऊन मुसलमानांची बादशाही दिल्ली येथें चालू झाली. (हिंदु० छा० व हस्तलि० इ०)

**पृथुराजरसन**— पृथुराज चव्हाणानें केलेला ग्रंथ. हा हिंदिभाषेंत आहे. (बुल्ह० शा०)

**पेदुभट्ट**– जगन्नाथराय पंडिताचा बाप व गुरु.

**पेद्दवीरन्ना**– चिन्नवीरन्नाचा भाऊ. याच्या हकीकती विषयीं (चिन्नवीरन्ना) शब्द प॰

**पेद्दीभट्ट**– हा कवि कोलचन वारु कुळांतील तैलंग ब्राह्मण होता. एवीर प्रांतांतील प-रिमीनामक खेड्यांतील हा रहिवासी असे. शालिवाहनाच्या तेराव्या शतकांत सर्वज्ञशिं-ग मनिडु त्याच्या कारकीर्दीत याचा उदय झाला. हा तीस वर्षांच्या वयाचा होई तों प-र्यंत अगदीं विद्याशून्य होता. हा केवळ अभ्यास करीतच नसे, असें तर नव्हतेंच. परं-तु सकाळचा पाठ संध्याकाळीं विसरे. त्या मुळें याचे सोबती यास हंसत. एकदां असें सांगतात कीं, हा हातांत पुस्तक घेऊन गुरूनें दिलेल्या पाठाची चिंतनिका करीत ब-सला असतां, यास त्यांतील मर्म काय तें कांहींच ध्यानांत येईना. या वेळीं याची मे-व्हणी तांदुळ सडीत जवळच बसली होती. तिला याची ती शंखमुद्रा पाहून हंसूं आ-ल्यानें तिच्या तोंडांतून हंसतां हसतां "मुसलः किसलायते" अशीं अक्षरें निघालीं. त्याचा अर्थ– मुसळाला अंकुर फुटतील पण माझ्या मेव्हण्यास विद्या येणें कठीण! हें बोलणें यास मर्मी लागून हा घराबाहेर पडला. व याचा वडील भाऊ मल्ली ज्या एका सिद्धपुरुषाची सेवा करीत होता त्याची सेवा करीत तेथें राहिला.

या प्रमाणें मल्ली व हा सेवा करीत असतां, मल्लीस दैववशें करून घरीं जाण्या-चें कारण पडलें. व त्या मुळें त्याचें येणें बरेच दिवस झालें नाहीं. त्या अवकाशां-त अशी गोष्ट झाली कीं, सिद्धास कांहीं व्याधि उत्पन्न होऊन तो मल्लीस हांका मा-रूं लागला. तेव्हां पेद्दी जवळ जाऊन म्हणाला. महाराज, मल्ली घरीं गेला आहे यास्त-व काय आज्ञा असेल ती मला करावी. असें ऐकून सिद्ध म्हणाला बरें तर आलीकडे ये. त्या वरून हा पुढें होतांच सिद्धानें यास हात पसरायास सांगतांच यानें तो पसरला. सिद्धानें लागलीच तोंडांत विडा होता तो याच्या हातावर घालून यास खाण्याची आज्ञा केली. ती प्रमाणें यानें केलें. व तेव्हां पासून यास सर्व शास्त्रांतील प्रमेयें आपोआप स्फु-रद्रूप होऊन हा चांगला विद्वान् झाला.

ही गोष्ट मल्लीस समजल्यावर त्यास वाईट वाटलें नाहीं. परंतु हा प्रसाद आपल्या-वर होणारा असून याचवर झाला तो केवळ आपल्या सेवेचें फळ होय. असें जाणून तो यास म्हणाला. तूं आतां शपथपूर्वक इतकेंच वचन दे कीं, जो ग्रंथ मी करीन त्याजवर तुझें नांव घालीन. ही गोष्ट पेद्दीनें मोठ्या संतोषानें मान्य केली. व पंचकाव्यांवर के-लेल्या घंटापथ नामक टीकेवर त्यानें वचन दिल्या प्रमाणें मल्लीचें नांव घातलें. हाहीं सदरील टीके पैकीं नैषधकाव्यावरील मात्र टीका या देशांत उपलब्ध आहे.

पुढें पेद्दीनें कित्येक तीर्थयात्रा केल्या. व अखेरीस सर्वज्ञशिंगाच्या दरबारांत जाऊन तेथें आपली विद्वत्ता प्रगट केली. तीवरून राजानें त्याचा सत्कार करून त्यास मोठें बक्षीस दिलें. यानें ग्रंथ किती लिहिले त्याचा दाखला कोठें कांहींच सांपडत नाहीं. मात्र याचा हजार श्लोकांचा एक द्व्यर्थ ग्रंथ मल्लीनाथाच्या नांवानें तैलंगणांत प्रसिद्ध आहे. (कविच०).

पेनुमंडल—तैलंगणांतील एक कस्व्याचा गांव.

पेरूव्यर अथवा वेल्लूवर— प्रसिद्ध जी अव्हेयर तिचा भाऊ. तेरुवेल्लुवर त्याचें ज्यानें पालन केलें तो गृहस्थ.

पेशवे घराणें—या घराण्याचा मूळपुरुष बाळाजी विश्वनाथ होय. कोंकणांत श्रीवर्द्धन म्हणून गांव आहे तेथील हा देशमुख व कुळकरणी असून याचें उपनांव भट असें होतें. परंतु हा काश्यपगोत्री भट समजूं नये. गार्ग्य गोत्री समजावा. शाहू राजाकडून पेशवेपणाची पदवि मूळ संपादन करणारा हाच होता. यास बाजीराव आणि चिमणाजी असे परम पराक्रमी व शाहाणे दोन पुत्र होते. यांत चिमणाजीचा पुत्र सदाशिवराव ऊर्फ भाऊसाहेब तो निपुत्रिक असतांच पानपतच्या लढाईंत मरण पावला. बाजीरावास पुत्र चार. एक बाळाजी ऊर्फ नानासाहेब. व दुसरा रघुनाथराव ऊर्फ दादा साहेब. तिसरा जनार्दन बाबा आणि चौथा मस्तानीपासून झालेला समशेर बहाद्दर. नाना साहेबास पुत्र तीन. एक विश्वासराव. एक माधवराव आणि तिसरा नारायणराव. यांत विश्वासराव पानपतच्या लढाईंत पडला. माधवरावानें ११ वर्षें राज्य करून पुढें तो क्षयरोगानें मरण पावला. व नारायण रावास मारेकऱ्यां कडून त्याची चुलती म्हणजे रघुनाथ रावाची बायको आनंदी बाई तिनें ठार मारविलें. विश्वासराव व माधवराव निपुत्रिक होते. तरी नारायणराव मारला गेला त्या वेळेस त्याची बायको गंगाबाई गरोदर होती. तिला पुढें पुत्र झाला तोच सवाई माधवराव प्रसिद्ध आहे. रघुनाथरावास पुत्र तीन. त्यांत अमृतराव दत्तक आणि बाजीराव व चिमणाजी हे दोन औरस होते. सवाई माधवराव मरण पावल्यावर, नाना फडणिसानें लागलीच एक मुलगा त्याच्या मांडीवर दत्तक देऊन, सरदार लोकांस बोलवायाचें अगर कळवायाचें, किंवा त्यांकडे या या प्रमाणें केल्याची साकर पाठवायाची, तें न करितां सावकाशपणानें विचार करीत बसल्या मुळें, त्याची मसलत फसून दौलतराव शिंद्याच्या साह्यानें बाजीराव, सवाई माधवरावाच्या मागें राज्याधिकारी झाला. परंतु हा राज्यास अगदीं योग्य नव्हता; कारण त्याला शौर्य व शहाणपण मुळींच नव्हतें. यानें फुकट राज्य मात्र गमाविलें. व हजारों ब्राह्मणांस भिकेस लाविलें. धुंडीराव ऊर्फ

नाना साहेब तो याचाच दत्तपुत्र होता. ही हकीगत शके १६३६ पासून १७४० पर्यंत समजावी. हल्लीं जे येथें राजमाचीकर आहेत ते पेशवे घराण्या पैकींच भावा बंदांचे वंशज होत. सदरीं लिहिलेल्या पुरुषांनीं कोणी किती दिवस पेशवाईचा अधिकार भोगून राज्य केलें त्या विषयीं त्या त्या नांवावर तो तो काळ दर्शविला आहे. व त्यांचें थोडथोडें चरित्रही दिलें आहे. ( हिंदु० छापी० इति० ).

**पेशावर शहर**— याचें जुनें नांव पुरुषपुर. हें तक्षशिला (तक्षिला) याच्या वायव्येस आहे. याचे उत्तर अक्षांश सुमारें ३४ व पूर्वरेखांश ७२ आहेत.

**पैठण शहर**— याचें जुनें नांव प्रतिष्ठान. शालिवाहनाचें जन्म येथेंच झालें. प्रख्यात साधु एकनाथ स्वामी त्यांचीही समाधि येथेंच आहे. हें शहर गोदावरीच्या कांठीं हल्लीं मोंगलाईंत आहे. व याचे उत्तर अक्षांश सुमारें १९ व पूर्वरेखांश ७६ आहेत.

**पोटय्या**— हा कवि जातीचा ब्राह्मण होता. गोदावरीच्या तीरीं राजमहेंद्री प्रांतांत कादंबरी म्हणून गांव आहे, तेथें हा राहात असे. याच्या बापाचें नांव सिंगय्या होतें. सिंगय्यास पोटय्या धरून तीन पुत्र होते. आणि त्या दोघांचीं कुमारस्वामी व अन्नमय्या अशीं नांवें होतीं.

पोटय्या अठरा वर्षांचा झाल्यावर त्यानें भोजचंपु व माघ वगैरे अनेक काव्य ग्रंथ पाहिले. त्या योगानें त्यास संस्कृताचें पूर्ण ज्ञान झालें. पुढें शालिवाहन ११८८ मध्यें यानें एक मोठा ग्रंथ लिहिला. त्याचें नांव प्रसंगरत्नावली आहे. व त्यांत प्रकरणें ८३ आहेत. यानें मोठे परिश्रम घेऊन हा ग्रंथ केलेला ईश्वरास अर्पण केला. नंतर त्यानें एक शाळा स्थापिली. ती मध्यें संस्कृत आणि तैलंगी दोन्ही भाषा विद्यार्थी पढत असत. यानें केलेल्या ग्रंथांपासून ऐक्यता व नीति लोकां मध्यें उत्पन्न होई म्हणून लोक त्याची फार स्तुति करीत. याचा ग्रंथ पंडितांस मान्य होता म्हणून राजेरजवाडे यास फार मान देत. परंतु त्यांकडून याची संभावना जशी व्हावी तशी झाली नाहीं. असें असतांही यास त्याचा किमपि खेद झाला नाहीं. कारण संतोषवृत्ति हा गुण याच्या अंगांत उत्तम होता. हा मरण पावला त्या वेळेस याचें वय ६५ वर्षांचें होतें. व याच्या मागें यास जीं मुलें होतीं तीं याचें नांव राखण्या सारखीं होतीं. ( क० च० )

**पोतराजू**— हा कवि बोम्मनकुळांत जन्मलेला जातीचा तैलंग ब्राह्मण होता. याची प्रख्याति शालिवाहनाच्या १३ व्या शतकांत झाली. हा रामोपासक होता म्हणून यानें रामचंद्राच्या स्तुतिपर पुष्कळ काव्य केलें. एकदां यास असा दृष्टांत झाला कीं, तूं श्रीमद्भागवताचें तेलंगींत भाषांतर कर. व त्या कार्यांत मी तुझें साह्य करीन. त्यावरून

यानें भाषांतर आरंभून नऊ स्कंध पुरे केले. पुढें दशमास आरंभ झाला. व त्यांत रुक्मिणीचें वर्णन करण्याचा प्रसंग आला. तेव्हां यानें श्लोकाचा एक चरण लिहिला. व तसाच स्नानास उठला. त्या चरणांत यानें आपल्याकडून रुक्मिणी बारा वर्षांची झाली असा अर्थ मनांत आणिला होता. परंतु त्याचा दुसरा अर्थ असा होत होता कीं, तीअग्नींत दग्ध झाली.

हा लिहिणें ठेऊन स्नानासाठीं उठला. व नदीवर जात असतां वाटेनें यानें एक कुमारी खेळतां खेळतां अग्नींत पडून लागलीच क्षरर्शांत निधाली. असें पाहिलें. ही गोष्ट रामचंद्रानें,यानें लिहिलेल्या चरणाच्या जागीं नवा चरण लिहून केलेली याच्या प्रत्ययास पुढें आली. ती अशी कीं, भोजन झाल्यावर हा येऊन पाहूं लागला तों,पहिला चरण निराळ्याच रीतीनें लिहिलेला आहे. मग आपण लिहिलेल्या चरणाचें स्मरण करून व त्यांतील होत असलेल्या दुसऱ्या अर्थाशीं वाटेंत पाहिलेल्या गोष्टीचा मेळ पाहून यास आश्चर्य झालें. मग ही गोष्ट दृष्टांत दिल्या प्रमाणें रामानें केली असें पूर्ण जाणून, यानें त्याची अतिशय स्तुति केली. प्रख्यात जो मल्लन कवि तो याचाच पुत्र होता.

पोतराजूची एवढी योग्यता असतांही त्यास मध्यान्ह काळची भ्रांती होती. तथापि त्यानें आपली कविता द्रव्यलोभानें कोणाही मनुष्यास दाखविली नाहीं. इतका हा निस्पृह होता. (कविच०).

**पोन्नुरू**– तैलंगणांतील एक गांव. [रा.मा.

**पौर्णमास**– आंध्रभृत्य राजांतील चवथा. श्रीशांतकरणाचा पुत्र व लंबोदर राजाचा बाप.

**प्रकटकवि**– हा शांकरवेदांतमताचा पुरुष काश्मीराकडे राहणारा होता. मंखकवीच्या ग्रंथाची परीक्षा करण्यास जे तीस पंडित काश्मीरास आले होते त्यांत हा होता. (बु.शो.)

**प्रकाशब्रह्मचारी**– श्रीमच्छंकराचार्यस्थापित चार मठ. त्यांतून असणाऱ्या एकेक ब्रह्मचाऱ्या पैकीं दक्षिणमठ शृंगिरीकडील ब्रह्मचारी तो.

**प्रकाशिका**– ब्रह्मगीतेवरील टीका. हिचा कर्ता कोण त्याचें नांव आढळलें नाहीं.

**प्रकाशेंद्र**– क्षेमेंद्राचा बाप.

**प्रक्रियाकौमुदी**– संस्कृत व्याकरण विषयक रामचंद्राचार्यकृत ग्रंथ.

**प्रक्रियाकौमुदीटीका**– श्रीकृष्ण कविकृत.

**प्रक्रियानीतिवाक्यामृत**– सोमदेव भट्टकृत.

**प्रजयभट्ट**– राजतरंगिणी ग्रंथाच्या चौथ्या भागाचा कर्ता पंडित. यांत अकबर बादशा-

हाच्या कारकीर्दीपर्यंत वर्णन आहे. (बुल्ह॰ शोध॰)

**प्रतापगड**– हा एक पाहाडी किल्ला महाबळेश्वराच्या (नहराच्या) पश्चिमेस आहे. येथें शिवाजी राजाचा वाडा व देवीचें देवालय आहे. अफझूलखानाचा वध याच किल्ल्याखालीं झाला.

**प्रतापमार्तंड**– प्रतापरुद्रकृत संस्कृत ग्रंथ.

**प्रतापरुद्रनाटक**– विद्यानाथ कविकृत प्रतापरुद्र राजाचें नाटक. हें वीररस प्रधान आहे.

**प्रतापरुद्रराजा**– वारंगूळ शहरचा राजा. हा शालिवाहनाच्या १३ व्या शतकांत तेथें होता. प्रख्यात विद्यानाथ कवि तो याच्याच आश्रयास असे. प्रतापरुद्रास नवलक्ष धनुर्धर स्वामी असेंही म्हटलेलें आढळतें. याचें चरित्र नाटक रूपानें विद्यानाथानें वर्णिलें असून हा अन्नमदेवाचा वडील भाऊ होता. अशा विषयीं त्या नांवावर लिहिलेंच आहे. प्रतापमार्तंड ग्रंथ यानें स्वतः केलेला आहे. (कविच॰).

**प्रतापसिंह**– दुसऱ्या शाहु राजाचा पुत्र. हा शके १७४० मध्यें इंग्लिशांच्या आश्रयानें गादीवर बसला. व पुढें पदच्युत झाल्यावर याचा धाकटा भाऊ शाहाजी तो सातारा येथील गादीचा अधिकारी झाला. (हिंदु॰ छा॰ इति॰).

**प्रतापादित्य**– कर्कोटनामक कुलोत्पन्न काश्मीरचा राजा. (बुल्ह॰ शो॰).

**प्रतिनिधीचें घराणें**– शोध करून लिहिण्यांत येईल. अशा प्रसंगीं वंशजांस हौस असणें अवश्य होती; कारण आह्मांकडून औंधलायब्रीकडे व खाशांकडे मिळून पहिल्या अंकाचीं दोन पुस्तकें गेलीं असतां त्यास नुसतें उत्तर सुद्धां नाहीं. मग आश्रय लांबच राहिला. अर्थात् माहिती लिहून पाठविणें तीतर फारच लांब आहे.

**प्रतिपक्षचंडभैरव**– परमतकालानल शब्द पहा. (रा॰ मा॰)

**प्रतिव्योम**– कलियुगांतील सूर्यवंशी राजा. वत्सद्रुहाचा पुत्र॰ व भानुराजाचा बाप.

**प्रतिष्ठान**– हल्लीं नांव पैठण (पैठण शहर) शब्द पहा. २– प्रयागाजवळचें एक शहर.

**प्रतिहारइंदुराज**– जयापीड राजाचा सभापति. भट्ट उद्भटाच्या ग्रंथावरील हा टीकाकार असें राजतरंगिणी ग्रंथांत कल्हणानें लिहिलें आहे. या वरून हा कल्हणाच्या पूर्वीचा होता. (बु॰ शो॰).

**प्रतीकाश्व**– कलियुगांतील सूर्यवंशी राजा. भानुमान् राजाचा पुत्र व सुप्रतीक राजाचा बाप. (राज॰ मा॰)

**प्रत्यभिज्ञासूत्र**– उत्पल कविकृत संस्कृत ग्रंथ.

**प्रद्युम्नशिखरपीठाष्टक**– राजानक गोपाल नामक कविकृत संस्कृत अष्टक.

**प्रद्योन**– पुरंजय अथवा रिपुंजय राजास मारणाऱ्या शुनकनामक प्रधानाचा पुत्र॰ पंच

प्रद्योतांतील मगध देशांत राज्य करणारा हा पहिला राजा. (राजमालि०).

**प्रद्योतन भट्ट**– संस्कृत चंद्रालोक नामक ग्रंथाचा टीकाकार. (बु. शो.)

**प्रद्योतराजघराणें**– हे राजे एकंदर पांच होऊन गेले. १ प्रद्योत. २ पालक. ३ विशाखयूप. ४ राजक आणि पांचवा नंदीवर्द्धन. मगध मार्जारीच्या वंशजांनीं मगध देशांत युधिष्ठिर शक सुमारें अकराशें वर्षें पर्यंत राज्य केलें. नंतर यांची कारकीर्द सुरू झाली. या पांच राजांनीं १३८ वर्षें राज्य केल्याचें वर्णिलेलें आढळतें. (रा. मा.)

**प्रबंधचिंतामणि**– या ग्रंथांत जैनधर्मी राजाचें वर्णन आहे. व तें मेरुतुंगाचार्यानें लिहिलेलें आहे.

**प्रबंधराज**– दुसऱ्या लक्ष्मण कवीनें केलेलें तेलंगी भाषेचें व्याकरण त्याचें नांव

**प्रबोधचंद्रोदय**– संस्कृत भाषेंतील एक नाटक. हें कृष्णमिश्र पंडितानें केलेलें आहे. यातील विषय वेदांतपर आहे. व दैवी तशीच असुरी संपत्ति त्या परस्पर प्रतिस्पर्धी पात्रांची यांत योजना करून याची रचना केलेली आहे.

**प्रबोधसुधाकर**– विद्याशंकर भारती नांवाचे जे दुसरे नामांकित शंकराचार्य, मूळच्या शंकराचार्यांच्या मागून सुमारें दीड हजार वर्षांनीं झाले. त्यांनीं केलेल्या कित्येक ग्रंथांतील एक.

**प्रभा**– शब्दकौस्तुभाची वैद्यनाथ कविकृत व्याख्या.

**प्रभाकर**– हस्तामलकाचार्यांच्या बापाचें नांव.

**प्रभाकर कवि**– हा कवि जातीचा कोंकणस्थ ब्राह्मण होता. याचें उपनांव दातार होतें. मरण समयीं याचें वय सुमारें ६० वर्षांचें होतें. व तो शके १७७४ मध्यें मरण पावला असें ह्मणतात. श्रीमंत विनायक गंगाधरशास्त्री पटवर्धन यांचें दुसरें कुटुंब जें हालीं विद्यमान आहे त्यांशीं या कवीचें पितृत्वाचें नातें आहे. म्हणजे ही बाई या कवीची कन्या होय. सवाई माधवरावाच्या रंग वगैरे कविता या कवीची पुष्कळ आहे. यास या कामा बद्दल पेशवाईंतून पेनशना दाखल कांहीं नेमणूक होती. व ती इंग्रजी मध्यें याच्या हयात पर्यंत चालली होती. (वृद्ध माहिती.)

**प्रभासक्षेत्र**– हें जुन्यागडाकडे आहे.

**प्रभुलिंगलील**– हा ग्रंथ तेलंगी भाषेंत आहे. यांत बसवाचा गुरु जो अलंप्रभु त्याचें वर्णन आहे.

**प्रमाणमंजरी**– हा ग्रंथ न्यायशास्त्र विषयावर सर्वदेवसूरी नामक जैनपंडितानें केला.

**प्रयागक्षेत्र**– अलाहाबाद शहराजवळचें क्षेत्र. येथें गंगा व यमुना यांचा संगम झाला आ,

**प्रल्हाद निराजी**– प्रतिनिधि घराण्याचा मूळ पुरुष.

**प्रल्हाद बडवे**– हा जातीचा प्रथमशाखी म्हणजे काण्व पंढरपुरचा राहणारा होता. यानें ज्ञानेश्वराचा अमृतानुभव संस्कृतांत श्लोकबद्ध लिहिला आहे. व तो विद्वन्मान्यही आहे. (वृद्धमा०).

**प्रल्हादाख्यान**– गुजराथी कालिदास कविकृत गुजराथी भाषेंत.

**प्रविलसेन**– पुरुषभीरु राजाचें दुसरें नांव.

**प्रशस्तकवि**– प्रशस्तभाष्य ग्रंथाचा कर्ता. (बुल्ह० शोध.)

**प्रशस्त भाष्य**– हा न्यायशास्त्र विषयक ग्रंथ वैशेषिक सूत्रांवरील भाष्य आहे.

**प्रश्नोत्तर मालिका**– श्रीमच्छंकराचार्यकृत ग्रंथ. हा संस्कृत भाषेंत प्रश्नोत्तर रूपानें आहे. उदाहरण:– "कोंधो ऽ कार्यरतोय: कोबधिरोय: शृणोति न हितानि ॥ क: शूरोयो ललना लोचनबाणैर्न व्यथित: ॥१॥ इत्यादि.

**प्रश्नोत्तर मालिकाटीका**– आर्याछंदांत मराठी भाषेंत मयूर कविकृत.

**प्रसंगरत्नावली**– पोटय्या कवीनें केलेला ग्रंथ. याचीं ८३ प्रकरणें आहेत. (कविच०).

**प्रसन्नराघवनाटक**– नामांकित जयदेव कविकृत संस्कृत भाषेंत.

**प्रसाद**– विठ्ठलकविकृत व्याकरणसूत्र व्याख्या.

**प्रसेनजित्**– हा कलियुगांतील सूर्यवंशी राजा. शुद्धोदन राजाचा पुत्र जो शौद्धोदनी-बुद्ध तो राज्य न करितां अरण्यांत निघून गेल्या मुळें हा राज्य करूं लागला. (रा.मा.)

**प्रस्थानत्रय**– श्रीमच्छंकराचार्य कृत.१ उपनिषद्भाष्य. २ ब्रह्मसूत्रभाष्य अथवा शारीरक भाष्य. ३ आणि गीताभाष्य. या तिहींचा समुदाय तें.

**प्रहसननाटक**– शंखधरकृत.

**प्राक्ज्योतिषदेश**– हा देश हिमालयाच्या दक्षिणदिशेकडे आहे. याच्या उत्तरेस कामरूपदेश. ज्यास हाल्लीं आसाम म्हणतात तो देश आहे. (ग्रा. न. पहा.)

**प्राकृतप्रकाश**– विक्रम सभेंतील वररुचि कविकृत ११०० सूत्रांचा बालभाषे विषयीं ग्रंथ. यावर भामह कवीची मनोरमावृत्ति नांवाची व्याख्या आहे.

**प्राज्यभट्ट**– राजावली पताका नामक ग्रंथाचा कर्ता. प्रजयभट्ट व हा एकच कीं कसें तें कळत नाहीं. अकबरानें काश्मीर जिंकलें येथपर्यंत यांत इतिहास आहे. (बु० शो०)

**प्रायश्चित्तेंदुशेखर**– नागोजी भट्टानें केलेला धर्मशास्त्र विषयक ग्रंथ.

**प्रियादास**– हा जातीचा नागर ब्राह्मण. तुळशीदासाच्या वेळेस असून चांगला विद्वान् होता. यानें संतचरित्र नांवाचा ग्रंथ आरंभीं संस्कृतांत लिहिला असतां त्यांत तुळशीदासाचें चरित्र लिहिण्याचें राहून गेलें. पुढें तुळशीदासाची व याची भेट झाली. ते-

ह्यां त्याचें यास स्मरण झालें. मग यानें तें लिहावें म्हणून पाहूं लागला तों त्याचें च-रित्र रामचंद्रानें स्वतः लिहून आंत घातलेलें आहे. त्यावरून यास पराकाष्ठेचें आश्च-र्य झालें. (भक्तवि०)३.

प्रीतमदास– गुजराथेंत संधेशर परगण्यांतील राहणारा जातीचा भाट होता. हा शके१७०३ मध्यें होता असें पक्कें समजलें आहे. शांकर वेदांतांत याची गति होती असें ह्मणतात. गुजराथी भाषेंत याची कविता गर्भे, पदें, छप्पा, गुरुमहिमा इत्यादिक बरीच आहे. का०

प्रीतिकूट– प्रख्यात बाणभट्ट कवीची जन्मभूमि. हा गांव शोण नदीच्या कांठीं आहे.

प्रेमदास– साधु. (नाभा. भक्त. ग्रंथ.)पद्य.

प्रेमधूल– रामानुजाचार्यांची जन्मभूमि. याचें पहिलें नांव भूतपुरी व हल्लीं पेनुमुत्तुर ह्मणतात. हा गांव मद्रासेपासून बारा कोसांवर असणाऱ्या कांची नगराच्या र-स्त्यावर आहे.

प्रेमानंद– बडोदें येथील राहणारा जातीचा गुजराथी चातुर्वेदी मोढ ब्राह्मण. हा शके १५९८ मध्यें तेथें होता. यानें गुजराथींत ग्रंथ लिहिले ते येणें प्रमाणें:– भागवत द-शमस्कंध संपूर्ण, उखाहरण, सुधन्वा आख्यान, नलोपाख्यान, सुदामचरित्र, नरसी मेहत्याची हुंडी, मामेरू, श्राद्धविधि आणि रणयज्ञ रामायण. (काव्यदो०).

प्रेमाबाई– ही बाई कोठली राहणारी तें कळत नाहीं. मात्र हिनें केलेले कांहीं अभंग व गाणीं प्रसिद्ध आहेत. ही शालिवाहनाच्या सोळाव्या शतकांत होती असें लोक बो-लतात. हिचें नांव भक्तविजयामध्यें आहे. ही कृष्णउपासक होती. व नेहेमी भागव-त श्रवण करणें हा हिचा मोठा नियम असे. कृष्णकथा ऐकून हिच्या नेत्रांतून प्रेमा-श्रु वाहात म्हणून हें नांव हिला पडेलें असें सांगतात. ही घरची फकरी होती. व पु-राणिक घरीं ठेवून पुराण ऐके. हिचा मुलगाही हिच्याच प्रमाणें असून तो की-र्तन करीत असे. एकदां त्यानें कीर्तन केलें व त्याच वेळेस त्यास प्रपंच परमार्था-चा हिनें उपदेश करून देहविसर्जन केलें असें ह्मणतात. (भक्तवि०).

प्रेमामृत– विष्णुस्वामीच्या गादीवरील जो श्रीराम नांवाचा पुरुष त्यानें केलेला ग्रंथ. हा संस्कृत भाषेंत आहे. [र्ता भट्टोजी दीक्षित.

प्रौढमनोरमा– सिद्धांतकौमुदीवरील टीका ग्रंथ. याची संख्या १२००० आहे. याचा क

प्रौढमनोरमाव्याख्या– हरिदीक्षित यानें हा ग्रंथ लिहिला आहे.

## फ.

फत्तेशिंग– अक्कलकोटच्या गादीचा मूळपुरुष. याचा वंश अजून अक्कलकोयास आहे.

२- पिलाजी गायकवाडाचा पुत्र. दमाजीचा चौथा मुलगा. हा माडीवरून खालीं पडून मरण पावला.

फरकाबाद- अहिक्षत्रा नगराचें हल्लीं नांव. याचे उत्तर अक्षांश २७ व पूर्वरेखांश ७९ आ.

फरदापूरचें लेणें- अजंटाच्या घाटांत जें कोरीव लेणें आहे त्याचा रस्ता या गांवावरून असल्यामुळें यास हें नांव पडलें आहे.

फिरुजुद्दीन- जलालुद्दीनाच्या मागून दिल्ली येथें झालेला बादशाहा. हा शके १२७३ मध्यें तेथें होता. यास कोठें कोठें फेरोजशाहा असेंही म्हटलेलें आढळतें.

फुलमरी- औरंगाबादेकडे असणारा गांव.

## ब.

बकृत्रियादेश- बकृत्रिया शहराच्या आसमंतातचा जो प्रदेश तो. याचें प्राचीन नांव बाल्हीकदेश. याचे उ. अ. सुमारें ३७ व पू. रे. ६९ आहेत. (प्रा. नका.) पहा.

बंकारंक- एक साधु. विशेष कांहीं अजून आढळलें नाहीं.

बक्काराय- विजयानगरच्या हरिहरराय राजाचा भाऊ.

बंगलूर- दक्षिणेकडे असणारें एक शहर. हें सुमारें उ. अ. १३ व पू. रे. ७९ वर आहे.

बंगारुयाचमनीडु- कालास्त्री (कालहस्ती) नगरचा जमीनदार. शके १६२५.

बंगालदेश- याचें प्राचीन नांव वंगदेश. (प्रा. कोश पहा). जैन लोकांच्या प्रवचन शारोद्धार ग्रंथाच्या छापील ५६६- ५६७ पृष्ठांत याचें राजधानी शहर ताम्रलिप्त नगर म्हटलेलें आहे. हल्लीं राजधानी कलकत्ता शहर आहे.

बटुकनाथ- उज्जयिनी येथें कापालिक मतवादी भैरवाचा उपासक कोणी ब्राह्मण होता. श्रीमच्छंकराचार्यांनीं यास हातांत असलेल्या दंडानें ताडन करतांच यानें भैरवास त्यांपुढें प्रत्यक्ष उभें केलें. तेव्हां आचार्यांनीं त्यास वंदन करून पुसलें कीं, हा बटुकनाथ जें आचरण करीत आहे तें पारमार्थिक (खरें) कीं कसें? असें ऐकून तो भैरव तुमचें खरें असें मोठ्यानें बोलत अंतर्धान पावला. त्यावरून तो कापालिक आचार्यांस शरण होऊन त्यांचा शिष्य झाला. (आनं० शंक० प्रक० ३२).

बडोदें शहर- गुजराथेंत असलेलें शहर. हें गायकवाड सरकारची राजधानी आहे. याचे उत्तर अक्षांश सुमारें २३ व पूर्वरेखांश ७३ आहेत. गुजराथी लोक यास वडोद्रा म्हणतात.

बंदरसरकार- तैलंगणांत या नांवाचें एक बंदर आहे.

बदरीकेदार- केदारनाथ शब्द पहा.

बदरीनाथ– बदरीकेदार येथें शंकराचें स्थान आहे.

बदरी नारायण–येथें विष्णुमूर्ति आहे. व ती परिसाची आहे असें सांगतात. येथें सोनार शिवाय करून इतरांस दर्शनास जाऊं देतात. सोनारांस बंदीचें कारण असें सांगतात कीं, एका सोनारानें परीस लोखंडास लाविल्यानें सोनें कसें होतें या ची प्रचीत पाहण्या साठीं देवाच्या करंगळीचा थोडा भाग शस्त्रानें कापून नेला. व तेव्हां पासूनही बंदी झाली. हें स्थान हिमालयांत आहे.

बंदागुरु– शीखलोकांच्या गुरुघराण्यांतील एक पुरुष. हा गुरुगोविंदाचा शिष्य होता. व त्याच्या मागें त्याच्या गादीवर बसला. (हिंदु० छा०)

बदामि– यास पूर्वी वातापी पुरी म्हणत असत. (महा० व कर्ना० इति०).

बंधनकवि– हा तैलंग ब्राह्मण जातीचा कवि तैलंगणांत राहात असे. पालीगार म्हणून कोणी बलाढ्य राजे होते. ते या कवीचा बहुमान राखीत. यानें त्यांच्या आज्ञेवरून संस्कृतांत असलेल्या राजनीतीचें तैलंगींत भाषांतर केलें. यांत राजकीय प्रकरणीं यानें बरेच विषय घेतले आहेत. ते असे कीं;– दुर्गप्राकारादि रचना, नगर रक्षण, राज्यरीति, मंत्रिपरीक्षा, आय व्यय विचार, युद्धसाहित्य संग्रह, इत्यादिक या ग्रंथाचे भाग तीन आहेत. पालीगारराजे या ग्रंथाच्या आधारानें राजकारभार चालवीत. व तेणें करून त्यांची प्रजा सुखी असे. म्हणून या कवीस त्यांनीं मोठी जहागीर दिली होती. या कवीचा काळ समजत नाहीं. (कविच०).

बनवारीदास– नाभाजीच्या भक्तमाल ग्रंथांतील एक साधु.

बनारस– वाराणशीनामक पवित्र क्षेत्र तें. हाल्लीं काशीचा पत्ता याच नावानें लिहिला जातो.

बप्पनकवि– हा तैलंग कवि कोंडवीडू येथील राजा रेड्डीवारू त्याच्या वेळीं उदयास आला. हा तैलंगी व्याकरणांत मोठा प्रवीण असून वक्ताही उत्तम होता. आंध्र भाषेंतील म्हणीचा एकत्र संग्रह करून यानें एक मोठा ग्रंथ रचिला. व त्याचें नांव आंध्रप्रयोग रत्नाकर ठेविलें. हा ग्रंथ यानें आपल्या बापास नजर केला. तैलंगणांतील शाळांतून याचा फार उपयोग करितात. या कवीनें स्वतःचें एक विद्यालय स्थापिलें होतें. व त्यांत पुष्कळ विद्यार्थी तयार केले होते. (कविच०).

बयाबाई– प्रसिद्ध रंगनाथ स्वामींची आई.

बरहान– बंगाल्यांतील एक शहर. यास पूर्वी वर्द्धमान शहर असें नांव होतें. याचे उत्तर अक्षांश सुमारें २४° व पूर्वरेखांश ८९° आहेत.

बऱ्हाणपुर– हें शहर तापी नदीच्या कांठीं खानदेशांत आहे. याचे उत्तर अक्षांश स-

मारें २१ व पूर्वरेखांश ७७ आहेत. पूर्वी हें शिंदेशायींत होतें; परंतु येथें हल्लीं इंग्रजी अंमल आहे. या शहरास पूर्वी ५२पुरें होते. असें तेथील लोक सांगतात. या शहरचा एक भाग बाहादरपुरा या नांवाचा पूर्वी शहरांत होता तो हल्लीं सुमारें शहरापासून तीन कोसांवर आहे. येथें गालिचे व कलाबतु चांगला होतो. येथील तुरींची डाळ फारच चांगली असल्याची प्रख्याति आहे. भुसकुटे उपनांवाचे जाहागीरदार या शहरांतील महाजना पेठेंत राहणारे मोठे कुलीन व संभावीत आहेत.

**बर्हिराजा**– सूर्यवंशी कलियुगांतील राजा. हा बृहत् अथवा बृहद्राज नामक राजाचा मुलगा. व कृतंजय राजाचा बाप. (राजमा.). [ती.

**बलदेव**– कल्याण येथील विजल राजाचा प्रधान. याची कन्या गंगादेवी बसवाची बायको होती.

**बलीराजा**– आंध्रभृत्य राजांतील पहिला. ग्यारेटच्या कोशांत याला सिप्रक म्हटलेलें आहे. आमच्या मतें तें शूद्रक असावें. काण्व राजांतील शेवटला जो सुशर्मा राजा त्यास यानें मारिलें व आपण मगध देशांत राज्य करूं लागला. याच्या मागें याचा भाऊ कृष्ण तो राजा झाला. (आंध्रभृत्य वंश) पहा.

**बलूचिस्थान**– याचें जुनें नांव रामठ देश. यावरून असें समजावें कीं, कराची शहराच्या उत्तरेकडील प्रदेश. किंवा सिंधप्रांताच्या पश्चिमेकडील हा प्रदेश होय.

**बल्लारीशहर**– हें तुंगभद्रेच्या दक्षिणेस आहे. धारवाडा पासून कांहींसें आग्नेयीस हें पुष्कळ दूर आहे. याचे उत्तर अक्षांश सुमारें १६ व पूर्वरेखांश ७७ आहेत.

**बल्लाळकवि**– भोजप्रबंधनामक ग्रंथाचा कर्ता. बल्लाळमिश्र यासच म्हणतात.

**बल्लाळमिश्र**– बल्लाळ कवि तोच.

**बसव**– विजापुराच्या पूर्वेस मुद्देबिहाळ तालुक्यांत बागेवाडी म्हणून एक गांव आहे. तेथें महादेवभट्ट नांवाचा आराध्य जातीय तैलंग ब्राह्मण राहात होता, त्याचा हा पुत्र. लिंगाईत धर्म यानें नवा काढून तो चालू केला. महादेव भट्ट म्हणजे मादिराज त्याची बायको किंवा बसवाची आई तिचें नांव मदलंबिका होतें. बसवास पद्मावती आणि नागलंबिका अशा दोन बहिणी असत. त्यांत पद्मावती विजलराजास दिली होती. व नागलंबिका एका ब्राह्मणानें वरिली होती.

विजल राजा हा जैनधर्मी होता. असें असतां बसवाची बहीण पद्मावती ब्राह्मणाची मुलगी असून तिचा विवाह त्याशीं कसा झाला त्यांतील बीज काय तें कांहींच कळत नाहीं. असो. महादेव भट्टास पुष्कळदिवस संतति नव्हती. म्हणून त्यानें आपला कुलस्वामी नंदीनाथ त्याची बहुत सेवा केली. तेव्हां त्याच्या प्रसादानें त्यास

बसव हा एक पुत्र व दोन कन्या मिळून तीन मुलें झालीं. बसव जन्मला त्या वेळेस शालिवाहनाचें अकराव्या शतकाचें पूर्वार्द्ध होतें.

बसव हा लवकरच लिहिण्या वाचण्यांत हुशार होऊन स्वजातीय आराध्य ब्राह्मणांच्या धर्मशास्त्रांतही चांगला प्रवीण झाला. पुढें महादेव भट्टाचा निर्वाह बागेवाडींत होईना, ह्मणून तो आपलें सर्व कुटुंब घेऊन बागेवाडीहून कल्याण येथें येऊन राहिला. ( हा कल्याणगांव कलबुर्ग्या जवळचा समजावा. ) महादेवभट्ट बागेवाडीस आला त्या वेळीं कल्याण येथें विजलराजा राज्य करीत होता. व तो जैनधर्मी असे. त्यानें बसव चांगला शाहाणा आहे असें जाणून त्यास एक हुद्याची जागा दिली. ती देण्यास दोन कारणें होतीं. तीं अशीं कीं, एक तर तो त्याच्या बायकोचा भाऊ असून त्याचा प्रधान जो बलदेव त्याचा जांवई होता.

बसवाचें जन्म, मुंज, आणि लग्न या तिहीं विषयीं बसव पुराणांत असें वर्णन आहे. नंदीनाथाच्या प्रसादानें मदलंबिका गरोदर झाल्यावर बसव हा तीन वर्षें पर्यंत गर्भांत होता. त्या मुळें तिला अतिशय वेदना होऊं लागल्या. म्हणून तिणें आपली सुटका होण्या साठीं नंदीनाथाची प्रार्थना केली. तेव्हां तिला दृष्टांत झाला कीं, या भूलोकावर वीरशैव धर्माची स्थापना करण्या करितां मीच स्वतः तुझ्या उदरीं अवतार घेतला आहे. तर माझें जन्म होतांच तूं माझें नांव बसव असें ठेवावेंस. बसव असें तैलंगींत व कानडींत ( नंदीस ) ह्मणतात. हा दृष्टांत झाल्यावर गळ्यांत लिंग बांधलेला असाच बसव गर्भांतून बाहेर आला. व दृष्टांत झाल्या प्रमाणें तिनें त्यानें नांव नवऱ्यास सांगून बसव असें ठेविलें.

पुढें बसवास आठवें वर्ष लागलें असें पाहून महादेवभट्टानें त्याची मुंज करण्याची सिद्धता केली. परंतु बसवानें बापास सांगितलें कीं, मला मुंज कर्तव्य नाहीं. कारण मला ब्राह्मणादि वर्णाल मुळींच नसून मी केवळ शिवभक्त आहें. आणि ज्ञातिवृक्ष उपटून टाकण्या करितांच मी जन्म घेतलें आहे. हें भाषण ऐन मुंजीच्या समारंभांत यानें केलें तें तेथें जमा झालेल्या सर्व लोकांनीं ऐकिलें इतकेंच नव्हे. तर महादेवभट्टाच्या बोलावण्या वरून त्याच समारंभास विजलाचा प्रधान बलदेव समाजांत आलेला होता त्यानेंही ऐकिलें. व या अद्भुत भाषणांवरून बसव हा कोणी अलौकिक पुरुष आहे असें जाणून, आश्चर्ययुक्त होत्साता त्यानें आपली कन्या गंगादेवि त्यास देऊं केली.

पुढें थोड्याच काळानें बसवाचें लग्न झालें. आणि वर लिहिल्या प्रमाणें त्यास

हुद्याची जागाही मिळाली. तें काम त्यानें बरींच वर्षें मोठ्या दक्षतेनें केलें. इतक्यांत बलदेव मरण पावला असें राजानें पाहून प्रधानकी, सेनापत्य, व जामदारपणा, हीं तिन्हीं कामें बसवानें करावीं असा त्यानें हुकूम केला. व त्यास त्या अधिकाराचीं वस्त्रेंही दिलीं. बसव हा प्रधान झाल्यावर विजळराजा आपल्या पद्मावतीनामक नव्या राणीशीं क्रीडा करण्यांत रात्रंदिवस निमग्न होऊन, सर्व राज्यभार त्यानें त्यावर निर्धास्त सोंपविला. नंतर बसवानें ज्या ज्या गोष्टी त्याला कर्तव्य होत्या, त्या त्या त्यानें पुढें लिहिल्या प्रमाणें करण्यास आरंभ केला.

प्रथम बसवानें असें केलें कीं, जे जुने कामदार त्याच्या हेतूस प्रतिकूळ होते, त्यांस त्यानें कामावरून दूर करून त्या जागीं आपल्या पक्षाचे लोक नेमिले. व मोठमोठाल्या जमीनदारांस त्यांच्या जमिनी जप्त करण्याची भीति घालून त्यांस आपल्या पक्षास मिळवून घेतलें. या प्रमाणें राज्यांत सर्वत्र त्याचे पक्षपाती लोक झाल्यावर मग त्यानें आपला नवीन धर्म स्थापण्याचा यत्न केला.

बसवानें जो नवा धर्म काढिला त्यांत जातिभेद मुळींच नव्हता. शिव आणि त्याचें वाहन नंदी यांस मात्र भजावें इतरांस भजूं नये असा त्यानें नेम ठरविला. आराध्य ब्राह्मणांत दंडास शिवलिंग बांधण्याची जी चाल होती ती मोडून तें गळ्यांत बांधण्याची त्यानें चाल घातली. या शिवाय मांस न खाणें व ईश्वरास अर्पण केल्याशिवाय कोणताही पदार्थ न भक्षिणें, ही रीत ब्राह्मणांत असलेली तशीच कायम राखिली.

बसव हा आपणास नंदीचा अवतार आहों असें म्हणवी. व आपण स्वतः ठरविलेला संस्कार विशेष जो कोणी करून घेई, त्याशीं तो मोकळे मनानें सर्व व्यवहार करी. हा संस्कार अमक्यानेंच करावा इतरांनीं करूं नये असा नियम नव्हता. तर ब्राह्मणांपासून धेडापर्यंत तो करण्यास सर्वांस सारखी मोकळीक होती. आणि तो केला कीं ब्राह्मण व धेड लागलीच समान योग्यतेचे मानले जात.

हा बसवाचा नवा धर्म कर्नाटकांत लवकरच पसरला. व तो पसरण्याचीं कारणें येणें प्रमाणें होतीं. त्यांत पहिलें कारण असें कीं, हा धर्म आराध्य ब्राह्मणांच्या धर्मांत थोडा फेरफार करून काढला होता. दुसरें कारण, बसवाच्या हातीं जबरदस्त राज्याधिकार होता. तिसरें कारण, त्यांत जातिभेद नसल्या मुळें धेडासही ब्राह्मणाच्या पंक्तींत खुशाल बसून जेवणास मोकळीक झाल्यानें नीच जात त्यांत पुष्कळ आली. चौथें कारण, राजाचा खजिना त्याच्या हातांत होता. व त्या मुळें त्यास हवा तो खर्च करून

लोकांस आश्रय देण्यास सांपडे. तेणें करून चोर,जार,दुर्व्यसनी व छांदिष्ट अशा लोकांनींही जरी हा धर्म स्वीकारिला,तरी त्यांस बसव भोजन देई. आणि पांचवें कारण,असें कीं, ब्राह्मण व जैन या लोकांत धर्मसंबंधानें वाद चालू होता ह्मणून, ब्राह्मणांसत्याच्या मताकडे लक्ष पुरविण्यास अवकाश सांपडला नाहीं.

विजलाच्या पदरचे मंत्रच वगैरे दुसरे अधिकारी बसवाच्या कागाळ्या त्यापुढें वारंवार नेत; परंतु राजा तिकडे बिलकुल लक्ष देईना. त्यामुळें बसवाचा अधिकार व वजन दिवसेंदिवस अधिकाधिक वाढत जाऊन त्याच्या अनुयायांची संख्या मोठी झाली. ती अशी कीं, बसवाच्या जीवावर नित्यशः केवळ जेऊन व खुशाल मन मानेल त्या रीतीनें वागून,प्रसंगीं त्याचा पक्ष धरणारे शहरांतच बारा हजार लिंगाईत होते. त्यांतच बोम्मिदेव नांवाचा एक लिंगाईत अट्टल चोर होता. व तो बसवाचा परिपूर्ण कृपापात्र होता. या चोराची बसव पुराणांत असलेली गोष्ट आम्ही त्याच्या नांवावर लिहिली आहे. ती तेथें पहावी.

या प्रमाणें होतां होतां,बसवाचें एकंदर कृत्य विजलाच्या मनांत कांहीं दिवसांनीं भरून त्यास पराकाष्ठेची भीति उत्पन्न झाली. व तीवरून त्यानें युक्तीनेंच बसवास कैद करावें असा विचार केला. परंतु ती गोष्ट बसवास कळून तो कल्याण शहरांतून लागलाच पळाला. त्या बरोबर राजानें त्याचा पाठलाग केला. तों इकडे सर्व लिंगाईत बसवास मिळून राजाची व त्याची गांठ पडतांच उभयतांचें युद्ध झालें. व राजाचा त्यांत मोड होऊन तो बसवास शरण आला.

नंतर राजा व बसव दोघे एकत्र होऊन कल्याणास परत आले. आणि बसव पूर्वीं प्रमाणें राज्यकारभार पाहूं लागला. परंतु बसवाचें मन राजा विषयीं साशंक झाल्यानें त्यानें त्याच्या घाताचा विचार आरंभिला. त्यांत हेतु एवढाच कीं, राजा मेला असतां,वीरविजल जो त्याचा पुत्र तो लहान आहे पर्यंत,आपणांस पाहिजे तें करण्यास अडचण पडणार नाहीं. हा हेतु त्याचा लवकरच कोणत्या प्रकारें सिद्धीस गेला त्या विषयीं विजलकाव्याच्या अकराव्या व बाराव्या सर्गांत येणें प्रमाणें लिहिलें आहे :—

विजल राजा कोल्हापुरच्या महामंडलेश्वरानें केलेलें बंड मोडून कल्याणास परत येत असतां, भीमा नदीच्या तीरीं तो येऊन पोंचतांच तेथें बसवानें त्यास अन्नांत विष घालून ठार मारिलें. हीच मारल्याची गोष्ट बसव पुराणांत अशी आहे. जगदेव, बोम्मदेव, आणि मालेय, या तिघां लिंगाइतांकडून भर राजदरबारांत बसवानें विजलाचा घात करविला. चन्नबसव पुराणाच्या ५२ व ५३ व्या अध्यायांत जगदेव वगैरे

तीन असामी बसवाचे मशालची होते. व त्यांनीं मशालींत हत्यारें लपवून राजाचा वध दरबारांत केला. कित्येकांचें म्हणणें हीच गोष्ट खरी असल्या विषयीं आहे. कारण मुद्देबिहाळ तालुक्यांतील नालतवाड परगण्याचा देसाई संगन बसाप्पा तो तीन मशालची पैकीं एकाचा वंशज असल्याचें कबूल घेतें. सारांश विजल राजास मारल्याची गोष्ट कलियुगाच्या ४२५५ व्या वर्षीं म्हणजे शालिवाहन शक सुमारें १०७६ किंवा १०७७ मध्यें घडली. व यास शिला लेखाचेंही प्रमाण पडतें.

विजल राजास अशा अपघातानें बसवानें मारिल्यावर त्याचें त्यासच असें भय पडलें कीं, राजपुत्र या वधाचा सूड उगवील. यास्तव आतां येथें राहणें बरोबर नाहीं. असा विचार करून तो तेथून जो पळाला तो मलबार किनाऱ्यास विरीषपुर म्हणून लहानसें शहर आहे तेथें जाऊन राहिला. इतक्यांत यानें मनांत आणिल्याप्रमाणेंच राजपुत्र पाठलाग करीत येऊन त्यानें यास गांठिलें. व शहरास वेढा दिला. तेव्हां आपला आतां बचाव होत नाहीं असें बसव समजून त्यानें तेथें एक विहीर होती तींत उडी टाकिली, व आपला जीव दिला. हें राजपुत्रास कळतांच त्यानें त्याचें शरीर विहिरींतून बाहेर काढवून तटाबाहेर फेंकून देवविलें. तेव्हां पासून त्या शहरास उळिवी असें नांव पडलें. हें नांव पडण्याचें जें कारण झालें, त्या विषयीं ( उळिवी ) शब्द पहा. या गांवास लिंगाईत लोक फार मानितात, आणि तेथें यात्रेसही जातात.

बसवाच्या मरणाची ही हकीकत जैन लोकांच्या ग्रंथांतून घेतली आहे. हीच हकीगत लिंगाईत या प्रमाणें सांगतात कीं, मलप्रभा आणि कृष्णा, या नद्यांच्या संगमावरील संगमेश्वर नामक लिंगांत बसव शिरून अदृश्य झाला. यास ते लिंगाच्या मस्तकावर असलेला खोलगा प्रमाण दाखवितात. परंतु उळिवी या नांवा वरून जैन लोकांनीं लिहिलेली हकीकत खरी असावी असेंच पुष्कळ अंशीं वाटतें.

लिंगाईत धर्म बसवाच्या वेळेपासून कर्नाटकांत चालू झाला, तो अजून तेथें चालत आहे. हल्लीं कर्नाटकाच्या दक्षिण भागीं जेथें लोक कानडी भाषा बोलतात तेथें या धर्माचे लोक आहेत. तसेच कानडा जिल्हा, निजामाच्या राज्याचा पुष्कळ भाग, आणि कुंडा, म्हैसूर, बल्लारी वगैरे प्रांत यां मध्यें लिंगाईत लोकांची संख्या पुष्कळ आहे; परंतु या धर्माची योग्यता ब्राह्मणधर्मा प्रमाणें मुळींच नाहीं. कारण वैदिक धर्म जसा हिमालयापासून दक्षिण समुद्रा पर्यंत व पूर्वसमुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंत सर्व हिंदुस्थानभर आहे तसा हा मुळींच नाहीं. तसेच त्याचे लोकही दक्षिणे शिवाय इतर भागांत फारसे कोठें आढळत नाहींत.

हाल्लीं बंगाल्यांत जो नवा ब्राह्मधर्म निघाला आहे त्याच तोडीचा हा लिंगाईतधर्म आहे, असें ह्मणण्यास अगदीं हरकत नाहीं. कारण, जातिभेद न पाळणें हें तर दोहों-तही सारखेंच आहे. विटाळशीचा विटाळ, तसेंच सूतक व सुयेर हे न धरणें, लिंगाइतां प्रमाणेंच ब्राह्मधर्मात असल्यास त्याचें व यांचें साम्य बरेंच होईल. असो. बसवाचे वेळेस सोंवळें ओंवळें, नीच जातीचा अन्नास स्पर्श, इत्यादिकांचा प्रत्यवाय अगदीं-च नव्हता; परंतु आलीकडे ती चाल बरीच बदलली जाऊन, ब्राह्मण लोकांच्या रीती-प्रमाणेंच कांहींसा थाट त्यांत दिसूं लागला आहे. (महा. व कर्ना. इति. पृ. १३७-१४६).

आलीकडे लिंगाइतांत संस्कृत शिकण्याची पुष्कळच उत्कंठा वाढली आहे, व-ती प्रमाणें त्यांत विद्वान्ही बरेच आढळतात. मात्र उपासना संबंधानें माध्व (म-ध्वमताचे लोक जसे वागतात तसेच हेही वागतात. म्हणजे असें कीं, त्यांनीं यांना स्पर्श निंद्य मानिल्यास हेही त्यांचा तसाच मानितात. सारांश उपासना संबंधानें माध्वांचें व लिंगाईतांचें रहस्य ७९ च्या अंका प्रमाणें बहुधा कर्नाटकांत आहे.

वर असें लिहिण्यांत आलें आहे कीं, लिंगाइतांच्या बायका विटाळशीचा विटा-ळ पाळीत नाहींत. या विषयीं 'लाविली राख आणि झाली पाक' अशी ह्मणही ऐक-ण्यांत येते. परंतु ही गोष्ट सर्वच बायका करितात असें नसल्याचें शोधा अंतीं कळू-न येतें. तें असें कीं, ज्या बायकोचा नित्य नेम जंगमाचें पादतीर्थ प्राशन केल्या वां-चून भोजन करायाचें नाहीं. ती मात्र स्वतः तसें करिते. इतर करीत नाहींत.

लिंगाइतांत आलीकडे वारकरी पंथानें वागणारे लोक पुष्कळ झाले आहेत आ-णि त्या वरून विष्णूचा द्वेषही त्यांच्यांत बराच कमी आहे. तथापि कर्नाटकांत व सो-लापुर आणि बारशी येथें "एकोविष्णुर्महद्भूतं" या जागीं 'एको रुद्रो महद्भूतं' अ-सा नवा संकल्प रचून जंगम समाराधनाच करणारे मात्र असेही लोक आमच्या पाह-ण्यांत बरेच आले आहेत.

श्रीमच्छंकराचार्यांचें शुद्धाद्वैत मत लिंगाइतांत बरेंच मान्य आहे असें दिसू-न येतें. शंकराचार्यांवर जरी त्यांची तादृश भक्ति नाहीं, तरी शंकराचार्यांची स्वारी लिं-गाइतांच्या मोठ्या वस्तींत गेल्यास त्यांचा ते जसा मान राखितात, तसा मध्वाचार्यां-चा राखीत नाहींत. (स्वतःची माहिती.)

**बसवकवि**– हा मोठा रामभक्त होता. व तैलंगणांत कृष्णातीरीं राहात असे. निरंतर रा-मायण वाचल्यानें याला कवितेची गोडी लागली. व त्या वरून यानें पुढें रामायणाचें तेलंगींत फारच सुरस भाषांतर केलें. याची लोकां मध्यें मान्यता चांगली होती.

परंतु हा कधीं होता त्या विषयींचा उल्लेख कविचरित्रांत कांहींच नाहीं. (कविचरित्र.)

**बसवपुराण**— हें पुराण चन्नबसव पुराणाच्या पूर्वींचें आहे. व तें रूमतिभीम ऊर्फ भीम कवीनें केलेलें आहे. यांत बसवाचें जन्म त्याची कल्याणच्या दरबारीं योग्यता. आणि त्याचा शेवट या गोष्टी असून बाकी सर्व पुराण त्याच्या अमानुषिक कृत्यांनीं भरलेंआहे. बसव पुराणाच्या हल्लीं पांच प्रति आढळतात. या पुराणाचें भाषांतर इंग्रजीमध्यें मिस्तर वर्थ साहेबांनीं करून तें मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीच्या (ज्या पुस्तकाच्या २४व्या अंकांत छापिलें आहे. (महा. व कर्ना. इति. पृष्ठ १३८ चीटीप) पहा:—

**बहारप्रांत**— मगध देशांत जें राजगृह शहर आहे त्याच्या आसमंतातचा प्रांत.

**बहारशहर**— प्राचीन काचीं यास गिरिव्रज म्हणत असत. मध्यंतरीं राजगृह नांव असे. याचे उत्तर अक्षांश रूमारें २५ं व पूर्व रेखांश ८५ आहेत. (प्राची. हिंदु. नकाशा.) प.

**बहिणाबाई**— महीपति बावांनीं हिचें नांव भक्तमंडळींत लिहिलें आहे. परंतु हिचें चरित्र दिलें नाहीं.

**बहिरापिसा**— हा जातीचा ब्राह्मण होता, व परळी वैजनाथ येथें राहात असे. याची गणना तेथें लोक पहिल्या प्रतींत करीत असत. व यास बहिरंभट्ट असें ह्मणत असत. या प्रमाणें याची योग्यता असतां, एकदां याची स्त्री यास प्रपंच संबंधानें कांहीं दुरुत्तर बोलल्या वरून यास संताप आला. व त्या भिरिरींत हा जो घरून निघाला तो मशिदींत जाऊन काजी जवळून सुंता करून घेऊन मुसलमान झाला. ही गोष्ट गांवांत कळल्यावर लोकांस याच्या बद्दल अतिशय वाईट वाटलें. व कित्येकांनीं यास बोधही केला. शेवटीं हा ऐकत नाहीं असें झाल्यावर याचा गांवांत सर्वत्र तिरस्कार होऊं लागला.

या गोष्टीस बरेच दिवस लोटल्यावर हा आपल्या मनानेंच ब्राह्मणांस शरण आला. त्यावरून यास ब्राह्मणांनीं प्रायश्चित्त देऊन शुद्ध केलें. ही गोष्ट यवनांस कळल्यावर ते याजकडेस येऊन ह्मणाले. तूं पुनः ब्राह्मण कसा झालास? कारण, जो एकदां मुसलमान झाला तो पुनः ब्राह्मण कधींही व्हावयाचा नाहीं. तेव्हां यानें काजीस उत्तर केलें, तुह्मीं मला अविंध केलेंत हें कशा वरून? कां ह्मणाल तर, जर तुमच्या संस्कारानें मी खराच अविंध झालों आहें, तर माझ्या कानांचीं भोंकें कां बुजालीं नाहींत! तस्मात् तुह्मी लबाड आहां. हें यानें दिलेलें उत्तर ऐकून काजी व त्याचे पक्षपाती लोक निरुत्तर होऊन मुकाट्यानेंच निघून गेले. मुसलमान निघून जातांच हा ब्राह्मणांकडे येऊन ह्मणूं लागला कीं, कां आतां मी ब्राह्मण झालोंना? ब्राह्मण ह्म-

णाले होय. तेव्हां हा त्यांस ह्मणूं लागला कीं, बरें तर जर मी आतां खरेंच ब्राह्मण आ-हें तर मुसलमानांनीं माझी केलेली सुंता अजून जशाची तशीच काय ह्मणून? त्या व-रून ब्राह्मण निरुत्तर झाले. असें पाहून, हा गांवोगांव हिंडून ज्यास त्यास पुसूं लाग-ला कीं, मी हिंदु आहें कीं मुसलमान तें सांगा? त्या वरून पिशाच बाधा झाल्यानें जसा मनुष्य भ्रमिष्ट होतो तसाच हा झाला असें समजून, लोक यास पिसा बहिरा अथवा बहिरा पिसा म्हणजे वेडा बहिरा असें ह्मणूं लागले.

या प्रमाणें हा फिरत फिरत वडवळ येथें गेला. व तेथें नाथपंथीं ८४ सिद्धां-पैकीं एका सिद्धाचे संप्रदायी नागनाथ नांवाचे सिद्ध होते. त्यांची गांठ पडल्यावरू-न त्यांसही यानें मी हिंदु कीं कोण तें सांगा? असा प्रश्न केला. तो ऐकून सिद्धांनीं शिष्यांस आज्ञा केली कीं, याच्या डोक्यांत तुह्मी सर्वांनीं सोटे घालून यास ठार मा-रावें. व याचें शरीर उखळांत घालून कुटून त्याचा एक गोळा करून आह्मा कडे घे-ऊन यावा. त्या प्रमाणें शिष्यांनीं केलें व गोळा बनवून त्यां पुढें नेऊन ठेविला. तो पा-हून सिद्धांनीं त्यावर तीर्थ शिंपडून तत्काळ यास पूर्ववत् सजीव करून पुसलें कीं; आतां सांग तूं कोण आहेस? इतकें ऐकतांच यानें नूतन उत्पन्न झालेल्या देहांत का-नास छिद्रें नाहींत व सुंताही झालेली नाहीं असें पाहून, सिद्धांस साष्टांग नमन के-लें आणि ह्मणाला महाराज, आतां मी कोण तें मला कळत नाहीं. तर माझी ओळ-ख मला पडेल असा मजवर कृपा करून अनुग्रह करावा. त्या वरून सिद्धांनीं यास अध्यात्म विद्येचा उपदेश केला व यास कृतार्थ केलें. तेव्हां पासून याची भगवद्भक्तां-त गणना झाली.

पुढें हा पूर्ण स्थितीस पावला असतां, भागवताच्या दशम स्कंधावर यानें मराठीं-त ओंवीबद्ध टीका लिहिली. त्यांतील पूर्वार्द्ध आमच्या पाहण्यांत आलेलें आहे. व-तें सुमारें पंचेचाळीस हजार आहे. त्या वरून समग्र टीका पाऊणलक्ष असेल असें आमचें अनुमान आहे. (भक्तवि. अध्या. ४४) बहिरंभट्ट कधीं होता त्याचा शोध नाहीं. परंतु तो विद्यारण्यांच्या पूर्वींचा असावा असें आह्मांस वाटतें; कारण, म्लेच्छांनीं बार-विलेल्या ब्राह्मणानें प्रायश्चित्त केल्याचें उदाहरण पंचदशी मध्यें तृप्तिदीपांत श्लोक २३९ यांत आहे. तें याच्याशिवाय इतिहासांत दुसरें आढळत नाहीं.

**बहुनदी**— ही नदी दक्षिण महाराष्ट्र देशांत आहे.

**बाका**— राका कुंभाराची मुलगी (राका) शब्द पहा.

**बागेवाडी**— सोलापुर जिल्ह्यांतील मुद्देबिहाळ तालुक्यांतील एक गांव. हा लिंगाईतधर्मा-

चा स्थापक जो बसव त्याची जन्मभूमि समजावा.

**बाजीराव फसलकर**— शिवाजी राजाचा मावळे लोकांवरील सरदार.

**बाजीराव बल्लाळ**— बाळाजी विश्वनाथ पेशवे यांचा वडील मुलगा. याचें प्रसिद्ध नांव थोरले बाजीराव असें होतें. याचें जन्म कोंकणांत श्रीवर्द्धन म्हणून गांव आहे तेथें शके १६१७ मध्यें युवा नामक संवत्सरीं झालें होतें. बाळाजी विश्वनाथ श्रीवर्धन सोडून सहकुटुंब सासवड येथें प्रथम आला. त्या वेळेस हा बारा वर्षांचा होता. व याचा धाकटा भाऊ चिमणाजी तो दाहा वर्षांचा होता. हा पुरुष मोठा बुद्धिमान्, शूर, राजकार्य निपुण, इमानी, व निष्कपटी असा असे. याच्या बापाच्या मागें यास पेशवाईचा अधिकार द्यावा असें शाहु राजाचे मनांत होतें. परंतु श्रीपतराव प्रतिनिधि यास बरें पहात नव्हता. त्याचें कारण इतकेंच होतें कीं, बाजीराव कोंकणस्थ असून प्रतिनिधि देशस्थ वाजसनी होता. परंतु शाहु राजानें याची स्वामिभक्ति व चलाखी वगैरे गुण पाहून प्रतिनिधीचें बोलणें गुंडाळून ठेविलें. व यास शके १६४२ मध्यें पेशवाईचीं वस्त्रें दिलीं. यानें मोंगल, निजाम, हबशी, इत्यादिकांशीं लढाया करून शाहुराजास पुष्कळ मुलुख साध्य करून दिला. याच्या कारकीर्दींत शिंदे, होळकर, गायकवाड, पवार इत्यादिक मराठे सरदार योग्यतेस चढले. व ब्राह्मणां पैकीं बुंदेले, पुरंदरे व भानु इत्यादिक लौकिकास आले.

शिवाजी राजाच्या मागें स्वदेशाभिमान बाळगून देश ऊर्जित दशेस यानेंच आणिला. म्हणून यास कित्येक लोक शिवाजीचा अवतार ह्मणतात. व शिवाजीमहाराजांस राजनीतीचा उपदेश करणारे जसे रामदास स्वामि होते. तसेच यास धावडशीचे परमहंस होते. म्हणून त्यांसही लोक समर्थांचा अंश समजतात. यास काशीबाई नांवाची स्त्री होती. व तिला या पासून बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब, रघुनाथराव ऊर्फ दादासाहेब, जनार्दनपंत ऊर्फ बाबासाहेब, असे तीन औरसपुत्र होते. यांत तिसरा जनार्दनपंत होता, तो अल्पवयांतच मरण पावला. याशिवाय मस्तानी म्हणून यास एक यवन जातीची उपस्त्री होती. तिजपासून याला झालेला एक पुत्र समशेर बाहादर या नांवानें होता, तो बांदें येथील नबाब इतिहासांत प्रसिद्ध आहेच.

पुणें येथें बाजीराव राहूं लागल्या पासून तें मोठें शहर बनलें. बाजीरावानें

---

१. या प्रसिद्ध व राजकार्य धुरंधर शूर पुरुषाचें चरित्र नुकेंच रा॰ रा॰ नागेशराव विनायक बापट यानीं तयार केलें आहे त्यांत याची त्यांनीं दिलेली हकीकत सविस्तर असून उत्तम आहे या स्तव ती पाहण्या विषयीं आम्हीं वाचकांस सूचवितों.

येथें आपणांस राहण्या करितां एक वाडा बांधण्याचें काम शके १६५१ मध्यें आरंभिलें व तें १६५८ त शेवटास नेलें. या वाड्यास शनवारच्या वाडा असें म्हणतात. या वाड्याचा हल्लीं कोट मात्र शिलक राहिला आहे. हा बाजीराव २० वर्षें पर्यंत पेशवाईचा अधिकार करून व राज्य उत्कर्ष दशेस आणून प्रायः ऐन उमेदींतच शके १६६२ वैशाख शुद्ध १२ चे दिवशीं नर्मदेच्या कांठीं मरण पावला. (हिंदु० छा० व हस्त० इति०).

**बाजीरावरघुनाथ.**– रघुनाथराव ऊर्फ दादासाहेब यांस आनंदी बाई पासून झालेल्या दोन औरस पुत्रांतील वडील. याचें जन्म शके १६९६ मध्यें धारच्या किल्ल्यांत झालें. सवाई माधवरावाचें व याचें जन्म एकाच वर्षीं झाल्याचें लोक सांगतात. हा पुरुष सर्व कामांत प्रवीण असे. परंतु भित्रा व कपटी असल्या मुळें राज्याच्या उपयोगीं नव्हता. आपले सरदार राजी कसे राखावे ह्याचें यास मुळींच परिज्ञान नव्हतें. तथापि हा दौलतराव शिंद्याच्या साह्यानें पेशवाईचा अधिकार पावला. यानें हलके लोक योग्यतेस चढवून जुन्या सरदारांचा अपमान केल्यामुळें ते सर्व बिथरले, व त्या योगानें पुणेशहराची नासाडी झाली. प्रजेस अनिवार्य दुःख झालें. याच्या कारकीर्दीत लोकांस सुख काय तें अन्नशांति पुष्कळ झाली एवढेंच. आणि तेव्हां पासून पेशवाईचें नांव तरवार बहादरींतून निघून जेवणाच्या प्रसिद्धीनें गाजलें. त्या बद्दल ही पुढील म्हण सांप्रत लोकांत चालू आहे ती अशी कीं, "कचेरी निजामाची, स्वारी भोंसल्याची, व पंगत पेशव्याची."

असें सांगतात कीं, ब्रह्मयज्ञ व तर्पण त्यां करितां यास नित्य मणभर तीळ व मणभर सातु लागत. ब्रह्मकर्म जरी हें याचें असें अचार होतें. तरी हा पराकाष्ठेचा दुर्व्यसनी व दुष्ट होता. याच्या कारकीर्दीत पुणें येथें व्यभिचार अतिशय वाढला. तशाच, होळकर, गंगाधरपंत भानु व गंगाधरशास्त्री पटवर्धन इत्यादिकांच्या हत्त्या निरर्थक झाल्या. व शेवटीं जें याच्या पूर्वींच्या अनेक पुरुषांनीं मोठ्या प्रयासानें कित्येक कोटींच्या उत्पन्नाचें राज्य मिळविलें. तें यानें निरर्थक गमावून आठ किंवा नऊ लक्ष रुपये वर्षाचे घेण्याचें ठरविलें. आणि ब्रह्मावर्त येथें जीवन्मृता सारखा तेवढेंच खात पडून राहून दत्तपुत्रा करितां इंग्लिशांस कांहीं हक्क न सांगतां शके १७७३ मध्यें मरण पावला.

यास जरी आश्रित लोक बाबा साहेब म्हणत, तरी इतर लोकांत रावबाजी या नांवानें याची प्रख्याति होती. बाजीराव जर शाहाणा असता, तर आपले सरदार आपल्या कह्यांत ठेऊन आनंदानें राज्य करीत राहता. बरें तें यास करितां आलें नाहीं

तर नाहीं. परंतु करारा प्रमाणें यानें इंग्लिशांशीं नरी बागायाचें होतें. तेंही याजकडून झालें नाहीं. जर आपण दिलेल्या वचना प्रमाणें इंग्लिशांस सहा आणे देता, तर दाहा कोटींच्या उत्पन्ना पैकीं प्रतिवर्षीं पावणेचार कोटी रुपये जाते. व सवासहा कोटींचें राज्य यास व याच्या वंशास बिनघोर भोगायास सांपडतें. तें याच्या हातून कांहींच न झाल्या मुळें, महालक्ष्मीचें निवास स्थान जें स्वराज्य तें लयास जाऊन महासरस्वतीचें अधिष्ठान असें इंग्रजी राज्य त्याचा पगडा हिंदुस्थान भर झाला.

इंग्रजी राज्य झाल्यावर लोकांत अशी एक म्हण चालू झाली कीं, महाकाली, महालक्ष्मी व महा सरस्वती, यांच्या वास्तव्याची राज्यें तीन. म्हणजे मोंगलाईंत महाकाली. कारण, जरा कांहीं झालें कीं, म्यानांतून तरवार किंवा जंबिया निघालाच, व मनुष्य मेलाच. स्वराज्यांत महालक्ष्मी. कारण द्रव्य विपुल. आणि इंग्रजींत महासरस्वती. कारण क्षुल्लक प्रकरण कां असेना, कागदा वांचून चालायाचेंच नाहीं. शेंकडों वंदजबान्यांचे पाटपोट भरून पार होऊन, शेवटीं हांशील झालें तर झालें. नाहींतर नाहीं. सारांश सदरींच्या म्हणणी वरून इंग्रजी राज्यास महासरस्वतीचें अधिष्ठान म्हणून जें वर आम्हीं म्हटलें त्याचें कारण हें होय. अस्तु पेशवे घराण्यांत होऊन गेलेल्या राज्याचा शेवट करणाऱ्या शेवटच्या पुरुषाची या प्रमाणें हकीकत होय. ( हिं॰इ॰ )

**बांदें**— हें संस्थान बुंदेलखंडांत आहे. थोरल्या बाजीराव साहेबां पासून मस्तानीस झालेला पुत्र जो समशेर बहादर तोच पुढें येथील नबाब झाला. हल्लीं त्याचे वंशज येथें आहेत.

**बाणभट्ट**— हा कवि जातीचा ब्राह्मण होता. शोण नदीच्या पश्चिमेस प्रीतिकूट नांवाच्या गांवीं याचे वडील राहात असत. याच्या बापाचें नांव चित्रभानु व आईचें राज्यदेवी. असें होतें. अर्थपति व कुबेर भट्ट ही नांवें क्रमानेंच याच्या आज्या पणज्यांचीं होतीं. हा सुमारें चवदा वर्षांचा झाला तोंच याचा बाप मरण पावला. याचे बालमित्र भद्रनारायण, ईशान आणि मयूरक असे तिघे असत. त्यांत मयूरक तर याचा मेहुणाच म्हणजे याच्या बायकोचा प्रत्यक्ष भाऊच होता, असें ऐकण्यांत येतें.

हा चांगल्या प्रतीचा विद्वान् होता. व त्या मुळें काश्मीरच्या हर्षराजानें यास आपल्या पदरीं बाळगिलें होतें. याच्या विद्वत्ते विषयीं विदग्धमुखमंडन नामक ग्रंथांत धर्मदासानें व याच्या विषयीं सप्तशतींत गोवर्धनाचार्यानें या प्रमाणें म्हटलें आहे.

"रुचिरस्वरं वर्णपदा रस भाववती जगन्मनो हरति ॥ तत्किं तरुणी नहि
"नहि वाणी बाणस्य मधुर शीलस्य॥ १॥ ज्ञाना शिखंडिनी प्राक् यथाशि-
"खंडी तथा व गच्छामि ॥ प्रागल्भ्य मधिक मासुं वाणी बाणो बभूवेति."

अर्थ- जिचा स्वर, जिचा वर्ण व जिचें पद चांगलें तशीच जी रसिक असल्या मुळें जगताचें मन हरण करिल्ये. ह्मणजे इकडे जिच्यांतील स्वर, वर्ण पदें आणि रसिकता चांगली म्हणून जी जगताचें मन हरण करिते ती कोण तरुणी कीं काय? तर नाहीं नाहीं. बाणभट्टाची वाणी होय.

पूर्वी द्रुपद राजाची कन्या शिखंडिनी जशी शिखंडी नांवानें पुरुषरूपतेप्रत पावली. तशी अधिक प्रगल्भ्यता मिळविण्या साठीं वाणी (शारदा देवी) बाण ह्मणजे बाणभट्ट झाली. शिखंडिनी शिखंडी कशी झाली ती कथा समजण्या साठीं आमचा (प्रा· ऐ· को·) पहा. यानें केलेले ग्रंथ येणें प्रमाणें आहेत:- पहिला कादंबरी, दुसरा हर्षचरित तिसरा चंडिका शतक, चौथा पार्वती परिणय नाटक व पांचवा रत्नावलीनाटक.

या प्रमाणें खुद्द याच्या विषयीं व याच्या ग्रंथा विषयीं वर्णन झालें. आतां हा कधीं होता त्या विषयीं असें आढळतें. डॉक्टर हॉल नांवाचा एक विद्वान् इंग्लिश गृहस्थ कलकत्यामध्यें होता. त्यानें असें लिहिलें आहे कीं, हुएनसंग नांवाचा एक चीन देशीय विद्वान् गृहस्थ इसवी ६२९ पासून ६४५ पर्यंत म्हणजे १६ वर्षे या देशांत यात्रा संबंधानें हिंडत असतां, त्यानें इकडील कित्येक प्रसिद्ध प्रसिद्ध गोष्टींचें वर्णन लिहिलें त्यांत बाणभट्ट ज्याच्या पदरीं होता त्या हर्षराजाचेंही चरित्र लिहिलें आहे. त्या वरून बाणभट्ट निदान शके ५७२ मध्यें खचित ह्यात होता असा निर्णय ठरला आहे. हुएनसंग यात्रेच्या संबंधानें इकडे आला असें वरती लिहिलें त्याचें तात्पर्य असें आहे कीं, चिनई लोक बौद्ध धर्मी आहेत. हें तर जनविश्रुतच आहे. ह्मणून ते लोक आपल्या धर्मस्थापकांच्या जन्मभूमिका पाहण्या साठीं हिंदुस्थानांत कधीं कधीं येत. त्याच प्रमाणें वरील गृहस्थ इकडे आलेला होता असें समजावें. सारांश बाणभट्ट हा दंडी कवीच्या मागून ११२ वर्षांनीं झाला होता, असें आह्मी दंडीच्या नांवावर लिहून दाखविलेंच आहे. (बाणं· नि०).

बादरायण- कृष्णद्वैपायन व्यास, ब्रह्मसूत्रांचा कर्ता. प्राचीन कोशांतील कृष्णद्वैपायन शब्द पहा. [ ना· काव्यदोगु·)

बापुकवि- हा गुजराथी कवि जातीचा कोण तें कळत नाहीं. मात्र १७६४ शकांत हो-

**बापु गोखले**— दक्षिण कोंकणांत राजापुर प्रांतीं पिरदावण नंजीक तळेखांजण या नांवाचें एक खेडें आहे. तेथें बाळाजीपंत गोखले या नांवाचे ब्राह्मण ज्ञातीचे गृहस्थ राहात असत. त्यांस धोंडोपंत आणि गणेशपंत असे दोन पुत्र होते. त्यांतील बापु हे गणेशपंताचे कनिष्ठ पुत्र होते. बापूंचे चुलते धोंडोपंत हे करनाटकांत पेशव्यांकडून सरफमेदार असतां त्यां बरोबर बापु व त्यांचे वडील बंधु आपा हेही असत.

धोंडोपंत चुलते व वडील बंधु आपा हे जसे शूर होते तसेच बापु हेही होते. शके १६९९ मध्यें या शूर पुरुषाचें जन्म झालें होतें. यानें शूरत्वाचीं अनेक कृत्यें केलीं व आपल्या वयाच्या चाळिसाव्या वर्षी शके १७३९ मध्यें आपले हातांतील तरवारीनें सबंध एक गोऱ्या लोकांचें पलटन कापून हातीं तरवार असतांच गोळी लागून हा रणांगणांत मरण पावला.

बापु गोखला हा धाकल्या बाजीरावाच्या कारकीर्दीत विशेष प्रख्यातीस आला. बाजीरावाच्या पदरीं चांगला इमानी व शूर असा मनुष्य काय तो एवढाच होता. व तो तरी चुलत्यानें बाजीरावास मरेपर्यंत सोडूं नको. असें सांगितल्या वरून राहिला. नाहींतर सर्व सरदार बिथरले असतां हा पाणीदार पुरुष राहावयाचा नव्हे. या विषयीं (शंकर तुकाराम शाळिग्राम) यांनीं जें याचें चरित्र लिहिलें आहे त्यांतील उपोद्घात पृष्ठ १८ यावरील टीप वाचकांनीं पहावी. असो. बापूच्या द्वितीयसंबंधाची स्त्री यमुनाबाई नांवाची होती. बापूचा पुत्र पूर्वीच मरण पावला होता व सून सती गेली होती. हल्लीं बापूंच्या चुलत भावाचा वंश पुणें येथें सदाशिव पेठेंत विद्यमान आहे. (हिंदु० छा० इति०) पुण्यांतील प्रसिद्ध कैलासवासी ठाकुरदास बावा ते बापूंचे गुरू होते.

**बापुविप्र**— प्रसिद्ध बोरबनकर तुकाविप्र त्यांचे पुत्र. हेही मोठे भगवद्भक्त होते.

**बापूजीनाईक जोशी**— बारामती येथील मोठे सावकार. यांचा धाकटा भाऊ आबाजी नाईक तो पेशवे बाळाजी विश्वनाथ यांचा जांवई होता. म्हणजे भिऊताई जी बाळाजी विश्वनाथाची मुलगी ती त्यास दिली होती.

**बाबाजीचैतन्य**— प्रसिद्ध साधु तुकाराम त्याचे हे गुरु. हे पुण्याच्या उत्तरेस ओतूरम्हणून गांव आहे तेथील देशपांड्ये होते. हे गृहस्थच परंतु मोठे ब्रह्मनिष्ठ असत. तुकारामास ज्ञानसंप्रदाय यांजपासूनच प्राप्त झाला. (बृहमा०) यांच्या विषयीं तुकारामाचा अभंग आहे तो असा:—

सत्य गुरुरायें कृपा मज केली, परी नाहीं घडली सेवा कांहीं ॥१॥ सांपडविलें वाटे जातां गंगास्नाना ॥ मस्तकीं तो जाणा ठेविला कर ॥२॥ भोजना मागती तूप पावशेर ॥ पडिला विसर स्वप्ना माजी ॥३॥ कांहीं कळे उजला-अंतराय॥ ह्मणोनियां काय त्वरा झाली ॥४॥ राघव चैतन्य केशव चैतन्य माळिकेची खूण सांगितली ॥५॥ बाबाजी हें आपुलें सांगितलें नाम ॥ मंत्र दिला राम कृष्ण हरी॥६॥ माघ शुद्ध दशमी पाहोनी गुरुवार॥केला अंगीकार तुका ह्मणे॥७॥

बांबोली गोपाळ — एक साधु. (नाभा भक्त ग्रंथ) पहा.

बाभूळगांव — हा गोदावरीच्या कांठीं आहे. समर्थ रामदास स्वामींचे प्रसिद्ध शिष्य कल्याण गोसावी त्यांची हा गांव जन्मभूमि होय.

बायजाबाई — शिंदे घराण्यांतील दौलतराव शिंद्याची बायको. व सर्जेराव घाटग्याची मुलगी. ही बाई शाहाणी परंतु मोठी उग्र स्वभावाची होती. अहल्या बाई प्रमाणें आपलेंही नांव राहावें म्हणून हिनें पंढरपुर येथें मुरलीधराचें देवालय बांधिलें आहे. व तें अहल्या बाईच्या रामा समोरच्याच अंगास आहे. एवढेंच काय तें हिचें धर्मकृत्य. हिला मरण पावल्यास आज सुमारें अठरा वर्षें झालीं आहेत.

बारशी — याचें जुनें नांव द्वादशी क्षेत्र. या नांवाचें प्रयोजन असें सांगतात कीं, अंबरीष राजानें येथें एकादशीच्या दुसऱ्या दिवशीं पारणें केलें होतें. हिंदुस्थानी भाषेंत द्वादशीला बारस ह्मणतात. आणि त्या वरून बारशी असें नांव प्रचारांत आलें. येथें भगवंताची मूर्ति व देवालय आहे.

बारामती — हा गांव पुण्याच्या पूर्वेस सुमारें वीस कोसांवर आहे. बाळाजी विश्वनाथ पेशवे यांची ज्येष्ठ कन्या भिऊताई ती येथील कोट्याधीश सावकार बापूजी नाईक जोशी बारामतीकर यांचे बंधु आबाजी नाईक त्यांस दिली होती. प्रसिद्ध आर्या करणारा कवि मोरोपंत तो याच बारामतीकरांच्या पदरचा आश्रित होता.

बारामासवर्णन — गुजराथी भाषेंत रत्नाकविकृत.

बालनराय — लिंगाईतधर्मी एक राजा. गंगाधर कवि तो याच्याच आश्रयास होता.

बालबोध — वल्लभमताचा एक ग्रंथ.

बालबोधिनी — जगधर कविकृत संस्कृत ग्रंथ.

बाललीला — गुजराथी भाषेंत दयाराम कृत.

बालसरस्वती — हा कवि जातीचा ब्राह्मण होता. याचें जन्म राजमहेंद्री येथें झालें. नन-

य भट्ट म्हणून जो एक नामांकित कवि तैलंगणांत होऊन गेला. त्याचा हा शिष्य, व राजनरेंद्राचा पुत्र. शार्ङ्गधर त्याचा गुरुबंधु होता. प्रथमतः हा एका पंडिताजवळ न्यायशास्त्र पढला. परंतु तो मरण पावल्या मुळें नन्नयभट्टाजवळ राहून पुढील अभ्यास करूं लागला. त्यांत याची बुद्धि इतकी प्रकाश पावली कीं, यानें नन्नयभट्टकृत आंध्रकौमुदीवर आंध्रसभा चिंतामणि नांवाची फारच उत्तम टीका लिहिली. याचे आणखीही कित्येक ग्रंथ होते असें म्हणतात. परंतु त्यांतील हल्लीं एकही उपलब्ध नाहीं.

बालिंदा पठाण— साधु होऊन गेलेला आहे. परंतु याचें इतिवृत्त अजून आह्मांस सांपडलें नाहीं.

बाल्हीकदेश— हल्लीं यास बकृत्रिया प्रांत ह्मणतात.

बाहुदानदी—

बाळकृष्ण— प्रसिद्ध वल्लभाचार्यांचा पुत्र विठ्ठलनाथ त्याच्या मुलांतील एक. [सें ऐकीतों.

बाळंभट्ट पायगुंडे— गदानामक संस्कृत ग्रंथाचे कर्त्ते. (गदा श॰ प॰) हे वांईचे राहणारे अ-

बाळाजी जनार्दन भानु— याचें प्रसिद्ध नांव नानाफडणवीस. पेशव्यांचें फडणीशीचें काम यांजकडेस वंशपरंपरेनेंच चालत आलें होतें. हा पुरुष मोठा शाहणा, स्मरणाचा धड, व थोड्या वेळांत अतिशय काम आटोपणारा असा होता. हा पानपतच्या लढाईंतून देशीं परत आल्यावर थोरल्या माधवराव साहेबांच्या कारकीर्दींत आपलें वडिलार्जित फडणिशीचें काम पाहूं लागला. हा प्रसिद्ध सखाराम बापूचा शीक असल्या मुळें याची गणना लोकांत अर्ध्या शाहाण्यांत जरी आहे. तरी आमच्या मतें हा चांगलाच शाहाणा होता. कारण यजमानाचें खरें हित करण्यांत याची एकनिष्ठता कशी होती ती इतिहासा वरून कित्येक प्रसंगांनीं स्पष्ट समजून येते.

याच्यावर लोकांचे मुख्य आरोप तीन आहेत. एक हा परोत्कर्षा सहिष्णु, दुसरा मनस्वी द्रव्यलोभी, आणि तिसरा दुर्व्यसनी होता. या तीन दोषांचा विचारच करून जर पाहिलें तर याच्या ठिकाणीं जी स्वामिभक्ति होती. तिला प्रतिबंधक एकही दोष आह्मांस दिसत नाहीं. महादजी शिंद्यानें सवाई माधवरावा करितां जी वकील मुतलखची सनद व मानमरातब दिल्लीच्या बादशाहाकडून आणिला, तो यानें यजमानांनीं न स्वीकारण्या विषयीं सवाई माधवरावास बोध केला, तो केवळ छत्रातीच्या अंकितांनीं दिल्लीच्या बादशाहाचें अंकित ह्मणविणें बरोबर नाहीं एवढ्याच हेतूनें केला. यांत वावगें तें काय? दुसरें आपल्या वडिलांस ज्या आनंदीबाईनें मारेकऱ्यांकडून मारविलें तिचा पुत्र बाजीराव होय, हें लक्षांत बागवू-

न वर्तन करा. हा सवाई माधवरावास याचा बोध गैर होता असें कोण ह्मणेल? लोक यास परोत्कर्षासहिष्णु ह्मणतात त्या पेक्षां यास भित्रा ह्मणते तर गैर नव्हते. कारण महादजी शिंद्याच्या गुळचट बोलण्यानें यजमानाच्या कोंवळ्या बुद्धीस अपाय न व्हावा या गोष्टीस मात्र तो खचित फार भीत होता. असो याच प्रमाणें दुसरे दोन आरोपही व्यर्थ आहेत.

आतां एकाद्या वेळेस लिहिणारा चुकतो व पोंहणारा बुडतो त्या प्रमाणें हा म्हणजे चुकला नसेल अथवा नाहीं असें आह्मीं ह्मणत नाहीं. हाही एक दोन गोष्टींत खचित चुकला. आणि त्या मुळेंच यास नगरच्या किल्ल्यांत कैदेमध्यें राहणें भाग पडून राज्यासही अपाय झाला. ही गोष्ट आह्मी कबूल करितों. परंतु शेवटीं इतकें सांगतों कीं, सखाराम बापू प्रमाणें हा दुहसबी मनुष्य नसून खरा स्वामिभक्त होता.

या चतुर पुरुषाचा काळ शके १७२२ मध्यें झाला. याच्या मरणकाळीं याची नववी बायको मात्र जिवंत होती. यास औरस संतती मुळींच नव्हती. हल्लीं जे मेणवलीकर रावसाहेब फडणीस आहेत ते याच्या मागें याच्या बायकोनें दत्तक घेतलेले ऋन्या चालीनें वागणारे आहेत. परंतु त्यांस त्यांच्या योग्यते प्रमाणें उत्पन्न नाहीं. त्याचें कारण नाना फडणिविसास जी जहागीर होती तिजवर व वाड्यावर बाजीरावाची जसी होती. ती इंग्रजींनही तशीच कायम राहिल्यानें या थोर घराण्याचा मोठा अपमान व नाश झाला. आमच्या मतें ज्या पुरुषानें आपल्या चातुर्यावर सवाईमाधवराव लहान असतां हिमालयापासून कन्याकुमारी पर्यंत एक छत्री व शांततेनें राज्यकारभार आरोपिला त्यास दोन तीन लक्षांची तरी जहागीर निदान असणें योग्य होती.

हल्लीं पुणें येथें वेलबागे संबंधीं जें विष्णूचें संस्थान आहे तेथील बेत बाता वरून या पुरुषाच्या चातुर्याचें सहज अनुमान होतें. व विद्यमान फडणिसाचीही योग्यता कळून येते. असो नाना फडणविसास स्मरण किती राहात असे व मनुष्याची परीक्षाही करण्याचें चातुर्य त्याच्या अंगीं कसें होतें ये विषयींची एक गोष्ट आह्मांस ऋन्या माहिती वरून कळली आहे ती येथें सांगून हें चरित्र आह्मी पुरें करितों.

जुन्नर येथील राहणारा बाबा राजहंस नांवाचा एक गृहस्थ रोजगारा करितां पुण्यास आला होता. त्याचा नित्यनेम असा असे कीं, प्रत्यहीं नानाच्या वाड्यांत जाऊन त्यांस त्यानें नमस्कार करून परतावें. या प्रमाणें दोन तीन महिने गेल्या-

वर एकदां अशी गोष्ट घडली कीं, तो नित्या प्रमाणें सकाळीं नानांस वाड्यांत नमस्कार करून परतल्यावर नाना बेलबागेंत देवदर्शनास गेलेले दर्शन करून बाहेर पडतात तों पुनः ते त्यास भेटले. म्हणून त्यानें पुनः नमस्कार केला. तो घेऊन नाना ह्मणाले. अहो तुमचा नमस्कार एकदां वाड्यांत झालाच आहे. मग आतां पुनः कशास? इतकें ऐकतांच, त्या चतुर व हजर जबाबी पुरुषानें "नमस्कार प्रियो भानुः" असें हात जोडून उत्तर दिलें. म्हणजे भानु (सूर्य) नमस्कारानेंच संतोष पावणारा आहे. तें ऐकून नाना उगीच राहिले. व नांव पुसून घेऊन वाड्यांत परत आले.

या गोष्टीस सुमारें पंधरा दिवस लोटले. त्यानें नित्य नमस्कार करून जात असावें व नानांनीं तो घेत असावा. या प्रमाणें होतां होतां एकदां यानीं त्यास पुसलें. कां राजहंस कसें काय आहे? माहाराज, जें आहे तें बरेंच आहे. असें त्यानें उत्तर देतांच नाना ह्मणाले कां काय झालें? तेव्हां तो हात जोडून या प्रमाणें बोलला.

> भानूदयीं निदसुरा भर होय जागा ॥ तों बावळी सुरगुरु करितो बजागा॥ शालूपरीस पाहतां फडक्यास मान॥ मी हंसराज फिरतों कवडीसमान॥

अर्थ:- सूर्योदय झाला असतां निदसुरा (झोंपाळू) जागा होऊन उद्योगास लागतो. तसा आपला भानूचा उदय होतांच आपले उपाध्ये निस्तुरे सांवरले. बावळे ह्मणजे केवळ वेंधळे ते बृहस्पतीच्या योग्यतेस चढून हल्लीं पानशांच्या हाताखालीं तो फरखान्याकडे फडणिशी करीत आहेत. फडका (चिंधी) तिचा मान शालूपेक्षां वाढून तो सरदारी करीत आहे. (म्हणजे फडकेही) आपल्या उर्जितकाळांत वाढले आहेत. पण मी राजहंस असून मला कोणी कवडीच्याही मोलानें पुसत नाहीं ह्मणून जें आहे तें बरेंच आहे. या प्रमाणें ऐकतांच नानांनीं जाणिलें कीं, हा मनुष्य सभ्य व चतुर आहे. मग खुष होऊन लागलीच त्यास जुन्नर महालची फडणिशी देऊन मानानें त्याची रवानगी केली. (इन्दुमा.)

**बाळाजी नारायण नातू**— उत्तर कोंकणां मध्यें पेण तालुक्यांत वेंकूळ नांवाचा एक गांव श्रीमंत खंडेराव रास्ते यांच्या जाहागिरीचा आहे. तेथें नारोपंत नातू नांवाचे एक कुलीन गृहस्थ राहत असत. त्यांस जे पुत्र होते त्यांमध्यें हे वडील होते. यांस लोक दादा असें ह्मणत. हा पुरुष मोठा शाहणा व मुत्सद्दी होऊन गेला. पेशव्यांचें राज्य लयास गेलें तें यानें घालविलें असा याच्यावर लोकापवाद आहे.

परंतु हें ह्मणणें निवळ लोकांच्या चुकीचें आहे. रावबाजीच्या कारकीर्दीत मोठ मोठाले सरदार व मुत्सद्दी यांचा अपमान. तसेच होळकर, पटवर्धन, भानु इत्यादि नामांकित पुरुषांचे भयंकर रीतीनें खून, हलकट लोकांचें प्राबल्य व शहरांत वारंवार लुटालूट इत्यादि अनुचित कर्मे पाहून हे गृहस्थ रास्त्यांचे आश्रित असल्यामुळें यांनीं वेळोवेळीं बाजीरावास बोध केला कीं, "श्रीमंतांनीं अशी वर्तणूक ठेऊं नये. व इंग्लिशांशीं आधीं करार करायाचाच नव्हता. तथापि आपण केलात तर आतां त्या प्रमाणें वागणें हें आपणास रास्त आहे. तशांत आपण आपल्या सरदारांस राजी न ठेवल्यामुळें आपल्या सैन्याचीही आपणास अनुकूळता नाहीं. दुसरें कवाईत शिकलेलें इंग्लिशांचें सैन्य आपलें ताबेदार आहे असें आपण समजत असाल तर प्रसंगास त्यावरील इंग्लिश अधिकारी आपणास धरून राहतीलच असेंही मला वाटत नाहीं. इत्यादि पुष्कळ प्रकार असल्यामुळें, व आपण घरंदाज, कुलीन व सुचालीच्या रयतेस प्रिय नसल्यामुळें काय करणें तें विचारानें करावें. परंतु बाजीरावानें या गृहस्थाचें व आणखी कित्येकांचें बोलणें कांहींच ऐकिलें नाहीं. व त्यानेंच आपल्या मूर्खपणानें शेवटीं राज्य गमाविलें. त्याला यांनीं काय करावें?

सारांश पुढें पेशवाई बुडाली. तेव्हां येथील रसिदंडानें ( इंग्लिशांच्या वकिलानें ) या चतुर पुरुषास हाताखालीं घेतलें. त्या वेळेस रयतेच्या सुदैवानें हाच पुरुष होता ह्मणून सर्व कामें चांगलीं झालीं. तीं अशीं कीं, सातारचा राजा पुनः गादीवर आला. सरदारांचे तहनामे ठरले. पेशव्यांकडून विद्वान् ब्राह्मणांस चालत आलेली दक्षिणा पूर्ववत् चालू झाली. व पर्वती वगैरे संस्थानांच्या नेमणुकांची व्यवस्था नीट झाली. हींच कामें डेंगळे, अवटी, कुंजर, राहतेकर, किंवा इंदापूरचा व्यंकूनाथी इत्यादिकांच्या हातीं असतीं तर निखालस त्यांनीं त्यांची घाण केली असती.

हा जो मजकूर आह्मीं बाळाजीपंत दादा नातू विषयीं लिहिला त्यावर एक आर्याही आमच्या ऐकण्यांत आली आहे ती अशीः—

"श्रीप्रेमें कलिंत जसा ॥ ह्यायांजन अवन ठेविला नातू ॥
"औसर तसेच दादा ॥ श्रीमंतीं कुलिन दक्ष द्विज नातू ॥

या आर्येच्या संबंधानें आह्मांस असें समजलें आहे कीं, दादा हे सातान्यास दुय्यम रसिदंड असतां, प्रतापसिंह राजाच्या कारकीर्दीत सरकार वाड्यांत झालेल्या कीर्तनांत एका नामांकित हरदासानें ही ह्मटली. ती ऐकून राजा, प्रतिनिधि व इतर लोक फार खुष झाले. या वरून यांनीं सातान्यास काम कसें केलें त्याचें अनुमान दा-

चक करतील.

यांस गणेश बल्लाळ, विश्वनाथराव बल्लाळ आणि नारायणराव बल्लाळ असे तीन पुत्र होते. त्यांस अनुक्रमें राव साहेब, दाजीसाहेब आणि नानासाहेब असें ह्मणत. शिवाय कन्या दोन होत्या असें ऐकतों. त्यांतील एक कन्या ताई साहेब नीलकंठ शास्त्री थत्ते ज्यांस थोरले शास्त्री बावा म्हणत त्यांचे चिरंजीव नारायणशास्त्री यांस दिली होती. वर जे तीन पुत्र सांगितले त्यांतील वडील रावसाहेब यांनीं लिंगपुराणावर संस्कृत टीका लिहिलेली प्रसिद्ध आहे. हे हालीं काशींत आहेत.

बाळाजीपंत दादा मोठ्या उंच आकृतीचा, गौर वर्णाचा व साधाच परंतु इभ्रतदार पुरुष होता. यांस आह्मी स्वत: पाहिलेलें आहे. यांचे सर्व कामांत नियम बांधलेले असत. संतति संपत्ति व नियमित वागणें हें जसें यांस अनुकूळ होतें असें यांच्या चिरंजीवांसही आहे. यांस उत्पन्नही चांगलें आहे. हा पुरुष पुढें सहकुटुंब काशीस गेला व यथाकाळीं कुटुंब निवर्तल्यावर मागून मरण पावला. (इन्दूमा०).

बाळाजीबाजीराव— थोरल्या बाजीराव साहेबांस जे तीन औरस पुत्र होते त्यांतला हा वडील. याचें प्रसिद्ध नांव नानासाहेब होतें. शके १६४२ मध्यें याचें जन्म झालें. व याप्त १६६२त बापाच्या मागें पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं. यानें पेशवाईचें काम बापाच्या मागें सुमारें एकवीस वर्षें केलें. हा पेशवाई करूं लागल्यावर नऊ वर्षांनीं शाहू राजा मरण पावला. तेव्हढ्याच काळांत याची काम करण्याची शैली पाहून शाहू राजा इतका खूष झाला कीं, त्यानें आपला औरस पुत्र मेल्यामुळें आपणादेखत दत्तक न घेतां सर्व राज्य यास दिलें. व मरतांना असें सांगितलें कीं, माझ्या पाठीमागें उगीच निमित्तास दत्तक घेऊन गादीचा मान राखण्यासाठीं त्यास कांहीं नेमणूक करून या व सर्व राज्य तुह्मी संभाळा. तेव्हां पासून पेशव्याचें महात्म्य व दौलत भरभराटीस आली.

याच्या बायकोचें नांव गोपिकाबाई होतें. व ती रास्त्यांची कन्या होती. तिला यापासून तीन पुत्र झाले. त्यांत वडील विश्वासराव. दुसरा माधवराव, आणि तिसरा नारायणराव. गोपिकाबाई शिवाय या पेशव्यास आणखी एक लग्नाची बायको होती. व ती देशस्थ आश्वलायन ब्राह्मण नारोबा नाईक वाखरे हरडापुरकर प्रगणें भंबड इलाखा मोंगलाई त्यांची कन्या होती. तिचें नांव राधाबाई होतें. परंतु ती संतति होण्या पूर्वींच मरण पावली. (इन्दूमा.)

बाळाजी बाजीराव राज्य वहिवाटीत असतां याचा चुलतभाऊ सदाशिव चिमाजी ऊर्फ भाऊसाहेब हा दिवाणगिरीचें काम करीत होता. व सख्खा भाऊ रघु-

नाथ राव ऊर्फ दादा साहेब यांजकडे सैनापत्य होतें. पुरंदरे भानु हे आपआपलीं कामें यथास्थितपणें बहिवाटीत असून शिंदे, होळकर, गायकवाड, पवार, बुंदेले, विंचुरकर, राजे बहादर इत्यादि सरदार मर्यादेनें व आज्ञेंत तत्पर असे वागत असत. याच्या वेळीं न्यायाधिशीच्या कामावर मोठे विद्वान् बाळकृष्ण शास्त्री गाडगीळ हे होते. व दरोबस्त कर्नाटक, संपूर्ण माळवा व हिंदुस्थान तशीच गुजराथ, आणि झाडून सारी कोंकणपट्टी इतकें राज्य याच्या ताब्यांत होतें.

याच्या कारकीर्दींत शके १६८३ मध्यें सोनपत पानपत येथें अफगाण लोकांशीं याची लढाई झाली. तींत याचा पुत्र विश्वासराव, चुलत भाऊ सदाशिवराव, सरदारां पैकीं गोविंदपंत बुंदेले व गणपतराव मेहेंदळे रणांगणांत पडले. शिंदे वगैरे कित्येक सरदारांस जखमा लागल्या. व इतर लोक हजारों प्राणास मुकले. हें वर्तमान ऐकून त्या दुःखानें हा पेशवा त्याच सालीं पुणें येथें त्यानें बांधिलेल्या पर्वतीच्या देवळांत मरण पावला. याच्या मागें याच्या दुसरा मुलगा माधवराव तो त्याच सालीं पेशवा झाला. ( हिंदु० छा० इति० ).

**बाळाजीविश्वनाथ**— दक्षिण कोंकणांत श्रीवर्धन ह्मणून गांव आहे तेथील देशमुख विसाजीपंत भट यांच्या दोन पुत्रांतील हा कनिष्ठ. वडिलांच्या मागें यांचे वडील बंधु जनार्दन पंत ( जानोजी विश्वनाथ ) यांस जंजिऱ्याच्या शिद्दीनें ( हपशानें ) गोणपाटाच्या थैल्यांत घालून समुद्रांत बुडविल्यामुळें यास भीति उत्पन्न होऊन यानें गांव सोडण्याचा निश्चय केला. व शके १६२९ मध्यें मुलां माणसां सुद्धां निघून देशांत सासवड येथें येऊन राहिला.

याच्या बायकोचें नांव राधाबाई होतें. तिला याजपासून बाजीराव, व चिमणाजी असे दोन मुलगे आणि भिऊबाई व अनूबाई अशा दोन मुली झाल्या होत्या. बाळाजीपंत कोंकणांतून देशांत आले. त्या वेळेस बाजीराव बारा वर्षांचा व चिमणा दाहा वर्षांच्या वयाचा होता. इकडे आल्यावर उभयतां मुलांचीं व मुलींचीं लग्नें झालीं. त्यांत बाजीरावास चासकर जोशी यांची कन्या व चिमणाजीस पेठे यांची कन्या करून भिऊबाई बारामतीचे सावकार बापूजी नाईक यांचे बंधु आबाजी नाईक यांस व अनूबाई इचलकरंजीकर घोरपडे यांच्या घरीं दिली.

बाळाजीपंतास प्रथम सेनापति धनाजी जाधव यांच्या पदरीं मुलखांतील जमाबंदी करण्याच्या कामावर कारकुनीची जागा मिळाली. तें काम यानें चांगलें व-

हिवारिलें; परंतु धनाजी जाधव मरण पावल्यावर त्या जागीं त्याचा पुत्र चंद्रसेन जाधव सेनापति झाला. तो याचा द्वेष करूं लागला. कारण बाळाजीपंत हा जुना माहितगार असल्यामुळें शाहू राजा सेने संबंधीं किंवा वसूला संबंधीं कामकाजा प्रकरणीं जें कांहीं पुसावयाचें तें चंद्रसेनास न पुसतां यास पुसे व याच्या सल्यानें कार्यकरणें तें करी.

हें शाहू राजाचें करणें चंद्रसेनास न आवडून त्यानें बाळाजी पंताचा उघड द्वेष आरंभिला. तो इतका कीं, त्यानें याच्या व याच्या सर्व कुटुंबाच्या प्राणावरही प्रसंग आणिला होता. परंतु शाहू राजाच्या कृपेनें तो वांचला जाऊन चंद्रसेनावर राजाची इतराजी झाली. तेणें करून तो खिन्न होऊन मागील कांहीं स्मरण न ठेवितां निमकहरामच झाला. व शाहूस सोडून निजामास जाऊन मिळाला. त्या बरोबरच रंभाजी निंबाळकर वगैरे कित्येक बेइमानी सरदारही गेले.

पुढें शाहूनें बाळाजीपंतास सेनाकर्ते ही पदवि दिली. व त्या अधिकारावर असतां यानें पहिले पेशवे पिंगळे होते त्यांस आंग्र्यांच्या कैदेंतून सोडवून आणिलें वगैरे मोठ मोठीं कामें केल्या मुळें शके १६३६मध्यें त्यास आपला पेशवा (मुख्यप्रधान) करून आबाजीपंत पुरंदरे यांस त्यांची दिवाणगिरी व रामचंद्र भानूस फडणविशी दिली. या प्रमाणें झालें असतां बाळाजी पंतानें दिल्लीस जाऊन शाहू राजा करितां स्वराज्य व सरदेशमुखी हे दोन हक्क मिळवून आणिले. आणि मुलखांत शांतता होण्या जोगे नवे कायदे करून राज्य निर्बाध चालेल अशी व्यवस्था केली. हे कायदे करण्यांत यास जाग्रणें घडून फार श्रम झाल्या मुळें पेशवाईच्या अधिकाराच्या साह्याव्या वर्षीं ह्मणजे शके १६४२ मध्यें हा सासवड येथें मरण पावला.

बाळाजी विश्वनाथ लिहिण्यांत हुशार, पोक्त मसलतीचा, मन मिळाऊ व स्वभावानें सरळ होता. त्या मुळें शाहूचा लोभ त्याच्यावर अतिशय असे. इतकेंच केवळ नव्हे. तर त्याच्या मुलां माणसांवरही त्याचा तसाच लोभ होता. त्या मुळें बाळाजीपंत अकाळीं मरण पावल्या मुळें त्याला बहुत दुःख झालें. ह्मणून त्यानें बाजीरावास पेशवाईचें काम देण्याचें मनांत आणून त्या बद्दल प्रतिनिधीस पुसलें. परंतु त्याचें या कामीं अनुमत पडेना. ह्मणून ती गोष्ट कित्येक महिने लांबणीवर पडली. शेवटीं शाहूनें पाहिलें कीं, प्रतिनिधीला गुणाची परीक्षा नसून तो केवळ ज्ञातिमत्सरानें माझ्या बेतास आड येतो. असा मनांत विचार करून प्रतिनिधीस सांगून पाठविलें कीं, आज दरबार करून मी बाजीरावास पेशवाईचीं वस्त्रें देणार तर तुह्मी दरबारास लवकर

याचें. तेव्हां प्रतिनिधीची सर्व विद्या लटपटून तो दरबारास आला. व शके १६४३ मध्यें बाजीराव पेशवाईचें पद पावला. (हिंदु० छा० व हस्तलि० इति०).

**बिटूर**— ब्रह्मावर्त शहराचें नांव. याचे उत्तर अ० २७° व पूर्वरे० ८०° आहेत.

**बिंदुभक्त**— हा एक भवानीचा उपासक मूळच्या शंकराचार्यांच्या वेळेस होता. (आ०शं०)

**बिंदुसर**— हें एक सरोवर आहे. खश देशाच्या पश्चिमेस हेमशृंगाजवळ हें असल्याचें प्राचीन हिंदुस्थानाच्या नकाशांत दिसून येतें.

**बिंबिसार**— विधिसार राजा. हा शब्द पहा.

**बियानदी**— पंजाबांतील विपाशा नदी ती.

**बिरबल**— अकबर बादशाहाच्या चार प्रधानांतील एक. हा जातीचा ब्राह्मण उज्जनी शहरचा राहणारा होता. याचें मूळचें नांव काय होतें तें कळत नाहीं. असो. परंतु हा शाहाणा उत्कृष्ट असे. याला फारसी विद्या व संस्कृत विद्या यांचें चांगलें ज्ञान होतें. व हजर जबाबी तर हा नांवाजण्या सारखा होता. एकदां असें सांगतात कीं, बादशाहानें दरबारच्या लोकांस असा प्रश्न विचारला कीं, व्यवहारामध्यें खरें आणि खोटें यांत अंतर किती आहे? त्यावर कोणी कांहीं कोणी कांहीं उत्तरें देऊन खऱ्या खोट्यांत जमीन अस्मानचें अंतर ठरविलें. परंतु बादशाहाचें त्यापासून व्हावें तसें समाधान झालें नाहीं. ह्मणून शेवटीं हाच प्रश्न त्यानें बिरबलास विचारला. त्या बरोबर त्यानें चार बोटें अंतर आहे, म्हणून उत्तर दिलें. बादशाहानें पुनः पुसलें. चार बोटें? बरें जें तूं ह्मणतोस यास प्रमाण काय? हा म्हणाला प्रत्यक्ष प्रमाण. बादशाहा म्हणाला कसें तें दाखीव. हा बोलला डोळे व कान यांच्या मधली जागा मोजा. बादशाहा म्हणाला मोजली; पण यांत झालें काय? यानें विनंति केली. केवळ कानांनीं ऐकिलें तें खोटें. व डोळ्यांनीं पाहिलें तें खरें. सारांश डोळ्यांनीं पाहिल्या शिवाय कानानीं ऐकिलेल्यावर विश्वास ठेवूं नये. आणि याच कारणामुळें आमच्या वेदामध्यें "चक्षुर्वै सत्यं" अशी श्रुति आहे. व ती व्यावहारिक आहे. असें श्रीमच्छंकराचार्यांनीं प्रतिपादन केलें त्याचें कारण हेंच आहे. हें उत्तर ऐकून बादशाहा खुष झाला. सारांश अशा प्रकारचा हा चमत्कारिक समयसूचकतेचा पुरुष होता. (सुन्दूमा०) याच प्रमाणें याच्या आणखीही गोष्टी पुष्कळ आहेत असो. हा चतुर पुरुष पुढें अकबर असतांच एका लढाईंत मरण पावला. (हिंदु० इति०)

**बिल्वमंगल**— विष्णुस्वामीच्या गादीवरील शेवटला पुरुष. हा द्रविड होता. याच्या मर-

णानंतर ती गादी व तो संप्रदाय बुडाला असतां, मागून कित्येक वर्षांनीं वल्लभाचार्यांनीं तिचा जीर्णोद्धार केला. (कविच०) व (विष्णुस्वामि) श० पहा.

२- एक महाराष्ट्र ब्राह्मण. हा कृष्णातीरीं जन्या माहुलींत होऊन गेला. कर्णामृत नांवाचा जो ग्रंथ संस्कृतांत आहे तो यानें केलेला आहे. हा कधीं झाला तें कांहीं कळत नाहीं. (वृन्दू माहिती.)

बिल्हणकवि– हा जातीचा ब्राह्मण. काश्मीराकडील राहणारा असे. शालिवाहनाच्या अकराव्या शतकांतील पूर्वार्द्धांत हा होता. काश्मीर येथील कलश राजाच्या पदरीं हा असतां त्यास परमदीदेव नामक कल्याणच्या राजानें एक पंडित पाठवून देण्याविषयीं पत्र लिहिलें. त्यावरून त्या राजानें परमदी देवाकडे यास पाठविलें. यानें केलेले दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. त्यांत पहिला विक्रमांक चरित. आणि दुसरा चौरी सुरत पंचाशिका येणें प्रमाणें होत. (बुल्ह० का० शोध०)

बिल्हणचरित्र– विठ्ठल कविकृत हें अनेक छंदांनीं युक्त मराठींत आहे.

बिसलदेव– अजमीर येथील रजपूत राजा. सारंगदेव तो याचा पुत्र होता.

बिहारीलाल– हिंदुस्थानांतील उत्तर भागांत शालिवाहनाच्या सोळाव्या शतकाच्यासुमारास हा एक कवि होऊन गेला. यानें ब्रजभाषेंत सातशें दोहोऱ्यांचा सतसय्या नांवाचा एक अत्यंत रसभरित ग्रंथ लिहिला. त्यांत श्लेष, उपमा, उत्प्रेक्षा, व अन्योक्ति यांचा समावेश आहे. यांत यानें राधाकृष्णाचें वर्णन, त्यांचा विलास, त्यांचें संभाषण फारच मजेचें लिहिलें आहे. या मध्यें अमुक एक कथा असें तर मुळींच नाहीं. मात्र सर्व दोहरे वर्णक्रमानेंच लिहिले आहेत.

बीजगणित– सिद्धांत शिरोमणि ग्रंथाच्या चार अध्यायांतील दुसरा अध्याय. यांत अव्यक्त पदांनीं गणित कसें करावें त्याची विद्या सांगितली आहे. इंग्रजींत ज्यास हल्लीं (ऑलजिब्रा) ह्मणतात तो मूळ याच्या आधारानें झाला. त्या विषयीं निकलसनच्या इंग्रजी बीजगणित ग्रंथांतील प्रस्तावनेंत जो सारांश आहे तो वाचकांस कळण्या साठीं भाषांतर रूपानें येथें लिहितों.

इसवी सन १४४२त यूरोपखंडांतील वेनीस नामक शहरचा व्यापारी, लिओनार्डो, कलकत्ता येथें व्यापारा करितां आला होता. तो बरींच वर्षे कलकत्यांत राहिल्या मुळें, त्यानें संस्कृताचें ज्ञान संपादून भास्कराचार्यांच्या बीजगणिताचें भाषांतर स्वभाषेंत उतरलें. व कांहीं दिवसांनीं स्वदेशीं जातांनां तें बरोबर नेलें. त्यांत त्यानें या प्रमाणें म्हटलें आहे.

"जरी बीज गणित यूरोप खंडांत प्रथम आरबस्थानांतून नेलें होतें तरी"
"त्याची जन्मभूमि हिंदुस्थानापेक्षां जो प्रदेश यूरोपास जवळ आहे ती न"
"व्हे असें मी निश्चयात्मक ह्मणतों."

या वरील लेखा वरून असें सिद्ध होतें कीं, बीज गणिताची विद्या प्रथम हिंदुस्थानांत उत्पन्न होऊन नंतर आरबस्थानांत गेली. व तेथून यूरोपांत गेली.

**बुंदेलखंड** – याचें जुनें नांव दशार्ण अथवा दशारण्य. हा तमसानदी व शोणनद यांच्या मध्यें आहे.

**बुद्ध**– हा एक विज्ञानवाद प्रवर्तक ह्मणजे (बुद्धि हाच आत्मा असें ह्मणणारा) मोठा नामांकित आचार्य होऊन गेलेला आहे. अमरसिंहानें आपल्या अमर कोशांत "सर्वज्ञः सुगतो बुद्धो" अशीं जीं बुद्धांचीं नांवें लिहिलीं आहेत त्यांतील तिसऱ्या नांवाचा तोच हा होता. याच्या आईचें नांव पद्मावती व बापाचें नांव महायशा असें होतें. हा जातीचा ब्राह्मण होता. व याचें जन्म मगध देशांत गये जवळ असणाऱ्या साहस्य नामक गांवीं चंपकारण्यांतील पुनंपुना नांवाच्या नदी तीरीं झालें होतें. युधिष्ठिर शकाच्या ९७२व्या वर्षी खरनामक संवत्सरीं आश्विन शुक्ल दशमीस हा जन्मला.आणि आपल्या वयाच्या ९२व्या वर्षी रुधिरोद्गारी संवत्सरा मध्यें पौषवद्य नवमीस बुधवारीं प्रभास क्षेत्रांत गिरनार पर्वतावर निर्वाण पावला. याच्या निर्वाणकालीं युधिष्ठिर शक १९८० जाण्याचा अवशेष राहिला होता. या विषयीं जैन ग्रंथामध्यें श्लोक आहेत ते येणें प्रमाणें:–

> द्वे ऋषि नंदसंख्या यां गतायां तद्दिने शुभे॥ खर वर्षे दशम्यांच शुक्ले मासे तथाऽश्विने॥ माता पद्मावती यस्य पिता यस्य महायशाः॥ ब्राह्मणस्य कुले शुद्धे मगधे पुण्य भूमिके॥ साहस्य संज्ञके ग्रामे गयाया निकटे तथा॥ पुनंपुना नदीतीरे पावने चंपके वने॥ योगविस्तरमो जातो महाख्यातोहि बुद्धराट्॥ ततो द्वेनंद वर्षांते रक्तोद्गारे प्रभासके॥ पौष कृष्णे नवम्यांच गिर्नारे सौम्य वासरे॥ सायान्हे न्यस्त देहोहि स्वस्मिन्लोके गतो बुधः॥

मात्स्यांत जैन ग्रंथांत असें आढळतें कीं, एके समयीं आकाश वाणीनें जैनांस व बौद्धांस आश्वासन देऊन असें सांगितलें कीं, तुह्मीं काळजी करूं नका. बुद्ध अमुक अमुक वेळीं उत्पन्न होईल, व तो तुह्मांस सुख देईल. ते श्लोक असे:– "पश्चाद्धर्म सुतो राजा पांडवानां भविष्यति॥ वासुदेव मुखामात्यैः पालयन्नवनीं त्विषा॥

तेषां शाकस्य पर्याये प्रभविष्यति बुद्ध गद्॥ चतुर्भिः सह शिष्यैश्च त्ववतीर्णो भवेत् ध्रुवम्॥ विष्णोर्नवावतारं वदिष्यंति बुधा जनाः॥ तदाच भवदीयानां दुःखस्यांतो भविष्यति॥"— अर्थ— पुढें युधिष्ठिर राजा होऊन कृष्णाच्या साहाय्यानें पृथ्वीचें पालन करित असतां त्याच्या शकांत चार शिष्यांसहवर्तमान बुद्ध प्रगट होईल व तो तुमच्या दुःखाचा नाश करील. लोकही त्यास विष्णूचा नववा अवतार आहे असें ह्मणतील. याच श्लोकांत लिहिल्या प्रमाणें 'आर्यविद्या सुधाकर' ग्रंथांत बुद्धा विषयीं पौराण वाक्य आहे तें असें:—

निष्ठे धर्म नृपस्य राज्य समयात् काले व्यतीते ऽल्पके॥ श्रीविष्णो रवतार एष नवमो बुद्धाभिधानो ऽभवत्॥ नीचानामसतां विमोह जननं श्रौता-ध्व निंदामिषात्॥भूताहिंसन मुख्य धर्म मतनो त्सर्वज्ञ एष प्रभुः॥ ४॥

अर्थः— कलियुगामध्यें युधिष्ठिर राजा राज्य करूं लागल्यावर अल्पकाळ गत झाला असतां बुद्ध अशा नांवानें विष्णूचा नववा अवतार होता झाला. त्यानें नीच व असज्जन यांच्या बुद्धीस मोह म्हणजे भ्रांति उत्पन्न होण्या साठीं श्रुति मार्गाच्या निंदामिषानें मुख्यत्वानें अहिंसा धर्म स्थापिला. या प्रमाणें बुद्धाविषयींची हकीकत जैन ग्रंथा वरून वगैरे समजून येते.

दशावतारांचे जन्मसंवत्सर पुराणाधारें वामन पंडितानें लिहिले आहेत. त्यांत याचाही संवत्सर लिहिलेला जैन ग्रंथास मिळतो. आणि त्यावरून बुद्ध तोच बौद्ध होय. असेंही दिसून येतें. तो श्लोक येणें प्रमाणें आहे:—

कृष्णावतार सरल्यावरि बौद्ध होतो॥ संग्राम काळ कलिचा खर वत्सरीं तो॥ आश्वीन शुक्ल दशमी रविवार देखा॥ तैं शुक्ल योग असतां घटि षड्विशाखा॥ १॥

या प्रमाणें बुद्ध ह्मणजे बौद्ध कधीं झाला व कोठें झाला वगैरेचा निर्णय आहे. आतां वाचकांस एक अशी शंका येईल कीं, जो बुद्ध आह्मी वर्णिला तो अर्वाचीन काळीं झाला असतां वाल्मीकि रामायणांत त्याचें नांव आलें हें कसें? त्यास असें समजावें कीं, सुगतादिक जे बौद्ध धर्म प्रवर्तक आचार्य ते सर्वज्ञास बुद्ध असें समजतात. व सर्वज्ञ ह्मणजे ऋषभ देव असें ते मानतात. वस्तुतः ऋषभ देवानें त्या सुगतादिकांस स्वतः बोध केला नसल्या मुळें तो त्यांचा गुरु नव्हता. तसेच तेही त्याचे शिष्य नव्हते. सुगत ह्मणजे अर्हत नामक प्राचीन राजानें ऋषभ देवाची बाह्य दीक्षा अवलोकन करून ती दीक्षा आपल्याच मनानें धारण केली. व त्या ऋषभ देवाचें नांव सर्वज्ञ

ह्मणजे बुद्ध असें ठेऊन आपणही बात्ध्याकारानें तत्वरूपच जाणून आपणासही सुगत संज्ञक बुद्ध ह्मणविलें. तो रामावताराच्याही फार पूर्वी होऊन गेल्यामुळें त्यानें स्थापिलेल्या वेदविरुद्ध नास्तिक मताचा ज्या काळीं जाबालि ऋषीनें उपन्यास केला त्या काळीं श्रीरामचंद्रानेंही बुद्धनामोच्चारपूर्वक ज्याबालीचें खंडन केलें. हेंच वाल्मीकि रामायणांत बुद्धनांव येण्याचें कारण समजावें. रामायणांत बुद्धाचें नांव जें आलें आहे त्यांतील आशयावर आर्यविद्यासुधाकर ग्रंथांत या प्रमाणें गद्य लिहिलें आहे.

"चित्रकूट मधिष्ठितो रामभद्रस्य पुनरयोध्यां प्रत्यानयनाय कृत बहुविध
" प्रार्थने भरते जाबालि नामकेन केनचिन्मुनिना पितृशासनस्य परिपालनेन
" किंचिददृष्टं पुण्य मुपजायते नापि भंगे किंचित्पापं तस्मात्साकेतं गत्वारा-
" ज्य सुखानुभव एव कर्तुमुचित इत्यर्थ समर्थनाय एकेनाध्यायेन नास्तिक
" मत मुपन्यस्तं। ततः प्रकुपितेन श्री रामचंद्रेणोक्तं।

यथाहि चोरः सतथाहि बुद्ध स्तथागतं नास्तिक मत्र विद्धि॥ तस्मा-
द्धियः शक्यतमः प्रजानां स नास्तिके नाभिमुखो बुधः स्यात्॥ ३४
(वाल्मीकि रामायण अयोध्याकांड सर्ग १०९).

अर्थ- श्रीरामचंद्र चित्रकूट पर्वतावर असतां तेथें भरतानें येऊन त्यास अयोध्यस परत नेण्या विषयीं बहुत प्रार्थना केली. परंतु तो ती कांहीं ऐकेना. तेव्हां जाबालि नामक ऋषीनें पितृ आज्ञा पालन केली असतां कांहीं पुण्य नाहीं व मोडली असतां पाप नाहीं, अतएव अयोध्येस जाऊन राज्यसुखानुभव घेणें उचित होय. अशा अर्थाची संभावना होण्यासाठीं एका अध्यायानें नास्तिक मताचा उपन्यास केला. त्या वरून राम क्रोधाविष्ट होऊन या प्रमाणें बोलला.

जसा चोर राजदंडास योग्य होय तसाच बुद्ध व तथागत इत्यादिक नास्तिकही होय. अन्यायानें परद्रव्यापहरण करणारा जसा चोर ह्मटला जातो, तसाच वेदप्रमाणांचा अन्यायानें अपहार करणारा बुद्ध व तथागतही चोरच ह्मटला पाहिजे. यास्तव प्रजांच्या हिता साठीं राजा इत्यादि सामर्थ्यवानानें चोरास दंड करणें अवश्य आहे. आतां दंड करण्यास असमर्थ असणारानें इतकेंच करावें कीं, त्या नास्तिकास कधींही सन्मुख होऊं नये ह्मणजे त्याशीं भाषण इत्यादिक करूं नये. या प्रमाणें श्रीरामचंद्र बोलला असतां जाबालि उगाच राहिला. व वसिष्ठानीं रामाचें सांत्वन करून ह्मटलें कीं, जाबालीनें केलेलें भाषण तुझ्या अंतःकरणाच्या परीक्षणार्थच होय. केवळ सत्यच नव्हे. यास्तव त्याच्यावर क्रोध करूं नको. असा पुढें रामायणांत सं-

दर्श आहे.

असो. आह्मी ज्या बुद्धाविषयीं लिहीत आहों यास होऊन गेल्यास आजमितीस ४००८ चार हजार आठ वर्षे झालीं आहेत. याचें मत असें आहे कीं, हें सर्व जग क्षणिक, दुःख-रूप, स्वलक्षण, आणि शून्य (अभावरूप) असें चार प्रकारचें आहे. हा जो याचा चा-र प्रकारचा सिद्धांत त्या विषयीं सर्वदर्शन संग्रहांत असलेल्या विस्तारांतील सारां-श वाचकांस कळावा ह्मणून येथें लिहितों. व याच्या पूर्वीं ३१२ वर्षांमागें होऊ-न गेलेला चार्वाक त्याचेंही खंडन हा कसें करितो, तेंही दाखवितों.

चार्वाक प्रत्यक्ष प्रमाण मात्र मानितो. हें आह्मी त्याच्या नांवावर दाखविलें-च आहे. आणि बुद्ध हा अनुमान प्रमाण व प्रत्यक्ष प्रमाण अशीं दोन मानितो. त-री उपमान आणि शाब्द हीं दोन प्रमाणें तो मुळींच मानीत नाहीं. उपमान ह्मण-जे दृष्टांत आणि शाब्द ह्मणजे वैदिक वाक्य असें समजावें. बुद्धानें चार्वाकमत खंडन करतांना त्याच्या अनुयायास ह्मटलें. अरे, तूं अनुमान प्रमाण नाहीं ह्मण-तोस अथवा तें व्यर्थ आहे असें म्हणतोस. तर धूमावलोकनें करून त्या स्थानीं अग्नि आहे, अशी प्रवृत्ति कां व्हावी ? अथवा बाग ह्मणतांच त्यांत फलपुष्पें आहे-त असें समजून तीं आणण्या विषयीं प्रवृत्ति कां व्हावी? कोणतीही वस्तु प्रत्य-क्ष पाहिल्यावरच त्या विषयीं आणिमात्रांची प्रवृत्ति अथवा निवृत्ति होत्ये असें नाहीं. तर इष्टानिष्ट श्रवणानेंही प्रवृत्ति अथवा निवृत्ति संभवत्ये. म्हणून अनुमान प्रमा-ण सत्य आहे व तें सार्थही आहे.

पुनः तुझा कोणी आप्त दूरदेशीं असलेला मरण पावला किंवा पुत्रवान् इत्या-दि झाला तर तें वर्तमान तूं ऐकिलेंस असतां सुखी किंवा दुःखी होतोस तें तूं कां व्हा-वेंस? कारण त्याचें मरणादिक तूं प्रत्यक्ष तर पाहिलेंसच नाहींस. तसेंच विषभक्ष-ण केल्यानें मनुष्य मरतें हें ही अनुमानच आहे. कां कीं त्याचाही प्रत्यक्ष अनुभव तुला मुळींच नाहीं. सारांश एकाद्यानें तुजपुढें विष आणून ठेविल्यास व तें खा ह्म-टल्यास, अनुमान प्रमाणास न मानणारा जो तूं त्या तुला तें मुकाट्यानें खाल्लें पाहि-जे. जर खाणार नाहींस तर अनुमान प्रमाणाचा अंगीकार केला पाहिजे. अर्थात् वि-ष भक्षणापासून येणारें मरण तें तुला प्रत्यक्ष अनुभूत नसतां अनुमान साध्य-त्वास्तव जसें सत्य मानितोस तसेंच अनुमान साध्य स्वर्गादिक तुला सत्य मानणें अवश्यक आहेत.

अशा प्रकारें चार्वाकाचें खंडन करून बुद्ध आपलें मत सांगतो. बुद्धाचा पहि-

ला सिद्धांत (सर्व क्षणिकं क्षणिकं) म्हणजे सर्व कांहीं क्षणिक आहे. तें क्षणिकत्व तो अशा रीतीनें प्रतिपादन करितो.

जें जें वस्तु जें जें कांहीं कार्य साधक ह्मणजे कार्य साधणारें अथवा करणारें, तें तें सत् ह्मणून क्षणिक आहे. उदाहरण,– जसें मेघमंडल, हें पर्जन्यवृष्टिरूप कार्यसाधक आहे, ह्मणून तें क्षणिक आहे. मेघमंडला प्रमाणेंच सर्व वस्तु कार्यसाधक आहेत. या कारणास्तव सृष्टींतील यच्च यावत् पदार्थ क्षणिक आहेत. बुद्ध ह्मणतो कोणी असें ह्मणेल कीं, जें जें वस्तु कार्यसाधक तें तें चिरस्थायी असें कां नाहीं? तर असें समजावें कीं, चिरस्थायी ह्मणजे सर्वकाळीं असणारें, म्हणून त्या पासून तें तें कार्य होण्यास कोणत्याही काळीं प्रतिबंध येऊं नये. तो येतो, या कारणास्तव वस्तुमात्रांस चिरस्थायित्व नसून त्यांस क्षणिकत्वच आहे.

पुनः कोणी ह्मणेल कीं, बीजादिक वस्तु चिरस्थायी आहेत. कारण त्यांपासून जल वायु इत्यादिक साहाकारी पदार्थांच्यायोगानें भूत, वर्तमान व भविष्यकाळीं अंकुर पल्लव आणि फळ इत्यादिकांची उत्पत्ति दिसते. यास उत्तर असें आहे कीं, सहाय करणाऱ्या ज्या जलवायु इत्यादि वस्तु त्या, त्या बीजादिकांवर कांहीं उपकार करितात कीं नाहींत? दुसऱ्या पक्षीं उपकार करीत नाहींत असें असेल तर त्या, जल वायु इत्यादि उपकार कर्त्यांची बीजादिकांस मुळींच अपेक्षा नसावी. आतां प्रथम पक्षीं उपकार करितात असें जर असेल, तर तो उपकार बीजादिक पदार्थांहून भिन्न आहे कीं अभिन्न आहे? असे दोन विकल्प. यांत प्रथम विकल्पीं आगंतुक जो उपकार त्यालाच कारणता येईल. चिरस्थायी मानलेल्या बीजास येणार नाहीं. कारण सहाकारी उपकाराच्या लाभानें कार्योत्पत्ति होते, न झाल्यानें होत नाहीं. दुसऱ्या विकल्पीं अभिन्न असेल ह्मणजे सहाकारी पदार्थांकडून चिरस्थायी पदार्थांच्या ठायीं कांहीं एक अभिन्न असा अतिशय ठेविला जातो असें असेल, तर बीजादिक पूर्वींचा पदार्थ नाहींसा होऊन दुसराच अतिशयरूप पदार्थ क्रियाकारित्वानें जाणण्यास योग्य झाला असें फलित होतें. तस्मात् चिरस्थायी पदार्थांस अर्थक्रियाकारित्व लक्षण जें सत्व तें दुर्लभ आहे.

चार्वाक पुनः ह्मणतो, गौतम आणि कणाद[1] यांच्या मता प्रमाणें सत्ता सामान्य या दोहोंचा जो योग तेंच सत्व होय, असें कां नव्हे? बुद्ध उत्तर देतो. अरे गौतम आणि कणाद यांच्याच मता प्रमाणें सत्ता सामान्याशीं योग न पावणारे जे

---

१. कणाद कधीं होता तें आम्हीं जैनग्रंथाधारें त्याच्या नांवावर दाखविलें आहे परंतु येथें तो बुद्धाच्यापूर्वींचा होय असें दिसतें.

सामान्य विशेष आणि समवाय यांस असत्व प्रसंग येऊं लागेल. म्हणून सत्ता सामान्य योगित्वच सत्व असें ह्मणतां येत नाहीं. बरें असो. सत्तेशीं सामान्याचा योग म्हणून जें तूं ह्मणतोस तर तें सामान्य सर्वगत आहे कीं स्वाश्रयगत आहे ? प्रथम विकल्पीं कालाचा संकर होईल. दुसऱ्या विकल्पीं वस्तु संकर प्रसंग येईल. हें असो. प्रस्तुत हा जो तुजपुढें घट विद्यमान आहे, याच्या ठायीं राहणारें सामान्य तें उत्पन्न होणाऱ्या घटाशीं जें संबंध पावतें तें काय या घटापासून निघून संबंध पावतें किंवा तदाश्रयानेंच संबंध पावतें ? प्रथम विकल्पीं घटापासून निघून संबंध पावतें असें ह्मणशील तर गमन क्रियात्व आल्यानें सामान्याला द्रव्यत्व येईल. आणि सामान्य तर द्रव्य नाहीं. तो पदार्थ आहे. जसें ( द्रव्य गुण कर्म सामान्य विशेष समवायाभावाः सप्तपदार्थाः ) दुसऱ्या विकल्पीं संबंधाची अनुपपत्ति होईल.

आणखी घटाचा नाश झाला असतां सामान्य तसेंचें तसेंच राहतें, कीं नाश पावतें. किंवा स्थानांतरास जातें ? प्रथम विकल्पीं आहे तसेंच राहातें म्हटल्यास निराधारत्व येतें. दुसऱ्या विकल्पीं अनित्यत्व संभवतें. तिसऱ्या विकल्पीं द्रव्यत्व प्राप्त होतें. अस्तु. तस्मात् अर्थक्रिया कारित्व लक्षण सर्वांस असल्या मुळें सर्व क्षणिक. समजावें. या प्रमाणें चार्वाकाशीं बुद्धाचा वाद होऊन त्यांत त्यानें आपल्या मताचा पहिला सिद्धांत ( सर्वं क्षणिकं क्षणिकं ) सिद्ध केला. व अनुमान प्रमाण अंगीकारून परलोकादिक आहेत त्यांचीही सिद्धता केली. त्यांतील हें अंशतः वर्णन वाचकांस थोडा भासला कळावा ह्मणून आह्मी केलें. नाहीं तर या ग्रंथांत त्याचें तादृश प्रयोजन नव्हतें.

आतां बुद्धाचा दुसरा सिद्धांत-- ( सर्वं दुःखं दुःखं ) असा आहे. त्यांतील तात्पर्य असें. संपूर्ण प्रपंचास दुःखरूपत्व आहे. जर तें नसतें तर त्याच्या निवृत्ती विषयीं बुद्धिमान् व ज्ञानी पुरुषांची प्रवृत्तीच न होती. ती दिसत्ये तस्मात् सर्व कांहीं दुःखरूप दुःखरूप.

तिसरा सिद्धांत--( सर्वं स्वलक्षणं स्वलक्षणं ) याच्या विषयीं बुद्ध म्हणतो. जें वस्तु कशा प्रमाणें आहे म्हणून कोणास विचारिलें असतां त्यास दृष्टांतच मिळत नाहीं. कारण संपूर्ण वस्तूंस क्षणिकत्व आहे ह्मणून सालक्षण्याचा अभाव आहे. सारांश हें वस्तु या वस्तू सारिखें आहे असें बोलतांच येत नाहीं. या कारणास्तव सर्व वस्तु मात्र स्वलक्षण स्वलक्षणच होत. या सिद्धांतावरून बुद्ध उपमान प्रमाण मानीत नाहीं. हें वाचकांच्या लक्षांत येईलच.

चौथा सिद्धांत—( सर्वं शून्यं शून्यं ) ह्मणजे संपूर्ण जग शून्यरूप आहे. याचें प्रतिपादन असें कीं, वस्तुमात्र ह्मणून जेवढें आहे तें सत्, असत्, उभय, व अनुभय, या च्यार प्रकारांतून कोणत्याही प्रकारचें ह्मणतां येत नाहीं. जर घटादिकांचा विद्यमानपणा ह्मणजे सदत्व हा जर स्वभावच आहे, तर दंड कुलालादिक साधनाची त्यास अपेक्षा नको. ती आहे ह्मणून सत् ह्मणतां येत नाहीं. बरें घटाचा स्वभावअसतच म्हणावा तर कुलालादिकें करून त्याची उत्पत्तीच होणार नाहीं. ती होते ह्मणून असत् ह्मणतां येत नाहीं. व उभय आणि अनुभय हे जे दोन पक्ष यांचा तर परस्पर परस्परांशीं विरोध आहे. ह्मणून तेही दोन पक्ष संभवत नाहींत. तस्मात् सर्व कांहीं शून्यरूप शून्यरूप होय. या बुद्धानें युधिष्ठिर शक १०१० मध्यें नलनामक संवत्सरीं सूतपुत्र सौतीच्या गादीवरील कोणी पुरुष त्याशीं नैमिषारण्यांत वाद करून त्याचा पराभव केला, असें जैन ग्रंथा वरून समजतें. परंतु आर्यविद्या सुधाकरा वरून ब्राह्मणांनीं याच्या मताचें खंडन केल्या वरून यानें आपला धर्म चीन, सिंहलद्वीप वगैरे ठिकाणीं जाऊन प्रकट केला. ( कुमारिलभट्ट श० प० ).

या प्रमाणें बुद्धाच्या सिद्धांता विषयीं जें कांहीं आम्हीं येथें लिहून दाखविलें त्या विषयींचीं त्याचीं वचनें येथें थोडीं लिहून दाखवितों.

यत्सत्तत्क्षणिकं यथा जलधरः संतश्च भावा अमी॥ सत्ताशक्तिरिहार्थ कर्मणि मितेः सिद्धेषु सिद्धानसा॥ नाप्येकैव विधान्यथा परकृतेनापि क्रियादिर्भवेत्॥ द्वेधापि क्षण भंग संगतिरतः साध्येच्च विश्राम्यति॥ ७॥ नसतः कारणा पेक्षा व्योमादे रिव युज्यते॥ कार्यस्या संभवी हेतुः खपुष्पादे रिवासतः॥ ६॥ परिव्राट् कामुक शुना मेकस्यां प्रमदा तनौ॥ कुणपः कामिनी भक्ष्य इति तिस्रो विकल्पना॥ ७॥

बौद्धानां सुगतो देवो विश्वंच क्षणभंगुरं॥ आर्य सत्वाख्यया तत्व चतुष्टय मिदं क्रमात्॥ दुःखमायतनंचैव ततः समुदयोमतः॥ मार्गश्चेत्यस्यच व्याख्या क्रमेण श्रूयता मतः॥ दुःखं संसारिणः स्कंधा स्तेच पंच प्रकीर्तिताः॥ विज्ञानं वेदना संज्ञा संस्कारो रूप मेवच॥ पंचेंद्रियाणि शब्दाद्या विषयाः पंच मानसम्॥ धर्मायतन मेतानि द्वादशायतनानितु॥ रागादीनां गणो ऽयंस्यात् समुदेति नृणांहृदि॥ आत्मात्मीय स्वभावाख्यः सः स्यात्समुदयः पुनः॥ क्षणिकाः सर्व संस्कारा इतियावासना स्थिरा॥ समार्ग इतिविज्ञेयः सच मोक्षो ऽभिधीयते॥ प्रत्यक्ष मनुमानंच प्रमाण द्वि-

नयंतथा॥

अर्थ:– बौद्ध लोकांचा देव सुगत, विश्व हें क्षणभंगुर, आणि आर्यसत्याख्या ह्मि रूप- चार प्रकारची भावना. ते चार प्रकार असे. दुःख. २ आयतन. ३ समुदय. आणि ४ मार्ग. यांत पहिलें दुःख त्यांत विज्ञान, वेदना, संज्ञा, संस्कार, आणि रूप अशा पांच शाखा आहेत. दुसरें आयतन त्यांत पांच इंद्रियें, पांच विषय, मन आणि धर्मायतन (बुद्धि) असे बारा भेद आहेत. तिसरा समुदय. याच्या मध्यें प्रीति मात्र म्हणून जेवढ्यांची त्या सर्वांचा समावेश आहे. आणि चौथा मार्ग म्हणजे सर्व संस्कार क्षणिक अशी जी स्थिर वासना तोच. त्यासच मोक्ष ह्मणावें. बौद्धमतांत प्रत्यक्ष आणि अनुमान अशीं प्रमाणें कायतीं दोनच हें आह्मी मागें सांगितलें आहेच.

॥ गद्य. ॥

"तेच बौद्धाश्चतुर्विधया भावनया परम पुरुषार्थं कथयंति। तेच माध्य-"
"मिकयोगाचार सौत्रांतिक वैभाषिक संज्ञाभिः प्रसिद्धा बौद्धा यथाक्रमं स-"
"र्वशून्यत्व बाह्यशून्यत्व बाह्यार्थानुमेयत्व बाह्यार्थ प्रत्यक्षत्व वादानातिष्ठं-"
"ते। यद्यपि भगवान् बुद्ध एक एव बोधयिता तथापि बोद्धव्यानां बुद्धिभेदा"
"च्चातुर्विध्यं। यथागतो ऽस्तमर्क इत्युक्ते जार चौरा नूचानादयः स्वेष्टानु"
"सारेणाभि सरण परस्व हरण सदाचरणादि समयं बुध्यंते॥ ७॥ ॥७॥"

अर्थ:– तेच बौद्ध चार प्रकारच्या भावनांनीं परम पुरुषार्थ बोलतात. तेच माध्यमिक, योगाचार, सौत्रांतिक आणि वैभाषिक अशा संज्ञांनीं प्रसिद्ध आहेत. यांत माध्यमिक हा सर्व शून्यत्व वादी आहे. योगाचार बाह्यार्थ शून्यत्व वादी आहे. सौत्रांतिक बाह्यार्थानुमेयत्व वादी आहे. आणि वैभाषिक बाह्यार्थ प्रत्यक्षत्व वादी आहे. जरी या चौघांस भगवान् बुद्ध एकच बोधकर्ता होय. तथापि बोधग्राहकांच्या बुद्धि भेदानें चातुर्विध्य झालें. जसा सूर्य अस्तास गेला. इतकें ह्मणतांच, जाराची व्यभिचाराकडे, चोराची परद्रव्य हरणाकडे आणि सदाचार संपन्नाची सदाचरणादिकांकडे प्रवृत्ति होते. हें बौद्धमतांतील तात्पर्य समजावें. बौद्ध भिक्षु हातामध्यें कमंडलु बाळगणारे, मुंडन करणारे, पूर्वाण्हीं भोजन करणारे आणि रक्तांबर धारण करणारे असे असतात. (सर्वद० सं०)

२– वर लिहिलेल्या बुद्धाच्या मागून तीनशें चाळीस वर्षांनीं म्हणजे युधिष्ठिरशकाच्या तेराशे बाराव्या वर्षीं प्रजापति संवत्सरीं माघ शुक्ल नवमी मंदवारीं उत्तर कोसल प्रांतांतील कपिल वस्तु नामक नगरांत, सर्वार्थ[1] सिद्ध नावाचा बुद्धाचा दुस-

1. कै. बा. बाळशास्त्री जांभेकर यांनीं सर्वार्थसिद्धनावाचा बुद्ध इ. सना पूर्वीं १०१४ वर्षें झाल्याचें लिहिलें आहे. परंतु आम्ही दाखविलेल्या काळास व त्यास फारच फरक आहे.

रा अवतार झाला. हा सूर्यवंशोत्पन्न शद्धोदन राजाचा पुत्र होता असें बौद्ध म्हण-तात. याच्या आईचें नांव मायादेवी असें होतें. अमर सिंहानें आपल्या अमर को-शांत जीं बुद्धाचीं नांवें (मुनिः शाक्य मुनिःस्तूयः सशाक्य सिंहः सर्वार्थ सिद्धः शौ-द्धोदनिश्चसः गौतमश्चार्क बंधुश्च मायादेवी सुतश्चसः) लिहिलीं आहेत. त्यांत-लीं हीं शेवटचीं सात नांवें याचीं आहेत. याचें सविस्तर वर्णन ललित विस्तर ना-मक ग्रंथांत प्रसिद्ध आहे.

आमच्या प्राचीन कोशांत शद्धोदन राजा आहे. परंतु त्याला पुत्र लांगल अथ-वा पुष्कल अशा नांवाचा आहे. सर्वार्थसिद्ध नांवाचा नाहीं. मात्र शद्धोदनाचा बा-प शाक्य नांवाचा राजा होता. व आज्याचें नांव नातवास ठेवावें अशी चाल दिसू-न येते. तीवरून अमरसिंहानें याचें नांव शाक्यसिंह लिहिलें असेल तर नकळे. असें अनुमान होतें. ललितविस्तरांत तर जन्म परिवर्त म्हणून सातवें प्रकरणआ-हे. त्यांत मायादेवी प्रसूत झाल्याचें वर्तमान राजास कळल्यावर तो आपणाशीं काय म्हणाला व पुत्राचें नांव त्यानें काय ठेविलें त्या विषयीं असें लिहिलें आहे:—

"ततो राज्ञः शद्धोदनस्यै तदभूत् किमहं कुमारस्य नामधेयं करिष्या-"
"मि अस्यहि जातमात्रेण मम सर्वार्थ समृद्धाः संसिद्धाः यत्त्वहमस्य"
"सर्वार्थ सिद्ध इतिनाम कुर्यां। ततो राजा बोधिसत्वं महता सत्कारेण"
"सत्कृत्य सर्वार्थ सिद्धोऽयं कुमारो नाम्ना भवतु इतिनामस्याकार्षीत्."

याचा अर्थ समजण्या सारखा आहे म्हणून लिहिला नाहीं. अस्तु. वरती आम्ही याचें जन्म माघमासीं झाल्याचें लिहिलें तें ललितविस्तराशीं मिळतें. ह्मणजे ल-लित विस्तरांतील गर्भावक्रांति नामक सहव्या परिवर्तांत याचा गर्भी प्रवेश वैशाखमासीं शद्ध पौर्णिमेस लिहिला आहे. तेथून नववा माघ अगदीं बरोब-र येतो. आह्मांस याच्या जन्मकाला विषयीं वगैरे जैन ग्रंथा वरून जो शोध ला-गला आहे, त्यांतील श्लोक येणें प्रमाणें आहेत.

चतुस्त्रिंसप्त मेकंच वामगत्यास्य मेलनं॥ सएव वत्सरोज्ञेयो संज्ञा चास्य प्रजापतिः॥माघे मासे शक्लपक्षे नवम्यां मंदवासरे॥ उत्तरेकौ-सले मांते सूर्यवंशे धुरंधुरः॥ मायादेवीच यन्माता पिता शद्धोदन स्तथा॥ जितायेनाचला सर्वा स्वीयया विद्यया त्विषा॥ संवत्सरे सर्व-जिते मासे भाद्रपदे शभे॥ शक्लपक्षे पूर्णिमायां रविवारे शभे दिने मगधे चंपकारण्ये गयायाःपुण्यभूमिके॥ मध्यान्हे चंद्र नक्षत्रे पूर्वा

भाद्रपदे शुक्ले॥ पंचाशत् षोडश शते पांडवानां शके महान्॥ महावीरो बुद्ध राजो समाप्ति मगमत्प्रभुः॥

युधिष्ठिर शक सव्वाशें बत्तीस जाण्याचा शेष राहिला असतां प्रजापति संवत्सरीं युधिष्ठिर शकाच्या १३१२व्या वर्षीं हा सर्वार्थसिद्ध बुद्ध जन्मला. (मूळावरून १३१० हा शक घेऊन संवत्सरास चूक पडते. तसाच याचा काळ,युधिष्ठिराच्या अवशेष राहिलेल्या सोळाशें छपन्नाव्या वर्षीं म्हणजे १३८८ व्या वर्षीं भाद्रपद शुद्ध पौर्णिमा रविवारीं मगध देशीं गयेजवळ चंपकारण्यांत झाला.) (मुळांत १३९४ मध्यें काळ दिसतो.पण संवत्सराची चूक पडत्ये.) हे संवत्सर विक्रम संवत्सरापासून मोजायाचे असें समजावें. हा मरण पावला त्या वेळेस याच्या वयास शाहात्तरावें वर्ष होतें.

वर जो याचा जन्ममरण काळ लिहिला. तो ताडून पाहण्यास दुसरें प्रमाणमिळणें अवश्य आहे. व तें मिळालें असतां याचा यथार्थ निर्णय ठरणार आहे.अस्तु. वरील संख्ये वरून पाहतां यास होऊन गेल्यास आजमितीस ३६६८ वर्षें जाहलीं आहेत.

३– जैन ग्रंथांत तिसरा एक बुद्ध आढळतो. व तो दुसऱ्या बुद्धाच्या मागून ६६५ वर्षांनीं झाल्याचें दिसून येतें. याच्या आईचें नांव वरुणावती व बापाचें नांव धनंजय होतें. चित्रकूटा जवळ याचें जन्म युधिष्ठिर शकाच्या १९७७ राव्या वर्षीं रुधिरोद्गारी संवत्सरांत कार्तिक शुक्लपक्षीं झाल्याचें लिहिलेलें आहे. हा संवत्सर ग्रंथकारानें प्रभव संवत्सरापासून धरला आहे. सारांश वरील संख्ये वरून या बुद्धास होऊन गेल्यास तीन हजार तीन वर्षें झालीं आहेत. (जैनग्रंथ).

**बुद्धकृत पूजाविधि**– पहिल्या बुद्धानें संस्कृतांत केलेला ग्रंथ.

**बुद्धविजय**– हा संस्कृत ग्रंथ आहे. यांत बुद्धाचा दिग्विजय वर्णिला आहे.

**बुद्धसूत्रें**– पहिल्या बुद्धानें रचलेलीं बौद्धधर्म विषयक सूत्रें.

**बुद्धिसागर**– भोजराजाचा जुना मंत्रि. (भोजप्र॰पहा.)

**बृहच्छब्दरत्न**– हा संस्कृत व्याकरण विषयक ग्रंथ नागोजीभट्टकृत आहे.

**बृहच्छब्देंदुशेखर**– नागोजी भट्टकृत संस्कृत व्याकरण विषयावर.

**बृहज्जातक**– विक्रम सभेंतील वराहमिहिर कृत ज्योतिष विषयक संस्कृत ग्रंथ. याचीं प्रकरणें २६आहेत. त्यांचीं नांवें येणें प्रमाणें:– १ राशिभेद. २ ग्रहयोनिभेद. ३ वियोनि जन्म. ४ निषेक. ५ जन्म. ६ रिष्ट. ७ आयुर्दाय. ८ दशा व अंतर्दशा. ९ अष्टकवर्ग. १० कर्मजीव. ११ राजयोग. १२ नाभसयोग. १३ चंद्रयोग. १४ द्विग्रहयोग. १५प्रव्र-

ज्या.१६ राशीभाव. १७ दृष्टिफल. १८ भावफल. १९ आश्रय. २० प्रकीर्णका.२१ अनिष्ट योग. २२ स्त्री जातक. २३ निर्याण. २४ नष्टजातक. २५ द्रेष्काण. २६ आणि उपसंहार. याच्याव-र जगच्चंद्रिका नांवाची उत्पलभट्ट कृत व महीधरी महीधरभट्टकृत, अशा दोन टी-का आहेत.

**बृहत्**– सूर्यवंशोत्पन्न कलियुगांतील राजा. हा कृमित्र राजाचा पुत्र. व बर्हि राजाचा बाप. हा दुसऱ्या बुद्धाच्या पूर्वीचा त्याचा सातवा पूर्वज होता. (राजमा.)

**बृहत्कथा**– कात्यायनकृत सात लक्ष श्लोकांचा ग्रंथ तो. हा संस्कृत भाषेंत आहे.

२– गुणाढ्य कवीनें केलेला ग्रंथ. हा इसवी सनाच्या दुसऱ्या शतकांत प्रथम पैशाची भाषेंत लिहिला गेला. नंतर सोमदेव भट्टानें तोच संस्कृत भाषेंत उतरला. व त्याचें नांव कथासरित्सागर असें ठेविलें. असें बुल्हर साहेबाचें मत आहे.

**बृहत्कथामंजरी**– क्षेमेंद्रकविकृत संस्कृत ग्रंथ. [बाप.

**बृहत्सेन**– कलियुगांतील जरासंध वंशीय राजा. कृतक्षत्र राजाचा पुत्र व कर्मजित् राजाचा

**बृहदारण्यकभाष्य**– श्रीमच्छंकराचार्यकृत एक व सुरेश्वराचार्यकृत दुसरें.

**बृहद्रण**– द्वापर युगाचे अंतीं कौरव पांडवांच्या युद्धांत अभिमन्यूच्या हातून मरण पाव-लेला जो सूर्यवंशी बृहद्बल राजा त्याचा हा पुत्र. यास कलियुगांतील सूर्यवंशोत्पन्न प-हिला राजा म्हटलेलें आहे. शौद्धोदनी नांवाचा दुसरा बुद्ध तो यापासून बाविसाव्या पिढी-स झाला. (राजमा.)

**बृहद्रथ**– युधिष्ठिर वंशीय कलियुगांतील राजा. याच्या राज्यकारकीर्दी पर्यंत युधिष्ठिर शक १४४१६१०६३ इतका गत झाला होता. व दुसरा बुद्ध निर्वाण पावून ५३ वर्षें झालीं हो-तीं. याच्या बापाचें नांव तिमिराजा. व पुत्राचें नांव सुदास होतें. (राजमा. व हिं.हु.इ.)

**बृहद्वाक्यवृत्ति**– श्रीमच्छंकराचार्यकृत, ५४ श्लोकांचा ग्रंथ.

**बृहन्मंजूषा**– नागोजी भट्टकृत संस्कृत ग्रंथ. हा व्याकरण विषयावर आहे.

**बृहस्पति**– अमरकोश पंजिका नामक संस्कृत ग्रंथाचा कर्ता.

**बेटावर्धन**– द्वार समुद्र शहरचा राजा. हा रामानुजाचार्यांच्या वेळेस तेथें होता.

**बेदनूर**– कर्नाटकांतील एक शहर. हें गजेंद्रगडाकडे आहे.

**बेदरशहर**– सोलापुराच्या पूर्वेस हें आहे. व या जवळून मांजरा नदी वाहते.

**बोधगिरि**– विश्वरूपाचार्यांचा शिष्य. व ज्ञानगिरीचा गुरु. [भाषेंत.

**बोधबासस्टी**– शिवरामस्वामीकृत् ६२ कडव्यांचें पद व सभासीचें ६३ वें कडवें मराठी

**बोधलेबावा**– देशावर धामणगांव म्हणून गांव आहे. तेथला पाटील माणकोजी बो-

बोधल्या नांवाचा मोठा भगवद्भक्त होऊन गेला तोच हा. हा जातीचा शूद्र होता व याचें उपनांव जगताप होतें. याची बायको पुत्र व सून अशी याचीं एकंदर माणसें याच्याच प्रमाणें होतीं. बायकोचें नांव ममताई असून पुत्राचें यमाजी होतें. यमाजीची बायको भागीरथी होती. व ती सासू सासरा व नवरा यांच्या अनुसारें वागणारी असे. एकदां असें सांगतात कीं, स्वतः देव ब्राह्मणाचें रूप धारण करून याजकडे आला. आणि यास ह्मणूं लागला कीं, माझी बायको मरण पावली आहे व मी तर अगदीं तरुण आहें; यास्तव तुझी सून मला देशील तर पहा. जरी तूं श्रीमान् आहेस व मला लग्नही करण्यास पैसा देशील हें खरें. तरी आतां येथून लग्न करितांच लागलीच ती मोठी होते असें नाहीं. निदान तिला वयांत येण्यास कशींतरी दोन तीन वर्षें पाहिजेत. यास्तव ही ऐती वयांत आलेली जाणून तुजजवळ हिची याचना करीत आहें. त्या वरून यानें तत्काळ भागीरथीस व पुत्रास हांक मारून त्यांचें अनुमत घेतां त्यांचा मोठ्या संतोषानें त्या गोष्टीस रुकार पडल्या वरून भागीरथीस ब्राह्मणाच्या स्वाधीन केलें.

भागीरथीस घेऊन ब्राह्मण चालला. आणि सुमारें दोन कोस पर्यंत तिला घेऊन गेल्यावर एका एकीं अदृश्य झाला. त्या वरून भागीरथीनें करुणास्वरें करून जी त्याची स्तुति केली ती फारच रसभरित कोणी कवीनें वर्णन केली आहे. सारांश त्या स्तुती वरून ब्राह्मण पुनः प्रगट झाला. व तिला परत बोधल्या बावाकडे पोंहोंचवून सर्वांस त्यानें दर्शन दिलें. या वरून बोधल्या बावाची योग्यता व सर्व माणसांची त्यास अनुकूलता कशी होती ती स्पष्ट समजून येते. याच्या आणखीही कित्येक गोष्टी चमत्कार वगैरेच्या अशाच आहेत. त्या ज्यांस पाहण्याची इच्छा असेल त्यांनीं भक्तविजयाचा ५३ वा अध्याय पहावा. हालीं याचे वंशज धामणगांव येथें आहेत. व त्यांस कांहीं उत्पन्नही आहे. यास होऊन गेल्यास सुमारें शंभर वर्षें झालीं असावींत असा अजमास आहे. कारण याचे पणतु आमच्या पाहण्यांत आहेत. व त्यांस पाहिल्यास सुमारें ३४ किंवा ३५ वर्षें झालीं आहेत.

**बोधामृत**— मराठी भाषेंत शिवरामस्वामीकृत श्लोक बद्ध.

**बोपदेव**— हा पंडित शके १२०० होता. याचे प्रायः सर्व शास्त्रांवर ग्रंथ आहेत. व्याकरण वैद्यक आणि अलंकार इत्यादि विषयांचे ग्रंथकार जे आलीकडे होऊन गेले त्यांनीं आप आपल्या ग्रंथांत याचें मत वारंवार घेतल्याचें आढळून येतें. मगध बोध ह्मणून बालभाषे वर रचलेलें याचें व्याकरण आहे, त्यांत मागधी, पैशाची, शौरसेनी आणि राक्षसी या च्यार भाषांचे नियम यानें ११०० सूत्रांनीं बांधिले

आहेत. मगध बोधांचीं एकंदर प्रकरणें बारा आहेत. या व्याकरणाचा बंगाल्यांत मोठा मान आहे. व त्यावर रामानाचारी वगैरे कर्त्यांच्या रूमारें आठ टीका आहेत.

संस्कृत व्याकरणाचेही नियम यानें बांधिले आहेत. परंतु हा पंडित ऋषि नसल्या मुळें त्यांस ऋषिप्रोक्तत्व नाहीं असें समजून लोक त्यास द्यावा तसा मान देत नाहींत. असो. धातुपाठ, छंदःशास्त्र, कविकल्पद्रुम, कविकामधेनु इत्यादि ग्रंथ याचेच आहेत. कविकल्पद्रुम ग्रंथांत यानें संस्कृत क्रियापदांचे संपूर्ण मूळधातु दाखवून तो पद्यरूपानें रचिला आहे. व त्यांत दोन हजारां पासून साडेतेवीसशें पर्यंत इतके धातु वर्णिले आहेत. या ग्रंथावर धातुदीपिका नांवाचीटीका दुर्गादास कृत एक असून कविकामकल्पद्रुम व्याख्या नांवाची रामन्यायालंकारकृत दुसरी टीका आहे.

कवि कामधेनु ग्रंथांत यानें समानानुपूर्विक धातु कस कसे पालटतात त्यांविषयीं निरनिराळ्या खुणा देऊन निराळे काढिले आहेत. आणि त्यांत पाणिनि ऋषि, शाकटायन, आपिशली इत्यादि वैयाकरणांच्या मतें कोणकोणत्या खुणा आहेत त्या सर्वांचा विचार करून त्या सर्वां विषयीं सर्व साधारण नियम बांधिले आहेत. असा हा पंडित मोठा विद्वान् होता. वैद्य शास्त्रावर याचा शतश्लोकी नांवाचा एकच काय तो ग्रंथ आहे. श्रीमद्भागवत यानें रचिलें असें ह्मणतात. परंतु वर लिहिलें आहे कीं, हा ऋषि नव्हता. असें असतां तें लोकांत कसें मान्य झालें? यास्तव भागवत ग्रंथ याचा नव्हे. (कविच.)

**बोमणदेव**— बिजल राजास मारणारा बसवाच्या तीन मल्लांपैकींतील एक.

**बोम्मनपोतराजू**— प्रसिद्ध जो मल्लन कवि त्याचा बाप. हा जातीचा तैलंग ब्राह्मण मोठा विद्वान् होता.

**बोम्मीदेव**— हा एक लिंगाईत धर्मी अट्टल चोर होता. याचा धंदा असा असे कीं, इतर धर्माच्या लोकांचीं घरें फोडून द्रव्य चोरून आणून लिंगाइतांस वांटावें. लिंगाईत धर्माची दीक्षा यास बसवा पासून मिळाली होती. त्या मुळें याच्यावर बसवाची अत्यंत कृपा होती. एकदां असें झालें कीं, याच्या घरीं अतिशय जंगम आले. आणि यास भोजन व द्रव्य मागूं लागले. तेव्हां यानें राजाचा खजिना फोडून द्रव्य आणावें व जंगमांस तृप्त करावें असा निश्चय करून राजवाड्याकडे चाल केली. इतक्यांत यास बसव भेटला. त्यास पाहून यानें त्यास आपला हेतु कळवून ह्मटलें कीं, मला खजिन्यांत नेऊन सोडा. बसवानें मुकाट्यानेंच त्यास चोरवाटेनें आंत सो-

डिलें. त्या वरून बोम्मी देवानें खजिना फोडून द्रव्य घेतलें व जंगमास तृप्त करून मार्गस्थ केलें. ही गोष्ट पाहरेकऱ्यांनीं राजास कळविली. व बसव चोरांस सामील असल्याचें सांगितलें. त्या वरून राजानें बसवास बोलावून आणून त्यास त्यानें बरोबर घेतलें व खजिना पाहण्यास गेला. तों चोरानें ज्या जागीं भिंतीस भोंक पाडिलें होतें तेथील भिंत जंगमाच्या स्पर्शानें सुवर्णमय झालेली पाहून तो अगदीं थक्क झाला. असें बसवपुराणांत आहे. (महा. कर्ना. इति.)

**बोल्होबा—** प्रसिद्ध आणि साधु जो तुकाराम त्याचा बाप. कन्हयाचा मुलगा.

**बौद्ध—** बुद्धाचा जो मतानुयायी तो. बुद्धि हाच आत्मा प्रतिपादन करणारा म्हणून बुद्धासही म्हणतात.

**बौद्धनय—** बौद्ध मताचा संस्कृत ग्रंथ. याचा कर्त्ता हरदत्त होता.

**ब्रह्मगीता—** माधवाचार्यकृत संस्कृत ग्रंथ. यांत रामानुज आणि मध्व यांच्या मताचा अनुवाद करून शांकरसिद्धांत दृढ केला आहे. याजवर प्रकाशिका नांवाची टीकाही आहे.

**ब्रह्मगुप्त—** साहा प्रकारच्या वैष्णवांतील क्रियापंथाचा वैष्णव. हा श्रीमच्छंकराचार्यांच्या वेळेस होता. आचार्यांशीं यानें वाद करून त्यांत हा पराभूत झाल्यामुळें त्याचें शिष्यत्व स्वीकारिलें (आनं. गि. शं. वि. प्र. ६).

२— हा एक मोठा ज्योतिषी भास्कराचार्यांच्या पूर्वी होऊन गेला. कोलब्रुकचें असें मत आहे कीं, इसवी सनाच्या सातव्या शतकांत म्हणजे भास्कराचार्यांच्या पूर्वी चारशें वर्षें झाला होता. ब्रह्मसिद्धांत नांवाचा ग्रंथ तो यानेंच केलेला आहे. (बुल्हर. शोध.)

**ब्रह्मनाळ—** आनंदमूर्ति म्हणून जे प्रसिद्ध पुरुष रामदास स्वामींच्या वेळेस होते त्यांची येथें समाधि आहे. हा गांव सातारजिल्ह्यांत आहे.

**ब्रह्मदेश—** हिंदुस्थानाच्या पूर्वभागीं हा एक देश आहे. येथील राजा हिंदु परंतु बौद्धधर्मी आहे. अमरपूर हें त्याच्या राजधानीचें शहर होय.

**ब्रह्मपुत्रानदी—** ही हिमालयाच्या उत्तर अंगाकडून निघून तिबेटांतून व आसामांतून वाहात जाऊन बंगालच्या उपसागरास मिळाली आहे.

**ब्रह्मविद्याभरण—** शांकरसिद्धांत प्रतिपादक अद्वैतानंदकृत संस्कृत ग्रंथ.

**ब्रह्मसमाज—** ब्राह्मधर्म म्हणून जो एक नवा पंथ बंगाल्यांत निघाला आहे त्याचा समाज तो. प्रार्थनासमाज, आर्यसमाज, सत्यसमाज इत्यादि पंथ अलीकडे याच नमुन्यावर निघाले आहेत.

ब्रह्मसिद्धांत– ब्रह्मगुप्तानें रचलेला ज्योतिषविषयक सिद्धांत यांत पृथिवी गोलाकार वगैरेआ-हे याचेंच प्रतिपादन केलेलें आहे. याचे श्लोक १२६० आहेत.

ब्रह्मस्तुतिटीका– मराठी भाषेंत श्लोकबद्ध वामनपंडित कृत.

ब्रह्मांडगिरि– काश्मीराकडील एक विद्वान् संन्यासी. (बुध्द- शोध.)

ब्रह्मानंद– प्राकृत भाषेचा कवि श्रीधर त्याचा बाप.

२– अबूच्या पाहाडाकडील राहणारा एक भार ज्ञानीचा पुरुष. हा कवि होता व यानें गुजराथी भाषेंत कृष्णवर्णन लिहिलें आहे. (का. गु.)

ब्रह्मावर्त– हें एक शहर भागीरथीच्या कांठीं कानपुरा जवळ आहे. यास हल्लीं कित्येकलो-क बिठूर म्हणतात.

ब्राह्मधर्म– हा नवा धर्म बंगाल्यांत निघालेला आहे. याची उत्पत्ति शके १७४४ म्हणजे इ-सवी १८२२ त झाली. याचा मूळ उत्पादक राममोहनराय नांवाचा एक बंगाली ब्राह्मण होता. वैदिक धर्मांतील कित्येक गोष्टींची धरसोड करून हा धर्म उत्पन्न केलेला आहे. यांत ईश्वर निर्गुण निराकार आहे. यास्तव त्याची भक्ति केवळ मनानेंच केली पाहिजे. इत्यादिक कित्येक सप्रयोजक व वर्णाश्रम धर्माचें उल्लंघन इत्यादि कित्येक अप्रयोजक सिद्धांत आहेत.

## भ.

भक्त– साहा प्रकारच्या शैवांतील पांचवा प्रकार. व साहा प्रकारच्या वैष्णवांतील पहिला प्रकार. शंकराचार्यांच्या पूर्वीं हीं मतें उत्पन्न झालीं होतीं. व पुढें आचार्यांनीं यांसचांगला बोध करून शुद्धाद्वैतमतांत आणिलें. (आनं. शां. वि.)

भक्तचरित्र– हा ग्रंथ मराठी भाषेंत आहे. व तो उद्धवचिद्घन नांवाच्या साधूनें केलेलाआहे. यांत भगवद्भक्तांचीं चरित्रें वर्णिलीं आहेत.

भक्तचिंतामणि– हा ग्रंथ गुजराथी भाषेंत निष्कुळानंद नामक कवीनें केलेला आहे.

भक्तमाल– हा ग्रंथ हिंदुस्थानी भाषेंत गद्यरूप संतचरित्रा वरून नाभाजीनें केलेला आहे.

भक्तलीलामृत– हा ग्रंथ मराठी भाषेंत ओंवीबद्ध महीपति बावा ताहराबादकर यां-नीं केलेला आहे. भक्तविजयांत जे जे भक्त आले नाहींत किंवा आले असून ज्यां-चीं चरित्रें अपुरीं राहिलीं तीं यामध्यें पूर्ण केलीं आहेत. म्हणून हा ग्रंथ भक्तवि-जयाची पुरवणी म्हटल्यास चिंता नाहीं.

भक्तविजय– महीपतिबावा ताहराबादकर यांनीं मराठी भाषेंत लिहिलेला ओंवीबद्ध

ग्रंथ. याचे अध्याय एकंदर ५७ आहेत. व यांत महाराष्ट्रांतले तसेच उत्तर हिंदुस्थानांतले बहुतेक भगवद्भक्त यांचीं वर्णनें आहेत. हा ग्रंथ नाभाजीच्या भक्तमाल ग्रंथाचा व उद्धवचिद्घनकृत भक्तचरित्राचा आधार धरून लिहिला. असें त्यांनीं यामध्यें दर्शविलें आहे.

भक्तिनिधि– हा ग्रंथ निष्कुळानंद कविकृत गुजराथी भाषेंत आहे.

भक्तिपोषण– दयाराम कविकृत गुजराथी भाषेंतील ग्रंथ.

भक्तिप्रकरणनिबंध– हा ग्रंथ वल्लभाचार्यकृत संस्कृत भाषेंत आहे.

भक्तिवर्द्धिनी– वल्लभाचार्यकृत भक्तिविषयक संस्कृत ग्रंथ.

भंग– मंखककवीचा भाऊ. (बु. का. शो.)

भगवत्पूज्यपाद– श्रीमच्छंकराचार्यांचें प्रतिष्ठा नांव. या नांवाचा प्रयोग पंचदशी ग्रंथांत विद्यारण्यांनीं भूतविवेका मध्यें केलेला आहे. तें वाक्य येणें प्रमाणें:– "भगवत्पूज्यपादाश्च शुष्कतर्क पटूनमून् ॥ आहु र्माध्यमिकान् भ्रांता नचिंत्येऽस्मिन् सदात्मनि" याशिवाय अप्पय्या दीक्षितांच्या नांवावर जें त्यांनीं केलेलें पद आह्मीं लिहिलें आहे त्यांत ही या नांवाचा उल्लेख आहे.

भगवंतबावा– याची हकीगत मिळाली नाहीं. याचें नांव भक्तविजयांत दाखल मात्र झालेलें आहे.

भगवंतभक्त– नाभाजीच्या भक्तमालेंत याचें नांव आहे.

भगवंत भट्ट– महीपतीच्या भक्तविजयांतील साधु.

भगवद्ध्यान– हा ग्रंथ वेदांताचार्यकृत संस्कृतांत आहे.

भगवान्– बुद्धाच्या नांवा पैकीं एक. अमर कोशाच्या पहिल्या कांडांत हें पहावें.

भगवान्दास– नाभाजीच्या भक्तमाले पैकीं एक भगवद्भक्त.

भगीरथराव– हे हल्लीं शके १८०१ पर्यंत शिंदे घराण्यांतील गादीवर आहेत.

भट्टउद्भट– अलंकार शास्त्र व कुमारसंभव या दोन ग्रंथांचा कर्ता. (बुल्ह० का० शोध) हा प्रतिहार इंदुराजाच्या आधींचा होय. कारण याच्या ग्रंथावर त्याची टीका आहे.

भट्टकल्लट– मुकुल कवीचा बाप. हा वसुगुप्ताचा शिष्य होता. व अवंतीवर्म राजाच्या वेळेस ह्मणजे इसवी सनाच्या नवव्या शतकांत असे. रत्नाकर पंडित व हा समकालीन होते. (बु० का० शो०).

भट्टदत्तात्रेय– दत्तात्रेय भट्ट तोच. पद्यरूप अमृतार्णव ग्रंथाचा कर्ता.

भट्टनारायण– हा कवि काश्मीराकडील होय. स्तवचिंतामणि ग्रंथाचा हा कर्ता. उत्पल

भट्ट व हा दोघे समकालीन होते. क्षेमराज तो याच्या मागला होय. कारण याच्या ग्रंथावर त्याची टीका आहे. (बु० का० शोध.)

भट्टपाद– कुमारिल भट्टासच ह्मणत असत. या विषयीं माधवपंडितानें आपल्या शंकर विजयांतील पहिल्या सर्गांत या प्रमाणें ह्मटलेलें आढळतें. "ततः सतारकारातिरजनिष्ठ महीतले॥ भट्टपादोऽभिधायस्य भूषादिक् स्फदशा मभूत्॥६०॥"

भट्टमूर्ति– हा कवि पेनुमंडल सुंभ्यांतील भट्टपाल क्या नांवाच्या खेड्यांत जन्मला होता. तेलंगी व संस्कृत या दोन्ही भाषांत हा चांगला प्रवीण असे. यानें जीं जीं काव्यें रचिलीं तीं पाहून कित्येक कवींनीं तर याचें शिष्यत्वच केलें. छंदःशास्त्रांत यानें पुष्कळ विद्यार्थी तयार केले. कृष्णदेव राजाच्या दरबारीं याला पुढें आश्रय मिळून याची गणना त्याच्या कविवर्गांत झाली. नरसभूपालेय नांवाचें काव्य जें यानें केलेलें आहे तें हल्लींच्या कवींस पराकाष्ठेचें आश्चर्य करण्या सारखें आहे. कृष्णादेव मेल्यावर यानें वसुचरित्र नांवाचें एक वीररस प्रधान काव्य रचिलें. त्यांत वसुराजा व गिरिका यक्षिणी या उभयांचा विवाह वर्णिला आहे. या वसुचरित्रास यानें भारताचा आधार धरिला आहे. हें काव्य यानें तिरुमल रावास अर्पण केल्या वरून राजानें यास पुष्कळ इनाम करून दिलें. त्या मुळें याचें उत्तरवय सुखसमाधानांत जाऊन हा आपल्या वयाच्या साठाव्या वर्षीं आपल्या गांवींच मरण पावला. हा कवि कृष्णादेवाच्या वेळेस होता ह्मणून शालिवाहनाच्या पंधराव्या शतकाच्या उत्तरार्धांत होता. (कविच.)

भट्टभास्कर– हा एक मोठा मीमांसक शालिवाहनाच्या साह्याव्या शतकांत होता.

भट्टमूर्ति– हा तैलंग जातीचा ब्राह्मण विद्वान् व कवि होता. हा कृष्णराजाचा प्रधान होता. याचें काव्य वगैरे कांहीं आढळत नाहीं. त्या वरून हा कवितेचा मर्मज्ञ होता. इतकेंच दिसतें. (कविच.)

भट्टवासुख– रुद्रकाचा बाप. (रुद्रक श० प०).

भट्टाचार्य– जैन ग्रंथांत कुमारिलभट्टास ह्मटलेलें आढळतें.

भट्टीकाव्य– जयमंगला टीके सहित काव्य तें. हें भर्तृहरीकृत आहे असें ह्मणतात; परंतु हा भर्तृहरी विक्रमाचा भाऊ नव्हे, तर क्षीर स्वामीचा मुलगा होय. असें कोलब्रुक साहेबाचें ह्मणणें आहे.

भट्टोजीदीक्षित– हा पंचगौडां पैकीं सारस्वत जातीचा ब्राह्मण होता. याचें जन्म शके पंधराशांत झालें होतें. असें सांगतात कीं, याचे पूर्वज बहुत काळापासून महा-

राष्ट्र देशांत राहात असत. व त्यांकडेस एका देवस्थानांतील पुजारीपणाचा अधिकार असे. महाराष्ट्रांत राहणाऱ्या सारस्वत ब्राह्मणांस शेणवयी ह्मणतात हें प्रसिद्ध आहेच. वडिलोपार्जित पूजाधिकार हाच पुढें चालूं लागला. याच्या वंशास दीक्षित हें उपपद होतें ह्मणून तें राखण्या साठीं यानें मोठ्या तसरतेनें शास्त्राभ्यास केला. व तो श्रीक्षेत्र काशी येथें यास पूर्ण साध्य झाला.

पुढें अध्ययन पूर्ण झाल्यावर व्याकरण शास्त्रावर यानें कित्येक ग्रंथ लिहिले त्यांत सिद्धांत कौमुदी हा ग्रंथ अत्यंत उत्कृष्ट व विद्वन्मान्य आहे. प्रथम जेव्हां यानें हा ग्रंथ लिहिला तेव्हां तो प्रसिद्ध होण्या साठीं यानें त्याच्या पुष्कळ प्रति लिहवून मोठमोठाल्या क्षेत्रांत वांटिल्या. त्यांत याचा ग्रंथ चांगला उतरला. अशा विषयीं पहिली मान्यता अपय्या दीक्षितांनीं दिली. या ग्रंथाची रचना अध्ययन करणारांस इतकी सोयवार झाली आहे कीं, तेणें करून तो लवकरच प्रसिद्धीस आला. व सर्व विद्वानांस प्रियही झाला.

याच ग्रंथावर प्रौढमनोरमा नांवाची टीका आहे व तिची संख्या बारा हजार आहे. तिजवरच पुढें बृहच्छब्दरत्न व लघुशब्दरत्न अशा नांवाच्या दोन टीका नागोजी भट्टानें लिहिल्या. तत्त्वबोधिनी नांवाचीही आणखी एक टीका आहे. व ती ज्ञानेंद्र सरस्वती यांनीं लिहिली आहे. अस्तु. वैयाकरण भूषण हा एक ग्रंथ दीक्षितांनींच लिहिलेला आहे. व तो न्यायशास्त्राचें अध्ययन झाल्यावर जे व्याकरण पढूं इच्छितात त्यांच्या सोयीचा आहे. यांचा शब्दकौस्तुभ ह्मणून जो तिसरा ग्रंथ आहे. त्यांत मूळांतील सूत्रार्थांचा निर्णय करण्या साठीं शंकासमाधान रूपानें पुष्कळ विचार करून मूळांतील सर्व अर्थ सरळ दाखविला आहे. या ग्रंथा विषयीं असें सांगतात कीं, पाणिनीच्या अष्टाध्यायीवर हा ग्रंथ दीक्षितांनीं एक लक्ष लिहिला होता. परंतु कित्येक पंडितांनीं तो बुडवून टाकून त्याच्या पहिल्या अध्यायांतील नऊ प्रकरणांची नवाह्निकी जिची संख्या नऊ हजार आहे तेवढा ग्रंथ काय तो ठेविला. व तोच कौस्तुभ हल्लीं उपलब्ध आहे. व्याकरण विषयावर कौस्तुभाचाच संक्षेप असा दीक्षितांचा चौथा ग्रंथ आहे. त्यावर बाळंभट्ट पायगुंडे यांची एक टीका असून भूषणसारदर्पण नांवाची हरिवल्लभकृत दुसरी टीका आहे.

दीक्षितांचे धर्मशास्त्रावरही कित्येक ग्रंथ आहेत. परंतु त्यांत उपलब्ध असा एक अशौचनिर्णय व अन्हिक एवढे दोनच आहेत. दीक्षितांनीं आपल्या उतार वयांत न्याय शास्त्राचा व्यासंग केला. आणि त्यांतच ते आपला काळ घाल-

वीत असतां वयाच्या छप्पन्नाव्या वर्षीं क्षेत्रींच मरण पावले. यांस भानुदीक्षित नांवाचा एक पुत्र होता.

दीक्षितां विषयीं लोकांत एक दंतकथा असलेली अशी ऐकण्यांत येते कीं, यांच्या मनाजोगा विद्यार्थी यांस व्याकरण पढविण्यास न मिळाल्यामुळें त्यांची तद्विषयक वासना राहून गेली. आणि त्या योगानें ते ब्रह्मराक्षस होऊन वंशजांस उपद्रव करूं लागले. म्हणून वंशजांनीं वाडा ओस पाडिला. या गोष्टीस दहापांच वर्षे गेल्यावर एक विद्यार्थी व्याकरण पढावें या इच्छेनें काशीस गेला. व लोकांस पुसूं लागला कीं, येथें व्याकरण पढण्याची सोय कोठें होईल? तेव्हां कित्येक थट्टेखोर लोकांनीं त्या अमुक वाड्यांत जा म्हणजे तेथें दीक्षित आहेत ते तुह्मांस व्याकरण पढवितील असें सांगितलें. ही गोष्ट त्या विद्यार्थ्यास खरी वाटून तो त्या वाड्यांत निःशंकपणानें गेला. आणि पाहतो तों रेशीमकांठी धोतरजोडा नेसलेले, अंगावर शालजोडी व पुढें रुप्याचीं भांडीं असून दीक्षित संध्या करीत आहेत. मग हेच दीक्षित खचित होत. अशा निश्चयानें विद्यार्थ्यानें त्यांस नमस्कार करून आपला हेतु कळविला. त्या वरून दीक्षित बरें ह्मणून त्यास बोलले कीं, अध्ययन संपे पर्यंत तुह्मी घाटावर किंवा अन्यत्र कोठें बाहेर मात्र भलतीं जाऊं नये. येथें खुशाल जेऊन अध्ययन करीत जावें म्हणजे झालें. विद्यार्थी गरीबच होता. त्यानें पाहिलें कीं, जेवणाची सोय होऊन अध्ययन होतें. मग बाहेर जाऊन तरी काय करणें आहे. असें मनांत आणून त्यांस त्यानें उत्तम आहे असें ह्मटलें. व अध्ययनास आरंभ केला. सात आठ वर्षांनीं अध्ययन समाप्त झाल्यावर दीक्षितांनीं त्यास आपली खरी हकीकत सांगून व पुष्कळ द्रव्य देऊन त्याकडून गति घेतली. (क. च.)

**भतुर—** निषध देशांतील एक शहर. याचे उ. अ. क्ष. २९ व पू. रे. ७४ आहेत. (रा. मा.)

**भद्रक—** शौंग अथवा संग राजांतील पांचवा राजा. व क्षमित्राचा पुत्र. व पुलिंदाचा बाप.

**भद्रनारायण—** हा कवि बाणभट्टाचा मित्र होता.

**भद्रबाहु—** हा एक जैन कवि होता. परंतु हा कधीं व कोठें होता त्याचा ठिकाण लागला नाहीं. जैन धर्मा विषयीं याचीं कल्पसूत्रें आहेत. (ग्या. इं. को.)

**भरतपुर—** हें शहर राजस्थानांत आहे. याचे उ. अ. क्ष. २६ व पू. रे. ८२ आहेत.

**भरतभाव—** हा वामनपंडितकृत श्लोकबद्ध ग्रंथ आहे.

**भरतराजा—** दुष्यंत राजाचा पुत्र. हा राजा अर्वाचीन जरी नाहीं तरी याच्या शका-

रंभाचा संवत्सर व पुढें त्याचा युधिष्ठिर शकाशीं मेळ, हें समजलें पाहिजे म्हणून ये-थें लिहिला आहे. युधिष्ठिराचा शक चालू होण्या पूर्वी याचा शक चालू होता. व तो ८९० वर्षे चालून युधिष्ठिर शक चालू होतांच बंद पडला. याच्या शकाचा आरंभ ई-श्वर संवत्सरापासून झाल्या विषयीं जैन ग्रंथांत या प्रमाणें आहे. "ईश्वरे वत्सरे रा-धे तृतीया रविवासरे ॥ शक्ले दुष्यंत पुत्रस्य प्रवृत्तो वें शकोत्तमः॥ (संक्षेपजिनविजय)

**भरद्वाजकवि**– याचा काळ व स्थळ कळत नाहीं. कालिय कुतूहल प्रहसन हें काव्य मात्र याचें प्रसिद्ध आहे. (बु. का. शो.)

**भर्तृहरि**– युधिष्ठिराच्या तिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत या कीर्तिमान् पुरुषाचें जन्म झा-लें. प्रसिद्ध जो शककर्त्ता विक्रमादित्य त्याचा हा वडील भाऊ होता. विक्रम शक चालू होण्या पूर्वी उज्जनींत हा राज्य करीत होता. म्हणून यास होऊन गेल्यास दोन ह-जार वर्षे होऊन गेलीं आहेत. हा मोठा विद्वान् व योगी असा होऊन गेला. या-चीं धाकटीं तीन भावंडें म्हणजे विक्रमादित्य, शुभ्रवीर्य, आणि मैनावती. या-च्या मागून एकामागें एक अशीं दोन दोन तीन तीन वर्षांच्या अंतरानें जन्मलीं हो-तीं. याच्या बापाचें नांव वीरसेन असें होतें, व तो गंधर्व होता. आणि आईचें नांव शुशीला असून ती राजकन्या होती.

व्याकरण शास्त्रा विषयींचा हा एक मोठा प्रख्यात व्याख्याकार होऊन गे-ला. पाणिनीच्या व्याकरणावरील पातंजल महाभाष्यावर जी यानें एक लक्ष कारिका-रूप व्याख्या लिहिली तिला वाक्यपदीय असें नांव आहे. कोणी त्या व्याख्येस हरि-कारिका असेंही ह्मणतात. पातंजल महाभाष्याचा टीकाकार जो कैयट त्यानें ती-टीका लिहितांना याच्या विषयीं असें ह्मटलें आहे.

> भाष्याब्धिः क्वाति गंभीरः क्वाहं मंदमतिस्ततः॥ छात्राणा मुपहास्य-
> त्वं यास्यामिपिशुनात्मनाम्॥ तथापि हरिबद्धेन सारेण ग्रंथ सेतुना
> क्रममाणः शनैः पारं तस्य प्रासास्मि पंगुवत्॥

अर्थ– महाभाष्यरूप गंभीर समुद्र कोणीकडे आणिमी कोणीकडे! व्याकरण प-ढणारे विद्यार्थी या माझ्या उद्योगाचा उपहास करतील. तथापि हरीनें बांधिलेला ग्रंथरूप सेतु त्याच्या आश्रयानें मी पंगू प्रमाणें हळु हळू पलीकडे जाऊन पों-होंचेन. या वरून याच्या कारिकांची योग्यता किती मोठी ती सहज लक्षांत ये-ते. व कैयट याच्या मागून झाला असेंही समजून येतें. (कैयट) श०पद्दा.

याच्या कारिकांचा आश्रय धरून जी कैयटानें टीका लिहिली तिच्या योगानें असें झालें कीं, तीच टीका प्रधान होऊन बसली. व याच्या कारिका मागें पडल्या, असें ह्मणतात. आतां जर ही गोष्ट खरीच असेल तर कैयट याच्या मागचा ये विषयीं शंकाच करणें नको. परंतु ही गोष्ट निबंधमालाकारांस संमत नाहीं. या विषयीं निबंधमाला अंक २८ यांतील २१ वें पृष्ठ पहा. असो. याच्या विषयींचा वृत्तांत नाथ लीलामृत ग्रंथांत आढळून येतो तो येणें प्रमाणें आहे.

भर्तृहरीची आई सुशीला जंबूनगरच्या राजाची कन्या होती. त्या राजास पुत्र-नसल्यामुळें त्याचें प्रेम तिजवरच होतें. कारण ती तरी त्यास एकुलती एकच होती. पुढें तो राजा अगदीं म्हातारा झाला. तेव्हां त्यानें मुलीचे मुलगे चांगले कर्ते आहेत. असें पाहून त्यांत जो हा वडील भर्तृहरी त्यास त्यानें आपल्या राज्याचा अधिकारी केलें. नंतर कांहीं काळानें तो राजा मरण पावला असतां थोडाकाळ पर्यंत यानें तेथें-च राज्य केलें. व दिवसेंदिवस विक्रमादित्य पराक्रमी निपजल्यानें व त्यानें अनेक राजे पादाक्रांत केल्यानें संतुष्ट होऊन त्याच्या अनुमतानें जंबूनगरांतील गादी उज्जनीस आणिली. आणि त्याच वेळेस विक्रमास युवराजा करून सुभटवीर्यास सेनापत्याच्या अधिकारावर नेमिलें. (ना. ली. अ. १४).

पुढें सर्वांचीं लग्नें झालीं. त्यांत याच्या बायकोचें नांव पद्माक्षी होतें. व ती-मगध देशाचा राजा सिंहसेन त्याची कन्या होती. पद्माक्षी ही रूपानें अप्रतिम होती. ह्मणून भर्तृहरि तिच्या लावण्यावर मोठा संतुष्ट असे. हा व्याकरण संबंधानें वसुरात नामक महाविद्वान् वैयाकरणाचा शिष्य होता. त्या विषयीं वाक्यपदीय ग्रंथांत जे याचे श्लोक आहेत ते आह्मी दुसरा पतंजलि या नांवावर लिहिले आहेत, ते तेथें पहावे. सारांश व्याकरण विषयावर याचा मूळ व मोठा ग्रंथ वाक्य पदीय समजावा. या शिवाय नीतिशतक शृंगार शतक आणि वैराग्य शतक हीं तीन शतकें याचे स्फुट ग्रंथ आहेत. यांत पहिलें व दुसरें शतक केव्हां झालें असावें तें सांगणेंच नको. मात्र तिसरें शतक केव्हां व काय कारणावरून झालें त्या विषयींचा इतिहास येणें प्रमाणें आढळतो.

उज्जनी मध्यें सुमंत नांवाचा एक ब्राह्मण राहात होता. त्याला तपें करून मिळालेलें अजरामरत्वाचें फळ त्यानें राजास आणून दिलें. व त्यांत गुण काय आहे तेंही त्यास सांगितलें. राजानें फळ घेऊन सुमंतास सन्मानानें मार्गस्थ केल्यावर तें राणीपाशीं ठेवावयास दिलें. परंतु तिला त्यांत गुण काय आहे तो ठाऊक न-

सल्या मुळें तिला हें सामान्य फळ आहे असें वाटून तिनें तें आपल्या जारास दिलें. जारानें आपल्या वेश्येस दिलें. व वेश्येनें फळाचा रंग व टवटवी पाहून हें कांहीं अपूर्व फल आहे असें आणून व तें सत्पात्रीं दान करण्यास योग्य रूमंत ब्राह्मण चांगला सदाचार संपन्न आहे असें समजतांच तिनें त्यावर बरीच मोठी दक्षिणा ठेवली व त्यास तें फळ दान दिलें.

तें फळ पाहतांच रूमंतानें ओळखलें आणि तो तत्काळ मोठ्या क्रोधानें राजाकडे जाऊन पुसूं लागला कीं;- तुला फळ दिलेलें तूं खाल्लेंस कीं नाहींस? राजा ह्मणाला अजून खाल्लें नाहीं. आतां खाणार आहें. इतकें बोलून त्यानें राणीस हांक मारिली, व फळ आण ह्मणून ह्मटलें. तेव्हां ती खालीं मान घालून उगीच उभी राहिली असें पाहून रूमंतानें फळ त्यास दाखविलें. आणि मला हें एका वेश्येनें दानांत दिलें असें सांगून पुनः तें त्याच्या स्वाधीन केलें. व आतां तरी खा. आळस करूं नको. असें बोलून तो आपल्या घरीं निघून गेला.

राजास या गोष्टी वरून राणीचा संशय येऊन त्यानें तत्काळ त्या वेश्येस बोलावून पुसलें कीं, रूमंत ब्राह्मणास जें फळ आज तूं दान दिलेंस तें तूं कोठून आणिलेंस? तिनें देणाराचें खरें नांव सांगतांच तिला राजानें जाण्यास सांगून त्यास बोलाविलें. हा मनुष्य राजाच्या अश्वशालेवरील अधिकारी होता. त्यास राजानें विचारिलें, अमुक वेश्येस जें फळ तूं एक दोन दिवसां मागें दिलें तें तुला कोठून मिळालें? हीं अक्षरें राजाच्या तोंडचीं ऐकतांच त्यास, 'दे माय धरणी ठाव' असें होऊन आतां राजास काय सांगावें हा विचार पडला व थर थर कांपूं लागला. तो भ्याला असें पाहून राजा त्यास ह्मणाला जें असेल तें खरें सांग. भिऊं नकोस तुला अभय आहे. मग त्यानें मोठ्या लज्जेनें निरुपाय होऊन राणीकडे बोट दाखविलें. व राजाचे पाय धरून ह्मणाला महाराज, हा अन्याय मूळ मजकडून झाला नाहीं. तथापि दास अपराधी आहे म्हणून शिक्षा होईल ती मला मान्य आहे. असें ऐकून राजानें त्यास अभय दिल्या प्रमाणें सोडिलें. पुढें तो जातांच राजानें तें फळ खाल्लें. व राणीस चकार शब्दही न बोलतां सर्व राज्य सोडून एकाकी अरण्यांत गमन केलें. त्या वेळेस हें वैराग्यशतक झालें. त्यांतीलच हे खालीं लिहिलेले दोन श्लोक होत.

यां चिंतयामि सततं मयि सा विरक्ता ॥ साचान्य मिच्छति जनं सजनोन्य सक्तः॥ अस्मत्कृतेतु परितुष्यति काचिदन्या ॥ धिक्तांच तंच मदनं-

च इमांच मांच ॥१॥

भोगे रोग भयं कुले च्युतिभयं वित्ते नृपालाद्भयं॥ माने दैन्य भयं बले रिपुभयं रूपे तरुण्या भयं शास्त्रे वाद भयं गुणे खल भयं काये कृतांताद्भयं॥ सर्वं वस्तु भयान्वितं खलु नृणां वैराग्य मेवाभयं॥२॥

अर्थ:-मी जिचें सर्वदां चिंतन करितों ती माझ्या ठायीं विरक्त. तसेंच ती ज्यास इच्छिते तो अन्यत्र आसक्त. आणि ती मजविषयीं संतुष्ट. तस्मात् मजवर तुष्ट असणारी तिला, तिजवर तुष्ट असणारा त्याला, त्या मदनाला, ही प्रत्यक्ष उभी असलेली हिला व तसाच मला धिक्कार असो. दुसऱ्या श्लोका मध्यें भोगादिकांत रोगादि भयाचें वर्णन करून शेवटीं वैराग्य मात्र निर्भय होय असें वर्णन आहे.

या प्रमाणें वैराग्य होऊन भर्तृहरि अरण्यांत गेला असतां पद्माक्षी राणीस अत्यंत लज्जा होऊन, तीही त्याच रात्रीस कोणास कळू न देतां दूर अरण्यांत गेली. आणि तेथें अग्निकाष्ठें खाऊन तिनें प्राणत्याग केला. राजा व राणी उभयतां शहरांतून गेल्याचें वर्तमान नागरिकांस कळतांच त्या सर्वांस अतिशय शोक झाला. तिकडे अरण्यांत राजा फिरत असतां एके वेळीं त्याची व चर्पटीनाथाची अकस्मात् गांठ पडली. तेव्हां त्यांनीं राजाचा सर्व वृत्तांत अंतर्दृष्टीनें जाणून त्यास त्याच्या स्त्रीचें पूर्वजन्मवृत्त कळवून म्हटलें. राजा, पद्माक्षी जी तुझी स्त्री ती पूर्वजन्मीं वेश्या असतां तिला एके वेळीं कोणी कामुक पुरुषानें पुष्कळ द्रव्य देऊन आपल्या घरीं रात्रीं बोलाविलें. परंतु तिचें जाणें न घडून त्या विरहानें तो त्याच रात्रीं मरण पावला. तीच वेश्या हल्लीं तुझी स्त्री झाली होती. व तो पुरुष तुझ्या अश्वशालेवर कामगार झाला. आणि त्याच कारणामुळें त्यांचा योग घडून आला. या साठीं कोणावरही कोप न करितां मजसमागमें चल. आणि तुझी मृत झालेली स्त्री तुला पुनः जीवंत करून देतों. तिला घेऊन परत राज्यावर जा. असें बोलून चर्पटी नाथांनीं जेथें पद्माक्षीनें आपणास जाळून घेतलें होतें तेथें राजास नेलें. व तिच्या रक्षेवर उदक अभिमंत्रित करून शिंपडून तिला सजीव केलें. तसेंच तिला पिंगला असें नवें नांव देऊन राजास सांगितलें कीं, हिला घेऊन राज्यावर जा. आणि बारा वर्षे राज्य करून नंतर अरण्यांत ये. असें बोलून चर्पटीनाथ अंतर्धान पावले. व राजा पिंगलेस घेऊन राज्यावर आला.(ना०)

राजा व राणी शहरांत परत आली हें वर्तमान ऐकतांच प्रजेस अतिशय आनंद झाला. राजाही पूर्ववत् आनंदानें राज्य करूं लागला. या प्रमाणें अका

वर्षे गेलीं. बाराव्या वर्षाच्या अंतीं अशी गोष्ट घडली कीं, एकदां पिंगलेस समागमें घेऊन राजा अरण्यांत शिकारीस गेला. व त्यानें तेथें एक मृग मारिला. ही गोष्ट त्याच्या स्त्रीनें पाहून तत्काळ उडी मारिली. व आपल्या पतीच्या उभ्या शिंगांवरपोट फाडून प्राणत्याग केला. त्या वरून राजास तिच्या पातिव्रत्याचें आश्चर्य वाटूनअहा हा! धन्य ही पतिव्रता असें त्यानें ह्मटलें.

पिंगळेनें हें राजाचें बोलणें ऐकून ह्मटलें. पतीचें मरण पाहतांच किंवा मरणाची वार्ता समजतांच जिचें प्राणोत्क्रमण होतें ती पतिव्रता होय. ह्मणून यांत विशेष कांहींच नाहीं. मात्र इतकेंच कीं, पशु जातींत देखील जर पातिव्रत्याची इतकी योग्यता समजली जाते, तर मनुष्यांत ती किती असणें व समजणें अवश्य आहे ही गोष्ट निःसंशय घेण्या सारखी खरी, हें तिचें भाषण ऐकून तो उगाच राहिला. व त्यानें ती गोष्ट लक्षांत ठेवून एकदां आपल्या मरणाचा खोटा ह्मांत राणीस कळविला. व तो ऐकण्या बरोबर ती मरण पावली.

पिंगला मरण पावली असें समजतांच राजा वेडा होऊन हे पिंगले; हे पिंगले असें ह्मणत भ्रमिष्ट होऊन अरण्यांत हिंडूं लागला. हें एके वेळीं गोरक्षनाथांनीं पाहून, त्यास शुद्धीवर आणण्या साठीं आपली तुंबडी फोडली व हे तुमड्ये, हे तुंबड्ये असें ह्मणत या जवळ आले. राजानें ही त्यांनीं आरंभलेली थट्टा पाहून ह्मटलें, गोसावी बावा असा विनोद करणें आपल्या सारख्यास योग्य नाहीं. कारण, तुंबडी आपणांस अलभ्य आहे असें नाहीं. परंतु तुह्मींच पहा, पिंगला पुनः मिळेल काय? इतकें ऐकतांच गोरक्षनाथांनीं योग बलें करून शंभर पिंगलात्यापुढें उभ्या करून म्हटलें कां! पिंगला मिळेल कीं नाहीं? त्या वरून राजा उमजून त्यानें विक्रमादित्यास राज्यावर स्थापिलें. व योगवृत्तीनें समाधान पूर्वक भूमिसंचारार्थ गमन केलें. (नाथलीलामृत अध्या० १७).

२— क्षीरस्वामीचा मुलगा असें कोलब्रुक साहेबाचें मत आहे. परंतु बुल्हरच्या काश्मीर संबंधीं शोधा वरून क्षीरस्वामि जयापीड राजाचा गुरु होता. व तो तेथें शके सुमारें ७२५च्या सुमारास असे. दुसरा क्षीरस्वामि प्रतापरुद्र राजाच्या पदरीं शके १४२२ मध्यें होता. या दोघांतून हा मुलगा कोणाचा त्याचा निर्णय कोलब्रुक साहेब कांहींच सांगत नाहींत. असो. यांत इतकेंच कीं, जयापीडाच्या गुरूचाच हा पुत्र ह्मटला पाहिजे. परंतु हाच भर्तृहरी पातंजल महाभाष्याच्या कारिकांचा कर्ता संभवत नाहीं. कारण जर याचा बाप क्षीरस्वामि शके ७२५ मध्यें होता.

तर हा ७५० मध्यें असला पाहिजे. आणि असें झालें असतां कैयट व हा समकाली-न झाले असें होईल. तेव्हां "तथापि हरिबद्धेन सारेण ग्रंथसेतुना" असें जें कैयटाचें ह्मणणें तें ऊत्वावें असें कळत नाहीं. यास्तव हा भर्तृहरि मुख्य तोच नव्हे.व पातंजल महाभाष्याच्या कारिकांचा कर्ताही नव्हे. भट्टीकाव्य तें मात्र याचें असेल किंवा आहे.

**भवभूति**— दक्षिणदेशी असणाऱ्या पद्मपुरचा राहणारा हा कवि होता. याच्या बापाचें नांव नीलकंठ, आज्याचें नांव गोपालभट्ट, आणि पणजाचें नांव डंबरभट्ट होतें. याच्या आईचें नांव जातुकर्णी असे. डंबरभट्ट हे काश्यप गोत्री मोठे तपस्वी ब्राह्मण होते. या कवीस भट्ट श्रीकंठ असेंही नांव पुढें प्राप्त झालें. याच्या विषयीं गोवर्धन कवीनें असें ह्मटलें आहे.

भवभूतेः संबंधाद्भूधर भूरेव भारती भाती ॥ एतत्कृत कारुण्ये किमन्यथा रोदिति ग्रावा ॥ १ ॥

अर्थ– भवभूतीच्या संबंधावरून पाहतां सरस्वती ही पर्वताची कन्या ह्मणजे पार्वतीच असावी असें वाटतें. एरवीं याच्या करुण रसानें पाषाण कसा रडावयास लागेल. सारांश दगडानें सुद्धां रडावें इतका करुणरस याच्या वाणींत असे असें यांत सूचित झालें.

असें सांगतात कीं, भवभूतीचें उत्तर रामचरित नाटक वाचून कालिदासासही अतिशय विस्मय झाला. व त्या आनंद भरांत तें नाटक तो मस्तकीं धरून नाचला. यावरून लोकांचा तर्क असा आहे कीं, हा व कालिदास एकाकालीं होते. परंतु हा तर्क व्यर्थ आहे. कारण ही गोष्ट भवभूति मरण पावल्यावरही होण्यास शक्य आहे. असा उल्लेख दंडी विषयीं त्याचें नांव लिहितांना जसा आह्मीं केला तसाच प्रकार येथें समजावा. बरें जर हे दोघे एकाच वेळचे ह्मणावे तर जो कालिदास, याचें नाटक मस्तकीं धरून नाचणारा तो जर राजसभेंत पूज्य व लोकांत प्रिय असा होता. तर त्यानें याची शिफारस केलीच असावी. परंतु तसें अगदीं झालें नाहीं. हा मरे पर्यंत राजाश्रित तर नव्हताच. व शिवाय आणखी वर लोकही याच्या ग्रंथास तादृश वहात नसत, असेंच दिसून येतें. या विषयीं याचीच सखेद उक्ति मालती माधव नाटकाच्या आरंभीं असलेली साक्ष देत आहे. ती भवभूतीचा एथक् एक निबंध आहे, त्याच्या तिसऱ्या दृष्टांत महावी. व याचे मालतीमाधव, महावीर चरित व उत्तर रामचरित. या तीन ग्रंथांत

काय रहस्य आहे तेंही अवांतर ग्रंथांत पहावें. तात्पर्य इतकेंच कीं, हाही दंडी प्रमाणेंच दोहों कालिदासांच्या मध्येंच होऊन गेलेला आहे. (भा॰भू॰नि॰).

**भवानभगत**– हा खंबायत परगण्यांत राहणारा ज्ञातीचा कानफाट्या गोसावी होता. याचा असण्याचा काळ कळत नाहीं. मात्र आत्मज्ञान नांवाचा एक ग्रंथ यानें केलेला गुजराथी भाषेंत आहे. (का॰दो॰).

**भवानीनगर**– तुळजापुराचेंच नांव.

**भवानीबावा**– अनंतफंदीचा बाप.

**भविष्यविषयाष्टक**– भूखण कविकृत गुजराथींत हें अष्टक आहे.

**भागलपुर**– अंगदेशाची राजधानी चंपानगरी तिचें हल्लीं चालू असलेलें नांव. मालिनी नांवाची नदी याजवळून वाहात आहे. व हें उत्तर अक्षांश सुमारें २५° आणि पूर्वरेखांश ८८° यांवर आहेत.

**भागवत**–साहा प्रकारच्या वैष्णवांतील एक मत व त्याचा अनुयायी.

२– शुंग किंवा संग राजांतील एक राजा. वज्रमित्राचा पुत्र व देवभूती राजाचा बाप. (राज॰)

३– अठरा पुराणांहून निराळें असें हें एक पुराण आहे. अठरा पुराणांत मुख्यतें करून देवीभागवत आहे. त्या पुराणाच्या दानाचा विधि सुवर्णाचा सिंह करून वगैरे प्रकारानेंच लिहिलेला आढळतो. आणि त्या वरून देवीभागवताचेंच प्राधान्य स्थापित होतें. कारण सिंह हें वाहन देवीचें आहे. विष्णूचें मुळींच नाहीं. हें भागवत शुकाचार्यांनीं परीक्षित् राजास कधीं सांगितलें त्या विषयीं भागवत माहात्म्यांत शौनक ऋषीचा सूत पुराणिकास प्रश्न व त्यावर सूतानें उत्तर या प्रमाणें आहे.

> शौनकउवाच॥ ॥ शुकेनोक्तं कदा राज्ञे गोकर्णेन कदा पुनः॥ सुरर्षये कदा ब्राह्मे छिंधिमे संशयो महान्॥१॥
>
> सूतउवाच॥ ॥ आकृष्णनिर्गमात् त्रिंशद्वर्षाधिगते कलौ॥ नवमीतो नभस्येच कथारंभं शुकोऽकरोत्॥१॥

अर्थ इतकाच कीं, शुकाचार्यांनीं परीक्षित् राजास भागवत कधीं सांगितलें असें ऐकून सूत म्हणाला कलियुग लागल्यावर कृष्ण निजधामास गेले असतां पुढें तीस वर्षांनीं श्रावण मासांतील नवमी पासून त्यांनीं राजास भागवत सांगण्यास आरंभ केला. या लेखा वरून परीक्षितानें हें श्रवण मरण काळीं केल्याचे

दिसून येत नाहीं. कारण कृष्ण व पांडव यांचें निर्याण झाल्यावर यानें राज्य ६० वर्षें केले-लें आहे.

**भागवतटीका सुबोधिनी**– ही संस्कृत भाषेंत भागवताची टीका वल्लभाचार्यकृत आहे.

**भागवत दशमस्कंध**– प्रेमानंदकृत गुजराथींत. व शिवा बहिरंभट्टकृत ओंवीबद्ध मराठींत.

**भागवत व्याख्या**– पोतराजूकृत तेलंगी भाषेंत.

**भागानगर**– दक्षिण हैदराबादेस उद्मी लोकांत म्हणण्याची रूढी.

**भागीरथी नदी**– ही हिमालय पर्वता पासून निघून बंगालच्या उपसागरास मिळाली-आहे. हिचाच जो हुगळी नांवाचा फांटा आहे त्याच्या कांठीं कलकत्ता शहर आहे.

**भागोदास**– हा कबीर संप्रदायी पुरुष विज्ञक नामक ग्रंथाचा कर्ता होता. [ रा.मा.

**भानु**– कलियुगांत झालेला सूर्यवंशी राजा. हा प्रतिव्योमाचा पुत्र व दिवाकर राजाचा बाप.

**भानुकला**– चार्वाकाचा सोबती जो क्षपणक त्याची आई.

**भानुदास**– प्रसिद्ध जे एकनाथ स्वामि त्यांचा हा पुरुष पणजा होता. हा जातीचा देशस्थ आ-श्वलायन ब्राह्मण पैठणास राहात असे. असें सांगतात कीं, हा सुमारें १० वर्षांचा झा-ल्यावर याचा बाप यास अध्ययन संबंधानें रागें भरला. त्या वरून हा नळघरांत जो लपला तो सात दिवस पर्यंत बाहेरच आला नाहीं. बापानें याचा शोध गांवांत पु-ष्कळ केला. परंतु ठिकाण लागला नाहीं. इकडे नळघरांत असें झालें कीं, यास एक दि-वस अगदीं खडखडीत उपास पडला. त्या वरून दुसऱ्या दिवशीं एका ब्राह्मणानें या-स पिण्यासाठीं दूध नेऊन तेथें दिलें. तें यानें पिऊन त्यास पुसलें आपण कोण? व ये-थें कसे आलां? दुसरें मी येथेंच लपलों हें आपणांस कसें कळलें? ब्राह्मण म्हणा-ला. मी विश्वचक्षु सूर्य आहें. तुझ्या बापानें माझें आराधन उत्तम रीतीनें बहुत काळ पर्यंत केल्या वरून माझ्या प्रसन्नतेनें तूं त्यास झालास. तुझें नांव भानुदास हें त्या-च कारणामुळें आहे असें समज. त्या वरून यानें ब्राह्मणास नमस्कार करून म्हटलें. मला विद्या यावी अशी मजवर कृपा व्हावी, म्हणजे मी बापास भेटेन. ब्राम्हण म्हणा-ला तुला विद्या येईल. काळजी करूं नको. आतां इतकेंच कर कीं, तूं येथें आणखी पां-च दिवस राहा. व साहाव्या दिवशीं बापास भेट या पांच दिवसांत तुला असेंच दर-रोज दूध मिळेल इतकें बोलून ब्राह्मण अदृश्य झाला.

ब्राह्मणानें सांगितल्या प्रमाणें हा पांच दिवस पर्यंत नळघरांत होता. व साहावे दिवशीं बाहेर येऊन बापास भेटला, तसेंच तेथें ब्राह्मण आला व तो अमुक अमुक बोलला इत्यादि त्यानें त्यास सर्व कळविलें. त्या वरून बाप संतुष्ट होऊन त्यानें यास

आलिंगन दिलें. आणि अध्ययनाविषयीं आतां यास बोलण्याची गरज नाहीं. असें समजून पूर्ववत् क्रम चालविला. पुढें याचें लग्न झालें व चक्रपाणि नांवाचा यास एक पुत्र झाला. कांहीं दिवसांनीं याचा बाप मरण पावला. त्या मुळें प्रपंच चालविणें याच्या अंगावर पडलें म्हणून यानें चाटीपणाचा (कापडविकण्याचा) धंदा चालविला व त्यांत मिळेल त्यावर कुटुंबाचा निर्वाह करूं लागला.

वर असें लिहिलें आहे कीं, हा चाटीपणाचा धंदा करीत असे. तो असा होता-कीं, गांवोगांवीं जे सोमवार मंगळवार इत्यादि नामसंकेताचे पेंठबाजार भरतात तेथें तेथें यानें त्या त्या वारीं घोड्यावर कापडाचें दिंड लादून जावें. व कापडविक्री होईल ती करून परत यावें. यास त्या व्यापारांत बराच पैसा मिळाला. कारण याचा व्यापार सचोटीचा होता. परंतु ही गोष्ट याच्या साथ्यांस सहन न होऊन त्यांनीं एकदां असें केलें कीं, बाजार आटपून सर्वजण रात्रीं बिऱ्हाडीं परत आल्यावर हा एकेठिकाणीं गांवांत कीर्तन ऐकण्यास गेला असें पाहून, याचें घोडें दूर नेऊन सोडून दिलें. व कापडाचें दिंड एका खांचेंत फेंकून देऊन पुनः सर्वांनीं येऊन निद्रा केली. या गोष्टीस सुमारें चार घटिका लोटतात न लोटतात तों चोर आले. व त्यांनीं या सर्वांसि हाण मार करून त्यांचीं कापडाचीं दिंडें दरोबस्त नेलीं. मग काय! एकेकास नेसायाचें एकेक वस्त्र मात्र शिल्लक राहिलें. पुढें पाहांटची प्रहर रात्र राहल्ये तों हा कीर्तनाहून परत येऊं लागला. व वाटेंत याचें घोडें यास सांपडलें तें यानें परत आणिलें. पुढें बिऱ्हाडीं येऊन पाहूं लागला तों साथ्यांची अशी दशा झाली आहे. मग यानें सर्वांचें समाधान केलें. व त्यांनींही आपली दुष्ट कृति प्रांजलपणें यास कळविली. पुढें उजाडतांच सर्वांनीं याचें दिंड खांचेंत फेंकिलेलें आहे तसेंच आहेसें पाहून याचें यास तें आणून दिलें. त्या वरून यानें तें कापड सर्वांसि सारखें वांटून देऊन तो घरीं आला. व त्या दिवसा पासून तो व्यापारच यानें सोडून दिला.

पुढें यानें आपला सर्व काळ भगवद्भजनांत घालविण्याचा क्रम ठेविला. त्यांत याची इतकी ख्याति झाली कीं, त्या वेळच्या साधुमंडळांत याची गणना प्रमुखत्वानें झाली. ती अशी कीं, अनागोंदीच्या किरीटी रामराजानें पंढरीहून पांडुरंगाची मूर्ति आपल्या शहरास नेलेली कोणाच्यानें आणवली नाहीं. ती यानें परत आणिली. ही गोष्ट शके १४३६ मध्यें घडली. हाच शक एका ग्रंथांत १४९६ लिहिलेला एकनाथ चरित्राशीं जमत नाहीं. म्हणून तो चुकीचा आहे.

**भानुदीक्षित**– भट्टोजी दीक्षितांचा मुलगा.

भानुमान्– कलियुगांतील सूर्यवंशी राजा. सहदेव राजाचा पुत्र. व प्रतीकाश्व राजाचा बाप.

भामह कवि– मनोरमा चरित्र व प्राकृत प्रकाश या दोन ग्रंथांचा कर्ता. हा काश्मीरचा राहणारा. (बुल्हरचा का० शो०)

भामाविलास– वामनपंडित कृत श्लोकबद्ध.

भामिनी– कानीफनाथाची आई. व करंध राजाची स्त्री.

भामिनीविलास– जगन्नाथ राय कृत संस्कृत भाषेंतील ग्रंथ. याचीं तीन शतकें आहेत.

भारतचंपु– अनंत कविकृत.

भारतमंजरि– क्षेमेंद्र कविकृत. संस्कृत भाषेंत.

भारतव्याख्या– तिक्कन सोमयाजी कृत. तेलंगी भाषेंत.

भारतीतीर्थ– वेदांताधिकरण मालाकार. हा कवि काश्मीराकडील होय. (बु. का. शो.)

२– विद्यारण्यांचा पंचदशी रचूं लागणारा सोबती. पंचदशीचा टीकाकार जो रामकृष्ण पंडित त्यानें या प्रमाणें म्हटलें आहे. "नत्वाश्री भारती तीर्थ विद्यारण्य मुनीश्वरौ" सांख्य सारांत एका पाश्चिमात्य पंडितानें विज्ञान भिक्षूच्या ग्रंथाचें भाषांतर इंग्रजींत लिहितांना हा विद्यारण्यांचा गुरु म्हणून जें म्हटलें आहे तें चुकीचें आहे. (विद्यार०) शब्द पहा.

भारविकवि– संस्कृत कवितेंत अर्थगौरव करणारा कवि हाच, असा याचा लौकिक आहे. संस्कृतांत किरातार्जुनीय काव्य आहे तें याचें आहे.

भार्गवराम बावा– हा प्रसिद्ध साधु सातार प्रांतांतील धावडशी नामक गांवीं होऊन गेला. परंतु हा थोरल्या बाजीराव साहेब पेशव्यांचे जे परमहंस गुरु त्यांच्या मागून झालेला असें समजावें.

भालगांव– ब्रह्मनाळ येथील प्रसिद्ध साधु आनंदमूर्ति त्यांचा हा मूळगांव.

भालचंद्रराय– नदियादचा राजा कृष्णचंद्रराय त्याचा पुत्र.

भावनगर– गुजराथेंतील एक शहर.

भावप्रकाश– प्रौढ मनोरमेवर वैद्यनाथ कवीनें केलेला संस्कृत ग्रंथ.

भावागणेश– नाभाजीच्या भक्तमालेंतील साधु.

भावार्थरामायण– एकनाथकृत ओंवीबद्ध मराठी भाषेंत. यांतील सुंदर कांडांत हास्यरस इतका उभा केला आहे कीं, हांसतां हांसतां मनुष्याचीं पोटें दुखूं लागतात. बहुतेकांच्या मतें तर याच्या पुढें शिमगाही तुच्छ आहे. [आहे.

भाषानुशासन– हा ग्रंथ व्याकरण विषयावर संस्कृतांत यशाह कवीनें केलेला

**भाष्यकार**– ही संज्ञा मुख्यत्वें करून श्रीमच्छंकराचार्यांस आहे. या विषयीं श्रीधराचार्यांनीं गीतेच्या टीकारंभीं असें म्हटलें आहे कीं, " भाष्यकार मतं सम्यक् तद्व्याख्यातृ गिरस्तथा ॥ यथामति समालोक्य गीता व्याख्यां समारभे ॥ " त्याच प्रमाणें ज्ञानेश्वरानें ज्ञानेश्वरीच्या १८च्या अध्यायांत या प्रमाणें म्हटलें आहे. " व्यासाचा मागोवा घेत ॥ भाष्यकारा वाट पुसत ॥ अयोग्यही मी नपवत ॥ कें जाईन ॥ (शतक१८) याचा अर्थ असा आहे कीं, व्यासाचा माग घेत मी चाललों असतां व जेथें वाट फुटली तेथें भाष्यकारास वाट पुसून योग्य मार्गानें जात असतां गीतेची टीका लिहिणारा जरी मी सामान्य असलों तरी कोणीकडे जाईन! तर अयोग्य स्थळीं न जातां योग्य स्थळींच जाईन. रामानुजाचार्य, मध्वाचार्य आणि वल्लभाचार्य, यानीं जरीं भाष्यें लिहिलीं असलीं तरी त्यांस भाष्यकार ही संज्ञा सर्वमान्य नाहीं.

**भाष्यटीका**– वाचस्पति मिश्रकृत.

**भाष्यप्रदीप**– पातंजल महाभाष्यावर कैयटानें लिहिलेला ग्रंथ.

**भाष्यप्रदीपविवरण**– नागेशभट्टकृत. यास भाष्यप्रदीपोद्योतही नांव आहे.

**भाष्यप्रदीपव्याख्या**– ईश्वरानंदकृत.

**भाष्यभानुप्रभा**– वेदशा॰ त्र्यंबक शास्त्री राधदुर्गकरकृत श्रीमच्छंकराचार्यांच्या भाष्याव[र व्याख्या.]

**भासकवि**– यास धावक असेंही नांव असल्याचें ऐकतों. जयदेवानें कविता कामिनीचीं अंगें व उपांगें वर्णितानां या कवीस त्यानें तिचें हास्य असें वर्णिलें आहे. (ज॰ दे॰) श॰

**भास्कर**– कल्लटाच्या शिष्यपरंपरेंतील चौथ्या पिढीचा पुरुष. मीमांसा संग्रह कौमुदी आणि पद्यामृत सोपान हे दोन ग्रंथ याचे आहेत. याच्या बापाचें नांव दिवाकर होतें. व हा काश्मीराकडे राहात असे. (बु॰ का॰ शो॰)

**भास्कररायपंडित**– माधवाचार्यांच्या शंकरविजयांत याचें नांव आढळतें. व त्या वरून हा उज्जनी येथें रहात होता असें दिसतें. याच्या वेळेस महाविद्वान् असा दुसरा तेथें दंडी कवि मात्र होता. (दंडी॰) श॰ प॰

**भास्कराचार्य**– हा ब्राह्मण जातीचा मोठा नामांकित ज्योतिषी होऊन गेला आहे. सह्याद्रि पर्वताच्या लगत्यास असणाऱ्या जलविड गांवीं याचें जन्म शके १०३६ मध्यें झालें. तिन्ही वेदांचें अध्ययन जाणणारे, श्रौत स्मार्त कर्म तत्पर, व ज्योतिषविद्या निपुण, शांडिल्य गोत्री महेश्वर भट्ट त्यांचा हा पुत्र होता. यानें आपल्या बापा जवळच सर्व अध्ययन केलें. व आपल्या वयाच्या ३६व्या वर्षीं म्हणजे शके १०७२ मध्यें सिद्धांत शिरोमणि नांवाचा ग्रंथ रचिला. त्या विषयीं याचे श्लोक आहेत ते येणें प्रमाणें:–

आसीत्सह्य कुलाचलाश्रितपुरे त्रैविद्य विद्वज्जने नाना सज्जन धाम्नि वि-ज्जलविडे शांडिल्य गोत्रो द्विजः॥ श्रौतस्मार्त विचार सार चतुरो निःशेषवि-द्यानिधिः साधूना मवधि र्महेश्वर कृती दैवज्ञ चूडामणिः॥१॥ तज्जस्तच्चर-णारविंद युगुल प्राप्तः प्रसादः सुधीर्मुग्धो द्बोधकरं विदग्ध गणक प्रीति प्रदं प्रस्फुटं॥ एतद्व्यक्त सदुक्ति युक्ति बहुलं हेलाव गम्यं विदां सिद्धांत ग्रथनं कुबुद्धि मथनं चक्रे कवि र्भास्करः॥२॥

रसगुण पूर्ण महीसम शक नृप समये भवेन्ममोत्पत्तिः
रसगुण वर्षेण मया सिद्धांत शिरोमणी रचितः॥ १ ॥

यानें लिहिलेल्या सिद्धांतशिरोमणि ग्रंथाचे चार अध्याय आहेत. ते असेः— अंकगणि-त (लीलावती), बीजगणित, गणिताध्याय (ग्रहगणित) आणि गोलाध्याय. असो. भास्कराचार्य हा आर्यभट्टाचें मत शिवाय करून इतर ज्योतिष्यांच्या मता प्रमाणेंच पृथिवी स्थिर मानून निज सभोंवती सूर्यादि ग्रह व नक्षत्रें फिरतात असें मानणारा असा होता. यानें पृथिवीच्या अगदीं जवळचा पहिला ग्रह चंद्र मानिला आहे. नंत-र पुढें दुसरा बुध, तिसरा शुक्र, चौथा रवि, पांचवा मंगळ, साहावा गुरु आणि सात-वा शनि सांगितला आहे. तशीच याच ग्रहकक्षा क्रमांवर अनादि वारांच्या प्रवृत्ती-ची युक्तीही येणें प्रमाणें बसविली आहे.

चंद्र, - बुध, - शुक्र, - रवि, - मंगळ, - गुरु, - शनि.

चंद्रापासून चौथा ग्रह रवि आहे म्हणून पहिला रविवार. रवीच्या पुढें मंगळापासून चौथा चंद्र येतो म्हणून दुसरा वार सोमवार. चंद्राच्या पुढें बुधापासून चौथा मंग-ळ येतो म्हणून तिसरा मंगळवार. याच क्रमानें इतर वार येतात. ते वाचकांनीं प्रत्यक्ष मोजून पाहून प्रत्ययास आणून घ्यावे.

भास्कराचार्यांच्या मतीं पृथ्वी गोलाकार, निराधार व आकर्षण शक्तीनें युक्त अशी आहे. गोल पृथिवीच्या परिधीचे तो ३६० मानून त्यानें निरक्ष देश (शून्य अ-क्षांशाचा देश) लंका मानिला आहे. लंकेच्या पूर्व पश्चिमेस क्रमानें ९० अंशांवर यम-कोटी नगर व रोमकपत्तन कल्पून थेट १८० अंशांवर सिद्धपुर मानिलें आहे. तसा-च मेरु (उत्तर ध्रुव) आणि वडवानल किंवा अगस्ति (दक्षिणध्रुव) लंकेपासून सार-खे ९०।९० अंशावर उत्तरेस व दक्षिणेस क्रमानें आहेत असें कल्पिलें आहे.

लंकेंत उभें राहिलें असतां उत्तर आणि दक्षिण ध्रुव या दोहोंचें दोहोंकडे क्षि-तिजांत (दृष्टिमर्यादा वृत्तांत) एककालींच दर्शन होतें. म्हणून लंका पृथ्वीच्या मध्य-

रेषेवर म्हणजे समवृत्तावर आहे. या शिवाय लंकेच्या उत्तरेस व दक्षिणेस क्रमानें साडेतेवीस अंशावर कर्कवृत्त आणि मकरवृत्त ज्यांस अयन वृत्तें ह्मणतात त्यांस दोंहोंकडे स्पर्शून व समवृत्तास छेदून पार जाणारें जें वृत्त त्यास त्यानें क्रांतिवृत्त ह्मटलें आहे. समवृत्तास क्रांतिवृत्त ज्या दोन ठिकाणीं छेदितें त्यांस संपात असें नांव आहे. व ते परस्परां पासून १८० अंशांवर आहेत.

लंकेपासून उत्तर आणि दक्षिण ध्रुवा पर्यंत नीट गेलेली जी पहिली रेषा तिचें नांव याम्योत्तर रेषा अथवा वृत्त होय. तेंच पहिलें याम्योत्तर. याच याम्योत्तरावर उज्जनी शहर (अवंती) आहे. व ती भू परिधीच्या १६व्या भागावर आहे. म्हणून लंका आणि उज्जनी यांच्या मध्यें जें अंतर त्याची १६पट केली असतां, भूगोलाचा परिधि समजतो. हा परिधि याच्या मतें ४९६७ योजनें म्हणजे १९८६८ कोस आहे. आणि व्यास सुमारें ६३२५ कोस आहे. भूगोलाच्या चतुर्थांशा वरील लोक परस्पर परस्परांस तिर्कस आणि अर्धावरील खालीं डोकें आणि वर पाय असे पाण्यांतील छाये प्रमाणें वाटतात. परंतु ज्यास त्यास आपल्या पायांखालीं पृथिवी व मस्तकावर आकाश असाच अनुभव होत असून हे सर्व पृथिवीच्या आकर्षण शक्तीमुळें पतन पावत नाहींत. इत्यादि प्रकारें याचें मत आहे. या वरील सर्व गोष्टी विषयीं याचीं वचनें आहेत. तीं येणें प्रमाणें:—

> भूमेः पिंडः शशांक ज्ञ कवि रवि कुजे ज्यार्कि नक्षत्र कक्षा ॥ वृत्तैर्वृत्तोवृतः सन् मृद निल सलिल व्योम तेजो मयो ऽयं॥ नान्याधारः स्व शक्त्यैव वियति नियतं तिष्ठती ह्यस्य पृष्ठे॥ निष्ठं विश्वंच शश्वत्स दनुज मनुजादित्य दैत्यं समंतात्.॥१॥

पृथिवी सपाट नाहीं अशा विषयीं यानें मनुष्यांस सूर्योदय व सूर्यास्त होतो. तो कधींच न होता असें दाखविलें आहे. व सपाट भासण्याचें कारण भू परिधीच्याशतांश तसाच दिसायाचा असेंही दर्शविलें आहे.

> यदि समा मुकुरोदर सन्निभा भगवती धरणी तरणिः क्षितेः॥उपरि दूर गतोपि परिभ्रमन् किमुनरें रमरैरिव दृश्यते॥१॥समो यतः स्यात्परिधेः शतांशः पृथ्वीच पृथ्वी नितरां तनीयान्॥ नरस्य तत्पृष्ठ गतस्य कृत्स्ना समेव तस्य प्रतिभात्यतः सा॥२॥

पृथ्वी निराधार आहे. अशा विषयीं यानें या प्रमाणें म्हटलें आहे:—

> भ पंजरस्य भ्रमणाव लोका दाधार शून्या कुरुति प्रतीतिः॥

लंका पृथिवीच्या मध्यावर आहे वगैरे विषयींचीं याचीं वचनें आहेत तीं अशीं:—

> लंका कुमध्ये यमकोटिरस्याः प्राक् पश्चिमे रोमक पत्तनंच ॥ अधस्ततः सिद्धपुरं सुमेरुः सौम्येथ याम्ये वडवानलश्च ॥ १ ॥ कुवृत्त पादां तरितानि तानि स्थानानि षट् गोल विदो वदंति ॥ वसंति मेरौ सुरसिद्ध संघा और्वेंच सर्वे नरकाः स दैत्याः॥२॥ तसेंच – निरक्ष देशात्क्षिति षोडशांशे भवेदवंती गणितेन यस्मात् ॥ तदंतरं षोडश संगुणं स्याद्भूमान मस्माद्बहुकिं तदुक्तं ॥ १॥ प्रोक्तो योजन संख्यया कु परिधिः सप्तांग नंदा ब्धयस्तद्व्यासः कुभुजंग सायक भुवः सिद्धांशकेनाधिकाः॥ इत्यादि ॥ ७॥

याच प्रमाणें सूर्यग्रहणास कारण चंद्र,व चंद्रग्रहणास कारण भूच्छाया होय.असें यानें सांगून भूमीच्या अर्धभागांत क्षारसमुद्र व जंबूद्वीप. आणि अर्धभागांत इतर साहा द्वीपें व सहा सहा समुद्र आहेत इत्यादि पूर्वाचार्यांनीं वर्णिलेले त्या सर्वांचा अनुवाद केला आहे. याचा दुसरा ग्रंथ करण कुतूहल होय. भारांश. असा हा मोठा नामांकित सिद्धांती होऊन गेला. भास्कराचार्यांच्या सिद्धांताविषयीं वगैरे आलीकडे एक लहानसें पुस्तक झालें आहे. व तें रा॰रा॰ जनार्दन बाळाजी मोडक यांनीं केलेलें आहे. त्यांत त्यांनीं याचें सविस्तर वर्णन लिहिलेलें पाहण्यासारखें आहे. मात्र त्यांत लंका १६ अक्षांशांवर आहे. व सिंहलद्वीपांतील क्यांडी शहरतीच लंका आहे. इत्यादि म्हटलेलें बरोबर नाहीं.

भिकाजी पंत– कान्राबाद मांडवगणचे हे गृहस्थ देशपांडे होत. प्रसिद्ध जयराम स्वामि वडगांवकर जे समर्थ रामदासपंचायतनांत नामांकित होऊन गेले त्यांचे हे तीर्थरूप होते. (रामदा॰च॰)

भीमकवि– हा जातीचा तैलंग ब्राह्मण होता. विजंडल प्रांतांत वेमुलवाड ह्मणून गांव आहे तेथें याचें जन्म झालें. याच्या बापाचें नांव शिवभट्ट होतें. व तो मोठा तपस्वी होता असें दिसतें. कारण त्यानें मरतांना यास असा आशीर्वाद देऊन ठेविला होता कीं, हा जें कांहीं तोंडानें बोलेल तें तत्काळ घडून येत जाईल. या गोष्टी पाहण्यास जरी शिवभट्ट मुलाच्या जन्मा पूर्वींच मरण पावल्या मुळें नव्हता तरी त्यानें केलेलें भविष्य लोकांच्या प्रतीतीस आलें. हा जन्मून मोठा झाल्यावर सहजींच आपली तेलंगी भाषा इतकी प्रतिष्ठितपणानें बोलूं लागला कीं, लोकांस ती याची बुद्धिमत्ता पाहून आश्चर्य वाटलें. यानें भीमचंडांश नांवाचा ग्रंथ तेलंगीभाषेंत केला आहे. त्या वरून हा कर्नाटक व महाराष्ट्र देश यांत फिरलेला होता असेंदि-

सून येतें.

हा जें बोले त्या प्रमाणें घडून येई अशा विषयीं असें सांगतात कीं, याच्या वेळचा तंजावर येथील राजा रायकलिंग गंगु त्याच्या भेटीस हा गेला असतां त्यानें निष्कारण याचा अपमान केला. त्या वरून यानें त्यास तुझी सर्व संपत्ति लयास जाईल असा शाप दिला. त्या प्रमाणें पुढें घडून आलें. व त्यास फार दुःख सोसावें लागलें. पुढें राजास पश्चात्ताप होऊन तो यास शरण आला. तेव्हां यानें आशीर्वाद देतांच याचे शत्रु पराभूत होऊन पुनः तो राज्यसुखानुभव घेऊं लागला. (कविचरित्र.)

**भीमचंडांश**– छंदःशास्त्रावर भीमकवीनें केलेला तेलंगींत ग्रंथ.

**भीमज्योतिष**– ज्योतिष संबंधीं जातक प्रकरणा वरील तेलंगी भाषेंतील ग्रंथ.

**भीमभट्ट**– काश्मिराकडील कवि रावणार्जुनीय काव्याचा कर्ता. (बुल्ह॰का॰शोध.).

**भीमाचार्य**– भैमीनामक व्याख्येचा कर्ता.

**भीष्मप्रतिज्ञा**– वामनी श्लोकबद्ध मराठींत.

**भुजंगनाथ**– हा कवि सुमारें ५० वर्षां मागें होऊन गेला. हा जातीचा नाथपंथी डौरी गोसावी असे. मोंगलाईंत परिंडा नांवाचा किल्ला व शहर आहे तें याची जन्मभूमि होती. याची कविता प्रबंधाच्या चालीची यमकांच्या भरण्यानें युक्त अशी पुष्कळ आहे. याला काशीनाथ इत्यादि सहा मुलगे होते. त्यांत काशीनाथ हा आमच्या पाहण्यांत असून तोही कवि होता, हें आह्मांस ठाऊक आहे. (स्वतःचीमा.)

**भुटानदेश**– हिमालय पर्वतांत नेपाळाच्या पूर्वेकडील देश.

**भुवनचुहन**– नाभाजीच्या भक्तमालेंतील एक साधु.

**भुवनेश्वरी स्तोत्र**– पद्मनाभ कविकृत.

**भूखण**– हा कवि वेहेकळ गांवचा राहणारा जातीचा गुजराथी रायकवाड ब्राह्मण होता. भविष्य विषयात्मक हा ग्रंथ याचा गुजराथींत आहे. (काव्यदो.)

**भूगर्भगोसावी**– नाभाजीच्या भक्तमालेंतील साधु.

**भूज शहर**– हें गुजराथेंत आहे. यास कच्छभूज ही संज्ञा प्रसिद्ध आहे.

**भूतपुरी**– हा गांव द्रविड देशांत आहे. येथें प्रसिद्ध रामानुजाचार्यांचें जन्म झालें.

**भूदकवि**– मंख कवीच्या श्रीकंठचरित्र नामक ग्रंथाची परीक्षा करण्यास जे काश्मीर येथें तीस पंडित अलंकारानें जमविले होते त्यांतील हा एक. (बुल्ह॰का॰शोध.)

**भूधरदैवज्ञ**– भास्कराचार्यकृत गणिताध्याय व गोलाध्याय यांवरील तिसरा टीकाकार.

**भूपाल**– हें शहर माळव्यांत आहे. येथें अधिकारी मुसलमान जातीची राणी आहे.

तिला भूपालची बेगम ह्मणतात.

**भूमंडली**– कृष्णदेव रायलूच्या राणीची दासी. तेनाल रामलिंग हिच्याच आश्रयानें प्रथम त्या राजाच्या दरबारांत जडला होता. (कविच०). [ एव राजे ) शाब्दपहा.

**भूमिमित्र**– काण्व राजांतील दुसरा. वसुदेव राजाचा पुत्र व नारायण राजाचा बाप. (का-

**भूरिस्तृष्टि**– श्रीधर कवीचा गांव. परंतु हा कोठें आहे तें कळलें नाहीं.

**भूषणभट्ट**– बाणभट्टाचा पुत्र. कादंबरी ग्रंथाचें उत्तरार्ध यानें पुरें केलें. याचें अध्ययन बापा जवळच झालें होतें. (निबंधमाला.) [प आहे.

**भूषणसार**– भट्टोजी दीक्षित कृत व्याकरण विषयावरील ग्रंथ. हा शब्दकौस्तुभाचा संक्षे-

**भूषणसारदर्पण**– हरिवल्लभ कविकृत भूषण सारावरील टीका.

**भेदाधिकार**– वेदांतविषयक नृसिंहाश्रमकृत ग्रंथ. यावर रामाश्रमाची टीका आहे.

**भैमी**– परिभाषेंदुशीखरावरील भीमाचार्यकृत टीका.

**भैरवकवि**– हा तैलंग जातीय ब्राह्मण कवि कोंडवीडु येथील एका राजाच्या वेळीं होता. तेलंगी व्याकरणांत याची गति चांगली होती. तरी याचा छंदःशास्त्रावर एक ग्रंथ आहे: व त्याचें नांव कविगजांकुश्रचंद्रांश्र आहे. हा चांगला सभ्य व स्वतंत्र असा मनुष्य होता. (कविच०)

**भैरवनाथ**– नाथलीलामृत ग्रंथाचा कर्त्ता. हा जातीचा ब्राह्मण होता. हा शके १६३५ मध्यें म्हणजे संवत् १७७० मध्यें असल्याचा व यानें तो ग्रंथ केल्याचा उल्लेख त्यांत आढळतो.

**भोजकट**– याचें हलीं नांव इलिचपूर आहे. हें पूर्वीचें विदर्भदेशाचें नगर. याचे उत्तर अक्षांश सुमारें २३ व पूर्वरेखांश ७८ आहेत.

**भोजचंपु**– यास रामायणचंपु ह्मणतात. हा भोजराजानें स्वतः लिहिला. परंतु युद्धकांड त्याच्या हातून पुरें होण्या पूर्वींच तो मरण पावल्या मुळें, लक्ष्मण कवीनें तो पुरा केला. त्या मुळें त्यास भोजचंपु लक्ष्मण असें नांव पडलें.

**भोजचंपुलक्ष्मण**– भोजचंपूसच नांव.

**भोजप्रतिदेशव्यवस्था**– हा देशव्यवस्था विषयक ग्रंथ, भोजराजाचा चुलता मुंज यानें आरंभिलेला भोजराजानें उत्कृष्ट रीतीनें कडेस लाविला. त्या मुळें त्यास असें नांव पडलें.

**भोजप्रबंध**– हा संस्कृत ग्रंथ बल्लालमिश्रानें केला. यांत भोजराजाचा जन्मापासून वृत्तांत आहे. भोजाचा शेवट मात्र त्यांत वर्णिला नाहीं. (बुल्ह० काश्मी० शोध.)

भोजराजा– माळव्यांत धारा नांवाची नगरी आहे, जिला हल्लीं धार म्हणतात तेथें शालिवाहन शकाच्या नवव्या शतकाच्या उत्तरार्धांत सिंधुल नांवाचा एक राजा होता, त्याचा हा पुत्र. याची गोष्ट अशी आहे कीं, हा सुमारें पांच वर्षांच्या वयाचा असतां याचा बाप मरण पावला. तेव्हां मरतानां त्यानें आपला परम विश्वासू व जुना प्रधान बुद्धिसागर याच्या अनुमतानें आपला धाकटा भाऊ मुंज यास राज्याधिकार देऊन यास त्याच्या स्वाधीन केलें. आणि सांगितलें कीं, आतां हा मुलगा माझा नाहीं. यास्तव याचें चांगलें पोषण करून हा मोठा झाला असतां यास राज्यावर बशीव. इतकें सांगून सिंधुल राजा मरण पावला.

मुंज हा राज्याधिकारी होऊन राज्य करूं लागला असतां, त्यानें बंधूच्या आज्ञेप्रमाणें राज्य चालवून याचें संगोपन चांगलें केलें. या गोष्टीस कांहीं काळ लोटल्यावर एकदां एका ज्योतिषी ब्राह्मणानें याची पत्रिका केली. तींत हा मोठा विद्वान् होईल व नामांकित राजा होऊन अनेक विद्वानांस आश्रय देईल. इत्यादि वर्णन केलें. तें पाहून मुंज कांहींसा मनांत खिन्न झाला. व याच्या विषयीं मत्सर उत्पन्न झाल्यानें वेड्यासारखा होऊन त्याच्या मनांत याच्या नाशा विषयींची बुद्धि उत्पन्न झाली. या गोष्टीस मुंजाचा नवा प्रधान वत्सराज याचेंही अनुमोदन पडून उभयतांनीं मिळून यास ठार मारण्याच्या हेतूनें बुद्धिसागराच्या स्वाधीन केलें.

बुद्धिसागर हा जुना व प्रामाणिक असून शाहाणा असल्या मुळें त्यानें राजास कांहीं विशेष न बोलतां, त्यास बरें आहे म्हणून व यास अरण्यांत नेल्या सारखें त्यास दाखवून आपल्या घरीं नेऊन लपवून ठेविलें. आणि एका कारागिरा कडून त्याच्याशिरा प्रमाणें एक शिर रंग इत्यादिकांनीं हुबेहूब तयार करवून तें राजास दाखवून भोजास मारिलें म्हणूनही कळविलें. या गोष्टीस थोडे दिवस लोटले नाहींत तों मुंजास कांहीं कारणानें व लोकापवादानें मुलाची आठवण झाली. व भावानें आपल्यास सांगितलें काय व आपण केलें काय याचा त्यास खेद झाला. आणि त्यामुळें त्यानें या मुला करितां अतिशय शोक केला. त्या वरून बुद्धिसागरानें त्याचें समाधान करून मी मुलगा मारिला नाहीं. माझ्या घरीं मी त्यास ठेविलें आहे. तर आपण शोक करूं नये. असें सांगून मुलगा आणून त्याच्या स्वाधीन केला. त्यास पाहून मुंजास अतिशय आनंद झाला. व त्यानें भोजास लागलीच शालिवाहन शके ९०४ या वर्षीं राज्यावर बसविलें. तेणें करून लोकांत याची पराकाष्ठेची कीर्ति झाली.

भोजराजा राज्य करूं लागल्यावर त्याची विद्वत्ता व औदार्य या दोन गुणांनीं

सर्वत्र मोठी ख्याति झाली. ती अशी कीं, त्याच्या दरबारीं अनेक कवि नवीन कविता घे-ऊन येऊं लागले. व याजकडूनही त्यांचा यथायोग्य सन्मान होऊं लागला. त्यांत बल्लाळमिश्रानें दंडी, भवभूति, शंकर इत्यादि अनेक कवि आल्याचें लिहिलें आहे. परंतु त्यांत पहिल्या दोघां विषयींचा लेख शोधक लोकांच्या विचारें असंभाव्य आहे. असु. कोणे एके वेळीं एक कवि आला. त्या वेळेस राजा अंतर्गृहांत गेल्या मुळें सभेंत नव्हता. तो आलेला कवि कोण म्हणाल तर कालिदास होय. त्याचें वर्णन बल्लाळ कवीनें जें केलें आहे. तें गद्य येणें प्रमाणें:—

"कश्चिदभ्यगात् कनकमणि कुंडलशाली। दिव्यांशुक प्रावरणो। विला-"
"स इव मूर्तिमान्। कवितेव तनुमाश्रितः प्राप्तो विद्वान् तं दृष्ट्वा। सा"
"विद्वत्परिषत् सच सर्वान् प्रणिपत्य आह। कुत्र भोज नृप इति? तेत-"
"मूचु रिदानी मेव सौधांतर गत इति। ततो सौ प्रत्येकं तेभ्यस्तांबूलं दत्वा"
"गजेंद्र कुलगत मृगेंद्र इवासीत।" इत्यादि.

अर्थ- भोजराजा अंतर्गृहांत गेला असतां सभेंत बसलेल्या लोकांनीं कोणी एका-स समोरून येतां पाहिलें. तें असें कीं, ज्याच्या कानांत सुवर्ण मण्यांचीं कुंडलें आ-हेत. अंगावर दिव्य वस्त्र आहे. जो केवळ मूर्तिमंत विलासा सारखा, तसेंच कविता हेंच आहे शरीर ज्याचें त्या प्रत ती विद्वत्सभा अवलोकन करून त्याच प्रमाणें त्या-नें सर्वांस पाहून व नमस्कार करून पुसलें कीं, भोजराजा कोठें आहे? तेव्हां ते त्यास बोलले इतक्यांतच वाड्यांत गेला आहे. तें ऐकून त्यानें सर्वांस आपल्याज-वळची पानसुपारी काढून प्रत्येकास विडे दिले. व शंकर कवीस नुक्तेंच राजानें बारा लक्ष द्रव्य दिलें होतें. त्या बद्दल त्यांच्यांत चाललेला वाद तोडिला. त्या विषयीं आह्मीं पूर्वीं लिहिलेंच आहे. (८२ कालिदास) शं॰पहा. सारांश भोजराजा सभेंत-आल्यावर त्यानें त्याचा सन्मान करून त्यास आपल्या जवळ ठेविलें.

एकदां सर्व पंडितांनीं याला भोजराजाच्या सभेंतून काढूनही टाकविलेलें आहे. कारण याचें वर्चस्व फार झालें होतें हें एक. आणि दुसरें हा स्त्रैण अस-ल्या मुळें ते याचा तिरस्कारही करीत. कांहीं दिवसांनीं राजानें यास पुनः दर-बारांत आणिलें व "हुताशनश्चंदन पंकशीतलः" असा श्लोकाचा चौथा चरण म्ह-णून एक समस्या पुसली. तिचें उत्तर यानें या प्रमाणें दिलें:—

सुतं पतंतं प्रसमीक्ष्य पावके न बोधयामास पतिं पतिव्रता॥
तदा भवत्तत्पति भक्तिगौरवात् हुताशन श्चंदन पंक शीतलः।

याचा भावार्थ असा कीं, कोणी पतिव्रता स्त्रीच्या मांडीवर तिचा पति मस्तक ठेऊन निजला असतां तिचें मूल खेळतां खेळतां अग्नींत पडलें. तथापि तिनें पतीस जागें केलें नाहीं; कारण त्याची झोंप मोडेल. त्या वरून तिच्या एकनिष्ठ पातिव्रत्यास्तव अग्नि गंधाप्रमाणें शीतळ झाला. त्या वरून भोजराजा फार संतुष्ट झाला.

भोजप्रबंधांत दुसरी एक गोष्ट अशी लिहिली आहे कीं, एकदां राजास कांहीं जबर व्यथा झाली. ती वैद्यांच्यानें बरी होईना. तेव्हां तेथें अकस्मात् दोघे वैद्य आले. त्यांनीं या प्रमाणें ह्मटलें. "असी तैनांभसि स्नानं पयःपानं वयः स्त्रियः॥ एतद्धी मानुष्याः पथ्यं" हा तिसरा चरण भोजानें ऐकण्या बरोबर, म्हणजे तुम्हां मनुष्यांस हें पथ्य इतकें ऐकतांच, हा चतुर राजा तत्काळ हे बोलणारे मनुष्य नव्हेत असें समजून त्यानें काय केलें व त्यांस काय म्हटलें त्या विषयीं बल्लाळ कवीनें गद्यरूपानें असें वर्णन केलें आहे:—

"राजा मानुषा इति संबोधनं श्रुत्वा। वयंचेन्मानुषाः कौ युवा मिति? तयोः"
"हस्तौ झटिति स्वहस्ताभ्यां अग्रहीत्। ततस्तत्क्षण एव तावंतर्धानं बुवं-"
"तावेव कालिदासेन पूरणीयं तुरीय चरण मिति। ततो राजा विस्मितः"
"सर्वानाहूय तद्वृत्त मब्रवीत्। तच्छ्रुत्वा सर्वेऽपि चमत्कृताः विस्मिताश्च"
"बभूवुः। ततः कालिदासेन तुरीय करणं पूरितं– स्निग्ध मुष्णंच भोज-"
"नम्। इति."

असीतैनाभसि स्नानं पयःपानं वयः स्त्रियः॥ एतद्धो मानुषाः पथ्यं
स्निग्ध मुष्णंच भोजनं॥१॥

अर्थ– उष्णोदकें करून स्नान, दुग्धप्राशन, आणि तरुण स्त्री संभोग हेंच तुह्मां मनुष्यांस पथ्य होय. तेव्हां राजा त्यांस म्हणाला जर आम्ही मनुष्य तर तुह्मी दोघे कोण? असें ह्मणून त्यानें त्या उभयतांचा हात धरिला. तों ते, कालिदासानें चौथा चरण पूर्ण करावा असें बोलत अंतर्धान पावले. त्या वरून राजा विस्मित होऊन तो समजला कीं, ते अश्विनी कुमार होत. म्हणून मग त्यानें सर्व पंडितांस बोलाविलें व झालेलें वृत्त त्यांस सांगितलें. तें ऐकून सर्वांस चमत्कार वाटून ते विस्मित झाले. पुढें "स्निग्ध मुष्णंच भोजनं" म्हणजे रखरखीत नव्हे असें उष्ण अन्नाचें भोजन करणें असा चौथा चरण म्हणून तो श्लोक कालिदासानें पुरा केला.

"ततः कश्चिद्भोजराजः कालिदासं प्रति आह। सुकवे। त्वमस्माकं चरम"
"ग्रंथं पठ। ततः क्रुद्धो राजानं विनिंद्य कालिदासः क्षणेन तं देवं त्यक्त्वा"

"विलासवत्यासह एकशिला नगरं प्राप."

अर्थ- तदनंतर एकदां भोजराजा कालिदासास ह्मणाला. हे सुकवे, तूं माझें भरते-रचें चरित्र वर्णन कर. त्यावरून कालिदास क्रुद्ध होऊन त्याची निंदा करीत होत्सा-ता राजास सोडून व विलासवती वेश्येस घेऊन एकशिला नगरीस (धारंगूळ शह-रास) गेला.

अशा प्रकारें कालिदास गेल्यानें भोजराजास त्या वांचून करमेनासें झालें. तेव्हां क्षपणिकवेष धारण करून भोजराजा एकशिला नगरीस आला. व कालिदासास भेटला. त्या वेळेस उभयतांचीं संभाषणें झालीं तीं येणें प्रमाणें :—

"ततः कालिदासो योगिनं दृष्ट्वा तं सामपूर्वं पप्रच्छ। योगिन् कुत्रते स्थिति"
"रिति? योगी वदति सुकवे। अस्माकं धारा नगरे वसति रिति। ततः कवि-"
"राह तत्र भोजः कुशली किम्?। ततो योगी प्राह किंमया वक्तव्य मिति।"
"ततः पुनः कविराह। तत्रा ऽतिशय वार्तास्ति चेत्। सत्यं कथयेति। तदा"
"योगी प्राह भोजो दिवंगत इति."

अर्थ- कालिदास योग्यास अवलोकन करून पुसता झाला. हे योगिन् तुमचें वास्तव्य कोठें असतें? योगी ह्मणतो सुकवे आमचें वास्तव्य धारा नगरींत. कवि बोलला. तर तेथें भोजराजा कुशल आहे कीं? योगी ह्मणाला मी काय सांगावें? कवि ह्मणा-ला कांहीं विशेष गोष्ट असेल तर सांग? योगी ह्मणाला भोजराजा स्वर्गवासी झा-ला. अशीं अक्षरें त्याच्या तोंडचीं ऐकतांच कालिदास मूर्च्छा येऊन भूमीवर पड-ला. नंतर कांहीं वेळानें सावध होऊन मोठ्या दुःखानें या प्रमाणें बोलला:—

अद्य धारा निराधारा निरालंबा सरस्वती ॥
पंडिताः खंडिताः सर्वे भोजराजे दिवंगते ॥१॥

"एवं यदा कविना चरमश्लोक उक्तस्तदैव सयोगी भूतले विसंज्ञः"
"पपात्। ततः कालिदास स्तथा विधं तमवलोक्य। अयं भोज एवे-"
"ति निश्चित्य। अहह महाराज। तत्र भवताऽहं वंचितो ऽस्मीत्यभिधा-"
"य इतितंश्लोकं प्रकारांतरेण पपाठ."।

अद्य धारा सदा धारा सदालंबा सरस्वती ॥
पंडिता मंडिताः सर्वे भोजराजे भुवंगते ॥१॥

" ततो भोजस्तमालिंग्य प्रणम्य धारा नगरिं प्रति ययौ."

अर्थ- आज भोजराजा स्वर्गवासी झाल्यानें धारा नगरि निराधार झाली. सरस्वती

निराश्रित झाली. सर्व पंडित खंडित झाले. असा शेवटचा श्लोक ऐकतांच योगी बेशुद्ध होऊन भूमीवर पडला. तेव्हां कालिदास अशा प्रकारें त्यास अवलोकन करून समजला कीं, निश्चयें करून हाच भोज आहे. मग अहाहा! महाराज! आपण मशीं वंचना केलीत. इतकें बोलून तोच श्लोक त्यानें फिरवून ह्मटला.

आज भोजराजा पृथिवीवर असल्यानें धारानगरि आधारयुक्त झाली. सरस्वतीस आश्रय झाला. व सकल पंडित अलंकृत झाले. इतकें ऐकून भोजराजा त्यास आलिंगनपूर्वक नमस्कार करून धारा नगरीस येता झाला. या गोष्टी वरून कालिदास व भोज या उभयतांत परस्पर प्रेम किती होतें तें उघड दिसून येतें. व कालिदास हा जातीचा तैलंग ब्राह्मण असून तो वारंगूळ शहरचा मूळ राहणारा त्याचेंही स्पष्टीकरण होतें. (भोजप्र० व कविच०).

भोळाराम— समर्थ रामदास स्वामींच्या शिष्यांतील एक. हा मूळचा औरंगाबादेकडील राहणारा जातीचा ब्राह्मण होता. याचें मूळचें नांव काय होतें तें कळत नाहीं.परंतु हा केवळ भावडा असल्या मुळें, समर्थ यास अशा नांवानें हांक मारून याच्यावर प्रीति करीत. व प्रत्यहीं भोजन झाल्यावर यानें विडा कुटून द्यावा. तेंही काम त्यांनीं याजकडेसच सांगितलें होतें. एकदां कांहीं मत्सरी मंडळींनीं याच्यावर समर्थांची अवकृपा व्हावी ह्मणून खलबत्ता लपवून ठेविला. त्या मुळें तो शोधण्यास विलंब लागून समर्थ जेऊन उठले तरी याचा विडा तयार झाला नाहीं. असें पाहून एकापाठीमागें एकानें मधल्या मध्येंच येऊन,अरे विडा लवकर आण अशा प्रकारें नेट लाविला. त्यावरून यानें लवकर लवकर पानांस चुना लावून व आंत सुपारी काथवगैरे घालून तो आपल्या दांतांनीं चावून तयार केला. व झट्कर नेऊन समर्थांस दिला. तो समर्थांनीं तसाच तोंडांत टाकून यास ह्मटलें. भोळ्या, आजचा विडा फारच रसभरित लागतो. तूं नेहेमीं विडा करतोस पण अशी रुची त्यास नसते. यास्तव सांगतों कीं, असाच विडा दररोज देत जा. संभाळ यांत चुकूं नको बरें?

ही समर्थांची आज्ञा यानें शिरसा वंद्य करून दुसऱ्या दिवसा पासून प्रत्यहीं विडा चावून देण्याचा क्रम ठेविला. त्या मुळें खलबत्त्याची गरजच मुळीं राहिली नाहीं. असें झाल्यानें हेवेखोरांचे दांत पडलें. तेव्हां आतां काय करावें? ही गोष्ट समर्थांस सांगावी कोणी? अशा विचारांत सर्वजण पडले. शेवटीं त्यांनीं असें केलें कीं, ही गोष्ट शिवाजी महाराज एकदां समर्थदर्शनास आले असतां त्यांस प्रत्य-

स दाखविली. म्हणून त्यांनीं समर्थां जवळ युक्तीनेंच गोष्ट काढली कीं, शिष्यांनीं गुरूस आपलें उच्छिष्ट द्यावें किंवा कसें? समर्थ ह्मणाले देऊं नये. अधर्म आहे. त्यावर शिवाजी महाराज ह्मणाले. भोळाराम आपणांस प्रत्यहीं विडा आपून देतो तो उष्टा असतो. समर्थ ह्मणाले तो असें करतो? बरें तर शिवाजी, आतांच तुह्मीं त्यास जाऊन सांगा कीं, आम्ही विडा खलबत्या करून्हां मागितला आहे. त्या वरून शिवाजीनें त्यास तसेंच जाऊन सांगितलें. तें ऐकतांच यानें नित्या प्रमाणें विडा चाऊन तयार केला. आणि एका जलद सुरीनें शिरकमळ शरीरापासून उतरून तें शिवाजीच्या हातांत दिलें. हें अघटित कृत्य पाहून शिवाजी भ्याला, आणि मनांत विचार करूं लागला कीं,आतां काय करावें? आपल्या शब्दानें हा एवढा अनर्थ घडून हा ब्राह्मण फुकट मेला. इतक्यांत हातांतील मुख ह्मणालें, शिवाजी, उशीर करूं नका. समर्थांस विडा लवकर नेऊन द्या.

सारांश, शिवाजीनें तें शिरकमळ घेऊन समर्थांपाशीं मोठें भीत भीत नेलें.तें पाहून समर्थांनीं मुकाट्यानेंच त्यांतील विडा घेऊन शिवाजीस सांगितलें. राजा,हा आणि हा खलबत्ता जागच्या जागीं होता तसाच ठेऊन ये. त्या वरून शिवाजीनें तें शिर धडास लाविलें; परंतु हातांस कांपरें सुटल्यानें तें किंचित् वांकडें बसलें.व तें बसतांच भोळाराम किंचित् मान वांकडी असा पूर्ववत् सजीव झाला. ही गोष्ट शके १५७३ मध्यें झाली. त्या दिवसा पासून शिवाजीची तर खात्रीच झाली. व मत्सरी लोकही मत्सर टाकून कोणी कोणाशीं हूं कीं चूं न करितां आप आपल्या अधिकारा प्रमाणें सेवा करीत राहिले. असा चक्र बसला. (रामदा॰ चरित्र.)

**भौत्यदेश—** भुटान नांवाचा जो देश तोच.

## म.

**मंखकवि—** काश्मीरच्या राजाचा दिवाण जो अलंकार त्याचा हा भाऊ. हा शालिवाहन शके ११३५ तागाईत ११४५ इतक्या काळांत खास असल्याचा पत्ता आहे. श्रीकंठ चरित्र ह्मणजे त्रिपुर वधवर्णन तें यानें केलेलें आहे. वर जो शक लिहिला त्या वेळेस काश्मिरांत जयसिंह राजा होता. मंखाच्या बापाचें नांव विश्ववर्त व आजाचें नांव मनोरथ होतें. हे एकंदर चौघे भाऊ होते. १ शृंगार. २ भंग. ३ अलंकार. आणि चौथा हा. यास क्वचित् लंकक अथवा मंखक असेंही ह्मणत. यानें रुय्यक नांवाच्या पंडिताजवळ अध्ययन केलें. त्या जवळच मंडन हा याच्या पूर्वीचा अध्ययन करणारा होता. मंखानें केलेला एक कोशही आहे. (बुल्ह॰ काश्मीरा॰ शोध.)

**मंखकोश**– मंखकवीनें केलेला कोश. याच्या कोशाचें प्रमाण हेमचंद्रानें आपल्या-कोशांत घेतलें आहे. त्यावरून हेमचंद्र याच्या मागला असें सहज दिसतें. (बु.शो.)

**मगधदेश**– जरासंध राजाचा देश. यास हल्लीं बहार प्रांत ह्मणतात. याची प्राचीन राजधानी गिरिव्रज. त्यास कांहीं काळा पूर्वीं राजगृह ह्मणत असत. हल्लीं त्या-जागीं बहार शहर आहे.

**मगधबोध**– बोपदेव पंडित कृत ग्रंथ. बालभाषेच्या व्याकरण विषयावर याची रचना आहे. याचीं प्रकरणें १२ व सूत्रें एकंदर ११०० आहेत. मागधी, शौरसेनी, पैशाची आणि राक्षसी अशी चार प्रकारची जी बालभाषा त्यांचे यांत नियम बांधलेले आहेत. रामानाचारी नामक पंडिताची यावर टीका आहे.

**मगर**– हा एक गांव गोरखपुराजवळ आहे. येथें कबिराची कबर आहे.

**मंगळवेढें**– हा गांव पंढरपुराजवळ आहे. व तो पटवर्धनी अमलांत आहे.

**मघपंडित**– विद्याशंकर भारती नांवाचे नामांकित दुसरे शंकराचार्य होऊन गेले ज्यांचें वर्णन माधवाचार्यानें आपल्या शंकरविजयांत केलें आहे त्यांच्या आईचा बाप ह्मणजे शिवगुरूचा सासरा.

**मंचन**– विज्जल राजाचा कारभारी. बसवाचा बोभाट हा राजास वारंवार कळवीत असे.

**मंचनामास्या**– हा कवि जातीचा तैलंग होता. सामुद्रिक विद्येचें ज्ञान यास चांगलें होतें. व संस्कृतांतून तो ग्रंथ यानें तेलंगींत लिहिला ही आहे. (कविच०).

**मछलीपटन**– मद्रास इलाख्यांतील समुद्रकांठचें एक शहर.

**मंजुकेशानंद**– कांठेवाडांतील वरताळ गांवचा राहणारा हा साधु. हा संवत् १९०२ ह्मणजे शके १७६७ मध्यें होता. यानें केलेलीं कित्येक पदें आहेत. (काव्यदोहु०)

**मंजूषा**– हा एक संस्कृत ग्रंथ आहे. व तो नागोजीभट्टानें केलेला आहे.

**मठाम्नाय**– यांत शारदा, गोवर्द्धन, जोशी व शृंगेरी या चार मठांचें आचार्यादि विषयक वर्णन आहे.

**मंडन**– मंखकवीचा गुरुबंधु. याच्या बापाचें नांव श्रीगर्भ होतें. हा सर्व शास्त्रांत मोठा प्रवीण होता. आणि त्याच कारणामुळें मंखाच्या ग्रंथाची परीक्षा करण्यासाठी तीस पंडित अलंकारानें काश्मिरास जमविले होते त्यांत हा होता. (बुल्ह० शो०)

**मंडनमिश्र**– हा महापंडित पंच गौडां पैकीं कान्यकुब्ज जातीचा ब्राम्हण होता. कुमारिल भट्ट व हा हे दोघे एकेच वेळीं होते. कारण आनंदगिरीनें आपल्याशंकरविजयांत श्रीमच्छंकराचार्यांची व कुमारिल भट्टाची भेट झाल्यावर तेथून

आचार्य निघाले ते याकडेसच आले. असें छप्पन्नाव्या प्रकरणांत लिहिलें आहे. अर्थात् कुमारिल भट्ट जसा युधिष्ठिर शकाच्या २२ व्या शतकांतील उत्तरार्द्धांत होता त्याच प्रमाणें हाही होता. या विषयीं आचार्यांस कुमारिल भट्टाची असलेली उक्ति माधवाचार्यानें आपल्या शंकर विजयांत लिहिली आहे ती अशीः—

अयंच पंथा यदिते प्रकाश्यः स्फुधीश्वरो मंडनमिश्र शर्मा ॥ दिगंत विश्रांत यशा विजेयो यस्मिन् जिते सर्व मिदं जितंस्यात् ॥ ११३ ॥ सदावदन्योग पदंच सांप्रतं सविश्वरूपः प्रथितो महीतले ॥ महाग्रही वैदिक कर्म तत्परः प्रवृत्ति शास्त्रे निरतः स्फुकर्मतः ॥ ११४ ॥ निवृत्तिशास्त्रे न कृतादरः स्वयं केनाप्यु पायेन वशं सनीयतां ॥ वशंगते तत्र भवेन्मनोरथ स्तदंतिकं गच्छतु माचिरं भवान् ॥ ११५ ॥ (सर्ग ७)

अर्थ- जर आपणास अद्वैत मार्ग प्रकाशित करणें आहे तर आपण कोणत्या तरी उपायानें मंडनमिश्रास जिंकावें. कारण निवृत्तिं शास्त्रास तो मानीत नसून प्रवृत्ति शास्त्ररूप जो वेदोक्त कर्ममार्ग त्यांतच त्याची बुद्धि निमग्न झाली आहे. यावरून मंडनमिश्र जैन मताचा स्थापक होता अशी जी लोकवार्ता आहे ती निर्मूळ असून तो केवळ कर्मवादी होता असें मागील व पुढील लेखा वरून वाचकांच्या ध्यानांत येईल.

चतुर्थाश्रमास तुच्छ मानून गृहस्थाश्रमच श्रेष्ठ ह्मणणारा व त्या प्रमाणें वर्तणारा जो मंडनमिश्र (विश्वरूपाचार्य) त्यास जिंकण्या साठीं आचार्य कुमारिल भट्टापासून निघाले ते माहिष्मती नगरीस (चोळी महेश्वर) येथें आले. आणि त्याच्या घराचे दरवाजे बंद असल्या मुळें आकाशमार्गानें त्यांत प्रवेश करिते झाले.

त्याच दिवशीं पितृतिथि असल्या मुळें मंडनमिश्रानें पितृस्थानीं व्यास आणि जैमिनी या दोघांस बसवून देवस्थानीं शालग्राम मांडला होता. नंतर संकल्प करून श्राद्धकर्मास आरंभ करीत आहे इतक्यांत, देवस्थानींच्या पाटावर त्यानें श्रीमच्छंकराचार्यांचीं दोन्ही पावलें अवलोकन केलीं. व लागलीच सर्व शरीरही पाहिलें. त्यांतही तो सन्यासी असें पाहून तर त्याच्या अंगाची आगच झाली. पुढें उभयतांचें संभाषण होऊन त्यांत मंडनमिश्र अगदीं बावरल्या सारखा होऊन निरुत्तर होत्साता अवाच्य भाषण करूं लागला. तेव्हां व्यास व जैमिनी या दोघांनीं त्यास सांगितलें. मंडना तुला असें करणें योग्य नाहीं. तर तो यति

विष्णूच समजून त्याचा आदर कर. त्या वरून मंडनमिश्र शांत होऊन त्यानें यतीचा सत्कार केला. व तो वादभिक्षा मागत असतां भोजनोत्तर ती देईन असें ह्मणून त्यानें श्राद्धकर्म यथासांग कडेस लाविलें.

पुढें उभयतांच्या वादाविषयींचा असा पण ठरला कीं, मंडन म्हणाला जरमी वादांत पराभूत झालों तर सन्यासी होईन. शंकराचार्य ह्मणाले आम्ही हरल्यास गृहस्थाश्रम करूं. या गोष्टीस मंडनमिश्राचीच स्त्री साक्षात् सरस्वतीचा अवतार जाणूनच तिला आचार्यांनीं साक्षीस ठेवून मंडनाशीं शंभर दिवस पर्यंत वाद केला. व त्यास त्यांनीं वादांत जिंकून अद्वैत ज्ञानोपदेश पूर्वक त्याला सन्यास देऊन व सुरेश्वराचार्य असें त्याचें नांव ठेवून आपला शिष्य केलें. या पुढें सरस वाणी जी मंडनाची बायको तिशीं आचार्यांचा वाद झाला आहे. व त्यांत तीही पराभव पावली आहे. ती गोष्ट आचार्यांच्या नांवावर आम्ही दाखविली आहे.

याच अर्थावर आनंदगिरीच्या शंकर विजयांतील गद्य येथें सारांश रूपानें दाखवून, माधवकृत शंकरविजयांतीलही श्लोक थोडे दाखवितों:—

"तदानीं मंडनमिश्रो विश्वेदेवान् संकल्प्य शालग्राम स्वागत मपि. दर्भा-"
"क्षत प्रोक्षण काले शंकराचार्य पादद्वयं मंडलस्थं ददर्श। ततः सर्वांगा-"
"नि वीक्ष्य क्षणेन किलायं सन्यासीति ज्ञात्वा कोप कोलाहल चित्तः कु-"
"तो मुंडीत्यवादीत्। आचार्य आह। अप्रार्थित निमंत्रिताभ्यागतो विष्णु-"
"रह मित्यादि वाक्यानि व्यासः श्रुत्वा पाद्यं दीयता मिति प्राह मंडन मिश्रं।"
"पाद्यग्रहण काले वादार्थ मागतोस्मीति गुरुर्जगाद। भोजना नंतरं"
"करोमी त्यवदत् मंडन मिश्रः। ततो यथाविधि पितृकर्म निर्वर्त्य वा-"
"दार्थं पणमेवं व्याचक्रतुः। गृहस्थोऽहमपि पलायितः सन्यासी भवे-"
"यं। अहमपि यदिवादे पलायितः गृहस्थो भवामीति उभयपक्ष ग्रह-"
"ण समर्था मंडन मिश्र पत्नींकृत्वा सरसवाणी नाम्नीं प्रसंगोपक्रम मा-"
"चक्रतुः।

तपो महिम्नैव तपोनिधानं सजैमिनीं सत्यवती तनूजं॥ यथाविधिश्राद्ध विधौ-निमंत्र्य तत्पाद पद्मान्यवने जयंतं॥ १२॥ तत्रांतरिक्षा दवतीर्य योगीवर्यः समागम्य यथार्ह मेषः॥ द्वैपायनं जैमिनि मप्युभाभ्यां ताभ्यां सहर्षं प्रतिनंदितोऽभूत्॥ १३॥ अथ द्युमार्गा दवतीर्णं मंतिके मुन्योः स्थितं ज्ञान शिखोपवीतिनं॥ सन्यास्य साविस्मय गत्य सो भवत्प्रवृत्ति शास्त्रैक रतोपि कोपनः॥ १४॥ तदा

निरुद्धस्य गृहाश्रमे पितुर्यतीश्वरः स्यापि कुतूहलं भृतः॥ क्रमात् किलेदं बुधशास्तयोस्तयोः प्रश्नोत्तराण्या करयोत्तरोत्तरं॥१५॥

येथें उभयतांचीं प्रश्न प्रश्नोत्तरें झालेलीं फार चमत्कारिक आहेत. तीं आठव्या सर्गांत सर्जी असल्यास वाचकांनीं पहावीं. सारांश शेवटीं झालेलीं एकमेकांचीं एकमेकांस उत्तरें ऐकून व शंकराचार्य मंडनमिश्रास हार जात नाहींत असें पाहून व्यास व जैमिनि मंडनमिश्रास या प्रमाणें बोलले.

तं मंडनं सस्मित जैमिनी क्षितं व्यासोब्रवीज्जल्पसि वत्स दुर्वचः॥ आचारणानेच मनिंदितात्मनां ज्ञातात्म तत्वं यमिनं धुतैषणं॥३३॥ अभ्यागतोसौ स्वयमेव विष्णु रित्येव मत्वाशु निमंत्रयत्वं॥ इत्याश्रवं ज्ञातविधि प्रतीतं सुध्यग्रणीः साध्वशिषन्मुनिस्तं॥३४॥ अथोप संस्पृश्य जलं सशांतः स संभ्रमं मंडन पंडितोपि॥ व्यासाज्ञया शास्त्र विदर्च यित्वा न्यमंत्रयद्भैक्ष्य

कृते महर्षिं॥३५

मंडनमिश्रानें व्यासाज्ञेनें शांत होऊन व नेत्रांस जलस्पर्श करून आचार्यांस भिक्षेचें आमंत्रण केलें. तेव्हां ते या प्रमाणें बोलले. आह्मांस वादभिक्षा दे. अन्नभिक्षा नको.

सचाब्रवीत्सौम्य विवाद भिक्षा मिच्छन् भवत्संनिधि मागतोस्मि॥
सान्योन्य शिष्यत्वपणा प्रदेया नास्त्यादरः प्राक्तन भक्त भैक्ष्ये॥३६॥
मम न किंचिदपि ध्रुवमीप्सितं श्रुतिशिरः पथ विस्तृति मंतरा॥ ॥
अवहिते नमखेष्ववधीरितः स भवता भवताप हिमद्युतिः॥ ३७॥

वादांत पराजय झाल्यावर मंडनमिश्र आचार्यांस शरण आला. त्या विषयीं आनंदगिरीनें असें लिहिलें आहे:-" ततो मंडन मिश्रः परम गुरु चरणारविंदं नत्वा तदुपदेशेन सन्यासी भूत्वा कुबेर दिश मभजत्॥"

माधवाचार्यांनें आपल्या शंकरविजयांत असें लिहिलें आहे कीं, आचार्य तैत्तिरीय शाखी यजु होते. व मंडनमिश्र काण्व होता. म्हणून त्यांनीं त्यास दोहों ग्रंथांच्या स्वकृत भाष्यावर वार्तिकें करावयास सांगितलीं. त्या बद्दल तेराव्या सर्गांत श्लोक आहेत ते असे:-

सत्यं यदात्थ विनयिन्मम याजुषीया शाखातदंत गत भाष्य निबंध इष्टः तद्वार्तिकं ममकृते भवता प्रणेयं सच्चेष्टितं परहितैक फलं प्रसिद्धं॥६५
तद्वत्वदीया खलु काण्व शाखा ममापि तत्रास्ति तदंत भाष्यं॥ तद्वार्तिकं

चापि विधेय मिदं परोपकाराय सतां प्रवृत्तिः॥६६॥

ही आचार्यांची आज्ञा झाल्या प्रमाणें यानें वार्तिकें लिहिलीं. असो. हा काण्वशाखी होता ह्मणून जें माधवाचार्यानें लिहिलें त्या बद्दल आनंदगिरीनें कांहींच लिहिलें नाहीं. तथापि तो कदाचित् काण्व असेल. त्याच प्रमाणें शंकराचार्यही तैत्तिरीययजु असतील. पण माधवाचार्य ज्या शिवगुरु पुत्र शंकराचार्यांचें वर्णन लिहितो.त्यावेळेस मंडनमिश्र मुळींच नसतां त्यांची गांठ त्यानें त्यांशीं घातलेली जुळते कशी? हीच आधीं पंचाईत आहे. कारण माधवप्रोक्त शंकराचार्य आनंदगिरिप्रोक्त शंकराचार्यांच्या मागून १४४२ वर्षांनीं झालेले आहेत.

सदानंदानें लिहिलेल्या शंकरविजयांत तर त्यानें माधवप्रोक्त शंकराचार्यच काईम धरून त्यांचा काळ जो लिहिला आहे तो ३५१ वर्षांनीं उणा आहे. असें असतांही मंडनमिश्र त्यां पाशीं वादांत हरून सन्यास घेण्या साठीं उभा केलाच आहे. परंतु असल्या पंडितांच्या हातून अशा चुका होणें ही गोष्ट मोठी शोचनीय आहे. सारांश. मंडन मिश्र हा विश्वजित् ब्राह्मणाचे पुत्र जे आनंदगिरिप्रोक्त श्री शंकराचार्य त्यांच्या वेळेस मात्र होता. तसाच तो कुमारिल भट्टाचा समकालीन होता. आणि त्यामुळें त्यास झाल्यास २८००वर्षें कांहीं काळ वरच झाला आहे.

**मणिसुव्रत**– जैन लोकांच्या २४ तीर्थकरांतील २०वा तीर्थकर. (प्रव० शारो०).

**मत्स्यदेश**– गाजीपुराच्यां आसमंतातचा देश.

**मत्स्यपुर**– हल्लीं या स्थळीं गाजीपुर आहे. (प्रा० हिं० न०)

**मत्स्येंद्रनाथ**– शिव आणि पार्वती हीं उभयतां क्षीर समुद्रतीरीं आत्मचर्चा करीत बसलीं असतां शिव जो विषय सांगत होते त्यास पार्वती हुंकार देत होती. असें होतां होतां पार्वतीस समाधि लागली असें पाहून मत्स्याच्या रूपानें विष्णु तेथें हुंकार देऊं लागला. कांहीं वेळानें हुंकार निराळ्या स्वराचा कां येतो ह्मणून शिवानीं पार्वतीकडे पाहिलें तों ती समाधिस्थ झाली आहे. मग तिला सावध करून ह्मणाले तूं समाधिस्थ असतां हुंकार कोण देत होतें? तिनें उत्तर केलें. आत्मस्वरूपाव्यतिरिक्त अन्य कोण आहे? वास्तव तो हुंकार आपलाच आपणास आहे. त्यावरून शिवांनीं हें कृत्य विष्णूचें आहे, असें जाणून मत्स्याकडे पाहून अलक्ष असा उच्चार केला. त्या बरोबर आदेश असें बोलत एक कुमार बाहेर पडला. तोच हा मत्स्येंद्र नाथ. आदिनाथ संप्रदायाचा प्रवर्तक होय. गोरक्षनाथ तो याचाच शिष्य होता. (नाथली० अध्या०२) व भक्तवि० अध्या०२२). हा मत्स्येंद्र मोठा विद्वान् होता. योग मा-

र्गावर याचा एक ग्रंथ आहे. त्यास मत्स्येंद्र संहिता असें नांव आहे. विक्रम शका पूर्वी हा सुमारें चारशें वर्षें होता. (आर्य॰ वि॰ क॰)

**मत्स्येंद्रसंहिता**– योगमार्गावरील ग्रंथ.

**मंथनकालेश्वर**– धर्मराजाध्वरी नामक कवीचा मूळ गांव. हा तैलंगणांत आहे.

**मथुराचंपु**– परशुराम मिश्रकृत संस्कृत ग्रंथ.

**मथुराशहर**– शूरसेन देशाची प्राचीन राजधानी. ही यमुना नदीच्या कांठीं आहे. या शहराच्या उत्तरेस दिल्ली शहर सुमारें तीस पस्तीस कोस आहे.

**मदलंबिका**– बसवाची आई. मादिराज अथवा महादेवभट्ट त्याची बायको.

**मदालसाचंपु**– हा चंपु संस्कृत भाषेंत आहे. व तो त्रिविक्रम पंडितानें केलेला आहे.

**मद्रदेश**– हा शल्यनामक प्राचीन राजाचा देश. याचें मुख्य शहर शाकल नगर. प्राचीन हिंदुस्थानाच्या इंग्रजी नकाशांत हा देश शतद्रु आणि विपाशा या दोन नद्यांच्या मध्यें लिहिलेला आहे. परंतु आमच्या मतें हा देश इंद्रप्रस्थाच्या (दिल्लीच्या) इतका वायव्येस येऊं नये. पश्चिमेस यावा.

**मद्रासशहर**– हें शहर हिंदुस्थानाच्या पूर्व किनाऱ्यावर आहे. प्राचीन हिंदुस्थानाच्या नकाशांत याचें जुनें नांव मंदराज्य असें लिहिलेलें आढळतें. याचे उत्तर अक्षांश सुमारें १२° व पूर्वरेखांश ८०° आहेत.

**मधुरंगचोक्कनाथ**– हा जंगू जातीचा तैलंग राजा त्रिचनापल्ली येथें जन्मला. याचें घराणें मोठें संभावित होतें. तंजावरचा राजा विजयरंग चोक्कनाथ तो याचा बाप होता. हा राज्यावर बसल्या नंतर यानें आपल्या पदरीं पुष्कळ गुणी मनुष्यें बाळगलीं होतीं. तसेंच त्यांनीं आप आपले गुण वाढवावे म्हणून यानें त्यांचे प्रपंच सर्वस्वीं चालविले होते. श्रीरंगनाथ देवाची यास पराकाष्ठेची भक्ति होती. म्हणून त्याच्या वारीस जाणें हा याचा मोठा नियम होता. यानें एक ग्रंथ करून त्या देवास अर्पिला असे. त्यांत व्यवहारोपयोगी बरेच विषय असून त्याची रचना सुबोध असल्या मुळें तो शाळांत शिकविण्याचा प्रघात पडला. (कविच॰).

**मधुराशहर**– हें पांड्य देशाची राजधानी द्रविड देशालगत दक्षिणेस आहे. याचे उत्तर अक्षांश सुमारें १०° व पूर्वरेखांश ७८° आहेत.

**मधुवेज**– हा लिंगाईत मनुष्य बसवाचा अनुयायी होता. म्हणून विजळ राजानें याच्या कंबरेस दोऱ्या बांधून रस्त्यांतून फरफटत ओढून ठार मारविलें.

**मधुसूदन**– विद्वद्भूषण नामक संस्कृत ग्रंथाचा कर्ता. (बुल्हरचा काश्मीरा क॰ शो॰).

**मधुसूदन सरस्वती**– हा कवि जगन्नाथाकडील राहणारा शके १५१० मध्यें होता. अद्वैतसिद्धि आणि तरंगिणी हे दोन ग्रंथ यानें केलेले आहेत. ( बुल्ह० शोध. )

२– सिद्धांत बिंदुग्रंथाचा कर्ता. ( इन्ह् मा० )

**मधुसूदनी**– मधुसूदनाची भगवद्गीतेवर व्याख्या आहे ती.

**मध्यकौमुदी**– हा ग्रंथ संस्कृत भाषेत वरदराज कविकृत आहे.

**मध्यमंदिर**– हा एक कवि होऊन गेलेला आहे. यानें महाभारत तात्पर्य हा ग्रंथ लिहिला आहे. हा मध्वाचार्यांच्या पूर्वीं होऊन गेलेला आहे.

**मध्यार्जुन**– द्रविड देशांतील हें एक क्षेत्र कुंभकोणाच्या पूर्वेस व तंजावरापासून सुमारें तीस कोस आहे. येथें महादेवाचें एक मोठें कडकडीत स्थान आहे. भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्य चिदंबराहून निघाल्यावर प्रदक्षिण मार्गानें या देवाचें दर्शन करून नंतर रामेश्वरास गेले होते. त्या विषयीं आनंदगिरीनें चौथ्या प्रकरणांत असें लिहिलें आहे:–

> "पद्मपाद,हस्तामलक,समित्पाणि,चिद्विलास, ज्ञानकंद,विष्णुगुप्त,शु-"
> "द्धकीर्ति,भानु,मरीचि, कृष्णदर्शन बुद्धि,विरिंची पाद, शुद्धानंतानं-"
> " दगिरि,प्रमुखैः शिष्य वरैः सेव्यमानः सर्वज्ञः श्रीशंकर भगवत्पाद"
> "चार्यः चिदंबर स्थलात् प्रदक्षिण मार्गेण श्रीमन्मध्यार्जुनं नाम शि-"
> "वाविर्भूत स्थलविशेषं प्राप"
> " तत्र किल भगवान् श्री शंकराचार्यः सदाशिव मेव मब्रवीत् । स्वामि-"
> " न् मध्यार्जुन । सर्वोपनिषदर्थोसि सर्वज्ञोसि यदि । निगमादीनां तात्प-"
> " र्य गोचरो द्वैत निर्णय अद्वैत निर्णयोवा पारमार्थिकः।पश्यतां"
> "सर्वेषां जनानां संशय निवृत्तिं कुर्विस्येवं मार्थिते । मध्यार्जुनेशः"
> "लिंगाग्रात् सावयव रूपेण निष्क्रम्य मेघवद्गंभीरगिरा दक्षिणं हस्त"
> "मुद्यम्य सत्यमद्वैत मिति त्रिरुक्त्वा लिंगाग्रेणांतर्दधे पश्यतां नराणा"
> "महदद्भुत मासीत् ।"

**अर्थ**– या स्थळीं भगवान् श्रीशंकराचार्य निश्चयें करून सदाशिवास पुसते झाले. हे स्वामि मध्यार्जुन,जर तूं सकल उपनिषदांतील अर्थरूप आहेस व सर्वज्ञ आहेस.तर वेदादिकांचा तात्पर्यगोचर द्वैत निर्णय कीं अद्वैत निर्णय पारमार्थिक तें सांग. आणि हे पाहणारे सर्व जन यांची संशयनिवृत्ति कर. या प्रार्थनेवरून लिंगाच्या अग्रभागापासून सावयव रूपानें मध्यार्जुन प्रगट होऊन मेघवत् गंभीर वाणीनें द-

क्षिण हस्त वर उचलून व अद्वैत सत्य अशा प्रकारें तीन वेळ बोलून पुनः तेथेंच अंतर्धान पावला. तेणें करून पाहणाऱ्या लोकांस अतिशय अद्भुत वाटलें.

**मध्वकपोलचपेटिका**– हा ग्रंथ संस्कृत भाषेंत अपय्यादीक्षितांचा आहे. [आहे.

**मध्वमतकुठार**– अपय्यादीक्षितकृत संस्कृत ग्रंथ. हा श्वासकुठाराच्या मात्रे सारखाच

**मध्वमुनीश्वर**– हा कवि जातीचा ब्राह्मण मोठा विरक्त व भगवद्भक्त होता. अद्वैतानंद ह्मणून जे नामांकित सन्यासी काशीमध्यें होते त्यांचा हा शिष्य असे. प्रख्यात कविजो अमृतराय त्यानें याची थट्टा केली असतांही त्याजवर यानें कृपा करून त्यास आपल्या गुरूकडून अनुग्रह देवविला. हा मूळचा नाशीक येथील राहणारा होय. असें असतां लोकांनीं यास सहकुटुंब औरंगाबादेस राहण्यास नेल्या वरून तेथें राहूं लागला. असें सांगतात कीं, लक्ष्मणपंत ह्मणून एक याचा गृहस्थ शिष्य होता. त्यास कांहीं कारणा वरून सरकारांतून ठेप झाली. त्या वरून यानें अद्भुत चमत्कारानें हाजी महंमद कोतवालास शिक्षा केली. कारण तोच त्या गृहस्थाच्या कैदेस कारण होता. सारांश हाजी महंमदानें लक्ष्मणपंतास सोडिलें. व आपणही फकीर होऊन याचा शिष्य झाला.

कान्होजी आंग्र्यानें याचें कीर्तन एकदां बुद्ध्या करवून ऐकिलें होतें. हा म्हातारा झाल्यावर याच्यानें पंढरीस जाववेनासें झालें. तेव्हां यास दृष्टांत असा झालेला सांगतात कीं, उद्धवभट्ट जोशी यांच्या आंगणांत दीड पुरुष खणिलें असतां मी तेथें आहें. यास्तव तेथें माझें दर्शन तुला होईल. ह्मणून यानें तेथें खणिलें. तों तेथें विठोबा रखुमाईच्या मूर्ति सांपडल्या. त्यांची यानें मग स्थापना केली. व पंढरीस जाणें तेव्हां पासून बंद केलें.

याचीं पदें वगैरे कविता पुष्कळ आहे. व ओंवीबद्ध ग्रंथ मराठींत धनेश्वर चरित्र आहे. धनेश्वर हा महादेव चाकणे जवळ आहे. तेथें द्रव्याच्या आशेनें कोणी गृहस्थ एका मुलास बळी देत असतां महादेव साक्षात् त्यांतून प्रगट होऊन त्यानें त्या मुलाचें रक्षण केलें, या विषयींचें वर्णन आहे. याचा मरणकाळ समजला नाहीं. (कवि०च०)

**मध्वाचार्य**– हा एक मोठा नामांकित आचार्य होऊन गेला. हा जातीचा कर्नाटकस्थ आश्वलायन ब्राह्मण होता. सन्यास घेतल्यावर यास आनंद तीर्थ असें नांव पडलें. यानें जें मत स्थापिलें त्याचें नांव पूर्णप्रज्ञदर्शन असें आहे. याच्या असण्याचा काळ संप्रदाय प्रदीप नामक ग्रंथा वरून शालिवाहन शक ११६५ आहे.

असें कळून येतें. आणि त्यावरून आज यास होऊन गेल्यास ६३६ वर्षें झालीं आहेत. असें स्पष्ट समजतें.

संप्रदाय प्रदीप ग्रंथावरून याची हकीकत कळून येते. ती अशी आहे कीं, गुजराथेंत एक कुमारपाल नावाचा राजा होता. तो वैदिक धर्मी असतां हेमचंद्र पंडितानें त्यास जैनधर्मांत नेलें. पुढें त्या राजानें आपली प्रजा बलात्कारानें जैनधर्म पाळायास लाविली. त्या मुळें जैनधर्म अतिशय पसरून वैदिक धर्म लोपत चालला. ही वार्ता गोकर्ण क्षेत्रांतील शांकरमतानुयायी एका महापंडितास कळून त्यास तेणें करून अनिवार्य खेद झाला. म्हणून त्यानें आपल्या जवळ अनेक शास्त्रांचे पाठ घेऊन तयार झालेले विद्यार्थी सर्व समक्ष बोलावून त्यांस आज्ञा केली कीं, तुम्ही हिंदुस्थानांत पर्यटन करा. आणि शंकराचार्य स्थापित जो सनातन वैदिक मार्ग तो सर्वत्र सांगत हिंडून जैन धर्म खंडनपूर्वक मंडित करा. अशी गुर्वाज्ञा होतांच सर्वांनीं तथास्तु ह्मणून देशपर्यटनास गमन केलें. व जैन धर्माचें खंडन करीत व तसेंच शांकरमत स्थापित सर्वजण उत्तरेकडे गेले. त्याच मंडळांतले हे मध्वपंडित होते. परंतु यांनीं मनांत असें आणिलें कीं, आपण कोठेंच न जातां एक नवा संप्रदाय काढावा. व तो लोकांत प्रवृत्त करावा. मग त्यांनीं त्या प्रमाणेंच नवें मत काढून त्याची पहिली गादी उडुपी अथवा उडुपीग्रम्य या गांवीं स्थापिली.

याच्या मताचे सिद्धांत कोणते त्या विषयींचें विवरण सायण माधवाचार्यांनीं सर्व दर्शन संग्रहांत पूर्णप्रज्ञ दर्शन प्रकरणांत केलें आहे. त्यांतील सारांश येणें प्रमाणें आहे. याच्या मतांत रामानुज मता प्रमाणेंच जरी जीव अणु आहे, दास आहे, वेद अपौरुषेय आहे. पांच रात्रांची मानपूक आहे. आणि प्रपंच सत्य इत्यादि आहे. तरी रामानुजांचा तत्त्वविभाग तीन प्रकारांनीं असलेला यास संमत नाहीं. कारण त्यांचा परस्पर विरोध आहे. म्हणून यानें तो तत्त्वविभाग स्वतंत्र आणि अस्वतंत्र अशा भेदानें दोन प्रकारचा मानिला आहे. या विषयीं यानें तत्त्वविवेकांत असें लिहिलें आहे.

स्वतंत्र मस्वतंत्रंच द्विविधं तत्त्व मिष्यते.॥
स्वतंत्रो भगवान् विष्णुर्निर्दोषोऽशेषसद्गुणः१

अर्थ- स्वतंत्र आणि अस्वतंत्र असें तत्त्व दोन प्रकारचें आहे. त्यांत सकल सद्गुणांनीं युक्त आणि निर्दोष असा एक भगवान् विष्णु तो मात्र स्वतंत्र आहे. बाकी इतर

सर्व परतंत्र होत. कोणी ह्मणेल कीं, सजातीय,विजातीय,स्वगत भेदरहित व नानाशून्य,असें वेदांतप्रतिपाद्य एक ब्रह्मतत्व असतां विष्णूसच अशेष सद्गुणत्व कसें येतें? तर असें आहे कीं, भेदाविषयीं जीं प्रत्यक्ष प्रमाणें आहेत,त्यांवरून तसें ह्मणतां येत नाहीं. पहा, निंब्याहून पिंवळें, पिंवळ्याहून तांबडें; तसेंच गायीहून घोडें व घोड्याहून गेंडा,इत्यादिक अगदीं भिन्न आहे. जर हा भेद नसताच, तर गाय आणावयास इच्छिणारा गेंडा घेऊन येता. अथवा गेंडा पाहूनही त्यास गायीचें स्मरण होतें,तसें होत नाहीं. ह्मणून प्रत्यक्ष प्रमाणानें अभेद ह्मणतां येत नाहीं.

जसा प्रत्यक्ष प्रमाणानें भेद गोचर होतो,तसाच अनुमानानेंही होतो. कसा-तर,जीवाहून परमेश्वर भिन्न आहे. व तो त्यास सेव्यच आहे. यास उदाहरणः— जसा सेवक आणि राजा. सेवक जो आहे तो आपण स्वामीहून उणे आहों असें समजून,स्वामीच्या गुणोत्कर्षेच वर्णन करितो, आणि त्या वरून स्तुत्य जो स्वामी तो संतुष्ट होऊन स्तुति करणारास इच्छित देतो. हाच न्याय सेव्य परमेश्वर आणि सेवक जीव यां विषयीं समजावा.

. आतां जर जीव हा स्वतंत्रच आहे,तर त्याच्या इच्छे प्रमाणें त्यानें जें इच्छावें तें कां घडून येऊं नये? घडून येत नाहीं. या कारणास्तव जीवास स्वतंत्र म्हणतां येत नाहीं. दुसरें,जो सेवक मीच राजा असें ह्मणतो तो राजाच्या हातून घात पावतो. परंतु गुणोत्कर्ष वर्णन करणारा तसा घात न पावतां इच्छित मनोरथास प्राप्त होतो. याच प्रमाणें मी ब्रह्म किंवा मी परमेश्वर आहें,असें ह्मणणारा जीव नाशच पावतो. आणि ईश्वर सेवन करणारा नाश न पावतां उलटा इष्टसिद्धि पावतो. या विषयीं असें ह्मटलें आहेः—

घातयंतिहि राजानो राजाहमितिवादिनः
ददत्यखिलमिष्टंच स्वगुणोत्कर्षवादिनां १

"एवंच परमेश्वराभेद तृष्णाया विष्णोर्गुणोत्कर्षस्य मृगतृष्णिका सम-"
"ताभिधानं विपुल कदलीफल लिप्सया जिह्वाच्छेदन मनुहरति। एता-"
"दृश विष्णु विद्वेषणा दंध तमस प्रवेश प्रसंगात्। तदेतत् प्रतिपादितं"
"मध्यमंदिरेण महाभारत तात्पर्य निर्णये॥"

अनादिद्वेषिणो दैत्या विष्णोर्द्वेषो विवर्धितः॥
तमस्यंधे पातयति दैत्यानंधे विनिश्चयात्॥१

अर्थ- सारांश परमेश्वर मी असें ह्मणणारा घात पावतो. म्हणून मीच परमेश्वर असा

अभेद इच्छेनें विष्णूच्या गुणोत्कर्षास मृगजल समत्व ह्मणणें तें केवळ पिकलेलीं के-ळीं खाण्याच्या आशेनें जिव्हा छेदन करून घेणें या प्रमाणें आहे. व अशा प्रकारचे जे विष्णुद्वेष करणारे ते अंधतम नरकांतच प्रवेश करितात.

असो. अंकन, नामकरण, आणि भजन अशा प्रकारानें नारायणाची सेवा तीन प्रकारची आहे. यांत अंकन ह्मणजे नारायणाचीं चक्रादि आयुधें तप्त करून अंगा-वर धारण करणें ये विषयीं शाकल्य संहिता परिशिष्टांत असें ह्मटलें आहे:—

"चक्रं बिभर्ति पुरुषोऽभितप्तं बलं देवाना ममृतस्य विष्णोः॥"

"सयाति नाकं दुरिता वधूय विशंति यद्यतयो वीतरागाः ॥"

तसेंच—"अतप्त तनुर्नत दामो अश्नुते" इत्यादि श्रुतिवाक्यही प्रमाण आहे. व त्या शं-खचक्रादि मुद्रा कोणत्या हातावर कोणती धारण करावी यास अग्निपुराण प्रमाण आ हे.— नामकरण, ह्मणजे पुत्रादिकांचीं केशव, माधव, इत्यादि नांवें ठेऊन भगवन्नामा-नुस्मरणार्थ सर्वकाळ तसाच व्यवहार ठेवणें. आतां तिसरें जें भजन त्याचे भेद दहा आहेत. ते असे:— दया, श्रद्धा, आणि स्पृहा हें त्रिविध मानसिक भजन. सत्य, हि-त, प्रिय, आणि स्वाध्याय हें चतुर्विध वाचिक भजन. तसेंच दान, लोकरक्षण आणि देवपूजन, असें त्रिविध कायिक भजन. मिळून भजन दशधा. या तीन प्रकारच्या से-वेनें दुसरें कांहीं कर्तव्यच राहात नाहीं. सारांश मोक्ष होण्यास विष्णूचाच प्रसाद पाहिजे. आणि तो प्रसाद त्याच्या गुणोत्कर्ष ज्ञानानेंच होतो.

जीवेश्वर भिदाचैव जडेश्वर भिदातथा॥ जीवभेदो मिथश्चैव जडजी-वभिदा तथा॥ मिथश्च जडभेदोयः प्रपंचो भेदपंचकः॥ सोयंसत्यो-प्यनादिश्च सादिश्चेन्नाश माप्नुयात्॥ नच नाशं प्रयात्येष नचासौभ्रां-ति कल्पितः॥ कल्पितश्चेन्निवर्तेत नचासौ विनिवर्तते॥

अर्थ:- जीव ईश्वर भेद, जड ईश्वर भेद, जीव जीव भेद, जड जीव भेद आणि जड जड भेद असे हे पांच भेद अनादि आहेत. जर हा भेद सादि असता तर नाश पावता. नाश पावत नाहीं ह्मणून भ्रांति कल्पित नाहीं. आणि भ्रांति कल्पितन-सल्यामुळें, हा नाहींसा व्हावयाचा नाहीं. तत्वमस्यादि वाक्यांनीं प्रतिपादित जी, जी-वेश्वर ऐक्यता ती तत् शब्द परोक्ष आणि त्वं अपरोक्ष असल्यानें कधींच व्हावया-ची नाहीं. तत्वमसि या ठिकाणीं तो जो स्वातंत्र्यादि गुणयुक्त आत्मा तो तूं नव्हेस ह्मणजे "अतत्वमसि" असा याचा पदच्छेद समजावा. याप्रकारें करून वायूचा तृ-तीयावतार जो पूर्णप्रज्ञ आनंदतीर्थनामा मध्वाचार्य त्याचें हें मत आहे असें समजावें.

प्रथमस्तु हनूमान्स्यात् द्वितीयो भीम एवच ॥
पूर्णप्रज्ञ स्तृतीयश्च भगवत्कार्य साधकः॥१॥

**मनगंजन**– हा ग्रंथ गुजराथी भाषेंत निष्कुळानंदानें केलेला आहे.

**मनबोध**– समर्थ रामदास स्वामीकृत मनास उपदेशपर श्लोक. यांची संख्या २०५ आहे व याचा छंद भुजंगप्रयात आहे.

**मनसाराम**– एक साधु.

**मनस्करवदास**– चित्पूर येथें राहणारा एक साधु.

**मनु**– स्वायंभुवादिक चौदा मनु ते.

**मनुसंहिता**– स्वायंभुव वैवस्वत मनूनें केलेली धर्मशास्त्रविषयक संहिता. [ची टी॰ भा॰

**मनुस्मृति**– स्वायंभुव वैवस्वत मनूचें शास्त्र. याचे अध्याय १२ आहेत. यावर कुलूकभट्टा-

**मनोरथ**– मंखनामक कवीचा आजा. विश्ववर्त्ताचा बाप. ( बुल्ह॰ शोध॰)

२– हा एक कवि आनंदवर्धनाच्या वेळचा होता. म्हणून शालिवाहनाच्या १० व्या शतकांत होता. (बुल्ह॰ शोध॰)

**मनोरथगुप्त**– काश्मीरदेश निवासी जो अभिनव गुप्त त्याचा भाऊ.

**मनोरमावृत्ति**– वररुचिकृत जो प्राकृत प्रकाश ग्रंथ त्यावरील भामह कविकृत व्याख्या.

**मनोहरकाव्य**– मनोहर दासकृत गुजराथींत.

**मनोहरदास**– हा भावनगरचा राहणारा. वडनगरी ब्राह्मण सन्यासी होता. काव्य दोहन ग्रंथांत हा संवत् १८८० म्हणजे शालिवाहन शके १७४५ मध्यें होता असें लिहिलें आहे. मनोहर काव्य आणि सच्चिदानंद स्वामींचें वर्णन असे याचे गुजराथींत दोन ग्रंथ आहेत. [ हेस॰ (गु॰भा॰)

**मन्मथशिवलिंग**– हा लिंगाईत धर्मी जंगम होता. यानें केलेले अभंग पुष्कळ आ-

**मम्मट**– कैयटाचा भाऊ. काव्यप्रकाश व शब्दव्यापारविचार असे दोन ग्रंथ याचे आहेत. ( बुल्ह॰ शोध॰)

**मयुखमाला**– शास्त्रदीपिका नामक ग्रंथावर सोमनाथ भट्टानें लिहिलेली टीका.

**मयूर अथवा मयूरक**– हा कवि अवंती देशांत राहणारा जातीचा ब्राह्मण होता. याची जी बहीण ती बाणभट्टाची स्त्री होती असें निबंधमाले वरून दिसून येतें. म्हणून हा बाणभट्टाच्या वेळेस होता, यांत संशय करणें नको. शिवाय–"सक्थाभिरवंतिषु प्रसिद्धान् विबुधान् बाणमयूर दंडिमुख्यान्–" हा श्लोक जो आम्ही दंडी शब्दावर लिहिला आहे त्यावेंही यास प्रमाण आहे. सारांश हा बाणभ-

ह्याचा समकालीन जसा होता तसाच त्याचा अत्यंत मित्रही होता.

एकदां असें झालें कीं, यानें कांहीं नवी कविता रात्रीं केली व ती बाणभट्टास दाखवावी म्हणून, उजाडतें न उजाडतें तों लगबगीनें उठून त्याच्या घराकडे गेला. परंतु त्या रात्रीस बाणभट्टाची स्त्री कांहीं कारणानें रुसल्या मुळें तिची तो समजूत करून करून थकला, तरी तिची समजूत होईना. शेवटीं उजाडत आलें असें पाहून व ती समजूत घेत नाहीं असें जाणून, त्याणें पुढील श्लोकाचे तीन चरण म्हटले ते असेः– "गत प्राया रात्रिः कृशा ननु शशी शीर्यत इव॥ प्रदीपोऽयं निद्रा वश मुप गतो घूर्णित इव॥ प्रणामांतो मानस्त्यजसि न तथापि क्रुध महो॥" इतक्यांत मयूर हाह्याच्या घरांत गेला. व ते त्यानें तीन चरण ऐकिले. त्या बरोबर त्यानें "कुच प्रत्यासत्त्या हृदय मपिते चंडि कठिनं" हा चौथा चरण म्हटला तो ऐकतांच बाणभट्ट बाहेर आला. त्या मुळें त्याच्या स्त्रीचा मनोभंग झाल्यानें तिनें यास 'तुला कुष्टरोग होईल.' असा शाप दिला.

वरील श्लोकांतील भाव असा आहे कीं, हे सूक्ष्मांगी, रात्र संपत आली, चंद्र अस्तास चालला, दिव्याचें तेज मंद होऊन त्याची ज्योत झोंपेनें गुंगलेल्या मनुष्याप्रमाणें हालूं लागली. फार तर काय मी नमस्कार केला असतांही अजून तुझा राग जात नाहीं. "यावरून कठिण स्तनाच्या सहवासानें तुझें कोमल हृदय अत्यंत कठोर झालेंसें दिसतें." हा चौथा चरण मयूराचा खचित अमर्यादपणाचाच होय. कारण, ती बहीण असतां, त्यानें तिच्या स्तनांस उद्देशून असें म्हणणें अगदीं अयोग्य. हें असो. ती बहीण जरी नसती, तरी देखील तें म्हणणें अनुचित झालें असतें. व बाणभट्टासही राग आला असता, तो त्यास आला नाहीं. तेव्हां यावरून वरील नात्याचा संभव असंभून दिसत नाहीं.

पुढें यास बहिणीच्या शापा प्रमाणें कुष्ठ उद्भवला. त्या वरून यानें तिजपाशीं क्षमा मागितली. तेव्हां तिनें यास सूर्याची आराधना करण्यास सांगितली. म्हणून यानें सूर्य शतक द्वारा सूर्याची स्तुति केली. तेणें करून त्या व्याधी पासून हा मुक्त झाला. (नि. मा.)

मराठदेश– महाराष्ट्र देश तोच.

मरीची परिणय– मोहनांगी नामक राजकन्येनें केलेलें काव्य. याचे सर्ग पांच आहेत. व यांत मरीची अप्सरेच्या विवाहाचें वर्णन आहे. (मा.)

मरुदेव– कलियुगांतील सूर्यवंशी राजा. सुप्रतीक राजाचा पुत्र. व सुनक्षत्राचा बाप. (रा.

**मरुदेश**– यास हल्लीं मारवाड ह्मणतात. अजमीर, बिकानेर, इत्यादि शहरें यांत आहेत.

**मलप्रभा**– ही नदी दक्षिण महाराष्ट्र देशांत आहे. ही तोरगल प्रांतांतून वाहात आहे.

**मलबार**– याचें जुनें नांव मलयवर. हा प्रांत पश्चिम समुद्र किनाऱ्यास असल्यामुळें त्यास हल्लीं मलबार किनारा ह्मणतात.

**मलयपर्वत**– हा सह्याद्रि पर्वताचा भाग आहे. येथें चंदन उंच प्रतीचा होतो.

**मलयवर**– मलयपर्वत व त्या संबंधानें नांव पावलेला मलबार देश तो.

**मलयाद्रिनृसिंहचंद्रांश**– हें एक तैलंगी भाषेचें व्याकरण आहे. व तें लिंगराज कवीनें केलेलें आहे.

**मलयानंद**– एक संन्यासी. विद्यातीर्थ स्वामींचे शिष्य.

**मलय्या**– हा कवि जातीचा मूळ तैलंग ब्राह्मण होता. व मादेर नामक एका संभावित गृहस्थाचा मुलगा असे. परंतु विजल राजाच्या वेळीं कल्याण येथें बसवाच्या धर्मप्रकरणीं धादलींत हा लिंगाईत झाला. हा लहानपणींच शास्त्र पढलेला होता. म्हणून जरी यानें धर्मांतर केलें होतें, तरी याचें विद्यांतर न झाल्या कारणानें राजशेखर राजाचें चरित्र लिहिलें. व तें सालू निमण्णा राजाचा पुत्र जो नंदाल अपय्या त्यास नजर केलें. (क॰च॰)

**मलाईभाषा**– द्रविड भाषे पासून उत्पन्न झालेल्या पांच भाषांतील एक. ही मलबारांत लोक बोलतात.

**मलुकदास**– हा एक बैरागी पंथाचा साधु होता.

**मल्लकोट**– हें एक शहर मद्रासेकडे आहे.

**मल्लन**– बोम्मन पोतराजू नामक राजाचा पुत्र. हा राजा जातीचा ब्राह्मण होता. मल्लनानें या जवळच अध्ययन केलें. पुढें विद्वान् झाल्यावर वीररस प्रधान असें रुक्मांगदचरित्र लिहिलें. त्यांत रुक्मांगदाचा व विंध्यावली राजकन्येचा विवाह वर्णिला आहे. हा कवि कधीं होता तें कळत नाहीं. (क॰च॰)

**मल्लारिमहात्म्य**– मोरोपंतानें रचलें आहे.

**मल्ली**– मल्लीनाथ कवि तोच.

**मल्लीनाथ**– हा पेद्दीभट्टाचा वडील भाऊ. कुमारसंभव ह्मणून जो कालिदास कवीचा ग्रंथ आहे त्यावर याची टीका आहे. याच्या विषयींचें वर्णन आह्मी बहुतेक पेद्दीभट्टाच्या नांवावर लिहिलें आहे. शिवाय निबंधमाला अंक ३२ पृष्ठ २५ यांत एक कुरुंदवाडकरांचें पत्र आहे तें पहावें.

**मल्लीनाथी**– हा एक ग्रंथ हजार श्लोकांचा आहे.

**मल्याळ**– मलबारास नांव.

**मल्हारराव होळकर**– पुणे जिल्ह्यांत निरानदीच्या कांठीं होळ नांवाचा एक गांव आहे. तेथील चौगुल्याचा हा मुलगा. व त्याच कारणामुळे यास होळकर असें ह्मणतात. हा जातीचा मराठा धनगर असून खानदेशांत याचा मामा होता, त्याच्या घरीं कांहीं दिवस मेंढ्या राखीत असे. परंतु हा दैवशाली होणार असा याचा प्रारब्ध योग असल्यामुळें, हा तें मेंढ्या राखण्याचें काम सोडून नंदुरबारास गेला. व तेथें सेनापति दाभाड्याचा सरदार कंठाजीराव कदमबांडे होता, त्याजवळ शिपायगिरीची चाकरी पतकरून राहिला. तेथें हा थोडासा चाढला. परंतु थोरल्या बाजीरावाच्या कारकीर्दींत त्यानें यास कदमापासून मागून घेतलें. तेणें करून हा उत्कर्षदशेस चांगलाच आला. कारण हा चतुर व शूर होता.

याची राजधानी इंदुर शहर आहे. व याचें राज्य पाऊणकोटीच्या सुमारांतआहे. यास खंडेराव नांवाचा पुत्र होता. व प्रख्यात जी अहल्या बाई ती याची सून होती. मल्हाररावाचें जन्म शके १६१५ मध्यें झालें होतें. हा शके १६८७ मध्यें मरण पावला, व त्या वेळेस याचें वय ७२ वर्षांचें होतें.(हिंदु० छापी० इति०)

**मसूर**– हा गांव सातार प्रांतांत आहे. समर्थ रामदास स्वामींच्या हातचा स्थापित येथें एक मारुति आहे.

**मस्तानी**– ही एक मुसलमान जातीची स्त्री ऐन उमेदवार व खूपसुरत अशी होती. शालिवाहन १६५० मध्यें थोरल्या बाजीराव पेशव्याशीं निजाम तह करण्यास कबूल झाला असतां, ही त्याच्या जनानखान्यांतून पुरुष वेषानें बाहेर पडली. व एका मोठ्या घोड्यावर बसून व हत्यारें वगैरे जेथल्यीं तेथें ठाम बांधून बाजीरावाच्या लष्करांत आली. तंबूंत गेल्यावर सलाम करून उभी राहिली असतां, बाजीरावानें कोण व कशाकरितां कोणाकडून येणें झालें ह्मणून पुसलें. तेव्हां हिनें हात जोडून उत्तर केलें. त्याचा उतारा थोरल्या बाजीरावाच्या चरित्रांतून घेतला आहे तो येणें प्रमाणें:—

"बंदा निजाम साहेबके नैनानमें हैं· मैं एक पठानका फरजंद हूं मेरा"
"नाम मस्तानखां हैं. हुजूरका इकबाल और तारीफ सुनके आया हूं."
"और उम्मेद हैं के हुजूरके खिदमतमें रहूं."

बाजीराव हें बोलणें ऐकून ह्मणाला कीं,–

"बहोत खूब हैं. अगर तुम हमसे नेकी और इमानसे चलोगे तो तुह्मारी

"अच्छी तरांहसे परवरीश होगी."

पुनः मस्तानी ह्मणाली,–

"हुजूरसे अर्ज हैके. मेरा येः लिबास हाल जो मर्दका देख पडता है तोमैं
"औरतकी जात हूं. मूझे मस्तानी कहते हैं. आपके जवामर्दीकी और,
"खूब सुरतकी तारीफ सुनके मेरा दिल आपके तरफ निहायत मायल
"हुवाहै. कल हुजूरकी सवारी जिआफतके वास्ते निजाम साहेबके ल-
"श्करमें आईथी. उस् वखत मेरी निगः हुजूरके उपर बराबर पहूंची.तो
"अबमैं उमेदवार हूं के हुजूर मेहेरबान होके आपका कौल पुरा करेंगे."

अर्थ:- सेवक निजामाच्या तैनातींतला आहे. मी एका पठाणाचा मुलगा असून म-ला मस्तानखां ह्मणतात. आपली हकीकत व तारीफ ऐकून आलों आहें. तर इच्छाआ-हे कीं, आपल्या सेवेंत राहीन. बाजीराव ह्मणाला फार उत्तम. जर तुह्मी आमच्या-शीं नेकीनें व इमानानें वागाल तर तुमचा सांभाळ इकडून चांगल्या प्रकारेंहोई.

मस्तानी ह्मणाली. हल्लीं जो माझा वेष पुरुषाचा दिसत आहे त्या प्रमाणें मी नसून जातीची स्त्री आहें. मला मस्तानी ह्मणतात. आपल्या सौंदर्याची व-गैरे तारीफ ऐकून माझें मन आपणा विषयीं अत्यंत लुब्ध झालें होतें. तों काल-रोजीं आपली स्वारी निजाम साहेबांकडे मेजवानीस आली. त्या वेळेस मी आप णांस पुरतें पाहिलें. त्या वरून तर सर्व मन आपणांकडे लागून राहिलें. आणि ह्मणूनच आज इकडे आल्यें. यास्तव विनंति इतकीच कीं, हुजरांनीं मेहेरबा-न होऊन दिलेलें वचन पूर्ण करावें. या प्रमाणें ऐकून बाजीरावास कसें करावें या-चा मोठा विचार पडला. परंतु बहुत सरदारांचें अनुमत पडल्या वरून त्यानें ति-चा अंगीकार केला. हिलाच पुढें बाजीरावापासून समशेर बाहाद्दर नांवाचापुत्र झाला.

**महदपूर**– याचें पूर्वींचें नांव कुलिंद.

**महाकालीचरित्र**– गिरिधर कविकृत गुजराथी भाषेंत.

**महाकुलमहातिष्य**– सिंहलद्वीपाचा राजा. कोरांग राजाचा वडील भाऊ. यास होऊन गेल्यास सुमारें आज १९५० वर्षे झालीं आहेत. (ग्यारे० इं० कोश.)

**महागणपतिमत**– साहा गाणपत्यांतील पहिलें. (आनं० शं० वि० प्र० १५).

**महादजीशिंदा**– राणोजी शिंद्याचा दासीपुत्र. हा पानपतच्या लढाईंत लंगडा झाला होता. हा मोठा पराक्रमी व शाहाणा निघाला. हा शके १७१६ मध्यें पुण्या जवळ वानवडी गांवीं मरण पावला. याच्या मागें याचा पुतण्या दौलतराव हा अधिका-

री झाला. हिंदु० इतिहा०).

**महादेव**– नामदेवाचा वडील मुलगा. २– तुकारामाचा वडील मुलगा.

**महादेवभट्ट**– बसवाचा बाप. यास मादिराज असेंही दुसरें नांव होतें.

**महानदी**– ही ओरिसा प्रांतांत आहे. व पूर्वबाहिनी होऊन समुद्रास मिळाली आहे.

**महानंदी**– शिशुनाग वंशांतील शेवटचा राजा. हा नंदीवर्धनाचा पुत्र होता. यासऔरस पुत्रसंतति नव्हती. एक दासीपुत्र मात्र होता. व त्याचें नांव महापद्म होतें. मगध देशांत जे क्षत्रिय राजे राज्य करीत होते त्यांच्या वंशाची येथें समाप्ति होऊन शूद्र राजांस येथून आरंभ झाला. महानंदी मरण पावला व त्याचा दासीपुत्र महापद्म गादीवर बसला. त्या वेळेस युधिष्ठिर शक १४९८ गत झाला होता. व इंद्रप्रस्थ (दिल्ली) येथें युधिष्ठिर वंशीय क्षेमक राजाची कारकीर्द संपून शतानिक राजाची कारकीर्द सुरू झाली होती. तसाच जैन धर्माचा स्थापक जो अर्हत तोही त्यावेळेस विद्यमान होता. (राजभा०)

**महानाग**– महेंद्र राजाचा भाऊ. सिंहलद्वीपांत बौद्धधर्म उत्कर्ष दशेस आणणारीजी अनुला नामक राणी तिचा हा पति होय. (ग्यारे० इं० कोश)

**महापद्म**– शिशुनाग वंशीय शेवटला राजा. महानंदी राजाचा हा दासीपुत्र. नंदराजांतील हा मूळपुरुष. सुमाल्य प्रभृति आठ नंद ते सर्व याचे पुत्र होते. मिळून यासुद्धां नऊ नंदराजे. यानें मगध देशांत राज्य केलें. हा मोठा पराक्रमी होता. (नंदराजे शब्द पहा).

**महाबलीपुर**– बौद्ध लोकांचें क्षेत्र विशेष. हें मद्रासेच्या उत्तरेस १७ कोसांवर आहे. यास सप्तक्षेत्र असेंही नांव आढळतें. (ग्या० इं० को०)

**महाबलेश्वर**– हा डोंगर सत्याद्रीचा भाग आहे. वांई पासून सुमारें दाहा कोसांवर हा आहे. व येथून कृष्णानदी निघाली आहे. नहर अथवा मालकंपेठ ती यापासून सुमारें दोन कोसांवर आहे.

**महाभारत**– हा ग्रंथ संस्कृतामध्यें व्यासांनीं लिहिलेला आहे. (प्रा० ऐ० को०) पहा.

**महाभारततात्पर्यरक्षा**– हा ग्रंथ संस्कृतांत वेदांताचार्यकृत आहे.

**महाभारतभाषांतर**– तिक्कम सोमयाजीकृत तेलंगीभाषेंत. दुसरें काशिदास व कृत्तिवास कविकृत बंगाली भाषेंत.

**महाभारतसारांश**– अथर्वणाचार्यकृत संस्कृत भाषेंत. हा ग्रंथ तीन हजार वर्षा मागला आहे.

**महाभाष्यनवान्हिकी**– पतंजलिकृत व्याकरण विषयावर हा ग्रंथ आहे.

**महाभाष्यप्रदीप—** व्याकरण विषयावर कैयटकृत.

**महाभाष्यव्याख्या—** वाक्यपदीय जो भर्तृहरीकृत ग्रंथ तो.

**महामुद्गलभट्ट—** हकीकत कळली नाहीं.

**महायज्ञा—** पहिल्या बुद्धाचा बाप. हा ब्राह्मण होता.

**महाराष्ट्र—** मराठा देश. पृथिवीवर जे देश आहेत त्यांत हा महा ह्मणजे मोठा व राष्ट्र ह्मणजे देश, ह्मणून यास महाराष्ट्र असें नांव आहे. शक्तिसंगम तंत्रांत छपन्न देश आहेत, त्यांत भारतांत व जैनाच्या ग्रंथांत यास महाराष्ट्र असेंच नांव आढळतें. आमच्या ऐकण्यांत असें आलें आहे कीं, आलीकडे एका उंच कामांच्या विद्वानांनें याचा महार आणि राष्ट्र असा पदच्छेद करून, हें राष्ट्र महारांचें असा अर्थ केला आहे. परंतु तो तसा केलाच असल्यास निर्मूल, अप्रयोजक व व्याकरणरीतीस प्रतिकूळ, म्हणून अशुद्ध आहे असें समजावें.

**महावीर—** जैन लोकांचा २४ वा तीर्थंकर. वर्द्धमान स्वामी असेंही यास दुसरें नांव आहे. याच्या विषयीं आर्यविद्या सुधाकर ग्रंथांत असें वाक्य लिहिलेलें आढळतें.

> ततः काले नात्र खंडे भारते विक्रमात्पुरा ॥ खमुन्यंभोधि विमिते वर्षे वीराह्वयो नरः ॥ प्राचारयज्जैन धर्मं बौद्धधर्म समप्रभम् ॥ १ ॥

अर्थ- विक्रम शका पूर्वी ४७० वर्षें यानें जैन धर्म खंडित झालेला प्रचारांत आणिला. एका जैन ग्रंथा वरून असें कळतें कीं, हा विक्रम शका पूर्वी ३९८ वर्षें जन्मला होता. व ४७० वर्षें मरण पावला होता. अर्थात् हा मरण पावला तेव्हां याचें वय ७२ वर्षांचें होतें.

**महावीरचरित—** भवभूति कवीनें संस्कृतांत रचलेलें सप्तांकी नाटक. यांत रामकथा व त्याचा पराक्रम वर्णिला आहे.

**महाक्षपणक—** अनेकार्थध्वनिमंजरीचा कर्त्ता. (बुल्ह० शोध०)

**महिपतराव—** हा एक गृहस्थ व कवि सातारचा राहणारा जातीचा ब्राह्मण होता. सातान्याच्या राजाच्या पदरीं हा पागेकडे कारकून असे. परंतु कोणत्या राजाचे कारकीर्दीत तें कळत नाहीं. यानें विठ्ठलवर्णनपर शंभर आर्या लिहिल्या असल्याचें लोक सांगतात. (ह्न० मा०). [ष कळलें नाहीं.

**महीधर अथवा महीधरभट्ट—** देवदत्त नामक एका विद्वान् ब्राह्मणाचा पुत्र. विशे-

**महीपतिबावा—** अहमदनगर जिल्ह्यांत राहुरी तालुक्या मध्यें ताहराबाद ह्मणून गांव आहे तेथें याचें जन्म झालें. हा जातीचा आश्वलायन देशस्थ ब्राह्मण हो-

ता. याच्या बापाचें नांव दादोपंत व आईचें नांव गंगाबाई होतें. दादोपंत वासिष्ठ गोत्री ब्राह्मण होते. याचें जन्म शालिवाहन शके १६३७ मध्यें होऊन शके १७१२त हा मरण पावला. असें सांगतात कीं, यास पांडुरंगाचा साक्षात्कार होता. आणि त्यावरून यास कवित्वाची स्फूर्ति होऊन यानें कित्येक ग्रंथ लिहिले. ते भक्तविजय, भक्तलीलामृत, संतविजय, संतलीलामृत, कथासारामृत, पांडुरंगस्तोत्र, शनिमाहात्म्य, कृष्णलीलामृत, तुकाराम चरित्र इत्यादि लहान मोठे आहेत. हा मरण पावला त्या वेळेस याचें वय ७५ वर्षांचें होतें. (क० च०) व (नवनीत). (हिं०न०)

महीषीनदी– माहिष्मती हल्लीं (निजाम हैदराबाद) यास लगत ही नदी आहे. (प्रा०

महेंद्र–सिंहलद्वीपाचा राजा व महानागाचा वडील भाऊ. हा अशोक राजाच्या वेळेस होता. (प्यारे० इं० को०)

महेशाक– सदाचार चंद्रोदय नामक संस्कृत ग्रंथाचा कर्त्ता. (बुल्ह० शो०)

महेश्वरभट्ट– हा सारस्वत ज्ञातीचा ब्राह्मण गोमंतक येथें रहात असे. याच्या बापाचें नांव रामचंद्र असें होतें. व तो सुकथंकर अशा उपनांवानें मोडे. याचें जन्म शके १६४० मध्यें झालें होतें. यानें अध्ययन त्याच प्रांतीं संपादिलें. न्याय व धर्मशास्त्र या दोहोंत यास चांगली गति होती. व हा प्रामाणिक असल्यामुळें लोकांत याची मान्यता चांगली असे. विश्वकोश, द्विरूपकोश, अमरविवेक आणि सौंदर्यबोधिनी हे चार ग्रंथ याचे आहेत. शिवाय एका ज्योतिष ग्रंथावर याची टीका आहे. यानें पुष्कळ विद्यार्थी तयार केले. व हा आपल्या वयाच्या ९८ व्या वर्षीं म्हणजे शके १७३८ मध्यें मरण पावला. (क० च०)

महेश्वरोपाध्याय– धर्माब्धिनामक ग्रंथाचा कर्त्ता. हा पंढरपूरच्या काशीनाथोपाध्यायांच्या आधींचा ग्रंथकार आहे.

मागधराजे– जरासंध राजाचा पुत्र सहदेव. तो भारती युद्धांत मरण पावला असतां त्याच्या मागें त्यास तीन पुत्र होते. एक सोमापि, दुसरा मार्जारि आणि तिसरा मेघसंधि. या तिघांत मार्जारीचा वंश मगध देशांत राज्य करीत होता. ते राजे येणेंप्रमाणें:– १ मार्जारि. २ श्रुतश्रवा. ३ अयुतायु. ४ निरमित्र. ५ सुनक्षत्र. ६ बृहत्सेन ७ कर्मजित्. ८ सृतंजय. ९ विप्र. १० शुचि. ११ क्षेम. १२ सुव्रत १३ धर्मसूत्र. १४ शम १५ द्युमत्सेन. १६ सुमति. १७ सुबल. १८ सुनीथ. १९ सत्यजित्. २० विश्वजित् २१ पुरंजय. कोणी यास रिपुंजय असेंही ह्मणतात. या एकवीस राजांनीं एकंदर राज्य हजार वर्षें केलें. हीं वर्षें युधिष्ठिर शकाचीं समजावीत. पुढें शुनक नांवाचे

प्रधानानें पुरंजयास मारून आपल्या प्रद्योत पुत्रास गादीवर बसविलें. वगैरे वृत्त प्र-
सिद्ध आहेच. (राजमालिका). [तात.

**मागधी भाषा–** बौद्ध व जैन यांचीं धर्मपुस्तकें ज्या पाली भाषेंत असतात तिला म्हण-

**माघकवि–** हा जातीचा ब्राह्मण व भोजराजाचा आश्रित नसतां त्याच्या वेळेस मात्र हो-
ता. माघ नांवाचें काव्य तें यानेंच केलेलें आहे. हा श्रीमालपुरांत राहात असे. व-
घरचा इतका संपन्न होता कीं, याचें ऐश्वर्य राजांच्या तोडीचें होतें. हा स्वतःच वि-
द्वान् कवींस मोठमोठाल्या देणग्या देई. उपमे विषयीं कालिदास, अर्थगौरवावि-
षयीं भारवी, व पदलालित्य विषयीं दंडी, असे एकेक गुणांत एकेक प्रख्यात हो-
ते. आणि याच्या मध्यें तर ते तिन्ही गुण होते. म्हणून हा मोठा जाडा कवि होता,
असें उघड दिसतें. हीच गोष्ट एका कवीनें पुढील श्लोकांत सांगितली आहे:-

" उपमा कालिदासस्य भारवेरर्थगौरवम्
दंडिनः पदलालित्यं माघे संति त्रयो गुणाः १ "

भोजराजानें यास एकदां धारेस बोलावून नेऊन मोठी मेजवानी दिली. व
याचा उत्कृष्ट सत्कार केला. पुढें यानेंही भोजास आपल्या गांवीं नेलें होतें. त्या-
वेळेस त्यानें आपणा बरोबर जे हजार बाराशें लोक नेले होते, त्यांस उतरण्या-
स यानें आपली एक अश्वशाळा मात्र दिली होती. या वरून ती केवढी मोठी
होती, आणि त्या मानानें याचें ऐश्वर्य केवढें होतें, त्याचें सहज अनुमान होतें.
राजास तर यानें खुद्द आपल्याच वाड्यांत जागा दिली होती. व तींत अनेक प्र-
कारचीं फळझाडें, फुलझाडें व जाड कांचानीं मढविलेल्या सर्वत्र जाण्या येण्याच्या
वाटा वगैरे पाहून राजा चकित होऊन गेला. भोजनाचा थाट तर इतका सर्वोत्कृ-
ष्ट होता कीं, सर्व ऋतूंतील फळें व इतर पदार्थ त्यांत होते.

माघ कवि असा श्रीमान् असतांही त्यास पुढें दारिद्र्य यावें असा त्याचा
योग होता. त्या प्रमाणें अचाट दातृत्वामुळें व नवें उत्पन्न होण्याचें नसल्या मुळें,
त्यास इतकी वाईट अवस्था येऊन पोहोंचली कीं, तो अन्नासही महाग झाला.
शेवटीं त्याच्या बायकोनें त्याची युक्तिप्रयुक्तीनें बळेंच मोट बांधिली व त्यास धा-
रेस नेलें. व यानें केलेलें माघ काव्य राजास नेऊन स्वतःच दाखविलें. तें पाहून
राजा इतका संतुष्ट झाला कीं, त्यानें याचा मोठा आदर करून यास पुष्कळ
द्रव्य दिलें. व मार्गस्थ केलें. (कविचरित्र.)

माघकाव्य– माघ कवीनें केलेलें काव्य. (व्यशे०)

मांडुण– हा एक कवि जातीचा गुजराथी होता. याचीं त्या भाषेंत पदें आहेत. (का-

माणिकप्रभु– शालिवाहनाच्या अठराव्या शतकांत जे कित्येक सत्पुरुष होऊन गेले त्यांतील हा एक होता. हा जातीचा महाराष्ट्र देशस्थ आश्वलायन ब्राह्मण होता. यास गायन कलेचें ज्ञान होतें. मराठी भाषा तर येतच होती. शिवाय कानडी-हिंदुस्थानी व फारसी या तीन भाषा चांगल्या येत होत्या इतकेंच नव्हे, तर त्या प्रत्येकींत याचीं शेंकडों पदें वगैरे रूपानें कविताही आहे. हा शांकर दर्शनानुसारी व साक्षात्कारी भगवद्भक्त असून असा दैवशाली होता कीं, पालखी, चोपदार, चौघडा इत्यादि ऐश्वर्य यास होतें.

यास जरी इतकें ऐश्वर्य होतें व घरीं अन्नसत्र होतें तरी हा स्वतः ब्रह्मचारी होता. व शिष्यांच्या हातून आणविलेल्या माधुकरीच्या अन्नाशिवाय दुसरें अन्न खात नसे. बेदराच्या दक्षिणेस सुमारें १५ कोसांवर हुमनाबाद नांवाचें एक शहर आहे. त्या पासून एका कोसावर एक भव्य टेंकडी आहे तेथें हा राहात असे. साधुत्वाचे जे अनेक गुण आहेत, त्यांत स्त्रियांशीं एकांत न करणें हा तर गुण याच्या अंगीं मोठा अमोल होता. प्रख्यात जे हंसराज स्वामी आमचे गुरु, त्यांचा यांचा परम ऋणानुबंध असल्या मुळें यांचा आमचाही दाट परिचय होता. हा पुरुष शके १७८७ मध्यें आपल्या वयाच्या ४२ व्या वर्षीं समाधिस्थ झाला. व हल्लीं याच्या गादीवर याचा पुतण्या विद्यमान आहे. (स्वतःची माहिती.)

माणिकभट्ट– मोरेश्वर भट्ट वैद्याचा बाप.

माणिक्यदेव– दिल्लीचा राजा. अलंकार शेखर व उणादि सूत्र वृत्ति दशपदि हे दोन ग्रंथ यानें केले. (बु० शो०)

माणिक्य व्यासर– हा कवि जातीचा द्रविड ब्राह्मण होता. याचें जन्म चिदंबर येथें झालें होतें. अध्ययन पूर्ण होऊन यानें शाळा सोडल्यावर, चिदंबर देवाच्या स्तुतिपर पुष्कळ कविता करून ती एका ग्रंथांत गुंफिली व त्याचें नांव चिदंबर कोरुअसें ठेविलें. याच्या ग्रंथाची मान्यता चांगली झाली. व हा पुष्कळ वृद्ध होऊन मरण पावला असें सांगतात. (कविच०).

मादिराज– बसवाचा बाप जो महादेवभट्ट त्यासच हें दुसरें नांव होतें.

मादेर– मलय्या म्हणून जो तैलंग कवि होऊन गेला त्याचा बाप.

माधव– हा एक पांचरात्र नांवाच्या आगम मताचा अनुसारी होता. भगवत्पूज्य

पाद श्रीमच्छंकराचार्य दिग्विजय करीत फिरत असतां,त्यांस सहा प्रकारचे वैष्णव अनंत शयनाकडे आढळले. ते येणें प्रमाणें:– " भक्ता भागवताश्चैव वैष्णवाः पांच रात्रिणः ॥ वैखानसाः कर्महीनाः षड्विधा वैष्णवा मताः १॥" म्हणजे भक्त,भागवत, वैष्णव,पांचरात्र, वैखानस आणि कर्महीन असे सहा होते. यांत सहा पैकीं आचार्यांनीं तिघांस वादांत जिंकून ते शरण झाले असतां त्यांस आपले शिष्य केल्यावर,पांचरात्र मताचा हा वैष्णव आचार्यांकडे आला. त्या वेळेस जीं उभयतांचीं संभाषणें झालीं त्यां विषयीं आनंदगिरीनें आपल्या शंकरविजयांतील आठव्या प्रकरणांत लिहिलें आहे तें असें:–

"एवं परिहृते वैष्णवमते पुनरन्यः पांचरात्रागम दीक्षितो माधवः प्रत्यव
"तिष्ठते। सतु श्रीशंकराचार्य मिदमाह। स्वामिन्। भवानागत्य भक्तभा-
"गवत वैष्णवमत निरसनं कृत्वा वर्तसे। ते वैष्णवाः किमु। जाति मात्रोप
"जीविनः पुंड्रादि धारण मात्रेण तद्दीक्षा। तन्मतं भवता निरस्तमेव इदा-
"नी मशेष विष्णु विदीक्षा कारणं पांच रात्रं परम वैष्णवमत महमवलंब्य
"चिरादनंत देव पाद कमलाराधनं कुर्वन् भगवत्प्रियो ऽभवं। पांचरात्राग-
"मस्य निंदां कर्तुं असमर्थ एव ईश्वरो ऽपि। अतः भगवदर्चा मूर्ति प्रतिष्ठादि-
"कमपि तदनुष्ठान मूलकत्वात्कर्तव्यं। तस्माद्ब्राह्मणैः सर्वैरपि पांचरात्रागमा
"चार एव कार्य इति प्राप्ते।

"आचार्यैरिदमुच्यते। भोवैष्णव,समीचीन मुक्तं भवता। विचार्यमाणे वेद
"विरुद्धत्व मागमे ऽस्तिचेत् तदुक्ताचारः परित्याज्यो भवति। यदि विरुद्ध स्त-
"दा सएवाचारः परित्याज्यो भवति। प्रथमं विष्णु संबंधो वैष्णवः विष्ण्वेक दे-
"वता निरत इत्यर्थः। तादृग्विधस्य वैष्णवस्य विष्णुमंत्र शतोपदेशेनापि नब्रा-
"म्हण्य भावस्स्यात्। किंतु गायत्र्युपदेशेनैव ब्राह्मण्यसिद्धिर्भवतीति। अतो मं-
"त्रांतरं परिग्रहस्य दुर्निवार्यत्वात् ब्राह्मण्यानुग्रहाय गायत्र्यंगीकार कर्तव्यआ-
"सीत्। तदभावे पतित एवस्यात्। तस्मान्मंत्रांतर सद्भावात् वैष्णत्व हानिःस्यात्
"किंचैव मेव रविरग्निश्च सेवनीयः तयोरपि ब्राह्मणकर्माधारत्वात्। तस्मादप-
"रिहार्येषु देवतांतरेषु सद्भावात् तत्परित्यागे ब्राह्मण्य विच्छिति दर्शनात् वै-
"ष्णवमतं अनृततरं इत्युक्ते स त्वब्रवीत्। भवदुक्तमसमंजसं। कथं गाय-
"त्र्या अपिविष्णु शक्तित्वात् तदपि कथं शंखचक्र धारणस्य विद्यमानत्वात् य
"त्र यत्र विष्णुचिन्ह धारणत्वं युज्यते तत्र तत्र तद्रूपत्वं प्राप्यते॥ ७॥ ७॥

"तर्हि रुद्रशक्तिरेवेति वक्तव्या। कथं पंचवदनेंदुशेखरत्वाद्युपमानाद्रुद्रस्य
"प्राणादि मुख सद्भावो यथा तथा गायत्र्या अपि चंद्रमुकुटत्वं रुद्रस्या साधा-
"रणो धर्मः तद्रूदस्यास्त्वेत्यतः गायत्री रुद्रशक्तिरेवे त्यविरुद्धं। किंच शरी-
"रापेक्षया आयुधानां भिन्नत्वात् पंचवक्त्र सद्भावात् रुद्रशक्ति रस्तिवान-
"वेति संदेह लेशा भावात् परमेश्वर्येव गायत्रीति निरवद्यं।

"स्वामिन्। गायत्री शब्दार्थस्तु न परमेश्वरीं रुद्रशक्तिं वक्ति। किंतु
"सवितुर्देवस्य वरेण्यं श्रेष्ठं भर्गः तेजः धीमही त्यादिना सूर्यतेज प्राधान्या-
"त् तन्मंडलालयस्य नारायणस्ये रेव शक्तिरिति रोचते तस्या बहुरूप सद्भा-
"वात् पंचमुखादिक मविरुद्धं।

"ननु अष्टमूर्तेः परमेश्वरस्यैव शक्तिरीदृशी। कथं।सूर्यस्य तन्मूर्तित्वा-
"त्। अतो रुद्रमूर्ति प्रतिपादिता गायत्री विष्णुशक्तिरिति वक्तुं नार्हसि।गाय-
"त्री हृदये गायत्र्युत्पत्ति प्रकारोऽपि नितरां प्रतिपादित स्तद्द्वारा प्रणवात्
"व्याहृत्युत्पत्तिः व्याहृतीभ्यः गायत्र्युत्पत्तिः गायत्र्याः सावित्रिः सावित्र्याः स-
"रस्वतिः सरस्वत्या वेदोत्पत्तिः वेदेभ्यः ब्रह्मोत्पत्तिः ब्रह्मणो लोकोत्पत्तिः ए-
"वं स्थिते प्रकृतिकार्ये किंचित्वं। एतत्सर्वस्यापि प्रणवजन्यत्वं सिद्धं भव-
"ति। प्रणवं प्रथमं परमेश्वरा दजायतेति— यो वेदादौ स्वरः प्रोक्तो वेदां-
"ते च प्रतिष्ठितः॥ तस्य प्रकृति लीनस्य यः परः स महेश्वर इति— नाराय-
"णोपनिषद्वचनात्। महेश्वरस्य जगत्कारणत्वाच्च जगदुत्पत्ति हेतवे त-
"स्मादेव गायत्री जाता। स्वमाया प्रविष्टस्य तस्य पंचवक्त्र चंद्रमुकुट विशे-
"षणस्य शक्तिरेव गायत्रीति समाधानं।

"यस्य परमात्मनः आदित्यः शरीरं भवति। अष्टमूर्त्यंतः पातित्वेनादि-
त्यः शिवस्य शरीरमेव। एवंचादित्य शरीरस्य ईशानस्य तेजोरूपा गाय-
त्री तस्याः पंचवक्त्र चंद्रचूडत्वा दुपपन्नं। अतः चक्रस्यायुध विशेषत्वात् रु-
द्रस्याप्युपपन्नमेव। तस्माद्देवतांतरत्वात् वैष्णवेन नैव गायत्र्युपासनीया
तथैवाग्नि रपि परित्याज्यः तस्य रुद्रत्वात् अष्टमूर्त्यंतः पातित्वात्। तस्मा-
द्गायत्र्याग्नि उपासनं कर्तुं नार्हसित्वं। एवं ब्राह्मण्य निवृत्तावपिजातायां
वैष्णवोऽस्मि यद्युच्यते तर्हि भारद्वस्या ति विचित्रत्वात् को भवान्। नास्मा-
कं तदुपयोगः जातिभ्रंशस्या मर्यादकत्वात् नित्य नैमित्तिक कर्म परित्या-
गे श्रुतिस्मृत्युक्त कर्मच्छेदिनां ज्ञानकर्म मार्गद्वय भ्रष्टानां मतं किमस्तीति।

"एवं वैष्णव मतस्य दौर्बल्ये प्राप्ते माधवाख्यो वैष्णव इदमाह। स्वामिन् पांचरा-
"त्रागमे तप्त शंखचक्रे द्विभुजे धार्ये तेन परमं लोकं यातीति फलं प्रतिपादितं त-
"स्माद्वैष्णव मत मवश्य मंगीकर्त्तव्यं इत्यत्रोच्यते। आगमोक्त तप्त शंखचक्र धा-
"रण मयुक्तं। वेदविरुद्धत्वात्। ब्रह्मा दुत्पत्तेः पूर्व भाविनो वेदस्य विरुद्धत्वे प्रोच्य-
"माने महानेव दोषः प्रसज्येत्। आगमेतिहास पुराणोक्ताचारस्तु वेदानुकूल
"त्वात्या ग्राह्यः अग्राह्य एव प्रतिकूलः। उक्तंच– अतींद्रियार्थ विज्ञाने प्रमाणं
"श्रुतिरेवहि॥श्रुत्युक्ताचारतो ग्राह्या ह्यागमानां प्रसज्यता– १ श्रेयान् स्व-
"धर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्॥ इत्युक्तेः यथोक्त कर्माचरण मेव तपः
"तेन तपसा यो ब्राह्मण स्तस्य तनुर्भवति स तप्त तनुः। एतादृशस्य अतप्त त-
"नोः पुरुषस्य भगवतो धाम विना विद्यतः न अश्नुते। उक्त तपसः मनो नै-
"र्मल्यं ततः ज्ञानाधिकारः तेन मोक्ष इति सिद्धांतः।

"अनेन प्रकारेण बोधितो माधवः त्यक्तचिन्ह परिवर्जित मागमाचारः
"सन्मार्गगामी स्वकुल ग्राम देशवासिभिः सह शूद्राद्वैत वृत्तिं प्राप्य स्ना-
"न संध्याग्निहोत्र स्वाध्याय वैश्वदेवा तिथि परायणः सर्व जगद्रूपेणावगतं ब्र-
"ह्मेति ध्यात्वा तथैवाह मस्मीति मुक्तोऽभवत्॥

अर्थ– या प्रमाणें भक्त, भागवत आणि वैष्णव यांचा निरास केला असतां पांचरात्र मताचा कोणी माधवनामक वैष्णव आचार्यांसि या प्रमाणें बोलता झाला. स्वामी आपण येथें येऊन ज्या तिघांस जिंकिलेंत ते वैष्णव केवळ जातिमात्र, ऊर्ध्वपुंड्र धारण करणें हीच त्यांची दीक्षा. तर आतां सर्व विष्णुदीक्षेस कारण जें परम मत त्याचा मी स्वीकार करून अनंत जो भगवान् त्याच्या आराधनानें तत्प्रिय झालेला त्याची निंदा करण्यास ईश्वरही असमर्थ आहे. यास्तव सांगतों कीं, सर्व ब्राह्मणांनीं पांचरात्रागम मताप्रमाणेंच चालावें.

आचार्य ह्मणाले योग्य बोललास. विचारा अंतीं जर वेदास अविरुद्ध आगम असेल तर त्यांतील आचार ग्राह्य होईल. विरुद्ध असल्यास होणार नाहीं. आतां असें पहा कीं, विष्णु देवता निरत जो पुरुष तो वैष्णव होय. अशा वैष्णवास शंभर विष्णु मंत्रानींही ब्राह्मणत्व येणार नाहीं. तर एक गायत्री उपदेशानेंच ब्राह्मणत्व येणार आहे. त्या वांचून तो पतित होईल. तस्मात् विष्णुमंत्रा शिवाय जर ब्राह्मण्य सिद्धी साठीं गायत्रीरूप मंत्रांतर वैष्णवास आहे. तर वैष्णवत्वाची हानि उघड आहे. दुसरें असें कीं, ब्राह्मण

कर्मास आधारभूत अशा मुख्य देवता सूर्य आणि अग्नि त्या होत. त्यांचेंही उपासन ब्राह्मणास अवश्य आहे. तसें तुह्मांस करणें ह्मटलें ह्मणजे देवतांतरत्व होतें. बरें न करावें तर ब्राह्मण्य हानि. या कारणास्तव विष्णुमंत्रा वांचून गायत्रीरूप मंत्रांतर आणि विष्णुदेवते शिवाय सूर्य अग्निरूप देवतांतर जर संभवतें, तर वैष्णवमतअगदीं अवृत तरच होय. या प्रमाणें आचार्य बोलले असतां, माधव त्यांस ह्मणाला, अहो हें तुमचें भाषण असमंजसपणाचें आहे. कसें ह्मणाल तर, शंखचक्रादिक आयुधें गायत्रीस आहेत. ह्मणून ती विष्णुशक्तीच आहे. तेव्हां देवतांतरत्व कसें संभवतें? आचार्य ह्मणाले. अरे, शंख चक्रादिक धारणत्वा मुळें जर तूं गायत्रीस विष्णुशक्ति ह्मणतोस, तर पंचवदनत्व आणि चंद्रशेखरत्व तीस असतां तिला रुद्रशक्तीही ह्मणावें. यास्तव रुद्रशक्ति जी गायत्री, ती परमेश्वरीच असेंच म्हणणें निर्दोष होय.

माधव ह्मणाला. गायत्री शब्दाचा अर्थ परमेश्वरी असा मुळींच नाहीं. तर सविता जो देव त्याचें वरेण्य ह्मणजे श्रेष्ठ असें जें भर्ग ह्मणजे तेज त्याचें ध्यान करणें. म्हणून सूर्यमंडलस्थ जो नारायण त्याच्या तेजाचें ध्यान तीच गायत्री. अर्थात् गायत्री नारायणाची शक्ति असल्या मुळें व तिला बहुरूपत्व असल्या मुळें, पंचवदनत्वादिकत्व तिच्या ठायीं अविरुद्ध आहे.

आचार्य ह्मणाले असें नव्हे. अष्टमूर्ति जो परमेश्वर त्याचीच शक्ति गायत्री होय. कशी ह्मणशील तर सूर्य हा परमेश्वराच्या अष्टमूर्तींतील आहे. ह्मणून त्या सूर्याची शक्ति ती रुद्रशक्तीच असल्या मुळें तिला विष्णुशक्ति ह्मणणें तुला योग्य नाहीं. या विषयीं गायत्री हृदयांत गायत्रीची उत्पत्ति प्रतिपादिली आहे ती अशी:- प्रणवा पासून व्याहृति, व्याहृती पासून गायत्री, गायत्री पासून सावित्री, सावित्री पासून सरस्वती, सरस्वती पासून वेद, वेदा पासून ब्रह्मा आणि ब्रह्मदेवापासून सर्व लोक; तात्पर्य प्रणवा पासून सर्वांची उत्पत्ति. व तो प्रणव परमेश्वरापासून झाला. यास नारायणोपनिषदांतील वचन प्रमाण आहे. म्हणून जगत्कारणत्व परमेश्वरास मात्र आहे. त्या परमेश्वराचीच शक्ति गायत्री असल्या मुळें, तिला पंचवदनादिकत्व युक्तच आहे. तेव्हां देवतांतरत्वा स्तव वैष्णवानें गायत्रीची उपासना करूं नये. तशीच अग्नीचीही करूं नये. कारण अग्नि हाही परमेश्वराचे अष्टमूर्तींतीलच एक आहे. या प्रमाणें ब्राह्मण्याची निवृत्ति झाली असतां, मी वैष्णव असें जेव्हां तूं म्हणतोस तेव्हां तुझें प्रारब्धच विचित्र ह्मटलें पाहिजे.

व असा जो वेदबाह्य तूं त्या तुझा आह्माला तरी काय उपयोग? नित्य नैमित्तिक कर्मत्याग झाला असतां, श्रुति स्मृति कर्मोच्छेदक, व ज्ञान आणि कर्म असा उभय मार्गभ्रष्ट, त्या तुझें मन तें तरी काय? तस्मात् व्यर्थ.

या प्रमाणें पांचरात्र वैष्णव मतास दुर्बलत्व प्राप्त झालें असतां, माधवारव्य वैष्णव ह्मणाला. अहो पण शंखचक्रांच्या तप्त मुद्रा भुजद्वयांवर धारण करणारास परम लोकाची प्राप्ती सांगितली असतां, वैष्णव मत अवश्य अंगीकारावें असें होतें. आचार्य ह्मणाले. आगमोक्त तप्त शंखचक्र धारण वेद विरुद्ध असल्या मुळें अयुक्त आहे. ब्रह्मदेवाच्याही उत्पत्ती पूर्वींचा जो वेद त्याशीं विरुद्ध भाषण केलें असतां महा दोष. आगम, इतिहास व पुराणोक्त आचार, वेदास अनुकूल तेच ग्राह्य व विरुद्ध ते त्याज्य होत. म्हणून यथोक्त जें कर्माचरण तेंच ब्राह्मणाचें तप. त्या तपें करून जो तप्त तनु तोच तप्त तनु. एतद्विरुद्ध तो अतप्त तनु त्यास मोक्ष नाहीं. सारांश यथोक्त कर्माचरणानें चित्तशुद्धि, तिजपासून ज्ञानाचा अधिकार, व ज्ञानापासून मोक्ष असा सिद्धांत होय.

या प्रमाणें माधवास आचार्यांनीं बोध केला. तेणें करून तो उमजून आगमोक्त आचाराचा त्याग करीत होत्साता सन्मार्गवर्ती होऊन, आपलें कुल, ग्राम आणि देशवासी यांसहित शुद्धाद्वैत दृष्टि पावून, स्नानसंध्या, अग्निहोत्र स्वाध्याय, वैश्वदेव आणि अतिथिपूजा परायण होत्साता जगद्रूपें करून सर्व ब्रह्म असें ध्यान करीत तेंच ब्रह्म आपण अशा प्रतीतिपूर्वक मुक्त होता झाला. (आनं० शं० प्र० ८). २- मितभाषिणी ग्रंथाचा कर्त्ता. (बु० शोध०)

माधवग्रंथ- अनंतफंदीकृत ओंवीबद्ध श्रीमंत सवाई माधवराव यांचें चरित्र.

माधवदास- नरमाधवदास तोच. २- वासिष्ठ ग्रंथाचा टीकाकार.

माधवनिदान- सायण माधवाचार्यकृत वैद्यशास्त्र विषयक ग्रंथ. याची श्लोकसंख्या पंधराशें आहे. व याजवर नरसिंह आणि विजयरक्षित यांच्या निरनिराळ्या दोन टीका आहेत.

माधवराय- हा कवि जातीचा वेलमवारु तैलंग ब्राह्मण होता. अनागोंदीच्या राजाजवळ हा मंत्रि असे. हा जरी राजकार्यांत निमग्न असे तरी फावल्या वेळांत कविता करी. चंद्रिका परिणय नाटक तें याचेंच आहे. याचा काल समजत नाहीं. (क०)

माधवरावबल्लाळ- यास थोरले माधवराव हें प्रसिद्ध नांव आहे. बाळाजी बाजीराव

(नानासाहेब) पेशवे त्यांच्या तिघां मुलांतील हा मधला होता. याचें जन्म शके १६६३ मध्यें झालें. व यास याच्या वयाच्या सत्राव्या वर्षी शके १६८३ त पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं. पेशव्यांच्या घराण्यांत हा अल्पवयस्क पुरुष फारच उत्कृष्ट होऊन गेला. याची बायको रमाबाई तीही अशीच उत्तम होती. याच्या कारकीर्दीत रामशास्त्री हे न्यायाधीश होते. सोनपत पानपतची लढाई होऊन याचा बाप मरण पावल्यावर हाच गादीवर बसला. म्हणून जिकडे तिकडे नीट व्यवस्था झाली. हा आपल्या वयाच्या २८ व्या वर्षीं ह्मणजे शके १६९४ मध्यें क्षयरोगानें थेऊर येथें मरण पावला. व याची बायको सती गेली. हें या उभयतांचें मरण सर्व महाराष्ट्र देशांत मोठें दुःखास कारण झालें. यास संतति नसल्या मुळें याच्या मागें याचा धाकटा भाऊ नारायणराव तो पेशवा झाला. ( हिंदुस्थान० छा० व हस्तलि० इति०).

माधववृत्ति- कोणी यास माधवीय वृत्ति ह्मणतात. हा ग्रंथ सायण माधवाचार्यकृत व्याकरण विषयावर आहे. व याची संख्या पंचवीस हजार आहे.

माधवशिंगवंश- शूरसेन वंशांतील शेवटचा राजा दामोदर सेन, इंद्रप्रस्थ (दिल्ली) येथें राज्य करीत असतां, उत्तरे कडून आलेल्या त्या माधवशिंगानें शालिवाहन शकाच्या सुमारें १०३ या वर्षी त्यास मारून आपण राज्यावर बसला. यानें व याचे पुढील पांच पुरुषांनीं मिळून राज्य केलें तीं वर्षें येणें प्रमाणें:—

| नांव. | वर्षें | म० | दि० | नांव. | वर्षें | म० | दि० |
|---|---|---|---|---|---|---|---|
| खुद्द माधवशिंग ... ... | १७ | १० | ६ | शेरशिंग ... ... ... | १० | ८ | ११ |
| दिचशिंग ... ... | १४ | ५ | ० | हरशिंग ... ... ... | २५ | ० | १५ |
| राजशिंग ... ... | १२ | ३ | २४ | नरहरशिंग ... ... ... | ८ | ० | ४ |

एकूण वर्षें ८८ महिने ४ याच्या वंशाची राज्यकारकीर्द होती. ( हिंदु० हस्त० इति०)

माधवसरस्वती- गंगाधर सरस्वतीच्या सात शिष्यांतील एक. २- तत्त्वानुसंधान ग्रंथाचा कर्ता. ( बुल्हरचा शोध.)

माधवाचार्य- यास सायण माधव आणि विद्यारण्य अशीं दोन नांवें प्रसिद्ध आहेत. तुंगभद्रा नदीच्या कांठीं पंपानामक क्षेत्रांतील हा राहणारा होता. शालिवाहनाच्या १३ व्या शतकाच्या उत्तरार्द्धांत ह्मणजे मध्वाचार्यांच्या मागून व वल्लभाचार्यांच्या पूर्वी याचें जन्म झालें होतें. लोकवार्तेनें याचा वृत्तांत ऐकण्यांत येतो तो असा- हा चाळीस वर्षांचें वय होई पर्यंत अगदीं दरिद्री होता. त्या मुळें व यास मुलें

पुष्कळ असल्या मुळें, निर्वाहा करितां भिक्षा मागणें पडे. एकदां असें सांगतात कीं, हा आपल्या गांवांतील विरूपाक्षेश्वर देवाच्या दर्शनास गेला असतां, तेथें कोणी सिद्ध पुरुषानें यास एक स्तोत्र दिलें. व त्याचा पाठ करण्यास सांगून आशीर्वाद दिला कीं, याच्या प्रभावानें तुला द्रव्य व प्रतिष्ठा हीं दोन्ही प्राप्त होतील.

नंतर यानें त्या स्तोत्राचा पाठ केला. व गायत्री पुरश्चरणही केलें. परंतु द्रव्य ह्मणून यास मिळेना. शेवटीं यानें त्रासून सन्यास घेतला. तों देवता यास प्रत्यक्ष होऊन काय इच्छा असेल तें माग. असें म्हणूं लागली. यानें उत्तर केलें आतां मला कशाचीच गरज नाहीं. तथापि देवतेनें प्रसन्नता पूर्वक तूं सर्व विद्या पारंगत होशील असा वर देऊन यास विद्यारण्य हें नांव दिलें. आणि विजया नगरावर सोन्याच्या होनांचा पाऊस पाडला. त्या योगानें राजा व प्रजा, सर्व श्रीमान् झाल्यानें याचा लौकिक वाढला. सदरीं लिहिलेले सोन्याचे होन अझून कर्नाटकांत कोणा कोणा जवळ आहेत.

पुढें देवता प्रसाद झाल्या प्रमाणें यानें ग्रंथ लिहिले ते येणें प्रमाणें:— माधवनिदान वैद्यशास्त्र विषयावर, कालमाधव धर्मशास्त्र विषयावर, ब्रह्मगीता, शतप्रश्न कल्प लतिका, माधववृत्ति व्याकरण विषयावर, न्यायमाला जैमिनी सूत्रांवर, पाराशर माधवीय पाराशर सूत्रांवर, पंचदशी वेदांत प्रकरणावर या शिवाय वेदभाष्य व सर्वदर्शन संग्रह. यांत पाराशर माधवीय ग्रंथांत यानें आपलें वृत्त येणेंप्रमाणें लिहिलें आहे:—

श्रीमती जननी यस्य सुकीर्तेर्मायणः पिता॥ सायणो भोगनाथश्च मनो बुद्धि सहोदरः ॥१॥ यस्य बौधायनं सूत्रं शाखा यस्यच याजुषी॥ भारद्वाज कुलं यस्य सर्वज्ञः सहि माधवः ॥२॥ ७॥

अर्थ:- ज्याची आई श्रीमती, बाप मायण, सायणाचार्य भाऊ, ज्याची तैत्तिरीय यजुःशाखा व सूत्र बौधायन असून गोत्र भारद्वाज होतें. बहुतेक ग्रंथांवर यानें नांव माधव असेंच आहे. सर्व दर्शन संग्रह आणि वेदभाष्य यांवर याचें नांव सायण माधव असें आहे. हें भावाचें नांव यानें त्याच्या प्रीतीस्तव घातलें असें ह्मणतात. आणि पंच दशीवर मात्र विद्यारण्य असें नांव आहे.

पंचदशीच्या आरंभीं यानें मंगल केलें आहे. त्यावरून याचे ज्ञान गुरु शंकरानंद स्वामी होते असें स्पष्ट दिसतें. तो श्लोक असा आहे:—

नमः श्री शंकरानंद गुरुपादांबु जन्मने॥ सविलास महा मोह ग्राहग्रा-

सेक कर्मणे ॥ १ ॥ अर्थ सोपाच आहे.

अस्तु. यानें एक ग्रंथ बक्कारायास नजर केला असें सांगतात. त्या वरून व पूर्वीच्या सुवर्ण वृष्टी वरून हरिहर राय यास फार मानूं लागला. याच्या मसलतीनें राजाचें पुष्कळ कल्याण झालें. यानें वयाच्या ६० व्या वर्षी तीर्थयात्रेस गमन केलें. व फिरतांना शेंकडों पंडित वादांत जिंकले. हा शांकर दर्शन मताचा असून मोठा योग्य होता. त्या मुळें जे जे पंडित यानें जिंकले ते सर्व याचे शिष्य झाले. त्यांतीलच एक पंडित रामकृष्ण ज्यानें पंचदशीवर टीका लिहिली तो होता. हंपी विरूपाक्ष येथें याचा एक मठ आहे. व तो मठ श्रृंगिरी मठाची शाखा आहे. हा सकलप्रिय पुरुष आपल्या वयाच्या ९० व्या वर्षी पंपा येथें समाधिस्थ झाला.

कित्येक असें सांगतात कीं, याच्या कित्येक ग्रंथांच्या प्रति भुईंत पुरलेल्या इसवी १८११ म्हणजे शके १७३३ मध्यें कर्नल मेकेन्झी यास सांपडल्या. त्यावरून त्यानें त्यांतील कित्येकांची इंग्रजींत भाषांतरें केलीं. व तीं विलायतेंतील विद्यासंग्रहालयांत पाठवून दिलीं. (कवि० व सु०मा०).

२– शंकरविजय ग्रंथाचा कर्ता. हा विद्यारण्याहून अगदीं निराळा होता. यास प्रमाण यानेंच त्या ग्रंथारंभीं जें मंगल लिहिलें आहे तें शंकरानंद गुरूचें न लिहितां विद्यातीर्थ अशा नावाचें लिहिलेलें आहे. तो मंगल श्लोक येणें प्रमाणें:—

प्रणम्य परमात्मानं श्री विद्या तीर्थ रूपिणं
प्राचीन शांकर जये सारः संगृह्यते स्फुटं १ (सर्ग १)

या मंगला वरून याचे गुरु विद्यातीर्थ स्वामि होते, असें स्पष्ट दिसतें. हीच गोष्ट याच्या शंकरविजयाचा टीकाकार जो धनपति याच्या टीके वरून निःसंशय ठरते ती अशी:— श्रीविद्या तीर्थ रूपिणं परमात्मानं प्रणम्य — याजवर, श्रीविद्या तीर्थरूपिणं अनेन स्वगुरोः श्रीविद्या तीर्थस्येश्वरावतारत्वं तत एव सर्वज्ञत्वंच सूचितं । परमात्मनि श्रीगुरौच तुल्य भक्त्यैव निःश्रेयस प्राप्तिरित्यपि ध्वनितं — यथा– यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ– इति. सारांश हा शंकरानंदाचा शिष्य नव्हता. म्हणून विद्यारण्याख्य जो माधवाचार्य तो हा नव्हे, असें सिद्ध होतें. आणखी असेंही दिसतें कीं, हा माधवाचार्य विद्यारण्यांच्या पूर्वीं होऊन गेलेला असावा. आणि त्यावरून विद्यारण्यानें आपल्या नांवास सायण माधवाचार्य अशी खूण केली असावी. जसा कालिदास व दुसरा आंध्रकालि-

दास परस्पर भिन्न होत त्या प्रमाणें. या विषयीं सर्व दर्शन संग्रहाच्या आरंभीं चे श्लोक वाचकांनीं पहावे. ह्मणजे खात्री होईल.

अस्तु. आतां शंकरविजयाचा कर्त्ता जो हा माधवाचार्य हा विद्वान् चांगला होता या विषयीं आह्मांस विशेष लिहिणेंच नको. त्या बद्दल याचें काव्यच साक्ष देत आहे. परंतु लिहिण्यास खेद होतो कीं, यानें आरंभीं लिहिण्याची प्रतिज्ञा केली एक. व पुढें लिहिलें एक. प्रतिज्ञा अशी कीं, प्राचीन जो शंकरविजयसांतील सारांशाचा मी येथें संग्रह करितों. या विषयीं याच्या नांवावर लिहिलेल्याश्लोकांतील उत्तरार्द्ध पहा. ह्मणजे आनंदगिरिप्रोक्त जे शंकराचार्य त्यांच्या वर्णनांतील सारांश संग्रहाची प्रतिज्ञा करून, आनंदगिरीनें लिहिलेलीं जीं आचार्यांच्या आई बापांचीं नांवें तीं यानें सोडून दिलीं आहेत व त्या जागीं दुसरींच लिहिलीं आहेत. तेव्हां या लिहिण्यास ह्मणावें तरी काय!! आनंद गिरि तर आपण लिहिलेल्या शंकरविजयांतील दुसऱ्या प्रकरणांत आचार्यांच्या आईचें नांव विशिष्टा लिहून बापाचें नांव विश्वजित् लिहितो असें असतां हा आईचें नांव सती व बापाचें नांव शिवगुरु लिहितो. तेव्हां हा केवढा विरोध! या वरून याच्या प्रतिज्ञेस व्यर्थत्वच खरें.

बरें हा ज्या शंकराचार्यांचें वर्णन लिहितो ते जर निराळे आहेत, तर यानें आनंदगिरी प्रमाणेंच मंडनमिश्र, कुमारिलभट्ट इत्यादिकांची जी गांठ त्यांशीं घातली ती अगोदर पडली कशी, अगर पडली तरी कशी? म्हणून हेंही याचें लिहिणें जसा कोणता तरी एक बादशाहा कल्पावा. आणि तेथें गोष्ट सांगणारानें बिरबल आणून उभा करावा तशांतलें झालें. (माध॰ शंक॰).

**माध्यमिकबौद्ध**– हे बाह्यांतरार्थ शून्यवादी आहेत. म्हणजे दिसणारे जे बाह्य विषय व भासणारे अंतर विषय त्या दोहींसही हे शून्य मानणारे आहेत. यांच्या मतीं गुरूच्या बोलण्यावर शंका न करितां चालावें असें आहे, ह्मणून योगाचार बौद्धांचें व यांचें जमत नाहीं. (सर्वद॰).

**मानपुरी**– हा कवि जातीचा गोसावी होता. हा दौलताबाद येथें राहात असे. याचीं पदें पुष्कळ प्रसिद्ध आहेत. (छन्द्मा॰)

**मानशिंग**– हा राजा कोठला तें कळत नाहीं. तिकून सोमयाजीचा हा आश्रयदाता होता. व याच्या असण्याचा काळ शालिवाहनाचा १२ शतक सांगतात. (कवित्व॰)

१— ब्राह्मामुनीचा बाप.

मानसोल्लास– हा ग्रंथ विश्वरूपाचार्यकृत संस्कृतांत आहे. (ग्यारे०)

मामिडीव्यंकाय्या– तैलंगभाषेचा कोशकार. हा कवि कर्नाट आहे असें म्हणतात.

मामेरु– गुजराथी भाषेंत ही कविता आहे. व ती प्रेमानंदानें केलेली आहे.

मायण– विद्यारण्याचा बाप.

मायादेवी– दुसऱ्या बुद्धाची आई. व शुद्धोदन राजाची स्त्री. (क.

मायादेवीसुत– अमरसिंहानें जीं दुसऱ्या बुद्धाचीं नांवें लिहिलीं आहेत त्यांतील ए-

मारजित्– पहिल्या बुद्धाच्या नांवां पैकीं एक.

मारवाड– गुजराथेच्या पुर्वेच्या बाजूचा प्रांत. हा मेवाडाच्या वायव्येस आहे. व जो-
धपुर, जयपुर, बिकानेर, इत्यादि शहरें यांत आहेत.

मार्कंडेयचूर्णिका– अमृतराय कविकृत मराठींत.

मार्कंडेयाख्यान– आनंदतनय कविकृत मराठींत. [ ज्ञाचा बाप. (रा०मा०)

मार्जारि– जरासंध वंशीय कलियुगांतील राजा. सहदेव राजाचा पुत्र. व श्रुतश्रवारा-

मार्तिकावतक– पश्चिमदशार्ण देशाचें शहर. (प्रा०इ०न०)

मालकंपेठ– महाबलेश्वर डोंगरा संबंधि जी नहर पेठ ती.

मालतीमाधव– भवभूति कविकृत नाटक. यावर जगद्धर कवीची टीका आहे.

मालव– माळवादेश– [ साचें तें कळत नाहीं.

मालविकाग्निमित्र– हें एक नाटक कालिदासकृत ह्मणतात. परंतु कोणत्या कालिदा-

मालाप्रसंग– वल्लभ संप्रदायाचा ग्रंथ.

मालिनीनदी– भागलपुरा जवळची नदी.

माली– जैनांच्या चोवीस तीर्थकरांतील एकोणिसावा. (तीर्थकर) श०प०.

मालेय– बसवाच्या तीन मशालचींतील विजल राजास मारणारा एक.

मालोपंत– हा गृहस्थ इंदुरबोधलें येथील राहणारा. व संतचरित्राचा कर्ता. हा अ-
कृष्णापंत व मादण्णापंत नांवाचे दोघे भाऊ विजापुर रूप्यांत होते त्यांच्या हा-
तारवालीं असे. (इन्दु मा०)

मावदास– हा कवि गुजराथी होता. याचा ग्रंथ देवीवर्णन हा आहे. (काव्यदो०)

माहिष्मतीनगर– हैहय देशांतील शहर. हें नर्मदेच्या कांठीं आहे. यास हल्लीं चो-
ळीमहेश्वर ह्मणतात. याचे उत्तर अक्षांश २२° व पूर्वरेखांश ७६° आहेत. मंडन
मिश्र येथेंच राहात होता.

माळवा– अवंती देश तोच.

मितभाषिणी— माधवसरस्वतीकृत.

मिताक्षरा— याज्ञवल्क्य स्मृतीवर विज्ञानेश्वर योगीकृत टीका.

मित्रपाळवंश— नरहरिनाथ वंशांतील शेवटला राजा विक्रम त्यास मारून मित्रपाळ हा राजा झाला. या कुळांतील सोळा पुरुषांनीं इंद्रप्रस्थ (दिल्ली) येथें युधिष्ठिर शकसुमारें २६ शें पासून तिसाव्या शतका पर्यंत ३१२ वर्षें राज्य केलें. ती प्रत्येकाची राज्यकारकीर्द येणें प्रमाणें :—(हिंदु० छा० इ०).

| राजाचें नांव. | व. | म. | दि. | राजाचें नांव. | व. | म. | दि. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मित्रपाळ | २४ | २ | ० | भीमपाळ … … … | १६ | १० | ७ |
| चंद्रपाळ | १६ | ९ | २४ | अकृतपाळ … … … | १६ | ७ | १९ |
| सुंदरपाळ | २१ | ४ | १८ | दळपाळ … … … | १२ | ५ | २७ |
| देशपाळ | १९ | ११ | ११ | भूपाळ … … … | १४ | ९ | २२ |
| रशमपाळ | १८ | ० | १२ | हरिपाळ … … … | १३ | ८ | १० |
| अनंतपाळ | १८ | ० | १२ | मदनपाळ … … … | १७ | ७ | १९ |
| रामपाळ | ३७ | ११ | १२ | भीमपाळ दुसरा. … … | १५ | २ | २५ |
| गोविंदपाळ | २८ | ७ | २७ | विक्रमपाळ … … … | १९ | ११ | १३ |

मित्रमिश्र— वीरमित्रोदय ग्रंथाचा कर्त्ता.

मिथिलानगर— यास हल्लीं तिरभुक्ति अथवा तिरहूट म्हणतात. (प्रा० हिं० न०)

मिदनापूर— याचें जुनें नांव मेदिनीपुर. कोठें यास ताम्रलिप्त नगर असेंही नांव आढळतें. हें सुमारें उ० अ० २२ व पू० रे० ८८ वर आहे.

मिरज— हें शहर फार जुनाट हल्लीं पटवर्धनी अमलांत आहे. येथें एक मजबूत किल्ला आहे. येथील मिरजकर पटवर्धनांत वडील आणि धाकटें अशीं दोन घराणीं आहेत. येथें एक मशीद आहे. तींत ती बांधल्याचा फारशींत शिलालेख आहे. त्यावरून ती शके १३३५ मध्यें बांधली असें दिसतें. (म. व. कृ. इ.)

मिरत— हें शहर जुनें हस्तनापुर याजवळ आहे. याचे उ. अ. कृ. २९ व पू. रे. ७८ आहेत.

मिराबाई— ही उदेपुर येथील एका राण्याची मुलगी. ही रूपानें फार सुंदर होती. म्हणून हिला वरण्या करितां पुष्कळ राजपुत्र आले. परंतु हिनें कोणाशींच लग्न न करितां आपला पति गोपाळकृष्ण मानला. व त्याचें भजन पूजन करूं लागली. व पुरुषजातीच्या साधुसंतांशीं मोकळेपणानें भगवच्चर्चा करूं लागली. तेणें

करून राजास लोक नांवें ठेऊं लागले. असें पाहून त्यानें हिला प्रसिद्धपणानें प्यावयास विष दिलें. तें हिनें घेतलें, परंतु ही मेली नाहीं गोपाळकृष्णाची मूर्ति मात्र काळी पडली. पुढें हिच्या प्रार्थनेनें मूर्ति पूर्ववत् झाली. थोडी गळ्याशीं मात्र काळी राहिली. हिचीं हिंदुस्थानी भाषेंत पदें पुष्कळ आहेत. अकबर बादशाहाच्या वेळेस ही होती. (प्रन्द्र मा०) व (भक्तवि० अ० ३९).

**मिश्री**— परिभाषेंदु शेखरावरील मिसरजी पंडिताची टीका. (का०)

**मीठाकवि**— डिमडीचा राहणारा. जातीचा दाढी होता. गुजराथींत याचीं पदें आहेत.

**मीरकमरुद्दीन**— निजाम उल्मुलुख जो चिनकुलिचखान तोच.

**मीमांसा**— पूर्व आणि उत्तर अशा भेदानें दोन प्रकारचें दर्शन तें. यांत पहिल्यामध्यें कर्ममार्ग व दुसऱ्यांत ज्ञानमार्ग आहे. पहिल्याचा कर्ता जैमिनि आहे. आणि दुसऱ्याचा कर्ता व्यास आहे.

**मीमांसासंग्रहकौमुदी**— भास्करकृत. न.

**मुकुंद**— कवि होता. कधीं व कोठें झाला. तें कळत नाहीं. पदें मात्र कांहीं आढळतात.

**मुकुंदराज**— हा महाप्रख्यात साधु नाथपंथी महाराष्ट्र ब्राह्मण होता. याच्या आईबापांचीं नांवें काय होतीं व मूळचा राहणारा कोठला त्याचा ठिकाण लागत नाहीं. मात्र याच्या गुरूचें नांव रघुनाथ होतें. व तो हरिनाथाचा शिष्य असून वेनगंगेच्या तीरीं जोगाईचें आंबें येथें राहात असे. असें विवेकसिंधु नामक जो याचा ग्रंथ आहे त्यावरून समजतें. त्या ओंव्या येणें प्रमाणें:— (विवेकसिंधु उत्तरा०)

> मुख्य आदिगुरु आदिनाथ ॥ तेथोनियां श्रीहरीनाथ ॥ तयाचा शिष्य रघुनाथ ॥ जो गुणांचा सिंधु ॥ ३४ ॥ तया सिद्धाचें चरित्र ॥ सांगिजेल विचित्र ॥ महापातकच्छेदन पवित्र ॥ श्रवण मात्रें ॥ ३५ ॥ वाणगंगेच्या तीरीं ॥ अंबा मनोहर नगरी ॥ तेथें प्रगटले श्रीहरि ॥ जगदीश्वर ३८

जयत्पाळ राजा तो याचा शिष्य होता. (जयत्पाळ शा०प०). त्यावरून मुकुंदराज शालिवाहन शके ११३२ मध्यें होते. आणि म्हणूनच यास होऊन गेल्यास आज ६६८ वर्षें झालीं आहेत. यास व ज्ञानेश्वरास सुमारें ७५ वर्षांचें अंतर आहे. म्हणजे ज्ञानेश्वराच्या पूर्वीं हा सुमारें ७५ वर्षें होऊन गेला होता.

विवेकसिंधु व परमामृत हे दोन ग्रंथ याचे वेदांतपर आहेत. शांकरदर्शन प्रधान याचें मत होतें. व वरील दोन्ही ग्रंथ यानें त्याचाच आधार धरून लिहिले. त्या विषयीं यानें विवेकसिंधूच्या सातव्या प्रकरणांत याप्रमाणें लिहिलें आहे.

श्रीशंकरोक्तीवरी॥ मी बोलिलों मराठी वैखरी॥ ह्मणोन येथें धरावी चतुरीं॥ शास्त्रबुद्धि॥ १४७॥ म्या आपुली निजवाणी॥ पवित्र केली इहीं वचनीं॥ ते प्रीति पावो पिनाकपाणी॥ श्रीमुकुंद ह्मणे॥ १५७॥ ७॥ ७

असो. लोकवार्ता अशी एक आहे कीं, यानें जयसाळ राजास ज्या घोड्यावर समाधि लावली, तोही त्या बरोबर समाधिस्थ झाला होता. तोच घोडा पुढें हल्या झाला. व ज्ञानेश्वरानें त्या कडून वेद बोलविला. नंतर तोच तिसऱ्या जन्मीं महार होऊन रामदास स्वामींच्या प्रसादानें मुक्त झाला. आणि त्या वरूनच घोडा, रेडा, व धेडा, अशी ह्मण लोकांत चालली आहे. परंतु ही गोष्ट वारकरी लोकांस संमत नाहीं. त्यांचें ह्मणणें ज्ञानेश्वरा विषयींची मधली गोष्ट मात्र खरी आहे. पण हें त्यांचें ह्मणणें न्यायाचें नाहीं. कारण जर रेड्याचा पूर्वोत्तर संबंध असाच खचित असेल, तर त्याचा आदि अंत खरा असल्या शिवाय मध्य खरा, असें कधींच होणार नाहीं.

याची समाधि जोगाईच्या अंब्यास डोंगराच्या एक्या अवघड कड्यावर आहे. ह्मणजे एका बाजूनें भिंती सारखा उंच कडा असून, एका बाजूस मोठा खोल भयंकर दरा आहे. समाधीपाशीं पराकाष्ठा चार माणसें बसण्या जोगी जागा आहे. त्याहून अधिक नाहीं. (स्वतःची माहिती.)

मुकुंदा– तुकारामाचा पूर्वज जो विश्वंभर, त्याचा मुलगा.

मुकुंदानंदभाण– नाटका सारखें हें एक संस्कृत काव्य आहे.

मुकुटराव– शिंदे घराण्यांतील एक पुरुष. (बुल्ह० शोध०)

मुकुलभट्ट– भट्ट कल्लटाचा पुत्र. अभिधान वृत्ति मातृका ग्रंथाचा कर्ता.

मुकुतिमण्णा– हा कवि नियोगी जातीचा तेलंग ब्राह्मण होता. याचें जन्म गन्नवरम गांवीं झालें. कृष्णदेव रायलूच्या पदरीं हा असे. याचें पारिजातापहरण नांवाचें काव्य तेलंगी भाषेंत आहे. व त्याचीं प्रकरणें तीन आहेत. (कविचरि०)

मुक्तमाल्य– स्वारोचिष मनुचरित्रावर कृष्णदेव रायलूनें केलेली तेलंगी भाषेंत टीका.

मुक्तानंद– हा गुजराथी कवि कांठे वाडांतील गडढा येथील राहणारा शके १७२९ मध्यें होता. उद्धव गीता, धर्माख्यान, सती गीता, रुक्मिणी विवाह, कृष्णप्रसाद व धर्मामृत इतके ग्रंथ यानें लिहिले. या शिवाय कित्येक याचीं पदें आहेत. (काव्य० गु०).

मुक्तापीड– ललितादित्य राजाचें दुसरें नाव.

**मुक्ताबाई**— निवृत्ति, ज्ञानेश्वर, व सोपान यांची बहीण. ही सर्वांत लहान असतांही उत्कृष्ट ज्ञानी होती. हिचें जन्म शके ११९८ त झालें होतें. लग्न तर मुळींच हिनें केलें नव्हतें. हिची समाधि पुणतांबें येथें आहे. (बृ०मा०).

**मुक्तामाळा**— मोरोपंतकृत मराठींत.

**मुक्तावली**— शोध नाहीं.

**मुक्तेश्वर**— प्रख्यात एकनाथ स्वामि त्यांच्या मुलीचा मुलगा. याच्या आईचें नांव लीलाबाई. व बापाचें नांव विश्वंभर होतें.— "गरुडारूढ मधुसूदन ॥ हृदयींधरिला आपण ॥ कंठीं सर्पाभरण ॥ नवल काय? ॥१॥ मस्तकीं चंद्र सुशीतल॥ त्याहीवरी गंगाजल ॥ कंठीं धरिलें हलाहल ॥ नवल काय? ॥२॥ अहो लीला विश्वंभरा ॥ शंभो शिवहरा शंकरा ॥ तारिसी मुक्तेश्वरा ॥ नवल काय? ॥३॥

हा देशस्थ आश्वलायन ब्राह्मण होता. व याचें जन्म शके १५३१ मध्यें झालें होतें. असें सांगतात कीं, हा बराच मोठा होईपर्यंत बोलत नव्हता. म्हणून याच्या आईनें हस्तामलक ग्रंथ नाथांचा आहे, त्याचा दररोज पाठ करून यास तीर्थ द्यावें. त्या योगानें हा बोलूं तर लागलाच. शिवाय यास कवित्वाची स्फूर्ति झाली. व यानें सर्व महाभारत मराठींत ओंवीबद्ध लिहिलें. याचें महाभारत आजमितीस सर्व विद्यमान आहे. अशा विषयीं निबंधमाला अं०४७ए-३०पहा.

या शिवाय शतमुख रावण वध व वत्सलाहरण यानेंच लिहिलें आहे. याची ओंवी पुरी चार चरणांची असल्यामुळें अतिशय गोड असते. उपमा, उत्प्रेक्षा आदि करून काव्याचे गुणही तींत असतात. तशीच रसाचीही साधणुक यथायुक्त असते.

**मुक्तेश्वरी भारत**— मुक्तेश्वरकृत मराठी ओंवीबद्ध भारत. याचीं सर्व पर्वें बेळगांवीं श्रीमंत बापुसाहेब शाहापुरकर यांच्या घरीं असल्याचा पत्ता लागतो. व हा पत्ता मुंबई येथें जांबुळवाडींत राहणारे शेणवी जातीचे गृहस्थ रा·रा· जिवबा अंण्णा शिरोडकर सांगतात. (निबं०मा०).

**मुंगंडा**— तैलंगणांतील जगन्नाथराव पंडिताचा गांव.

**मुंगेरी**— मोंगीर शहर.

**मुंज**— धारा नगरच्या भोजराजाचा चुलता.

**मुंडकोपनिषत्**— याचें बंगालींत व इंग्रजींत भाषांतर राममोहनरायानें केलेलें आ०

**मुद्गलभट्ट**— हा ब्राम्हण निःसीम रामभक्त होता. हा वेदशास्त्रसंपन्न, निगर्वी, नम्र आ-

णि दयाळू असा असे. याच्या घरीं श्रीराम पंचायतनाच्या मूर्ति असत. व त्यांची हा सेवा अयाचित वृत्तीनें भिक्षा मागून करी. प्रतिवर्षी रामनवमीचा उत्सव करणें, तो गांवकरी मदत करून करीत. या प्रमाणें होतां होतां हा पुढें काशीस गेला. तेथें यास लोकांकडून पुष्कळ द्रव्य मिळालें. तें घेऊन हा माघारा परतला असतां, चोरांनीं याची पाळत राखून पाठलाग चालविला. परंतु राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न या चार धनुर्धरानीं त्यांचें कांहींच चालूं दिलें नाहीं. अशा रीतीनें हा गांवीं येऊन स्वरूप पोंहोंचला. ही गोष्ट चोरांनींच यास शेवटीं कळविली. व ते याची क्षमा मागून परत गेले. त्या वरून यानें रामाची स्तुति शंभर आर्यांनीं केली. तें मुद्गल शतक लोक प्रसिद्ध आहे. (क०च०).

मुद्गलशतक– मुद्गलभट्टकृत संस्कृत भाषेंतील शंभर आर्या.

मुद्गलाचार्य– मुद्गलभट्ट तोच.

मुद्देबिहाळ– विजापुराच्या पूर्वेस असणारा तालुक्याचा गांव.

मुद्राराक्षसनाटक– विशाखदत्त कवीनें रचलेलें संस्कृत नाटक.

•मुधोळ– हें एक संस्थान जमखिंडीच्या दक्षिणेस सुमारें ९ कोसांवर आहे.

मुनिकपण– हा एक जती कवि होता. (काव्यदो०)

मुनिमतमणिमाला– वामदेव कविकृत. संस्कृत भाषेंत.

मुनींद्र– बुद्धाच्या नांवांतील एक.

मुंबई– हिंदुस्थानाच्या पश्चिम किनाऱ्यास हें शहर आहे. हें मोठें बंदर असून इलाख्याची जागा आहे. हल्लींच्या राज्यकर्त्यांचा एक अधिकारी येथें असतो. वैदिक धर्मास प्रतिकूळ असें कोणतेंही कृत्य कोणास करणें झाल्यास, तें त्यानें येथें केलें असतां निर्विघ्न सिद्धीस जातें. अशी याची फार प्रसिद्धि झाली आहे. हें शहर उत्तर अक्षांश १९° व पूर्व रेखांश ७३° यांवर आहे.

मुरग्गा– ही कवयित्री प्रसिद्ध जी अव्वैयर तिची बहीण होती. हिचें जन्म कावेरी पट्टन येथें झालें. ही एका भंडाऱ्याच्या घरीं वाढली. तामिळ भाषेंत हिची कविता आहे. (क० च०)

मुरारपरब्रह्म– हा एक साधु होता. हा जातीचा ब्राम्हण व गृहस्थ असे. याचें स्वतःचें नांव मुरारपंत व बापाचें नांव ब्रह्माजी पंत होतें. आणि त्यावरून असें नांव चाललें आहे. प्रसिद्ध शिवाजी महाराजांच्या वडिलांचे गुरु जे आनंदतनय अरणीकर ते यांचेच शिष्य होते. (वृद्ध माहिती.)

मुरारिकवि– अनर्घ्यराघव नाटकाचा कर्ता. (बु॰शो॰).

मुरारिमिश्र– एक महापंडित.

मुर्शिदाबाद– फल्गुनदी लगतचें शहर. याचे उत्त॰ अ॰ २४° व पू॰रे॰ ८९° आहेत.

मुलतान– पंजाबांतील एक शहर. याचे उ॰ अ॰ रू॰ ३०° व पूर्व रे॰ ७२° आहेत.

मुसळराम– हा समर्थ रामदास स्वामींचा शिष्य होता. एक्या मोठ्या लांकडाच्या मुसळावर कोरींव मारुतीची मूर्ति केलेली व तिला शेंदूर लावलेला, तें हा नेहेमी खांद्यावर वागवून समर्थांची सेवा करी. त्या वरून हें नांव यास पडलें होतें.

मुळी– कांठेवाडांतील एक गांव.

मूळदास– हा गुजराथी कवि कधीं व कोठें होता तें समजलें नाहीं. (का॰दो॰).

मूळपुरुष– वल्लभसंप्रदायाचा ग्रंथ.

मृच्छकटिक– हें नाटक शूद्रककृत आहे. याचें मराठींत भाषांतर कैलासवासी परशुराम पंत तात्या गोडबोले यांनीं केलेलें आहे.

मृतसंजीवनी– हा ग्रंथ छंदःशास्त्रविषयक संस्कृत भाषेंत हलायुधभट्टकृत (आहे.

मेकलचरित्र– हा ग्रंथ कृष्णदेव रायलुकृत तेलंगी भाषेंत आहे.

मेघदूतकाव्य– वल्लभदेवकृत कै॰ वे॰ कृष्णशास्त्री चिपळूणकर त्यांनीं याचें मराठींत भाषांतर केलेलें आहे.

मेघस्वाती– आंध्रभृत्य राजांतील पुरीमान् राजाचा पुत्र. व शिवस्कंदाचा बाप.(रा॰मा॰)

मेघकवि– हयग्रीव वध काव्याचा कर्ता. (बु॰शो॰).

मेथवड– सातारा प्रांतांतील गांव. [रा॰मा॰]

मेदःशिरा– आंध्रभृत्य राजांतील पुरिमान् राजाचा पुत्र. व अटमान् राजाचा बाप.

मेदिनीपुर– कुमारिलभट्टाचा साह्यकर्ता जो सुधन्वा राजा त्याच्या राजधानीचें शहर. यास हल्लीं मिदनापुर ह्मणतात. (जैन ग्रंथ.)

मेधातिथि– मनुसंहितेचा भाष्यकार.

मेधावी– युधिष्ठिर वंशीय कलियुगांतील राजा. सुनय राजाचा पुत्र. व नृपंजयाचा बाप.

मेनीनाथ– जैन लोकांचा २२वा तीर्थकर. याच्या मागचा पार्श्वनाथ.

२– मत्स्येंद्रनाथापासून स्त्रीराज्यांतील राणीस झालेला पुत्र.

मेरुतुंगाचार्य– प्रबंधचिंतामणि ग्रंथाचा कर्ता.

मेरुकवि– अवधूतगीतेचा टीकाकार.

मेरुशास्त्रिगोडबोले– वाई मध्यें अनंतशास्त्री नामक महाविद्वान् ब्राह्मण हो-

ता. त्यांच्या तीन चिरंजीवांतील मधले. हे मोठे नय्यायिक होते. वाक्यवृत्ति म्हणून न्याय शास्त्रावर यांचा ग्रंथ आहे. हे सन्यास घेऊन काशीस समाधि० झाले.

मेवाड– गुजराथे पलीकडचा ईशान्य बाजूचा प्रांत. हा माळव्याच्या उत्तरेस आहे. व उदेपुर वगैरे शहरें यांतील आहेत.

मैत्रेयरक्षित– धातुपाठ प्रदीप ग्रंथाचा कर्त्ता.

मैनावती– कांचनपुरच्या त्रैलोक्यचंद्र राजाची स्त्री. व गोपीचंद्र राजाची आई. ही भर्तृहरि व विक्रमादित्य राजा त्यांची धाकटी बहीण होती, जालंदर नाथास हिनें गुरु केलें होतें. ही मोठी विचारवान् व ज्ञानी होती.

मैलापुर– हा मद्रासेकडील एक गांव आहे.

मोदापुर– भागीरथीच्या कांठीं जें मोंगीर शहर आहे. त्याजवळचें हें शहर.

मोरयादेवगोसावी– हा मोठा सिद्धपुरुष होऊन गेला. पुरंदर तालुक्यांत भोंगवली म्हणून गांव आहे तेथील हा जोशी होता. याचें मूळ उपनांव शालिग्राम होतें. यानें मोरगांवास अनुष्ठान केलें. व त्या योगानें श्रीगणपतीचा यास साक्षात्कार झाला. शके १५२० मध्यें हा विद्यमान होता. सिद्ध झाल्यावर हा चिंचवडास राहूं लागला. हल्लीं याची समाधि तेथें आहे. याच्या मागें यास एक पुत्र होता. व तो चिंतामण महाराज या नांवानें प्रसिद्ध आहे. ( हन्दूमाहिती )

मोरेश्वरभट्ट– अहमद नगरा मध्यें हा ब्राह्मण राहात असे. हा चांगला विद्वान् वैद्य होता. याच्या बापाचें नांव माणिकभट्ट होतें. यानें वैद्यकावर शके १६०३ मध्यें वैद्यामृत नांवाचा ग्रंथ लिहिला. हल्लीं तो ग्रंथ मराठींत अर्थ लिहून मूळासहित छापला आहे. ( कविचरित्र ).

मोरोपंत– हा एक मोठा नामांकित कवि होऊन गेला. मराठी भाषेंत आर्या छंदोबद्ध कविता यानें केलेली फारच सरस आहे. याच्या आर्ये प्रमाणें आर्या करणें अजून कोणास साधत नाहीं. व ती करण्यास कोणी शाहाणा झटतही नाहीं; कारण जर ती याच्या आर्ये प्रमाणें हुबेहुब उतरली, तर लोक आहारे पंत, असें म्हणून शाबासकी द्यावयाची ती यास देतात. कर्त्ता बिचारा कोरडाचा कोरडाच. आणि हुबेहुब न उतरल्यास, कोणहो हा आर्या करणारा मूर्खआहे. सारांश नव्या आर्या करणारास कोणत्याही प्रकारें आर्या करण्यांत लाभ नाहीं. अशा प्रकारें याच्या आर्येची कांहीं विलक्षण छाप आहे.

मोरोपंत हा जातीचा कऱ्हाडा ब्राह्मण होता. याच्या बापाचें नांव रामचंद्र

पंत होते. हा मूळचा कोल्हापुरा जवळ पन्हाळा ह्मणून गांव आहे तेथला राहणारा असून, याचें उपनाव पराडकर होतें. पुण्याच्या पूर्वेस सुमारें २० कोसांवर बारामती ह्मणून गांव आहे, तेथील जाहगीरदार बापूजीनाईक जोशी, त्यांच्या-पदरीं याचा बाप कारकून असल्या मुळें हाही तेथेंच होता. याचें जन्म शके १६५१ त झालें होतें. व हा रामउपासक होता.

मोरोपंत संस्कृत विद्या शिकून चांगला विद्वान् झाल्यावर पुराणही सांगूं लागला. हा जरी बापाचें कारकुनीचें काम करीत होता. तरी याचें पुराणसांगणें बापूजी नाइकांस रुचल्या वरून, त्यांनीं यास सालिना वेतन ५०० रुपये करून पुराण सांगण्यास ठेविलें. यानें भारत, रामायण, भागवत, ब्रम्होत्तरखंड, हरिवंश इत्यादिकांवर आर्या केल्या आहेत. व त्या पंढरपुरास याचे वंशजआहेत त्यांनीं उत्तम व्यवस्थेनें ठेविल्या आहेत. मोरोपंत व प्रसिद्ध काशीउपाध्यायोपाध्याय हे परस्पर व्याही होते.

याच्या आर्या प्रसिद्धीस आणणारा रामजोशी सोलापुरकर होता. त्यानें याच्या आर्यारूप कन्येचें चांगलें पोषण केल्यामुळें मोरोपंत जोशिबावांस जांवई अशी हांक मारीत. मोरोपंताच्या कवितेंत यमक, प्रास, उपमा, उत्प्रेक्षा इत्यादिकांचा भरपुर संग्रह आहे. याची वाणी शुद्ध व गोड अशी असून क्वचित् स्थळीं संस्कृत शब्दांच्या भरण्यानें ती कठिणही आहे. यानें रामायणांनच, परंतु रामायण, निरोष्ठ्य रामायण इत्यादि चातुर्याचे अनेक प्रकार केले आहेत. व कोठें कोठें त्रयोदशाक्षरी व द्वादशाक्षरी मंत्रही अपूर्व साधले आहेत. हा प्रख्यात कवि शके १७१६ मध्यें वयाच्या ६५ व्या वर्षीं पंढरपूर येथें वारला. याच्या आर्येनें आलीकडे रूप करणारे कै० परशुरामपंत तात्यागोडबोले होऊन गेले. त्यांस लोक फार करून प्रतिमोरोपंत म्हणत. असें ऐकिवांत येतें. (कविच० व नवनीत.)

**मोहनदास**— हनुमान् नाटकाचा टीकाकार. (बुल्हर्चा शोध.)

**मोहनांगी**— कृष्णदेव रायलूची कन्या. ही चांगली विद्वान् होती. मरीची परिणय नाटक हिनें केलेलें आहे. हिचा नवरा हिच्या ऐन तारुण्यांत मरण पावल्यामुळें हिनें सहगमन केलें.

**मोहमुद्गर**— हा एक लहानसा श्लोकबद्ध ग्रंथ श्रीमच्छंकराचार्यांचा आहे. त्यांतील मासल्या करितां एक श्लोक येथें लिहितों. — "आदित्यस्य गता गतै रहरहः

संक्षीयते जीवनं ॥ व्यापारें र्बहुकार्य कारण शतें र्कालोपि नज्ञायते ॥ दृष्ट्वा जन्म जरा वियोग मरणं त्रासश्चनोत्पद्यते ॥ पीत्वा मोहमयीं प्रमोद मदिरा मुन्मत्तभूतं जगत् ॥१॥

मोंगीरशहर– हें भागीरथीच्या कांठीं आहे.

मोनीबाबा– हा पुरुष चांगला समाधानी होता. हा मूळचा शिन्नरचा राहणारा जातीचा वाजसनी ब्राह्मण होता. प्रख्यात जे नासीक येथील राहणारे रघुनाथ भट्टजी त्यांचा हा शिष्य असे. चतुर्थाश्रम घेतल्यावर यांनीं वेदांतपर स्फुट कविता केली तीन हें याचें असें नांव आढळतें. याची समाधि शके १७९८ मध्यें ~~मुंबईस~~ कल्याणास झाली. (स्वत:ची माहिती)

मौर्यराजे– भागवता वरून या राजवंशाचा मूळ दशरथ. २ चंद्रगुप्त. ३ बारिसार. ४ अशोक. ५ सुयशा. ६ संगत. ७ शालीशूक. ८ सोमशर्मा. ९ शतधन्वा. १० बृहद्रथ या वंशास राज्य संपादून देणारा चाणक्य नांवाचा ब्राह्मण होता. यांनीं मगध देशांत १३७ वर्षे राज्य केलें. यांच्या राज्यकारकीर्दीस आरंभ युधिष्ठिर शकाच्या १५ व्या शतकाच्या समाप्तीस झाला. असें इतिहासा वरून दिसतें. (राजमा०) हाल्लीं मोरे आडनांवाचे मराठे आहेत ते याच वंशांतले आहेत.

मोल्ली– तैलंगणांतील राहणारी ही एका कुंभाराची मुलगी होती. हिच्या अंगीं कविता शक्ति विलक्षण होती. त्या वरून कृष्णदेवाच्या राज्यांतील कविवर्गांत हिची गणना असे. हिची कवित्व विषयक स्फूर्ति व धारणाशक्ति वयाच्या मानानें अधिकाधिक वाढत गेली. असें सांगतात. शीघ्र कवित्व करण्या विषयीं हिची एक गोष्ट अशी आहे कीं, हिनें एकदां स्नान केल्यावर रामाख्यान रचावयास आरंभ केला. व केंस वाळतात तों त्यांतील एक कथाभाग कडेस लाविला. बरें हिची कविता ओबड धोबड होती असेंही नाहीं. तर तींत अलंकार व श्लेष असेही असत. तैलंगणांत हिची कविता उपलब्ध आहे. हिच्या असण्याचा काळ समजला नाहीं. (कृ०च०).

म्हैसूर– याचें जुनें नांव महिषासुर नगर. (प्रा० हिं० न०) हा एक प्रांत असून शहर श्रीरंगपट्टणाच्या दक्षिणेस सुमारें १०।१२ कोसांवर आहे.

## य.

यतिराजसप्तति– हा ग्रंथ रामानुजाचार्यांच्या वर्णनपर वेदांताचार्यकृत आहे.

यथार्थदीपिका– मराठींत भगवद्गीतेवर वामनाची टीका.

**यदुनाथ**– प्रसिद्ध वल्लभाचार्यांचा सातवा नातु. विठ्ठलनाथांचा सातवा मुलगा.

**यमदंड**– निष्कुळानंदकृत गुजराथींत ग्रंथ.

**यमदुनाचार्य**– रामानुजाचार्यांचा पट्टशिष्य.

**यमप्रस्थ**– हाल्लीं यास आग्राशहर ह्मणतात. (जै॰ग्रं॰).

**यमुनानदी**– ही हिमालया पासून निघाली आहे. व प्रयागापाशीं भागीरथीस मिळून बंगालच्या उपसागरास जाऊन मिळाली आहे.

**यशवंतमहादेव**– यास कोणी देवमामलेदार व कोणी साधु मामलेदार ह्मणतात. पंढरपुराकडे भोंसें नांवाचा गांव आहे, ज्यास करकम भोंसें म्हणतात, तेथील हा राहणारा होय. यास तेथें कांहीं वृत्तीही आहे. हा पुरुष सरळ चालीचा व साधा आहे. इंग्रजींत हा मामलेदार होता. याची गणना उपासकांत आहे. सरकारी पेनशन यास मिळत असतां तें यानें घेतलें नाहीं. हा पुरुष विद्यमान आहे.

**यशोदा**– महावीर तीर्थकराची आई.

**यशोमित्र**– वाक्यदीपक नामक संस्कृत ग्रंथाचा कर्ता. (बुल्ह॰शोध॰).

**यष्टिग्रह**– शोण नदीच्या कांठचा गांव. हाल्लीं काय म्हणतात तें समजत नाहीं.

**यक्षानंद**– हें एक तेलंगी भाषेंत नाटक आहे. व तें कृष्णमूर्तिकवीनें केलेलें आहे.

**यज्ञश्री**– आंध्रभृत्य राजांतील शिवस्कंदाचा पुत्र. विजय राजाचा बाप.

**यज्ञेश्वरभट्ट**– जैनमताचा खंडन कर्ता प्रख्यात कुमारिल भट्ट, त्याचा बाप.

**यज्ञेश्वरभट्टजोशी**– विरोधमर्दन ग्रंथाचा कर्ता. याचें प्रतिष्ठानांव बाबा जोशी होतें. याचें उपनाव रोडे व हा कोंकणस्थ ब्राह्मण उत्कृष्ट विद्वान् होता. यास हाल्लीं एक मुलगा आहे. परंतु ज्योतिषी नसून केवळ रोजगारी आहे. पुराणमतास न मानणारे जे श्री॰ कै॰ विनायक गंगाधर शास्त्री पटवर्धन व रा॰ब॰ केरो लक्ष्मण छत्रे, या उभयतांचा या विद्वानाशीं पुराणमताचें ज्योतिष खोटें असा वाद होता. त्या बद्दल याचें ह्मणणें असें होतें कीं, मी तुह्मांस पुराण मताच्या आधारानें नव्या सारणी करून तुमच्या गणितांशीं गणित मिळवून देतों. मात्र एक लिहिणारा मनुष्य मला द्या. कारण मी हातानें पंगु आहें. तें म्हणणें त्यांनीं ऐकिलें नाहीं. आमच्या मतें ही गोष्ट त्यांनीं अजमाऊन पहायाचीच होती. कारण असे विद्वान् पुरुष पुढें होणार नाहींत.

**याचमनीडू**– कालास्त्री पेथील जमीदार. चक्रापा कवि याच्या आश्रयास होता.

**यात्रानिबंध**– वराहमिहीरकृत २१ प्रकरणांचा ग्रंथ. [ऊला होता.

**यादककर**– एक पंडित. सेनेकराचा व याचा वाद पुष्कळ दिवस शास्त्रप्रकरणांत चा-

**यादवप्रकाश**– शांकर दर्शनानुसारी एक महाविद्वान् ब्राह्मण. रामानुजाचार्यांचा मामा. रामानुजाचार्यांनें सर्व अध्ययन याजवळच केलें.

**यादवराव**– प्रसिद्ध रंगनाथ स्वामीचे वडील बंधु. संन्यास घेतल्यावर ब्रह्मानंदनाव यास होतें. रामविजयादिक कविता करणारा जो श्रीधर त्याचा हा बाप होय.(स्व.)

**यादवेंद्रसरस्वती**– प्रख्यात जे कृष्णसरस्वती त्याचे गुरु.

**यामुनदेश**– यमुना नदीच्या तीरचा देश.

**यार्कंद शहर**– खश देशाची राजधानी. या जवळून सीता नदी वाहते.

**याज्ञवल्क्यस्मृतिटीका**– अपरादित्य राजानें केलेली टीका. (बु॰ शी॰).

**युक्तिदीपिका**– वाचस्पति मिश्रकृत सांख्य शास्त्रावर (बु॰ शी॰).

**युधिष्ठिर राजा**– आमच्या त्या अर्वाचीन कोशास कालमानानें आरंभ भूत, मूळ सूत्र, जो राजा तो हा होय. कलियुगाचें जें पहिलें वर्ष, तो याचा शकारंभ असल्यामुळें, ज्या ज्या नामांकित पुरुषांचीं चरित्रें येथें आह्मी लिहिलीं आहेत, तीं मुख्यत्वेंकरून या काळास अनुलक्षून आहेत. आमच्या प्राचीन ऐतिहासिक कोशांत जें याचें इतिवृत्त आह्मी भारता वरून लिहिलें, त्यांत कोणत्या संवत्सरीं काय घडलें, त्या विषयीं आम्हांस त्यावेळेस लिहिण्यास कांहींच आधार सांपडला नव्हता. परंतु हल्लीं ती सर्व वाण दूर होऊन, याचें शक, मितिवार, इत्थंभूत चरित्र आह्मी मोठ्या प्रयासानें मिळविलेलें, जैन ग्रंथांतील मूळ उतार्‍यां सहित वाचकांस सादर करितों:—

> शशबिंदुर्येविनाशचो मरुत्तो भरतस्तथा॥ अवीक्षितस्य पुत्रस्य मरुत्तस्य महात्मनः॥ भरतस्यच प्रागेव त्रिपंच ऋषि मेलनात्॥ लभ्यते वामभागेन मरुत्तस्यच सोवधिः॥ पश्चात्प्रवृत्तो राज्ञो ऽथ दौष्यंतेः समहात्मनः॥ भारतः शक इत्येवं यं विदुर्विबुधा जनाः॥ द्वापरस्यांत पर्यंतं प्रवृत्तो भारतः शकः॥ पूर्णनंदाश्च वसवः सोवधिर्भरतस्यच॥ ईश्वरे वत्सरे राधे तृतीयारविवासरे॥ शक्रं दुष्यंतपुत्रस्य प्रवृत्तोवै शाकोत्तमः॥ रुद्राक्षीणिच वेदाश्च वसवश्चैव मेलनात्॥ विक्रमे वत्सरे राधे राकायां ब्रध्नवासरे॥ मध्याह्ने शुक्लपक्षेच प्रादुर्भूतो युधिष्ठिरः॥ बाणारसाश्च वसवो भरतस्य शकावधिः पांडवार्जित कृष्णास्ते किंचित्काले गृहे वसन्॥ भूभुजा निर्जिताः सर्वे कौर-

बा: सचिवैः सह॥ निर्भयं द्रुपदं हत्वा स्थितास्ते तस्य मंदिरे॥ कीलके फाल्गुनोचीर स्तीर्थार्थं गतवान्मुदा॥ साधारणे वत्सरेतु प्राप्तवान् भद्रयासह॥ विरोध कृतमारभ्य दुंदुभेर्वत्सरस्यच ॥ समाप्ति मगमत्ताव द्राज्यं निष्कंटकंकृतं नंदा बस्कर्वसुवर्षे क्रोधने वत्सरे शुभे॥ माधवे राजसूयस्य प्रारंभं कृतवान्नृप:॥ नवती वसवश्चैव वर्षेच क्षय वत्सरे॥ माघे मासे शुक्लपक्षे शुभे प्रतिपदा तिथौ॥ अभिषिक्तो महा राजो ऋषिभि र्ब्रह्मसन्नभैः॥ इंद्रप्रस्थे महास्थाने शाकारंभं महायशाः॥ कृतवान् भारत शकः समाप्ति मगमत्तदा॥ भूमिर्नंदाश्च वसवः प्रभवे वत्सरे महान्॥ शुभे मासे शुक्लपक्षे दीपावल्यांतुकार्तिके॥ हंतीपुरे महाराजा कौरवैर्दुष्टचिंतकैः॥ कपट द्यूत योगेन निर्जितो बंधुभिः सह॥ ततो राजा प्रतिज्ञार्थे द्वादशाब्द वनंगतः॥ पश्चात्तेन कृतोऽज्ञात वासो वैराट वेश्मनि॥ त्रयोदशेच वर्षेच प्रमाथी वत्सरे शुभे॥ पांडवैर्निर्जिताः सर्वे कौरवा दुष्ट मानसाः॥ विक्रमे वत्सरे पश्चा द्विभपूरे महायशाः॥ युधिष्ठिरो महा राजा सिंहासन मुपागमत्॥ पूर्वबच्छक पर्यायं-प्रवृत्तं कृतवान्नृपः॥ कलेर्युगस्य पर्याय स्तदा जातो न संशयः॥ ७॥ ७

अर्थ- शशबिंदु, यौवनाश्व इत्यादि राजे होऊन गेल्यावर मरुत्त राजा शककर्ता झाला. त्याचा शक ७५५५ वर्षे चालला होता. पुढें दुष्यंत पुत्र भरत राजा शककर्त्ता झाला. त्याचा शक ८९० वर्षे चालला. व तो द्वापरयुग समाप्त होई पर्यंत होता. त्या पुढें कलियुगाच्या आरंभास युधिष्ठिर शक चालू झाला. ईश्वरनामक संवत्सरीं वैशाखमासीं अक्षय्य तृतीयेस भरत शकाचा आरंभ झाला असतां, वैशाख शु०१५ रविवार भरत शक ८४३ विक्रमनामक संवत्सरीं युधिष्ठिराचें जन्म झालें. नंतर पुढें लाक्षागृहदहनादिक अनेक गोष्टी घडून येऊन, भरत शक ८६५ शुभकृन्नामसंवत्सरीं द्रौपदी स्वयंवर होऊन त्यांन ती याच्यासह पांडवांस प्राप्त झाली. नंतर धृतराष्ट्रानें यास बंधूं वगैरे सहवर्तमान हस्तिनापुरास परत आणवून व निमें राज्य याचें यास देऊन राजधानी शहर इंद्रप्रस्थ करून दिलें. तेथें हा सुखानें राज्य करीत असतां अर्जुनास तीर्थयात्रेस जाण्याचें कारण पडून, तो तीर्थयात्रेस गेला. व भरत शक ८७४ साधारण नामक संवत्सरीं सुभद्रेस घेऊन इंद्रप्रस्थास परत आला. पुढें तेथून युधिष्ठिरानें भरत शक ८८६ दुंदुभिनामक संवत्सरा पर्यंत वर्षे १२ सुरळीत व सुखानें राज्य केलें. नंतर राजसूय यज्ञाचा विचार होऊन, जरासंधास मारल्यावर भरत शक ८८९ क्रोधन नामक संवत्सरांत यज्ञास आरंभ झाला. पुढें शके

८९० क्षयनामक संवत्सरीं यज्ञाची समाप्ति होतांनां, यास महान् महान् ऋषींनीं स- र्वां देखत राज्याभिषेक केल्यावरून, यानें भरत शकाचें ८९१ बावें वर्ष आरंभणार तें, प्रभव संवत्सरीं आपला शक चालू केला. परंतु ही गोष्ट दुर्योधनास सहन न होऊन, त्यानें त्याच कार्तिक मासीं दिवाळींत धृतराष्ट्रा कडून यास बंधूंसहित हस्ति- नापुरास बोलावून आणवून, कपटद्यूतानें याची सर्व संपत्ति हरण केली, व या- स वनवासास पाठवलें. त्यावरून यानें बारा वर्षें वनवास व एक वर्ष पर्यंत अ- ज्ञातवास करून, प्रमाथि संवत्सरांत कौरवांशीं युद्ध करून त्यांत त्या सर्वांस मारि- लें. व विक्रम संवत्सरा पासून राज्य करायास लागून आपला शक पूर्ववत् चालूकेला. या विक्रम संवत्सरास यानें पुनः प्रभव नाव दिलें असें कित्येकांचें मत आहे. कारण कलियुगाचा मूळ आरंभच येथून आहे. (सं. ज्ञि. वि.)

या प्रमाणें याचें वृत्त जें आह्मीं येथें लिहिलें, यावरून वाचकांच्या लक्षां- त येईल कीं, द्रौपदीच्या प्राप्तिकाळीं याचें वय ३२ वर्षांचें. प्रथम राज्याभिषेक का- ळीं ४७ वर्षांचें व कौरवांस मारून पुनः राज्याभिषेक काळीं, ह्मणजे कलियुगांत आ- पला शक यानें चालू केला त्या काळीं ६० वर्षांचें होतें. या प्रमाणें जैन ग्रंथांत सर- ळ व्यवस्था असतां, चमत्कार वाटण्या जोगी एक गोष्ट आमच्या पंडितांची राजतरं- गिणी ग्रंथांत आढळून येते ती अशीः—

शतेषु षट्सु सार्द्धेषु त्र्यधिकेषुच भूतले॥
कलेर्गतेषु वर्षाणा मभवन्कुरु पांडवाः १॥

अर्थ- राजतरंगिणी ग्रंथाचा कर्ता ह्मणतो कीं, कलियुगाचीं ६५३ वर्षें गत झाल्या- वर कौरव पांडव उत्पन्न झाले. परंतु हें म्हणणें अगदीं चुकीचें आहे, असें वाच- कांनीं समजावें. कारण-“ आरभ्य भवतो जन्म यावन्नंदाभिषेचनं॥ एतद्वर्ष स- हस्रंतु शतंपंच दशोत्तरं॥” ह्मणजे हे जनमेजय, तुझें जन्म झाल्यापासून, नं- दराजास राज्याभिषेक होई पर्यंत, कलियुगाचीं १५१० वर्षें होतील. यांत नउ नंदां- नीं राज्य १०० वर्षें केलें तीं वर्षें, व परीक्षित् राजा व युधिष्ठिर या दोघांच्या राज्य- कारकीर्दीचीं एकंदर वर्षें ९६ मिळून वर्षें १७०६ होतात. ही वर्षसंख्या नंदाच्या- मागून राज्य करणारा जो चंद्रगुप्त, त्याच्या राज्याभिषेकाशीं अगदीं जवळजव- ळ आहे.

दुसरें असें कीं, सर्व तऱ्हेच्या जुन्या व नव्या पंचांगांतून या प्रमाणें लिहि-

लेलें आढळतें. "कलियुगप्रमाण वर्षाणि ४३२००० तन्मध्ये षट् शककर्त्तारः" 'युधिष्ठिरो विक्रम शालिवाहनौ ततो नृपस्या द्विजयाभि नंदनः॥ ततस्तु नागार्जुन भूपतिः कलौ कल्की षड़ेते शककारका नृपाः॥१॥'– इतकें लिहून झाल्यावर नंतर पुढें "अथ गतकलिः ४९८० तन्मध्ये प्रथम इंद्रप्रस्थे युधिष्ठिरस्तस्य शकः ३०४४" "द्वितीय उज्जयिन्यां विक्रमस्तस्य शकः १३५ तृतीयः प्रतिष्ठाने शालिवाहनस्तस्य शकः १८०१ इत्यादि" या वरून कलीचा आरंभ तोच युधिष्ठिर शकाचा आरंभ सर्वमान्य असतां, राजतरंगिणीकाराचें वरील ह्मणणें निवळ चुकीचें आहे, असें म्हटल्या वांचून उपाय नाहीं.

कदाचित् राजतरंगिणीकारानें हा कलियुगाचा संधिकाल धरिला असेल म्हणावें, तर तो काल शास्त्ररीतीनें देवमाना प्रमाणें शंभर वर्षांचा म्हणजे मनुष्यमानानें ३६००० वर्षांचा असतो. म्हणून त्यास व ६५३ वर्षांस मुळींच मेळ नाहीं. असो, आतां युधिष्ठिर मुख्य धरून त्याच्या वंशांत जे एकंदर तीस राजे झाले त्यांचीं नांवें व राज्यकारकीर्दीचीं वर्षें खालीं लिहिल्या प्रमाणें आहेतः– (रा.भा.)

| राजाचें नांव. | व. | म. | दि. | राजाचें नांव. | व. | म. | दि. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ॐ युधिष्ठिर ... ... ... | ३६ | ० | ० | ॐ परिप्लव ... ... ... | ६१ | १० | ४ |
| ॐ परीक्षित् ... ... ... | ६० | १ | ० | सुनय ... ... ... | ७२ | ११ | ३ |
| ॐ जनमेजय ... ... ... | ८४ | ६ | ० | मेधावी ... ... ... | ५८ | ० | ८ |
| शतानीक ... ... ... | ८० | ५ | १९ | नृपंजय ... ... ... | ५० | ८ | २१ |
| सहस्रानीक ... ... ... | ८८ | २ | ८ | ॐ दूर्व ... ... ... ... | ५२ | ४ | ४ |
| अश्वमेधक ... ... ... | ८१ | ११ | २४ | ॐ तिमि ... ... ... ... | ४८ | १० | २९ |
| असीमकृष्ण ... ... ... | ७५ | ८ | ८ | बृहद्रथ ... ... ... | ४७ | ८ | १७ |
| ॐ निमिचक्र ... ... ... | ७५ | १० | ८ | ॐ सुदास ... ... ... | ४७ | ११ | ० |
| ॐ चित्ररथ ... ... ... ... | ७७ | ७ | ७ | ॐ शतानीक ... ... ... | ४४ | ८ | १७ |
| ॐ रुचिरथ ... ... ... | ७९ | ८ | २९ | सोमक ... ... ... | ५६ | ० | ० |
| वृष्टिमान् ... ... ... | ६१ | ० | २ | दुर्दमन ... ... ... | ५४ | १० | ० |
| सुषेण ... ... ... | ६५ | १० | १५ | ॐ वहिनर ... ... ... | ५१ | ११ | ८ |
| सुनीथ ... ... ... | ६४ | ७ | २ | ॐ दंडपाणि ... ... ... | ४८ | ७ | ४ |
| ॐ नृचक्षु ... ... ... | ५५ | ९ | २ | ॐ निमि ... ... ... | ५८ | ५ | १५ |
| ॐ सुखीनल ... ... ... | ६२ | ० | ३ | ॐ क्षेमक–लक्ष्मीदेव.. | ४९ | ० | २५ |

एकंदर १८५३ वर्षे. ४ महिने. १२ दिवस.

या नांवांत ज्यांच्या नांवावर फुली आहे, त्यांच्या कारकीर्दीत कांहीं विशेष गोष्ट घडली आहे असें समजावें. तेंच सविस्तर लिहून दाखवितों:- युधिष्ठिराच्या कारकीर्दीत त्याच्या शकाचा आरंभ व कलियुगास आरंभ होऊन, काश्मिराकडे सप्तर्षीचा शक चालू झाला. म्हणजे युधिष्ठिर शकाच्या पंचविसाव्या वर्षापासून सप्तर्षि पृथिवीवर कोणास भेटेनातसे झाले. परीक्षित् सर्पदंशानें मरण पावला. जनमेजयानें सर्पसत्र केलें. निमिचक्राच्या कारकीर्दीत भागीरथीच्या पुरानें हस्तनापुर वाहून गेलें. व त्यानें आपली राजधानी कौशांबी नगरी केली. चित्ररथाच्या कारकीर्दीत युधिष्ठिर शक ६६१ व ६६२ मध्यें चार्वाक व क्षपणक उत्पन्न झाले. रुचिरथाच्या वेळेस ७२६-७२७ त दोघेही आपलें नास्तिक मत स्थापून मरण पावले. नृचक्षूच्या कारकीर्दीत युधिष्ठिर शक ९७२ मध्यें पहिला बुद्ध जन्मला. सुखीनलाच्या कारकीर्दीत जरासंध वंशाची समाप्ति होऊन मगध देशांत प्रद्योत राजे राज्य करूं लागले. परिप्लवाच्या कारकीर्दीत युधिष्ठिर शक १०६४ मध्यें पहिला बुद्ध मरण पावला. व मगध देशांत शिशुनाग राजांची कारकीर्द ह्या मरण पावल्यावर सुरू झाली. दूर्वराजाच्या कारकीर्दीत यु० श० १३१२त शौद्धोदनी नांवाचा दुसरा बुद्ध जन्मला. तिमिराजाच्या कारकीर्दीत यु० श० १३८८ मध्यें दुसरा बुद्ध मेला. सुदासाच्या वेळीं यु० श० १४४५ मध्यें अर्हत जन्मला. शतानीकाच्या वेळीं यु० श० १५३३ मध्यें अर्हत मरण पावला. वहिनराच्या वेळीं नंदराजांची राज्यसमाप्ति झाली. व शेवटला नंद यु० श० १६९२ मध्यें मारला जाऊन १६९३ मध्यें चंद्रगुप्त राज्यावर बसला. तसाच पाणिनीही उदयास आला. दंडपाणीच्या वेळीं म्हणजे त्याच्या मरण समयास यु० श० १७४५ मध्यें अशोक गादीवर बसला. निमीच्या वेळेस यु० श० १७९१ मध्यें अशोक मरण पावला. याच निमीच्या वेळेस देवगड किल्ला व वेरूळचें लेणें तयार झालें. ( अशोकाच्या नांवांवर त्यानें वीरसेन वंशाची समाप्ति केली. असें मागें लिहिलें गेलें तें नजरचुकीचें आहे. ) क्षेमकास त्याच्या वीरसेन प्रधानानें मारिलें. व कौशांबींतून गादी इंद्रप्रस्थास (दिल्लीस) पुनः नेऊन तेथें राज्य करूं लागला. युधिष्ठिर शक सुमारें १८५४.

युधिष्ठिरविजयकाव्य- वासुदेवपंडितकृत संस्कृत भाषेंत. [आहेत.

योगयात्रा- ज्योतिष विषयावर वराहमिहीरकृत संस्कृत ग्रंथ. याचे श्लोक ७००

योगराज- मरवाच्या ग्रंथाच्या परीक्षेस जमलेल्या तीस पंडितांतील एक. हा एक

मोठा काव्यशाला गुरु होता. याचा ग्रंथ पादप्रकरण नांवाचा आहे. (बु० का० शो०)

**योगशास्त्रनिबंध–** हेमचंद्र पंडित कृत संस्कृत भाषेंत. [ हेत.

**योगसंग्राम–** शेखमहंमद कृत मराठी भाषेंतील ओंवीबद्ध ग्रंथ. याचीं प्रकरणें १९ आ-

**योगसूत्रव्याख्या–** भोजराजकृत संस्कृत भाषेंत.

**योगाचार बौद्ध–** बुद्धाचे चार शिष्य होते त्यांतील एक. याचें जें मत तें योगाचार मत. यास योगाचार नांवाचें प्रयोजन होतें तें असें– याच्या मतें अप्राप्त अर्थाची प्राप्ति म्हणजे जो अर्थ जसा आहे तसा तो कळण्या साठीं त्यावर पर्यनुयोग(शं-कोत्थापन)करून खात्री करून घेणें याचें नांव योग. आणि आचार म्हणजे गुरूनें सांगितलें त्याचा अंगीकार करणें हे बाह्यपदार्थ शून्यरूप मानितात. व स्व-संवेदन म्हणजे बुद्धि तेंच तत्त्व समजून तिच्यांत असलेले अर्थ तेच बाहेर भ्रमेंकरून दिसतात. वस्तुत: नाहींत असें म्हणतात. (सर्वद०).

**योगानंद–** हा देशस्थ आश्वलायन ब्राह्मण सोनपेठ येथील राहणारा होय. हा उ-त्तम विद्वान् होता. पंचीदशीवर याची मराठी ओंवीबद्ध टीका आहे. याची स-माधि १७८८च्या सुमारास सोनारी येथें झाली.

**रखुमाबाई–** निवृत्ति, ज्ञानेश्वर, सोपान व मुक्ताबाई या सर्व भावंडांची आई. [ज्ञा.

२– थोरले चिमणाजी आपा यांची बायको. ही पेठे उपनावाच्या गृहस्थाची क-

**रंगनाथपंडित–** भास्कराचार्य कृत गणिताध्याय व गोलाध्याय यांवरील गूढार्थ प्रकाशिका नामक टीकेचा कर्ता.

**रंगनाथस्तोत्र–** श्रीरंगपत्तन येथील रंगनाथ देवाचें स्तवन.

**रंगनाथ स्वामी–** पंढरपुरा पासून सुमारें पंधरा सोळा कोसांवर नाझरें म्हणून गां-व आहे. तेथील हा राहणारा होता. याच्या बापाचें नांव गोपाळपंत व आईचें नांव बयाबाई होतें. गोपाळपंतांनीं पुढें सन्यास घेतला असतां, त्यांचें नांव नि-जानंद असें झालें. गोपाळपंतास तीन पुत्र होते. त्यांतील हा मधला होता. या-च्या वडील भावाचें नांव यादवराव होतें. तोच सन्यास घेतल्यावर ब्रह्मानंद नांवा-नें प्रसिद्ध झाला. व प्रसिद्ध जो रामविजयादिक ग्रंथांचा कर्ता श्रीधर, त्याचा तो बाप होता. रंगनाथाच्या धाकट्या भावाचें नांव विठ्ठलराव होतें. व तो आत्मा स्वामी या नांवानें प्रसिद्ध असे.

रंगनाथ स्वामि आपल्या दोघां भावां प्रमाणें गृहस्थाश्रमांत शिरला ना-हीं. ब्रह्मचारीच राहिला. हा जातीचा वाजसनी ब्राह्मण, रूपानें सुंदर व शिपाई

बाण्यानें राहणारा असे. असें सांगतात कीं, हा एकदां दक्षिण हैदराबादेस गेला असतां, यास पाहून चंद्रंमा आणि तारंमा नांवाच्या एका कायताच्या दोघी मुली, यास भुलून त्यानीं यास युक्तीनेंच एकांतीं गांठलें. व आपली पापवासना दर्शित केली. परंतु हा त्यांस वश झाला नाहीं.

याला ब्रह्मविद्येचा अनुग्रह बापा पासूनच होता. ये विषयीं याचीं पदें-च साक्ष देत आहेत. लघुवासिष्ठावर याची मराठींत ओंवीबद्ध टीका आहे. समर्थ रामदास स्वामींच्या पंचायतनांत याची गणना होती. समर्थांची वारंवार भेट व्हावी म्हणून हा पुढें निगडीस राहूं लागला. निगडी गांवचा दरवाजा परळी किल्ल्या वरून ( सज्जन गडा वरून ) स्पष्ट दिसतो. एकदां समर्थ निगडीस गेले. तेव्हां यानें त्यांचा मोठा सत्कार केला, व त्यांस राहून घेतलें. एके दिवशीं असें झालें कीं, हा स्नानसंध्येस गेला असतां, समर्थांनीं कोळसा घेऊन भिंतीवर एक श्लोकार्ध लिहिलें:-

अद्वैत वार्त्ता कंटाळवाणी॥ सांडून भजावा कोदंडपाणी॥

हें श्लोकार्ध यानें पाहिलें व समर्थांनीं माझी निष्ठा अद्वैताच्या ठिकाणीं सदृढ आहे, किंवा कसें? ही परीक्षा पाहण्या करितां हें लिहिलें आहे असें जाणून, त्याच पूर्वार्धा-खालीं उत्तरार्ध लिहिलें तें येणें प्रमाणें होतें:-

अद्वैत वार्त्ता जंवरी कळेना॥ तंव राम नामीं मनहें वळेना १

असें उत्तरार्द्ध समर्थांनीं पाहून ते संतोष पावले. व सज्जनगडास निघून गेले.

वरती आम्हीं असें लिहिलें आहे कीं, हा शिपाई बाण्यानें राहात असे. तो याचा बाणा असा होता कीं, डोकीस शेंदीडशें रुपयांचा मंदील. कानांत दोन अडीचशें रुपयांची भिकबाळी. पायांत मोठ्या किंमतीची तुमान, अंगांत भरजरीचा आंगरखा. हातांत भाला. पाठीशीं ढाल व तिरकमान. पांच सहाशें रुपये किमतीचा बसण्याचा घोडा. डाव्या पायांत शंभर सवाशें भार चांदीचा तोडा. व बरोबर धावणारे वीस पंचवीस लंगोटबंध खरेखरे ब्रह्मचारी. या प्रमाणें थाटानें कोठें जाणें झाल्यास जाऊन मुक्कामास उतरले, व अंगावरील पोषाक उतरला कीं, आंत पाहावी तर बळकट लंगोटी असे. असो. याचीं पदें मोठीं ठेकेदार आहेत त्यांतील एक मासल्या साठीं येथें लिहितों:-

जगीं साधु विरळा जगीं साधु विरळा॥ कचित डोळस इतर लोक तिरळा॥ जगीं साधु विरळा जगीं साधु विरळा॥ ध्रु॰॥ हंस कोकिल शुका

काक उलुका बका ॥ सरिकाय माणिका आणि हरळा ॥ १ ॥ जगीं० ॥ नाचरे वेदोक्त मूढ विषयासक्त यातना दुःख दुर्निवार भोगी ॥ सुजन सद्भक्त साधनचतुष्टय युक्त गुरुमुखें उपनिषत्सार भागी ॥ २ ॥ जगीं ॥ ज्ञानानळें अहं ममपाश जाळिले वाळिले षड्वर्ग श्वपच जैसे ॥ किं कुंजर प्राण हरण करी केसरी मर्दिले दुष्ट ते अपज तैसे ॥ जगीं० ॥ ३ ॥ सकळ भूतीं भपण वास तैसा निपुण रंगुनी निजगुणीं ब्रह्म झाला ॥ जाणुनी हेंचि वर्म पावुनी स्वकिय सद्य श्रीगुरूदत्त संप्राप्ति त्याला ॥ जगीं साधु विरळा० ॥ ४

याच्या निगडीच्या मठांत श्रीकृष्ण मूर्ति आहे. त्यावरून हा कृष्णभक्त होता असें दिसतें. बृहद्वाक्य वृत्तीवर ही याची टीका आहे. याची समाधि शके १६०६ मध्यें निगडीस च झाली. हल्लीं निगडी येथें याच्या धाकट्या भावाचे वंशज आहेत. (क० चरि०). रामदासच० व वृ० मा०).

**रंगपुर**– बंगाल्यांतील हा एक जिल्ह्याचा गांव आहे.

**रघुदेव**– आख्यातवाद टिप्पणीनामक संस्कृत ग्रंथाचा कर्ता. (बु० शोध०)

**रघुनंदन**– हा भावनगरचा राहणारा ज्ञातीचा प्रश्नोरा नागर ब्राह्मण होता. यानें कित्येक ग्रंथ लिहिले आहेत. परंतु याचा काळ समजत नाहीं. (काव्य० दो०).

**रघुनाथ**– प्रख्यात जो मुकुंदराज त्याचे हे गुरु.

२– प्रसिद्ध जे वल्लभाचार्य त्यांचा नातु. विठ्ठलनाथाच्या सात मुलांतील एक.

३– हा एक रजपूत ज्ञातीचा पुरुष कवि होता. संस्कृत भाषेंत जेवढे न्याय म्हणून आहेत. जसे देहलिदीपन्याय–स्थूणानि खननन्याय इत्यादि. त्यां विषयीं लौकिकन्याय संग्रह नांवाचा संस्कृत ग्रंथ यानें केलेला आहे. (बु० का० शो०).

**रघुनाथदास**– अमदाबादे जवळ गोमतीपुर म्हणून आहे. तेथील हा राहणारा ज्ञातीचा लेउवा कुळंबी होता. श्रीमद्भागवत, रामायण, ध्रुवाख्यान, अभिमन्यु विवाह, चक्रव्यूह वर्णन व छप्पा इत्यादि विषयक याची कविता गुजराथींत आहे. शके १७०१ मध्यें हा होता. (काव्य दो०).

**रघुनाथपंडित**– हा कवि शके १७०० मध्यें होता. नलदमयंती स्वयंवराख्यान यानें मराठी भाषेंत श्लोकबद्ध केलेलें आहे. हा ग्रंथ शृंगार रस प्रधान आहे. यांत यमकादिक शब्दालंकार व उपमा, उत्प्रेक्षादिक अर्थालंकार यानें चांगले साधले आहेत. श्लोकही अनेक छंदांनीं युक्त आहेत. ग्रंथाची रचना संस्कृत मिश्रित असतांही क्लिष्ट नाहीं. हा पंडित आनंदतनय नामक कवीचा व्याही होता. (क० च० वृ० मा०)

रघुनाथपंडित अमात्य– शिवाजी राजाच्या अष्टप्रधानांतील एक. राजव्यवहारकोशाचा कर्ता.

रघुनाथभट्टजी– नासिक येथें जे प्रख्यात भट्टजी महाराज होऊन गेले तेच हे. हे मोठे योगी व सिद्ध पुरुष होऊन गेले. हे जातीचे कऱ्हाडे ब्राह्मण होते. यांचें मूळ गांव विजापुराकडे असून यांचें उपनांव अळवणे होतें. प्रसिद्ध अच्युतरावजी मोडक वगैरे पंडित; अध्ययन संबंधानें यांचे शिष्य होते. यावरून हे मोठे विद्वान्ही होते, असें उघड समजतें. कठवल्ली उपनिषद्यावर यांची टीकाही असल्याचें ऐकतों. यांची समाधि शके १७४२ मध्यें झाली. यांच्या मागें यांचे पुतण्ये केशव भट्टजी नासिकास होते. त्यांची व आमची भेट तर शके १७६६ मध्यें प्रत्यक्षच झाली होती. (ग्रन्थमा०).

रघुनाथराव– थोरल्या बाजीराव साहेबांचा मुलगा, व धाकट्या बाजीरावाचा बाप. हा पुरुष मोठा शूर होता. यास राघो भरारी असेंही लोक म्हणत; कारण प्रसंगानुसार हा मोठाल्या मजला करून शत्रूस गांठी. याच्या तरवारीस इतकें यश असे कीं, जेथें हा जाई, तेथें याची फत्तेच होई. परंतु बायकोच्या नादानें नारायणरावास मारविल्यावर, याचें तेज जें गेलें तें अगदींच गेलें. व इंग्लिशांस चार आणे देणें जरी यानें स्वराज्या पैकीं ठरविलें. तरी यास त्यांत लाभ म्हणून कांहींच न होतां, उलटा तो करार पेशव्यांचें राज्य बुडण्यास मात्र कारण झाला.

रघुनाथशास्त्री पर्वते– प्रसिद्ध राघवाचार्यांचे शिष्य. यांचा न्यायावर न्यायरत्न नांवाचा ग्रंथ आहे. व मध्वमत खंडनपूर्वक शांकर दर्शन प्रतिपादनपर, शंकरपादभूषण नांवाचाही एक मोठा ग्रंथ आहे. हे शके १७८९ त मरण पावले.

रघुनाथस्वामी– आनंदमूर्ति ब्रह्मनाळकर त्यांचे गुरु.

रघुराम– कालनिर्णय ग्रंथाचा टीकाकार. (बु०का०शो०).

रघुवंशकाव्य– विक्रम सभेंतील कालिदासकृत काव्य. याचे सर्ग १९ आहेत. व यांत सूर्यवंशी प्राचीन राजांचें वर्णन आहे.

रघुवंशटीका– मल्लीनाथकृत संस्कृत.

रघुवीरगद्य– वेदांताचार्यकृत संस्कृत.

रणक– कलियुगांतील सूर्यवंशोत्पन्न राजा. क्षुद्रक राजाचा पुत्र व सुरथ राजाचा बाप. दुसऱ्या बुद्धाच्या मागून झालेला दुसरा पुरुष. (रा०मा०)

रणछोड– कृष्णमूर्ति.

**रणछोडजी दिवाण**– हा वडनगरी नागर ब्राह्मण शके १७९३ मध्यें जुनागड येथें होता. गुजराथी भाषेंत यानें देवीवर्णन ग्रंथ लिहिला आहे. (काव्यदो०).

**रणछोड भगत**– तोरणानामक गुजराथेंतील एका गांवचा राहणारा जातीचा गूढ वाणी होता. यानें गुजराथींत सीता मारुती संवाद व रावण मंदोदरी संवाद लिहिला आहे. परंतु हा कधीं होता तें कळत नाहीं. (का० दो०)

**रणंजय**– कलियुगांतील सूर्यवंशी राजा. कृतंजय राजाचा पुत्र. व संजय राजाचा बाप. हा दुसऱ्या बुद्धाच्या पूर्वींचा त्याचा चौथा पूर्वज होता. (रा० मा०)

**रणजितसिंग**– शीख लोकांचा लाहोर येथील राजा. हा महासिंगाचा पुत्र. नानकाच्या गादीवरील बंदागुरू त्याच्या मागें हाच त्या गादीवर झाला. याचें जन्म शके १७०२ मध्यें होऊन १७६१ त मरण पावला. याच्या बायकोचें नांव महिताब कुंवर होतें. हा मरण पावल्यावर याचा मुलगा खरकसिंग गादीवर बसला. (हिंदु० छापील इ०).

**रतनगिरि**– म्हैसूर प्रांतांतील गांव.

**रत्नकंठ**– युधिष्ठिरविजयटीका व स्तुतिकुसुमांजली टीका यांचा कर्ता. हा औरंगजेबाच्या वेळेस होता. (बु० का० शो०).

**रत्नधर**– काशीमहात्म्य ग्रंथाचा कर्ता. (बु० का० शो०).

**रत्नपरीक्षा**– अपय्यादीक्षित कृत वेदांत प्रकरणावरील ग्रंथ. (बु० शो०).

**रत्नमहेश्वरोपाध्याय**– सरस्वती कंठाभरण ग्रंथाचा टीकाकार.

**रत्ना**– खेडा जिल्ह्यांतील राहणारा हा गुजराथी कवि जातीचा भावसार (रंगारी) होता. शके १६६० मध्यें हा असे. व यानें बारामास वर्णन नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. (का० दो० गु०)

**रत्नाकर**– काव्यालोकलोचन अथवा सहृदयलोक आणि ध्वनिगाथा पंजिका या दोन ग्रंथांचा कर्ता. (बु० का० शो०).

२– हरविजयकाव्य, रामचरित, कादंबरीकथासार, आणि ध्वनिशास्त्र टीका इतक्या ग्रंथाचा कर्ता. हा शालिवाहनाच्या ८ व्या शतकाच्या उत्तरार्धांत होता. (बुल्ह० का० शोध.)

**रत्नागिरि**– दक्षिण कोंकणांतील जिल्ह्याचें ठिकाण. हें शहर आहे.

**रत्नावलीनाटक**– श्रीहर्षकृत.

**रत्नेशक**– न्यायविषयावर लक्षण संग्रह नामक ग्रंथाचा कर्ता. (बु० का० शोध.)

रंभानाटक– लक्ष्मीनारायणाख्या यानें केलेलें आहे.

रमयदेव– मंखाच्या ग्रंथाची परीक्षा करण्या करितां काश्मीर येथें जे ३० पंडित जमले-होते त्यांतील हा एक. हा वैदिक असून विद्वान् होता. (बु० का० शो०).

रमाभक्त– कोल्हापूर येथील महालक्ष्मीचा उपासक. पहिल्या शंकराचार्यांच्या वेळस हो-ता.(आनं० गिरी० शंकर० प्रक० २०).

रमावल्लभदास– हल्लीं सोलापूर येथें जे रायरासकर आहेत,त्यांचा मूळपुरुष. हा मोठा सावकार व कृष्णउपासक होता. साधु व कवि यांत याची गणना आहे. याचें मत अ-द्वैत होतें. अशाविषयीं याचा एक अभंग खालीं दाखविला आहे. हा देशस्थ आश्व-लायन ब्राह्मण होता. व रामजोशाच्या पूर्वीचा आहे. (हस्त्मा०).

> बोले चाले हरी ॥ ज्याची कथा तोची करी ॥१॥ होउनीयां श्रोता वक्ता॥
> गाय ऐके आपुली कथा ॥२॥ विश्वरूप परिपूर्ण ॥ अवघा एकचि
> नारायण॥३॥ विनवी रमावल्लभदास ॥ अवघा हरीचा विलास॥४॥

रविकीर्ति– हा कवि होता इतकेंच आढळतें.

रविसूनु– त्रिपुर दहन काव्याचा कर्ता. (बुल्ह० को०).

रवीनदी– पंजाबांतील इरावती नदीचें हल्लीं चाललेलें नांव.

रसकल्लोळ– दीनकृष्णदासकृत ग्रंथ.

रसगंगाधर– अलंकारशास्त्र विषयक जगन्नाथराय पंडितकृत संस्कृत ग्रंथ.

रसमंजरि– कृष्णदेव रायछूकृत तेलंगी भाषेंतील ग्रंथ.

रसमंजरिपरिमळ– चिंतामणि कविकृत संस्कृत भाषेंत.

रससिंधु– वल्लभ मताचा ग्रंथ.

रसाळरामायण– साव्या रसाळ कविकृत मराठी भाषेंत.

रसिकमुरार– हा जातीचा ब्राह्मण साधु व दयार्णव बैराग्याचा शिष्य होता. मथुरा प्रांतीं सायनगांवीं हा रहात असे. साधुसंतांची सेवा व गुरुभक्ति हीं त याचीमो-ठी निष्ठा होती. गुरुभक्तीविषयीं याची एक गोष्ट अशी आहे कीं, याच्या गुरूस देवाच्या नैवेद्या करितां असलेला इनाम तालुक्याच्या नव्या इजारदारानें जप्त-केला. त्यावरून गुरूनें यास इतकेंच पत्र लिहिलें कीं, तूं जेवीत असलास तर आंचवावयास येथें ये. हें पत्र यास पावलें. त्या वेळेस हा खरोखरीच जेवीत हो-ता. ह्मणून तसाच उठला. तो हात न धुतां गुरूच्या गांवीं आला. व प्रथम गुरु-

दर्शन घेऊन, नंतर यानें हात धुतले. पुढें यानें गुरूस काय आज्ञा आहे म्हणून पुसलें. गुरूनें गांव जप्त झाल्याची हकीकत सांगून यास ह्मटलें कीं, यत्न करून गांव सोडीव. तेव्हां हा इजारदाराकडे गेला. इजारदारानें याचें बोलणें वगैरे कांहींच मनास न आणितां, उलट महातास सांगून याच्या अंगावर हत्ती घातला. परंतु हत्ती यासमोर येतांच, त्यानें याच्या पुढें पुढील दोनी पाय लववून मस्तक नम्र केलें. यास कांहींच इजा केली नाहीं. असें पाहून इजारदारानें हा भगवद्भक्त साधु आहे असें जाणून, याच्या गुरूच्या गांवावरची जप्ती मोकळी केली. (भक्तवि० अ० ३७).

**रसिकसंजीवनी—** अर्जुनवर्मा नामक राजानें संस्कृतांत केलेला ग्रंथ.

**रसेश्वरदर्शन—** सर्वदर्शन संग्रहांत हें दर्शन सायण माधवाचार्यांनीं लिहिलें आहे. यांत, हा प्रत्यक्ष देह चिरकाळ वांचण्याचा उपाय आहे. व तो पाऱ्या पासून साध्य होतो. याच्या योगानें पुष्कळ सिद्धि पावलेले आहेत. श्रीमच्छंकराचार्यांचे गुरु गोविंदभगवत्पादाचार्य आदि करून सिद्ध अजून आहेत. असें रसेश्वरसिद्धांता वरून कळतें. साकार सिद्धि ग्रंथा वरून विष्णुस्वामींसही ही गोष्ट संमत आहे.

**रहस्यत्रयसार—** हा ग्रंथ वरदाचार्यकृत संस्कृतांत आहे.

**राऊबाई—** अनंतफंदीची आई.

**राकाकुंभार—** हा जातीचा परदेशी कुंभार होता. परंतु हा कोठें राहात असे त्याचा शोध लागला नाहीं. हा मोठा वैराग्यशील व पुरा ज्ञानी भक्त होता. याच्या बायकोचें नांव बंका. व मुलीचें नांव बांका होतें. याच्या चमत्काराच्या गोष्टी भक्तविजयाच्या सत्राव्या अध्यायांत लिहिल्या आहेत. त्या येथें ग्रंथविस्तार भयास्तव आम्हांस लिहितां येत नाहींत, म्हणून एक गोष्ट सांगण्या जोगी आहे. तेवढी मात्र सांगतों. याची मुलगी बाका व हा एकदां सर्पण वेंचण्यास रानांत गेला. तेथें सर्पण वेंचतां वेंचता, यास एक रत्नजडित कंकण सांपडलें. तेव्हां तें यानें पुनः वरती माती व सर्पण टाकून स्वतः न घेतां आच्छादून टाकिलें. हें कृत्य याच्या मुलीनें पाहून बापास ह्मटलें बाबा, आपण ज्ञानी असतां, अजून आपणांस आत्मरूपाहून सोनें भिन्न आहे, हें द्वैत भासतें हें कसें? जर भासत नाहीं, तर त्यावर माती घालून झांकण्याचें कारण काय? दुसरें माती नीच व सोनें उंच ही तरी विषमदृष्टि नव्हे काय! तेव्हां आपल्या ठिकाणीं समत्व बुद्धि, तशीच नामरूपा विषयीं मिथ्यत्व बुद्धि झाल्याचें चिन्ह कसें समजावें. हें तिचें भाषण

ऐकून यास अतिशय आनंद झाला. व आपली मुलगी इतकी विचारवान् आहे ये-णें करून यास समाधान होऊन ह्मणाला. बेटा, तूं ह्मणत्येस तें खरें आहे. परंतु जेथें व्यवहार आहे, तेथें पदार्थमात्रीं व्यावहारिक सत्यत्वही आहे. आणि तें आहे ह्मणून क्रियाही द्वैतरूपानें भासणें संभाव्य आहे. आपल्या कारखान्यांत रांजण व घागर एका मातीचींच असतां, रांजणांत पाणी सांठवावें व घागरीनें त्यांत भरावें असें कां असावें? रांजणांनेंच पाणी कां भरूं नये बरें? बरें हें क्रियातारतम्य असतां, रांजण व घागर उंच नीच झाली असें ज्या प्रमाणें होत नाहीं. त्याच प्रमाणें सोनें व माती मला उंच नीच न स्फुरतां, क्रियातारतम्य लोकव्यवहारानुरूप झालें असें समज. त्यावरून मुलगी उगीच राहिली. (भ० वि० अ० १७)

**राघवपांडवीयकाव्य**– हें काव्य द्व्यर्थ आहे. म्हणजे यांत रामकथा व पांडव कथा दोन्ही बांधल्या आहेत. हें काव्य बुल्हरच्या शोधावरून काश्मीराकडील कविराज ह्मणजे कविराज शेषधर पंडितानें संस्कृतांत रचलेलें आहे. व दुसरें कविचरित्रावरून पिंगळसूरण्णा नामक तेलंग कवीनें केलेलें आहे. या प्रमाणें दिसून येतें.

**राघवेंद्राचार्य**– त्रिपथगा नामक व्याख्येचा कर्ता. हा गजेंद्रगडचा राहणारा असे.

**राजक**– पांच प्रद्योत राजांतील चौथा. विशाखयूपाचा मुलगा. व नंदीवर्द्धनाचा बाप. (राजभा०).

**राजकुंद**– किरातकाव्य दुर्घट ग्रंथाचा कर्त्ता.

**राजगृह**– केकय देशाची राजधानी गिरिव्रज, त्याचें नांव. हें अमृतसरा नजीक आहे. २– मगध देशाची राजधानी जें गिरिव्रज नगर तें. हें बहार शहरा लगत आहे.

**राजतरंगिणी**– काश्मीर देशाचा इतिहास. याचे चार भाग आहेत. पहिला भाग कल्हणपंडित कृत. शके १०७१ पर्यंतच्या हकीकतीचा. दुसरा भाग जोनराज पंडितकृत शके १३३४ पर्यंत. तिसरा भाग श्रीवर पंडित कृत शके सुमारें १३९९ पर्यंत. व चौथा भाग प्रजय भट्टकृत शके सुमारें १७२५ पर्यंत. हा ग्रंथ नीलमत पुराणाधारें झालेला आहे. (बुल्हरचा काश्मीराकडील शोध.)

**राजतरंगिणीसंग्रह**– साहेबराम कविकृत.

**राजधर्म भाषांतर**– जगन्नाथ कविकृत तेलंगी भाषेंत.

**राजनरेंद्र**– शार्ङ्गधर पंडिताचा बाप. राजमहेंद्री शहरचा राजा. शालिवाहन शके ३२२ मध्यें होता. या वरून हा राजा सुमारें दीड हजार वर्षां मागें होता. (क०)

**राजनीति**— बंधन कविकृत संस्कृत भाषेंत. २ देवीदासकृत संस्कृत भाषेंत. हिचे श्लोक ४५० आहेत.

**राजपुर**— अमरावादे जवळचा गांव.

**राजपुरी**—- काश्मिरांत श्रीनगरच्या ईशान्येस सुमारें चार कोसांवर असणारा गांव

**राजमहेंद्री**— तैलंगणांतील शहर. हें गोदावरीच्या तीरीं आहे. याचे उत्तर अक्षांश १७° व पूर्वरेखांश ८४° आहेत.

**राजमार्तंड**— हा संस्कृत ग्रंथ, भोजराजकृत ह्मणतात.

**राजयोग**— मराठींत वामनपंडितकृत. हा वेदांत विषयावर आहे.

**राजव्यवहारकोश**— शिवाजी राजाच्या अष्टप्रधानांतील अमात्य रघुनाथपंडित, त्यानीं फारसी शब्दास संस्कृत पर्याय देऊन राजाज्ञेवरून केलेला कोश. (छ०)

**राजशेखर**— कोणी एक कवि. मंखाच्या ग्रंथांत याचें नांव आहे. म्हणून हा त्या-च्या पूर्वीं होता. (मंख श० पहा).

**राजशेखरचरित्र**— हें चरित्र मलय्या कवीनें तैलंग भाषेंत लिहिलें आहे.

**राजशेखर राजा**— केरल देशाचा राजा. दुसऱ्या शंकराचार्याच्या वेळेस होता. यानें तीन नाटकें लिहिली आहेत. (मा० शं० वि०).

**राजस्थान**— रजपुताना प्रांत.

**राजाई**— प्रसिद्ध जो नामदेव शिंपी त्याची बायको.

**राजागिरिधर**— माळव्यांत दिल्लीच्या बादशाहाकडून होता सुभेदार तो. हा जातीचा नागर ब्राह्मण होता. थोरल्या बाजीरावाशीं हा वांकडा तिकडा वागूं लागल्यामुळें, त्यानें याची चांगलीच खोडकी जिरविली. तेव्हां हा ताब्यावर आला. (हिंदु० इ०)

**राजानक गोपाल**— प्रद्युम्नशिखर पीठाष्टक व शिवमाला या दोन ग्रंथांचा कर्ता. (बु०)

**राजापुर**— दक्षिण कोंकणांतील एक शहर. येथें प्रतिवर्षीं गंगेचें आगमन होतं अ०

**राजाराममोहनराय**— हा रामकंठराय नामक एका बंगाली ब्राह्मणाचा मुलगा होता. रामकंठराय मुर्शिदाबाद येथील सरकारच्या पदरीं असे. परंतु त्याचा तेथें कांहीं अपमान झाल्यामुळें, तो आपल्या वतनाचा गांव राधानगर येथें परत येऊन राहिला. राममोहन याचें जन्म शके १६९६ मध्यें झालें होतें. हा मोठा झाल्यावर यानें स्वभाषेचा अभ्यास प्रथम केला. व तींत चांगलाच हुशार झाला. याची लिहिण्याची शैली चांगली होती. पुढें यानें आरबी व फारसी भाषांचा अभ्यास चालना

शहरांत केला. नंतर काशीस जाऊन संस्कृत शिकला. या प्रमाणें हा चांगला विद्वान् झाला. परंतु धर्माच्या कामांत याचें मत निराळें झालें. पुराणें तर सर्वथैव खोटींच, असें याचें मत होऊन, मूर्तिपूजा करणें वाईट असें यास वाटूं लागलें. व याच समजुतीवर प्रथम मूर्तिपूजानिषेध हा ग्रंथ यानें लिहिला. त्या मुळें बापाच्या वगैरे मनांतून हा अगदीं उतरला.

पुढें यानें पाहिलें कीं, बापाची मर्जी आपल्यावर नाहीं. म्हणून हा तिबेटांत गेला. परंतु लौकिकारूव बापानें यास परत आणिलें. पुढें हा इंग्रजी शिकूं लागला. व त्यांतही सामान्य पक्षानें बराच हुशार झाला. याची बुद्धि तीव्र होती. तीमुळें जेवढें यास इंग्रजी येत होतें, तेवढेंच परंतु तें चांगल्या रीतीनें बोलतां व लिहितां येत होतें. कांहीं दिवसांनीं याचा बाप व थोरला भाऊ वारला. म्हणून यानें रंगपुर येथील कलेक्टर कचेरींत कारकुनीची जागा पतकरिली. व सर्व कुटुंबाचा निर्वाह चालवूं लागला. कांहीं दिवसांनीं त्याच कचेरींत हा चिटणीस झाला. तेव्हां यानें एक जमीन खरेदी केली. तीन याच्या स्फदैवानें यास सालीना प्राप्ति दहा हजारांची होऊं लागली. असें पाहून यानें कलकत्यांत एक बाग व बंगला खरीद करून, थोड्याच दिवसांनीं चाकरी सोडिली. व कलकत्यास येऊन राहिला. नंतर यानें आपणास इष्ट जें धर्मप्रकरण, तें पुनः हातांत धरिलें. व तें आपलें वय चाळीस वर्षांचें होई पर्यंत ह्मणजे सुमारें वीस वर्षें पावेतों मोठ्या प्रयास्यानें व परिश्रम घेऊन चालविलें. त्यांत याच्या मूर्तिपूजा निषेधास बरीच मंडळी अनुसरली. त्या योगानें यानें सती जाणें वाईट अशा बद्दल जे अर्ज सरकारास केले, ते तत्काळ पुष्कळ सह्या झाल्यानें लागू होऊन, गवरनर जनरल लार्ड बेंटिक याच्या कारकीर्दीत, शके १७५० च्या सुमारास, स्वतंत्र संस्थानें खेरीज करून हिंदुस्थानांत सती जाणें अगदीं बंद झालें.

यानें शके १७४४ मध्यें आपल्या धर्म प्रकरणाची कलकत्यांत ब्रह्मसमाज नांवानें एक सभा स्थापन केली. तिजमध्यें हल्लीं दुफळी आहे. असो. हा दिल्लीचे बादशहाच्या तर्फे वकील होऊन विलायतेस गेला होता. तेथून परत येऊन पुनः गेला. व तिकडे देश व शहरें पहात हिंडत असतां, ब्रिस्टल नांवाच्या शहरांत मरण पावला. (कवि० चरि०).

राजावलि— क्षेमेंद्र कविकृत संस्कृत भाषेंत.

राजावलीपताका— प्राज्यभट्टकृत संस्कृत भाषेंत.

**राजे**– हा गोसावी जातीचा पुरुष अमदाबाद येथें राहात असे. हा कधीं होता तें कळत नाहीं. मात्र गुजराथी भाषेंत राधास्वप्नवर्णन नांवाचा याचा ग्रंथ आहे.(का.)

**राजेबहादर**– पेशव्यांच्या पदरचा एक ब्राह्मण सरदार.

**राज्यदेवी**– बाणभट्टाची आई.

**राणूबाई**– समर्थ रामदास स्वामीची आई.

**राणोजीशिंदा**– हाल्लीं हिंदुस्थानांत जें शिंद्यांचें राज्य आहे, त्याचा मूळसंपादक हा पुरुष होता. साताऱ्या पासून ६ कोसांवर कण्हेरखेड म्हणून कोरेगांव तालुक्यांत गांव आहे, तेथील हा पाटील होय. हा पूर्वीं मोंगलाच्या चाकरीस असे. परंतु तेथें उंच पदवीस चढून कर्मगतीनें घसरल्या मुळें, बाळाजी विश्वनाथाजवळ बारगिरीची नौकरी धरून राहिला. कालगतीच्या उदयानें बाजीरावाच्या कारकीर्दींत हा वाढला. व ग्वाल्हेर शहर हें त्याच्या राजधानीचें शहर झालें.

राणोजीस औरस पुत्र तीन होते. त्यांत जयाजीस विजयशिंगानें मारिलें. आणि दत्ताजी व जनकोजी पानपतच्या लढाईंत पडले. त्या मुळें दासीपुत्र महादजी तोच राज्याधिकारी झाला. (हिंदु० छा० च ह० लि० इ०).

**रादेर**– हा गांव सुरत जिल्ह्यांत आहे.

**राधानगर**– बरद्दान परगण्यांतील एक गांव.

**राधाबाई**– श्रीमंत पेशवे बाळाजी विश्वनाथ यांची बायको. थोरल्या बाजीरावाची व चिमणाजी आप्पा यांची आई.

**राधाविनोदकाव्य**– रामचंद्र कविकृत संस्कृत. याचे श्लोक १८० आहेत.

**राधाविलास**– गुजराथी भाषेंत दयाराम कविकृत.

**राधास्वप्नवर्णन**– राजे कविकृत गुजराथींत.

**रामकंठ**– उत्पल देवाचा शिष्य. हा शालिवाहन नव्या शतकांत होता. (बु० का० शो०)

**रामकंठराय**– राजाराम मोहन जो ब्रह्मसमाज स्थापक त्याचा बाप.

**रामकृष्ण**– कृष्णाकृतिपर याचीं पदें आहेत. बाकी याचें वृत्त कांहीं कळत नाहीं.

**रामकृष्णकाव्य**– राम आणि कृष्ण यांच्या वर्णनपर सूर्यकविकृत द्व्यर्थ काव्य.

**रामकृष्णपंडित**– पंचदशी ग्रंथाचा टीकाकार.

**रामकृष्णभट्ट**– वल्लभाचार्यांचा वडील भाऊ.

**रामगिरि**– रामटेक- २ नासिका जवळचा एक डोंगर.

**रामगुणावली**– तुळशीदासकृत हिंदुस्थानी भाषेंत.

**रामचंद्रपंतपराडकर**– प्रसिद्ध आर्या करणारा कवि मोरोपंत त्याचा बाप.

**रामचंद्रपंतभानु**– श्रीमंत पेशवे बाळाजी विश्वनाथ त्यांचा फडणीस फडणीसघराण्याचा हा मूळपुरुष.

**रामचंद्रबावाशेणवी**– हा मूळ पेशव्यांचा नावेदार. सांवताच्या वाडीकडील राहणारा. व अरवली गांवचा कुळकर्णी. सदाशिवराव भाऊच्या हाताखालीं हा कांहीं दिवस होता. पुढें शिंद्याचा दिवाण झाला.

**रामचंद्रभट्ट**– कृष्ण रत्नावलीचा कर्ता. ( बु. शो.

**रामचंद्र वर्णन**- मोरोपंत कृत मराठींत.

**रामचंद्रसुकथंकर**– महेश्वर भट्टाचा बाप.

**रामचंद्राचार्य**– प्रक्रिया कौमुदीचा कर्ता.

**रामचरित**– रत्नाकर कविकृत संस्कृतांत.

**रामचरित्र**– विष्णुदास कविकृत गुजराथींत.

**रामजन्म**– रामायणापैकीं मराठींत वामन पंडित कृत.

**रामजोशी**– हा सोलापुरचा राहणारा देशस्थ याजसनी ब्राह्मण होता. याचें जन्म शके १६९४ मध्यें झालें होतें. यानें लावण्या पुष्कळ केल्या असून उत्कृष्ट आहेत. छंदःशास्त्रावर छंदोमंजरी नांवाचा याचा एक ग्रंथ मराठींत आहे. हा शके १७३४ मध्यें आपल्या वयाच्या ५० व्या वर्षी मरण पावला. मोरोपंताच्या आर्या यानेंच प्रथम प्रसिद्धीस आणल्या. (नवनीत.)

**रामटेक**– नागपुराकडे आहे. येथील विड्याचें पान मोठें आख्येनें आहे.

**रामठदेश**– हल्लीं यास बलूची स्थान ह्मणतात.

**रामदास**– नानकाच्या गादीवरील जो अमेरदास त्याचा शिष्य.

२– हा एक गुजराथी ब्राह्मण डांकूरचा राहणारा असे. हा मोठा भक्तिमान् होता. यास एक स्त्रीमात्र होती. हा भिक्षा मागून आपला उदरनिर्वाह करी. व प्रतिपंध्र वड्याच्या एकादशीस द्वारकेस श्रीकृष्णदर्शनास जाई. या प्रमाणें यानें पंचवीस वर्षे वारी केली. पुढें हा म्हातारा झाल्या मुळें, यानें आतां या पुढें माझ्यानें दर्शनास येववणार नाहीं या करितां मला निरोप द्यावा. म्हणून देवाची प्रार्थना केली. तेव्हां देव बोलला तूं चिंता करूं नको. मी तुजबरोबरच डांकुरास येतों. त्यावरून मूर्ति याच्या बरोबर गेली. व द्वारकेस ती नाहींशी झाली. पुढें देवळांत मूर्ति नाहीं असें पाहून पुजारी चौकशी करूं लागले. तों मूर्ति डांकुरास असल्याची खबर

त्यांस कळली. तेव्हां ते डाकुरास येऊन याजपाशीं मूर्ति मागूं लागले. इतक्यांत देवानें यास सूचना केली कीं, मूर्तीच्या भारंभार सोनें मी तुम्हांस देतों. परंतु मूर्ति नेऊं नका. असें म्हण. त्या प्रमाणें यानें म्हटलें, व तें पुजाऱ्यांनीं मानिलें. नंतर यानें धराच्या एका पारड्यांत मूर्ति घालून दुसऱ्या पारड्यांत बायकोच्या नाकांतील नथ घातली. तेणें करून मूर्ति व नथ समतोल भरली. हें पाहून पुजाऱ्यांस आश्चर्य झालें. मग त्यानीं देवाचीच मर्जी येथें राहण्याची आहे असें जाणून याची स्तुति केली. व द्वारकेस परत जाऊन तेथें नवी मूर्ति स्थापिली. (भ. वि. अ. ३१). हा कधीं होता त्या विषयीं बरोबर शोध लागला नाहीं.

रामदासकवि– रामसेतु प्रदीप काव्याचा कर्त्ता. (बु० शो०)

रामदासचरित्र– रामदास स्वामींचें मराठी भाषेंत आहे चरित्र तें.

रामदासस्वामि– गोदावरीच्या उत्तर तीरास जांब म्हणून गांव आहे, तेथील कुळकर्णी सूर्याजीपंत, त्यांचे हे कनिष्ठ चिरंजीव. यांच्या आईचें नांव राणूबाई. व वडील बंधूचें नांव गंगाधरपंत होतें. यांचें जन्म शके १५३० कीलकनाम संवत्सरीं चैत्र शुद्ध ९ चे दिवशीं झालें. यांचें उपनांव ठोंसर व गोत्र जामदग्न्य होतें. हे देशस्थ आश्वलायन ब्राह्मण होते.

यानीं लग्न मुळींच केलें नाहीं. लग्नाचा योग मातुश्रीनें जमवून आणिला असतां हे त्या समारंभांतून पळाले. व नासिका जवळच्या टांकळीस राममंत्राचें पुरश्चरण केल्यानें प्रख्यातीस आले. यांस मारुतीचा साक्षात्कार असून हे स्वतः मारुतीच्याच अंशानें जन्मले होते आणि त्यामुळें यांस साक्षात् रामाचा अनुग्रह होता. त्या विषयीं यांचा एक अभंग या प्रमाणें आहे.

"आदिनारायण सद्गुरु आमुचा॥ शिष्य झाला त्याचा महाविष्णु॥१॥
"तयाचा तो अंश जाणावा हो हंस॥ तेणें ब्रह्मयास उपदेशिलें॥ २॥
"ब्रह्मदेवें केला उपदेश वसिष्ठा॥ तेथें धरा निष्ठा शुद्ध भावें॥ ३॥
"वसिष्ठ उपदेशी श्रीराम रायासी॥ रामें रामदासीं उपदेशिलें॥ ४॥

महीपति बावांनीं भक्तविजयाच्या ४७ व्या अध्यायांत यांचें चरित्र लिहिलें आहे. परंतु त्यांत सर्व चरित्राचा समावेश न झाल्या मुळें, संतविजय म्हणून एक पृथक्च ग्रंथ लिहिला आहे. त्यांत यांच्या चमत्कार वगैरेंच्या त्यानीं अनेक गोष्टी लिहिल्या आहेत; शिवाय त्यांच्या वंशजानीं रामदास चरित्र गद्यरूप लिहिलें

आहे तें निराळेंच आहे.

यांच्या शिष्यमंडळींत जे जे नामांकित होते ते येणें प्रमाणें:– उद्धव गोसावी. २ कल्याण गोसावी. ३ भोळाराम. ४ मुसळराम. ५ अनंतभट्ट महाबळेश्वरकर. ६ मौनी गोसावी. ७ त्र्यंबक गोसावी भानगांवकर. ८ हनुमंत गोसावी करंदीकर. ९ जयराम गोसावी शिरोळकर. १० बयाबाई शाहापुरकरीण. ११ आका. १२ वेणूबाई. इत्यादि. आणि शिवाजी राजा छत्रपति.

यांनीं ग्रंथ लिहिले ते येणें प्रमाणें:– दासबोध, सगुणध्यान, निर्गुण ध्यान, मानसपूजा, पंचसमासी, सप्तसमासी, एकवीस समासी, ऊनाट पुरुष, पूर्वारंभ, आत्माराम, गोसावी, मनबोध श्लोक, अभंग शतकें चौदा, शिवाय स्फुट अभंग व कित्येक पदें वगैरे. हा पुरुष पराकाष्ठेचा निस्पृह व स्पष्टवक्ता होता. वारकरी लोक हा राजगुरु होता असा यावर आरोप ठेऊन, तुकारामानें यांच्या विषयीं असें म्हटलें तसें म्हटलें, इत्यादिकां विषयींच्या नव्या नव्या कल्पित कादंबऱ्या सांगतात; परंतु त्या सर्व खोट्या आहेत; कारण राजगुरु म्हणजे राजाचें जो उपाध्येपण करतो तो. तसें नसतां व्यर्थ नांव ठेवणें अल्पबुद्धीचेंच काम होय. यांत संशय करणें नको.

विचार करून जर पाहिलें, तर रामदासाची समजूत ज्ञानेश्वर, एकनाथ, मुकुंदराज, यांच्या तोडीची दिसून येते. याचें ज्ञान व वैराग्य मळमळीत किंवा संशयाचें अगदीं नव्हतें. समर्थांचें वय २० वर्षांचें होउन, त्यांस तपःसंपन्नता व ज्ञान हीं प्राप्त झालीं, त्या वेळेस तुकारामही तितक्याच वयाचा असून चुकलाच प्रपंचांतून जागा होत चालला होता. म्हणून तुकारामास समर्थांची बरोबरी होते कशी? व तुकारामही लहान तोंडीं मोठा घांस घेण्यास जाईल कशाला? सारांश हें कांहींच संभवत नाहीं. तुकारामाची व समर्थांची गांठ असून, तो समर्थांचा मत्सर करीत होता असें प्रमाण मुळींच आढळत नाहीं. असें असतां, रामदासाचा अभंग निघाला कीं, वारकरी टाळ वाजविणें बंद करितात, याचें मात्र खरोखर आश्चर्य वाटतें. असो. यांच्या ग्रंथांतील निवडक वचनें आहेत तीं अशीं:—

## ओंव्या.

चित्त सुचित्त करावें। बोलिलें तें जीवीं धरावें। सावध होऊन बैसावें निमिष एक॥१॥ कोणे ग्रामीं अथवा देशीं। राहणें आहे आपणाशीं। न भेटतां तेथल्या प्रभूशीं॥ सौख्य कैचें॥२॥ म्हणोन ज्यास जेथें राहणें॥ तेणें त्या प्रभूची भेट घेणें॥ म्हणजे हो-

य श्लाघ्यवाणें। सर्व कांहीं ॥३॥ प्रभूची भेटी न घेतां। तेथी कैंची हो मान्यता। आपुलें महत्त्व जातां। वेळ नाहीं ॥४॥ या कारणें जो शाहणा। तेणें प्रभूस भेटावें जाणा। ऐसें न करितां दैन्यवाणा॥ संसार त्याचा ॥७॥ ब्रह्मा विष्णु आणि हर। तयांस निर्मिता तोचि थोर। तो ओळखावा परमेश्वर। नाना यत्नें ॥१२॥ तो देव ठायीं पडेना। तरी यमयातना चुकेना। ब्रह्मांडनायक चोजवेना॥ हें बरें नव्हे ॥१३॥ जाणिजे परमात्मा निर्गुण। त्याशींच ह्मणावें ज्ञान। त्या वेगळें अज्ञान। सर्वही कांहीं॥ १९ ॥ पोट भरावया कारणें। नाना विद्याभ्यास करणें। त्याशींच ज्ञान ह्मणती परी तेणें सार्थक नव्हे॥ २०॥ ऐसें ज्या पाशीं ज्ञान। तोचि जाणावा सज्ञान। तया पाशीं समाधान। पुसलें पाहिजे॥२४॥ ब्रह्मज्ञानेंवीण उपदेश। तो म्हणों नये विशेष॥ धान्येंवीण जैसें भूस। खातांचि नये॥२॥ सकळ सृष्टीची रचना। ते हे पंचभूतीक जाणा। ह्मणोनि हे तगेना॥ सर्व काळ॥७॥ आदि अंतीं ब्रह्म निर्गुण। तेचि शाश्वताची खूण। येर पंचभूतीक सगुण। नाशवंत॥ ८॥ देखिलें तें सत्य मानावें। हें ज्ञात्याचें देखणें नव्हे। जडमूढ अज्ञान जीवें॥ हें सत्य मानिजे॥२॥ माझें दिसतें हेंच खरें। येथें चालेना दुसरें। ऐशिया संशयाच्या भरें। भरोंचि नये॥ ४ ॥· गुप्त आहे उदंड धन। काय जाणती सेवक जन। तयांस आहे तें ज्ञान। बाह्याकाराचें॥१॥ तैसें दृश्य हें मायिक। पहात असती सकळ लोक। परी जयांस ठाउका विवेक। ते तदंतर जाणती॥३॥ दिसेना जें गुप्त धन। तयास करणें लागे अंजन। गुप्त परमात्मा सज्जन। संगती शोधावा॥१९॥ (दासबोध दशक ६).

संसार हाचि दीर्घ स्वप्न। माजी वोसणती जन। माझी कांता माझें धन। कन्या पुत्र माझे ॥२०॥ ज्ञान सूर्य मावळला। तेणें प्रकाश लोपला। अंधकारें पूर्ण झाला। ब्रह्मगोळ अवघा॥२१॥ नाहीं सत्याचें चांदणें। कांहीं मार्ग दिसे जेणें। सर्व भ्रांतीचेनि गुणें। आपआपणाही न दिसे॥२२॥ माया ब्रह्म ओळखावें। तयास अध्यात्म म्हणावें। तरी तें मायेचें जाणावें। स्वरूप आधीं॥५४॥ माया सृष्टीची रचना। माया आपुली कल्पना। माया तोडितां तुटेना॥ ज्ञानें वीण॥५९॥ संग सोडावा आपुला। मग पहावें तयाला। अनुभवी तो या बोला॥ सखावेल॥१९॥ आपण म्हणजे मीपण। मीपण म्हणजे जीवपण। जीवपण ह्मणजे अज्ञान॥ संग जडला॥२०॥ सोडितां तया संगाशी॥ ऐक्य होय निःसंगाशी। कल्पनेवीण प्राप्तीशी। अधिकार ऐसा॥२१॥ जळचरास जैसें जळ। सबाह्याभ्यंतरीं निखळ॥ तैसें ब्रह्म हें केवळ। जीवमात्राशीं॥५॥ जळा वेगळा ठाव आहे। ब्रह्मा बाहेरि जातां नये॥ म्हणोनि उपमा न साहे। जळाची तया

॥६॥ अाकाशा बाहेर पळों जातां ॥ पुढें आकाशाची तत्वता। तैसाचि तया अनंता। अंतचि नाहीं॥७॥ (दासबोध दशक ७).

## पूर्वारंभ वेंचे प्रश्नोत्तर.

शिष्य बोले लडिवाळपणें॥म्या संसार घेतला कोण्या गुणें॥मज हें दुःख भोगणें॥ किंनिमित्त घडे॥२॥ विषय लोभें भगवंता। नेणोन झालाशिरे दुश्चित्ता॥तेणें गुणें मागुता॥ आलासी जन्मा॥३॥ तरी हा जन्म कैसा तुटे॥ मज भगवंत कैसा भेटे॥ भवसागर तो बोहटे॥कोणे परी दातारा॥४॥जन्म तुटे संत संगें॥ देव भेटे अंतरंगें॥ दृढ भक्तीचेनि योगें॥ भवसिंधु आटे॥५॥दृढ भक्ति करूं कैशीं॥काय धरावें मानसीं॥ सांगा स्वामी अज्ञानासी॥ मार्ग कांहीं॥६॥ सद्गुरूसी जावें शरण॥ मनीं धरावें वचन॥ तेणें तुझें अज्ञान॥ जाईल बापा॥७॥ सद्गुरु कैसा ओळखावा। तो मज दातारें सांगावा॥ कवण उपदेश घ्यावा॥ तयापाशीं॥८॥ऐक सद्गुरूचें लक्षण। जेथें सक्रिय ब्रह्मज्ञान॥ आशा रहित निरभिमान॥ तयास मोक्ष मागावा॥ ९॥ मोक्ष कोणास म्हणावें॥ हें मज स्वामींनीं सांगावें॥ दयासिंधु देवाधि देवें॥ मज उपेक्षूं नये. ॥१०॥ अधिकारें वीण सांगणें। अलभ्य होय तेणें गुणें॥ म्हणोनियां आधीं शाहणे॥ अधिकार पाहती॥ ११॥तरा त्या अधिकाराची खूण॥ मज करावी श्रवण॥ ऐक बापा लक्षण॥अधिकाराचें॥ १२॥ जेथें विश्वास आणि विरक्ति॥ नाहीं संसारीं आसक्ति॥ज्या आवडे गुरुभक्ति॥ अंतरा पासूनी॥ १३॥ तेंचि अधिकाराचें स्थळ। ज्ञान उपतिष्ठे प्रांजळ॥ फिटे भ्रांतीचें पडळ॥ सद्गुरु बोधें॥१४॥स्वामी पतीत पावन॥ ऐकोनि आलों जी शरण॥न विचारितां दोषगुण॥ मज बोध करावा॥ १५॥ऐक बोधाचें लक्षण॥ बोध मागशी तो तूं कोण॥ पाहें आपली ओळखण॥आपणा मध्यें १६

## वेंचे गोसावी ग्रंथ करामत निषेध.

अभिन अविवेकी अन्यायी॥ अभक्त अधर्म लंडाई॥ वेदशास्त्र करील काई॥तया मूर्खाशीं॥१॥ कर्माच्या ठायीं अनादर॥ नाहीं सगुण साक्षात्कार॥ज्ञान पाहतां अंधार निश्चय नाहीं.॥२॥ उग्याच गोष्टी ऐकिल्या॥ मनास आल्या त्या जीवीं धरिल्या॥ रत्नें सांडून एक वटिल्या॥ शंभा जैशा॥३॥फाल्गुन मासींचा खेळ॥जैसा अवघाच बाष्कळ॥ तेथें पाहोनि निर्मळ॥ काय घ्यावें॥४॥ तैसा प्रत्यय ज्ञानेंवीण॥ करी अनुमानाचा शीण॥ शत्रु आपणास आपण॥ होऊन राहे॥ ५॥तयास कोणें उमजवावें॥ जिकडे मानेल तिकडे जावें॥ जैसें आंधळें गुरूं स्वभावें॥ धांवे चहूंकडे॥६॥ जिकडे तिकडे ज्ञान झालें॥उदंड गोसावी उतले॥तयाच्या संगतीनें झाले॥ बाष्कळ प्राणी७

गर्भांधास कैंची परीक्षा॥ दीक्षाहीनास कैंची दीक्षा॥ प्रमाण मानिती प्रत्यक्षा॥ विवेकहीन॥८॥ काश पासून काय झालें॥ ब्रह्मांड कवणें निर्मिलें॥ कांहींच नेणतां भुंकलें॥ गाढव जैसें॥१०॥ जें वेदशास्त्राशीं मिळेना॥ अध्यात्म कांहींच कळेना॥ माजला बोका कीं आकळेना॥ रेडा जैसा॥११॥ एक लोक उपदेश घेती॥ देवतार्चन दाकून देती॥ धर्मनीति बुडविती॥ महापाषांडी॥१५॥ एक ह्मणती आमुचा गुरु॥ नयाचा अगाध विचारु॥ जेथें अवघा एकंकारु॥ भेदचि नाहीं॥१६॥ एक म्हणती अनर्गळा॥ भूताळा आणि देवताळा॥ जनांमध्यें आग्या वेताळा॥ चेतवूं जाणे॥२३॥ आमुचे गुरु साक्षेपें॥ अखंड करिती सोनें रुपें॥ अंजन साधन त्यापें॥ काय उणें॥३०॥ आमचा गुरु गै बच होतो॥ पुनः दुसरे दिवशीं उमटतो॥ अचेतन चालविती मोठा ज्ञानी॥ ३२॥ व्याघ्रावरी बैसे निःशंक॥ हातीं सर्पाचा चाबुक॥ वांचले होते सहस्त्र एक॥ सामर्थ्य बळें॥३४॥ दांत पडोन निघाले॥ पांढरे केंस काळे झाले॥ •कितीक आले आणि गेले॥ गोसाव्या देखतां॥३५॥ आमचे गुरु भविष्य सांगती॥ रेड्या करवीं वेद बोलविती॥ गधड्या करवीं सांगविती॥ शास्त्रें पुराणें॥४३॥ कुत्न्या करवीं रागोन्हार॥ कोंबड्या करवीं तत्वविचार॥ खेचर आणि भूचर सकळ बांधी ४४ मेले प्राणी उठविले॥ साकरेचें मीठ केलें॥ गटगटां अग्नीस गिळिलें॥ काय सांगूं॥ ॥५०॥ लिंगाचे तुकडे तोडिती॥ कोटलिंगें एकत्र करिती॥ भिजली दाळ चारिती॥ पाषाण नंदीशीं॥५२॥ ऐसें वर्ततें लौकिकीं॥ परी येणें सार्थक नव्हे कीं॥ अध्यात्मविद्या विवेकीं॥ जाणिजेते॥६८॥

• समर्थांच्या वेळेस जे भगवद्भक्त होते, त्या सर्वांत यांची मान्यता विशेष असे. म्हणून सर्व यांस समर्थ म्हणत. हे ज्या परळीच्या किल्यावर राहात, तेथें हंमेष संत येत जात, म्हणून त्यास नांव सज्जनगड पडलें, तें चाललेंच आहे. यांची समाधि शके १६०३ दुर्मुखनाम संवत्सरीं माघवद्य ९स सज्जनगडींच झाली. (भक्तविज० अ०४७) व (रामदासच०).

**रामदुर्ग**– या संस्थानाच्या उत्तर पश्चिम बाजूस तोरगळ, पूर्वेस बदामी, आणि दक्षिणेस नरगुंद या प्रमाणें आहे. येथें भावे उपनावाचे कोंकणस्थ ब्राह्मण संस्थानी आहेत.

**रामदेवरावजाधव**– हा देवगडचा राजा. ज्ञानेश्वराच्या वेळेस असल्यामुळें याचें नांव ज्ञानेश्वरींत ज्ञानेश्वरानें ग्रंथसमासीस लिहिलें आहे.

**रामनाथ**– रामेश्वर महादेव, यास सेतुबंध रामेश्वर असें ह्मणतात.

**रामन्यायालंकार**– कविकाम कल्पद्रुम व्याख्येचा कर्ता.

**रामपुर**– विपाशा ह्मणजे बिया नदीच्या कांठच्या गांव. नानकाची जन्मभूमि तो हाच.

**रामप्रसाद**– साधु.

**रामभद्र कवि**– हा कवि तैलंग ब्राह्मण होता. रामलीला नांवाचें तीन सर्गाचें काव्य याचें आहे.(कविच.)

**रामभद्रदीक्षित**– जानकी परिणय ग्रंथाचा कर्ता.

**रामभद्रेयकाव्य**– रामलीला ग्रंथासच नांव.

**रामभारती**– अक्कलकोट येथें चुकतेच होऊन गेलेले प्रख्यात स्वामी. यांचा मूळ मठ करनाटकांत आहे असें सांगतात. यांच्या गुरूनीं यांची स्थापना आपले गादीवर केल्यावर,काहीं दिवस हे गादीवर होते. परंतु चंचळा प्रमाणें हे एका ठिकाणीं राहीनात. त्या मुळें लोक यांस चंचळभारती ह्मणूं लागले. हे पुष्कळ वर्षे मोहोळास होते. यांची आंगकाठी फारच उंच व भव्य तेजःपुंज होती. पुढें पुढें हे अक्कलकोटास किंवा त्याच्या आसपास राहूं लागले. या पुरुषास कनक (द्रव्य) आणि कांता (स्त्रिया) वमनप्राय होत्या. यांची वृत्ति वास्तविकभसाची अशी स्वरूपनिष्ठ असे. लोकांच्या मनांतील गोष्टी हे सांगत,असें लोक ह्मणतात. परंतु ती यांची सहज लीला होती. म्हणजे हे जें कांहीं सहज बोलत,तें लोकच आपल्या मनानें आप आपल्यावर बसवून घेत. दुसरें कांहीं नाहीं. यांचें स्वतः मात्र समाधान उत्कृष्ट होतें. परंतु यांच्या पासून यां सारखाच समाधानी कोणी झाला असें आढळत नाहीं. या पुरुषाची समाधी चैत्रवद्य १३ मंगळवारीं शके १८०१ मध्यें अक्कलकोटासच झाली. (स्वतःची माहिती)

**रामराजा**– शृंगवेरपूरचा राजा. नागोजीभट्टाचा यजमान.

**रामलीला**– रेवाशंकरकृत गुजराथी भाषेंत.

**रामवनवासवर्णन**– आत्मारामकृत गुजराथी भाषेंत.

**रामविजय**– मराठी भाषेंत ओंवीबद्ध,हा ग्रंथ श्रीधरकृत आहे.

**रामसेतुप्रदीप**– रामदास कविकृत संस्कृत भाषेंत.

**रामस्नेही**– रामाचरणाच्या मतांतील एक पंथ.

**रामस्तवराज**– तैलंगी भाषेंत आलसानी पेदन्नाकृत एक ग्रंथ.

**रामाचरण**– रामानुजाच्या गळता येथील गादीवरील अधिकारी. यानें केलेल्या नव्या व्यवस्थेंत,निरंजन व रामस्नेही असे हल्लीं दोन पंथ झाले आहेत.

**रामाजनार्दन**– जनार्दन स्वामींचा शिष्य व एकनाथाचा गुरुबंधु. ज्ञानेश्वरावर यानें आरती लिहिलेली वारकरी म्हणत असतात.

**रामानंदस्वामी**– रामानुज संप्रदायाचा एक पुरुष. यानें आनंद नांवाचा एक नवा संप्रदाय काढिला तो उत्तर हिंदुस्थानांत चालू आहे. व तो शांकरमतास अनुसरून आहे. रामानंद हा मोठा विद्वान् होता. निवृत्ति ज्ञानेश्वरादि भावंडांचा बाप विठ्ठलपंत तसाच कबीर हे याचेच शिष्य होते.

**रामनाचारी**– मगधबोध ग्रंथाचा टीकाकार.

**रामानुजमतविध्वंस**– अपय्यादीक्षित कृत संस्कृत ग्रंथ.

**रामानुजभाष्य**– रामानुजाचार्यांनीं केलेलें व्याससूत्रांवरील भाष्य तें.

**रामानुजाचार्य**– हा जातीचा द्रविड ब्राह्मण. शालिवाहनाच्या १० व्या शतकाच्या समाप्तीस होता. हा मोठा नामांकित आचार्य होऊन गेला. प्रेमधूल ज्यास पेनुमुत्तुर म्हणतात तेथें याचें जन्म झालें होतें. याच्या बापाचें नांव केशवाचार्य आणि आईचें नांव कांतिमति होतें. याचें मौंजीबंधन झाल्यावर, याचा मामा शांकरमतानुयायी यादवप्रकाश नांवाचा होता. त्या जवळ यानें वेद आणि शास्त्र या दोहींचेंही अध्ययन केलें.

अध्ययन संपूर्ण झाल्यावर हा परत आपल्या गांवीं आला. व तेथें एका चिंचेच्या झाडाखालीं बसून यानें श्रीरामचंद्राचें आराधन केलें. पुढें यानें अर्हत मतवादी जैन लोक यांशीं वाद केला. व त्यांचें मत ज्या सिद्धांतांनीं खंडित केलें, तेंच सिद्धांत याचें मत झालें. याच्या मतास रामानुज दर्शन ह्मणतात. म्हणजे याच्या मतांत मध्वाचार्यांप्रमाणें व्यवहार व अव्यवहार या उभय काळीं जसें द्वैतच मानिलें आहे, तसें मानिलें नाहीं. तर व्यवहार काळीं द्वैत व अव्यवहार काळीं अद्वैत असें मानिलें आहे. आणि त्याच कारणास्तव याच्या मतास विशिष्टाद्वैत ह्मणतात.

याचें अनुष्ठान पुरें झाल्यावर हा मल्लकोट शहरास गेला. व तेथील स्मार्त ब्राह्मणांस यानें आपल्या पंथांत आणिलें. पुढें द्वारसमुद्र येथें कैटावर्द्धन नामक राजा होता. त्याच्या कन्येची यानें पिशाचबाधा दूर केली. नंतर हा आपल्या यमदुनाचार्य शिष्यास समागमें घेऊन तिरुपति (व्यंकटेश) जगन्नाथ, काशी, जयपूर, इत्यादि ठिकाणीं गेला. त्यांत जयपुरास यानें जैनांस वादांत जिंकिलें. त्यावरून तेथील राजानें याचें मत स्वीकारून पुष्कळ जैनांस ठार मारलें. व याचा एक

मठ शहरांत स्थापिला. व्यास सूत्र भाष्य, गीताभाष्य, तर्क भाष्य, वेदार्थ संग्रह, न्यायामृत, वेदांत प्रदीप, वेदांत तत्वसार, श्रौतभाष्य शत दूषणी, चंड मारुति, त्रिंशाख्यान, नारदीय पंचरात्र, विष्णु पूजा, विष्णुप्रबोधन, रंगनाथ स्तोत्र, विष्णु सहस्रनाम, त्रिगद्य, धर्मसंहिता इत्यादि अनेक ग्रंथ यानें संस्कृतांत लिहिले. याचें वय ५० वर्षांचें झाल्यावर यानें सन्यास घेतला. तिंगळ, वडगळ, तादरी या ठिकाणीं याचे मठ आहेत. याचे संप्रदायी यास शेषाचा अवतार असें समजतात. याची समाधि प्रेमधूल येथेंच झाली. (क०च०).

याचें मत सायण माधवाचार्यांनीं सर्वदर्शन संग्रहांत लिहिलें आहे. त्यांतील सारांश येणें प्रमाणें आहे. याच्यामतांत ईश्वर, चित् व अचित् म्हणजे एकनियंता, एक भोक्ता आणि एक भोग्य अशीं तीन तत्वें, अथवा तीन पदार्थ मानिले आहेत. यास प्रमाण असें आहे.

"ईश्वरश्चिदचिच्चेति पदार्थ त्रितयं हरिः। ईश्वरश्चित इत्युक्तो जीवो दृ-
"श्य मचित्पुनः॥१॥— अर्थ:– भगवान् हरि ईश्वर आहे. चित् म्हणजे जीव, तो परमात्मा जो ईश्वर, त्याहून भिन्न तसाच नित्य आणि अणु परिमाणाचा आहे. आणि अचित् म्हणजे संपूर्ण दृश्य व जडरूप असें जग आहे. यांत जीव ईश्वराहून भिन्न इत्यादि आहे. त्यास प्रमाणें आहेत तीं अशीं:–

"द्वासुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते इति। न जायते
"म्रियतेवाविपश्चित्। बालाग्रशत भागस्य शतधा कल्पितस्यच इति।
या प्रमाणें ईश्वराहून जीव भिन्न, नित्य, व अणु परिमाणाचा सांगून, रामानुजाचार्य अचित् म्हणजे जड त्यांत भोग्य, भोगोपकरण, आणि भोगायतन म्हणजे ज्यांचा भोग घ्यावयाचा ते पदार्थ भोग्य, भोग घेण्यास साधनभूत इंद्रियें, त्यांचें नांव भोगोपकरण आणि भोग होण्यास स्थान जो हा स्थूलदेह, तो भोगायतन अशी व्यवस्था करितात.

"वासुदेवः परंब्रह्म कल्याण गुण संयुतः॥ भुवनाना मुपादानं क-
"र्ताजीव नियामकः॥ वासुदेवः स्वभक्तेषु वात्सल्यात्तदीहितम्॥
"अधिकार्यनु गुण्येन प्रयच्छति फलं बहु। तदर्थं लीलया स्वीयाः
"पंचमूर्तीः करोतिवै॥ प्रतिमादिक मर्चास्या दवतारास्तु वैभवाः॥
"संकर्षणो वासुदेवः प्रद्युम्नश्चानिरुद्धकः॥ व्यूहश्चतुर्विधो ज्ञेयः
"सूक्ष्मं संपूर्ण षड्गुणं॥ तदेव वासुदेवाख्यं परंब्रह्म निगद्यते

" अंतर्यामी जीवसंस्थो जीवप्रेरक ईरितः॥ य आत्मनीति वेदांत वाक्य
" जालैर्निरूपितः॥ अर्चोपासनया क्षिप्ते कल्मषेः धिकृतो भवेत्॥ वि-
" भवोपासने पश्चा द्व्यूहोपास्तो ततः परं॥ सूक्ष्मे तदनु शक्तः स्या दंतर्या
" मिण मीक्षितुं॥

अर्थ- वासुदेव पदादिकें करून जाणण्यास योग्य असा जो पुरुषोत्तम ईश्वर, तो या जगाचा कर्ता उपादान होय. तोच परम कारुणिक भक्तवत्सल आपले उपासकांस अनुकूल फल देण्या करितां, आपल्या लीलें करून आर्चा, विभव, व्यूह, सूक्ष्म आणि अंतर्यामि अशा भेदानें पांच प्रकारचा झाला आहे. यांत आर्चाविभवादिक पूर्व पूर्व उपासनें करून, परम पुरुषार्थ प्राप्ति आणि शत्रुरूप पातकाचा नाश होऊन, उत्तरोत्तर मूर्त्युपासने विषयीं अधिकार येतो.

आर्चा ह्मणजे प्रतिमा, विभव ह्मणजे अवतार, व्यूह म्हणजे ( संकर्षण, वासुकदेव, प्रद्युम्न, अनिरुद्ध.) सूक्ष्म ह्मणजे संपूर्ण वासुदेवाख्य परब्रह्म तें, आणि जीवसंस्थ व जीवप्रेरक तो अंतर्यामी. यांत आर्चोपासनें करून पातक नाहींसें झालें ह्मणजे, विभव उपासनेचा अधिकार येतो. विभव उपासनेनें व्यूह उपासनेचा अधिकार येतो. आणि याच क्रमानें पुढेंही जाणावें.

आतां अभिगमन, उपादान, ईज्या, स्वाध्याय आणि योग, अशी पांच प्रकारची उपासना पंचरात्रांत सांगितली आहे. यांत अभिगमन ह्मणजे देवता स्थान व मार्ग, यांचें संमार्जनादिक करणें. उपादान ह्मणजे गंधपुष्पादि साहित्य संपादन करणें. ईज्या म्हणजे देवतापूजन करणें. स्वाध्याय म्हणजे नामार्थानुसंधानपूर्वक मंत्रजप व विष्णुसूक्तादि पाठ करणें. तसाच नामसंकीर्तन प्रतिपादक शास्त्राभ्यास करणें. आणि योग म्हणजे देवतानुसंधान. या प्रमाणें उपासनरूप कर्मापासून उत्पन्न झालेलें जें विज्ञान, तेणें करून ध्याता व ध्यान नष्ट झालें म्हणजे, तसा जो भक्त, त्याला भक्तवत्सल परम कारुणिक पुरुषोत्तम, तो आपलें यथायुक्त आत्मानुगुण युक्त असें आपलें पद देतो.

या प्रमाणें विचार मनांत आणून व बौधायनाचार्यांनीं जी केलेली विस्तीर्ण ब्रह्मसूत्र वृत्ति तीप्रत अवलोकन करून, महोपनिषत् मताच्या आश्रयानें रामानुजाचार्य ब्रह्मसूत्र भाष्य करिते झाले. तस्मात् तापत्रय संतप्त पुरुषांनीं मोक्ष होण्याकरितां, पुरुषोत्तमादि पदें करून बोध्य जें ब्रह्म तेंच जाणावें. शब्द ज्ञानें करून कांहीं होणार नाहीं. अशी श्रुतीही प्रमाण आहे. सारांश विचारा पासून भक्ति उत्प-

न होते. तो विचार सत्त्वशुद्धि अदृष्टान्नापासून उत्पन्न होतो, यास्तव रामानुजमतानुसारी, आपल्या शिजलेल्या किंवा शिजवायाच्या अन्नास दृष्टिदोष होतो म्हणून तें, इतरांस पाहूं देत नाहींत. या प्रकारचे रामानुजाचार्य, विष्णुस्वामीच्या शिष्य संप्रदायांत जन्मलेले जे बिल्वमंगल, त्यांच्या मागून, व मध्वाचार्यांच्या पूर्वी होते झाले. असें संप्रदायप्रदीप ग्रंथांत लिहिलें आहे. (सर्वद० सं०) व (आर्यवि०रु.)

**रामायण**— रघुनाथ दास कृत गुजराथी भाषेंत.

**रामायणचंपु**— भोजचंपु लक्ष्मण नोत्र.

**रामायणमंजरि**— क्षेमेंद्रकृत.

**रामायणभाषांतर**— रायनी भास्कररकृत तैलंग भाषेंत. २— काशीदास व कृत्तिवास कविकृत बंगाली भाषेंत.

**रामाश्रम**— अमरकोशाचा टीकाकार. २— भेदाधिकार ग्रंथाचा टीकाकार

**रामेश्वर**— हें एक ज्योतिर्लिंग सेतुबंधाकडे आहे. यांस रामनाथ असेंही म्हणतात. याचे उत्तर अक्षांश ९ व पूर्वरेखांश ७९ आहेत.

**रामेश्वरभट्ट**— पुण्याजवळ वाघोली म्हणून गांव आहे, तेथील हा राहणारा मोठा विद्वान् ब्राह्मण होता. तुकारामानें केलेले अभंग इंद्रायणी नदींत बुडविणारा तोहाच. पुढें वह्या ज्याच्या तशाच शाबूद निघाल्या वरून, हा तुकारामाच्या मार्गी वारकरी होऊन राहिला.

**रायचूर**— कर्नाटकांतील गांव.

**रायदुर्ग**— हा एक करनाटकांत गांव आहे.

**रायनीभास्कर**— तैलंगणांतील कोंडवीडू येथील राहणारा ब्राह्मण. तेलंगींत यानें रामायणाचें भाषांतर केलेलें आहे. हा शालिवाहनाच्या १३व्या शतकांत होता.

**रायरास**— सोलापुराकडे हा एक गांव आहे.

**रावण**— हा कोणी वैयाकरण दक्षिणदेशांत मोठा नामांकित होऊन गेला. हा प्राय: पर्वत प्रदेशांत आश्रम स्थान करून राहणारा असावा असें दिसतें. कारण पाणिनी कृत व्याकरणाची प्रत यानें लिहिलेली होती ती, पाणिनी व्याकरणाचा लोपसंभव होत आला असतां, चंद्राचार्यास सांपडलेली त्यानें वररुचीस दिली. ती वरून वररुचीपासून भर्तृहरि व्याकरण पढला. व त्यानें त्यावर कारिकाही लिहिल्या. (तारानाथ तर्क वाचस्पतिकृत सरला प्रस्तावना) पहा.

**रावणमंदोदरिसंवाद**— रणछोड भगतकृत गुजराथी भाषेंत.

रावणार्जुनीयकाव्य– भीमभट्टकृत संस्कृत भाषेंत.

रासक्रीडा– मोरोपंतकृत मराठींत.

रासमंडळ– गुजराथींत नरसी मेहता यानें रचलें.

रासलीला– दयाराम कविकृत गुजराथींत.

रास्तेघराणें– हें घराणें पेशव्यांच्या नामांकित सरदारां पैकीं आहे. यांचें मूळचें उपना-
व गोखले आहे. व रास्त चाल (उत्तम चाल) तीवरून यास रास्ते हें सरकारांतून नां-
व मिळालें. दुसरे फाटक उपनांवाचेही एक रास्ते होते, असें ऐकलों. (वृन्दुमा०)

राहटकाव्य– भट्टी काव्य हेंच असेलसें वाटतें. क्षीरस्वामीचा मुलगा जो भर्तृहरि त-
त्कृत हें काव्य आहे.

राक्षस– या नांवाचा नंदराजाचा एक मुख्य प्रधान होता.

राक्षसभुवन– हा गांव पैठणाकडे गोदावरीच्या कांठीं आहे. [त. (पुरंजय) असम-

रिपुंजय– जरासंध वंशीय मागध राजांतील शेवटला. यास पुरंजय असेंही म्हण-

रुक्मणणापंत– विजापूर येथील बादशाहाचा खजानीस. हा कवि होता. [लेलें काव्य.

रुक्मांगदचरित्र– रुक्मांगदाचा विंध्यावलीशीं विवाह. या विषयावर मल्हन कवीनें के-

रुक्मिणी– एकनाथ स्वामींची आई. २– वल्लभाचार्यांची सून व विठ्ठलनाथाची बायको.

रुक्मिणीविलास– वामनकृत मराठी भाषेंत.

रुक्मिणी विवाह– मुक्तानंदकृत गुजराथींत. [ विठ्ठल कविकृत.

रुक्मिणीस्वयंवर– मराठी भाषेंत ओंवीबद्ध एकनाथ स्वामीकृत. २ श्लोकबद्ध

रुचककवि– काश्मिराकडील कवि. काव्यप्रकाश संकेत ग्रंथाचा कर्ता. (बु॰ का॰ शो॰).

रुद्रककवि– हा काश्मिराकडील राहणाऱ्या भट्टवामुखाचा पुत्र. रुद्रकास शतानंद अ-
सेंही दुसरें नांव होतें. शालिवाहन ११ व्या शतकाच्या उत्तरार्द्धांत हा होता. १६ अ-
ध्यायांचा काव्यालंकार नामक ग्रंथ तो यानें केलेला आहे. (बुल्ह॰ का॰ शोध॰)

रुद्रटकवि– शृंगारतिलकग्रंथाचा कर्ता. (बु॰ का॰ शो॰)

रुद्रदेव– हा कवि पैठण येथील राहणारा. मात्र कधीं होता तें समजलें नाहीं. धर्म
शास्त्रावर संस्कारप्रताप नारसिंह या नांवाचा याचा एक ग्रंथ आहे.

रुद्राजी बावा– साधु.

रुय्यककवि– मंखनामक पंडिताचा गुरु. (बु॰ का॰ शो॰)

रूपगोस्वामि– पद्यावली नामक संस्कृत ग्रंथाचा कर्ता. (बु॰ का॰ शो॰) [होता.

रूपविजय– हा जैनी कवि होता. व अमदाबादेस रहात असे. हा शके १७७० मध्यें

रूपसाराजा– वीरसेन वंशीय राजा. यानें ३५ वर्षें ९ महिने सात दिवस राज्य केलें. याच्या राज्यकारकीर्दीच्या सुमारें ३ऱ्या वर्षीं युधिष्ठिर शक १९७७ मध्यें एक बुन्हज झाला. व तो तिसरा होता.(हिंदुस्थानचा हस्त लि॰ इ॰ व जैन ग्रंथ॰)

रेणुकानंद– हकीकत कळली नाहीं.

रेणुकाबाई.– हंसराज स्वामींची आई.

रेवणसिद्ध– लिंगाईत मतानुयायी. परमरहस्य ग्रंथाचा कर्ता.

रेवाकांठा– नर्मदातीरचा प्रदेश.

रेवाखंड– सामळभट्ट कृत गुजराथी भाषेंत नर्मदा महात्म्य.

रेवानदी– नर्मदा नदी.

रेवाशंकर– हा वडनगरी नागर ब्राह्मण जुनागड येथें रहात असे. हा शके १७४० मध्यें होता. दशमस्कंधसार, अंकुरलीला, रामलीला, कृष्णलीला, चंद्रायणा, पदें व गर्भे इत्यादिक यानें गुजराथी भाषेंत ग्रंथ लिहिले आहेत. (का॰गु॰)

रेवासा– हें एक रामानुजाचार्यांच्या गादीचें ठिकाण आहे.

रोहीदासचांभार– हा चांभार उत्तर हिंदुस्थानांतील राहणारा मोठा कडकडीत कृष्णउपासक होता. याच्या काळाचा निर्णय ग्रंथांत लिहिलेला असा कोठेंच सांपडत नाहीं. परंतु कबिराचा व याचा आप आपल्या उपास्य देवतेच्या श्रेष्ठत्वाविषयीं झालेला संवाद, कधीं कधीं हरदास लोक कीर्तनांत गात असतात. त्या वरून हा कबिराच्या वेळेस होता असें दिसून येतें. त्या संवादांतील ध्रुवपद कबिराचें बोलणें झाल्यावर– "सुन सुन साधोजी राजा राम कहोजी." असें असतें. आणि याचें बोलणें झाल्यावर– "सुन सुन साधोजी जयगोपाल कहोजी." येणें प्रमाणें असतें. याचें चरित्र महिपती बावांनीं लिहिलें आहे. त्यांत त्यांनीं याच्या चमत्काराच्या गोष्टी वगैरे पुष्कळ सांगितल्या आहेत. (भक्तवि॰ अ॰२९).

रौद्र– सहा शैवांतील हें एक मत आहे.

## ल.

लंका– हा एक द्वीपरूप प्रदेश दक्षिण समुद्रांत आहे. याचें मुख्य शहर याच नांवाचें असून तें पृथ्वीच्या मधोमध म्हणजे मध्यरेषेवर किंवा समवृत्तावर आहे. याला अक्षांश शून्य असल्यामुळें निरक्ष देश असें नांव ग्रंथांतून आढळतें. हल्लीं सिंहलद्वीपास लंकाद्वीप असें समजून त्यांतील कोलंबो शहर किंवा दुसरें

क्यांडी शहर तेंच लंकानगर असें कित्येक म्हणतात. परंतु तें म्हणणें चुकीचें आहे कारण, कोलंबो शहराचे उत्तर अक्षांश ७° व क्यांडी शहराचे ८° हे अगदीं नकाशांत स्पष्ट आहेत. [ हे.

लखनौशहर– याचें जुनें नांव लक्ष्मणावती होतें. अयोध्येच्या किंचित् पश्चिमेस हेंआ-

लघुकौमुदी– वरदराजकृत संस्कृत भाषेंत.

लघुचिंतामणि– गणेश दैवज्ञकृत पंचांग करण्या विषयीं, यांत गणित प्रकरण आ०

लघुमंजूषा– नागोजी भट्टकृत संस्कृत व्याकरण विषयावर.

लघुवाक्यवृत्ति– श्रीमच्छंकराचार्यकृत वेदांत प्रकरणीं श्लोक १८ यांवर हंसराजस्वामीची मराठी भाषेनें ओंवीबद्ध टीका. ५६०० आहे.

लघुशब्दरत्न– नागोजी भट्टकृत संस्कृत व्याकरण विषयावर.

लघुशब्देंदुशेखर– नागोजी भट्टकृत व्याकरण विषयावरच.

लज्जाराम– हा औदीच सहस्र जातीचा गुजराथी ब्राह्मण अमदाबाद येथें शके १७-०८ मध्यें होता. याची कविता उपलब्ध नाहीं. (काव्यदो०गु०)

लतीब– एक अवलिया. (रा०मा०)

लंबोदर– आंध्रभृत्य राजांतील एक. पौर्णमास राजाचा पुत्र. व विकल राजाचा बाप.

ललितविस्तर– जैन लोकांचा ग्रंथ. यांत शौद्धोदनी नांवाचा दुसरा बुद्ध त्याचें जन्मवगैरे चरित आहे. ग्रंथांमून जसे अध्याय असतात तसे यांत परिवर्त आहेत.

ललितादित्य– मुक्तापीड यासच म्हणतात. चंद्रापीडाच्या मागून हाच काश्मीरच्या गादीवर बसला. (बु० का० शो०).

लल्ल– हा एक ज्योतिषी होऊन गेलेला आहे. व हा भास्कराचार्यांच्या आधींचाआहे.

लवंगी– ही अकबर बादशाहास रजपूत राजकन्येपासून झालेली मुलगी. जगन्नाथ राय पंडितास जी त्यानें मागितल्या वरून दिली होती तीच ही.

लक्षणसंग्रह– रत्नेश कविकृत संस्कृत भाषेंत.

लक्ष्मण– श्रीमच्छंकराचार्यांचा शिष्य. शुद्धाद्वैत प्रतिपादन पुरःसर हस्तामलकाचार्यांसह वैष्णव मताचा स्थापक. (आनं० शं० प्र० ६८).

लक्ष्मणकवि– हा वाराणशी चारुकुळांत जन्मला होता. व जातीचा तैलंग ब्राम्हण असे. संस्कृतांत याची गति उत्तम होती. परंतु यानें पुढें कलावंतिणी व नट, यांस नृत्यकालीं हावभाव कसे करावे, ते शिकविण्याचें काम पतकरल्या मुळें, विद्वान् लोक यास नांवें ठेऊं लागले. मग यानें आपली गतप्रतिष्ठा पुनः मिळवि-

ण्यासाठीं, भोजराजानें केलेल्या रामायण चंपूचीं पांच कांडें पुरीं होऊन साहावें युद्धकांड पुरें होणें राहिलें होतें तें पुरें केलें. त्यावरून याचा मोठा लौकिक झाला. व त्या चंपूस "भोजचंपुलक्ष्मण" असें विद्वानानीं नांव दिलें तें अजून चालत आहे. (कविच०).

२– हाही कवि तैलंगच होता. आंध्रनाम संग्रह नांवाचा तैलंगभाषेचा कोश तो यानेंच चार कांडांनीं विभागून लिहिला आहे. याचा दुसरा ग्रंथ सुभाषित रत्नाकर आहे. व तो पहिल्या ग्रंथाचाच शेष आहे. (कविच०).

३– कोंडवीडू येथील राहणारा हा तिसरा कवि होता. प्रबंधराज नावाचें तैलंग भाषेचें व्याकरण यानें केलेलें आहे. यास वैयाकरणलक्ष्मण असें नांव आहे.

**लक्ष्मणगुप्त**– काश्मीराकडील नरसिंहगुप्ताचा पुत्र. व उत्पल आणि भट्टनारायण त्यांचा शिष्य. (बु० का० शो०).

**लक्ष्मणभट्ट**– वल्लभाचार्यांचा बाप व बल्लरभट्टांचा मुलगा. [ गावीं आहेत.

**लक्ष्मणराव**– हंसराज स्वामींचे गुरु. यांचे वंशज हल्लीं मोंगलाईंत शेवाळेंया

**लक्ष्मणसेन**– हा एक काश्मीराकडील वैद्य शके १०३८ मध्यें होता. (बु० का० शो०).

**लक्ष्मणाचार्य**– चंडीकुच पंचाशती ग्रंथाचा कर्त्ता. (बु० का० शो०).

**लक्ष्मणावती**– हाल्लीं लखनौ शहर म्हणतात.

**लक्ष्मी**– वल्लभाचार्यांची बायको.

**लक्ष्मीदेव**– क्षेमक राजाचें दुसरें नांव होतें.

२– मंखकवीच्या ग्रंथाची परीक्षा करण्यास काश्मीर येथें असलेल्या तीस पंडितांतील एक. हा वैदिक होता. (बु० का० शो०).

**लक्ष्मीनाथ**– पिंगलार्थप्रदीप ग्रंथाचा कर्त्ता. (बु० का० शो०)

**लक्ष्मीनारायणाप्पा**– हा नियोगी ज्ञातीचा ब्राह्मण. मगध देशांत राहात असे. हा मूळचा कर्नाटकांतील राहणारा व व्यंकाप्पा नामक एका ब्राह्मणाचा मुलगा होता. नंदराज वादीयर नावाच्या राजाच्या पदरीं हा कांहीं काळ होता म्हणून, शालिवाहनाच्या आठव्या शतकांत होता. मगध देशांतील विद्यालयांत याचें संस्कृत अध्ययन सूळ झालें. नंदराज यशोभूषण नांवाचें काव्य तें यानेंच केलेलें आहे. तें पंचांकीं काव्य हर्ष व वीररस प्रधान आहे.

पुढें यानें नंजन नाटक रचिलें. व तें नंजन नामक देवाच्या वर्णनपर आहे. या शिवाय उत्तर गोग्रहण, शारदासंभव, रंभानाटक आणि ऐरावत विजय.

इत्यादि ग्रंथ लिहिले. व त्या योगानें यास पुष्कळ द्रव्य मिळालें. या द्रव्यांतून यानें बराच मोठा अंश खर्च करून, एक मोठें तळें बांधिलें. व त्या सभोंवतें नारळी पोफळी इत्यादि झाडांचें आगर केलें. हा कवि पुष्कळ विद्यार्थी तयार करून, आपल्या वयाच्या ६१ व्या वर्षी मरण पावला. याच्या मागें यास एक मुलगा होता.

लक्ष्मीविलास– हा एक महालक्ष्मीचा उपासक श्रीच्छंकराचार्यांच्या वेळेस होता.(आ०)

लक्ष्मीसहस्र– व्यंकटाध्वरि यांनीं केलेला. हजार श्लोकांचा ग्रंथ.

लक्ष्मेश्वर– धारवाड जिल्ह्यांत सांगलीकरांच्या शिरहट्टी तालुक्या जवळ हा एक परगणा आहे. व हा मिरजकरांच्या ताब्यांत आहे. (महा० व कर्नाटकचा इ०).

लांगलराजा– हा सूर्यवंशोत्पन्न कलियुगांतील शुद्धोदन राजाचा पुत्र. परंतु बौद्ध व जैन म्हणतात कीं, सर्वार्थसिद्ध नांवाचा जो दुसरा बुद्ध तोच हा.

लाडदेव– अनंगभीम राजाचें हें दुसरें नांव.

लाडूभाट– शालीवाहन १७५१ मध्यें कांठेवाडांतील मुळीनामक गांवचा राहणारा भाट जातीचा हा कवि होता. (कविच०).

लालदास– हा कवि कोठला व कधीं होता तें कळत नाहीं. कृष्णप्रभाव वर्णन नांवाचा ग्रंथ मात्र गुजराथींत याचा आहे. (का०दो०).

लासाशहर– तिबेट देशाची राजधानी. हें उ० अ० क्र० ३१ व पूर्वरे० ९१ यांवर आहे.

लाहोरशहर– अमृतसर शहराच्या पश्चिमेस हें सुमारें ७५ कोसांवर आहे. याचे उत्तर अक्षांश सुमारें ३१ व पूर्व रे० ७१ आहेत. याचें जुनें नांव शालातुर नगर असें होतें.

लिंगकवि– हा तैलंगजातीय कवि मोठा इतिहासवेत्ता होता. पुराणामध्यें सत्त्वियुध राजाचें आख्यान आहे. त्याचें यानें तैलंगींत भाषांतर करून तीन भाग केले आहेत. (कविच)

लिंगय्याकवि– हाही कवि तैलंगच होता. व हा कोंडवीडू येथील राजाचा प्रधान असे. काश्मीरचा राजा केयूरबाहू, त्याचा वृत्तांत यानें काव्यरूपानें लिहिला आहे.(क०

लिंगराज– मलयाद्रि नृसिंह चंडांशुनामक ग्रंथाचा कर्ता. व हा जातीचा तैलंग होता.

लिंगसूत्रें– क्षीरस्वामीकृत संस्कृत व्याकरण विषयांतील लिंगभेदाचीं सूत्रें.

लिंगानुशासन– पाणिनीकृत संस्कृत व्याकरण विषयावर.

लिमडी– गुजराथेंतील एक गांव.

लीलादेवी– प्रख्यात भोजराजाच्या बायकोचें नांव.

**लीलाबाई**– एकनाथ स्वामींची मुलगी. व प्रसिद्ध मुक्तेश्वर कवीची आई.

**लीलावती**– प्रसिद्ध ज्योतिषी भास्कराचार्य यांची कन्या. हिचेंच नांव त्यांनीं आपल्या अंकगणितास दिलें असें म्हणतात. कारण यांस पुत्र मुलीच नव्हता.

**लीलावतीभूषण**– धनेश्वर दैवज्ञानें लिहिलेली लीलावती ग्रंथावर टीका ती.

**लीलाविश्वंभर**– मुक्तेश्वर कवीचीं आई बापें.

**लुकमानहकीम**– हा अकबर बादशाहा जवळ एक मोठा नामांकित वैद्य होता.

**लुधियाना**– याचें प्राचीन नांव वारणावत नगर. हें शतद्रू नदीच्या कांठीं आहे. पांडवांस जाळून मारण्या करितां दुर्योधनानें येथें लाक्षागृह करविलें होतें. असें जैन म्हणतात.

**लेखनपद्धति**– हा ग्रंथ हेमाद्रिपंतानें केलेला मराठी भाषेंत आहे. यांत कोणी कोणास पत्र कसें लिहावें त्याची व्यवस्था सांगितली आहे. याचे त्यानें सुगम, शुद्ध आणि रहस्य असे तीन प्रकार ठरविलेले आहेत. (वृद्धमा०).

**लेण्याद्रि**– जुन्नरा जवळचें कोरीव लेणें. येथें मुख्यत्वें करून गणपतीचें लेणें आ.

**लेशाभयतिलक**– शके ११५७मध्यें हेमचंद्राच्या काव्यावर कोणी जैन पंडितानें लिहिलेली व्याख्या.

**लोकजित्**– पहिल्या बुद्धाच्या सत्रा नांवांतील एक.

**लोकप्रकाशकोश**– क्षेमेंद्रकृत संस्कृत कोश.

**लोकभनय्या**– तैलंगणांत हा एक मोठा रसिक कवि होऊन गेला. तेलंगी भाषेंत लोकभनय्या याचा अर्थ जगमित्र आहे. त्याचप्रमाणें हाहोता. यानें संस्कृत हरिश्चंद्राख्यान भारतांतून काढून त्याचें तेलंगींत भाषांतर केलें आहे. तें इतकें रसिक झालें आहे कीं, आबालवृद्धांस तें लवकर समजतें. म्हणून हें नांव या कवीस मिळालें असें सांगतात. (कविच०).

**लोपामुद्रासंवाद**– वामनपंडितकृत मराठींत.

**लोंबकळ्यायवन**– शेकफरीद नांवाचा फकीर होता, त्यासच हें नांव आहे. कारण हा नेहमीं लोंबकळत राही. याचा दर्गा निफाडास आहे. (वृद्धमाहिती.)

**लोमधी**– आंध्रभृत्य राजांतील तिसावा राजा.

**लोलिंबराज**– दिवाकरभट्ट नांवाचा कोणी विद्वान् ब्राह्मण जुन्नरास राहात असे. त्याचा हा मुलगा. याचा बाप लवकर वारल्या मुळें हा स्वच्छंदी, मूर्ख आणि विषयी असा निघाला. म्हणून लोक याचा अतिशय अपमान करूं लागले. पु-

देें यास पश्चात्ताप होऊन हा शके १५५२ मध्यें सप्तशृंगास गेला. व तेथें यानें देवी-
ची निष्ठापूर्वक आराधना केली. या गोष्टीस बरेच दिवस लोटल्यावर यास देवी-
नें प्रसन्न होऊन आपल्या मुखांतील तांबूल याच्या मुखांत घालून तूं विद्वान् हो-
शील असा आशीर्वाद दिला. त्या वरून हा नसाव होऊन पुनः जुन्नरास परत आ-
ला असतां, याचे चमत्कार व याची विद्वत्ता लोकांच्या प्रत्ययास येत गेल्यानें याची
कीर्ति झाली.

एकदां असें झालें कीं, जुनरास कोणी यवन जातीचा सुभेदार होता. त्यानें या-
स सत्कारानें आपल्या घरीं बोलावून पुसलें. माझी स्त्री गरोदर आहे. तिला पुत्र
होईल कीं कन्या ? मला तर पुत्र व्हावा अशी इच्छा आहे. आणि तो जर झाला तर
मी आपणास जें मागाल तें देईन.. त्या वरून यानें सांगितलें. आपणांस निश्च-
यें करून पुत्रच होईल. व तो होतांच आपण मला आपली उपवर कन्या आहे
ती दिली पाहिजे. सुभेदारानें बरें आहे असें म्हणून यास घरीं पोंचविलें. कां-
हीं दिवसांनीं सुभेदारास पुत्र झाला. व त्यानें आपली कन्या बोलल्या प्रमाणें
यास दिली. तिचेंच नांव यानें रत्नकला असें ठेविलें.

पुढें शके १५५५ त यानें वैद्यजीवन नांवाचा ग्रंथ संस्कृतांत लिहिला. शिवाय
आणखीही याचे कित्येक ग्रंथ आहेत. हरिविलास काव्य तेंही यानेंच केलेलें आ-
हे. (कविच०). [क. (बु. का. शो०).

**लोष्ठ**— मंखाच्या ग्रंथाची परीक्षा करण्यास काश्मीरास जमलेल्या तीस पंडितांतील ए-

**लौकिकन्यायसंग्रह**— रघुनाथ वर्मानामक कोणी रजपुतानें केलेला संस्कृत भाषेंत
ग्रंथ.

**लौहित्यदेश**— काशीमणिपुराकडील प्रांत. हा बंगाल्याच्या पूर्वेस आहे. (प्रा. हि. न.).

## व.

**बंगदेश**— यास हल्लीं बंगालदेश म्हणतात.

**वचनविधि**— निष्कुळानंदकृत गुजराथी भाषेंत. [प. (रा.)

**वज्रमित्र**— शुंग म्हणजे संगराजांतील एक. घोषवसूचा पुत्र व भागवत राजाचाबा-

**वडगळ**— अहोबळ येथील रामानुजाचार्यांच्या गादीचें नांव.

**वडनगर**— हें एक शहर गुजराथेंत आहे. येथें गायकवाड्याचा अंमल आहे.

**वडवानलभट्ट**— कोंडवीडू येथील राहणारा ब्राह्मण, हा मोठा कर्ममार्गी असे. विद्वान्
असून कवि असल्या मुळें याचे लिहिलेले प्रबंध अनेक विषयांवर आहेत. नांवासा-

रखीच यांची करणी होती ती विषयीं अशी गोष्ट सांगतात कीं, हा एकदां ब्रह्मयज्ञ करण्या करितां तळ्यावर गेला. तेथें याच्या हातांतील सोन्याचें पवित्रक पाण्यांत पडलें. परंतु तें याच्या पासून इतकें दूर व खोल गेलें कीं, याच्या हातीं येण्यास मार्ग खुंटला. म्हणून याणें तळ्यास तूं आटून जा असा शाप दिला. त्या बरोबर तळें आटून कोरडें ठणठणीत पडलें. मग हा पवित्र घेऊन आपल्या घरीं आला. (कवि० चरि०).

**वत्सर भट्ट**– लक्ष्मणभट्टाचा बाप. व वल्लभाचार्यांचा आजा. याच्या बापाचें नाव गणेशभट्ट होतें.

**वत्सभूमिदेश**– शरयू आणि बाहुदा या दोन नद्यांच्या मध्यें असणारा देश. याची राजधानी कौशांबी नगर. (प्रा. हिं. न.)

**वत्सराज**– प्रख्यात भोजराजाचा चुलता. मुंजराजा जो त्याचा हा प्रधान.

**वत्सलाहरण**– मुक्तेश्वर कविकृत ओंबीबद्ध मराठींत.

**वत्सव्यूह**– कलियुगांतील सूर्यवंशी राजां पैकीं उरुक्रिय राजाचा मुलगा. व प्रतिव्योमाचा बाप. (रा. भा.).

**वनसुधा**– वामन पंडित कृत मराठींत

**वरताळ**– कांठेवाड जिल्ह्यांतील एक गांव.

**वरदराज**– मध्यम आणि लघु कौमुदी या दोन संस्कृत ग्रंथांचा कर्ता. (कविच०)
२– डांकूर येथील राहणारा गुजराथी ब्राम्हण. (का० दो०).

**वरदराजपंचाशति**– वेदांताचार्यकृत ५० श्लोकांचा ग्रंथ.

**वरदाचार्य**– वेदांताचार्यांचा शिष्य. कांची येथें रहात असे. हा चंद्रगिरीच्या राजाचा कुलगुरु जो तातचार्य त्याचा नातलग होता असें म्हणतात. परंतु हा रामानुज मताचा होता असें दिसून येतें. याने रहस्यत्रयसार, सत्यत्रय निरूपण, आणि वेदांतविजय. असे तीन ग्रंथ लिहिले. नंतर वसंत तिलकभाण हा ग्रंथ लिहिला. या चार ग्रंथांतून यानें पहिल्यांत विष्णुमंत्रांच्या व्याख्या, दुसऱ्यांत चित्, अचित् आणि ईश्वर या तीन पदार्थांचें निरूपण. व तिसऱ्यांत आपले गुरूचें वर्णन करून, चौथ्यात रंगनाथ देवाच्या उत्साहाचें वर्णन केलें आहे. व त्यांत अनेक चमत्कारिक विषय गुंफिले आहेत. ते विषय इतके आल्हादकारक आहेत कीं, त्यांच्या वाचण्या पासून आनंद होऊन याच्या कल्पना शक्तीची ही सीमा वाटते. हा आपल्या वयाच्या ५४ व्या वर्षी कांची येथेंच मरण पावला. (क.

**वररुचि**– उपवर्ष पंडितांच्या तीन शिष्यांतील जो कात्यायन त्यासच हें दुसरें नांव होतें. (कात्यायन) (रा० प०).

२— विक्रम सभेंत जीं नऊ पंडित रत्नें होतीं त्यांतील हा सवावें रत्न होता. प्राकृत प्रकाश नांवाचा ग्रंथ बालभाषेंतील सूत्रांविषयीं आहे. तो यानेंच रचलेला आहे.

वराडदेश— वरदानदीच्या तीरचा जो प्रदेश तो. त्या नदीच्याच संबंधानें थोडा वरदाशब्दांत अपभ्रंश होऊन हें नांव झालेलें असावें, असें वाटतें.

वराहमिहिर— विक्रम सभेंतील आठवें पंडित रत्न. हा मोठा सिद्धांति ज्योतिषी होता. कांपिल्य गांवच्या राहणाऱ्या कोणी आदित्यदास नांवाच्या ब्राह्मणाचा हा पुत्र होता असें म्हणतात. याची बुद्धि मोठी तीव्र व सूक्ष्मदर्शी होती. पदार्थविज्ञानांत ही याची गति चांगली होती असें सांगतात. कोलब्रुक साहेबांच्या मतें हा इसवीसनाच्या पांचव्या शतकांत होता. व कविचरित्रकारांच्या मतें इसवी सनाच्या १४व्या शतकांत होता. परंतु हीं दोन्हीही मतें याच्या संबंधानें चुकीचीं आहेत. कारण, विक्रम सभेंत हा होता म्हणून, यास होऊन गेल्यास १९०० वर्षांहून कमी वर्षें अगदीं झालीं नाहींत. याचे ज्योतिष विषयावर तीन ग्रंथ आहेत. त्यांत पहिला वराहमिहिर संहिता, दुसरा बृहज्जातक आणि तिसरा यात्रा निबंध. बुल्हरच्या शोधांत या तिसऱ्या ग्रंथास योगयात्रा असें म्हटलेलें आढळतें. वरजें याच्या बापाचें नांव आम्हीं लिहिलें तें कविचरित्रावरून लिहिलें आहे. परंतु तें आमच्या मतें दुसरें प्रमाण मिळे पर्यंत कायम नाहीं असें समजावें. ज्योतिर्विदाभरण ग्रंथही याचाच आहे.

वराहमिहिरसंहिता— ज्योतिष विषयावर वराहमिहिरकृत संस्कृत ग्रंथ.

वरुणावती— तिसऱ्या बुद्धाची आई. (जैन ग्रंथ.)

वर्द्धमान राजा— समरवीर नामक जैनधर्मी राजाचा जांवई. (ग्या. इं. को.)

वर्द्धमानशहर— यास हल्लीं बरहान म्हणतात.

वर्द्धमान स्वामी— महावीर नांवाचा जो जैन लोकांचा २४वा तीर्थंकर त्यासच जैन म्हणतात.

वल्लभदेव— मेघदूत काव्याचा टीकाकार. (बुल्ह॰ का॰ शो॰).

वल्लभभट्ट— अमदाबादचा राहणारा मेवाडा गुजराथी ब्राम्हण. हा शके १६७५ मध्यें होता. यानें गुजराथी भाषेंत लिहिलेले तीन ग्रंथ आहेत. धनुर्धारी वर्णन, कालिका व चौसष्ट जोगिणी वर्णन आणि बहुचरा देवीचें वर्णन. (का॰).

वल्लभाख्यान— गोपाळदासकृत वल्लभाचार्यांचें चरित्र.

वल्लभाचार्य— तैलंगणांत कांकरव नांवाच्या गांवांत तैत्तिरीय यजुःशाखी लक्ष्मणभट्ट नामक एक ब्राह्मण राहात होता. त्याचा हा मुलगा होय. याच्या आईचें

नांव एल्लम्मा गारू होतें. लक्ष्मण भट्ट हा आपल्या स्त्रीस समागमें घेऊन काशीयात्रेस गेला असतां, तेथून तो मगध देशांतील चंपकारण्यांत आल्यावर, तेथें आठमहिन्यांनींच एलम्मागारु संवत् १५३५ ह्मणजे, शके १४०० मध्यें वैशाख वद्य ११ स प्रसूत होऊन पुत्रास प्रसवली. तोच पुत्र हा पुढें वल्लभाचार्य अशा नांवानें प्रख्यातीस आला.

गिरिधर कवीनें संप्रदायप्रदीप ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं, लक्ष्मण भट्ट काशीस गेला त्या वेळेस तेथें कांहीं यवनांचा दंगा होता. म्हणून तो तेथून निघून, चौंडाशहरास जात असतां, मार्गांत स्त्री प्रसूत झाली. असें त्यानें पाहून दंग्याच्या भीतीनें तें मूल तेथेंच झाडपाल्यांत लपविलें व आपण स्त्रीस घेऊन पुढें गेला. पुढें दंगा शांत झाल्याचें त्यास कळलें. व तो परत काशीस येण्यास निघाला. तेव्हां येतानां ज्या जाग्यावर एलम्मागारु प्रसूत झाली होती तेथें आला. आणि पाहूं लागला तों सभोंवार अग्नि असून, त्यांत मूल सुखें करून खेळत आहे. तेणें करून त्यास आश्चर्य व आनंद होऊन, त्यानें त्या मुलास घेऊन स्त्रीच्या स्वाधीन केलें. आणि तिला घेऊन तो काशींत येऊन राहिला. ज्या जाग्यावर वल्लभाचार्यांचें जन्म झालें, तेथें ह्लीं देऊळ बांधलेलें कायम आहे.

वल्लभाचार्यांस वडील भाऊ होता त्याचें नांव रामकृष्ण होतें. व धाकट्या भावाचें नांव केशव होतें. हा केशव वल्लभाचार्यांच्या पाठीवर, लक्ष्मणभट्टास काशींत आल्यावर झाला होता. पुढें वल्लभाचार्य पांच वर्षांचा झाल्यावर लक्ष्मण भट्टानें त्याची मुंज केली. व नारायणभट्ट नामक एका विद्वान् ब्राह्मणाजवळ त्यास पढायास ठेविलें. तेथें असें सांगतात कीं, यानें चार महिन्यांत वेदशास्त्राध्ययन पूर्ण करून त्यांत तो उत्कृष्ट निपुण झाला. पुढें हा अकरा वर्षांचा झाल्यावर याचा बाप लक्ष्मणभट्ट वारला. म्हणून थोडे दिवस जाऊं देऊन, यानें मातुश्रीस तीर्थयात्रेची आज्ञा मागितली. ती तिनें देतांच हा तेथून निघाला, तो बहुत वर्षें यात्रा करीत होता. या यात्रा प्रसंगांत एका नगरशेटाचा मुलगा दामोदरदास, तो याचा शिष्य झाला. हा वल्लभाचार्यांचा पहिलाच शिष्य होता.

पुढें दामोदरदासास बरोबर घेऊन वल्लभाचार्य दक्षिणेकडील यात्रा करण्यास निघाला. व तो फिरत फिरत विद्यानगरास आला. तेथें असें सांगतात कीं, स्मार्त आणि वैष्णव यांचा फार दिवसांपासून तंटा पडलेला होता. त्यांत रामानु-

ज संप्रदाची व मध्वाचार्यांचा शिष्य व्यासतीर्थ, हे उभयतां स्मार्तांबरोबर वाद करीत असतां, त्या संधीस हाही तेथें जाऊन पोहोंचला. मग या तिघांनीं मिळून, स्मार्तांचा पराजय केला. या प्रमाणें होतांच विष्णुस्वामींची खंडित झालेली गादी निजवर, विद्यानगरच्या राजानें वल्लभाचार्यांची स्थापना केली. कारण तसें करण्या विषयीं त्यास दृष्टांत झाला होता.

याचें मत द्वैत नाहीं, विशिष्टाद्वैत नाहीं, व शुद्धाद्वैतही नाहीं. म्हणजे मध्व, रामानुज आणि शंकराचार्य यांच्या मतांहून याचें मत अगदींच निराळें आहे. असें असतां, यानें आपल्या मताचें नांव शंकराचार्यांच्याच मताचें ठेविलें आहे. परंतु त्या दोहोंत जें अंतर आहे, त्याचें स्पष्टीकरण आम्ही शंकराचार्य शब्दावर केलें आहे. तूर्त वाचकांनीं इतकेंच समजावें कीं, हा आपल्या मतास शुद्धाद्वैत नांव देतो. या विषयीं वेदांत चिंतामणि ग्रंथांत गोवर्द्धन भट्ट ऊर्फ गट्टुलाल पंडित त्यांनीं या प्रमाणें म्हटलें आहे.

शुद्धाद्वैतं सर्व शक्तिं जडजीवादि कारणं॥
साकारं सच्चिदानंदं वंदे श्री पुरुषोत्तमं१॥

वल्लभमतांत जीव दोन प्रकारचे मानिले आहेत. शुद्ध आणि अशुद्ध. यांत पुरुषोत्तम श्रीकृष्णाची सेवा करणारे तेमात्र शुद्ध आणि इतर अशुद्ध. तशीच सेवा दोन प्रकारची, म्हणजे एक साधनरूप सेवा आणि दुसरी फलरूप सेवा. साधनरूप सेवा म्हणजे शरीर व धन इत्यादिकांनीं करणें ती. आणि फलरूप सेवा म्हणजे मनें करून करणें ती. याच प्रमाणें मुक्ति म्हणजे, आपण वृंदावनांतील गोपी आहों अशा भावनेनें, सेव्य जो पुरुषोत्तम श्रीकृष्ण, त्याच्या अनुग्रहें करून रासक्रीडे संबंधीं प्राप्त जो निर्भर रसावेश ती. तात्पर्य या मतांत पुरुषोत्तम माया उपाधिरहीत केवळ शुद्ध साकार सच्चिदानंद मानिला असून, त्याचीच सेवा करणारा जीव त्याहून भिन्न परंतु शुद्ध जीव, अशा तात्पर्यानें या मतास शुद्धाद्वैत असें नांव आहे. वर जे दोन प्रकारचे जीव सांगितले त्यां विषयीं वल्लभाचार्यांनीं पुष्टिप्रवाह मर्यादा नामक ग्रंथांत येणें प्रमाणें म्हटलें आहे:—

तस्माज्जीवाः पुष्टिमार्गे भिन्ना एव न संशयः॥ भगवद्रूप सेवार्थं
तत्सृष्टिर्नान्यथा भवेत्॥ १ ॥ स्वरूपेणा वतारेण लिंगेनच गुणेनच
तारतम्यं न स्वरूपे देहेवातत्क्रिया स्ववा॥२॥ अर्थ वर आला आहे.

या शिवाय वल्लभाचार्यांच्या पुष्टिमार्गांत १० सिद्धांत म्हणजे आज्ञा आहेत त्या अशाः—

१ आचार्यांचा दृढ आश्रय करणें. २ श्रीकृष्ण पुरुषोत्तमाची भक्ति करणें. ३ लोकलज्जा सोडून व वेदशास्त्राची आज्ञा एकीकडे ठेवून आचार्यास शरण जाणें. ४ देव आणि गुरु यांशीं नम्रता ठेवणें. ५ मी पुरुष किंवा इतर स्त्री आहें असें मनांत न आणितां मी वृंदावनांतील गोपी आहें असें मानणें. ६ गोस्वामीचे गुण गायन करणें. ७ त्यांच्या नांवाचें महात्म्य वर्णन करणें. ८ गुरूची आज्ञा पाळणें. ९ गोस्वामी जें बोलतील अथवा करतील त्यावर विश्वास ठेवणें. आणि १० वैष्णवांचा समागम व तशीच सेवा करणें. या आज्ञां प्रमाणें न चालणारा तो मर्यादा मार्गी. मुख्य भक्त अथवा वैष्णव नव्हे.

कोणत्याही वस्तु असोत, त्या आधीं आचार्यास समर्पण करून नंतर आपण त्यांचा उपभोग घ्यावा. या विषयीं सिद्धांतरहस्य नामक ग्रंथांत अशीं आज्ञा वचनें आहेत :—

"ब्रह्म संबंध करणात्सर्वेषां देहजीवयोः॥ सर्व दोष निंवृत्तिर्हि दो-
"षाः पंचविधा मताः॥१॥ अन्यथा सर्व दोषाणां न निवृत्तिः कथंचन
"असमर्पित वस्तूनां तस्माद्वर्जन माचरेत्॥२॥— ब्रह्मसंबंध ह्मणजे आचार्यापासून उपदेश घेणें. याजवर गोकुळनाथांनीं व्याख्या लिहिली आहे ती येणें प्रमाणें :—

" तस्मादादौ स्वोपभोगात्पूर्वमेव सर्व वस्तुपदेन भार्या पुत्रादीना
" मपि समर्पणं कर्त्तव्यं। विवाहानंतरं स्वोपभोगे सर्व कार्य सर्व का-
" र्य निमित्तं तत्कार्योपभोगी वस्तुसमर्पणं कार्यं। समर्पणं कृत्वा प
" श्चात्तानि कार्याणि कर्त्तव्यानीत्यर्थः"

अर्थ:- आचार्यास कोणतीही वस्तु अर्पण केल्या शिवाय तिचा आपण उपभोग घेऊं नये. फार तर काय, स्त्री सुद्धां आधीं आचार्यास अर्पण करून नंतर आपण तिचा उपभोग घ्यावा.

वल्लभाचार्यांनीं संस्कृत भाषेंत ग्रंथ लिहिले ते येणें प्रमाणें:— १ व्याससूत्र भाष्य. २ जैमिनीसूत्र भाष्य. ३ तत्वदीप निबंध. ४ भागवत टीका सुबोधिनी. ५ सिद्धांत मुक्तावली. ६ पुष्टिप्रवाह मर्यादा. ७ सिद्धांत रहस्य. ८ चित्तप्रबोध. ९ अंतःकरण प्रबोध. १० विरोधलक्षण. ११ नवरत्न. १२ भक्तिप्रकरणनिबंध. १३ विवेक धैर्याश्रय. १४ पत्रावलंबन १५ कृष्णाश्रय. १६ भक्तिवर्द्धिनी १७ जलभेद. १८ सन्यास निर्णय. १९ निरोध लक्षण. २० सेवाफल २१ शृंगाररसमंडन

२२ पुरुषोत्तम सहस्रनाम. २३ वैद्यवल्लभ. आणि २४ अणुभाष्य. या मध्यें पहिले दोन तीन ग्रंथ मात्र मोठाले आहेत. बाकीचे सर्व लहान लहान आहेत.

वल्लभाचार्यांस स्त्री होती तिचें नांव लक्ष्मी होतें. आणि गोपीनाथ व विठ्ठलनाथ असे दोन पुत्र होते. वल्लभाचार्यांनीं गोवर्द्धन पर्वतावर असलेली गोवर्द्धन नाथाची मूर्ति, शके १४४१ मध्यें तेथून आणून मेवाडांत स्थापिली. हल्लीं ही मूर्ति जेथें आहे त्या स्थळास नाथद्वार ह्मणतात, व त्या मूर्तीस सर्व राजोपचारपूर्वक याचे वंशज जी सेवा करितात तिचा नित्याचा खर्च १२०० रुपये आहे म्हणून सांगतात. असो. या प्रमाणें संप्रदाय स्थापून पुढें वल्लभाचार्य शके १४५२ मध्यें आषाढ शुद्ध ३ येच्या दिवशीं काशीमध्यें हनुमान् घाटीं सन्यास करून समाधिस्थ झाले. (क० च०).

वल्लभाचार्यांचे वंशज जे हल्लीं आप आपल्या गाद्यांवर आहेत. ते जरी लक्षाधीश कोट्याधीश आहेत, व त्यांच्या हाता खालीं शतावधि नोकर लोक आहेत, तरी ते स्वतः वेळच्या वेळीं भगवत्सेवेस इतके सादर पाहण्यांत येतात कीं, तें पाहून खचितच चित्तास आनंद होतो. जैन धर्मांतून हजारों भाट्यांस व इतर गुजराथी लोकांस, ज्या त्यांच्या पूर्वजांनीं वैदिक धर्मांत आणून भक्तिमार्गास लाविलें, त्यांच्या भक्तीचें पोषण करण्यांत ते मोठे दक्ष दिसतात. व त्यांचे सेवक तेही वाखाणण्या सारखे भक्तिमान् आढळतात. मात्र थोड्या वर्षां मागें एका प्रकरणांत कित्येक भाट्यांचें रास्त म्हणणें महाराजांनीं नाकबूल केल्या वरून, भाट्यांत हल्लीं दुफळी झाली आहे ही गोष्ट अत्यंत दुःखावह आहे.

वल्लभाचार्यांनीं आपला संप्रदाय प्रवृत्त करतांना पोटांत चूकबीज असें धरिलें होतें कीं, श्रीमच्छंकराचार्यांच्या सनातन संप्रदायास होईल तितका मोडकळपणा यांवा. तोच प्रसंग स्वामी नारायण पंथानें आज त्यांजवरही गुजरला आहे. (स्वतःची माहिती.)

**वसंततिलकभाण**– भाण म्हणजे नाटका सारखेंच परंतु कांहीं निराळ्या स्वरूपाचें काव्य. हा ग्रंथ वरदाचार्यकृत आहे.

**वसंतसेना**– मृच्छकटिक नाटकांतील नायिका.

**वसावड**– कांठेवाडांतील एक गांव.

**वसुगुप्त**– स्पंदशास्त्राचा कर्ता. हा इसवी आठव्या शतकांत होता. (बु० कां० शो०)

**वसुचरित्र**– भट्टमूर्ति कविकृत तेलंगी भाषेंत. यांत वसुराजा आणि गिरिका

यांचा विवाह वर्णिला आहे.

**वसुदेव**– काण्व राजांतील पहिला. यानें शुंग अथवा संग राजांतील शेवटला राजा. देवभूति, त्यास मारून युधिष्ठिर शक सुमारें २७९१ मध्यें आपण राजा झाला. याचा पुत्र भूमिमित्र होता. (रा·मा·)

**वसुपूज्य**– जैनांच्या २४ तीर्थ करांतील बारावा. (तीर्थकर) शा·प· (प·

**वसुमित्र**– शुंग अथवा संग राजांतील एक. सुज्येष्ठ राजाचा पुत्र व भद्रकाचा बा-

**वसुरात**– भर्तृहरीचा व्याकरण शास्त्राचा गुरु. याला व्याकरण चंद्राचार्या पासून मिळालें होतें.

**वहीनर**– युधिष्ठिर वंशीय कलियुगांतील राजा. हा दुर्दमन राजाचा पुत्र व दंड पाणीचा बाप होता. यानें राज्य ५१ वर्षे ११ महिने व आठ दिवस केलें. याची राज्यकारकीर्द युधिष्ठिर शक सुमारें १६४६ व्या वर्षी आरंभली. व १६९८ व्या वर्षी संपली. याच्या कारकीर्दींत युधिष्ठिर शक १६९२ मध्यें नंदराजा मारला गेला. व १६९३ मध्यें चंद्रगुप्त राज्यावर बसला. प्रख्यात वैयाकरण जो पाणिनि तो १६९० मध्यें प्रख्यातीस आला होता. (हिंदु· ह· इ· व रा·मा·)

**वांई**– हें एक क्षेत्र कृष्णा नदीच्या कांठीं साताऱ्या पासून सुमारें १० कोसांवर आहे. येथें ब्राह्मणांची मोठी वस्ती आहे. आळि आळीचे कृष्णेस ओळीनेंच घांटआहेत, व प्रति घांटावर कृष्णेचे उत्साह क्रमा क्रमानेंच तेथील लोक करितात. तीएक या ठिकाणीं पाहण्या सारखी मौज आहे.

**वाक्यदीपक**– हा संस्कृत ग्रंथ व्याकरणावर आहे. व तो यशोमित्र नामक पंडितानें केलेला आहे. (बु· का· शो·)

**वाक्यपदीय**– हा संस्कृत व्याकरण विषयक ग्रंथ भर्तृहरिकृत आहे.

**वाक्यप्रदीप**– वाक्यपदीय ग्रंथाची व्याख्या. हेलाराज कृत एक व पुंजराज कृत एक अशा दोन आहेत.

**वाक्यवृत्ति**– श्रीमच्छंकराचार्यकृत दोन स्तोत्रें यांत एकीस बृहद्वाक्यवृत्ति व दुसरीस लघुवाक्यवृत्ति ह्मणतात.

**वाक्यसुधा**– श्रीमच्छंकराचार्य कृतस्तोत्र

**वागीश्वर**– मंखककवीच्या ग्रंथाची परीक्षा करणाऱ्या ३० पंडितांतील एक.

**वाग्भट्ट**– हा मोठा प्रसिद्ध वैद्य होऊन गेला. याचें जन्म मगध देशांत झालें होतें. व हा जैन धर्मी होता असें ह्मणतात. वाग्भट्ट ग्रंथ तो याचाच आहे. (बु·मा·)

अलंकारतिलक नांवाचाही एक ग्रंथ याचा आहे. (बु॰का॰शो॰).

**वाचस्पतिमिश्र–** भागीरथीच्या कांठीं पाटना शहर आहे, तेथील हा राहणारा ब्राह्मण. कल्पतरु आणि युक्तिदीपिका हे दोन ग्रंथ याचे आहेत. याच्या बायकोचें नांव भामती होतें. व ती मोठी विद्वान् होती. असें सांगतात कीं, कल्पतरूवर तिची संस्कृत टीका आहे. (वृन्दु मा॰ व बुल्ह॰ का॰ शोध॰)

**वामन–** काव्यालंकार वृत्तीचा कर्ता. हा जयापीड राजाचा दिवाण. इसवी ९ व्या शतकांत होता. काशिकावृत्तीचे ४ अध्याय यानेंच केलेले आहेत. (बु॰का॰शो॰)

**वामदेवकवि–** मुनिमत मणिमाला ग्रंथाचा कर्ता. हा ग्रंथ धर्मशास्त्र प्रक॰ आहे.

**वामनचरित्र–** वामन पंडित कृत वामनावतारा विषयींचें मराठी भाषेंत चरित्र.

**वामनचूडामणि पांड्ये–** पांड्य देशाचा चंपकमार राजा तोच. (कविच॰)

**वामन पंडित–** सातारा जिल्ह्यांत कोरे गांव म्हणून एक गांव आहे, तेथील हा वडिलार्जित वतनदार जोशी होय. हा फारच मोठा विद्वान् होता. व त्यामुळें दिवसास मशाल लाऊन देशोदेशीं केवळ शास्त्रप्रकरणीं वादकरीत हिंडे. याच्या बायकोचें नांव गिरीबाई होतें. व हा मध्यमतानुसारी होता. असें सांगतात कीं, हा जागोजाग जयपत्रें घेत घेत काशीस गेला असतां, तेथील सर्व पंडितांस यानें वादांत जिंकलें. त्यामुळें काशीकरांस याला जयपत्र देणें भाग आलें. परंतु उद्यीक पत्र देऊं असें ठरवून सभा उठली. मग याचा आनंद काय पुसावा? तो याच्या हृदयांतही मावेना!!

त्याच दिवशीं अस्तमानीं अशी गोष्ट झालेली सांगतात कीं, वामन पंडित हा बहिर्दिशेस बाहेर गेला, तेथें वडाचा मोठा एक वृक्ष होता. त्याला तीन मोठाल्या खांद्या होत्या. पैकीं दोहोंवर दोन ब्रह्मराक्षस बसले होते. इतक्यांत कोणी तिसरा ब्रह्मराक्षस येऊन, तो त्या तिसऱ्या खांदीवर बसूं लागला. असें पाहून पहिले दोघे त्यास निषेधून म्हणाले. अहो तुह्मीं येथें बसूं नका. तो विचारतो कां बरें? त्यास पहिले दोघे उत्तर देतात. तुमची येथें बसण्याची योग्यता नाहीं. तेव्हां तिसरा ह्मणाला, येथें बसण्यास योग्यता लागते काय? तथापि योग्यता राहूं द्या. मी निराश्रित आहें. मला कोठें बसण्यास जागा नाहीं व ही खांदी रिकामीही आहे. यास्तव कृपा करून मला बसूं द्या. दोघे उत्तर करितात. अहो तुह्मी ह्मणतां ती गोष्ट खरी. बिद्येचें असूं द्या. पण ही खांदी मुळीं रिकामी आहे कोठें? उद्याच द्विजवरील

अधिकारी येथें येऊन बसतील. मग तर तुह्मी जाणारच कीं नाहीं? यास्तव उद्यां जे जाणार ते आज कां गांशा गुंडाळाना?

तिसरा ह्मणाला, असें असेल तर मग आह्मांस जाणें भाग आहे. पण येथें उद्यांच्या उद्याच येणारे असे ते आहेत तरी कोण? मला उगीच नांवतर कळवाल? दोघे म्हणाले. अहो या क्षेत्रांत कोणी महा विद्वान् पंडित आले आहेत. ज्यांस वामन असें म्हणतात. त्यांनीं येथील क्षेत्रस्थ ब्राह्मणांस जिंकल्या मुळें त्यांस उद्यां जयपत्र मिळणार. तें मिळतांच त्यांस हर्षवायु होऊन ते मरणार, व ब्रह्मराक्षस होऊन लागलीच येथें येणार. त्या वरून तिसरा ब्रह्मराक्षस चालता झाला. परंतु इकडे हा संवाद वामनानें सर्व ऐकिला. आणि त्यावरून त्यास पश्चात्ताप होऊन, त्यानें दुसऱ्या दिवशीं सर्व क्षेत्रस्थांस बोलावून त्यांस आपणाजवळ जेवढें म्हणून कांहीं होतें तेवढें सर्व वांटून दिलें. आणि तेथून एका वस्त्रानिशीं बांयकोस घेऊन निघाला, तो दक्षिण देशीं परत आला. याच वेळे पासून प्राकृत भाषेनें यानें भगवद्गुणानुवाद वर्णन करण्यास आरंभ केला.

पुढें यानें तुकारामाची भेट घेतली म्हणून सांगतात. व रामदासस्वामीचेंही दर्शन घेतलें. त्यांत समर्थांनीं यास आशीर्वाद देऊन सांगितलें. तुजवर साक्षाद्भगवंताचाच अनुग्रह होणार आहे. यास्तव चिंता करूं नको. या वरून यानें, निर्मत्सर मनानें मध्व, रामानुज, वल्लभ, आणि शंकराचार्य यांचे सिद्धांत, एकाग्रपणें सावकाश मननानें घोळून पाहतां, याच्या अंतःकरणांत शांकर सिद्धांता विषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न झाली. व यास स्वरूप लक्षणांतील सद्रूप व चिद्रूप स्पष्टपणें समजलें. मात्र आनंदा विषयींची समजूत पडेना. ती बटुवेषधारी वामनानें, क्षणमात्रांत याच्या मनांत भरून देऊन, तो अंतर्धान पावला असतां हा अल्पच काळांत कृतार्थ झाला. नंतर यानें ग्रंथ लिहिले ते येणें प्रमाणें:—

ब्रह्मसूत्रांवर मराठी टीका, भगवद्गीतेवर भावार्थदीपिका, भागवतांतून नामसुधा, वेणुसुधा, दधिमंथन, भामा विलास, रुक्मिणी विलास, वामन चरित्र व कालिय मर्दन, त्याच प्रमाणें भारता पैकीं भीष्मप्रतिज्ञा, पार्थ भाग्य. आणि रामायणा पैकीं राम जन्म, भरत भाव, सीता स्वयंवर, लोपामुद्रा संवाद, या शिवाय वेदांत प्रकरणावर व गंगालहरीवरही याची

टीका आहे. हा विख्यात पुरुष शके १५९५ मध्यें वैशाख शुद्ध ५ स वांई जव-ळील पांडववाडी या गांवीं समाधिस्थ झाला. याचे वंशज काशींत असल्या-चें लोक सांगतात. (कविच. व इन्दू माहिती).

याच्या ग्रंथांतील वेदांतप्रकरणीं कांहीं उतारे.

विज्ञान जें अतिरहस्य विशुद्ध वेदीं॥ तेथेंचि भागवत धर्म न भक्ति भेदीं ॥ ज्या कारणें प्रिय कलत्र सुखादि वित्तें॥ तेव्हांचि भक्तिजरि तो उमजेल चित्तें ॥१॥ म्हणविती बहु वैष्णव आपणा ॥ परि न जाणति भक्तीचिया खुणा॥ हरि असें दुसरें जरि नावडे॥ तरीच ते हरि-भक्ति तया घडे॥२॥ प्रिय हरी सकळां हुनि जाणती॥ परि जयास्तव तो प्रिय नेणती॥ भजति कीं, सुखदे हरि आपणा॥ प्रिय तयीं निजजीव हरी उणा॥३॥ निज सुखार्थ हरि प्रिय जेधवां॥ अधिक आपुलि आवडि तेधवां॥ हरिहुनी प्रिय आणिकही अशी॥ निगम संमतिं भक्ति घडे कशी॥४॥ मैत्रेयी प्रति याज्ञवल्क्य निगमीं हें विस्तरें बोलिला॥ कीं ज्या साठिं समस्तही प्रिय असा आत्माचि हा आपुला॥ जो का आवडतो निभिन्न नसतां तो जाणसी जेधवा॥ कांहींही तुज जाणणेंचि न उरे सर्वज्ञ तूं तेधवां॥५॥ कोणी ते सगुणींच निष्ठ परि हा आत्मा प्रियंश्रीहरी॥ ऐसें भक्तिरहस्य नेणति नहे सद्भक्ति दोघां परी॥ आत्मा सर्व जडप्रकाशक असे लोकीं बहू जाणती॥ ज्ञाणोनि श्रुत कीर्तनादि सगुण प्रेमा मनीं नेणती॥६॥ रमे दो पुरुषीं नारी तेजशी व्यभिचारिणी॥ देवीं जीवीं तशी भक्ति केवल व्यभिचारिणी॥७॥ म्हणतसे श्रुति कीं पशुतुल्य तो॥ इतर मानुनियां हरि-सेवितो॥ ह्मणुनि आत्मपणें हरिसेवणें॥ परम वैष्णव तो नरिबोलणें८

वेदतत्त्वप्रकरण ६

दिसति भेदमतें निगमाश्रितें॥ परि समस्तहि नास्तिक मिश्रितें ॥
निगम दूषक नास्तिक ते जसे॥ श्रुतिगतार्थ विदूषक हे तसे॥ १॥
अनधिगत अबाधितार्थ वेदीं॥ अधिगत बाधित वर्णिताति भेदीं॥
अधिगत सकळांशि भेद जो हा॥ निवडित तत्वमसि श्रुतींत हाहा॥२
आहेसि तें तूं ह्मणवूनि साचा॥ जो अर्थ हा तत्त्वमसि श्रुतीचा॥ श्रु-त्यर्थ हा अर्थ गुरूप देशें॥ कळे रमाकांत कटाक्ष लेशें॥३॥ अहो-

टाकिलें श्रौत दूषोन शास्त्रीं॥ तिहीं घेतलें त्यास सिद्धांत पात्रीं॥ जसा त्यागिला कांडुनी धान्य कोंडा॥ समर्थें दरिद्र्यास तो होय मांडा॥४॥ संध्याकरा प्रतिदिनी ह्मणवून जैसा॥ वाक्यार्थ तत्वमसिचा न किमर्थ तैसा॥ स्पष्टार्थ आणिक अलौकिक अर्थ जेथें॥ व्याख्या बळेंचि करिती विपरीत तेथें॥५॥ श्रुतिगत न दिसे जो अर्थ तो व्याकरीती॥ अधिगत सकळांनें साधिती द्वैत रीती॥ श्रुतिगत दिसतो जो अर्थ तो आवडेना॥ गुरुविण न कळे जें बोलती तें घडेना॥६॥

वरील वाक्यां वरून, मध्वादिक द्वैतवाद्यांच्या मतावर वामनाची किती व कोणत्या प्रकारची निष्ठा होती, तें वाचकांच्या सहज लक्ष्यांत येईल. शिवाय निगम दूषक आणि श्रुतिगतार्थ विदूषक असें ह्मणून, म्हणजे निगम दूषक जे बौद्ध जैन वगैरे, त्यांच्या मालिकेंत श्रुतिगतार्थ विदूषक म्हणजे मध्वादिक द्वैतवादी त्यांची ही गणना केली आहे. तसेंच समर्थानें धान्य कांडून घेऊन टाकलेला कोंडा, भिकाऱ्यास तो मांडा होतो. म्हणजे शंकराचार्यांनीं ज्या श्रुति, व्यावहारिक म्हणून पूर्वाचार्यांच्या मता प्रमाणें सिद्धांतांत कोंड्या प्रमाणें समजून टाकिलेल्या, त्या यांनीं सिद्धांतपर मानून मांड्या प्रमाणें समजून घेतल्या. इत्यादि प्रकारें, निर्भीडपणानें त्यांची पत्ती कशी केली आहे तीही समजेल. सारांश. ही गोष्ट लहान मोठ्या सर्वांनीं ध्यानांत ठेवण्या सारखी आहे. (नव. वगैरे.)

वामनसूत्रवृत्ति– काश्मिराकडील वामन त्यानें लिहिलेली वृत्ति.

वारंगूळ शहर– एकशिला नगर.

वारणानदी– कोलापुराच्या उत्तरेकडील नदी. ही हरिपुरा जवळ कृष्णेस मिळाली आहे.

वारणावत– हालीं यास लुधियाना म्हणतात. [ठिकाण त्याचें नांव.

वाराणसी– वरुणा व असी या दोन नद्यांच्या संगमा जवळील काशीपुरीचें मूळ

वारिस्सार– चंद्रगुप्ताचा पुत्र जो वीरबाहु तोच. हा अशोक राजाचा बाप.

वार्तिक– कोणत्याही भाष्यावरील जी वृत्तिरूप व्याख्या तें. परंतु मुख्यत्वें करून शांकर भाष्यावरील वृत्तीस संज्ञा.

वार्तिककार– शांकर भाष्यावर वृत्ति लिहिणारा जो सुरेश्वराचार्य (मंडनमिश्र) तो.

वार्तिकपाठ– व्याकरण विषयावरील कात्यायन कृत वार्तिक तें.

वालीज– ही कवयित्री अव्वैयरची बहीण. हिला कारवार ज्ञातीच्या लोकांनीं वाढविलें. हिचें तामिळ भाषेंत पुष्कळ काव्य आहे. (कविच०).

वासवदत्ता– सुबंधु कविकृत काव्य.

वासवदत्तावृत्ति– श्रृंगार गुप्त कविकृत.

वासिष्ठसारटीका– रंगनाथ स्वामीकृत.मराठी भाषेंत ओंवी बद्ध टीका.

वासिष्ठाद्वैत भाष्य– संस्कृत भाषेंत रामानुजाचार्यकृत.

वासुदेवकवि– युधिष्ठिर विजय काव्य आणि न्यायसार पद पंजिका या ग्रंथांचा कर्ता. हा कवि काश्मिराकडे राहात असे. (बु॰ का॰ शो॰). ( बाप. ( रा.मा.)

विकल– आंध्रभृत्य राजांतील एक राजा. हा. लंबोदर राजाचा पुत्र व मेघस्वातीचा-

विक्रमचरित्र– कर्ता आढळत नाहीं. मात्र याच्यावर शिवदासाची टीका आहे. हा ग्रंथ मू-

विक्रमांकचरित– बिल्हण कविकृत संस्कृत भाषेंत. [ळ संस्कृतांत आहे. [बु.शो.]

विक्रमादित्य– कलियुगा मध्यें होणारे जे सहा शककर्ते त्यांतील हा दुसरा. युधिराच्या मागून, त्याच्या शकाचें ३०४५ वें वर्ष चालू होणार, त्याच वर्षीं कार्तिक शुद्ध प्रतिपदे पासून याचा शक चालू झाला. याच्या शकास संवत् अशा नांवानें कागदो पत्रीं व पंचांगांत लिहिण्याची चाल आहे. युधिष्ठिर शकाच्या ज्या वर्षीयाचा शक चालू झाला, त्या वर्षीं रक्ताक्षि संवत्सर होता.

वीरसेन नामक गंधर्वा पासून, सुशीला राजकन्येस झालेल्या चार मुलां पैकीं, हा दुसरा होता. म्हणजे भर्तृहरीहून हा धाकटा असून, मैनावती आणि सुभटवीर्य यांच्याहून वडील होता. हा मोठा पराक्रमी असे. तो असा कीं, यानें भरतखंडांतील सर्व राजे पादाक्रांत केल्यावर, रूम देशाचा शक जातीय कोणी यवन राजा, त्याच्यावर कांहीं प्रसंगानें स्वारी केली. व त्यास उज्जनीस धरून आणून शहरभर फिरविल्यावर सोडून दिलें. त्या विषयीं ज्योतिर्विदाभरण ग्रंथांत असें आहे.

योरूम देशाधिपतिं शकेश्वरं जित्वा गृहित्वोज्जयिनीं महाऽहवे॥
आनीय संभ्राम्य मुमोच तंत्वहो श्रीविक्रमार्कः समसह्य विक्रमः

यानें परोपकाराचीं शतावधि कृत्यें केलीं. त्यांचें वर्णन सिंहासन बत्तिशी, वेताळ पंचविशी इत्यादि अनेक संस्कृत ग्रंथांत, व नाथलीलामृत नामक प्राकृत ग्रंथांत प्रसिद्ध आहे. हा स्वतः भर्तृहरीसारखा नाहीं तथापि बराच विद्वान् होता. यानें आपल्या सभेंत नऊ पंडित बाळगले होते, व त्यांस रत्नें अशी संज्ञा दिली होती. त्या पंडितांचीं नांवें येणें प्रमाणें होतीं.

धन्वंतरिः क्षपणका मरसिंह शंकु वेतालभट्ट घट खर्पर कालिदासाः
ख्यातोवराह मिहिरो नृपतेः सभायां रत्नानिवै वररुचिर्नव विक्रमस्य १॥

या नऊ पंडितांचीं कामें जीं आमच्या ऐकण्यांत आलीं आहेत तीं येणे प्रमाणेः- धन्वंतरि याजकडेस वैद्यक्रियेचें काम होतें म्हणून, त्यानें राजाची प्रकृति पाहून औषधाची योजना करावी. राजास कोठें गमन करणें झाल्यास, त्याला जयसंपादक नेमकी वेळ क्षपणिकानें द्यावी. शब्दकोश इत्यादि लिहून, संस्कृत भाषा शिकण्यास सुलभ होईल तो उपाय अमरसिंहानें करावा. तव्वीं, देवालयें, व इमारती कशा बांधावयाच्या त्यांचे नकाशे तयार करून शंकूनें द्यावे. वेतालभट्ट मांत्रिक क्रियेंत निपुण असल्या मुळें, त्यानें राजाची देहरक्षा करावी. घटखर्परानें भूमिगत गुप्त द्रव्य साधण्याचे उपाय योजावे. कालिदासानें मनोरंजक काव्यें व नाटकें लिहून, राजास करमणूक करावी. वराहमिहिरानें खस्थ पदार्थांच्या वर्णनांनीं, राजास त्यांचे सप्रमाण अनुभव आणून द्यावे. आणि वररुचीनें बालभाषा सुधारून तिचे नियम बांधावे. या नवांमध्यें क्षपणक आणि अमरसिंह, हे दोघे मात्र जैन धर्मी असून उरलेले सात ब्राह्मण होते असें ह्मणतात. (वृन्दमा०).

* युधिष्ठिर शकाचीं ३०४४ वर्षें पुरीं होतांच, विक्रमास राज्याभिषेक होऊन त्याच्या शकास आरंभ झाला. व त्याचें पहिलें वर्ष मागून आलेल्या क्रमानेंच रक्ताक्षी संवत्सरापासून सुरू झालें. परंतु विक्रम संवत्सराचें वर्ष ३रें यांत भर्तृहरि जो याचा वडील भाऊ तो पुनः राज्यावर येऊन त्यानें बारा वर्षें राज्य केलें. तरी याचा शक जो चालू होता त्यास त्यानें व्यत्यय आणिला नाहीं. पुढें भर्तृहरि राज्य सोडून गेल्यावर, हा पुनः राज्य करूं लागला. मग मात्र यानें १२ वर्षें शिवाय करून ६३ वर्षें राज्य केलें. आणि नंतर मरण पावला. याच्या मागें याचा पुत्र जैत्रपाळ राज्य करूं लागला. त्याच्या राज्य कारकीर्दीच्या ५८ व्या वर्षीं शालिवाहनाचें व त्याचें मोठें युद्ध होऊन, त्यांत जैत्रपाळ मागें हटला. व नर्मदेच्या उत्तर तीरास गेला. त्याच्या मागें शालिवाहन लागला होताच, ह्मणून तो नर्मदा उतरूं लागला. परंतु दैव योगानें शालिवाहनाचें सैन्य, नदी उतरतांनां बरेंच बुडून मेल्या मुळें तो मागें हटला. तेव्हां पासून दक्षिणेकडे शालिवाहन शक चालू होऊन, उत्तरेकडे विक्रम संवत् चालू राहिला. तो अजून तिकडे चालत आहे.

या दक्षिण उत्तर भेदानें चालणाऱ्या दोन्ही शकांत दोहों कडील अधिकाऱ्यानीं फेरफार केला, तो सांगणें अवश्यक असल्या मुळें सांगतों कीं;-

शालिवाहनाचें व जैत्रपाळाचें ज्या वर्षी युद्ध झालें, त्या वर्षी सर्व भरत खंडांत बहुधान्य संवत्सर चालत होता. आतां पुढें प्रमाथी संवत्सर आरंभणार तों; शालिवाहनानें तें नांव बदलून त्याचें नांव प्रभव ठेविलें. व दक्षिणेकडे आपला शक चालू केला. हल्लीं शालिवाहन शकाचा कोणताही संवत्सर काढितांनां चालू वर्षसंख्येंत १२ मिळवून ६० नीं भागावें लागतें, व बाकी राहील तेथपर्यंत प्रभवापासून संवत्सर मोजावे लागतात, त्याचें कारण सदरीं लिहिलेली पिछेहाटच होय. तिकडे जैत्रपाळानें प्रमाथी संवत्सर कायम ठेविला. परंतु भर्तृहरीच्या राज्यकारकीर्दीचीं १२ वर्षें भोगलेली पोकळ समजून, विक्रम शकाचा आरंभ धाता संवत्सरापासून मोजण्याची रीत पाडिली ती अजून चालू आहे. व त्या रीती प्रमाणेंच हल्लीं कोणत्याही विक्रम संवताचा संवत्सर काढणें असतां, चालू वर्षसंख्येस फक्त ६० नीं भागावें लागतें. व बाकी राहिल्या वर्षांपर्यंत धाता संवत्सरापासून वर्षें मोजावीं लागतात त्यांचेंही कारण हेंच आहे.

विक्रमादित्याचा पुतळा, उज्जनीस त्याच्या मागें स्थापिलेला अलतमष नांवाच्या बादशाहानें शके ११५२ मध्यें फोडून नाहींसा केला. कारण त्यानें यवन राजास झिंकून उज्जनीस धरून आणिलें होतें. व त्याची अपमानपुरःसर अवंती देशांत मिरवणूक करून त्यास सोडिलें होतें. तो रोष सर्व यवनांच्या पोटांत होता. ( हिंदु० इ० इति० व अवांतर माहिती.)

**विक्रमोर्वशीनाटक–** विक्रमसभेंतील कालिदास कृत.

**विचारमाल–** अनाथजीकृत हिंदुस्थानी भाषेंत.

**विचारसागर–** दादूकृत हिंदुस्थानी भाषेंत.

**विंचूर–** हें एक लहानसें संस्थान आहे. येथील अधिकाऱ्यांस विंचुरकर म्हणतात. हें नाशिक जिल्ह्यांत निफाडा जवळ आहे.

**विंचूरकरघराणें–** शोध होणें आहे. खाशांकडे आमचा पहिला अंक गेला आहे. पण त्यांजकडून लक्ष पुरविण्यांत आलें नाहीं.

**विजय–** आंध्रभृत्य राजांतील २९ वा राजा. (राजमा.)

**विजयडिंडिम–** पद्मपादाचार्यकृत संस्कृत ग्रंथ.

**विजयध्वज–** जयश्री नगरचा राजा. गोरक्षनाथाचा बाप सद्बोध ब्राह्मण, तो याच्याच नगरांत राहात असे.

**विजयध्वजाचार्य–** भागवतावर जी विजयध्वजी टीका आहे तिचा कर्त्ता. याचा काळ

फळत नाहीं. यानें भागवतांत बऱ्याच ठिकाणीं पाठभेद करून ब्रह्मस्तुति तर अजि-
बाद गाळली आहे. [ टीके प्रमाणें नाहीं.

**विजयध्वजी**– मध्वमताप्रमाणें भागवतावरील टीका. हिची लोकांत मान्यता श्रीधरी

**विजयपत्तन**– कलिंग देशांतील एक शहर. [ याचा पुत्रअसे.

**विजयरंगचोक्कनाथ**– हा तंजावराकडील मांडलीक राजा होता. मधुरंगचोक्कनाथ तो

**विजलकाव्य**– विज्जल राजाच्या वर्णनाविषयीं जैनांनीं लिहिलेला ग्रंथ.

**विजलराजा**– कर्नाटकांतील कल्याण येथील जैनधर्मी राजा. हा राजा सोमवंशी क-
लचुर्य होता. बसवाचा हा यजमान होता. परंतु शेवटीं-यास बसवानें मारविलें.

**विजलेंकिनकाव्य**– विजलकाव्य तेंच.

**विजयानगर**– किष्किंधानगराचें हल्लींचें नांव.

**विजापुर**– सातारा जिल्ह्यांतील शहर. हें पूर्वीं ब्राह्मणी बादशाहांची नामांकित राज-
धानी होतें. तालिकोटाच्या पश्चिमेस हें आहे. याचे उत्तर अक्षांश सुमारें १७° व पू-
र्वरेखांश ७६° आहेत.

२– गुजराथेंतील एक गांव.

**विज्जक**– हा ग्रंथ हिंदुस्थानी भाषेंत भागोदासकृत आहे.

**विठ्ठल**– प्रसादनामक संस्कृत ग्रंथाचा कर्ता.

**विठ्ठलकवि**– हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होता. सीतास्वयंवर व रुक्मिणी स्वयंवर अ-
से दोन ग्रंथ याचे मराठींत श्लोकबद्ध आहेत. शिवाय पदें पुष्कळ असून कूट-
काव्य अथवा चित्रकूट काव्यही अगणित आहे. कूटकाव्यांत तें उलगडण्याविष-
यीं कोठें कोठें साहा महिन्यांचा वायदा असलेला वाचकांस ठाऊक असेलच. हा
शालिवाहनाच्या १६व्या शतकाच्या समाप्तीस होता. म्हणजे समर्थ रामदास स्वामीं-
च्या वेळेस हा होता. या कवीस देवीची भक्ति होती. असें खालीं लिहिलेल्या पदाव-
रून दिसून येतें.

शरत्सरसिजानने रवींदु बिंदुनेत्रेगे ॥ चलत्कुंडले स्फुकुंतले सुगात्रेगे
लसन्नासिके हरप्रमोदपात्रे गे ॥ अतिजडमति विनवूं मिकिति तुज भ-
गवति चल कलगति अंबे भवानी ॥ मज तारिंगे अंबे भवानी ॥ ध्रु॰ ॥ १
रणत्कंकणांगुलीयकाभिरामेगे ॥ तडिद्दीप्तिवर्ण किंकिणीकदामेगे ॥
झणन्नूपुरांघ्रि निर्जर प्रणामेगे ॥ अतिहितकर बहु स्फरवकर धरिं शि-
रीं करचल लवकर अंबे भवानी ॥ २ ॥ धर्म अर्थ काम मोक्ष तुझ्या हा-

तींगे ॥ दीन इच्छिला पदार्थ पुरुन धातीगे ॥ तुझिं स्तोत्रें विठ्ठलादिभ-
क्त गातीगे ॥ प्रणत जना जननि सतत करिं मजनत ढकलुनि मत देइं म-
जगत अंबे भवानी ॥ ३ ॥

आह्मांस या कवीविषयीं प्रथम अशी माहिती मिळाली होतीकीं, तो जातीचा शेण-
वी ब्राह्मण असून कोलापुराकडे अजरें म्हणून गांव आहे तेथील राहणारा होता.
नंतर दुसरी माहिती मिळाली तींत तो चित्रकूट काव्याचा कर्त्ता व कोलापुरच्या रा-
जाकडून पेशवे दरबारांत थोरल्या माधवराव साहेबांच्या वेळीं पुणें येथें वकील
होता. परंतु निबंधमालेच्या ६१ व्या अंकावरून दोघांचा कालनिर्णय होऊन गेल्या-
नें हा निराळा व तो निराळा अशी आमची खात्री झाली.

**विठ्ठलनाथ–** वल्लभाचार्यांस जे दोन पुत्र होते त्यांतील हा धाकटा. वल्लभाचार्य समा-
धिस्थ झाल्यावर यानें याचा थोरला भाऊ गोपीनाथ त्याशीं, गादीच्या मालकी वि-
षयीं तंटा उपस्थित केला. त्याच्या निर्णयासाठीं उभयतांही बादशाहाच्या दरबारीं
पुष्कळ दिवस पर्यंत दिल्लीस बसले होते. परंतु लवकर दाद लागून कांहींच नि-
काल होईना. इतक्यांत असें झालें कीं, गोपीनाथ दिल्ली येथें अकस्मात् मरण
पावला. तेणें करून हा ऐताच निष्कंटक झाला, व गादीचा उपभोग करूं लागला.

याला रुक्मिणी आणि पद्मावती अशा दोघी बायका होत्या. व दोघींची मि-
ळून यास अक्रा मुलें होतीं. त्यांत सात मुलगे व च्यार मुली होत्या. १ गिरिधर. २
गोविंदराय. ३ बाळकृष्ण. ४ गोकुळनाथ. ५ घनःश्याम. ६ रघुनाथ. ७ यदुनाथ.
हीं नांवें मुलांचीं होतीं. आणि शोभा, यमुना, कमला व देवका हीं नांवें मुलींचीं
होतीं.

हा विद्वान् होता. व यानें कित्येक नवे ग्रंथ लिहून कित्येक जुन्या ग्रंथांवर टी-
काही लिहिल्या. यानें आपण स्वतः लिहिलेल्या विद्वन्मंडन नामक ग्रंथांत, मना-
स वाटले तितके तोंड भरून श्रीमच्छंकराचार्यांस अपशब्द लिहून आपलें समा-
धान करून घेतलें आहे. ही गोष्ट एक याच्या विद्वत्तेंत मोठी अवर्णनीय आहे.
अस्तु हा शके १५०७ मध्यें माघ वद्य ७ स आपल्या वयाच्या ७० व्या वर्षीं मरण
पावला. तेव्हां याच्या मागें याचे सात पुत्र आपआपल्या सात गाद्या संभाळू-
न राहून, त्यांनीं संप्रदाय पुष्कळ वाढविला. व निरनिराळ्या रीतीनें विशेष कृ-
त्यें करून ते प्रख्यातीस आले.

संप्रदायी लोक विठ्ठलनाथास पांडुरंगाचा अवतार समजतात. व त्यास

गोसावीजी महाराज अशा प्रतिष्ठा नांवानें संबोधन करितात. याच्या वंशजांनीं व संप्रदायिकांनीं ग्रंथ लिहिले ते येणें प्रमाणें:— १ निजवार्ता. २ चौऱ्यांयशीं वैष्णवांची कथा. ३ बालबोध. ४ हरिरायकृत शिक्षापत्री. ५ मालाप्रसंग. ६ अग्निकुमार. ७ सेवाप्रकरण. ८ दोनशें बावन्न वैष्णवांची कथा. ९ शरणोपदेश. १० रससिंधु. ११ मूळपुरुष. १२ द्वारकेशकृत नित्यकृत्य. १३ शुद्धाद्वैतमार्तंड. १४ कल्पद्रुम. १५ आणि विठ्ठलनाथ अष्टोत्तर शतनाम. (कवित्र०).

**विठ्ठलनाथ अष्टोत्तरशतनाम**— वल्लभाचार्यांच्या मताप्रमाणें १०८ नांवाचा ग्रंथ.

**विठ्ठलपंत**— निवृत्ति, ज्ञानेश्वर, इत्यादि भावंडांचा बाप.

**विठ्ठलराव**— रंगनाथ स्वामींचे बंधु, आत्मास्वामी त्यांचें नांव.

**विठ्ठलशिवदेव**— विंचुरकरांचा मूळपुरुष व पेशव्यांचा सरदार.

**विठोबा**— नामदेवाच्या मुलां पैकीं एक. २ तुकारामाच्या मुलांपैकीं एक.

**वितस्ता**— हल्लीं नाम जेलम. ही नदी पंजाबांत आहे.

**विदग्धमुखमंडन**— धर्मदासकृत संस्कृत ग्रंथ.

**विदमिसर**— मगध देशाचा एक राजा.

**विदर्भदेश**— ज्यांतून वरदा नदी वाहते असा वराडदेश तो.

**विदेह देश**— मिथिला देश म्हणजे हल्लीं तिरहूत प्रांत

**विद्यातीर्थ**— दुसऱ्या शंकरविजयाचा कर्त्ता. माधवाचार्याचा गुरु.

**विद्याधिराज**— दुसऱ्या शंकराचार्यांचा आजा. म्हणजे शिवगुरूचा बाप.

**विद्यानगर**— अनागोंदी शहर तेंच.

**विद्यानाथ**— एकासील नगर म्हणजे वारंगूळ शहर, तेथील हा कवि राहणारा जातीचा ब्राह्मण होता. यानें विद्याभ्यासास २४ व्या वर्षी आरंभ करून तो ४० व्या वर्षी संपविला. व चांगला विद्वान् झाला. प्रतापरुद्र राजावर जें यानें नाटक लिहिलें तें चांगलें सर्वमान्य आहे. याच्या अंगीं शीघ्रकवित्वाचा व समयसूचकतेचा गुण उत्तम होता. त्या विषयीं एक गोष्ट अशी आहे. शिवय्या नांवाचा कोणी एक ब्राम्हणकवि, अग्रहारांत पीडा झालेली प्रतापरुद्राकडे सांगण्यासाठीं फिर्याद आला होता. व येऊन त्यानें या प्रमाणें श्लोक म्हटला. "नवलक्ष धनुर्धराधिनाथ पृथिवीं शाससि वीररुद्र भूपे । अभवत्सरमाग्रहारपीडा" हा तिसरा चरण यानें ऐकतांच राजास वाईट न वाटतां याचें कार्य व्हावें अशा उद्देशानें चौथा चरण झटकन् या प्रमाणें म्हटला:— "कुच कुंभेषु कुरं-

ग लोचनानां " याचा अर्थ, हे नवलक्ष धनुर्धर राजा, तूं पृथिवीचें पालन करीत अ-सतां स्त्रियांच्या स्तनमंडलावर मोत्यांच्या हाराचें ओझें झालें आहे. या प्रमाणें रा-जानें ऐकून यास बक्षीस दिलें. व शिवध्याचेंही काम केलें. हा कवि शालिवाहना-च्या तेराव्या शतकांत होता. (कविच०).

**विद्यानृसिंहभारती–** शृंगेरीच्या शंकराचार्यांच्या गादीवरील संन्यासी. शिवगुरुपु-त्र शंकरानें यांपाशीं अध्ययन केलें. पुढें तो चांगला आहे असें जाणून त्यास स-यांनीं सन्यास दिला. व विद्याशंकर भारती असें त्याचें नांव ठेऊन त्यास आपले गादीवर स्थापिलें. (दुसरे शंकराचार्य शब्द पहा.)

**विद्यापति–** पुरुष परीक्षा ग्रंथाचा कर्त्ता. हा कवि काश्मीराकडील होता. (बु.का.शो.) २– कीर्तनसंग्रह ग्रंथाचा कर्त्ता. हा कवि बंगाली होता. व याच्या असण्याचा काळ शालिवाहन १२४२ होता.

**विद्यारण्य–** सायण माधवाचार्यांचें संन्यास घेतल्यानंतरचें नांव.

**विद्याशंकरभारती–** शंकराचार्यांच्या गादीवर विद्यानृसिंहभारती नांवाचे असले-ले शंकराचार्य त्यांनीं जो पुढें गादीवर बसविला सन्यासी तो. हाही मोठा नामां-कित होऊन गेला. (दुसरे शंकराचार्य श.प.)

**विद्वन्मंडन–** विठ्ठलनाथकृत संस्कृत ग्रंथ.

**विद्वद्दूषणव्याख्या–** मधुसूदनकृत संस्कृत व्याकरण विषयावर ग्रंथ.

**विद्वेषवीर–** साहा प्रकारच्या शैवांतील एक. शंकराचार्यांनीं यास वादांत जिंकल्या-वर यानें त्यांची केलेली स्तुति आनंदगिरीनें शंकरविजयांत लिहिली आहे ती अशी:– श्लोक. "स्वामिन् त्वमेव शरणं मम सर्वदाऽसि संसार सर्प विषदग्ध तनुं नयाशु। मामद्य युष्मदति निर्मल वेदवाक्यै र्नष्टाभिदाऽस्मिशिव एव जग-त्सिताऽसि १॥ महादेवार्चन फलं गुरोस्त्वमसि सत्तम। अद्वैता मृत दातृत्वे रुद्रा-दप्युत्तमोत्तमः ॥२॥" ॥ गद्य ॥

"इति आचार्य शिरोमणिं स्तुतिपात्रं मुहुर्मुहुर्नत्वा तदीयचरणोद-
"कपानं तदुक्ताचारलक्षणं शिरसा परिगृह्य स्वकुल ग्रामदेशस्थान्
"सर्वानपि शब्दाद्वैत वादिनः कृत्वा श्रीमत्परमहंसाचार्य मभिवाद्य
"करवमास "

**विधिसार–** शिशुनागवंशीय मगध देशांतील राजा. क्षेत्रज्ञ राजाचा पुत्र व अजात शत्रूचा बाप. याला ग्यारेट साहेबाच्या कोशांत बिंबिसार असें म्हटलेलें आहे.

**विंध्यवासिनी**– मिरजापुराजवळ जी दुर्गानामक देवी आहे ती.
**विंध्याचल**– विंध्याद्रि नांवाचा माळव्यांत आहे पर्वत तो.
**विनयपत्रिका**– तुळशीदासकृत हिंदुस्थानी भाषेंत.
**विनयविजय**– शके १६०३ मध्यें सूरत जिल्ह्यांतील रादेर गांवचा राहणारा जती.या-
नें श्रीपाळरास नांवाचा ग्रंथ केलेला आहे. (काव्यदो.)
**विनयाग्निकवि**– काश्मीराकडील राहणारा. खंडप्रशास्ति वृत्तीचा कर्त्ता. (बुल्ह. शो.)
**विनशनतीर्थ**– कौरव पांडव यांची युद्धभूमि जें कुरुक्षेत्र त्यांतील तीर्थ.
**विनायक**– बुद्धाच्या नांवांतील अमरकोशांत अमरसिंहानें लिहिलेलें एक नाव.
**विनायककवि**– दशकुमारचरिताचा व्याख्याकार.
**विपक्षशूल**– सहा शैवांतील एक. शंकराचार्यांचा शिष्य झाला.
**विपाशानदी**– हाल्लीं बियानदी म्हणतात. ही पंजाबांत आहे. [ ॰शिष्य झाला.
**विप्रदेव**– सहा प्रकारच्या वैष्णवांतील भागवत मताचा वैष्णव. शंकराचार्यांचा पुढें.
**विमल**– पद्मपादाचार्यांचा बाप. हा ब्राम्हण होता.
**विरिंचिपाद**– आचार्यांच्या शिष्यांतील एक सन्यासी.
**विरीषपुर**– उळिवी शब्द पहा.
**विरूपाक्ष**– चन्नबसवपुराणाचा कर्त्ता. हा चांगला विद्वान् होता.
**विरोधमर्दन**– पौराणिक भूगोल वर्णनपर ग्रंथ. यांत सूर्य पृथिवीभोंवता नवीन पृ-
थिवी सूर्याभोंवती फिरत्से. या दोन्हीं मतांचें खंडन केलें आहे. व हा यज्ञेश्वर
ऊर्फ (बाबा जोशी रोडे) पुणें पाठशाळेंतील ज्योतिषशास्त्राचे माजी मुख्य गुरु.
यांनीं सुब्बाजी बापू तैलंगशास्त्री यांच्या खंडना करितां मुख्यत्वें केला होता.हा-
संस्कृत भाषेंत आहे.
**विरोधलक्षण**– वल्लभाचार्यकृत ग्रंथ.
**विलासवती**– आंध्रकालिदासाची वेश्या.
**विवनमोदतरंगिणी**– चिरंजीवभट्टकृत.
**विवादभंगार्णव**– जगन्नाथ तर्कपंचाननकृत संस्कृत ग्रंथ. हा धर्मशास्त्र विषयावर
आहे. याची ग्रंथसंख्या ७३०० आहे. (१८०० आहे.
**विवादरत्नाकर**– संस्कृत भाषेंत चंडेश्वरकृत धर्मशास्त्रावर याची ग्रंथसंख्या सु-
**विवादार्णवभंजन**– गौरीकांतकृत संस्कृत भाषेंत धर्मशास्त्रावरील ग्रंथ.
**विवेकधैर्याश्रय**– वल्लभाचार्यकृत संस्कृत भाषेंत ग्रंथ.

**विवेकमार्तंड**– गोरक्षनाथकृत योगप्रकरणीं संस्कृत ग्रंथ.

**विवेकसिंधु**– मुकुंदराजकृत वेदांत प्रकरणीं मराठी भाषेंत ओंवीबद्ध ग्रंथ. याचीं प्रकरणें १८ आहेत. पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे यांत दोन भाग असून पूर्वार्द्धांत प्रकरणें सात व उत्तरार्द्धांत अक्रा आहेत. द्वारसमुद्र शहरचा राजा जयत्पाळ त्यासाठीं हा ग्रंथ झाला.

**विशाखदत्त**– मुद्राराक्षस नाटकाचा कर्त्ता.

**विशाखयूप**– प्रद्योतराजांतील एक. पालक राजाचा पुत्र व राजकाचा बाप (रा० मा०)

**विशालानगरी**– भागीरथीच्या उत्तरतीरास अलाहाबादे नजीक हें शहर आहे.

**विशिष्टा**– भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्य त्यांची आई. (शंकराचार्य पहिले) श० प०

**विश्वकोश**– महेश्वरभट्टकृत संस्कृत भाषेंत.

**विश्वगुणादर्श**– हा ग्रंथ संस्कृत भाषेंत व्यंकटाध्वरी यांनीं केलेला आहे. यांत कृशानु आणि विश्वावसु या दोन गंधर्वांचा संवाद कल्पिलेला आहे. यांत एकानें सृष्टींतील पदार्थांचे गुण वर्णिले आहेत आणि दुसऱ्यानें दोष देऊन त्याचें खंडन केलें आहे. अशी याची रचना आहे.

**विश्वजित्**– भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्यांचा बाप.

**विश्वंभर**– मुक्तेश्वर कवीचा बाप. २ तुकारामाचा पूर्वज.

**विश्वरूपाचार्य**– शृंगेरीच्या गादीवरील पहिला पुरुष. २ मंडनमिश्रासही हें नांव (आहे.

**विश्ववर्त्त**– शृंगारभंग, अलंकार व मंख यांचा बाप. आणि मनोरथ ब्राह्मणाचा पुत्र. (बु० शो०)

**विश्वशंभु**– एकाक्षर नाममालेचा कर्त्ता. हा काश्मिराकडील कवि होता. (बु० का० शो०)

**विश्वामित्र**– सर्वार्थसिद्धाचा म्हणजे दुसऱ्या बुद्धाचा पंतोजी. (ललित विग्रह)

**विश्वासराव**– बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे त्यांचा थोरला मुलगा. व थोरल्या माधवरावाचा वडील भाऊ. हा पानपतच्या लढाईंत पडला.

**विश्वेश्वर कवि**– निर्णय कौस्तुभ नामक धर्मशास्त्र विषयक ग्रंथाचा कर्त्ता. (बु० का०)

**विष्णुगद्य**– त्रिगद्यांतील पहिलें प्रकरण. यांत विष्णुलोकींच्या रचनेचें वर्णन आहे.

**विष्णुगुप्त**– भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्यांचे शिष्य. (लें नाहीं.

**विष्णुदास**– रामचरित्राचा कर्त्ता. परंतु हा राहणारा कोठला व कधीं होता तें कळ-

**विष्णुपूजा**– रामानुजाचार्यकृत संस्कृत ग्रंथ.

**विष्णुप्रबोधन**– प्रातःस्मरण विधि रामानुजाचार्यकृत संस्कृत भाषेंत.

**विष्णुबावाब्रह्मचारी**— भिकाजीपंत गोखले नांवाच्या एक्या गृहस्थाचा मुलगा. व- वेदोक्त धर्मप्रकाश नामक गद्यरूप मराठी ग्रंथाचा कर्ता. हा पुरुष अल्पवयस्कच परंतु मोठा उत्कृष्ट वक्ता होऊन गेला. मुंबई इलाख्यांतील वगैरे पाद्री लोकांस असा वस्ताद कधींच मागें मिळाला नव्हता. पाद्रीलोक कोटिक्रमानें बोलणारे पे- वढे जबरे, पण त्यांस या पुरुषानें "दे माय धरणी ठाव" असें करून सोडलें होतें. विलायतेंत बायबल सुधारणें चाललें आहे, त्यास तरी कारण हाच पुरुष असें ऐकिवांत येतें. हिंदुलोकांनीं इंग्रजी धर्म स्वीकारून बाटणें, या गोष्टी तर याच्या कारकीर्दीत स्वप्नांत सुध्दां नाहींशा झाल्या होत्या. हा पुरुष उत्तम वैराग्य- शील व ज्ञानी होता, हें जरी खरें आहे, तरी याचें ज्ञान थोडें तऱ्हेवर गेलें होतें. या- चा मरणशाक महाशिवरात्र हा दिवस होय. याचें आमचें संभाषण झा- लेलें आहे.

**विष्णुबावाशेंबेकर**— रत्नागिरी जिल्ह्यांत शेंबें म्हणून गांव आहे तेथील हा राह- णारा जातीचा कराडा ब्राम्हण आहे. यास लोक काळबावा अशा नांवानें ओळ- खतात. हा पुरुष ज्ञानी परंतु उन्मत्त वृत्तीचा आहे. आणि याचा उपयोग लो- कांस परमार्थ संबंधानें अजून झाला नाहीं व पुढेंही होणें नाहीं. हा पुरुष ह- ल्लीं पुणें येथें विद्यमान आहे.

**विष्णुमानसपूजा**— श्रीमच्छंकराचार्यकृत

**विष्णुमित्र**— मंडनमिश्राचा सासरा. हा शोणनदीच्या तीरचा राहणारा होता.

**विष्णुशर्मा**— सहा प्रकारच्या वैष्णवांत ज्ञान आणि कर्म अशा भेदानें १२ भेद आहेत. त्यांतील ज्ञानी म्हणविणाऱ्या भक्तमताचा वैष्णव. नित्यकर्माचा परित्याग करू- न केवळ अनंत जो भगवान् तोच कायतो आपणास आश्रय. अशा बुद्धीनें स्वस्थ असणें याचें नांव ज्ञान्. असें शंकराचार्यांनीं ऐकून ते यास म्हणाले, हे मूढ विष्णुशर्मन्,- "जन्मना जायते शूद्रः कर्मणा जायते द्विजः" इतिवचना- त्. "आश्रम धर्मानुकूलं कर्म सर्वेषा मलंघ्यं। तस्यैव तपः शब्दवाच्यत्वात्। अह रहः संध्यामुपासीत्। उदित सूर्ये प्रातर्जुहोति। कर्महीनेतु पातित्यमिति दर्शना- त्। अतः सर्वैराश्रमिभिः वेदोक्तं कर्म अवश्यं कर्तव्यमेव। अतः स्वकर्म भ्रष्टानां भवतां ब्राह्मण्य हानिः प्रसक्तिःस्यात्। किंच ज्ञानमार्ग वर्तिनो वयमिति भव- द्भिरुक्तम् तत्राप्यधिकारोनास्त्येव। यद्यस्ति तर्हि सदसद्लक्षणं। ब्रम्हनाडिवि- भेदनं। विसरामर्ष भावं। षट्चक्रमार्गं दर्शयध्वं। एवमाचार्यैरुक्ते विष्णुशर्माद-

यः इदमूचुः । यतिनाथ अथ कर्मज्ञानं चोभयमेवाः स्माभिर्विदितं। त्रिकालमनंत देव पाददर्शनं विना न किंचिदस्तीति तद्वचः श्रुत्वा । संभूताश्चर्यः श्रीशंकराचार्य इदमाह। विष्णुशर्मन् कतिपयैरब्दैरेवंस्थितिः। सत्याह। मत्सदृशः ससमः पुरुषस्तत्पिता किंचित्कर्मशील इति बाल्ये मयाश्रुतं। तं निशाम्य। कोपाश्चर्योभयात्मक मानसः सकल गुरुराह हे भ्रात्य। सकल धर्म बहिष्कृत दूराद्गच्छेति। त्वत्संसर्गेणास्माकं दोषोभवेदिति विष्णुशर्माणमवादीत्। सदुःक्लेश पूरित मानसः सगणः समस्तापराधं क्षमस्वेति दंडवत् प्रणम्य संपुटित करद्वयः स्थाणुवत्समातिष्ठत् पश्चात्सगणस्य तस्य प्रायश्चित्तकरणे हस्तामलकादीन् निजशिष्यान्ना ज्ञापयामास। ततस्ते विष्णुशर्म प्रमुखानां स्नान ब्रह्मदंड समर्पण मुंडन सहस्र घटस्नान शत्तप्राजापत्य कृच्छ्र प्राच्योदिचांग गोदान भूशायन गोगर्भजनन जात कर्म नामकरण चौलोपनयन विवाह प्रमुख कर्माणि यथाविधि समाचरंत। विष्णुशर्मादयोपि विहित ब्राह्मणानुष्ठान तत्पराः श्रीपरम गुरु मिदमूचुः स्वामिन्। भवत्कृपया ब्राह्मण्यसिद्धिरासीत्। मोक्षसिद्धिः केनोपायेन नो भविष्यतीति जल्पंतं विष्णुशर्माण मिदमब्रवीत्।

> ब्राह्मणाचार देवास्युरीशो विष्णुर्दीनेश्वरः ॥ उमागणपतिश्चैव तेषां पूजा परानराः ॥१॥ ब्रह्मार्पण धिया कामान् परित्यज्या चरंतिते एवंकृते नित्यकर्मण्यमले मनसि प्रभो ॥२॥ जीवस्यच भिदाभावो भवत्येव न संशयः ॥ मूलाज्ञानस्य तत्तस्य निवृत्तिर्ज्ञान कारणम् ३॥ तेन भग्ने लिंगदेहे मुक्तिर्भवति नान्यथा॥ इत्यादिष्टो विष्णुशर्मा दंडवत्प्रणिपत्यतम् ॥ सगणः कारयामास नित्यकर्म गुरुं स्मरन् ॥ ४ ॥ स्मार्ताचार परिभ्रांतः पंचपूजा विशारदः ॥ त्रिपुंड्रं भस्मना कुर्वन् चंदनेनच सुव्रतः ॥ स्नात्वा मृत्तिकया चोर्ध्वं पुंड्रं कुर्वन् प्रयत्नतः ॥५॥

अर्थः- वर्णाश्रमास अनुकूल जीं कर्मे तीं सर्वांस अलंघ्य आहेत. कारण त्यांचें जें अनुल्लंघन तेंच तप असें म्हटलेलें आहे. दिवसा दिवसाचे ठायीं संध्योपासना करीत जावी. हें कर्म टाकणारा पतितत्वास पावतो. म्हणून आचार्य विष्णुशर्म्यास म्हणतात. स्वकर्म भ्रष्टजे तुह्मी त्या तुमच्या ब्राह्मण्याची हानि झाली. आम्ही ज्ञानमार्गी असें जें तुह्मी म्हटलेंस त्यांत पाहतां तुम्हास मुळींच अधिकार नाहीं. जर आहे तर सत्य काय व असत्य काय? ब्रह्मनाडी विभेद

ह्मणजे मायारूप जें इंद्रजाल त्याचा भेद (निरास) कसा, चित्परामर्ष ह्म० ब्रम्ह-साक्षात्कार तो कोणता? षट्चक्रें देहामध्यें आहेत तीं कोणतीं इत्यादि सर्व सांगा. विष्णुशर्मादिक ह्मणाले, यतिवर्य, अनंत देवाच्या चरणाचें त्रिकाल दर्शन करणें. यांत कर्म व ज्ञान सर्व कांहीं आलें. त्याहून कांहीं अधिक नाहीं. नंतर आचार्य म्हणाले अशी तुझी स्थिति किती काळापासून आहे. विष्णुशर्मा म्हणाला माझ्या सातव्या पूर्वजाचा बाप, किंचित् कर्मशील असल्याचें मी लहानपणीं ऐकिलें आहे. त्यावरून आचार्य अतिशय रागावून बोलले: हे व्रात्य, दूर हो. तुझ्या संसर्गानें आम्हाला दोष लागेल. पुढें विष्णुशर्मादिक आचार्यांस शरण आल्यावरून, त्यांनीं हस्तामलकादिक शिष्यांकडून त्यांस प्रायश्चित्त देववून जन्मापासून विवाहापर्यंत पुनः त्यांचे सर्व संस्कार करविले. नंतर विष्णुशर्मादिक म्हणाले, स्वामिन्, आपल्या कृपेनें ब्राह्मण्यसिद्धि झाली. आतां मोक्षसिद्धि कशी ती सांगा.

आचार्य बोलले ब्राह्मणाचारांत मुख्यत्वें शिव, विष्णु, सूर्य, उमा आणि गणपति या पांचांची पूजा आहे. ती ब्रह्मार्पण बुद्धीनें कामनारहित केली पाहिजे. असें केलें असतां नित्यकर्मानें चित्त निर्मल होऊन मग जीव आणि ईश्वर भिन्न होत अशी भावना उत्पन्न होते. त्या भावनेस मूलाज्ञान असें म्हटलेलें आहे. त्याचा नाश ज्ञानानें झाला असतां लिंगशरीर (वासना) नाहींशी होऊन मोक्ष होतो. असें ऐकून विष्णुशर्मादिकांनीं उक्त क्रमानुसार आचरण करून मोक्षसिद्धि अनुभविली. (आनं० शंकर० विज० प्र० ६).

विष्णुशर्मापंडित– हा महा विद्वान् पंडित जातीचा ब्राह्मण होता. हा कोठें राहात असे व कधीं होता त्या विषयींचा शोध लागावा तसा अजून लागला नाहीं. कविचरित्रांत त्याच्या कर्त्यानें असें लिहिलें आहे कीं, महिलारोप्य नगरीचा राजा सुदर्शन, त्याच्या वेळीं हा होता. परंतु महिलारोप्य नगरीस हल्लीं काय म्हणतात व ती कोठें आहे तसाच सुदर्शन कोणत्या वंशांतला वगैरे विषयीं त्यानें कांहींच लिहिलें नाहीं असें असतां, हा इसवी सनाच्या १२व्या शतकांत होता असें तर तो लिहून चुकला आहे. परंतु हा त्याचा लेख आम्हीं जें वृत्त खालीं लिहितों त्यावरून कसा आहे त्याचें अनुमान वाचकानींच करावें.

सुदर्शन राजाच्या मुलांस नीतिशास्त्रांत प्रवीण करण्या साठीं जो यानें पंचतंत्रात्मक ग्रंथ रचिला, त्याचा संक्षेप जो हितोपदेश, त्याचें फारशी भाषेंत भाषांतर प्रथमतः पारस देशाचा (इराणदेशाचा) राजा खुसरु होता.

त्यानें तें मोठ्या अगत्यानें शालिवाहन शके सुमारें ४७५ मध्यें करविलें आणि जर ही गोष्ट खरी आहे तर हा पंडित फार जुना आहे, असें ह्मणण्यास अगदीं बाध नाहीं.

विष्णुसहस्रनाम— रामानुआचार्यकृत संस्कृत भाषेंत. [तें.

विष्णुसहस्रनामभाष्य— व्यासकृत विष्णुसहस्रनामावर श्रीमच्छंकराचार्यांनें भाष्य

विष्णुस्वामी— द्रविड देशांत कोणी एक राजा होता. त्याजवळ जो ब्राह्मण जातीय प्रधान असे त्याचा हा पुत्र. वल्लभाचार्यमार्गीय संप्रदायप्रदीप ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं, यानें शांकरसिद्धांताचें खंडन करून साकारसिद्धि नांवाचा एक नवीन वैष्णवसंप्रदाय काढिला. व तो प्रचारांत आणिला. याच्या मतास बरेच लोक मिळाले. हा त्रिदंडी संन्यासी होता. व संप्रदाय वाढूं लागतो न लागतो तों हा मरण पावला.

विष्णुस्वामीचें मत चालविणारा पहिला पुरुष ज्ञानदेव होता. त्याच्या मागें क्रमानेंच केशव, हिरालाल, श्रीराम, श्रीधर, आणि बिल्वमंगल असे पुरुष एकामागें एक गादीवर झाले. परंतु बिल्वमंगल मरतांच असा चमत्कार झाला कीं, ही गादी अगदीं बुडाली. व पुढें बऱ्याच वर्षांनीं मागून वल्लभाचार्यांनीं तिचा जीर्णोद्धार केला. विष्णुस्वामीचा मतावलंबी गर्भश्रीकांतमिश्र, यानें जो साकारसिद्धिनामक ग्रंथ लिहिला आहे त्यावरून असें दिसतें कीं, विष्णुस्वामी नृसिंह उपासक होता. व तो त्याचा आकार सच्चिदानंदरूपच मानणारा असे. हीच गोष्ट सर्वदर्शन संग्रहांत रसेश्वर दर्शन प्रसंगानें सायण माधवाचार्यांनीं लिहिली आहे ती अशी :— "सच्चिन्नित्य निजाचिंत्य पूर्णानंदैकविग्रहं॥ नृपंचास्यमहं वंदे श्रीविष्णुस्वामिसंमतम्॥" हेंच मत वल्लभाचार्यांचें होतें. परंतु नृसिंहाच्या जागीं त्यांनीं पुरुषोत्तमास उभें केलें. आणि त्यास साकार सच्चिदानंद मानिलें. असो. विष्णुस्वामीस होऊन गेल्यास सुमारें साडेसातशें वर्षे आजमितीस झालीं असावींत. असा अदमास आहे. (कविच० व दृन्दू माहिती०)

विसोबाखेचर— हा सराफीचा धंदा करणारा व बार्शी येथील राहणारा जातीचा ब्राह्मण नामदेवाचा गुरु होता. ज्ञानेश्वरापासून यास आत्मस्वरूप बोधाची प्राप्ति झाली होती म्हणतात, परंतु हें कालमानानें संभाव्य दिसत नाहीं. (द्द०)

विसोबासराफ— हकीकत कळली नाहीं. साधु होता इतकें मात्र समजलें आहे. ज्ञानेश्वराचा हा शिष्य असेल तर नकळे.

विहंगी– बैरागी लोकांत जे दोन पंथ आहेत त्यांतील दुसरा.

विज्ञानभिक्षु– सांख्यसारनामक ग्रंथाचा कर्त्ता.

विज्ञानेश्वर योगी– याज्ञवल्क्य स्मृतीवर मिताक्षरानामक व्याख्या आहे तिचा कर्त्ता. हा विक्रमादित्याच्या वेळेस होता. (सरलाप्र.).

वीतिहोत्र– अग्न्युपासना मताचा वादी. (आ. शं. वि. प्र. १२).

वीरबाहु– चंद्रगुप्ताचा पुत्र जो वारिसार त्यासच जैन ग्रंथांत म्हटलेलें आहे.

२– अशोक राजानें आपलें राजधानी शहर नगर केलें व तेथें जो एक जैन अधिकारी स्थापिला तो. (जैनग्रंथ.)

वीरभद्र– साहा गाणपत्यांतील नवनीत गणपति मताचा वादी. (आनं. शं. प्र. १८).

वीरविजय– संवत् १९०५ मध्यें अमदाबाद येथें असणारा जती. गुजराथींत धम्मिल्लरास, हितशिक्षा वगैरे याचे ग्रंथ आहेत. (काव्यदो.)

वीरसिंह– कबिराच्या वेळेस काशीमध्यें राजा होता तो.

वीरसेन– युधिष्ठिर वंशीय शेवटला राजा क्षेमक (लक्ष्मीदेव) त्याचा हा प्रधान. यानें राजास मारिलें. व कौशांबी नगरांतून गादी काढून इंद्रप्रस्थास (दिल्लीस) नेऊन तेथें हा राज्य करूं लागला. या वेळेस युधिष्ठिर शकाचें १८५४ वें वर्ष होतें.

२– भर्तृहरि, विक्रमादित्य, मैनावती आणि शुभटवीर्य ह्या चार भावंडांचा बाप. याची मूळ गोष्ट अशी आहे कीं, स्वर्गीं इंद्रसभेंत असणाऱ्या या गंधर्वानें इंद्रादेखत मिश्रकेशी अप्सरेशीं कामसंकेत केल्यावरून त्यास राग आला. म्हणून त्यानें यास शाप दिला कीं, तूं गंधर्व चांगला जाणता असून गर्दभाप्रमाणें त्या निंद्य गोष्टीस प्रवृत्त झालास त्या अर्थी मृत्युलोकीं तूं १२ वर्षें गर्दभाचीच योनि पावशील. व पुनः स्वर्गीं परत येशील. त्यावरून चक्ररथ राजाच्या जंबुनगरामध्यें एका कुंभाराच्या घरीं, हा ती योनि पावला. या गोष्टीस कांहीं दिवस लोटल्यावर यानें एके रात्रीस मनुष्यवाणीनें कुंभारास म्हटलें. तूं या शहरच्या राजाकडे जाऊन त्यास असें कळीव कीं, माझा गर्दभ तुझी कन्या मागत आहे. म्हणून त्याचें म्हटलें ऐकशील तर तो तुझें सर्व नगर कांचनमय करील. त्यावरून ती गोष्ट कुंभारानें राजास कळवितांच त्यानें, आधीं नगर कांचनमय करून घेऊन नंतर त्यास कन्या दिली.

पुढें गर्दभानें, रात्रीं आपलें मूळचें गंधर्वरूप प्रगट करून राजकन्येशीं समागम केला. ही गोष्ट मुलीच्या सांगण्यावरून राणीस कळतांच, तिनें एके रात्रीं हा आपलें गर्दभशरीर टाकून गंधर्वरूपानें आपल्या स्त्रीशीं रममाण अस-

नां,त्याचें तें गर्दभ शरीर सेवकां कडून राणीनें दग्ध करून टाकविलें. त्यावरून या-स तेथेंच गंधर्वरूपानेंच मुदत भरे पर्यंत राहणें आलें. त्या वेळेस जीं त्या पासून रा-जकन्येस मुलें झालीं तेच भर्तृहरि आदिकरून पुढें प्रसिद्धीस आले. व गांधर्व राजे अशा नांवानें विख्यात झाले. (नाथलीलामृ. अ. १४ व ग्यारेट सा. इं. को. ).

वीरसेनवंश– क्षेमक (लक्ष्मीदेवाचा) प्रधान जो वीरसेन,त्याच्या वंशांत त्या कुळांचे दहा राजे झाले.त्यांचीं नांवें व राज्यकारकीर्दीचीं वर्षें येणें प्रमाणें:– युधि-ष्ठिर शकाच्या सुमारें १८५४ व्या वर्षी वीरसेन दिल्लींत राज्य करूं लागला व या-नें १७ वर्षें ७ महिने १ दिवस राज्य केलें.

| नांवें. | वर्षें | महिने | दिवस | विशेष घडलेल्या गोष्टी. |
|---|---|---|---|---|
| वीरसेन | १७ | ७ | १ | - दिल्लीशहर राजधानी झालें. |
| शूरसेन | ३२ | ८ | ११ | |
| वीरसा | ३७ | ८ | २२ | |
| अनंतसा | ३२ | १० | २३ | |
| रूपसा. | ३५ | ९ | ७ | - तिसरा बुद्ध युधिष्ठिर शक १९७७ जन्मला. |
| सुलोचन | ४३ | १ | १७ | |
| पर्वत | ४२ | ९ | ४ | |
| गोपाल | ३८ | २ | २५ | - कुमारिलभट्ट २११० मध्यें जन्मला. |
| ध्रुवाद | ३५ | ४ | २४ | - भग. पू. पा. श्रीमच्छं० २१५८ त जन्म० |
| पृथिवीपाळ | ३१ | ८ | १२ | - कुमारिल २१७३ व भगवत्पूज्यपा- |
| | ३४७ | १० | २७ | द श्रीम० २१९० म. धर्म स्थापून स्वलोकीं गेले. |

वृत्तिबोध– निवृत्तिनाथांनीं वेदांत प्रकरणावर मराठींत लिहिलेला ग्रंथ.

वृत्तिवार्तिक– अपय्यादीक्षित कृत.

वृंदसरस्वती– यादवेंद्र सरस्वतीचे गुरु.

वृंदावन– हें एक मथुरे जवळ क्षेत्र आहे.

वृंदासंभावना– अप्पाकविकृत तेलंगी भाषेंत. यांत वृंदा नांवाची एक दैत्याची बायको होती. ती विष्णुभक्त असे. तीच पुढें तुळस होऊन विष्णूस प्रिय झा-ली. ही कथा यांत आहे. या आख्यानांत कर्त्यानें मध्वमताचे लोक तुळशी-स मानितात असें लिहिलें असल्या वरून. हा मध्वाच्या मागून झाला होता असें

स्पष्ट दिसून येतें.

वृष्टिमान्– युधिष्ठिर वंशीय राजा, रुचिरथाचा मुलगा. व रुचेणाचा बाप.

वेणीसंहारनाटक– नारायणभट्टकृत.

वेणूबाई– समर्थ रामदास स्वामींची शिष्य. सिद्धिराम ग्रंथ मराठींत हिनेंच केलेला आहे. ही मिरज येथील देशपांड्याची कन्या, नवऱ्याशीं लग्न लागलें त्याच दिवशीं नवरा मरून विधवा झाली. शके १५४८ मध्यें हिचें जन्म झालें होतें. वैधव्य आल्यावर पुढें ही लौकरच समर्थांची शिष्य झाली. हिनें आपलें सर्व आयुष्य रामभजनांत घालविलें व अध्यात्म विद्येंत पूर्ण झाली. शके १५७७ मध्यें हिचा मठ मिरज येथें झाला. परंतु हिचें देहावसान समर्थ असतांच सज्जनगडीं झालें. हिची अध्यात्म विषयक समजूत व त्यापासून झालेलें हिचें समाधान उत्कृष्ट होतें. याविषयीं हिचीं पदेंच साक्ष देतात. (रामदा॰चरित्र)

वेणूसुधा– वामनानें केलेलें वेणूविषयक गीत मराठींत.

वेतालभट्ट– हा अतिशय मोठा मांत्रिक (मंत्रशास्त्र) वेत्ता ब्राम्हण विक्रमाजवळ नऊ पंडित रत्नांत होता.

वेताळपंचविशी– हा ग्रंथ मूळ संस्कृत भाषेंत आहे. व याच्यावर संस्कृतच शिवदासाची टीका आहे. गुजराथींत जें या ग्रंथाचें भाषांतर आहे तें सामळ भट्टानें केलेलें आहे. या ग्रंथाचा मूळ तर्जुमा फारशींत त्यांतून इंग्रजींत व नंतर मराठींत झाला. असें निबंधमालेवरून समजतें.

वेदगंगा– ही नदी कोल्हापुराकडील भूदरगड पेठ्यांतून निघालेली आहे.

वेदप्रबोध– हा ब्राह्मण मोठा विद्वान् होऊन गेला. याला भट्टाचार्य असेंही कोणी म्हणत. कुमारपाल राजास जैनधर्मांतून पुनः वैदिक धर्मांत यानें आणिलें.

वेदमौळी– तामिळ देशांतील भविष्यवेत्ता ब्राह्मण. पिरलीचा बाप. (पिरली श॰ पहा.)

वेदव्यास– बादरायण व्यास तेच. यांनीं वेदसूत्रें ज्यांस ब्रह्मसूत्रें म्हणतात तीं रचिलीं. व महाभारत लिहिलें. पांडवांचा आजा जो भीष्म तो व हा समवयी होते.

२– वेदांताचार्याचा बाप.

वेदशेखर– दक्षिणदेशांतील एक राजा. अद्वेयरचा भाऊ जो तेरुवेलुवर त्याच्या वेळीं हा होता म्हणून हा अडीच हजार वर्षां मागचा आहे. (कविच.)

वेदांत– वेदांचा शेवटचा भाग जीं आरण्यकें म्हणजे उपनिषद्भाग तो. यास ज्ञानकांड म्हणतात.

वेदांततत्त्वसार— हा ग्रंथ रामानुजाचार्यकृत संस्कृत भाषेंत आहे.

वेदांतदीपिका— गोपाळबाबाकृत.

वेदांतपरिभाषा— धर्मराजाध्वरीकृत.

वेदांतप्रदीप— संस्कृत भाषेंत रामानुजाचार्यकृत.

वेदांतभाष्य— वेदांताचार्यकृत संस्कृता मध्यें.

वेदांतमाला— सायण माधवाचार्यकृत.

वेदांतविजय— वरदाचार्यकृत. यांत वेदांताचार्यांचें सद्गुण वर्णन आहे.

वेदांतसंग्रह— वेदार्थ संग्रह रामानुजाचार्यकृत. तोच.

वेदांतसार— सदानंद स्वामीकृत संस्कृत भाषेंत.

वेदांताचार्य— वेदव्यास भट्टनामक ब्राह्मणाचा पुत्र. हा रामानुज मताचा वैष्णव होता. याचें जन्म कांची येथें झालें होतें. व हा शालिवाहनाच्या चौदाव्या शतकांतील उत्तरार्द्धांत होता. हा विद्वान् चांगला असे. यानें ग्रंथ लिहिले त्यांचीं नांवें अशीं आहेत. वेदांतभाष्य, पादुकासहस्र, रघुवीर गद्य, महाभारत तात्पर्य रक्षा, वरदराज पंचाशती, पंचायुधस्तोत्र, अंतर्ज्योति, शरणागतिदीपिका, यतिराजसप्तति, कस्तूरी तिलकपंचाशती, सुदर्शन स्तोत्र, दयाशतक, ऊर्ध्वपुंड्रविधि, क्षमाषोडशी, श्रीगुण रत्नकोश, भगवद्ध्यान सोपान, न्यासदशक, अभीतिस्तव, हरिस्मरण, दशावतार स्तुति, गरुडपंचाशती, अभयप्रदानसार, संकल्पसूर्योदय नांवाचें नाटक इत्यादिक अनेक ग्रंथ लिहिले.

हा मोठा वैराग्यशील होता. त्यामुळें गांव सोडून अरण्यांत राहात असे. व तेथें मधुकरी वृत्तीनें स्त्रीसह वर्तमान निर्वाह करी. यास पुत्र संतति नव्हति. वरदाचार्य शिष्यमात्र होता. यानें पुढें चतुर्थाश्रम घेऊन आपला काळ सार्थकीं लाविला. (कविचं०)

वेदांताधिकरणमाला— भारतीतीर्थकृत संस्कृत भाषेंत.

वेदाज्ञा— श्रीहंसराज स्वामीकृत ईशावास्य उपनिषदावर मराठींत ओंवीबद्ध टीका.

वेदेश्वरी— शिवगीतेवर श्रीहंसराज स्वामीची टीका. हिचे अध्याय १६ व ओंव्यांची संख्या १०००० आहे.

वेद्यलक्षण— वल्लभाचार्यकृत संस्कृत ग्रंथ.

वेनुगोंडा— राजमहेंद्री शहराजवळचा गांव.

वेरूळ— हें एक नामांकित लेणें अशोकराजानें कोरविलेलें आहे. या कामास युधिष्ठि-

र शक १७५० मध्यें त्यानें आरंभ करवून १७६२ मध्यें १२ वर्षांनीं तें समाप्त करवि-
लें. देवगड किल्ला याच वेळेस तयार झाला.

**वैखानसमत**— सहा प्रकारच्या वैष्णवांतील एक प्रकारचें मत.

**वैद्यजीवन**— संस्कृतांत लोलिंबराजकृत वैद्यशास्त्र विषयक ग्रंथ.

**वैद्यनाथ**— हा एक संस्कृत भाषेचा कवि होता. याचा व्याकरण विषयावर भावप्रका-
श नांवाचा ग्रंथ आहे. या शिवाय प्रभा, कला, परभाषा काशिका, व चिदस्थिमाला हेही
ग्रंथ आहेत. (कविच.).

**वैद्यामृत**— मोरेश्वरभट्टकृत संस्कृत वैद्यकावरील ग्रंथ.

**वैनगंगा**— ही नदी नागपुराच्या पूर्वेस आहे.

**वैभाषिक बौद्ध**— च्यार प्रकारच्या बौद्ध मतांतील एका मताचे बौद्ध.

**वैयाकरणभूषण**— भट्टोजी दीक्षितकृत एक व कोंडभट्टकृत एक.

**वैयाकरणभूषणदर्पण**— हरिवल्लभकृत.

**वैयाकरणसर्वस्व**— धरणीधर काशीनाथकृत.

**वैराग्यशतक**— राजा भर्तृहरीकृत.

**वैशालीनगर**— विशाल नगरी कोणी अलाहाबाद म्हणतात.

**वैष्णवमत**— साहा प्रकारच्या वैष्णवांतील एक मत.

**व्यंकटपतिराजा**— हा ज्ञातीचा क्षत्रिय असून कवि होता. हा अनागोंदी येथील
राजाच्या लष्करांतील एक हुद्देदार असे. याला संस्कृत व तेलंगी उत्तम येत-
होतें. वीररस प्रधान असें चित्रांगद चरित्र नांवाचें यानें केलेलें काव्य सर्व-
मान्य आहे. (कविच०).

**व्यंकटपतिरायलू**— चंद्रगिरी येथील राजा. हा अपय्यादीक्षितांच्या वेळेस होता.

**व्यंकटराव घोरपडे**— पेशव्यांचा सरदार. हा थोरल्या बाजीराव साहेबांच्या बहि-
णीचा मुलगा. यांच्या राहण्याचा व जहागिरीचा गांव इचलकरंजी होय.

**व्यंकटाध्वरी**— रघुनाथ दीक्षितांचा पुत्र, कांची मंडलांत अरिशालपल्ल येथें रा-
हात असे. हा लक्ष्मीचा उपासक होता. विश्वगुणादर्श, लक्ष्मीसहस्र आणि
हस्तगिरिचंपु हे तीन ग्रंथ, यानें जेवढे ग्रंथ लिहिले त्या सर्वांत उत्तम आहे-
त. असें सांगतात कीं, विश्वगुणादर्श हा याचा ग्रंथ स्तुतिनिंदात्मक झाल्या-
मुळें, याचे डोळे गेले होते. व ते लक्ष्मीसहस्र केल्यावर पुनः पूर्ववत् झाले.

**व्यंकटेशस्तोत्र**— देवीदासकृत मराठींत ओंवीबद्ध.

रास आहेत.

व्यंकाप्पा– लक्ष्मीनारायणाचा बाप.

व्यंकोजीराजा– हा राजा शिवाजी महाराजांचा सावत्र भाऊ. याचे वंशज हल्लीं तंजाव-

व्याडी– उपवर्ष पंडिताचा शिष्य. पाणिनि वैयाकरण त्याचा हा गुरुबंधु होता. पाणि-
नीच्या व्याकरणावर संग्रह नांवाचा जो ग्रंथ आहे. तो याचा होय.

सें म्हणतात.

व्यास– वेदव्यास प्रथमार्थक शब्द पहा.

व्यासतीर्थ– मध्वाचार्यांचा शिष्य. हा आपल्या गुरूपेक्षांही अधिक विद्वान् होता, अ-

व्यासदास– वैखानस मताचा वैष्णव. भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्यांचा शिष्य
झाला. (आनंदगि० शंकरविजय प्र० ९).

२– काश्मिराकडे झालेल्या क्षेमेंद्र कवीसही हें नांव होतें. ( बु० का० शो० ).

व्याससूत्रभाष्य– भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्यकृत एक व वल्लभाचार्यादि आचा-
र्यकृत इतर. यांत शंकराचार्यांच्या भाष्या विषयीं आनंदगिरीनें आपल्या शंक-
रविजयांत ५२ व्या प्रकरणामध्यें जें लिहिलें आहे ते शंकराचार्य पहिले या नां-
नांवावर आहे. यास्तव तें तेथें पहावें.

## श.

शंकर– तुकारामाच्या पूर्वज पुरुषांतील. ( तुका० अभं० गाथा० )

शंकरकवि– हर्षचरित संकेतनामक संस्कृत ग्रंथाचा कर्ता. ( बुल्ह० का० शोध० )

शंकरपंडित– शांकरीनामक ग्रंथाचा कर्ता.

शंकरपादभूषण– रघुनाथशास्त्री पर्वतेकृत वेदांतप्रकरणावर.

शंकरमंदार सौरभ– नीलकंठभट्ट कृत शंकराचार्यांविषयीं वर्णन. या ग्रंथांत शि-
वगुरूचा पुत्र शंकर तोच शंकराचार्य असें कर्त्यानें नांव लिहून, त्याचा जन्मका-
ळ कलियुगाच्या ३८८९ व्या वर्षी लिहिला आहे, तो जैन ग्रंथा वरून पाहतां
२९० वर्षांनीं उणा असल्यामुळें चुकीचा आहे.

शंकरविजय– आनंदगिरि म्हणून जो भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्यांचा शिष्य
होता, व ते दिग्विजय करीत फिरत असतां नेहेमीं त्यांच्या बरोबर असे, त्यानें
आचार्यांच्या हकीकती विषयीं लिहिलेलें जें वर्णन त्या विषयींचा ग्रंथ तो. याचीं
प्रकरणें ७४ आहेत. यांत आचार्यांच्या बापाचें नांव विश्वजित्. आईचें नांव वि-
शिष्ठा जात द्रविड ब्राह्मण. आणि जन्मभूमि चिदंबर या प्रमाणें आहे. त्यांनीं कुमा-
रिलभट्टास भेटून सूत्रभाष्य लिहिलें. व मंडनमिश्रास वादांत जिंकून त्यास
सन्यास दिला. सदरीं लिहिलेलीं नांवें व इतर वृत्तांत जैन लोकांच्या ग्रंथाशीं

बरोबर जमती. म्हणून यांत लिहिलेले शंकराचार्य मूळचे समजावेत आणि काल-मानानेंही ते पहिले असें वाचकांनीं बळकट ध्यानांत ठेवावें. (प्रथमा० शं० श० प०)

२– माधवाचार्यानें लिहिलेला शंकरविजय तो. याचे सर्ग १६ आहेत. यांत त्यानें ज्या शंकराचार्यांचें वर्णन लिहिलें आहे. तो मूळच्या शंकराचार्यांच्या गादीवर झालेला एक नामांकित पुरुष होता व तो विद्याशंकर भारती अशा नांवानें प्रसिद्ध होता. त्याच्या बापाचें नांव शिवगुरु व आईचें नांव सती होतें. आणि तो केरल देशांत पूर्णा नदीच्या तीरीं जन्मला होता. त्यानें दिग्विजय केला अशा विषयींचें प्रत्यंतर जैन लोकांच्या ग्रंथावरून पटतें. परंतु कुमारिल भट्टाशीं त्याची भेट व मंडनमिश्राशीं त्याचा वाद झाला. असें जें त्यानें लिहिलें तें असंभाव्य आहे. कारण त्याच्या वेळेस ते मुळींच नव्हते. म्हणून व जैनांनीं लिहिलेल्या काला वरून हा शंकराचार्य दुसरा असेंच निःसंशय दिसतें. (द्वितीयार्थक शंकराचार्य शब्द पहा.)

३– सदानंदानें लिहिलेला शंकरविजय तो. यांतील वर्णन माधवाचार्यांच्या वर्णनाशीं अगदीं सारखेंच आहे. असें असतां यानें जो त्याचा काळ दाखविला आहे तो पुष्कळच उणा आहे. म्हणून शिवगुरु पुत्र जो शंकराचार्य तोच हा असें म्हणतां येत नाहीं. यास्तव हा तिसरा असला पाहिजे. व याचे आईबापही निराळे पाहिजेत.

शंकराचार्य– कलियुगामध्यें उत्पन्न झालेल्या अनेक पाखंडमतांचा विध्वंस करून, लुप्त झालेल्या सनातन वैदिक धर्माची पुनः स्थापना करावी. या साठीं झालेला शिवावतार तो. या अवतारा विषयीं भविष्यवचनें पुराणांतून पुष्कळ आहेत. त्या पैकीं कूर्मपुराण अध्याय ३० यांतील एकवचन आर्यविद्यासुधाकर ग्रंथांत दाखविलें आहे, तें येणें प्रमाणें :–

> कलौ रुद्रो महादेवो लोकाना मीश्वरःपरः ॥ करिष्यत्यवतारंस्वं शंकरो नील लोहितः ॥ १ ॥ श्रौतस्मार्त प्रतिष्ठार्थं भक्तानांहित काम्यया ॥ उपदेक्ष्यति तत्ज्ञानं शिष्याणां ब्रह्मसंमितम् ॥ सर्व वेदांत सारंच धर्मान्वेद निदर्शनान् ॥ २ ॥

अर्थ:- श्रुति स्मृति प्रतिपादित धर्माची प्रतिष्ठा करण्या करितां, व तेणें करून भक्तांचें हित होण्या करितां, परमेश्वर जो महादेव तो कलियुगांत स्वतः अवतार धारण करील आणि ज्यांत ब्रह्मस्वरूपाचा विचार सांगितला आहे, तें वेदां-

तांतील सारभूत ज्ञान शिष्यांस उपदेशील.

आनंदगिरीनें आपल्या शंकरविजयांत, जें यांच्या विषयीं लिहिलें आहे त्यांतील सारांश येणें प्रमाणें आहे. एकदां नारदमुनि स्वर्गलोकांतून फिरत फिरत पृथिवीवर आले असतां त्यांनीं असें पाहिलें कीं, वेदप्रतिपाद्य सत्यज्ञानानंत आणि गुणातीत अशा दैवतास सोडून लोक अनेक प्रकारचीं दैवतें कल्पून त्यांच्या भजनास लागले आहेत. व शरीर साध्या चिन्हांनीं तसेंच नसमुद्रादि चिन्हांनीं चिन्हित करून शोभवूं लागले आहेत. त्यावरून त्यांस अत्यंत सखेदाश्चर्य होऊन, त्यांनीं ही गोष्ट सत्यलोकीं जाऊन आपला पिताब्रम्हदेव त्यास कळविली. आणि सांगितलें कीं, पृथिवीवर अनेक प्रकारच्या नव्या नव्या तऱ्हा उत्पन्न करून तिचा लोकांनीं मोठा घोंटाळा केला आहे. व चार्वाकादिकांनीं तर सर्वच नाश केला आहे. यास्तव याचा विचार होऊन लोक सन्मार्गास लागतील असें व्हावें. त्यावरून ब्रह्मदेव कैलासीं श्रीशंकराकडे गेले. व त्यांनीं त्या परमेश्वराची स्तुति करीत या प्रमाणें म्हटलें.

> कर्त्ता त्वमीश जगतां मम केशवस्य तेजो भुगंत समये लयकर्त्तृ
> कत्वात् ॥ तस्मात् कुविप्र बल कुत्सित दुर्मतानां नाशाय चिंतय स-
> मुध्दर वेद मार्गं ॥ १ ॥

अर्थ- तूं सकल जगताचा, माझा आणि विष्णूचा ईश (स्वामी) आहेस. तसाच तूं लय करणारा असल्यामुळें, अंतीं आमच्या तेजाचाही भोक्ता आहेस. यास्तव जे कुविप्र (बौध्दादिक) त्यांच्या बळानें वाढलेलीं स्फलक दुर्मतें त्यांचा स्वीकार ज्यांनीं ज्यांनीं केला त्यांच्या नाशा साठीं उपायांची योजना करून वेदमार्गाचा उध्दार कर. असें ब्रह्मदेवाचें वाक्य भगवान् शिवांनीं श्रवण करून त्यांनीं त्यास या प्रमाणें उत्तर दिलें.

> ब्रह्मन् यथा सुखं गच्छ संतुष्टोस्मितवोक्तितः ॥ शंकराचार्य
> नाम्नाहं संभवामि महीतले ॥ १ ॥ यध्दितं तवविष्णोश्च तदेव
> स्थापयाम्यहं ॥ मम भक्ता युवां यस्मा त्तस्त्वंनान्य द्विचिंतय ॥ २ ॥ इ०

अर्थ- ब्रह्मदेवा, तुझ्या स्तुतीनें मी संतोष पावलों आहें. तर आतां तूं स्वलोकीं सुखें करून जा. मी शंकराचार्य अशा नांवानें पृथिवीवर प्रगट होईन. आणि ज्यांत तुझें व विष्णूचें हित आहे तें स्थापन करीन. कारण तुह्मी दोघेही माझे भक्त आहां. या प्रमाणें बोलून त्यांनीं प्रथमतः वेदोक्त कर्ममार्गाचा उध्दार

होण्या सांठीं स्वामिकार्तिकास पृथिवीवर पाठविलें. तेव्हां तो कुमारिल भट्ट अशा नांवानें अवतरला. आणि बौद्धादिकांच्या मताचा उच्छेद करून अव्याहत कर्ममार्गाप्रत स्थापिता झाला. त्यांत त्यानें कर्ममार्ग हा साक्षात् मोक्ष पुरुषार्थास कारण नाहीं, ह्मणजे चित्तशुद्धिद्वारा परंपरेनें ज्ञान होऊन कारण आहे, असें वूर्त सांगितल्यास लोक कदाचित् कर्ममार्गास कंटाळतील. असें जाणून तसें न होण्या साठीं, व पाखंड मार्गानें चालून कर्मभ्रष्ट झालेल्यांची कर्मामध्यें गति होण्या साठीं, कर्मे करूनच मोक्षपुरुषार्थ सिद्धि होते असेंच सांगून कर्ममार्ग प्रवृत्त केला. (कुमारिलभट्ट श·प·).

या प्रमाणें कुमारिल भट्टानें कर्म मार्ग स्थापन केलेला पाहून, व तो ज्ञानांगत्वानें चालू न होतां सर्वत्र चालू झाला असें अवलोकन करून, शंकर भूमीवर आले. व त्यांनीं पुढें जें केलें तें असें:–

> तावताप्य परितुष्यन् विद्याधीशो महेशः स्वयमेव तन्मत निराचिकीर्षया श्रीमच्छंकराचार्यरूपेणाविर्भूयोपनिषदां ब्रम्हसूत्राणां च तात्पर्य सारं तत्तद्भाष्य। प्रणयनेनाविष्कुर्वन् कर्मणां चित्तशुद्धिद्वारा मोक्षसाधनी भूतात्म ज्ञानांगत्वं निर्णीयोपनिषदा मर्थवादत्वं च निरस्य निरर्गल ज्ञान मार्ग मभिषिपत् ॥

अर्थ:- तेवढ्यानें असंतुष्ट होत्साता विद्याधीश जो महेश, तो स्वतः त्या मताचें निराकरण करण्याच्या इच्छेनें श्रीमच्छंकराचार्य रूपानें प्रगट होऊन उपनिषदें आणि ब्रह्मसूत्रें यांतील तात्पर्याचें सार त्यांच्या त्यांच्या भाष्य प्रणयनानें (मार्गदर्शनानें) उघड करून कर्मास चित्तशुद्धिद्वारा मोक्षसाधनोपयोगित्वानें ज्ञानांगत्व आहे असा निर्णय करून, उपनिषदांचें अर्थवादत्व दूर करीत, अप्रतिबंध ज्ञानमार्ग जो त्याप्रत स्थापन करिते झाले. (आसपु॰ प्रस्तावना·)

> ततः सर्वात्मको देवश्चिदंबर पुराश्रितः ॥ आकाश लिंग नाम्नातु विख्यातो भून्महीतले ॥ १॥ तत्र विद्वन्महेंद्रस्य कुले द्विज गणाश्रिते ॥ जातः सर्वज्ञ नाम्नातु कश्चिद्द्विज कुलेश्वरः ॥२॥ कामाक्षीति सतीचाभूत्तस्यलक्षण लक्षिता ॥ चिदंबरेश्वरंध्यात्वा तावुभौ प्रापतुः सुतां ॥३॥ साकुमारी सदाध्यान सक्ताऽभूत् ज्ञान तत्परा ॥ विशिष्टेतिच नाम्नातु प्रसिद्धाभून्मही तले ॥ ४ ॥ तामष्टमे हें विप्राय शांतायाद्भुतकर्मणे ॥ प्रददौ विश्वजिन्नाम्ने सर्वज्ञोऽस्याः पि-

तास्वयं ॥५॥ सा सदा पतिमद्वैतं ध्यात्वा काशात्मकं शिवं ॥ तस्यारा-
धन मत्यग्र माचकार विवेकिनी ॥६॥ तादृशी मपि संत्यज्य ययौ
विश्वजिदद्भुतं ॥ अरण्ये तपसे कृत्वा मनो निश्चयतां गतं ॥७॥ त-
दा प्रभृतिसा नारी चिदंबर महेश्वरम् ॥ तोषयामास पूजाभिर्ध्यानै रा-
त्मगतैः सदा ॥ ८ ॥ सदेवः सर्वपूर्णोपि तस्यावदन पंकजम् ॥ प्रविश्य
विस्मितान्कुर्वन् जन्यानन्यान् समागतान् ॥९॥ महोग्र तेजसा कृष्टा वि-
शिष्टा ऽ भूद्यथांबिका ॥ सर्वैः संपूजितानित्यं पित्रादिभि रुपाश्रिता ॥
१०॥ अतीते मासिगर्भस्य वृद्धिरासीद्दिने दिने ॥ चिदंबरे श्वरं कृत्वा
यजमानं द्विजोत्तमाः ॥११॥ तृतीयादिषु मासेषु चक्रुः कर्माणि वेदतः
प्रासेतु दशमे मासि विशिष्टा गर्भगोलतः ॥ १२॥ प्रादुरासीन्महादेवःशं-
कराचार्य नामतः ॥ आसीत्तदा पुष्पवृष्टिर्देवसंघैः प्रचोदिता ॥ नेदुर्दुंदु-
भयो दिव्याः स्वर्गलोके चिरंसुखमिति ॥१३॥ ( आनं॰ गि॰ शं॰ प्र॰ २)

अर्थः- तदनंतर सर्वात्मा जो ईश्वर तो चिदंबर येथें आकाशलिंग अशा नांवानें वि-
ख्यात होता झाला. ( चिदंबरपुर ) श॰ प॰ ) त्या चिदंबरपुरांत सर्वज्ञ नांमें करून को-
णी कुलीन ब्राह्मण राहात होता व त्यास कामाक्षी नांवाची स्त्री होती. तीं उभयत-
तां स्त्री पुरुषें चिदंबरेश्वराचीं भक्त होतीं म्हणून, तीं त्याची ध्यानधारणा करीतअ-
सतां त्यांस विशिष्टा अशा नांवाची एक कन्या झाली. ती मोठी झाल्यावर तिच्या आ-
ठव्ये वर्षीं सर्वज्ञानें तिचा विवाह केला. व ती विश्वजित् नामक परमशांत अशा-
विख्यात ब्राह्मणास दिली. तेव्हां विशिष्टा आपला पति आकाशात्मकशिवच आ-
हे असें समजून तिनें त्याची मोठी कडकडीत सेवा केली. असें असतांही तो ति-
ला तिच्या आई बापां जवळ ठेऊन तप करण्या करितां अरण्यांत गेला. तेव्हां पासून
मग ती चिदंबरेश्वराची सेवा करूं लागली. असें होतां होतां परमेश्वर सर्वव्याप-
क जरी, तरी तिच्या मुखकमला वाटे तिच्या उदरांत प्रवेश करून तिला अवलोकन
करणाऱ्या सर्व जनांस त्यानें विस्मित केलें. तें असें कीं, गर्भाच्या परम तेजस्वीप-
णानें ती विशिष्टा साक्षात् अंबिकाच कींकाय ! अशी दिसूं लागल्यानें सर्व ग्रामस्थ
तिची प्रत्यहीं पूजा करूं लागले. व तिचा गर्भ दिवसें दिवस वाढत चालला असें पा-
हून, सर्व ब्राह्मणांनीं चिदंबरेश्वरास यजमान करून वेदोक्त विधीनें गर्भाचीं मा-
सामासा संबंधीं करावयाचीं जीं कर्में तींहीं सर्व केलीं. पुढें दहावा मास प्राप्तझा-
ला असतां, विशिष्टा प्रसूत होऊन श्रीशंकराचार्यांस प्रसवली. त्या काळीं आका-

शांतून देवांनीं पुष्पवृष्टि केली. व दिव्य दुंदुभी वाजूं लागून स्वर्गामध्यें आनंद झाला.

वरील सर्व वर्णन ठीक आहे. परंतु त्यांत आनंदगिरीनें आचार्यांच्या जन्मकालाचा शक, संवत्सर, मिति वगैरे कांहींच लिहिलें नसल्यामुळें जी उणीव केलेली आहे. ती आचार्यांच्या प्रतिपक्ष्यांनीं पूर्ण केली हें पाहून मोठें सानंदाश्चर्य होतें. यास्तव ती उणीव जैन लोकांनीं जीं वचनें लिहून पूर्ण केली ती वाचक वाचण्यास उत्सुक होतीलच. हें जाणून आह्मी महत्प्रयासानें साध्य केलेला जो जैन लोकांच्या ग्रंथांतील मुद्याचा उतारा, तो येथें वाचकां पुढें ठेवितों.

> ऋषिर्बाण स्तथा भूमि र्मर्त्याक्षौ वाममेलनात् ॥ एकत्वेन लभेदंकस्ताम्राक्षस्तत्र वत्सरः ॥ विश्वजिच्च पितायस्य विख्यातश्चचिदंबरे ॥ तस्य भार्यांबिका देवी शंकरं लोक शंकरं ॥ प्रसूता सर्व लोकस्य तारणाय जगद्गुरुं ॥ शंकरेण निशीथेहि स्वकीयेनच तेजसा ॥ बभ्र वत्काशितं सर्व सूत्यागारं स्वलीलया ॥ वामाशायन ब्रध्नस्यमाघेकृष्णे शुभे दिने ॥ चतुर्दश्यां निशीथेतु पुष्यवंतौ तदाघटे ॥ गेीर्वासरे प्रादुरासीद्वादकच्छंकरो महान् ॥ पश्चात्संचदशो वर्षे शंकरस्य गते सति ॥ भट्टाचार्य कुमारस्य दर्शनं कृतवान् शिवः ॥ द्वात्रिंशद्वर्षविज्ञेया स्थितिरासीद्धिमालये ॥ शंकरस्य शरीरस्या वसानमभवत्तदा नंदोवत्सभूमिनेंत्रे मेलने शक उत्तमः ॥ ज्ञातव्यः पंडुपुत्रस्य जातो वामेन वैतदा ॥ दुर्मुखे मार्गशीर्षेच शुक्लपक्षे त्रयोदशी ॥ सौम्यप्रदोषे सायान्हे कैलासे शंकरो गतः

अर्थ- ( अंकानां वामतो गतिः ) इकडे लक्ष देऊन सांगितलेले अंक एक झाल्यावर दहं स्थानींचा, त्या पुढें शतं स्थानींचा असा क्रम समजावा. ऋषि म्हणजे. बाण म्हू० पांच, भूमि म्हण० एक आणि मर्त्याक्षि म्ह० दोन असे डावे डावेकडे मांडल्यानें २१५७ होतात. यावरून असें समजावें कीं, युधिष्ठिर शकाचीं वर लिहिलेलीं वर्षें गत झाल्यावर, २१५८ व्या वर्षी रक्ताक्षी संवत्सरीं श्रीमच्छंकराचार्यांचें जन्म झालें. यांच्या वडिलांचें नांव विश्वजित् होतें. व तो चिदंबर येथील राहणारा होता. त्याची स्त्री अंबिकादेवी ( विशिष्टा ) ती सर्व लोकांचें कल्याण करणाऱ्या व त्यांस गुरुरूपें करून तारणाऱ्या अशा शंकरास ( शंकराचार्यास ) प्रसवली. शंकराचार्य जन्मले त्या वेळेस उत्तरायण होतें. व माघवद्य१४

असून सोमवार होता. सूर्य व चंद्र कुंभराशीत होते. आचार्यांचें जन्म मध्यरात्रीस झालें असतां, त्यांच्या तेजानें प्रसूतिगृह सूर्यप्रमाणें प्रकाशित झाहलें. या प्रमाणें हा पुरुष मोठा तेजस्वी व पाखंड्यांस वादांत जिंकणारा असा वादी उत्पन्न झाला. हा आपल्या वयाच्या पंधराव्या वर्षी कुमारिल भट्टास त्याच्या अंतकाळीं भेटला. हा ३२ वर्षांचें वय होई पर्यंत पृथिवीवर होता. व पुढें हिमालयावर याचें देहावसान झालें. त्या वेळेस युधिष्ठिर शक २७८९ जाऊन २७९० होता. व मार्गशीर्ष शुक्लपक्षींचा सोमप्रदोष असून संवत्सर दुर्मुख होता. (जिनविजय).

वर जो शक दाखविला त्यास प्रत्यंतर कुमारिल भट्ट शब्दावर पूर्वी लिहिलेंच आहे. तें असें कीं, "अष्टचत्वारि वर्षाणि जन्मकालाद्गतानिवै ॥ प्रादुर्भवः शंकरस्य ततो जातो ऽ विवादिनः" ह्मणजे कुमारिल भट्टाच्या वयास ४८ वर्षे झालीं असतां शंकराचार्यांचें जन्म झालें. तथापि हें वाक्य परस्परांचें परस्परांस सापेक्ष्य आहे, असें जर कोणास वाटेल तर आचार्यांच्या जन्मशका विषयीं जैन ग्रंथांत दुसरें एक प्रमाण आढळतें. तें या प्रमाणें आहे:—

ऋषिर्वसुर्वसुर्नेत्रो पांडवानां महात्मनाम्
गणना शेष कालस्य शकस्य शिवजन्मनि

अर्थ— आचार्यांचें जन्म झालें. त्या वेळेस युधिष्ठिर शक ३०४४ वर्षां पैकीं आठशीं सत्यायशीं वर्षे भोगून जाण्याचा शेष राहिला होता. अर्थात् वरील शकाशीं येणें करूनही मेळ बसतो. या प्रमाणें आनंदगिरि इत्यादिक वैदिक पंडितांनीं, आचार्यांचा काळ दर्शविण्यांत केलेली जी उपेक्षा व तिच्या योगानें ते कधीं झाले त्या विषयीं आजपर्यंत सर्वत्र झालेली अनिश्चय बुद्धि तिची जैन पंडितांनीं तोंच काळ दोन तीन प्रकारांनीं दाखवून निश्चयात्मकता केली. हें काम त्यांनीं खचितच अतिशय मोठें केलें यांत संशय नाहीं. म्हणून हा एक त्यांचा अमूल्य उपकार व गुणच समजणें अवश्य असून, आह्मी वाचकांस कळवितों कीं, भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्यांस होऊन गेल्यास आज ४९९१ याच्या वर्षी २८२४ वर्षे झालीं आहेत.

आनंदगिरीनें तिसऱ्या प्रकरणांत आचार्यांची आकृति, त्यांची बुद्धि व पुढील वर्तणूक या प्रमाणें लिहिली आहे. मुखपूर्णचंद्राप्रमाणें, वक्षस्थळ विशाळ, आजानुबाहु, पावलें लहान, नखें आरक्त, हाता पायांच्या मध्यस्थळीं शंखचक्रादि-

चिन्हें, मस्तकाच्या वामभागीं त्रिशूल चिन्ह, दक्षिणभागीं अर्धचंद्राकार चिन्ह, समप्रमाण शरीर, या प्रमाणें उत्कृष्ट व तेजस्वी असें त्यांचें रूप असून, बाळपणींच संस्कृत प्राकृत व मागधी इत्यादि भाषांत ते प्रवीण होते. त्यांचें चौलकर्म तिसऱ्या वर्षी व मौंजीबंधन आणि गुरूजवळ अध्ययन पांचव्या वर्षी झालें. त्या अध्ययनाचा प्रकार असा कीं, एकवार श्रवण मात्रें करूनच त्यांस सर्व विद्या पारंगतत्व प्राप्त झालें. नंतर लोकानुग्रहार्थ मौंजी दंडाजिन व तिलक धारण, एतत् पूर्वक भिक्षान्नानें निर्वाह करीत, जे जे मुमुक्षु शिष्य शरण येत गेले. त्यांस त्यांस त्यांनीं प्रत्येकास उद्देशून, "तूंच ब्रह्म होस" असा उपदेश केला. या उपदेशास जे अनधिकारी. त्यांस ज्ञानाधिकार प्राप्त होण्या साठीं, ब्रह्मार्पण बुद्धीनें कर्म करण्यास सांगून पंचायतन पूजेचा मार्ग लाऊन दिला. कारण पंचमहायज्ञ करणारांस पंचायतन पूजा अवश्य आहे. या प्रमाणें सहस्रावधि शिष्यांस शुद्धाद्वैत परायण करीत आपल्या वयाच्या आठव्या वर्षी श्रीमद्योगींद्र गोविंद यति, त्यांपासून त्यांनीं परम-हंसाश्रमाचा स्वीकार केला.

"पुढें चौथ्या प्रकरणांत आनंदगिरीनें असें लिहिलें आहे कीं, वासुदेवाचीं चर आणि अचर अशीं दोन रूपें, त्यांत अचर त्या प्रतिमा आणि चररूप तो सन्यासी. म्हणून आचार्य वासुदेवच साक्षात् होत्सातें, त्यांनीं– 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' इत्यादि व्यास सूत्रांवर व्यासमनोभिप्रायानुकूल अद्वैत भाष्य लिहिलें. व नंतर सकल शिष्यगणांसहित दिग्विजय करण्यास चिदंबराहून निघाले, ते प्रदक्षिण मार्गानें प्रथम मध्यार्जुनास आले. तेथें काय केलें त्या विषयीं (मध्यार्जुनः) शब्द प०). तेथून सेतुबंधास येऊन आचार्य रामेश्वराची पूजा करीत तेथें दोन महिने राहिले. त्या वेळेस अद्वैत विद्येचे परम द्वेषी व शूलादिकांच्या तप्त मुद्रा धारण करणारे असे षड्विध शैवां पैकीं कित्येक आचार्यां समीप येऊन जें कांहीं म्हणाले व त्यावर आचार्यांनीं जें उत्तर दिलें तें येणें प्रमाणें आहे:—

"किं भोः सन्यासिन्। तव शिवतत्व मशेष दोष निराकरण हेतुभूत मरुच्य
"मासीत्तद योग्यं। बहुश्रुति प्रमाणत्वात्। आचार्याह। यावतीर्वै देवतास्ताः
"सर्वा वेदविदि ब्राम्हणे वसंति। तस्मात्तथा विधतनी र्जीवन दशायां कृततापे
"पे देवाः पलायंते तप्तायः सानिध्यान्मनुष्य इव।

तथा विधतनोरस्य तापनांकं करोतियः॥ एनं शास्त्या पलायंते देवाः
शीर्षादि वासिनः॥ पतितोयं भवत्येव शूद्रवच्चितिकाम्बवत्॥ त्या-

धिंविना कर्म योग्ये विप्रांगे चिन्ह मीक्ष्यच॥ लोकेश्वरं भानुमीक्षे द-
थवा न्हदमाविशेत्॥

" इत्यादि बहूनि वचनानि प्रमाणानि संति।श्रुतावपि "योऽन्यां देवता मुपास्ते
" अन्योऽहस्मीति नसंवेद यथा पशुरिति "श्रीमद्गिराचार्यै रेव मुक्तः विद्वेष-
"वीरनामको लिंग भृदग्रणीरिदमाह॥

अर्थ- थोडक्यांत इत काच कीं, अशेष दोषांस नाहींसें करणारें शिवतत्व तुला रु-
चत नाहीं हें अयोग्य होय. असें ऐकून आचार्य ह्मणाले. वेदवेत्त्या ब्राह्मणाच्या ठा-
यीं सर्व देव वास्तव्य करितात. तस्मात् तशा शरीरास जीवंतपणीं तप्त केलें अस-
तां, तप्तलोह गोला पासून जशीं मनुष्यें दूर पळतात त्या प्रमाणें त्या पासून देव पळ-
तात. केवळ त्याला सोडून जातात इतकेंच नव्हे. तर त्याला शाप देतात. तेणें करून
तो पतित होतो. म्हणजे शूद्र किंवा चिताकाष्ठ यांच्या प्रमाणें अपवित्र होतो. म्ह-
णून कांहीं एक व्यापीवांचून कर्मयोग्य शरीरावर जो डाग घेतलेल्यास पाहतो त्या-
नें तत्काळ सूर्यास अवलोकन करावें. अथवा सचैल स्नानार्थ एकाद्या मोठ्या डोहां-
त शिरावें. सारांश, सकल जगद्व्यापी सत्यज्ञानानंत देवास सोडून इतर देवांची-
उपासना करितो. तसाच उपास्याहून आपण भिन्न आहों असें मानितो. तो केव-
ळ अज्ञान पशूच होय. या प्रमाणें आचार्यांनीं ह्मटलें असतां लिंगांकन करणाऱ्यां-
चा अग्रमणि जो विद्वेषवीर, तो आचार्यांस शरण आला. व त्यास आचार्यांनीं पा-
वन केलें. ( विद्वेषवीर ) शा०प०.

यानंतर पांचव्या प्रकरणांत परमतकालानल नामक आराध्य जातीय शै-
वास आचार्यांनीं जिंकून आपला शिष्य केलें. (परमतकालानल शब्द पहा). नंतर
आचार्य अनंत शयनास गेले. व तेथें देवाचें दर्शन करून एक मास पर्यंत राहि-
ले. त्यांत विष्णुशर्मादिक व माधवादिक तप्तमुद्राधारकांस त्यांनीं स्वमतांत आणिलें.
हा कथाभाग सहा, सात व आठ या तीन प्रकरणांत क्रमानेंच आहे. त्या विषयीं
(विष्णुशर्मा व माधव शा०प०)

पुढें नवव्या प्रकरणांत व्यासदासाचे खंडन. तसेंच क्रमें करून पुढील प्र-
करणांतून सहा प्रकारचे सौर, सहा प्रकारचे गाणपत्य, महालक्ष्मीचे उपासक,
महा कालीचे उपासक. इत्यादि मतवाद्यांचे धुडके उडवून, मद्यपि जे कापालिक
(भैरवोपासक) त्यांस उज्जनी येथें जिंकले. चार्वाक, क्षपणिक, जैन त्यांस ही
जिंकून भगवान् शंकराचार्य काशीस गेले. तेथें त्यांस व्यासांची भेट झाली.

त्यांत जो प्रकार घडला त्या विषयीं (पद्मपादाचार्य) शा०प० पुढें पद्मपादाचार्या-नें आचार्यांसि हे आपणाशीं बोलणारे व्यास आहेत, असें सूचविलें असतां ते या प्रमाणें बोलले. "स एव व्यासश्चे दनुपममतिः सो ऽयमपि मा भवतु" म्हणजे हे व्यासच असल्यास ते मजप्रत संरक्षोत.

आयातु स्वयमेवात्र व्यासः शिष्यजन प्रियः॥ अद्वैत भाष्यकर्ता-रं पातुनो बादरायणः॥ सएव परमार्थश्चे द्विदाभिथ्या भवेद्यदि व्यासं संयमिनां श्रेष्टं शरणं चाभि सर्वदा॥ सएवाद्य प्रसन्नात्मा हरत्वखिल तामसं॥

"शंकराचार्येणा एवं स्तुतो व्यासः सर्व सम इव समक्ष माविरासीत्। तं नत्वा "तस्य द्वादशा प्रदक्षिणाभि र्वंदनानि कृत्वा। त्वदंश स्त्वच्छिष्यो ऽहमिति वि-"ज्ञाप्य निजकृत ब्रह्मसूत्र भाष्य मवदत्। सतुभाष्यं सम्यगवलोक्य परम "गुरुमालिंग्य इदमुवाच

सूत्राणांतु पदार्थैक तात्पर्यं विदितं त्वया॥
महाशयस्तु दुर्ज्ञेय आचार्यस्त्वं जगत्पतिः॥१॥

अर्थ— व्यास शिष्यजन प्रिय आहेत तो व्यास येथें येवो. व अद्वैत भाष्य करणा-ऱ्या मला तो बादरायण संरक्षो. भाष्यामध्यें जें मी लिहिलें तेंच परमार्थ (श्रेष्ठ अर्थ) असेल व जीवेश्वर भेद मिथ्या असेल. तर त्या संयमशील श्रेष्ठ व्यासांस आह्मी शरणागत आहों आणि तोही प्रसन्नांतःकरणानें आमचें अखिल ताम-स हरण करो.

या प्रमाणें शंकराचार्यांनीं व्यासांची स्तुति केली असतां साक्षात् व्यास प्रगट झाले. त्यांस आचार्यांनीं नमस्कार करून व द्वादश प्रदक्षिणांनीं वंदन करून आपल्या अंशानें मी आपला शिष्य आहें. अशीही विज्ञापना करीत त्यां-पुढें भाष्य ठेविलें. तें व्यासानीं उत्तम प्रकारें अवलोकन करून, शंकराचार्यांसआ-लिंगून या प्रमाणें ह्मटलें:— सूत्रांतील पदार्थ तात्पर्य तसाच दुर्ज्ञेय (जाणा-यास कठीण) असा जो सखोल अभिप्राय तो त्वां उत्तम जाणिला. म्हणून तूं आचार्य जगत्पति (जगद्गुरु) होस. या प्रमाणें ही गोष्ट आचार्यांच्या पूर्ण सोळाव्या वर्षीं घडली. (आनंदगि० शं० प्र०९२).

यानंतर त्रेपन्न आणि चौपन्न या दोन प्रकरणांत आनंदगिरीनें असें लिहिलें आहे कीं, शंकराचार्यांनीं व्यासांस विनंति करून म्हटलें. मी सोळा वर्षे

पृथिवीवर राहावें. व सद्धर्म स्थापून परत कैलासास जावें असा संकल्प केला होता. त्या प्रमाणें मी माझें कर्त्तव्य होतें तें केलें. आतां हें भाष्य आपण संभाळावें. मी जातों. तें ऐकून व्यासांनीं तत्काळ ब्रह्मदेवाचें स्मरण करून त्यांस बोलाविलें. व ते येतांच त्यांजवळ सदरील गोष्ट सांगितली. तीवरून ब्रह्मदेवांनीं व व्यासांनीं आणखी इच्छेस येईल तितकीं वर्षें तुह्मी पृथिवीवर रहावें. असें ह्मणून उभयतांनीं आचार्यांस गंगाजलें करून अभिषेक केला. आणि म्हणाले,–' शृणवाचार्यभिदमिथ्या अद्वैतं पारमार्थिकं॥ उपदेशं नृणामेव कुरुयत्नेन सर्वतः॥ इत्युक्त्वांतर्दधे ब्रह्मा व्यासश्च भगवान् ऋषिः॥'– हे आचार्य, भेद हा मिथ्या आहे. आणि अद्वैत मात्र पारमार्थिक (सत्य) आहे. तर हाच उपदेश यत्नें करून तूं सर्वत्र कर. इतकें बोलून उभयतां अंतर्धान पावले. पुढें आचार्य काशींतून निघून कुमारिल भट्टास भेटले. (आनं० शंक० प्र० ५)

वरील लेखावरून आनंदगिरीचें म्हणणें, आचार्यांची कुमारिल भट्टाशीं भेट सोळाव्या वर्षीं झाली. व जैन म्हणतात पंधराव्या वर्षीं झाली. इतकेंच. पण हें उभयतांचें म्हणणें मोठ्या फरकाचें नाहीं. नंतर कुमारिल भट्टास आचार्य भेटून तेथून ते मंडनमिश्राकडे गेले. (मंडनमिश्र प्र० ५) मंडनमिश्रास जिंकल्यावर त्याची स्त्री सरसवाणी (सरस्वती) हिशीं आचार्यांचा झालेला वाद त्याच संबंधानें आचार्यांस देहांतर संचार (परकायाप्रवेश) करणें प्राप्त पडलें तें प्रकरण, नृसिंह साक्षात्कार, सरस्वती जय, शृंगगिरि येथें सरस्वतीची स्थापना, इत्यादिक वर्णन क्रमें करून सत्तावनाव्या प्रकरणापासून त्र्याहात्तराव्या प्रकरणापर्यंत असून, चौऱ्याहात्तराव्या प्रकरणांत आचार्य समाधिस्थ झाल्याचें वर्णन आहे. या वर्णनांत मात्र वैदिक व जैन पंडितांचा मतभेद असा पडला आहे कीं, आनंदगिरि म्हणतो त्यांची समाधि कांचीस झाली. आणि जैन म्हणतात हिमालयावर झाली. यांत हिमालयावरच खरोखर समाधि असल्यास आनंदगिरीच्या हातून कांची नगर लिहिलें जाईल असें कधींच होणार नाहीं. कारण तो नेहेमीं आचार्यांच्या समागमेंच असे. ह्मणून आम्हांस असें दिसतें कीं, आनंदगिरीचा मूळचा लेख कोणीतरी बदलला असावा. त्या शिवाय जैन ग्रंथांशीं व शंकरविजयाशीं इतका फेर पडणार नाहीं.

नारायणं पद्मभवं वसिष्ठं शक्तिंच तत्पुत्र पराशरंच॥ व्यासं शुकं गौडपादं महांतं गोविंद योगींद्र मथास्य शिष्यं॥ श्री शंकराचा.

र्व मथास्य शिष्यं पद्मंच हस्तामलकंच शिष्यम् इत्यादि ॥७॥
अर्थ- आचार्यांची गुरुपरंपरा आनंदगिरीनें या प्रमाणें लिहिली आहे. नारायणाचा शिष्य ब्रह्मदेव, त्याचा वसिष्ठ मुनि, त्याचा शक्ति, त्याचा पराशर त्याचा बादरायणव्यास, त्याचा शुकाचार्य, शुकाचार्यांचे शिष्य गौडपादाचार्य त्यांचे गोविंदपादाचार्य व त्यांचे शंकराचार्य, शंकराचार्यांचे पद्मपादाचार्य, हस्तामलकाचार्य, तोटकाचार्य इत्यादिक मूळचे अनेक शिष्य असून, सुरेश्वराचार्य म्हणजे मंडनमिश्र (वार्तिककार) परमतकालानल, विष्णुशर्मा, माधव आदिकरून वादांत पराजित केलेले, व नंतर ते आचार्यांस शरण येऊन कृतार्थ झालेले, असे शेंकडोंवधीच केवळ नव्हत तर सहस्त्रावधि शिष्य होते.

वर लिहिलेल्या आचार्यांच्या सकलमान्य गुरुपरंपरे वरून व त्यांच्या अल्प वयांत त्यांनीं जी जी वेदवचनास अनुसरून केलेली यथायुक्त वर्तणूक, तशीच मोठमोठीं कार्ये त्यांवरून, आचार्यांच्या तोडीचा पुरुष आजपर्यंत झालाच नाहीं, असें म्हणावें लागतें. त्यांचे हरएक गोष्टींतील विचार इतके प्रौढ व समाधानकारक आहेत कीं, ते सर्वदां निर्बाधच राहावेत. अलीकडे जरी कित्येक होऊन गेलेल्या इतर आचार्यांनीं मुख्यत्वें द्रव्य आणि प्रतिष्ठा यांच्या लोभानें कांहीं धर्मविषयक नवीन संप्रदाय प्रवृत्त केले आहेत, तरी ते यांच्या संप्रदायाच्या इतके मागें आहेत कीं, त्यांच्या प्रवर्तकांस आचार्यांस गांठण्यास कोट्यावधि जन्मच घ्यावे लागतील. सारांश कलियुगामध्यें असा पुरुष पाहतां एक शंकराचार्यच होऊन गेला. जैमिनि ऋषीनेंही मंडनमिश्रास तो वादांत पराजित झाल्यावर त्यास असें ह्मटलें आहे.

> आद्ये सत्यमुनिः सतां वितरति ज्ञानं द्वितीये युगे दत्तो द्वापर
> नामकेतु रमति व्यासः कलौशंकरः॥ इत्येवं स्फुर मीरितो१
> स्य महिमा शैवे पुराणे यत स्तस्यत्वं रमते मते त्ववतरः सं-
> सार वार्धि तरेः ॥११॥ (माध० शंक० वि० सर्ग९).

आतां व्यासांची, जैमिनीची, व गोविंदपादाचार्यांची वगैरे आचार्यांस भेट झाल्याचा असंभव वाटण्या सारखा जरी आहे, तरी व्यास चिरंजीव असून गोविंदपादाचार्यादिक औषधि कल्पानें पुष्कळ काळ वांचलेले असल्यामुळें त्यांचा संशय कोणी करूं नये. (रसेश्वर दर्शन) पहा.

आचार्यांचा सिद्धांत काय तो सांगणें ह्मटलें ह्मणजे त्यास कशींतरी पांच

पन्नास कागदाचीं पानें पाहिजेत, ह्मणून त्यांतील सारांश मात्र सांगतों. "सत्यंज्ञान मनंतं ब्रह्म-" सदेव सोम्येदमग्र आसीत्- आत्मावा इदमेक एवाग्र आसीत्- एकमेवाद्वितीयं ब्रह्म-" "नेहनानास्तिकिंचन" "ज्ञानादेवतु कैवल्यं-" "ब्रह्मविदाप्नोतिपरं-" यदाह्येवैष एतस्मिनुदर मंतरं कुरुते अथ तस्य भयं भवति-" "असन्नेव स भवति। असद्ब्रह्मेति वेदचेत्-" "अस्तिब्रह्मेतिचेद्वेद संतमेनं ततोविदुरिति-" "योवेदनिहितं गुहायां परमेव्योमन् सोश्नुते सर्वान् कामान् सः-" "तत्त्वमसि-" "अहंब्रह्मास्मि-" "प्रज्ञानं ब्रह्म-" "अयमात्मा ब्रह्म-" "अथ योऽन्यां देवतामुपास्ते सपशुः" इत्यादिश्रुतयः

अर्थ:- तिन्हीं कालीं अबाधित, त्यास सत्य असें म्हणावें. तेंच ज्ञानघन, आणि अनंत शब्दें करून देश, काल, वस्तु परिच्छेद रहित ब्रह्म होय. तेंच सत् अशा उपलक्षणानें सृष्टीच्या पूर्वीं असतें झालें. अथवा आत्मा सृष्टिपूर्वीं असता झाला. सदादि लक्षणांनीं युक्त ब्रह्म आणि आत्मा हे दोन निरनिराळे नाहींत. कारण ब्रह्म सजातीय, विजातीय आणि स्वगत भेदरहित असें एकच अद्वितीय आहे. तेथें नाना ह्मणजे अनेक कांहींच नाहीं असें असतां, नसून जें जें दिसतें तें तें भ्रम ह्मणजे अज्ञानास्तव दिसतें. वास्तव ज्ञानें करूनच मोक्ष होतो. ब्रह्मवेत्ताच परब्रह्मास पावतो. म्हणजे ब्रह्मच होतो. जो कोणी ब्रह्म आणि आत्मा यांच्या मध्यें अंतर करितो म्हणजे भिन्न म्हणतो तो भय पावतो. जो ब्रह्मास असत् म्हणतो तो स्वतःच असत् होतो. ब्रह्म आहे तसेंच राहतें. म्हणून आहे म्हणतो तोच सद्रूप जाणावा. गुहेंत (पंचकोशामध्यें) निहित जें ब्रह्म तें जो जाणतो तोच सर्व कामावासीस पावतो. म्हणूनच तें तूं आहेस असें गुरूनें, शरण येऊन पुसणाऱ्या शिष्यास सांगावें. त्यानेंही मी ब्रह्म आहें असें त्रिपुटी वांचून अनुभवावें. इत्यादि. हा आचार्यांचा सिद्धांत, वसिष्ठादिक ऋषि, रामकृष्णादिक अवतार व व्यासादिक आचार्य यांच्या मनोभिप्रायास संमत आहे. ये विषयीं वासिष्ठ, रामगीता, व भगवद्गीता इत्यादि ग्रंथ पहावे. अशा प्रकारें आचार्यांचें मत थोडक्यांत समजावें.

आचार्यांनीं प्रथम प्रस्थान त्रय म्हणजे ब्रह्मसूत्र भाष्य (शारीरकभाष्य) उपनिषद्भाष्य, आणि गीताभाष्य असें लिहून. नंतर सुलभ सुलभ असे लहान लहान आत्मबोधोपयोगी सहस्रावधि ग्रंथ लिहिले. कारण प्रस्थानत्रय वादीलोकांस जिंकण्या साठीं झाल्यामुळें, तें न्याय, मीमांसादि दुर्बोध शास्त्रीय विषय

प्रचुर असल्यानें मंदबुद्धि जनांस कळणें कठिण आहे. या प्रमाणें हें श्रीमच्छं-कराचार्यांचें वर्णन, वाचकांस आह्मी आमच्या शक्त्यनुसार सादर केलें आ-हे, तें त्यांस कल्याणकारक होवो.

२ — श्रीमच्छंकराचार्यांनीं स्थापिलेला जो रामेश्वराकडील शृंगेरी मठ तेथील गादीवर त्यांच्या मागून १४४३ वर्षांनीं झालेला नामांकित पुरुष तो. याच्या विषयीं माधवाचार्यानें आपल्या शंकरविजयांत येणें प्रमाणें लिहिलें आहे.

तसो महेशः किलकेरलेषु श्रीमद्वृषाद्रौ करुणासमुद्रः ॥ पूर्णानदीपुण्य तटे स्वयंभू लिंगात्मना नंगधगाविरासीत् ॥ तन्नोदितः कश्चन राजशेखरः स्वप्ने मुहुर्दृष्ट तदीय वैभवः ॥ प्रासादमेकं परिकल्प्यसुप्रभं प्रावर्त्तयत्तस्य समर्हणं विभोः ॥ कश्चिद्विपश्चिदिह निश्चल धीर्विरेजे विद्याधिराज इतिविश्रुत नामधेयः ॥ रुद्रोवृषाद्रि निलयोः वतरीतु कामो यत्पुत्र मात्मपितरं समरोचयत्तः ॥ पुत्रो भवत्तस्य पुरा-त पुण्यैः स्फुब्रह्मतेजाः शिवगुर्वभिख्यः ॥ ॥ लग्ने शुभे शुभयुते सुषुत्वे कुमारं श्रीपार्वतीव सुखिनी शुभवीक्षितेच ॥ जाया सती शिवगुरो-र्निजतुंग संस्थे सूर्ये कुजे रविसुतेच गुरौच केंद्रे ॥ (माध. शं. वि. स. २)

अर्थ — वृषाद्रि पर्वतावर, पूर्णानदीच्या तीरीं केरळ देशांत, स्वयंभू लिंगामध्यें प्रथमतः कामशत्रु असा जो शिव तो प्रकट झाला. त्यांच्या दृष्टांता वरून राजशेखर राजानें तेथें देवालय बांधिलें. तेथें कालटीनामक अग्रहारचा राहणारा विद्याधिराज नांवाचा कोणी विद्वान् ब्राह्मण होता. त्यास त्याच्या पुण्याईनें शिवगुरुनांवाचा पुत्र झाला. त्याला मघ नांवाच्या पंडितानें आपली कन्या सती विवाहविधीनें दिली. त्यांस जो पुत्र झाला तोच पुढें शंकराचार्य ही पदवि पावला. त्याच्याजन्म कालीं केंद्रस्थानीं रवि मंगळ शनि आणि गुरु हे चार ग्रह होते. इतकाच कायतो यांतील सारांश आहे. पण याचा काळ स्पष्ट असावा तसा यांत नाहीं. तोच जैन लोकांनीं आपल्या ग्रंथांत कसा दाखविलेला आहे पहाः—

भूमिर्नेत्रे मानवस्य कस्यास्यानांच मेलनात् ॥ वामगत्या शकेकाले प्रमाथी वत्सरे महान् ॥ शालिवाहन राज्ञश्च वर्तते उत्तमः शकः ॥ मल्लुयाले माघकृष्णेच चतुर्दश्यां शुभे दिने ॥ पिता शिवगुरुर्यस्य माताच गिरिजासती ॥ द्वितीयः शंकरः साक्षात् इदंति मुनयः सदा ॥ जाले पंचदशे वर्षे शृंगिरौ गमनं कृतं ॥ विद्याभ्यासं नंदवर्षे कृत्वाथाश्रम प्राप्तवान् ॥

विद्यानृसिंह यतिना भारतीनां मठे शुभे॥ स्वकीये स्थापयामास विद्या शांकर भारतीम्॥ ततः पंचदशे वर्षे जयार्थं भटनं कृतं॥ निर्जिता शेष पृथिवी वादेन स्वीयविद्यया॥ पश्चात्कृत्वा अकूपारे स्नानार्थं सूर्यपर्वणि॥ तस्मिन्देशो निर्मलेच समाप्तिमगमद्गुरुः॥ भूमिर्नंदो मुहीणस्य वदनानिच मेलनात्॥ कार्तिक्यां शुक्लपक्षेथ त्रयोदश्यां शुभे दिने॥ विरोधी काव्यवारेच सायान्हे कीकटे महान्॥ समाप्ति मगमत्साक्षाद्विद्या शांकर भारती.

अर्थ- भूमि म्हणजे एक, मानवनेत्र म्हणजे दोन, आणि कस्यास्यें म्हणजे ब्रह्मदेवाचीं मुखें हे अंक वामगतीनें मांडिले असतां ४२१ होतात. या शालिवाहन शकांत प्रमाथी संवत्सरीं मल्झाळ येथें माघवद्य १४ स शिवगुरु नामक ब्राम्हणापासून, सतीभार्येच्या ठायीं हा साक्षात् दुसरा शंकरच असा जन्मला. हा पंधरा वर्षांच्या वयाचा झाल्यावर शृंगिरीस गेला. व तेथें यानें नऊ वर्षें पर्यंत गादीवरील स्वामीं जवळ अध्ययन केलें. पुढें यास त्याच स्वामीनीं ( विद्यानृसिंह भारती )नीं संन्यास देऊन व विद्याशंकर भारती असें याचें नांव ठेऊन आपल्या गादीवर बसविलें. गादीवर बसल्या नंतर हा पंधरा वर्षांनीं म्हणजे शके ४६० मध्यें आपल्या वयाच्या ३९व्या वर्षीं दिग्विजयास निघाला. व यानें पृथिवीचा जय केला. पुढें शके ४९१ मध्यें विरोधी संवत्सरीं सूर्यग्रहण होतें म्हणून समुद्रस्नानास हा गेला असतां, कार्तिक शुद्ध त्रयोदशीस शुक्रवारीं निर्मळ येथें आपल्या वयाच्या ७० व्या वर्षीं समाधिस्थ झाला. यावरून हा मुख्यआचार्यांच्या मागून १४४३ वर्षांनीं झाला. व यास आज होऊन गेल्यास १३८० वर्षें झालीं आहेत, असें स्पष्ट होतें. शिवाय यानें ज्या शंकराचार्यांच्या गादीवरील विद्यानृसिंह भारतींजवळ अध्ययन केलें. ते उत्तम विद्वान् होते असें कळून येत असून, शंकराचार्य नांवाची जी गादी व तिचे स्थापक जे मूळचे शंकराचार्य ते, याच्या पूर्वींचेंच खरें हें ही सिद्ध होतें. यास प्रमाण जैन ग्रंथांत आणखी एक गोष्ट अशी आढळते कीं, यानें संक्षेपशारीरक, प्रबोध सुधाकर, इत्यादि ग्रंथ लिहिले. अर्थात् शारीरक भाष्य लिहिणारे शंकराचार्य ते याच्याआधींचे असून, मागून हा झाला. व यानें संक्षेप शारीरक नंतर लिहिलें. याशिवाय मूळच्या शंकराचार्यांची समाधि ३२ व्या वर्षीं व याची सत्तराव्या वर्षीं हा फेर असून पहिले हिमालयावर समाधिस्थ झाले व हा वसई जवळच्या निर्मळ

गांवीं समाधिस्थ झाला.

या पुढें माधवाचार्यानें कित्येक गोष्टी मूळच्या शंकराचार्यांस अनुलक्षून लिहिलेल्या त्या त्यांच्या विषयीं मात्र खऱ्या आहेत. याच्या विषयीं नाहींत. याचें सन्यास प्रकरण तर त्यानें असें लिहिलें आहे कीं, हा आपल्या मातुश्रीस समागमें घेऊन नदीतीरीं स्नानास गेला असतां याचा पाय पाण्यामध्यें मगरानें धरिला. तेव्हां यानें मातुश्रीस मोठ्यानें हाक मारून वर घडलेली गोष्ट सांगितली. व स्वतःच प्रैष मंत्र उच्चारून सन्यास घेतला. ही गोष्ट जैन ग्रंथाशीं जमत नाहीं. यानें आपल्या आईच्या प्रेतास परसांत दहन केलें. ही गोष्ट खरी असली पाहिजे. कारण केरळी जातीच्या ब्राह्मणांत ती चाल अजून दृष्टीस पडते. यानें मंडनमिश्रास जिंकलें. व हस्तामलकाचार्य याचा शिष्य झाला. इत्यादि ज्या लिहिलेल्या गोष्टी त्या ते याच्या वेळेस मुळींच नसल्यामुळें असंभाव्य आहेत. यानें उज्जनी येथें भास्कर व दंडि पंडितांस जिंकलें असेल तर असेल. ही गोष्ट नाहीं म्हणवत नाहीं. कामरूप देशीं यानें अभिनवगुप्तास जिंकलें. त्या विषयीं (अभिनवगुप्ताचार्य) श० प०.

३— हा एक तिसरा कोणी तरी शंकराचार्यांच्या गादीवर झालेला नामांकित पुरुष असावा. परंतु वरील दोघां प्रमाणें जैनांनीं याचें वर्णन केलेलें नाहीं. असो. याचा काळ या प्रमाणें आढळतो:—"प्रासूत तिष्य शरदा मतियावतस्यां एकादशाधिक शतोन चतुःसहस्र्याम्—" या श्लोकांत लिहिले प्रमाणें च्यार हजार संख्येंत एकशें अक्रा वजा केले असतां बाकी ३८८९ राहतात. हीच संख्या आज गतकलि ४९८१ वजा दिल्यास १०९२ बाकी राहते. ह्मणून शालिवाहन शके ७१० मध्यें याचें जन्म विभव संवत्सरीं झालें. असें स्पष्ट होतें. अर्थात् हा दुसऱ्या शंकराचार्यांच्या मागून २८९ वर्षांनीं झाला होता. म्हणून याचा बाप शिवगुरु नव्हे व आईही सती नव्हे. कविचरित्रांत एक समाधि काल असा लिहिला आहे तो, याचाच असावा असें दिसतें. त्या विषयींचा श्लोक येणें प्रमाणें आहे:— शि॒व॒धी॒ल॒ः कलिमलान् दलयंश्चरिता मृतैः॥ जगाम शंकराचार्यश्चंद्रचूड परंशिवं॥ या श्लोकांत लिहिलेले अंक वामगतीनें मांडले असतां ३९४५ असे होतात. म्हणजे कलियुगाचीं इतकीं वर्षें गेल्यावर जो कैलासास गेला तो हाच होय. अर्थात् शके ७६६ मध्यें हा आपल्या वयाच्या ५६ व्या वर्षीं समाधिस्थ झाला. कारण याचें जन्म शके ७१० मध्यें झाल्याचें

वर सांगितलेंच आहे. असो. याच्या नांवावर सदानंद स्वामींनीं ज्या गोष्टी मूळ शंकराचार्यांस अनुलक्षून लिहिल्या आहेत त्या त्यांच्या विषयीं मात्र संभाव्य आहेत. याच्या विषयीं नाहींत. सारांश या तिन्ही शंकराचार्यांच्या वर्णना वरून शांकरदिग्विजय नाटकाची रचना कशी असली पाहिजे तें ध्यानांत येईलच.

**शंकराजीबावा**– भक्तविजयांत लिहिलेला हा एक साधु आहे. परंतु याचें कांहींच चरित्र महिपति बावांनीं लिहिलें नाहीं.

**शंकरानंद**– हा पुरुष विद्यारण्यांचा गुरु होय. त्या विषयीं विद्यारण्यांनीं पंचदशीच्या आरंभीं मंगल केलें आहे तें येणें प्रमाणें:– नमः श्रीशंकरानंद गुरुपादांबुजन्मने॥ सविलास महामोह ग्राह ग्रासैक कर्मणे॥ या मंगला वरून हा विद्यारण्यांचा गुरु असून त्याच्या वेळेस पुष्कळ वृद्ध होता, असें उघड होतें. कित्येकांनीं शंकराचार्यच हा अशी वर्णनें केलेलीं आहेत. परंतु तीं नजरचुकीचीं समजावीं. त. आत्मपुराण म्हणून जो ग्रंथ कित्येक उपनिषदांतील अर्थाच्या वर्णनावर आहे, तो याचाच आहे. त्यांत जो एक श्लोक टीकाकारानें लिहिला आहे. त्यावरून हा शांकर संप्रदायाचा होता. शंकराचार्य नव्हे. असेंच स्पष्ट दिसून येतें. तो श्लोक येणें प्रमाणें आहे:– श्रीशंकरानंदमुनेः प्रबंधः श्रीशंकराचार्य मतानुगामी श्रीशंकरेऽपि विश्वलिंगतः पुरेश्रीशंकरोऽनुग्रहमातनोतु॥ १॥

**शंकु**– विक्रम सभेंतील नऊ पंडित रत्नांतील चौथें पंडितरत्न.

**शकुंतलानाटक**– कालिदास कृत. याचे सात अंक आहेत. सर. विल्यमजोन्स त्यानें याचें भाषांतर इंग्रजींत केलें आहे.

**शक्तिविलास**– राजश्यामळोपासक वाममार्गी देवीभक्त. हा भगवत्पूज्यपाद शंकराचार्य त्यांच्या वेळेस होता. व त्यांनीं याचें मत खंडित करून यांस जिंकलेंही होतें. (आ. गि. शं. वि. प्र. २२)

**शंखधर**– प्रहसन नाटकाचा कर्त्ता. (बु० का० शोध.)

**शंखोद्धारतीर्थ**– हें एक क्षेत्र असून चर्मण्वती आणि क्षिप्रा या दोन नद्यांच्या संगमा जवळ अवंती देशांत आहे. चार्वाक नांवाचा जो नास्तिक तो येथेंच जन्मला होता. (जैन ग्रंथ.)

**शतद्रू**– पंजाबा मध्यें ज्या पांच नद्या आहेत. त्यांतील एक. (प्रा. ऐ. को.) हिला हालीं नकाशांत सतलज असें नांव असून कोणी कोणी हिला सत्रंजीनदी असेंही म्हणतात.

**शतधन्वा**– मौर्यवंशी चंद्रगुप्तघराण्यांतील ९वा राजा. सोमशर्म्याचा मुलगा व बृहद्रथाचा बाप. (रा·मा·)

**शतप्रश्नकल्पलतिका**– माधवाचार्य (विद्यारण्य) यांचा ग्रंथ. यांत एकेक श्लोक प्रश्नाचा व त्यावर उत्तराचे श्लोक दहा दहा असल्यामुळें यास असें नांव आहे.यांत सर्व जातींच्या ब्राह्मणांची उत्पत्ति कशी झाली इत्यादि वर्णन आहे. (क॰च॰).

**शतमुखरावणवध**– मुक्तेश्वरकृत मराठी भाषेंत.

**शतश्लोकी**– बोपदेवकृत वैद्यशास्त्र विषयक संस्कृत ग्रंथ.

**शतानंद**– रुद्रकाचें दुसरें नांव.

**शतानीक**– युधिष्ठिर वंशीय सर्पसत्र करणाऱ्या जन्मेजयाचा पुत्र व सहस्रानीक राजाचा बाप. यानें ८० वर्षे ५ महिने १९ दिवस राज्य केलें. व याच्या कारकीर्दीच्या संमाप्तीपर्यंत कलीचीं २६१ वर्षे एकोणीस दिवस इतका काळ गेला होता. (हिंदु॰ह॰इ॰).व (राजमालि॰) २– याच वंशांतील रूदास राजाचा पुत्र व सोमक राजाचा बाप. (रा·मा·) याच्या राज्यकीर्दीच्या समाप्तीस युधिष्ठिर शक १५३३ मध्यें अर्हत मरण पावला.

**शनिमहात्म्य**– मराठींत ओंवीबद्ध, महीपतिबावा कृत.

**शबरस्वामि**– दीस स्वामीचा पुत्र. हा काश्मीराकडील राहणारा होता. पूर्वमीमांसेवर याचें भाष्य आहे. (बु॰का॰शो॰).

**शब्दकौस्तुभ**– भट्टोजीदीक्षित कृत व्याकरणविषयक संस्कृत ग्रंथ.

**शब्दप्रकाश**– अपय्यादीक्षित कृत संस्कृत कोश.

**शब्दमालाकोश**– उपेंद्रभानकृत संस्कृत भाषेंत.

**शब्दरत्न**– व्याकरण विषयावर संस्कृत भाषेंत हरिदीक्षितकृत.

**शब्दव्यापारविचार**– राजानक कृत संस्कृतांत. यावर मम्मटाची टीका आहे.

**शब्दार्थरत्न**– तारानाथ तर्कवाचस्पतिकृत संस्कृत व्याकरणावर.

**शब्दावलोक**– जयदेवमिश्रकृत संस्कृत व्याकरण विषयावर.

**शब्देंदुशेखर**– नागोजीभट्टकृत. सिद्धांत कौमुदीवर

**शब्देकज्योत्स्ना**– बुद्ध पहिला त्याचा व्याकरण विषयावर ग्रंथ.

**शंभुनाथ**– हा कवि गुजराथी होता. देवीवर्णन यानें लिहिलेलें आहे. (काव्य·)

**शंभुराजचरित्र**– हरिकविकृत संस्कृत भाषेंत.

**शंभुराम**– वेदांत विषयक आत्मविलासनामक संस्कृत ग्रंथाचा कर्ता. (बु·का·शो·)

शाम– मागध राजांतील धर्मसूत्राचा पुत्र. व क्षमसेनाचा बाप. (राजमालिका.)
शरणागतिदीपिका– वेदांताचार्य कृत संस्कृत भाषेंत.
शरणागद्य– रामानुजाचार्यकृत त्रिगद्यांतील एक गद्य तें.
शरणोपदेश– वल्लभमताचा ग्रंथ.
शरयूनदी– अयोध्ये जवळची नदी. हिचा उगम हिमालयांतून आहे.
शरावतीनदी– हिच्या कांठीं श्रावस्ती नगरी आहे. (प्रा. हिं. न.).
शष्ठपंडित– मंखकवीच्या ग्रंथाचे परीक्षक ३० पंडित त्यांतील एक. (बु० का० शी०).
शाकटायन– हा एक मोठा वैयाकरण होऊन गेलेला आहे. [त. (प्रा. हिं. न.).
शाकलदेश– शोण आणि वितस्ता या नद्यांमधील देश. यास हल्लीं सगल म्हणतात.
शाकलनगर– मद्रदेशाची राजधानी. [आहे.
शाकुंतलनाटक– शकुंतला आणि दुष्यंत राजा यांच्या गांधर्वविवाहांचें वर्णन यांत
शाक्यमुनि– दुसऱ्या बुद्धाच्या नांवांतील अमरकोशांत लिहिलेलें पहिलें नांव.
शाक्यराजा– सूर्यवंशी संजयराजाचा पुत्र व शुद्धोद राजाचा बाप.
शाक्यसिंह– शाक्यमुनीचेंच अमरकोशांत लिहिलेलें दुसरें नांव.
शाक्या– दुसऱ्या बुद्धास मानणारी एक ब्राह्मणस्त्री. ही त्याच्या वेळेसच होती.
शातवाहन– काश्मिराकडील राजा. याची गोष्ट अशी सांगतात कीं, हा एकदां आपल्या स्त्रियांसह वर्तमान विलास करीत असतां, याच्या मुखावाटे निघालेलें संस्कृत वाक्य अतिशयच अशुद्ध असल्यानें त्यांस पराकाष्ठेचें हंसें आलें. ती गोष्ट याच्या मनास लागून, यानें सर्ववर्मा पंडितांकडून एक इतकें सोपें व्याकरण करविलें कीं, मोठेपणीं देखील त्याच्या अध्ययनानें पाहिजे त्यानें पाणिनीचें व्याकरण शिकल्या प्रमाणें विद्वान् व्हावें. त्या व्याकरणास कातंत्र कौमुदी अथवा कातंत्र व्याकरण ह्मणतात. तेंच हा पुढें पढला. व चांगला विद्वान् झाला. (बु.)
शांति– सोळावा तीर्थंकर. (तीर्थंकर) श. प.
शांतिदास– कृष्णगोपी संवादाचा कर्त्ता. हा संवाद गुजराथींत आहे. (काव्य दो०).
शांतिपंचीकरण– ओंवीबद्ध मराठींत जयराम स्वामीकृत.
शारदामठ– श्रीमच्छंकराचार्य स्थापित जे दिशापरत्वें च्यार मठ त्यांतील पश्चिमदिशेकडील द्वारका येथील मठ तो. या विषयीं मठाम्नाय ग्रंथांत येणें प्रमाणें आढळतें:– " प्रथमः शारदो विंद्या द्गोवर्धन द्वितीयकः॥
जोशीमठस्तृतीयःस्यात् शृंगेरीति चतुर्थकः १

तीर्थ आणि आश्रम हे इकडील सन्यासी असून स्वरूपनांवाचा ब्रम्हचारीही पे-थीलच आहे.

**शारदामानसपूजा**– श्रीमच्छंकराचार्यकृत. देवीची मानस पूजा.

**शारदासंभव**– लक्ष्मीनारायणाख्या याचा १०० श्लोकांचा ग्रंथ.

**शारीरकभाष्य**– भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्यकृत ब्रह्मसूत्रावरील भाष्य तें.

**शार्ङ्गधर**– हा ब्राह्मण अनंगभीम राजाच्या कारकीर्दीत होता. हा चांगला विद्वान् असल्यामुळें हम्मीर राजानें यास आश्रय दिला होता. यानें हम्मीरविजय, शार्ङ्ग-धर, व सुभाषित शार्ङ्गधर असे तीन ग्रंथ लिहिलेले प्रसिद्ध आहेत. (क०च०).

२– नन्नय भट्टाचा शिष्य व राजनरेंद्राचा पुत्र.

३– वैद्यकावर असलेला शार्ङ्गधराचा ग्रंथ तो.

**शार्ङ्गपाणि**– वैष्णवमताचा वादी. याचा पहिल्या शंकराचार्यांनीं पराजय केला.

**शालातुरीयनगर**– हल्लीं यास लाहोर म्हणतात.

**शालिग्रामीनदी**– गंडकी नदी.

**शालिवाहन**– कलियुगामध्यें जे सहा शककर्ते व्हावयाचे म्हणून लिहिलें आहे, त्यांत हा होऊन गेलेला तिसरा शककर्ता. विक्रम संवताच्या १३५व्या वर्षीं या-चें विक्रमाचा पुत्र जैत्रपाल त्याशीं युद्ध होऊन, त्यांत त्याचा पराभव झाल्यामु-ळें तो नर्मदेच्या उत्तर तीरास गेला. त्यामागून शालिवाहन जाऊं लागला अस-तां, याचें सैन्य नर्मदेंत निभेना म्हणून तो मागें हटला. आणि त्यानें आपला श-क दक्षिणेंत चालू केला. याचा शक चालू झाला त्या वर्षीं विक्रम संवताचा बहु-धान्य संवत्सर संपून प्रमाथि लागणार होता. त्या विषयीं यानें असा बदल केला कीं, प्रमाथीचें नांव प्रभव ठेवून तें आपल्या शकाचें पहिलें वर्ष म्हण-विलें. हल्लीं शालिवाहन शकाचा संवत्सर काढणें झाल्यास शकाच्या वर्षांत १२ मिळवून ६०नीं भागावें लागतें. त्याचें कारण प्रभवापासून बहुधान्य हा बारावा संवत्सर आहे हें होय.

याचा मूळवृत्तांत असा आहे कीं, पैठणामध्यें सोमकांत नांवाचा राजा राज्य करीत असतां तेथें सुलोचन नांवाचा एक ब्राम्हण राहात होता. त्याला पु-त्रसंतति नव्हति. एक कन्या मात्र सुमित्रा नांवाची होती. सुमित्रा च्यार वर्षांची झाली इतक्यांत तिची आई मरण पावली. म्हणून सुलोचनानेंच तिला वा-ढविलें व ती उपवर झाली, आतां तिचें लग्न करावें तों अशी गोष्ट घडली कीं;

शेषापासून तिला गर्भ राहिला, व तो दिवसेंदिवस वाढत चालला. ही गोष्ट गांवांतील ब्राह्मणांस समजतांच त्यांनीं त्यास बहिष्कार घालून गांवाबाहेर हांकून लाविलें. तेव्हां सुलोचन निरुपाय होऊन गांवा बाहेर कुंभारवाड्यांत कन्येस घेऊन जाऊन राहिला.

राहाव्या महिन्यांत सुमित्रा प्रसूत होऊन उत्तम व सलक्षण अशा पुत्रास प्रसवली. तोच हा शालिवाहन होय. हा जसजसा मोठा होत गेला तसतसा सर्व खेळ राजकारणींच खेळूं लागला इतकेंच नव्हे, तर जे न्याय कित्येक दरबारांतून राजांच्यानें तोडवेनात ते यानें सहज बाललीलेंत तोडिले. कुंभारवाड्यांतच राहणें असल्या कारणानें, व त्यांचीं मुलें याचीं खेळगडी असल्या कारणानें, यानें हजारों मातीचे हत्ती, घोडे व शिपाई केले असत. हा न्याय उत्तम प्रकारचे तोडतो व आपल्यास बाललीलेंत शककर्त्ता राजा म्हणवितो. ही गोष्ट विक्रमाच्या जैत्रपाळ पुत्रास कळून त्यानें याच्यावर स्वारी केली. ही गोष्ट यास कळतांच यास चिंता पडली कीं, आतां काय करावें. असें पाहून याच्या आईनें शेषाचें स्मरण केलें. त्या बरोबर तो प्रगट झाला. व त्यानें याचें सर्व सैन्य सजीव केलें. तें हा घेऊन जैत्रपाळावर गेला. त्यांत याची सरशी झाली. व जैत्रपाळ हटत हटत नर्मदेपार गेला. तेव्हां हाही जाऊं लागला. परंतु याचें सैन्य मातीचें होतें म्हणून तें पाण्यांत विरघळूं लागलें. त्या मुळें हा माघारा सरला. व दक्षिणप्रांत सर्व जिंकून तेथें यानें आपला शक वर लिहिल्या प्रमाणें चालू केला. त्याचें आज १८०२ रें वर्ष आहे. (शालिवाहनचरित्र.)

**शालिवाहनचरित्र**— यांत शालिवाहनाचें सर्व इतिवृत्त आहे. यांत याच्या चमत्काराच्याही पुष्कळ गोष्टी आहेत. हा ग्रंथ मराठी मध्यें आहे. व तो रघुनाथशास्त्री दांते यांनीं लिहिलेला आहे.

**शालिवाहनसप्तशती**— अलंकार शास्त्रावर संस्कृता मध्यें शालिवाहनानें केलेला सातशें श्लोकांचा ग्रंथ तो.

**शालिशूक**— मौर्यवंशी राजा. संगत राजाचा पुत्र. (रा. मा.)

**शाली**— चिदंबरा जवळचा गांव.

**शाल्वदेश**— कच्छ देशाच्या ईशान्येकडील देश. (प्रा. हिं. न.)

**शास्ता**— बुद्धाच्या नांवांतील एक.

**शास्त्रदीपिका**— मीमांसा विषयक पार्थसारथी मिश्रकृत संस्कृत ग्रंथ.

शाहापुर– कर्नाटकांतील शहर. (शहासु॰ शा॰प॰)

शाहाबावा– हा साधु जातीचा रजपूत होता. याच्या स्त्रीचें नांव अमिनाबाई होतें.

शाहाब्राह्मणी– बेदर येथील ब्राम्हणी बादशाहांतील एक.

शाहामुनि– याचे पूर्वज मूळचे प्रयागांतील राहणारे होत. याचा पणजा रजपूत जातीचा शाहाबावा म्हणून होता. याच्या आज्याचें नांव जानाजी व बापाचें मानशिंग होतें. हा मोठा भगवद्भक्त होता. व हा सिद्धटेकास बापापासूनच राहात होता. यानें केलेला मराठी भाषेंत सिद्धांतबोध नांवाचा ५० अध्यायांचा ग्रंथ वेदांतविषयावर आहे. व तो शके १७९० मध्यें यानें रचलेला आहे.

शाहूराजा– मराठी राज्याचा मूळ संस्थापक जो छत्रपति शिवाजी राजा त्याचा हा नातू. व संभाजीचा पुत्र होता. याच्या आईचें नांव येसूबाई होतें. याचें जन्म सुमारें शके १६९० मध्यें होऊन हा शके १६३० च्या सुमारास राज्याधिकारी झाला. औरंगजेबानें संभाजीस मारिल्यावर त्यानें यास याचे आईसुद्धां धरून दिल्लीस नेलें होतें. व तेथेंच हा लहानाचा थोर झाला. औरंगजेबाची कन्या याजवर अतिशय प्रीति करी. त्यामुळें याचा काळ दिल्लीमध्यें मोठ्या सुखानें ऐषआरामांत गेला. औरंगजेब मरण पावल्यावर दिल्लींतून याची सुटका झाली. व हा सातान्यास परत आपल्या वडिलार्जित राज्यावर आला. याच्या राज्याची भरभरार श्रीवर्धनकर ब्राम्हण बाळाजी विश्वनाथ, तो पेशवा झाला व तेव्हां पासून उत्तरोत्तर अधिकाधिक वाढत गेली. यानें राज्य ४२ वर्षें केलें व शके १६७१ मध्यें हा निपुत्रिक मरण पावला. (हिंदु॰ छा॰ व हस्तलि॰ इ॰).

शिंघणराजा– हा हिंदुजातीचा राजा खान्देशांत होता. हा रजपूत असे. यानें तापीनदीच्या कांठी प्रकाशानामक क्षेत्रांत भद्रेश्वर नांवाच्या महादेवास इनाम जमीन देऊन देवाचें देऊळ बांधिलें आहे. तेथें तो इनाम यानें देवास कधीं दिला त्या विषयींचा कोरीव लेख कोरविला आहे. त्यांत शालिवाहन शक २७६ आनंदनाम संवत्सर आढळतो. (हु॰मा॰)

शितिकंठ– हा जातीचा तैलंग ब्राम्हण स्मार्त होता. शालिवाहनाच्या १५ व्या शतकांत गंडीकोटा येथें याचें जन्म झालें होतें. यानें पुष्कळ मोठें वय झाल्यावर काशीस जाऊन न्यायशास्त्राचें अध्ययन केलें. व तर्कसंग्रहावर तर्कसंग्रहदीपिकानांवाची टीका लिहिली. तिलाच कोणी शितिकंठी म्हणतात. यानें न्यायशास्त्रांत पुष्कळ विद्यार्थी तयार केले व काशींतच मरण पावला. (कविचरित्र॰) ६७

**शितिकंठी**– तर्कसंग्रहावर शितिकंठानें तर्कसंग्रह नांवाची लिहिली आहे टीका ती.

**शिंदेघराणें**– या घराण्याचा मूळपुरुष राणोजी शिंदा होता. हा साताऱ्या जवळ कण्हेरखेड म्हणून गांव आहे तेथील पाटील असे. थोरल्या बाजीराव साहेबांच्या कारकीर्दींत हा वाढला. याला जयाजी दत्ताजी व जनकोजी असे तीन औरस मुलगे व महादजी वगैरे दासीपुत्र होते. यांत याच्या मागें जयाजी याचें काम पाहूं लागला. त्यानें राज्याधिकार नऊ वर्षें केला. व शेवटीं विजयशिंग नांवाच्या एका रजपूत राजाच्या लढाईंत तो मारला गेला. म्हणून जनकोजी अधिकारी झाला. तो जनकोजी व त्याचा भाऊ दत्ताजी पानपतच्या लढाईंत पडल्यामुळें महादजी तें काम पाहूं लागला. महादजी पानपतच्या लढाईंत बचावला होता तरी तो किंचित् एका पायानें लंगडा झाला होता. त्यानें ३३ वर्षें आपल्या शिंदे पदवीचा अधिकार केला. व नंतर मरण पावला. त्याच्यामागें त्यांचा पुतण्या दौलतराव तो अधिकारी झाला. यानेंही शिंदेपदवी ३४ वर्षें अनुभविली. हा मरण पावल्यावर याची बायको बायजाबाई तिनें मुकुटरावास दत्तक घेतलें. आणि त्यास गादीवर बसवून आपण कारभार पाहूं लागली. त्यानें १५ वर्षें अधिकार केला. परंतु तो पुढें मरण पावल्यामुळें, इसवी १८४५मध्यें बायजा बाईनें भगीरथराव ऊर्फ जयाजी यांस गादीवर बसविलें. ते हल्लीं विद्यमान आहेत. येणें प्रमाणें या घराण्याची ही हकीकत शके १६५२पासून आज १८०२पावेतों आहे. (हिंदुस्थान॰ छा॰ इ॰).

**शिधोपंत**– भवंदी येथील राहणारा एक स्रवबस्त गृहस्थ. हा निवृत्ति इत्यादि भावंडांच्या आईचा बाप होता.

**शिबीदेश**– सिंधुदेशाच्या दक्षिणेकडील देश. (प्रा॰ हिं॰ न॰)

**शिराळशेट**– हा जातीचा लिंगाईत धर्मी वाणी होता असें सांगतात. व त्याचप्रमाणें लिंगाइतांत याची मानणूकही दिसून येते. असें ऐकण्यांत येतें कीं, हा अतिशय श्रीमान् असून दिल्ली येथें राहात असे. एकदां असें झालें म्हणून सांगतात कीं, बादशाहास फारच मोठ्या द्रव्याच्या रकमेची गरज लागली. म्हणून त्यानें सर्व सावकारांस बोलावून आपून हुकूम केला कीं, सदर रकमेची भरतीं तुह्मी सर्वांनीं करून द्यावी. परंतु त्यांनीं आपापलें द्रव्य एकत्र केलें तरीसुद्धां त्या रकमेची भरती होईना. तेव्हां सावकार व बादशाहा मोठ्या चिंतेंत पडले कीं. आतां काय करावें? इतक्यांत कोणी माहितगारानें याचें नांव बार-

शाहास कळविलें. त्या वरून त्यानें यास बोलावून आणून सदर रकम मागितली. यानें सांगितलें हुकुमाप्रमाणें रकम देतों. परंतु माझें मागणें सरकाराजवळ इतकेंच आहे कीं, आपल्या सर्व राज्यांत माझा हुकूम साडेतीन घटका पर्यंत चालावा. तें बादशानें कबूल केलें. पुढें यानें रकमेची भरती केली. व बादशाहानेंही यास साडेतीन घटकापर्यंत बादशाही दिली. तेवढ्या वेळांत यानें हजारों इनामें लोकांस देऊन त्या बद्दलच्या सनदाही आपल्या शिक्क्याच्या लोकांस करून दिल्या असें ह्मणतात. (हस्तुमा०).

हल्लीं कोणी मनुष्य द्रव्यबलानें किंवा अधिकार बळानें चार दिवस तुरतुर करून पुढें फिक्का पडला असतां तेथें त्याच्या निंदार्थी शिराळशेटीचें राज्य साडेतीन घटका अशी म्हण लोकांत म्हणण्याची चाल आहे. तिचें कारण हेंच होय. ही गोष्ट होऊन गेल्यास सुमारानें पांचशें वर्षे झालीं अशी लोकांत बोलवा आहे. (हस्तुमाहिती.)

**शिवकर्णामृत**– अपय्यादीक्षितकृत संस्कृत ग्रंथ.

**शिवकल्याण** – ज्ञानेश्वराच्या अमृतानुभव अथवा अनुभवामृत ग्रंथाचा टीकाकार. ही टीका मराठींत ओंवीबद्ध आहे. समर्थ रामदास स्वामींचे शिष्य कल्याणगोसावी त्यांचा शिष्य हा टीकाकार होता असें कित्येक लोक ह्मणतात.

**शिवगुरु**– दुसरे शंकराचार्य जे नामांकित विद्याशंकर भारती त्यांचा बाप. (मा. शं.)

**शिवतत्त्वरत्नाकर**– केळदी बसवप्पा यानें केलेला संस्कृत ग्रंथ.

**शिवतत्त्वविवेक**– अपय्या दीक्षित कृत संस्कृत ग्रंथ.

**शिवतीर्थ**– विद्यातीर्थांचे शिष्य. व भारती तीर्थांचे गुरु.

**शिवदास**– खंबायत येथील राहणारा जातीचा गुजराथी नागर ब्राह्मण संवत् १६७३ मध्यें होता. यानें गुजराथी भाषेंत द्रौपदी स्वयंवर वर्णिलें आहे. (का.)

२– वेताळपंचविशी ग्रंथाचा टीकाकार. (बु. का.

**शिवदीनबावा**– केसरीनाथाचा शिष्य. हा पैठणचा राहणारा जातीचा वाजसनीब्राह्मण असे. यास रामचंद्र बावा, लक्ष्मण बावा, विठ्ठल बावा आणि महादेवबावा असे चार पुत्र होते. यांत वडील रामचंद्रबावाचा पुत्र एकच रघोबा बावा व त्यासही एकच पुत्र धुंडिराजबावा होता. दुसरा लक्ष्मणबावा त्यासही पुत्र एकच रंगनाथबावा होता. आणि विठ्ठलबावा व महादेव बावा यांस संतति मुळींच नव्हती. (हस्तुमा.) यास होऊन गेल्यास सुमारें सवाशें वर्षे

झालीं असें ह्मणतात.

शिवदृष्टि— हा एक संस्कृत ग्रंथ आहे. व तो सोमानंदानें केलेला आहे.

शिवपुराण— सामळभट्टकृत गुजराथी भाषेंत.

शिवभट्ट— नागोजीभट्टाचा बाप.

शिवमणिदीपिका— अपय्यादीक्षित कृत संस्कृत ग्रंथ.

शिवमानसपूजा— भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्य कृत.

शिवमाला— संस्कृत भाषेंत, राजानक गोपाल कृत.

शिवय्याकवि— इलेश्वर अग्रहारांतील राहणारा ब्राह्मण. (विद्यानाथ) शा० पहा.

शिवरथ— उत्पल राजाचा प्रधान. इ० ११ व्या शतकाच्या समाप्तीनंतर होता. (बु.का.)

शिवरामस्वामी— बाबूराव नामक कोण्या एक्या गृहस्थाचे हे चिरंजीव. हा पूर्वी मामलेदार होता. पुढें वैराग्य पावून पूर्णानंद स्वामींचा शिष्य झाला. रंगनाथस्वामींचे वडील निजानंद स्वामी ते व हे गुरुबंधु होते. याची समाधि कल्याण येथें आहे. हा पुरुष मोठा ज्ञाता होता. यानें केलेलीं पदें तर शेंकडों आहेत. तीं जरी चांगलीं आहेत, तरी याच्या पांच भुपाळ्या आहेत त्यांवरून याचें अनुभूत उत्तम ज्ञान चांगलें समजून येतें. हा शालिवाहनाच्या १५ व्या शतकाच्या समाप्तीनंतर होता. व हा कलबुर्ग्यास राहात असे असें ह्मणतात.

शिवलीलामृत— श्रीधर कविकृत ओंवीबद्ध मराठी भाषेंतील १४ अध्यायांचा ग्रंथ.

शिवस्कंद— तीस आंध्रभृत्य राजांतील सत्ताविसावा.

शिवस्वाति— तीस आंध्रभृत्य राजांतील तेविसावा.

शिवार्चनचंद्रिका— अपय्यादीक्षित कृत संस्कृत भाषेंत.

शिवाजीबावा— एक साधुपुरुष.

शिवाजी राजा— मराठी राज्याचा मूळ स्थापक जो परम प्रतापी पुरुष तो. विजापुरकरांचा सरदार शाहाजी भोंसला त्याचा हा पुत्र होता. हा लहानपणापासूनच चपळ, धूर्त, उद्योगी आणि स्वदेशाभिमानी असा असे. दादोजी कोंडदेव जो याच्या बापाचा विश्वासू कारभारी त्याची शिक्षा यास होती. याचें जन्म शके पंधराशें एकुणपन्नास मध्यें झालें होतें. व यानें आपणास राज्याभिषेक शके १५९६ मध्यें करविला असे. याच्या गादीची जागा रायगड किल्ल्यावर होती व यानें सैन्य मावळे व हेटकरी या रानटी व इमानी लोकांच्या जातीचें होतें. यानें अष्टप्रधान केले असत. व त्यांचीं नांवें फारशी भाषेंत होतीं तीं संस्कृत भाषेनें

लिहिण्यांची पद्धत घातली होती. जसा पेशवा ह्मणजे मुख्य प्रधान इत्यादि.ज-मारवर्ची लिहिण्यांत वगैरे फारशी शब्द येतात तेही न यावेत व त्या जागीं देश-भाषेचे शब्द असावेत असें याच्या मनांत असल्या मुळें, यानें राजव्यवहारोप-योगी संस्कृत भाषेमध्यें एक कोश करविला होता. परंतु ती रीत घालण्या पूर्वीं-च हा गुडघी नांवाच्या रोगानें शके १६०२ चैत्रशुद्ध १५स मरण पावल्या मुळें, व याचा मुलगा चांगला नसल्या मुळें ती गोष्ट तशीच राहून गेली ती गेलीच. यास संभाजी व राजाराम असे दोघी बायकां पासून झालेले दोन मुलगे हो-ते. त्यांत संभाजी तो याच्या मागें राज्याधिकारी झाला.

समर्थ रामदास स्वामी ते याचे गुरु असत. व ते यास राजनीति वारंवा-र शिकवीत. हाही तसाच निःसीम गुरुभक्त होता. कारण हा पांच पन्नासको-सांच्या आंत असल्यास, गुरुवारीं समर्थांच्या दर्शनास आल्या शिवाय कधींच राहात नसे. याच्या गोष्टी रामदास चरित्रांत व छापील हिंदुस्थानाच्या इतिहा-सांत प्रसिद्ध आहेतच. म्हणून त्या सांगण्याची तादृश गरज येथें नाहीं. परंतु यानें एंकदां समर्थांस प्रार्थना केली. त्या बद्दलचा याचा स्वतःचा एक अभंग आमच्या ऐकण्यांत आलेला खालीं लिहिला आहे. यावरून याची गुरुभक्ति, या-ची लीनता, व याचा समाधानाचा निश्चय कसा होता तें वाचकांस तेव्हांच कळेल.

सद्गुरु बापा तूं माहेरा॥ मातें तुझाचि उबारा॥ पारकीजे भवसा-वसागरा॥ पूर्णदासा स्वामीया॥ १॥ अनन्याच्या प्रतिपाळका॥ दा-रुण भवभय हारका॥ रक्षा आपुल्या बाळका॥ नका नका उपेक्षूं ॥२॥ भवसर्पे गुंडाळिलें॥ तेणें मन हें व्याकुळ झालें॥ हित अहित विसरलें॥ सांभाळिलें पाहिजे॥ ३॥ मोकलिलें तुह्मी जरी॥ निरवा वें ह्या कवणे परी॥ तुह्मावीन गति दुसरी॥ मातें नाहीं दयाळा॥ ४ शुद्ध करोनियां मन॥ पूर्ण निजरूप जाणून॥ रामदासीं लोटांगण शिवराजानें घातलें॥ ५॥

अहाहा!! काय या राजाची योग्यता! प्रपंच व परमार्थ या दोहोंकडे सावध असा राजा आलीकडे एक हाच होऊन गेला. बरें गुरु तरी उगेच होते असेंही नव्हे. त्यांचीही योग्यता तशीच होती. शिवाजी राजानें तुकारामास मी भेटी-स येतों असें पत्र लिहिलें असतां, त्यानें समर्थ रामदास स्वामींच्या नामोल्लेख पूर्वक उत्तर लिहिलें तो अभंग येणें प्रमाणें आहे:—

नहों कीलवाणें नहों आह्मीं दीन॥ सर्वदां शरण पांडुरंगीं॥ १ ॥ जरीमाझी वाणी दीनरूप बाहे॥ करुणा त्या आहे हृदयस्था॥ ध्रु०॥ पांडुरंग आह्मां पाळीता पोशीता॥ आणिकाची कथा काय येथें॥२॥ तुझी भेट घेणें कायबा मागणें॥ आशेचें तें शून्य जाहालेंसे॥३॥ निराशेचा गांव दिधला आह्मांशी॥ प्रवृत्ति भागासि सोडियेलें॥४॥ पतिव्रता मन पतीशींच भेटो॥ तैसे आह्मी विठो माझी नांदों॥५॥ विश्व हें विठ्ठल नाहीं दुजें कांहीं॥ देखणें तुझेंही तया माजी॥६॥ तुजही विठ्ठल ह्वा ऐसें वाटे॥ तरी ऐक नेटे एक गोष्टी॥७॥ सद्गुरु श्रीराम दासाचें भाषण॥ तेथें घाली मन चळों नको॥८॥ बहुतीं हे वृत्ति चावळली जरी॥ रामदास्य तरी घडे कैसें॥९॥ तुका म्हणे बापा चातुर्य सागरा॥ भक्ति भाव थारा भाविकाशीं॥१०॥

शिवानंद– हा सन्यासी गुजराथी ब्राह्मण रेवाकांठा येथें राहात असे. व हा संवत् १६५७ मध्यें होता. यानें आरत्या वगैरे बरीच कविता केलेली आहे. (का०दो०).

शिवाभरण– चंद्रोपासक. हा मुख्य आचार्यांच्या वेळेस होता. (आ० शं० प्र० ४४).

शिशुनाग– हा राजा शिशुनाग घराण्याचा मूळपुरुष होता. (राजमा०)

शिशुनागघराणें– पंचप्रद्योत राजांतील शेवटला नंदीवर्द्धन, त्याच्या मागें त्याचा प्रधान मगध देशांत राज्याधिकारी झाला. या रूपद्यां याच्या वंशांत एकंदर दाहा राजे झाले. त्यांचीं नांवें– १ शिशुनाग. २ काकवर्ण. ३ क्षेमधर्मा. ४ क्षेत्रज्ञ. ५ विधिसार. ६ अजातशत्रु. ७ दर्भक. ८ आजय. ९ नंदीवर्द्धन. १० महानंदी. येणें प्रमाणें होतीं. व या सर्वांनीं मिळून राज्य ३६० वर्षे केलें. यांच्या राज्यकारकीर्दीच्या समाप्ती पर्यंत युधिष्ठिर शक १५०० गेला होता. (राजमा०).

शिष्यहितान्यास– हा व्याकरण विषयावरील ग्रंथ उग्रभूतिकृत संस्कृतांत आहे.

शिक्षा– हा ग्रंथ जीवनकविकृत गुजराथींत आहे.

शिक्षापत्री– हरिरायकृत वल्लभमताचा ग्रंथ.

२– निष्कुळानंदकृत गुजराथी भाषेतील ग्रंथ.

शीखलोक– हे जातीचे प्रायः रजपूत लोक लाहोराकडील होत. नानकाचा पंथ निघाल्या पासून व त्यांनीं तें मत स्वीकारल्या पासून शिष्य अशा संबंधानें असें नांव त्यांस चालू झालें. (हुडू मा०).

शुकचरित्र– अमृतरायकृत मराठी भाषेंत.

**शुकनिधान-** हिंदुस्थानी भाषेंत कबिरानें केलेला ग्रंथ.

**शुकबाहात्तरी-** सामळभट्ट कृत गुजराथींत.

**शुकाचार्य-** बादरायण व्यासांचे पुत्र. यानीं परीक्षित् राजास भागवत सांगितलें. (३ भागवत श. प.) यांचे शिष्य गौडपादाचार्य. त्यांचे शिष्य गोविंद पादाचार्य. व त्यांचे शिष्य शंकराचार्य होते.

**शुक्तिमती नदी-** ही चेदी देशांत आहे. (प्रा. हिं. न.)

**शुंगराजे-** या राजांस कोणी शौंग अथवा कोणी संग राजे ह्मणतात.

**शुचिराजा-** मागध राजांतील विप्रराजाचा पुत्र व क्षेमराजाचा बाप.

**शुद्धकीर्ति-** भगवत्पूज्य पाद श्रीमच्छंकराचार्य त्यांच्या शिष्यांतील एक.

**शुद्धमती-** ही एक नदी गंडकी नदीस मिळणारी आहे.

**शुद्धाद्वैत-** भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्यांच्या मताचें नांव. या नांवाचा उल्लेख आनंदगिरीच्या शंकरविजयांत जागोजाग आला आहे. बुद्धानें आपल्यास अद्वयवादी म्हणविल्या मुळें आचार्यांनीं आपल्या मताचें नांव असें ठेविलें असावेंसें दिसतें. व विचारानें पाहिलें असतां हें नांव सार्थही आहे. कारण बुद्ध सर्व कांहीं क्षणिक मानितो. आणि क्षणविनाशी तें तें भ्रांतिकल्पित म्हणजे अज्ञानजन्य असेंही म्हणतो. परंतु भ्रांतिकल्पितास यानें सत्याधिष्ठान मानावें तें न मानतां, क्षणविनाशी बुद्धीस अधिष्ठानत्व कल्पिलें आहे. हीच बौद्धमतांत मोठी चूक आहे. आचार्यांनीं स्वात्मनिरूपणांत असें म्हटलें आहे.

> सुप्तौ स्वयं विलीना बोद्धव्यासा कलेवरं सकलं
>
> विज्ञान शब्द वाच्या चित्प्रति बिंबा न बुद्धिरप्यात्मा

या प्रमाणें आचार्यांनीं बुद्धाच्या विज्ञानवादास दोष देऊन जीं जीं नामरूपें दिसतात भासतात तीं मुळींच "नेहनानास्तिकिंचन" या श्रुत्यर्थावरून नाहींत. असें असतांही तीं ज्यास दिसतात व भासतात. तीं सत्याधिष्ठानींच भ्रांतीनें भासमान होतात. हा च बौद्धमतांत व आचार्यांच्या मतांत फेर असल्या मुळें आचार्यांच्या मताचें नांव शुद्धाद्वैत आहे.

२- वल्लभाचार्यांनींही आपलें मत शुद्धाद्वैत असें मानिलें आहे. ह्मणजे शंकराचार्य निराकार सच्चिदानंद ब्रह्म जगतास अधिष्ठानत्वें करून कारण मानतात. तसें ते मानीत नाहींत. त्यांचें म्हणणें साकार सच्चिदानंद श्रीपुरुषोत्तम तोच सर्वशक्तिमान् जगत्कारण आहे. परंतु हा जो साकार श्रीपुरुषोत्तम तो यांच्यामतीं

सांश आहे कीं निरंश आहे ? निरंश असेल तर त्यास साकारत्व म्हणणें विरुद्ध होईल. ह्मणजे त्यास साकारत्व नाहीं असेंच ह्मणावें लागेल. आणि जर असेंचआहे,तर शांकर मत आणि वल्लभमत यांत मुळींच भेद नाहीं असें होईल. परंतु ज्या अर्थी वल्लभाचार्यांनीं आह्मी शंकरमतवाद्यांस जिंकलें असा काशीविश्वेश्वराच्या देवळावर जाहीरनामा लाविला. व त्यांच्या चिरंजिवांनीं ( विठ्ठल नाथांनीं )आपल्या स्वतःच्या विद्वन्मंडन नामक ग्रंथांत,शंकराचार्यांची दुरुत्तर युक्त वाङ्मय पूजा यथाविधि केली. त्या अर्थीं शांकर मताशीं यांचें मत खास विरुद्ध आहे.व तसें आहे म्हणून साकार श्रीपुरुषोत्तम त्यांच्या मतानें सांश आहे असें होईल. व तो तसा झाला असतां "सांशस्य घटवन्नाशः" या न्यायानें तो-साकार नाशवंत होईल. म्हणून वल्लभ मतास शुद्धाद्वैत हें नांव केवळ उसनवारीचेंच असें समंजस लोक ह्मणतात.

**शुद्धाद्वैतमार्तंड**— वल्लभमताचा ग्रंथ.

**शुद्धोदनराजा**— सूर्यवंशी कलियुगांतील राजा. याच्या स्त्रीचें नांव मायादेवी असें होतें. व हा सर्वार्थसिद्ध नांवाचा जो बुद्ध त्याचा बाप होता. (ललितवि०) पहा.

**शुनक**— मागध राजांतील शेवटला पुरंजय त्याचा हा प्रधान होता. यानें त्यास युधिष्ठिर शकाच्या ११ व्या शतकांत मारून आपल्या प्रद्योत पुत्रास राज्यावर बसविलें. (रा॰मा॰)

**शूद्रक**— आंध्रभृत्य राजांतील पहिला राजा जो बली,त्यासच ग्यारेटच्या इंग्रजी कोशांत सिप्रक अथवा शूद्रक असें ह्मटलेलें आढळतें. मृच्छकटिक नाटकाचा कर्ता हाच होता किंवा तो निराळा त्याचा मात्र निर्णय होत नाहीं.(रा॰मा॰)

**शूरसेनपश्चिम**— हा देश आहे. व याचें मुख्य शहर मथुरा आहे. शौरसेनी भाषेचें मूळ उत्पत्तिस्थान हाच देश होय.

**शूर्पारकदेश**— कोंकणदेशांसच नांव. (प्रा॰ऐ॰को॰)पहा.) या नांवाचें एक शहर मुंबईच्या उत्तरेस असलेलें प्राचीन हिंदुस्थानाच्या नकाशांत आढळतें.

**शृंगवेरपुर**— नागोजी भट्टाचा आश्रयदाता जो रामराजा त्याचें राजधानीचें शहर. हें अयोध्या प्रांतांत असेलसें वाटतें.

**शृंगार**— मंखकवीचा भाऊ. (बु॰का॰शो॰)

२— शृंगारक तोच. (बु॰का॰शो॰)

शृंगारक– जयरथ कवीचा बाप. (बु० का० शो०)

शृंगारगुप्त– वासवदत्ता वृत्तिनामक ग्रंथाचा कर्ता. (बु० का० शो०).

शृंगारतिलक– आंध्रकालिदासकृत. (ब्रन्हूमा०) २-रुद्रटकवीचाही या नांवाचा एक ग्रं-[थ आहे.

शृंगाररसमंडन– वल्लभाचार्यकृत.

शृंगाररसाष्टक– आंध्रकालिदासकृत.

शृंगारशतक– भर्तृहरीकृत. २-नागराजकृत. (बु० का० शो०)

शृंगेरीमठ– भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्य त्यांचा दक्षिणेकडील स्थापित मठ, सरस्वती, भारती, आणि पुरी हे तीन सन्यासी व प्रकाश ब्रह्मचारी याम- ठांतील अधिकारी होत. हें स्थान तुंगा नदीच्या तीरीं आहे.

शेखउसमन– अवलिया होता.

शेखफरीद– लोंबकळ्या यवन. असेंही यास कोणी म्हणतात. चांदवडापासून दाहा कोसांवर निफाड म्हणून गांव आहे तेथें याचा दर्गा आहे. हा मोठा अ- वलिया होऊन गेला. (ब्रु० मा०)

शेखमहंमद– हा कबीरपंथी अवलिया चांभारगोंदें (श्रीगोंदें) येथील राहणा- रा होय. याचे वंशज हल्लीं तेथें आहेत. ते हिंदूं प्रमाणें वागतात. रूंता करी- त नाहींत. व शेंडी राखतात गोपीचंदनाचे द्वादश तिलक करितात. व तु- ळशीच्या मण्याच्या माळा गळ्यांत घालतात. हे रामं उपासक आहेत. व आ- पली मुलगी मुसलमानाच्या घरीं तशीच मुसलमानाची आपल्या घरीं लग्न करून देतात व आणितात. परंतु आणलेल्या मुलीस पुनः तिच्या माहेरीं पा- ठवीत नाहींत. आणि दिलेल्या मुलीस पुनः पंक्तीस घेत नाहींत. (ब्रु० मा०) शेखमहंमदाचे अभंग पुष्कळ आहेत. व योगसंग्राम नांवाचा १८ प्रकर- णांचा ओंवीबद्ध एक ग्रंथही आहे. हा तुकारामाच्या वेळेस होता. (ब्रु० मा०)

शेखस्फलतान– हा अवलिया साताऱ्याकडे त्रिपुटी म्हणून गांव आहे तेथें असे. हाही एका हिंदु साधूचा शिष्य होता. याचे कांहीं अभंग आढळतात. त्यांती- ल एक येणें प्रमाणें आहे.

अभंग.

ऊंस सर्व अंगीं काळा ॥ आंत सारखर जिव्हाळा ॥ १ ॥ फणसा अंगीं सर्व कांटे ॥ आंत अमृताचे सांठे ॥ २ ॥ नारळ वरुता कठिण ॥ परी अंतरीं जीवन ॥ ३ ॥ हिरवेचि द्राक्ष घड ॥ रसा येतां बहु गोड ॥ ४ ॥

शेखकलतान अविंध॥ त्याच्याहृदयीं गोविंद॥५॥ (हनुमा.).

शेंबेगांव- हा पैठणाजवळ आहे. व दुसरा रत्नागिरीकडे आहे.

शैवमत- सहा शैवांतील एक मत.

शोणनदी- ही बुंदेलखंड प्रांतांत आहे.

शोभा- विठ्ठलनाथाची मुलगी व वल्लभाचार्यांची नात.

शोभाकर- अलंकाररत्नाकर व अलंकारोदाहरण या दोन ग्रंथांचा कर्ता. (बु.का.)

शोंगराजे- संगराजे श.प.

शौद्धोदनी- शुद्धोदन राजाचा पुत्र जो दुसरा बुद्ध तो. (अमरकोश. श.प.)

श्रमणक- बौद्धमताचा साधु.

श्रावस्तीनगरी- ही प्राचीन काळीं उत्तरकोसलदेशाची राजधानी होती. ही शरावती नदीच्या कांठीं असे. प्राचीन हिंदुस्थानाच्या नकाशांत हिचे उत्तर अक्षांश सुमारें २७॥ व पूर्वरेखांश ८२ लिहिले आहेत.

श्रावक- जैन लोक आपणास या नांवाचे ह्मणवितात. यांत अर्थ असा आहेकीं देवाच्या मुखांतून निघालेलीं वचनें. ऐकणारे ते.

श्रीकंठ- श्रीगर्भाचा पुत्र व मंखकवीच्या ग्रंथाच्या परीक्षक ३० पंडितांतील एक. २- भवभूति कवीचें दुसरें नांव.

श्रीकंठचरित्र- मंखकविकृत यांत त्रिपुरवध वर्णन आहे.

श्रीकंठचरित्रटीका- जोनराज पंडित कृत.

श्रीकंठदेश- श्रीहर्ष राजाचा देश. (निबंधमाला.)

श्रीकृष्ण- प्रक्रिया कौमुदी नामक टीकेचा कर्ता.

श्रीगर्भ- मंख कवीच्या ग्रंथपरीक्षक ३० पंडितांतील एक. याच तीस पंडितांत याचा पुत्र श्रीकंठही होता. बापाच्या देखत मुलानें विद्वान् होऊन त्याच्या बरोबरीनें ग्रंथाचें परीक्षण व्हावें. येणें करून बापास किती आनंद झाला असेल तो त्याचा तोच जाणे. (बु.का.शो.)

श्रीगुण- मंखाच्या ग्रंथाचा परीक्षक. हा मीमांसक होता. (बु.का.शो.).

श्रीगुणरत्नकोश- वेदांताचार्यकृत.

श्रीघन- बुद्धाच्या नांवा पैकीं एक. (अम.को.श.प.)

श्रीदत्त- आचारादर्श ग्रंथाचा कर्ता. (बु.का.शो.).

श्रीधर- मराठी भाषेचा कवि. हा प्रसिद्ध रंगनाथ स्वामींचा पुतण्या. व त्यांचे

वडील भाऊ यादवराव ज्यांस सन्यासा नंतर ब्रह्मानंद नांव पडलें त्यांचा पुत्र होता. यानें रामविजय, हरिविजय, पांडवप्रताप, शिवलीलामृत इत्यादिक ओंवीबद्ध ग्रंथ लिहिले. याची वाणी रसाळ व लेखांत अर्थालंकारही चांगला आहे.याचा जन्म शके १६०० व मरणशक १६५० होता.

**श्रीधराचार्य**– विष्णुस्वामीची गादी चालविणारे जे पुरुष होऊन गेले त्यांतील हा पांचवा पुरुष होता. म्हणजे बिल्वमंगलाच्या पूर्वींचा हा होता. याच्या मागून बिल्वमंगल गादीवर बसला. श्रीमद्भागवताचा संस्कृत टीकाकार तो हाच असावा असा आमचा तर्क आहे. कारण, यानें लिहिलेली टीका जरी शांकरमतास अनुसरून आहे. तरी टीकेच्या आरंभीं यानें जें मंगल केलें आहे तें नृसिंहाचें असून विष्णुस्वामीच्या संप्रदायास अनुसरून आहे. तो मंगलश्लोक येणें प्रमाणें आहे:–

वागीशा यस्य वदने लक्ष्मीर्यस्यच वक्षसि॥
यस्यास्ते हृदये संविसंनृसिंह महं भजे॥१॥

अर्थ– ज्याच्या मुखांत साक्षात् सरस्वती, वक्षस्थळीं लक्ष्मी आणि हृदयामध्यें ज्ञानकला त्या नृसिंहाप्रत मी भजतों. म्हणून विष्णुस्वामीचा हा संप्रदायी व भागवताचा टीकाकार खास होय यांत संशय करणेंच नको. मध्वाचार्या पूर्वी हा सुमारें ७५ वर्षे असावा असें वाटतें. यांस नृसिंहाचा साक्षात्कार होता. हल्लीं भागवताच्या टीकेंत ज्या ज्या स्थळीं "अयंभाव:" असें लिहिलें जाऊन टीका लिहिली गेली आहे, ती स्वत: नृसिंहानें लिहिली आहे असें लोक मानतात. याची टीका इतकी सरस आहे कीं, ती स्मार्त भागवत इत्यादि सर्व लोकांस सारखी मान्य आहे. भगवद्गीतेवरही याची लहानशी संस्कृत टीका आहे. हस्तामलकाच्या ओंवीबद्ध टीकेंत एकनाथ स्वामींनीं हा शंकराचार्यांचा शिष्य लिहिलेलें चुकीनें समजावें. (ह०मा०)

भाष्यकार श्रीमच्छंकराचार्य त्यांच्या मतास अनुसरून जी याची टीका आहे. तीवरून शांकरसिद्धांत तथ्य असा याचा निश्चय होता. व त्यास नृसिंहाचेंही अनुमोदन होतें, असें स्पष्ट दिसून येतें. अर्थात् विष्णुस्वामीचें मत बरोबर नव्हतें. रामानुजाचार्यांच्या शिष्यांत व माध्वांत रामानुजाचें आणि मध्वाचें मत रामानंदास व वामनपंडितास याच प्रमाणें संमत नव्हतें. या विषयीं रामानंद व वामनपंडित हे शब्द पहा.

**श्रीनगर**– कश्यपपुर अथवा काश्मीर त्याचें मुख्य शहर.
 २– बदरिकेदार येथील सरकार तें.

**श्रीनाथजी**– मेवाडांतील गोवर्द्धन नाथाची मूर्ति. ही मूर्ति हल्लीं ज्या गांवीं आहे त्यास नाथद्वार म्हणतात. वल्लभमताचे लोक येथें यात्रेस जातात.

**श्रीनिवास**– प्रवरेच्या कांठीं नेवासें म्हणून जें क्षेत्र आहे त्याचें जुनें नांव.(जै०)

**श्रीपतफंदी**– अनंतफंदीचा मुलगा. यास सवाईफंदी असेंही म्हणत.

**श्रीपतरावप्रतिनिधि**– थोरला बाजीराव साहेब पेशवा असतां जो प्रतिनिधि होता तो. हा मनांतून पेशव्यांचा मोठा द्वेष करीत असे. (हिं० छा० इ०).

**श्रीपति**– कोणी साधु होता.

**श्रीपाद**– विद्यातीर्थांचे गुरु.

**श्रीपालरास**– विनयविजयजतीकृत गुजराथी भाषेंत हा ग्रंथ आहे.

**श्रीभूतिराज**– इंदुराज कवीचा बाप.

**श्रीमंत**– पेशव्यांच्या गादीवरील पुरुषांस साधारण प्रतिष्ठा नांव.

**श्रीमती**– विद्यारण्यांची आई.

**श्रीमद्भागवत**– रघुनाथदासकृत गुजराथींत भागवताचें भाषांतर.

**श्रीमान्‌वाणी**– शिलाहारवंशी राजां पैकीं शके ९८२ मध्यें असणारा कोंकणचा राजा. (म. क. इ.)

**श्रीरंगगद्य**– त्रिगद्यांतील दुसरें गद्य.

**श्रीरंगचरित्र**– व्यंकटबोरय्यानें तेलंगींत लिहिलेलें श्रीरंग देवाचें चरित्र तें.

**श्रीरंगपत्तन**– म्हैसूर प्रांतांत म्हैसूर शहराच्या किंचित् उत्तरेस सुमारें १० कोसांवर हें शहर आहे.

**श्रीराम**– विष्णुस्वामीच्या गादीवरील श्रीधराचार्यांच्या पूर्वीचा पुरुष. (द्व० मा०)

**श्रीवत्स**– मंखांच्या ग्रंथाचे परीक्षक ३० पंडित त्यांतील एक. (बु० का० शो०).

**श्रीवरकवि**– फारसी भाषेंतील गोष्टींचा तर्जुमा ज्यास कथाकौतुक असें म्हणतात त्याचा कर्ता. (बु० का० शो०). हा जोनराजाचा शिष्य नसून त्याच्या मागचा आहे.

**श्रीवरपंडित**– जोनराज पंडिताचा शिष्य. व राजतरंगिणी ग्रंथाच्या तिसऱ्या भागाचा कर्ता. सुभाषितावली हाही एक याचा ग्रंथ आहे. (बु० का० शोध०)

**श्रीवर्द्धन**– हा श्रीमंत पेशव्यांचा मूळगांव हा गांव उत्तरकोंकणांत आहे.
 २– हर्षवर्द्धन कवीचा बाप. (बु०)

श्रीविद्यानिकेतन- जैन पंडित. कुमारिल भट्टानें जैनमत मोडण्या साठीं जें प्रथम जैनमत समजून घेतलें तें याज्ञवल्क्य समजून घेतलें, असें जैन ह्मणतात.

श्रीशांतकर्ण- आंध्रभृत्य कृष्णराजाचा पुत्र व पोर्णमासाचा बाप. (राजमा०)

श्रीशैलमल्लिकार्जुन- हें एक क्षेत्र तैलंगणाच्या तोंडींच आहे.

श्री हर्ष- काश्मीरचा राजा. रत्नावलीचा कर्ता. (बु·का·शो·) हा राजा शालिवाहनाच्या ६व्या शतकांत होता.

श्रीहर्षचरित- बाणभट्टकृत संस्कृत भाषेंत.

श्रीहीर- हर्षनामक पंडिताचा बाप.

श्रुतगोपाळ- कबिराचा शिष्य.

श्रुतबोध- कालिदासकृत. (बु०का०शो०).

श्रुतश्रवा- मागध जो मार्जारि राजा त्याचा पुत्र. व अयुतायूचा बाप. (रा·मा·)

श्रुतिकल्पलता- मराठी भाषेंत वामनपंडितकृत.

श्रेयांश- २४ तीर्थकरांतील ११ वा.

श्रौतभाष्यदूषणी- रामानुजाचार्यकृत.

श्लिष्टभूषण- महालक्ष्मीचा उपासक. शंकराचार्यांनीं जिंकला. (आ·शं·)

श्वेतांबर- जैनामध्यें रक्तांबर अथवा दिगंबरमताचे लोकांहून केवळ शुभ्र वस्त्रें वापरणारे जे जती लोक असतात ते.

श्वेतांबरकवि- काव्यालंकार ग्रंथाचा टीकाकार. (बु०का०शो०).

षट्पंचाशति- वराहमिहिरकृत ज्योतिषविषयक ग्रंथ.

षड्दर्शन- २ सांख्य २ न्याय आणि दोन मीमांसा मिळून.

षडभिज्ञ- बुद्धाच्या नांवांतील एक. याचा अर्थ असा आहे. १ दिव्यचक्षु. २ श्रोत्र परिचितज्ञान. ३ पूर्वनिवासानुस्मृति ४ आत्मज्ञान. ५ आकाशगमन ६ कायव्यूहादिसिद्धि.

षड्विधगाणपत्य- महागणपति, हरिद्रागणपति, उच्छिष्टगणपति, नवनीत गणपति स्वर्णगणपति आणि सनानगणपति, यांचे उपासक. (आ·शं·प्र·१५)

षड्विधवैष्णव- भक्त २ भागवत ३ वैष्णव ४ पांचरात्र ५ वैखानस ६ व कर्महीन अशा प्रकारें विष्णूचे सहा उपासक ते. (आ·शं·वि· प्रकरण ६,७,८,९,१०).

षड्विधशैव- शैव २ उग्र ३ जंगम ४ रौद्र ५ भक्त अथवा भट्ट आणि ६ पाशुपत. अशा प्रकारें शिवाचे सहा उपासक ते. (आनंदगिरीचा शं·वि·प्र·४।५)

## स.

**सकलकथासारसंग्रह**– कृष्णदेव रायसूकृत. तेलंगी भाषेंत.

**संकल्पसूर्योदय**– संस्कृत भाषेंत वेदांताचार्यकृत. नाटक.

**संकाश्यानगरी**– अहिसंत्रा नगरानजीक (प्रा. हिं. न.).

**संकेतकुबडी**– दासबोध तात्पर्यदर्शन. हंसराजस्वामीकृत.

**सखाराम बापु**– याचें उपनाव बोकील. अफझूलखानास शिवाजीनें मारिलें.तेव्हां ज्या गोपीनाथ पंतानें शिवाजीचें साह्य केलें त्याचा हा वंशज. हा देशस्थ आश्वलायन ब्राह्मण. उत्कृष्ट शहाणा होता. पुरंदऱ्यांच्या वशिल्यानें हा वाढला असे. (हिंदु० इति०).

**सखाराम बावा केतकर**– हा एक चांगला सत्पुरुष होऊन गेला. नासिक येथें जे भट्टजीमहाराज मोठे नामांकित होऊन गेले त्यांचा हा शिष्य होता असें ह्मणतात. हा जातीचा कोंकणस्थ ब्राह्मण आनगांव कवाड पैयें रहात असे. याचा नित्यनेम असा होता म्हणून सांगतात कीं, प्रातःकालापासून दोन प्रहर पर्यंत स्नानसंध्या करावी व नंतर मधुकरी आणून भोजन करावें.ग्रंथ पाहणें झालेंच तर भागवत अवलोकन करावें. यांची शिष्यमंडळी बरीच आहे. यांचें कुटुंब पूर्वीच फार दिवसांमागें निवर्तलें होतें. व यांस संतति नव्हति. या पुरुषाची समाधि शके ***त भाद्रपद कृष्ण ७ स कवाड येथेंच झाली. वे. शा. संपन्न कै. बा. रामकृष्ण बावा भाटे पुराणिक यांनीं पुढें होऊन समाधीचें काम उत्तम केलें आहे.

**सखाराम बावा डोमगांवकर**– कल्याणगोसावी यांच्या शिष्यपरंपरेंत हा एक मोठा नामांकित पुरुष होऊन गेला. वेदांतपर कीर्तन करून श्रुतियुक्ति प्रतिपाद्य वक्तृत्व करणारा पुरुष या सारिखा अलीकडल्या काळांत मागें झाला नाहीं. व पुढें होणार नाहीं. आह्मी यांचें कीर्तन स्वतः ऐकिलेलें आहे. वारकरी मंडळींत नामांकित कीर्तन करणारे भाऊ काटकर त्यांस जें कीर्तनाचें उत्तम वळण लागलें तें येथूनच लागलें होतें. एवढी याची योग्यता असतांही,खऱ्या खऱ्या सत्पुरुषाच्या ठिकाणीं याची भक्ति अवर्णनीय होती. यास उदाहरण आमचे गुरु प्रख्यात हंसराज स्वामी त्यांची यानें केलेली सेवा होय.याची समाधि शके मध्यें निजामाच्या हैदराबादेस झाली. याचे चिरंजीव दासबावा ते हल्लीं डोमगांव येथें विद्यमान आहेत.

**संगमनेर**– हा गांव अहमदनगर जिल्ह्यांत आहे.

**संगतराजा**– मौर्य (मोरे) वंशीय राजा चंद्रगुप्त याच्या पिढींतील सुयशा राजाचा पुत्र व शालिशूकाचा बाप. (रा. मा.)

**संगराजे**– मौर्यवंशीय शेवटला राजा बृहद्रथ त्याच्या पुष्पमित्रनामक प्रधानानें त्यास मारिलें. व आपण राजा झाला. हा शुंग राजांचा म्हणजे संगराजांचा मूळपुरुष. हे राजे एकंदर १० होते. १ पुष्यमित्र २ अग्निमित्र ३ सुज्येष्ठ ४ वसुमित्र ५ भद्रक ६ पुलिंद ७ घोष ८ वज्रमित्र ९ भागवत आणि १० देवभूति. यानीं राज्य मगधदेशांत ११२ वर्षे केलें. यांच्या राज्यकारकीर्दीचा आरंभ युधिष्टिर शकाच्या १९ शतकांत झाला होता. (रा. मा.).

**संगलदेश**– शाकल्य देश तोच. (प्रा. हिं. न.)

**सगुणध्यान**– समर्थरामदास स्वामीकृत, स्फुटग्रंथापैकीं एक.

**संग्रह**– हा ग्रंथ पाणिनीचें व्याकरण व त्यावरील कात्यायनकृत वार्तिक. यांवर न्यायप्रदर्शन पूर्वक व्याडी जो पाणिनीचा गुरुबंधु त्यानें केलेला आहे. (स.)

**संघमिता**– अशोकराजाची कन्या. हिचा नवरा चांगल्या चालीचा नव्हता म्हणून, त्यानें हिला टाकिलें होतें. नवऱ्यानें हिला सोडल्यावर हिनें जैनधर्माचा उपाध्यायपणा पतकरला. व सिंहलद्वीपांत त्या धर्माची ही पहिली शिक्षक झाली.

**संघमित्रा**– महेंद्र व महानाग या दोघां राजबंधूंची बहीण. बौद्ध धर्मी जी अनुला तिची नणंद. (ग्या. इं.)

**संघातर**– मथुरा शहरचा राजा. याच्या पदरीं सेनेकर वगैरे ४९ पंडित होते. हा राजा शालिवाहन शकापूर्वीं १०० वर्षां मागें होता.

**सचिवघराणें**– शोधांत आहों. अशा कामाची खाशांस हौस असणें महत्वाचें आहे.

**सच्चिदानंद**– ज्ञानेश्वराच्या ज्ञानेश्वरी ग्रंथाचा लेखक. (ज्ञाने. अ. १८) शेवट प.

**सच्चिदानंदस्वामीवर्णन**– मनोहरदासकृत गुजराथी भाषेंत.

**संजय**– कलियुगांतील सूर्यवंशी शाक्यराजाचा बाप. (रा. मा.)

**संजीवनकवि**– हा परंडा येथील राहणारा जातीचा वाजसनी ब्राह्मण होता. यानें हंसपदूतीचीं आठ अष्टकें चिमणकवीनें रचल्यावर तीन अष्टकें पुढें लिहिलीं. व तीं उपाष्टकें अशा नांवानें मूळग्रंथांत दाखल केलीं. हीं उपाष्टकें लिहिण्याचा शक १७७४ आहे. (स्वतःची माहिती.)

**सज्जनकसई**– हिंदुस्थानांत हिंदुजातीचा कसई होऊन गेला. खाटीक गोवधक-

रिनात. तो कसई करीत नाहींत. हाच कसई व खाटीक यांत भेद आहे. यावरू-न खाटीक यवन असतात असें समजावें. भक्तिविजयांत याचें नांव आहे. व त्यावरून हा साधु होता असें दिसतें.

**सज्जनरंजन**– याचें मूळचें नांव गोविंद गोसावी. हा इंदापूरचा राहणारा असे. याचा जन्मशक १६९८ व मरणशक १७२६ याचीं पदें या नांवानेंच पुष्कळ प्रसिद्ध आहेत. ( ब्र. मा. ) यानें चांगल्या चांगल्या लोकांचीं मनें रंजवावीं म्हणून यास हें नांव पडलें असें म्हणतात.

**संतचरित्र**– प्रियादासकृत संस्कृत भाषेंत. याचा उतारा कांहीं नवे संत आंत घालून नाभाजीनें केला.

**संतबापवार**– भक्तविजयांत वर्णिलेला साधु.

**संतमालिका**– देवीदासकृत.

**सतलजनदी**– पंजाबांत ज्या पांच नद्या आहेत. त्यांतील शतद्रू नदीस हल्लीं हें नांव चालतें.

**संतलीलामृत**– महीपतिबावाकृत मराठी भाषेंत ओंवीबद्ध. यांत फक्त रामदास स्वामीचेंच वर्णन आहे.

**संतविजय**– भक्तविजयांत जीं चरित्रें आलीं नाहींत, तीं महिपति बावांनीं यांत वर्णिलीं आहेत.

**सतसय्या**– सातशें दोहऱ्यांचा ग्रंथ. यांत कृष्णलीला वर्णिली आहे. हा ग्रंथ ब्रजभाषेंत व गुजराथींत असा दोन प्रकारचा आहे. यांत पहिल्याचा कर्त्ता बिहारीलाल व दुसऱ्याचा दयाराम होय.

**संतानगणपति**– गाणपत्यांत एका मताचें नांव. शंकराचार्यांनीं याचें खंडन केलेलें आहे. ( आनं॰ शंकर॰ ) पहा.

**सती**– शिवगुरूची बायको. व दुसऱ्या प्रसिद्ध शंकराचार्यांची आई.

**सतीगीता**– गुजराथींत मुक्तानंदकृत.

**सतीदेवी**– नागोजी भट्टाची आई.

**सत्यजित**– मागध राजा सुनीथ त्याचा पुत्र. व विश्वजिताचा बाप.

**सन्नंजीनदी**– सतलज नदीसच पोंवाड्यांतून नांव आढळतें.

**सदाचार**– हें सुमारें साठ श्लोकांचें एक स्तोत्र आहे. भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्य त्यांनीं हें केलेलें आहे. याच्यावर मराठी ओंवीबद्ध टीका आहे. बती हंसराज स्वामींनीं लिहिली आहे. या ओंव्याचीं संख्या २०६३ आहे. म्हणजे २१ शें पूर्ण होण्यास ३७ ओंव्या उणया आहेत.

**सदाचारचंद्रोदय**– धर्मशास्त्र विषयावरील महेशककृत संस्कृतग्रंथ.

**सदानंद**– तिसऱ्या शंकरविजयाचा कर्ता. शोध करून कांहीं एक लिहिणें त्या विषयीं हा अगदीं दुर्बल होता.

**सदानंदसरस्वती**– गंगाधर सरस्वतीचा शिष्य.

**सदाशिव काशीनाथ छत्रे**– यांस बापू छत्रे असेंही लोक म्हणत. यांची जन्मभूमि वाळुकेश्वर नजीक मुंबई हा गांव होता. यांचें जन्म शके १७१० मध्यें झालें होतें. व हे मरण पावले त्या वेळेस यांचें वय ४२ वर्षांचें होतें.

मुंबई इलाख्यांत प्रथमतः शाळा स्थापन करणें व त्या शाळा चालविणारे पंतोजी तयार करणें हें काम इंग्लिश सरकारांतून सुरू करतानां मि॰ कर्नल कौपर व मि॰ जर्वीस साहेब यांस मदत देणारा हाच गृहस्थ होता. व मुंबईंत ज्या कित्येक टौनहाला सारख्या जुन्या इमारती आहेत त्या सर्व मराठी व इंजिनियरांनीं याच गृहस्थांच्या मदतीनें व विचारानें बांधल्या.

यांस इंग्रजी भाषा जी येत होती व तिच्या योगानें जी विद्वत्ता यांच्या अंगीं होती ती आतांच्या सक्तीन हात किताबवाल्यांच्या बरोबरीची जरी नव्हती. तरी तेवढीवर जे जे ग्रंथ यांनीं लिहिले ते इतके उत्कृष्ट उतरले कीं, किताबवाल्यांच्या हातून अजून एकही ग्रंथ तसा झाला नाहीं किंवा नसेल. आणि कदाचित् झालाच असला तर त्या प्रमाणें उत्तमही उतरला नसेल. यांनीं जे ग्रंथ इंग्रजींतून मराठींत उतरले ते मुख्य बाळमित्र, इसपनीति, आणि वेताळपंचविशी येणें प्रमाणें होत. रा॰ ब॰ दादोबा पांडुरंग यांनीं यांस आपल्या मोठ्या व्याकरणाच्या प्रस्तावनेंत मराठी भाषेंतील गद्यात्मक ग्रंथाचे जनक अशी पदवि दिली आहे तिचें कारण तरी हेंच होय.

यांनीं केलेली कांहीं कविताही आहे. परंतु ती आह्मांस सांपडली नाहीं. असु. यांस पगार दरमहा रुपये ३०० पर्यंत वाढला होता. व हे मुंबई सोसैटीचे सेक्रेटरी होते. हल्लीं यांचे चिरंजीव वीरेश्वर सदाशिव छत्रे बडोदें येथें आहेत. व परंपरा पुतणे रा॰ ब॰ प्रो॰ केरोलक्ष्मण छत्रे पुणें येथें आहेत. ते तर सर्वांस महशूर आहेतच. (इं॰ मा॰) [ वर आहे.

**सदाशिवपंडित**–गूढदीपिनी नामक ग्रंथाचा कर्ता. हा संस्कृत असून वैद्यका-

**सदाशिवपंत**– उद्धवगोसाव्याचा बाप.

सदाशिवराव भाऊ- थोरल्या बाजीराव साहेबांचा धाकटा भाऊ चिमणाजी बल्लाळ त्याचा हा मुलगा होता. याला दिवाणगिरीच्या कामाचें चातुर्य उत्तम होतें. परंतु लढाईच्या कामांत हा अगदीं गैरवाकब होता. पानपतच्या लढाईच्या वेळेस होळकरासारख्या अनुभवशीर सरदारांचें बोलणें यानें न ऐकिल्यामुळें मराठी राज्यास जो धक्का बसला तो केवळ याच्या एककल्लीपणानेंच बसला. व पेशव्याचा थोरला मुलगा त्यांत मेला जाऊन सरशेवटीं हा आपणही मरण पावला.

संदीलपरगणा- उत्तरहिंदुस्थानांत आहे. अकबर बादशाहाकडून येथील वसूलाच्या कामावर सूरदास नांवाचा एक ब्राह्मण होता.

सद्बोध- एक ब्राह्मण. हा गोरक्षनाथाचा बाप होय.

सद्वृत्ति- गोरक्षनाथाची आई.

संधेशार- गुजराथेंतील एक गांव.

सनत्सुजातभाष्य- हें प्रकरण महाभारतांतील आहे. व याच्यावर श्रीमच्छंकराचार्यांचें भाष्य आहे.

सनंदनाचार्य- भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्यांच्या शिष्यांतील एक.

सन्नियुधकाव्य- लिंगकविकृत तेलंगी भाषेंत.

सन्मणिमाला- मोरोपंतकृत आर्याबद्ध मराठींत.

सन्यासनिर्णय- वल्लभाचार्यकृत.

सप्तर्षिमान- पूर्वीं पृथिवीवर सप्तर्षि येऊन राहात असत. व पुनः जात पुनः येत असें वारंवार करीत. तें बंद झालें त्या विषयीं असें आढळतें. "कलेर्गतैः सायक नेत्र वर्षैः सप्तर्षिवर्यास्त्रिदिवं प्रयाताः॥ लोकेहि सांवत्सर पत्रिकायां सप्तर्षिमानं प्रवदंति संतः॥" अर्थ- कलियुगाचीं २५ वर्षें गेलीं असतां, सप्तर्षि अदृश्य झाले. तेव्हां पासून पंचांगामध्यें यास सप्तर्षींचें मान असें म्हटलें आहे. याची प्रवृत्ति काश्मिराकडे आहे.

सप्तशती- गोवर्धनाचार्यकृत. ही देवीची सप्तशती असें कोणी समजूं नये.

सप्तशतीआर्या- मोरोपंतकृत मराठींत.

सप्तशृंग- नासिका पासून सुमारें १५ कोसांवर डोंगर आहे तो. येथें देवीचें स्थान आहे.

सप्तसमासी- समर्थरामदास कृत स्फुट ग्रंथांतील एक.

सप्तक्षेत्र- महाबलीपुराचें दुसरें नांव.

**संप्रदायप्रदीप**– गिरिधर कविकृत संस्कृत ग्रंथ. यांत विष्णुस्वामि, रामानुज, मध्व आणि वल्लभाचार्य यांचीं चरित्रें व संप्रदाय प्रवृत्ति यांचें वर्णन आहे. परंतु आनंदगिरीनें जशी श्रीमच्छंकराचार्यांची गुरुपरंपरा श्री आदिनारायणापासून व्यास, शुकाचार्य, गौडपादाचार्य व गोविंदपादाचार्यांपर्यंत दाखवून शंकराचार्यांचें मत परंपरा शुद्ध असल्याचें स्पष्टीकरण केलें आहे. तसें या ग्रंथांत कर्त्यानें केलें नाहीं. म्हणून वरील आचार्यांचीं मतें कल्पित होत. असें स्पष्ट दिसून येतें.

**संभव**– चोवीस तीर्थंकरांतील तिसरा.

**समंतभद्र**– बौद्धाच्या कित्येक नांवांतील हें एक नांव. ( अमरकोशांतील बुद्धानीं नांवें पहा. )

**समन्यप्रदीप**– दत्तो पाध्यायकृत धर्मशास्त्र विषयावरील ग्रंथ.

**समयमयूख**– नीलकंठकृत धर्मशास्त्र विषयक ग्रंथ.

**समयमातृका**– क्षेमेंद्रकृत ग्रंथ.

**समयविलोक**– जैनमताचा ग्रंथ.

**समयसुंदर**– हा जती परंतु कोठें व कधीं होता तें कळत नाहीं. आणि ग्रंथही आढळत नाहीं. परंतु कवि होता येवढें खरें आहे. (का. दो.)

**समरवीर**– हा बौद्धधर्मी एक राजा होता. (ग्यारे.)

**समशेरबहादूर**– थोरल्या बाजीराव साहेबांस मस्तानीपासून झालेला मुलगा. हा मोगाभूर व पानपतच्या लढाईंत असून तींत पडला, असें म्हणतात. उत्तरहिंदुस्थानांत बांडे येथील नबाबांचा मूळपुरुष हाच होय. (हिं. इ.)

**समास**– हा ग्रंथ मराठींत ओंवीबद्ध ज्ञानेश्वराचा आहे.

**समित्पाणि**– श्रीमच्छंकराचार्यांचा सन्यासी शिष्य. (आ॰ शं॰).

**सयामदेश**– हिंदुस्थानाची पूर्व.

**संयोगी**– बैराग्यांत जे दोन पंथ आहेत त्यांतील हा एक.

**सरणी**– अद्वैतसरणी ग्रंथ तोच.

**सरला**– सिद्धांत कौमुदीवरील व्याख्या. ही तारानाथ तर्कवाचस्पति यांनीं केली आहे.

**सरसवाणी**– मंडनमिश्राची विद्वान् स्त्री. मंडनमिश्र पराजित झाल्यावर हिशी श्रीमच्छंकराचार्यांचा वाद झाला. त्यांत याज्ञवल्क्यानें पूर्वीं जसें गार्गीस जिंकलें त्याच प्रमाणें आचार्यांनीं हिलाही जिंकलें. ( आनं॰ शं॰ प्र॰ ५७)

**सरस्वती**– सरस वाणीसच नांव.

**सरस्वतीकथाभरण**– साहित्य शास्त्रावरील ग्रंथ. याचे अध्याय पांच आहेत. याचा कर्त्ता आढळला नाहीं. परंतु यावर रत्नमहेश्वरोपाध्यायांची टीका आहे. असें ऐकण्यांत येतें.

**सरस्वतीगंगाधर**– गंगाधर सरस्वती तोच.

**सरस्वतीनदी**– हिमालयांतून निघून पश्चिमसमुद्रास मिळाली आहे. हिच्या तीरच्या प्रदेशास सारस्वत देश असें ह्मणतात.

**सरस्वतीविलास**– गजपति प्रतापरुद्र राजानें स्वतः संस्कृतांत केलेला ग्रंथ.

**सर्वदर्शनसंग्रह**– सायण माधवाचार्य कृत संस्कृत भाषेंत. या मध्यें भरत खंडांत जेवढीं मतें म्हणून त्यांच्या वेळे पर्यंत चालत होतीं तितक्यांचें वर्णन चार्वाक मतापासून आरंभ करून तें शेवटीं पातंजल दर्शन सांख्यपाची समाप्ति केली आहे. शांकर दर्शन मात्र न सांगतां अखेरीस असें लिहिलें आहे कीं, –"इतःपरं सर्व दर्शन शिरोमणि भूतं शांकर दर्शन मन्यत्र लिखितमित्यत्रोपेक्षित मिति" म्हणजे जेवढीं मतें यांत सांगितलीं आहेत त्या सर्वांचें मुकुटमणि जें शांकरदर्शन तें अन्यत्र (निराळें) लिहिलें असल्यामुळें येथें सांगणें सोडलें आहे.

**सर्वदेवसूरि**– प्रमाणमंजरि ग्रंथाचा कर्त्ता. (बु० का० शोध.)

**सर्ववर्मा**– कातंत्र व्याकरणाचा कर्त्ता. (बु.का.शो.).

**सर्वसारउपदेश**– हिंदुस्थानी भाषेंत अनाथजीकृत.

**सर्वसेन**– संस्कृत हरिविजय काव्याचा कर्त्ता. (बु. का. शो.)

**सर्वज्ञ**– अमरकोशांत जीं बुद्धाचीं नांवें लिहिलीं आहेत त्यांत "सर्वज्ञः सुगतो बुद्धो" इत्यादि नांवें तीं. यांत पहिलें जें नांव आहे तें ऋषभ देवाचें असें बौद्ध व जैन ह्मणतात. आणि तो बुद्ध म्हणजे ज्यानें सर्व कांहीं जाणिलें असा होता असें मानितात.

२– पहिल्या शंकराचार्यांचा आजा. म्हणजे आईचा बाप. (आनं० शं० प्र. २).

**सर्वज्ञशिंगमीनडू**– तैलंगणांतील शालिवाहनाच्या १३ वे शतकांतील राजा. (क.)

**सर्वज्ञातमुनि**– दुसऱ्या शंकराचार्यांनीं केलेला संक्षेप शारीरक ग्रंथ त्याचा टीकाकार. (वृद्धमाहिती.)

**सर्वार्थलक्षणा**– संस्कृत लिंगानुशासनावर टीका. त्यांत एक शबरस्वामीनी व

दुसरी हर्षवर्द्धनाची आहे. (बु. का. शो.)

**सर्वार्थसिद्ध**— दुसऱ्या बुद्धाच्या नांवांतील अमरकोशांत असलेलें एक " सशाक्यसिंहः सर्वार्थसिद्धः शौद्धोदनिश्चसः"

**संवत्सरग्राम**— सासवड असें ज्या गांवास ह्मणतात त्याचें मूळचें नांव.

**संवर्त्तविजय**— आंध्रकालिदासकृत तेलंगी भाषेंतील ग्रंथ. असें कविचरित्रकार ह्मणतात.

**सवाईफंदी**— श्रीपत फंदीसच कित्येक लोक सन्मानार्थ ह्मणत.

**संशयरत्नमाला**— मोरोपंतकृत आर्या आहेत.

**सशिव**— सोमशंभूचा गुरु.

**संस्कारप्रतापनारसिंह**— रुद्रदेवकृत. यांत धर्मशास्त्राचा विषय असून आश्वलायन व आपस्तंब या दोन शाखांचें याज्ञिकही आहे.

**संस्काररत्नमाला**— गोपीनाथ दीक्षित ओक यांनीं केलेला संस्कृत ग्रंथ. हा १६९५ मध्यें झाला होता.

**सहजानंदस्वामी**— स्वामीनारायण तोच. हा मूळचा अयोध्येकडील राहणारा होता. हा सामान्य सन्यासी होता असें सांगतात. यानें गुजराथेंत येऊन "वर्तमानधर्म" या नांवाचें मत लोकांस शिकवून पुष्कळ लोकांस आपल्या मतांत ओढिलें. या मताचें नांव स्वामिनारायणपंथ असें जरी चालत आहे तरी यास उद्धव संप्रदाय ह्मणतात. व वल्लभसंप्रदायास यानें बराच अडथळा आणिला आहे. हा पंथ विक्रमसंवत् १८३० म्हणजे शके १६९५ मध्यें सुरू झाला. अर्थात् हें मत निघाल्यास आज शके १८०२त १०७ वर्षें झालीं आहेत. दयानंद स्वामीस आर्य समाज स्थापन करण्याची हुक्की येण्यास हेंच मूळ होय. अशी लोकवार्ता असल्याची ऐकिवांत येते.

**सहदेव**— कलियुगांतील सूर्यवंशी दिवाकर राजाचा पुत्र. व भानुमानाचा बाप. (रा. मा.).

२— शूद्रजातींत अडाखेदार असा हा एक उत्तम ज्योतिषी होऊन गेला. याच्या विषयींची दंतकथा अशी सांगतात कीं, कोणी मोठा ज्योतिषी ब्राह्मण आपल्यास उत्कृष्ट ज्योतिषविद्या निपुण पुत्र व्हावा म्हणून योग पहात असतां, त्यास तसा योग सांपडला. परंतु तो बराच अवधीचा होता. ह्मणून जरी ब्राह्मणास त्याचें पक्कें स्मरण होतें तरी एकदां तो कांहीं कामा-

निमित्त परगांवीं गेल्यानें त्यास त्याची विस्मृति झाली; पुढें परगांवीं असतां त्यास एकाएकीं स्मरण झालें कीं, तो योग उदयीक आहे. ह्मणून त्यानें काम होतें तें तसेंच ठेविलें. व अस्तमानीं गांवास पोंचूं अशा बेतानें तो पांहांटेस निघाला. परंतु मार्गांत त्यास त्यादिवशीं इतका पाऊस लागला कीं, तो जेमतेम गांवाजवळ नदी होती तेथपर्यंत आला. आणि पाहतो तर नदी पूं करीत पात्र मर्यादा सोडून वाहात आहे. तेव्हां आतां काय करावें अशी यास चिंता पडली. परंतु नदी भरल्यामुळें त्याचा कांहीं उपाय चालेना, म्हणून तो त्याच खेड्यांत शूद्र जातीच्या दोघी सासवा सुना राहात होत्या. त्यांच्या झोंपडींत पहिल्या ओव्हरीवर जाऊन उतरला. या गोष्टीस प्रहर रात्र लोटली. ब्राह्मणास स्वस्थ झोंप येईना. व वारंवार उसासे टाकून इतकेंच म्हणे कीं, मर्जी ईश्वराची. या प्रमाणें तो दोन तीन वेळा बोलला तें घरच्या वृद्ध म्हातारीनें ऐकिलें. म्हणून ती त्याजवळ येऊन पुसूं लागली. जोशीबावा तुह्मी चांगले सज्ञ असून आज असे वरळतां त्याचें कारण काय? त्यानें उत्तर केलें तें माझें मीच जाणें. तथापि आज असा असा योग असून लगबग करून निघालों असतांही, अखेर घर माझ्या हातीं आलें नाहीं म्हणून खेद वाटतो. म्हातारी ह्मणाली असें असेल तर व इच्छेस येईल तर ही कृपा माझ्या सुनेवर कां करातां? तिला सेवेस हजर करत्यें. वस्तुतः तुमचें कुटुंब तर आज तुम्हांस अंतरलेंच आहे. तेव्हां ब्राह्मणानें क्षणभर विचार करून बरें म्हटलें. तोच त्या शूद्र स्त्रीस गर्भ राहून झालेला हा पुत्र होय. याचा असण्याचा काळ मात्र समजत नाहीं.

यास जन्मापासून ज्योतिष विद्या इतकी स्फुरद्रूप झाली होती म्हणून सांगतात कीं, यानें जें जें सहज बोलावें तें तें अनुभवासच यावें. व ज्योतिष शास्त्रासही मिळावें. याचें उपनांव भाडळें होतें, असें ऐकिवांत येतें. व हा नोंगलाईंत राहात असे. त्या मुळें याची काहीं कविता मराठींत व कांहीं हिंदुस्थानींत अशी आहे. भाडळे उपनांवाच्या संबंधानें आपल्या आईशीं बोलतानां कित्येक प्रसंगीं याणें जरी तिला भाडळी म्हटलें आहे तरी तें तिचें नांवच होतें असें समजूं नये. (नृ॰ मा॰) याच्या भडारयाचीं खालीं एक दोन उदाहरणें दिलीं आहेत तीं पहावीं.

॥ पूर्वेस रोहिणी संभाळ मित्रा उत्तरेस हस्त दक्षिणेस चित्रा ॥

पश्चिमेस श्रवण करिशी गमन सहदेव बोले निश्चयें मरण॥ १॥

अर्थ- पूर्वेस, पश्चिमेस, उत्तरेस व दक्षिणेस गमन करणें असतां रोहिणी, श्रवण हस्त आणि चित्रा या नक्षत्रांवर कधींही गमन करूं नये. केल्यास मरणयेईल.

बीजका नक्षत्र पुनम अमावास॥ भलन्नन गहुकरे चंद्रसूरजग्रास१

अर्थ- मागील महिन्यांतील वद्य द्वितीयेचें नक्षत्र पौर्णिमेच्या दिवशीं आणि चालू महिन्यांतील शुक्ल द्वितीयेचें नक्षत्र अमावास्येचे दिवशीं या प्रमाणें येईल. तर क्रमानेंच चंद्रसूर्य ग्रहण होईल.

तेरा अंगुलकी लीजे काडी॥ एक अंगुल गाडके करना खडी॥ रवीके अठरा सोमके बीस॥ मंगल सोला बुध चौदा खास॥ गुरु बर्ज्य करके धीरा॥ शुक्र शनिश्चर बाराही बारा॥ यही मुहूर्त सहदेव बानी॥ तोड लंका सीता घर आनी॥

अर्थ- तेरा अंगुलें लांबीची एक काडी घेऊन ती एक अंगुल भूमींत पुरून उभी करावी. नंतर तिची सावली पहावी. आणि रविवारीं अठरा, सोमवारीं बीस, मंगळवारीं सोळा, बुधवारीं चौदा, शुक्र शनिवारीं बरोबर बारा. याप्रमाणें ज्या वेळेस सावली असेल तो विजय मुहूर्त समजून बेलाशक कार्यास जावें. काम फत्ते होईलच. रामानें लंका जिंकून सीता आणिली ती मुहूर्त हा होय. या कामास गुरुवार बर्ज्य समजावा.

नऊ चोवीस एकादशी॥ कशास पाहिजे येथें जोशी॥

मुसलमानी चंद्र अथवा तारीख नववी व चोविसावीस एकादशी खासयेते. येथें जोशी नको.

सहरामपुर- कुरुजांगल देशांतील हिमालयामधलें शहर. (प्रा० हिंदु० नकाशा).

सहस्रानीक- युधिष्ठिर वंशीय शतानीक राजाचा पुत्र. व अश्वमेधकाचा बाप.(स०)

सह्याद्रि- तापी नदी पासून कन्याकुमारी पर्यंत दक्षिणोत्तर आहे तो.

संक्षेपजिनविजय- कल्याण कीर्तिकृत संस्कृत भाषेंतील ग्रंथ.

संक्षेपशारीरक- शारीरक भाष्याचा संक्षेप. हा विद्याशंकर भारती नांवाच्या शंकराचार्यांनीं लिहिला. याच्यावर सर्वज्ञात मुनीची टीका आहे.

साकल्यमाला- अनागोंदीचा राजा हरिहरराय त्याचा न्यायाधीश. हा शालिवाहनाच्या १३व्या शतकांत होता. यानें गजेंद्रविजयचंपु संस्कृतांत लिहिला.

सांकळेश्वर- गुजराथेंत कडी म्हणून गांव आहे तेथला हा जोशी. संवत् १८०६

मध्यें होता. यानें देवीवर्णनावर कांहीं कविता केलेली आहे. (का० दा० गु०).

**साकारसिद्धि**– गर्गश्रीकांतमिश्रकृत संस्कृत ग्रंथ. यांत भगवान् साकार मानिला आहे. व तो आकार नित्य असें कल्पिलें आहे. हा ग्रंथ विष्णुस्वामीच्या मताचा आहे.

**साकेतनगर**– अयोध्यानगर.

**सांख्य**– सांख्यशास्त्राचे दोन भेद आहेत. म्हणजे एक निरीश्वर सांख्य आणि दुसरें सेश्वर सांख्य. – सांख्या निरीश्वराः केचित् केचिदीश्वर देवताः – जे प्रकृतीस प्रधान मानितात ते निरीश्वरसांख्य. आणि ईश्वरास मानणारे ते सेश्वर सांख्य, तेच पातंजल होत. सांख्य मताविषयीं व्यासांनीं असें म्हटलें आहे. "शुद्धात्म तत्त्वविज्ञानं सांख्यमित्यभिधीयते॥" या वचनाचा आधार धरून शंकराचार्यांनीं लिहिलें आहे तें असें:– हें सांख्यशास्त्र साह्य आस्तिकांतलें आहे.

"सांख्यंनाम इमेसत्व रजस्तमांसि गुणामम दृश्या॥ अहंतेभ्यो ः

न्यस्तद्व्यापार साक्षिभूतो नित्योगुण विलक्षण आत्मेतिचिंतनं"

**सांख्यचंद्रिका**– नारायण तीर्थकृत संस्कृत भाषेंत. (बु० का० शो०)

**सांख्यसार**– विज्ञानभिक्षुकृत. याचें इंग्रजींत भाषांतर मि० हॉल साहेबानीं केलेंआहे.

**सांगली**– हें शहर पटवर्धनांच्या ताब्यांत आहे.

**सातपुडाडोंगर**– याचा आरंभ खानदेशाच्या उत्तरभागापासून झाला आहे, तो तहत खरगुणवतिशी पोटांत घेऊन इंदुरापर्यंत आहे.

**सातारा राजघराणें**– या घराण्याचा मूळपुरुष महाप्रतापी शिवाजी राजा होता. याचें जन्म शके १५४९ मध्यें झालें होतें. शके १५९६ मध्यें याला राज्याभिषेक झाला. यानें राज्य ६ वर्षें केलें व शके १६०२ मध्यें हा मरण पावला. याला संभाजी व राजाराम असे दोन पुत्र होते. त्यांत वडील संभाजी तो याच्यामागें राज्याधिकारी झाला. त्यानें राज्य नऊ वर्षें केलें. व शेवटीं औरंगजेबाच्या हातून मरण पावला. याला शाहु नांवाचा पुत्र होता. परंतु औरंगजेबानें त्यास धरून नेल्यामुळें राजाराम तो राज्य करूं लागला. हा राजाराम १० वर्षें राज्य करून शके १६२९ मध्यें मरण पावला असतां त्यास ताराबाई व राजसबाई या दोघी स्त्रियांपासून शिवाजी व संभाजी असे दोन पुत्र असलेले त्यांतील शिवाजी राज्याधिकारी झाला. परंतु शाहूची सुटका दिल्लींतून त्याच सालीं होऊन तो साताऱ्यास आल्यामुळें ताराबाई शिवाजीस घेऊन कोलापुरास गेली.

व तेथें तिनें स्वतंत्र राज्य स्थापिलें.

शाहू राजा दिल्लीहून शके १६३० मध्यें आला. तेथून त्यानें ४२ वर्षें राज्य केलें. याच्या मागें रामराजा गादीचा अधिकारी झाला. परंतु तो मानाचा मात्र राजा होता. कारण शाहूच्या आज्ञेवरून सर्व राज्य पेशव्यांचे वहिवाटीत होते. यानें राज्य २९ वर्षें केलें व शके १६९९ मध्यें मरण पावला. याच्या मागें दुसरा शाहू गादीवर बसला. हा शके १७३० पर्यंत राज्य ३१ वर्षें करून मरण पावला असतां याचा वडील मुलगा प्रतापसिंह (बुबासाहेब) तो गादीचा अधिकारी झाला. परंतु तो आपल्या राज्यकारकीर्दीच्या ३१ व्या वर्षी खोट्या आरोपानें इंग्लिशांकडून पदच्युत झाल्यामुळें याचा धाकटा भाऊ शाहाजी तो गादीवर बसला. व ९ वर्षें राज्य करून शके १७७० मध्यें निपुत्रिक मरण पावल्यामुळें इंग्लिशांनीं तें राज्य खालसा केलें. (हिंदु० इति०).

**साताराशहर**– हें शहर पुण्याच्या दक्षिणेस सुमारें ३० कोसांवर आहे. शिवाजी महाराज छत्रपति त्यांच्या मागून हें मराठी राज्याची राजधानी झालें. हल्लीं हें खालसा आहे.

**सात्विकब्रह्मविद्याविलास**– तातार्चार्य वैष्णवकृत. द्वैतमतपर. (ज० स्वा० श० प०

**सात्विकराजा**– जगन्नाथ क्षेत्रींचा राजा. हा जयदेव स्वामीच्या वेळेस तेथें होता.

**साबरमतीनदी**– ही अमदाबादे जवळून वाहात आहे.

**सामळभट्ट**– अमदाबादे जवळ गोमतीपूर गांवचा राहणारा जातीचा गौडमाळवी ब्राह्मण होता. हा संवत् १७८१ मध्यें असल्याचा पत्ता लागतो. यानें सिंहासन बत्तिशी, वेताळपंचविशी, शुकबाहात्तरी, नंदबत्तिशी रेवाखंड याचीं गुजराथींत भाषांतरें केलीं. रणछोड देवावर कित्येक श्लोक व शिवपुराण हेंही लिहिलें. (का० गु०).

**सायणाचार्य**– हा विद्वान् पुरुष माधवाचार्य (विद्यारण्य) त्यांचा वडील भाऊ. विद्यारण्यांनीं जें वेदभाष्य लिहिलें त्यावर त्यांनीं याच्या प्रीतीस्तव याचें नांव घातलें. कांहीं ठिकाणीं तर आधीं याचें नांव लिहून मागून आपलें नांव लिहिलें आहे. जसें–" सायणमाधव."

**सारंगदेव**– अजमीरच्या विसलदेव राजाचा पुत्र. याचें एकदां माथें फिरून हा जैन धर्मांत शिरला होता. परंतु बापानें यास पुनः वैदिक धर्मांत आणिलें.

**सारप्रदीपक**– जगन्नाथकृत संस्कृत व्याकरणावरील ग्रंथ.

**सारसिद्धि**– निष्कुळानंदकृत गुजराथींत.

**सारस्वत देश**– सरस्वती नदीच्या तीरचा प्रदेश.

**सारस्वतव्याकरण**– सरस्वतीनें स्वतः रचून अनुभूतिस्वरूपाचार्यास दिलें तें.

**सालंकरणी**– आंध्रभृत्य राजांतील लंबोदर राजा तोच.

**सालूतिमण्णा**– हा एक राजपुत्र होता, इतकेंच आढळतें. नंदाल अपय्या असें ही यास ह्मणत; परंतु हा होता कधीं व याचें विशेष वृत्त काय त्याचा ठिकाण नाहीं. (क०च०).

**सावजी**– तुकाराम साधूचा वडील भाऊ. हा मोठा विरक्त होता. व एकदां तीर्थयात्रेस जो गेला तो गेलाच. (तुका० गाथा०). (भवि·अ·१६)

**सांवतामाळी**– हा पंढरपूरचाच राहणारा मोठा भगवद्भक्त होऊन गेला. (भ०

**सावथी**– श्रावस्ती नगरी तीच.

**सांवळीगोठडा**– बडोदेशाहींतील एक गांव.

**सासवड**– यास पूर्वी संवत्सर गांव म्हणत असत. हा गांव पुरंदर किल्ल्याच्या पायथ्याशीं आहे. येथें पेशव्यांचा वाडा असल्या मुळें बहुतेक ब्राम्हण सरदारांचेही वाडे आहेत. सोपानदेवाची समाधि येथेंच आहे.

**साहसांकचंपु**– श्रीहर्षकृत.

**साहस्रगांव**– मगध देशांत पुनंपुना नदीच्या तीरीं गयेपासून अगदीं जवळ हा गांव आहे. पहिल्या बुद्धाचें जन्म येथें झालें. (जैनग्रंथ.)

**साहिणीमारा**– अन्नावे मारेड्डीच्या पंडितांतील प्रमुख पंडित. शालिवाहन श०१३

**साहित्यशास्त्र**– हेमचंद्र पंडित कृत.

**साहेबराम**– तीर्थसंग्रह ग्रंथाचा कर्ता. (बु· का· शो·)

**साळोजीमळोजी**– हे उभयतां बंधु जातीचे शूद्र परंतु मोठे भगवद्भक्त होते. तुकाराम अद्वैत चांगलें समजत नव्हता तें नव्हताच. पण वरती त्याची निंदा करी. तें या दोघां भावांस अगदीं खपेना. तथापि यानीं तुकाराम आपल्या जातीचा कुणबी असून शांकरमतांत आंधळा आहेसा जाणून व लोकांनींत्यास तसें ह्मणूं नये ह्मणून रचेनें ज्ञानपर कित्येक अभंग त्याचे नांवानें प्रगट केले. ही गोष्ट तुकारामास कळल्यावर तिजमधील बीज न समजतां त्यानें हा एक अभंग धडकावलाच. "साळोमळो हरिचे दास॥ यानीं अवघा केला नास.॥" परंतु हीच गोष्ट तुकारामाच्या ध्यानांत पुढें आली. व त्यास प-

श्रात्यांपेही आला. म्हणून यांपाशीं अपराधाची क्षमा मागावी, असें त्याच्या मनां-त आलें. पण ते आधींच समाधिस्थ झाले होते. (द्व·मा·)

**साळ्यारसाळ–** हा यजुर्वेदी ब्राह्मण पंढरपुरासच राहात असे. हा चांगला विद्वान् व विठोबाचा परम भक्त असे. शके १६६० मध्यें याच्या असण्याचा काळ आढळतो. मराठींत ओंवीबद्ध रसाळ रामायण आहे तें याचेच आहे. (क·)

**सिंगय्या–** पीटय्या कवीचा बाप.

**सिताल–** २४ तीर्थकरांतील १० वा. (तीर्थकर) श·प·

**सिंधहैदराबाद–** सिंधप्रांतांतील शहर. दक्षिण हैदराबादेहून हें निराळें आहे.

**सिंधुदेश–** सिंधुनदीच्या तीरचा देश.

**सिंधुनदी–** हिमालयांतून ही नदी निघून हिंदुस्थानाच्या वायव्य प्रांतांतून वाहात गेली आहे. व पुढें बरीच दक्षिणेकडे जाऊन पश्चिमसमुद्रास मिळाली आ·

**सिंधुलराजा–** धार येथील भोजराजाचा बाप.

**सिंधुसौवीर–** सौवीर देशासच हें नांव आहे. (प्रा·ऐ·को·पहा·)

**सिप्दू–** राजतरंगिणी ग्रंथांत कल्हणानें याचें नांव लिहिलें आहे. व त्यांत त्यानें असें म्हटलें आहे कीं, यानें एका दक्षिणेंतील महा विद्वान् पंडितास इसवी सना पूर्वी २२० वर्षामागें वादांत जिंकिलें. (बु·का·शो·). .

**सिद्धटेक–** अष्टविनायकांतील एक स्थान. हें भीमेच्या कांठीं आहे. हरिपंततात्या फडके येथें वारले. (द्व·मा·)

**सिद्धराजा–** गुजराथेंतील जयसिंह राजा तोच.

**सिद्धराम–** चन्नबसवानें सांगितलेलें भविष्य भक्तिभावानें ऐकणारा.

**सिद्धांत–** रामानुजाचार्यकृत संस्कृत ग्रंथ.

**सिद्धांतकौमुदी–** संस्कृत व्याकरणावर भट्टोजीदीक्षित कृत ग्रंथ.

**सिद्धांतकौमुदीव्याख्या–** भट्टोजी कृतच.

**सिद्धांतचंद्रोदय–** संस्कृत व्याकरणावर कृष्णधूर्जटीकृत.

**सिद्धांतबिंदु–** मधुसूदन सरस्वतीकृत.

**सिद्धांतबोध–** शाहामुनिकृत ५० अध्यायांचा मराठी ओंवीबद्ध ग्रंथ. हा शांकरमता-[चा आहे.

**सिद्धांतमुक्तावली–** वल्लभाचार्यकृत संस्कृत भाषेंत.

**सिद्धांतरहस्य–** वरप्रमाणें.

**सिद्धांतलेश–** शांकर वेदांतपर अपय्यादीक्षित कृत, संस्कृत भाषेंत आहे तो ग्रंथ

**सिद्धांतशिरोमणि**– भास्कराचार्यकृत ज्योतिषविषयावर ४ अध्यायांचा संस्कृतग्रं.

**सिद्धार्थ**– महावीर तीर्थकरांचा बाप. व त्रिशलेचा नवरा.

**सिद्धेंद्रसरस्वती**– गंगाधर सरस्वतीच्या सात शिष्यांतील एक.

**सिद्धेश्वरभट्टजी**– कोल्हापुरच्या राजाचे गुरु. मूळचे औरंगाबादेकडील फुलमरी येथील राहणारे होत. हे वाजसनी यजुर्वेदी ब्राह्मण असून यांचें उपनांव देवपाठक होतें. प्रसिद्ध जो अमृतराय त्याचे हे शिष्य होते. सरणी किंवा अद्वैतसरणी हा प्राकृत श्लोकबद्ध ग्रंथ यांचा आहे. या शिवाय यांचीं पदेंही पुष्कळ आहेत. रामचंद्र पंडित व पुणें येथील प्रसिद्ध कैलासवासी भाऊ माहाराज असे दोन पुत्र यांस होते. व तेही कवी व चांगले ज्ञाते असत. (हु.मा.) हल्लीं यांचे वंशज कोलापुर येथें व पुणें येथें आहेत.

**सिम्रक**– आंध्रभृत्य पहिला राजा जो बली ज्यास शूद्रक असें ह्मटलेलें आढळतें. त्यासच ग्यारेट साहेबांनीं आपल्या कोशांत हें नांव लिहिलें आहे.

**सिंहलगिरि**– ज्ञानगिरीचे शिष्य. व ईश्वरतीर्थाचे गुरु.

**सिंहलद्वीप**– सेतुबंध रामेश्वरापासून दूर सुमारें १५ कोसांवरील बेट. हें लंकाद्वीपच असें कित्येक ह्मणतात. परंतु तें ह्मणणें चुकीचें आहे. (प्रा. ऐ. को.) पहा.

**सिंहसेन**– मगध देशाचा राजा. भर्तृहरीची बायको. पद्माक्षी तिचा बाप.

**सिंहासनद्वात्रिंशति**– संस्कृतांत आहे. कर्ता कोण तो आढळत नाहीं. (बु.शो.)

**सिंहासनबत्तिशी**– गुजराथींत सामळभट्टानें केलेलें भाषांतर.

**सीतानदी**– यार्कंड शहरा जवळची खशदेशांतील नदी. (प्रा. हिं. न.)

**सीतामारुतिसंवाद**– रणछोड भगतकृत गुजराथींत.

**सीतारामविवाह**– कृष्णरावकृत संस्कृत शतश्लोकी ग्रंथ.

**सीतास्वयंवर**– रामायणापैकीं वामनी. व कालिदासकृत गुजराथींत.

**सीतास्वरूपवर्णन**– पुरी बाईकृत गुजराथींत.

**सीरदेव**– परिभाषा वृत्तीचा कर्ता.

**सुखीनल**– कलियुगांतील युधिष्ठिरवंशीय राजा नृचक्षु त्याचा पुत्र व परिप्लव राजाचा बाप. यानें राज्य ६२ वर्षे व तीन दिवस केलें. याची राज्यकारकीर्द आरंभली. त्या वेळेस युधिष्ठिर शक सुमारें १०४९ इतका गत झाला होता. व याच्याच कारकीर्दींत प्रद्योतराज्य सुरू झालें होतें. (रा.मा.)

**सुगत**– अमरसिंहानें अमरकोशांत जीं बुद्धाचीं नांवें लिहिलीं आहेत त्यांतील १ रें.

बौद्धलोक सर्वज्ञ नांव जसें ऋषभदेवाकडे लावितात. तसेंच हें प्राचीन काळच्या अर्हत राजास जोडतात. (जैनग्रंथ.)

**सुगमोपाय**– समर्थ रामदास स्वामींचे वडील बंधु. गंगाधरपंत त्यांनीं मराठी केलेला ओंवीबद्ध ग्रंथ तो.

**सुचंद्र**– विशाला नगरीचा राजा हेमचंद्र त्याचा पुत्र. [ बाप. (रा.मा.)

**सुज्येष्ठ**–'शृंग अथवा संग राजांतील जो अग्निमित्र त्याचा पुत्र. व वसुमित्राचा

**सुंदरअष्टक**– सुंदरदास कृत ग्रंथ.

**सुंदरदास**– हा जातीचा क्षत्रिय उत्तर हिंदुस्थानांत होऊन गेला. प्रसिद्ध जो दादूपिंजारी त्याचा हा शिष्य होता. शांकरमतांत याची समजूत फारच उत्तम होती. असें याच्याच ग्रंथावरून समजून येतें. सुंदरविलास, ज्ञानसमुद्र, व सुंदराष्टक. हे याचे ग्रंथ हिंदुस्थानी भाषेंत आहेत. यास होऊन गेल्यास आज २२६ वर्षे सुमारें जाहलीं आहेत. कारण ज्ञानसमुद्र ग्रंथ संवत् १७१० मध्यें लिहिलेला आहे.

**सुंदरर**– हा कवि जातीचा ब्राह्मण परंतु कधीं होता तें कळत नाहीं. तेरुवेल्लुरु या गांवीं हा राहात असे. व यानें चिदंबर येथें अध्ययन केलें होतें. (क.च.)

**सुंदरविलास**– शांकरवेदांतपर सुंदरदासकृत हिंदुस्थानी भाषेंत ग्रंथ आहे तो.

**सुदर्शन राजा**– अशोक राजाच्या वेळीं महाराष्ट्र देशांत होता महाबलाढ्य राजा तो. याचें त्याशीं मोठें निकराचें युद्ध नेवासें येथें झालें. परंतु हा युद्धांत पडल्यामुळें अशोकास ऐताच जय मिळाला. (जैनग्रंथ). २– पंचोपाख्यान अथवा पंचतंत्रकर्ता जो विष्णुशर्मा पंडित त्यानें ज्याच्या पुत्रांस राजनीतींत प्रवीण केलें तो. (विष्णुशर्मापंडित) श.प.

**सुदर्शनस्तोत्र**– वेदांताचार्यकृत संस्कृत भाषेंत.

**सुंदरेश्वर**– महादेव हा दक्षिणेंत आहे.

**सुदामचरित्र**– मराठींत अमृतराय कृत व गुजराथींत प्रेमानंद कृत.

**सुदास**– युधिष्ठिर वंशीय बृहद्रथ राजाचा पुत्र व शतानीक राजाचा बाप. यानें ४७ वर्षें ११ महिने राज्य केलें. याच्या राज्यकारकीर्दीस आरंभ युधिष्ठिर शकाच्या सुमारें १४४२ व्या वर्षीं झाला होता. व पुढें सुमारें एका वर्षानेंच अर्हनुनांवाचा जैनाचार्य उत्पन्न झाला. (रा.मा.) व जैन ग्रंथ.)

**सुधन्वाख्यान**– गुजराथींत प्रेमानंद कृत.

सुधन्वाराजा- कुमारिलभट्ट जैन लोकांशीं वाद करीत असतां त्यास जो सहाय देणा-
रा राजा होता तो. हा जैनधर्मी होता. व तसा असून वैदिक धर्माकडे वळला.
असें जैन लोक ह्मणतात. आनंदगिरीच्या शंकरविजयांत दुसऱ्या कोणाचेंच
फारसें वर्णन नसल्या मुळें कुमारिल भट्टाचें नाहीं म्हणून याचेंही नाहीं. प-
रंतु माधवाचार्यांनें याच्या विषयीं असें लिहिलें आहे.

ब्रह्मापिते सहायार्थं मंडनोनामभूत्सुरः॥ भविष्यति महेंद्रोपि
सुधन्वा नामभूमिपः॥१॥

अर्थ- कार्तिक स्वामीस शिवांनीं पृथिवीवर अवतरण्याची आज्ञा दिली व मां-
गितलें कीं, ब्रह्मदेव मंडननामक ब्राह्मणाच्या रूपानें तूं कर्ममार्ग स्थापिशील.
त्यास सहाय करण्या साठीं व इंद्र सुधन्वा राजाच्या रूपानें जैनमत मोडण्या-
साठीं प्रकट होऊन पृथिवीवर येतील. असो. सुधन्वा हा मेदिनीपुर हल्लीं बं-
गाल्यांतील मिदनापुर येथील राजा होता. असें जैन लोक ह्मणतात.

सुनंदन- आंध्रभृत्य राजांतील पुरुषश्रीरूचा पुत्र व चकोर इत्यादिक नऊ भावांचा
बाप. (रा. मा.)

सुनय- युधिष्ठिर वंशीय परिप्लव राजाचा पुत्र. व मेधावीचा बाप. यानें ७२ वर्षे ११ म-
हिने व ३ दिवस राज्य केलें. याच्या वेळेस शिशुनाग राजांची कारकीर्द आरंभ-
ली होती. (रा.मा.) व ( हिं. इ. इ.).

सुनक्षत्र- हा सूर्यवंशी मरुदेव राजाचा पुत्र व पुष्कर राजाचा बाप. (रा.मा.)

सुनीथ-. युधिष्ठिरवंशी सुषेण राजाचा पुत्र व नृचक्षु राजाचा बाप. (रा.मा.), मागध रा-
जांतील सुबलाचा पुत्र व सत्यजिताचा बाप. (राजमा.).

सुप्रतीक- सूर्यवंशी प्रतीकाश्व राजाचा पुत्र. व मरुदेवाचा बाप. (रा.मा.).

सुप्रबुद्ध- दुसऱ्या बुद्धाच्या आईचा बाप. (ललितवि.)

सुपार्श्व- सातवा तीर्थंकर. (तीर्थंकर श.प.).

सुबल- मागधराजा सुमति त्याचा पुत्र व सुनीथ राजाचा बाप. (राज.माली.)

सुबंधुकवि- वासवदत्तानामक ग्रंथाचा कर्ता. हा बाणभट्टाच्या पूर्वीं होऊनगेला.
या विषयीं (मि. विष्णु कृष्ण चिपळूणकरकृत निबंध आहे तो पहा.)

सुभट- दूतांगद नाटकाचा कर्ता. (बु. का. शो.)

सुभटवीर्य- शककर्त्या विक्रमादित्याचा धाकटा भाऊ. (नायर्ली.)

सुभानराव- हा कविजातीचा ब्राम्हण होता. मद्रासेच्या पश्चिमेस ४० कोसांवर

अरणी म्हणून गांव आहे तेथें हा राहात असे. हा शके १६४० मध्यें होता. अरणी येथील राजाच्या दरबारीं हा कामदार होता. आपली बुद्धि वाढावी यास्तव यानें मालकांगोणीचें तेल प्राशन केलें असतां ती तर वाढली. पण यास अतिशय खाज सुटली. ती यानें कांहीं औषधोपाय करून शमविली. सीतारामविवाह तो ग्रंथ याचाच आहे. (क. च.).

**सुभाषितरत्नाकर**– लक्ष्मण कविकृत तेलंगी भाषेंत.

**सुभाषितशार्ङ्गधर**– शार्ङ्गधरकविकृत.

**सुमंत**– उज्जनीचा राहणारा ब्राह्मण. यास देवतेनें प्रसादरूपानें अजरामरत्वाचें फळ दिलें होतें. व तेंच त्यानें भर्तृहरीस आणून दिलें.

**सुमति**– मागधराजा द्युमत्सेनाचा पुत्र व सुबलाचा बाप. (रा. मा.)

**सुमतिभीम**– बसवपुराणाचा कर्ता. (ब. श. प.) (रा. मा.)

**सुमाल्य**– नऊनंदांतील पहिला नंद जो महापद्म त्याच्या आठ मुलांतील वडील.

**सुमित्र**– सूर्यवंशी अंतरिक्ष राजाचा पुत्र. याचा पुत्र सुहन. सुमित्रास आणखी दोन भाऊ होते. परंतु त्यांत सुतपा राजास अमित्रजित नांवाचा पुत्र होता व तोही निपुत्रिक होता. याच वंशांतील सुरथ राजाचा पुत्र.

**सुमित्रा**– शककर्त्या शालिवाहनाची आई. ही सुलोचन ब्राम्हणाची कन्या होती. ही कौमार दशेंतच भगवान् शेषाच्या प्रसादानें गर्भिणी होऊन शालिवाहन पुत्रास प्रसवली होती.

**सुयशा**– अशोक राजाचा पुत्र. (रा. मा.)

**सुरत**– गुजराथ देशांतील एक शहर.

**सुरथ**– सूर्यवंशी रणक राजाचा पुत्र. व सुमित्राचा बाप.

**सुरसागर**– सूरदासकृत हिंदुस्थानी भाषेंतील ग्रंथ.

**सुराभांडेश्वराख्यान**– घंटय्य कविकृत तेलंगी भाषेंत.

**सुरेश्वराचार्य**– मंडनमिश्रास नांव आदळतें. परंतु श्रीमच्छंकराचार्यांनीं शृंगिरीस मठ व गादी स्थापून प्रथम तेथील गादीवर जो पुरुष स्थापिला तो हा नव्हे. तो निराळाच. कारण आनंदगिरीनें असें लिहिलें आहे कीं, मंडनमिश्र सन्यासी होऊन आचार्यांपासून सदुपदेश पाऊन लागलीच उत्तरपंथाकडे चालता झाला.

**सुलोचन**– शालिवाहनाची आई सुमित्रा, तिचा बाप. पैठण शहरचा राहणा॰

**सुवर्त**– सुव्रत राजा तोच.

**सुवृत्ततिलक**– क्षेमेंद्रकृत संस्कृत भाषेंत.

**सुव्रत**– मागध राजांतील क्षेमराजाचा पुत्र व धर्मसूत्राचा बाप. (रा॰मा॰).

**सुशर्मा**– काण्वराजांतील चौथा. नारायण राजाचा पुत्र. (रा॰मा॰)

**सुशीला**– भर्तृहरि, विक्रमादित्य, मैनावती आणि सुफरवीर्य या चार भावंडांची (आई.

**सुश्रुत**– वैद्यशास्त्र ग्रंथ व त्याचा कर्ता.

**सुषेण**– युधिष्ठिर वंशीय दृष्टिमान् राजाचा पुत्र व सुनीथ राजाचा बाप. याच्या राज्यकारकीर्दीच्या समाप्ती पर्यंत युधिष्ठिर शकाच्या ८०२ वर्षास आरंभ होतो.

**सुहल**– कनोज येथील गोविंदचंद राजाचा काश्मिरास असलेला वकील. मंखाचे ग्रंथपरीक्षेस असणाऱ्या ३० पंडितांत हा होता. (बु॰का॰शो॰)

**सूर्यकवि**– रामकृष्ण काव्याचा कर्ता. (बु॰ का॰ शो॰)

**सूर्यप्रशस्तिशतक**– बाणभट्टाचा मेव्हणा मयूर कवि तत्कृत स्तोत्र.

**सूर्यसिद्धांत**– याची कथा अशी आहे कीं, हा सिद्धांत सूर्यांश पुरुषानें मयासूर दैत्यास पढविला किंवा सांगितला. परंतु कधीं त्याचा ठिकाण नाहीं. तथापि हा फार जुना आहे, यांत संशय नाहीं. म्हणजे तीन हजार वर्षांच्या पूर्वीचा तर खचितच आहे. यास प्रमाण असें कीं, आनंदगिरीच्या ४६ व्या प्रकरणांत कालवादी मतांचा क्षपणक भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्यांकडे येऊन पृथिवी प्रतिक्षणीं खालीं खालीं या प्रमाणें नित्य चाललीच आहे, असें बोलला. तेव्हां भगवान् आचार्यांनीं त्यास उत्तर दिलें तें असें:—

"पृथिवी नित्य मधः पतति इति यत्त्वया उक्तं तत् अप्रमाणं भू-"
"गोलो व्योम्नि तिष्ठतीति सूर्यसिद्धांत वचनाच्च। किंच भूनिष्ठ"
"पुरुषेण गगनं प्रत्युत्क्षिप्तं पाषाणादि वस्तु भूम्युपर्येव क्षि-"
"प्रं निपतति। तद्दृष्ट्वापि किमुच्चरितं भवता मंदधिया॥ ७॥"

अर्थ- आचार्य म्हणाले पृथिवी नित्य खालीं चालली आहे असें जें तूं म्हटलेंस तें अप्रमाण आहे. आकाशामध्यें भूगोल स्थित आहे. हें सूर्य सिद्धांताच्या वचनावरून सिद्ध आहे. आणखीं असें कीं, भूमीवर उभा असलेल्या मनुष्यानें पाषाणादिक वस्तु आकाशांत उंच फेंकलेलें तत्काळ पृथिवीवर येऊन पडतें. तें पाहूनही मंद बुद्धि जो तूं त्या त्वां हें काय उच्चारिलेंस? श्रीमच्छंकराचार्यांस होऊन गेल्यास आज २०२४ वर्षें झालीं आहेत.

म्हणून त्या वेळेस जर सूर्यसिद्धांताचीं वचनें मोठमोठ्या लोकांत इतकीं प्रमाणार्थ घेत असत, तर त्याची प्रसिद्धि त्या वेळेस चांगलीच होती. असें स्पष्ट दिसून येतें. आणि त्यामुळेंच त्याचें ऋनाटपणही सिद्ध होतें.

**सूर्याजीपंत**– समर्थ रामदास स्वामींचे वडील.

**सूर्योपंत**– प्रख्यात एकनाथ स्वामींच्या वडिलांचें नांव.

**सूत्रकार**– ज्या ज्या शास्त्रावर जो जो मूळचा सूत्ररचना करणारा तो तो त्याचा सूत्रकार होय. परंतु यथार्थ परमेश्वर प्राप्तीस उपायभूत जीं ब्रह्मसूत्रें, त्यांची रचना व्यासांनीं केली म्हणून त्यांस या नांवानें म्हणण्याची विशेष रूढीआहे.

**सूत्रभाष्य**– वर प्रमाणेंच व्यवस्था समजावी. परंतु व्यासांच्या ब्रह्मसूत्रावरील जें सर्वमान्य शांकरभाष्य त्यास ह्मणतात.

**सूरदास**– हा अक्रूराच्या अंशानें जन्मलेला जातीचा ब्राह्मण होता. याचें जन्म शके १४५० मध्यें झालें होतें. परंतु हा जन्मांध जन्मला होता. म्हणून यानें आपला सर्वही काळ भगवद्भजनांत घालविण्याचा क्रम ठेविला. हा कीर्तन करी. व याच्या कीर्तनींत कृष्णमूर्ति नृत्य करीत असे. हीच गोष्ट एकदां तानसेन गवय्याच्या मुखानें उज्जनीचा राजा भीमक त्यानें ऐकून सूरदासास अवंतीस आणविलें व त्याचें कीर्तन ऐकिलें तेणें करून राजाची वृत्ति संतुष्ट झाली. राजाच्या बायकांनींही कीर्तन ऐकून याची स्तुति केली. एकदां असें सांगतात कीं, राणीच्या दासी पैकीं एक याच्यावर फिदा होऊन याजवळ आली. इतक्यांत यास दृष्टि येऊन यानें तिला धुडकावून लाविलें. तेव्हां ती गेली व हा पहिल्या प्रमाणें अंध झाला.

हा मथुरेमध्यें किंवा वृंदावनामध्यें राहात असे. व कविताही करी. सूरसागर म्हणून जो ग्रंथ आहे तो याचाच आहे. असें सांगतात कीं, यानें सवालक्ष पदांचा संकल्प करून पुष्कळ पदें लिहिलीं. तेव्हां देव प्रसन्न होऊन त्यानें यास दृष्टि दिली. व सांगितलें कीं, आतां तुझे नेत्र कायम राहतील. परंतु यानें सांगितलें तसें नको. कारण हें जें आतां आपलें रूप मी प्रत्यक्ष पाहिलें आहे यास इतर पदार्थांच्या अवलोकनानें व्यत्यय येईल. त्यावरून देवानें याचे नेत्र पूर्ववत् केले. पुढें हा कांहीं दिवसांनीं थोडीं पदें पुरीं होण्याचीं राहून मरण पावला. तेव्हां तीं पदें देवानें पुरीं केलीं. हल्लीं जेवढ्या पदांमध्यें

सूरदास नांव आहे तीं पदें याचीं. व सूरदास मदनमोहन नांव आहे तीं पदें देवानें याचीं पुरीं केलेलीं होत. अशी लोकांत समजूत आहे. काशीच्या उत्तरेस सुमारें एका कोसावर शिवपुरी नामक गांवीं याची समाधि आहे. ( सू. मा. )

कविचरित्रांत याची गोष्ट चमत्कारिकच आहे. तिचा व भक्तिविजयांतील कथेचा जरी थोडा मेळ आहे तरी कविचरित्रकारांचें म्हणणें सूरदास व सूरदास मदन मोहन एकच. आणि भक्तविजयकाराचें म्हणणें ते निरनिराळे आहेत इतका फेर आहे. अशा बद्दल त्यांनीं सूरदासा विषयींचा ३३ वा अध्याय निराळा लिहून सूरदास मदनमोहन याच्या विषयीं ३६वा अध्याय निराळा लिहिला आहे.

सूरदास मदनमोहन हा कविचरित्रकारांच्या व भक्तविजयकारांचे मतें दिल्लीच्या अकबर बादशाहाकडून मथुरा प्रांतांतील संदील परगण्याचा तहशिलदार होता. परंतु डोळ्यां वांचून असणारा जो सर्व लोक प्रसिद्ध सूरदास त्याला ही गोष्ट मुळींच लागू पडत नाहीं. म्हणून कविचरित्रकारांचें म्हणणें बरोबर दिसत नाहीं. व तो जन्मांध असल्या मुळें त्यानें तहशीलदारी केली तिचाही संभव नाहीं.

**सृग्विणी**– चार्वाकाची आई.

**सृनंजय**– मागध राजांतील कर्मजिताचा पुत्र व विप्रराजाचा बाप. ( रा. मा. )

**सेतुकाव्य**– महा कालिदासकृत. याचा उल्लेख बाणभट्टाच्या हर्षचरितांत आहे.

**सेनेकर**– हा एक कवि शालिवाहन शका पूर्वीं १०० वर्षां मागें होऊन गेलेला आहे. मथुरा शहरचा हा राहणारा होता. व संघातर राजाच्या ४९ कवींत शिरोमणि असे. चंपकमार राजानें केलेल्या प्रश्नाचें उत्तर यास देतां आलें नाहीं. म्हणून तेंच उत्तर धामग ब्राह्मणानें दिलें. त्यावरून यानें धामगाची निंदा केली असतां यास त्याच्या उपास्य देवतेचा शाप झाला कीं, तुझा पराभव कोणी नीच पुरुष करील. याच प्रमाणें तेरू वेळूवरापासून याचा पुढें पराजय झाला.

**सेनाचार्य**– अमोघवर्ष राजाच्या पदरचा पंडित. यानें जैन धर्मा विषयीं कित्येक ग्रंथ लिहिले आहेत. परंतु हा जातीचा कोण होता तें कळत नाहीं. मात्र याच्या ग्रंथांतील शका वरून हा शालिवाहनाच्या ८ व्या शतकांत होता इतकें कळतें. ( क. च. )

**सेनान्हावी**– भक्तविजयाच्या १४व्या अध्यायांत याची कथा आहे. त्यांत हा बादशाहाची हजामत करीत असे. व एकदां बादशाहाचें बोलावणें आलें असतां हा ध्यानस्थ असल्यामुळें याचें जाणें न झाल्यानें देवानें याचें रूप धरून त्याची हजामत केली. परंतु हा राहणार कोठला व कोणत्या बादशाहाची हजामत करीत असे. त्याचा खुलासा नाहीं.

**सेवाप्रकरण**– वल्लभमताचा ग्रंथ. कोणी संप्रदायिकांनीं केलेला आहे.

**सेवाफलें**– वल्लभाचार्यकृत ग्रंथ.

**सोजंत्रा**– गुजराथेंतील एक गांव.

**सोनपतपानपत**– पानपत शब्द पहा. काशीराज पंडितानें येथील लढाईचा वृत्तांत फारसी भाषेंत लिहिलेला आहे.

**सोपानदेव**– निवृत्तीचा भाऊ. याची समाधि सासवडास आहे. याचें जन्म शके ११९६ मध्यें झालें होतें. मा.)

**सोमक**– युधिष्ठिर वंशीय राजा शतानीक त्याचा हा पुत्र व दुर्दमनाचा बाप. (रा.

**सोमकांत**– हा पैठणचा राजा होता. याच्याच कारकीर्दींत शालिवाहन शककर्ता जन्मला.

**सोमदेव**– गुणाढ्यकवीचा पैशाची भाषेंत असलेला ग्रंथ बृहत्कथा, त्याचें संस्कृतांत भाषांतर करणारा हा कवि होय. याच्या ग्रंथाचें नांव कथासरित्सागर प्रसिद्ध आहे. हा कवि काश्मीराकडे राहात असे. व हा शालिवाहनाच्या सुमारें १२व्या शतकांत होता. कोणी ५व्या शतकांत होता असेंही म्हणतात. (बु. शो.) प्रक्रिया नीतिवाक्यामृत हाही याचा दुसरा ग्रंथ आहे.

**सोमनाथ**– सोरटी सोमनाथ तोच.

**सोमनाथभट्ट**– राजमहेंद्री जवळ तेनुलंकानामक गांवचा राहणारा हा जातीचा तैलंग ब्राम्हण होता. हा दरिद्री असतांही एका गृहस्थानें सर्व खर्च आपला करून याचें लग्न केलें. परंतु याची सासू भारी द्रव्यलोभी होती. म्हणून लग्न झाल्यावर हा तिला नमस्कार करायास गेला असतां तिनें तोंड मुरडलें. तें याच्या ध्यानांत आलें. नंतर हा काशीस गेला, व तेथें अध्ययन करून चांगला विद्वान् झाला. देशीं परत येतां येतां यानें कित्येक राजांच्या भेटी घेतल्या. त्यांत यास पुष्कळ द्रव्य मिळालें. तें यानें सासूपुढें ठेविलें असतां तिला आनंद झाला.

पुढें यानें न्यायशास्त्र पढविण्याची शाळा घातली. व पुष्कळ विद्यार्थी तसेंच आपले मुलगे चांगले प्रवीण केले. पार्थसारथीमिश्राची जी शास्त्रदीपिका टीका मीमांसा शास्त्रावर आहे तिजवर यानें मयुखमाला नांवाची व्याख्या लिहिलेली विद्वन्मान्य आहे. कविचरित्रांत हा शालिवाहनाच्या १२ व्या शतकांत होता, असें लिहिलें आहे. (क०च०).

**सोमशंभु**– सशिव कवीचा शिष्य. (बु० का० शो०)

**सोमशर्मा**– मौर्यवंशी चंद्रगुप्ताच्या कुलांतील शालिशूक राजाचा पुत्र व शतधन्व्याचा बाप. रा.

**सोमानंद**– उत्पलभट्टाचा गुरु. शालिवाहनाच्या १० व्या शतकांत होता. शिवदृष्टि हा ग्रंथ याचाच आहे. (बु० का० शो०)

**सोमेश्वर**– कीर्तिकौमुदी ग्रंथाचा कर्त्ता.

**सोलापुर**– हें एक शहर व जिल्ह्याचें ठिकाण आहे. बसव पुराणांत हें शहर लिंगाइतांनीं वसविल्याचें लिहिलें आहे. [हिं० न०

**सोहागपुर**– पुलिंद देशांतील शहर. याचे उ० अ० रू० २३° व पू० रे० ८१ आहेत (प्रा०

**सोहिरोबा**– हा शेणवयी ब्राम्हण कवि होता. (नवनीत०)

**सौगत**– सुगत नामक बुद्धाचा अनुयायी तो.

**सौति**– सूतपुराणिकाचा पुत्र.

**सौत्रांतिक बौद्ध**– यांच्या मतीं बाह्यार्थ सत्य आहेत. कारण अहंवृत्यात्मक बुद्धितत्व असतां इदंवृत्यात्मक बाह्यपदार्थ शून्य होणार नाहींत. या मतांत विषय आणि इंद्रियें हा रूपस्कंध, बुद्धि हा विज्ञानस्कंध, या दोहोंच्या संयोगापासून जो सुख दुःख प्रत्यय होणें तो वेदनास्कंध, वेदनेपासून रागद्वेषादिक होणें तो संस्कारस्कंध, आणि पांचवा संज्ञास्कंध. (सर्वद०)

**सौंदर्यबोधिनी**– महेश्वर भट्टकृत संस्कृत भाषेंत.

**स्तवचिंतामणि**– भट्टनारायणकृत– (बु० शो०)

**स्तुतिकुसुमांजलि**– जगधरकृत (बु० शो०)

**स्तुतिकुसुमांजलिटीका**– रत्नकंठकृत (बु० शो०)

**स्त्रीनाथ**– हा तैलंग ब्राह्मण कवि पोतराजूच्या बायकोचा भाऊ होय. यानें अध्ययन पोतराजूजवळच केलें. हा उत्कृष्ट इतिहासवेत्ता होता. रुद्रविणा वाजविण्यांत याची मोठी आख्या होती. काशीखंडांत जी मरुत्त राजाची कथा आहे तिचें यानें तेलंगी भाषेंत इतकें गोड भाषांतर केलें कीं, कोंडवीडूयेथील

अन्नावे मैरेड्डी राजानें यास आपल्या दरबारीं न्यायाधिशीची जागा दिली. स्त्रियांचे स्वभाव व गुणदोष जाणण्याची यास फार इच्छा असल्यामुळें हा वारंवार देशपर्यटन करि. त्या विषयावर याचा एक ग्रंथही आहे. हा मोठा द्रव्यलोभी असे. व दुसऱ्यास बोलण्यांत छकविणें हाही एक दुर्गुण याच्या अंगीं जबर होता.

असें सांगतात कीं, हा एकदां फिरत फिरत एका गांवीं गेला असतां एका बाईनें यास सहज पुसलें, दादा तुझें नांव काय? यानें उत्तर दिलें माझें नांवस्त्रीनाथ. तें ऐकून ती ह्मणाली. अरे तर मग तुझ्या आईचा नवरा कोण? इतकें ऐकतांच हा इतका ओशाळला कीं, दुसऱ्यास छकविण्याची याची खोडच मोडली. (क.च.)

**स्त्रीराज्य**— प्राचीन हिंदुस्थानाच्या नकाशा वरून हें हिमालयांत असल्याचें दिसून येतें. याचे उत्तर अक्षांश सुमारें ३३ व पूर्वरेखांश ८० आहेत.

२– सिंहलद्वीपाकडेही एक स्त्रीराज्य होतें. असें म्हणतात.

**स्नेहगीता**— गुजराथी भाषेंत निष्कुळानंदकृत. (का० दो० गु.)

**स्पंदशास्त्र**— वसुगुप्तकृत. (बु. शो.)

**स्पंदकारिकासर्वस्व**— भट्टकल्लटकृत. (बु.)

**स्मृतिदर्पण**— इलेश्वरोपाध्यायकृत.

**स्वप्रकाश**— या नांवाचें एक क्षेत्र आभीर देशांत आहे. क्षपणिक नांवाचा नास्तीक तो येथेंच मरण पावला.

**स्वर्णगणपति**— साहा गाणपत्यांतील हें एक मत आहे.

**स्वयंप्रकाश**— अद्वैतमकरंदाचा टीकाकार.

**स्वात्मनिरूपण**— श्रीमच्छंकराचार्यकृत संस्कृत आर्या.

**स्वात्मसुरव**— एकनाथ स्वामीकृत मराठी भाषेंत ओंवीबद्ध टीका शुकाष्टकावर.

**स्वात्मानुभव**— व्यंकटाद्रिकृत शांकर वेदांत विषयावर.

**स्वामीनारायण**— सहजानंदस्वामी शब्द पहा.

**स्वारोचिषमनुचरित्र**— आलसानी पेद्दना नामक कविकृत. या चरित्रांत स्वारोचिष मनूची उत्पत्ति सांगितली आहे. ती अशी कीं, पूर्वीं प्रवराख्य नामक कोणी ब्राह्मणांस हिमालयाचें शिखर पाहण्याची इच्छा होऊन त्यानें ती गोष्ट कोणी एका सिद्धास कळविली. त्यानें एका वनस्पतीचा रस पायांस लाव

आणि जा म्हणून सांगतांच यानें तसेंच केलें व हिमालयावर गेला. परंतु रस वाळून गेल्यानें याची उड्डाणशक्ति बंद होऊन हा तेथेंच अडकला.आ-तां काय करावें व घरीं कसें जावें या विचारांत आहे तों यानें तेथें एक गंध-र्वकन्या पाहिली. म्हणून तिजकडे गेला. परंतु तिनें यास बात्द्यात्कारीं धु-डकाविलें तें यास न समजून हा माघारा परतला. व अग्नीची प्रार्थना करू-न त्याच्या प्रसादानें घरीं आला. तिकडे गंधर्व कन्येस याचा विरह झाला अ-सतां प्रवराख्याचें रूप धरून अग्नि तिजपुढें गेला. व तिशीं संगत झाला. तो-जो गंधर्वकन्येस गर्भ राहून पुत्र झाला तोच स्वारोचिष मनु प्रसिद्ध हो-ऊन गेला. (क०च०).

## ह.

**हजाराशहर**– याचें जुनें नांव अभिसारी नगर होतें. हें तक्षशिलेच्या ईशान्ये-स आहे. (प्रा·हिं·न·)

**हनुमत्स्तव**– मोरोपंतकृत मराठींत. (बु·)

**हनुमन्नाटक**– कर्त्ता आढळत नाहीं. याजवर मोहनदासाची टीका मात्र आहे.

**हनुमान् कवि**– दूतांगद नाटकाचा कर्त्ता. (बु·)

**हयग्रीववध**– मेथकविकृत· (बु·का·शो·)

**हरगोविंद**– नानकपंथी अर्जुनमल्लाचा शिष्य. याचे पुत्र दोन होते. एक हरि-हरराय व दुसरा हरकिसनराय.

**हरचरित्रचिंतामणि**– जयद्रथ कविकृत (बु·का·शो·)

**हरदत्त**– गौतमीय धर्मशास्त्रवृत्ति मिताक्षरेचा कर्त्ता. (बु·का·शो·)

**हरदत्ताचार्य**– बौद्धनय ग्रंथाचा कर्त्ता. (सर्वद·)

**हरविजयकाव्य**– सर्वसेनकृत एक. व दुसरें रत्नाकरकृत. (बु·का·शो·)

**हरविजयकाव्यटीका**– अलककृत (बु·का·शो·)

**हरिकवि**– शंभुराज चरित्राचा कर्त्ता. (बु·)

**हरिकारिका**– पातंजल महाभाष्यावर भर्तृहरीनें लिहिलेल्या एक लक्ष कारि-[का त्या.

**हरिदीक्षित**– शब्दरत्न व प्रौढमनोरमा व्याख्या यांचा कर्त्ता.

**हरिद्रागणपति**– साहा गाणपत्यांतील एक मत.

**हरिद्वार**– हिमालयामध्यें गंगोत्री जवळ आहे.

**हरिनाथ**– मुकुंदराजाचा परम गुरु.

हरिनारायणबाबा- हा एक साधु पुरुष होऊन गेला. करमाळे तालुक्यांत बेनवडीम्हणून गांव आहे तेथें याची समाधि व वंशज आहेत. (स्वतःची माहिती.)

हरिपंडित- एकनाथ स्वामींचा मुलगा.

हरिपाठ- ज्ञानेश्वरकृत २७ अभंग मराठींत.

हरिबाळगीता- निष्कुळानंदकृत गुजराथींत.

हरिभट्ट- बडोदें येथील औदीच टोळकिया गुजराथी ब्राह्मण संवत् १८९५ मध्यें होता. याची कृष्णवर्णन वगैरे कविता गुजराथींत आहे. (काव्यदो.)

हरिमीडे- भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्यकृत स्तोत्र.

हरिराम — नवीन मनविचार ग्रंथाचा कर्त्ता. (बु. का. शो.)

हरिराय— शिक्षापत्रीचा कर्त्ता.

हरिवल्लभ- भूषणसार दर्पणाचा टीकाकार.

हरिविचरण- निष्कुळानंदकृत गुजराथींत.

हरिविजय- मराठी ओंवीबद्ध श्रीधरकविकृत.

हरिविलास- लोलिंबराजकृत संस्कृत काव्य.

हरिश्चंद्राख्यान- तेलंगी भाषेंत लोकभनय्यानें केलेलें काव्य.

हरिस्मरण- वेदांताचार्यकृत संस्कृतांत.

हरिस्मृति- गुजराथींत निष्कुळानंदकृत.

हरिहरराय- विजयानगरचा राजा. उरगणादंडनाथ व साकल्यमाला वगैरे कवि याच्या पदरीं होते. विद्यारण्यांचा हा शिष्यच होता.

हर्षकवि- हा कवि काश्मीरच्या श्रीहर्ष राजाच्या पदरीं होता असें ह्मणतात.

हर्षचरित- बाणभट्टकृत संस्कृतांत. व हुएनसंगकृत चिनी भाषेंत.

हर्षचरितसंकेत- संस्कृत भाषेंत शंकरकविकृत.

हर्षमिश्र- शांकरमतानुयायी पंडित. हा विद्यारण्यांच्या पूर्वीचा होय. कारण पंचदशींत याचें नांव आहे.

हर्षराजा- श्रीहर्ष राजा तोच.

हर्षवर्द्धन- श्रीवर्द्धनाचा पुत्र. लिंगानुशासनाचा टीकाकार. (बु. का. शो.)

हलायुधकोश- हलायुधभट्टकृत संस्कृत भाषेंत. या कोशासच अभिधानरत्नमाला ह्मणतात.

हलायुधभट्ट- अभिधानरत्नमाला कोशाचा कर्त्ता. भट्टभास्कर या नामांकित पं-

डिताचा हा शिष्य होता. म्हणून शालिवाहनाच्या १७व्या शतकांत होता. (क॰चरि॰)

२- मृतसंजीवनी नामक ग्रंथाचा कर्ता. हा कोंकणस्थ ब्राह्मण होता. परंतु क-धीं व कोठें असे त्याचा ठिकाण नाहीं. शल्वशास्त्रांतील पिंगलसूत्रांवर जे व्याख्याकार झाले त्यांत ह्याची गणना आहे. (क॰च॰)

**हंसपद्धति**– या ग्रंथाचीं ११ अष्टकें आहेत व यांत समर्थ रामदास स्वामी व त्यांचे शिष्य उद्धव गोसावीं त्यांच्या शिष्य परंपरेचें वर्णन आहे.

**हंसराजस्वामी**– मौजे परभणी इलाखा मोंगलाई येथील राहणारे गंगाधरपंत नांवाचे कोणी गृहस्थ होते. ते जातीचे देशस्थ आश्वलायन ब्राह्मण व घरचे संपन्न असे असत. त्यांस त्यांचें कुटुंब रेणुकाबाई तिंजपासून जे तीन पुत्र झाले त्यांतील मधले जे नारायणराव तेच हे होते. यांसच संन्यास घेतल्या नंतर नारायणतीर्थ असें नांव होतें. व यांच्या परमहंस दीक्षे वरून लोकत्याविषयीं या नांवानें व्यवहार करूं लागले.

गंगाधरपंताच्या तीन पुत्रांत काय ते सुलक्षण ते हे नारायणरावच होते. नारायणराव यांचा बांधा फार उंच किंवा ठेंगणा व अतिकृश किंवा अति स्थूल असा नसून मध्यम प्रतीचा होता. यांची अंगकांति पिवळट गौरवर्णाची होती. व नाक सरळ, डोळे मोठे, पावलें लहान आणि आवाज खणखणीत असे.

यांची बुद्धि इतकी विलक्षण तीव्र होती कीं, कोणताही विषय असो. एकदां नजरे खालून किंवा कानांवरून गेला पुरे, कीं मग तो जातो कोठें? या प्रमाणें यांची बुद्धि असल्या मुळें यांस रोजगार लवकर लागला. व यांचें लग्नही झालें. परंतु यांचा योगप्रवृत्तीमध्यें विशेषें करून वाटण्याचा नव्हता म्हणून यांस परमार्थ साध्य झाला. तो असा कीं, लक्ष्मणराव नांवाचे परम प्रामाणिक व पुरे ब्रम्हनिष्ठ कोणी मोंगलाईंतील मामलेदार गृहस्थ होते ते यांचे ज्ञानगुरु होऊन हे त्यांचे पट्टशिष्य झाले.

यांचें कुटुंब लक्ष्मीबाई पहिल्याच खेपेस गरोदर असतां प्रसूत होऊन पुत्रासहित मरण पावली. असें पाहून यांनीं पेषकारीची चाकरी होती ती सोडली. व गुरूजवळ त्यांची सेवा करीत तेथें बरेच दिवस राहिले. कांहीं दिवसांनीं गुरूंची आज्ञा झाल्यावरून हे देशपर्यटनास निघाले. व माहुरास जाऊन तेथून धाराशिवावर उतरले. तेथें यांस बाळनाथ नांवाचा एक

शिष्य मिळाला. तो केवळ कल्याण स्वामीचाच अवतार होता. इतका उत्तम सेवा-दक्ष असे.

पुढें पंढरीस जाऊन यानीं चतुर्थाश्रम घेतला व आतां तेथून निघणार तों सखाराम बाबा डोंमगांवकरांनीं, यांस आपल्या गांवीं आणून यांची आठ नऊ वर्षें पर्यंत इतकी उत्कृष्ट सेवा केली कीं, यांच्या प्रसादानें ते बनावे त्या प्रमाणेंबनले. नंतर थोड्याच दिवसांनीं सखाराम बाबा हैदराबादेस गेले व तेथेंच मरण पावले. म्हणून हे परंडा येथें येऊन राहिले. व करतलभिक्षा करून राहात असतां कांहीं विकृतीनें यांचे पाय लुले होऊन यांची त्वरित गमनशक्ति कुंठित झाली. त्या मुळें यांचें परंडा येथें जें शिष्यासह राहणें झालें तें झालेंच. आम्हांस यांची भेट व आमच्यावर यांचा अनुग्रह झाला तो याच संधीस शके १७७२मध्यें झाला.

यानीं मराठींत ओंवीबद्ध ग्रंथ लिहिले ते येणें प्र०:— कथाकल्पलता ह्म० कादंबऱ्या प्रकं०१८ यांत वेदांतविषयरूपकानें वर्णिलेला आहे व त्या कादंबऱ्यांचा मूळ अर्थ करण्या साठीं उत्तर प्रकरणेंही १८ केलीं आहेत. या ग्रंथाची संख्या १००००आहे. दुसरा ग्रंथ वेदेश्वरी हा शिवगीतेवरील टीका आहे याचीही संख्या १०००० चआहे. ३रा ग्रं० श्रीमच्छंकराचार्यांच्या लघुवाक्यवृत्तीची टीका होय. याची सं० ५६०० आहे. ४था ग्रं०,आचार्यांच्या सदाचारावरील टीका. हिची सं० २००० आहे. ५वा आगमसार. हा ग्रंथ उपनिषत्तात्पर्यपर साडेतीन हजार आहे. साहावा ईशावास्य उपनिषत् टीका पांचशें. सातवा दास बोध त्दद्गताभिप्रायवर्णन ग्रंथ पांचशें. आठवा वासिष्ठांतर्गत चूडालाख्यानावर शंभर कडव्यांचा एक अभंग याप्रमाणें अभंग बेवीस. नववा तत्त्व झाडा (पंचीकरण) गद्यरूप ग्रंथ सुमारें दोन हजार. व शिवाय वेद अशा संज्ञेचीं वेदांतपर पदें सुमारें १०० आहेत.

यांनीं लिहिलेल्या टीकांत विशेष हाच आहे कीं, संस्कृतांत जशी लिहिण्याची चाल आहे, म्हणजे "पदच्छेदः पदार्थोक्तिर्विग्रहो वाक्य योजना॥ आक्षेपस्य समाधानं व्याख्यानं पंचलक्षणं" तीच पद्धत यांच्या लिहिण्याचीआहे. सारांश आरंभीं मंगल लिहून पुढें अनुबंधचतुष्टय सांगून नंतर मूळ ग्रंथाचें व्याख्यान वर सांगितल्या प्रमाणें लिहायाचें. अशी पद्धत यांच्या पूर्वीं होऊन गेलेल्या मराठी टीकाकारांतून एकाच्याही लिहिण्यांत आढळत नाहीं.

स्वामींच्या ग्रंथांत दोन भेद आहेत ते असे कीं, उत्तम अधिकाऱ्यांक-

रितां सदाचारादिक आणि मंदाधिकाऱ्यां करितां वाक्यवृत्त्यादिक येणें प्रमाणें होत. हे ग्रंथ इतके उत्तम आहेत कीं, ज्या कोणाला त्याच्या गुरूपासून कांहीं श्रवणमात्र झालें असेल. आणि मनन निदिध्यास झालें नसून गुरूचा वियोग झाला असेल,त्यानें आपल्या अधिकारा प्रमाणें ते ते ग्रंथ विचारपूर्वक पाहिले असतां व त्यांत लिहिल्या प्रमाणें साधन केलें असतां स्वरूप साक्षात्कार हटकून व्हावयाचाच. म्हणून यांच्या ग्रंथांची बरोबरी, वेदांत प्रकरणीं कोणत्याच प्राकृत ग्रंथास करितां येत नाहीं, असें मार्मिक लोकांचें म्हणणें आहे. सारांश ज्यांच्या लेखाची ही योग्यता, त्यांची स्वतःची योग्यता केवढी असली पाहिजे. त्यानें अनुमान सहजच होईल. पूर्णानंद व प्रसिद्ध योगानंदस्वामी, हे यांची समाधि होई पर्यंत यांच्या सहवासास होते.

यांचें ज्ञान जसें निःसंशय होतें तसेंच यांचें वैराग्यही मरवर होतें. यांची समाधि परंडा येथें आहे. व ती शके १७७७ मध्यें तेथें वैशाख शुद्ध ८ स झाली. समाधीच्या वेळीं यांच्या वयास ५० वें वर्ष होतें. व यांस ज्ञानपरंपरा चालविण्याजोगे काय ते शिष्य दोन होते. पैकीं एक समाधिस्थ होऊन एक मात्र हल्लीं विद्यमान आहेत. असो. यांचें साद्यंत व सविस्तर चरित्र हंसपद्धतिनामक ग्रंथाच्या सातव्या अष्टकांत असलेलें इच्छा असेल त्यानीं पहावें.

**हस्कपुर**– जिनेंद्रबुद्धिनामक कवीचा गांव.

**हस्तगिरिचंपु**– व्यंकटाध्वरीकृत.हा ग्रंथ संस्कृत भाषेंत आहे.

**हस्तामलक**– हस्तामलकाचार्य व श्रीमच्छंकराचार्य यांचा संवादरूप ग्रंथ. याजवर एकनाथ स्वामींची मराठी टीका आहे.

**हस्तामलकाचार्य**– श्रीवलीनामक गांवीं राहणाऱ्या प्रभाकरनामक ब्राम्हणाचा हा मुलगा होय. याचा इतिहास असा आहे कीं, हा जन्मापासून मुका होताच. परंतु उपजत ज्ञानी असे. ही गोष्ट भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्यांस कळून ते तेथें गेले. व त्यांनीं यास प्रश्न केले तो श्लो० येणें प्र०–"कस्त्वं शिशो कस्य कुतोसि गंता किं नाम ते त्वं कुत आगतोसि॥ एतन्मयोक्तं वद चार्भकत्वं मत्प्रीतये प्रीति विवर्धनोसि॥" या एका श्लोकांत आचार्यांनीं यास पांच प्रश्न पुसले. ते असे-कीं, तूं कोण? कोणाचा? जाणार कोठें? तुझें नांव काय आहे? आणि आलास कोठून तें मला माझ्या प्रीतीस्तव सांग. कारण तूं प्रीति वाढविणारा आहेस.

याजवर यानें आचार्यांस क्रमें करून सर्व उत्तरें दिलीं आहेत. त्यांत प-

हिल्या प्रश्नाचें उत्तर यानें या प्रमाणें दिलें. "नाहं मनुष्यो नच देव यक्षो न ब्राम्हणः क्षत्रिय वैश्य शूद्रः॥ न ब्रह्मचारी न गृही वनस्थो भिक्षुर्नचाहं निजबोध रूपः॥ १॥" अर्थ- मी मनुष्य,देव व यक्ष नाहीं. ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य, व शूद्र नाहीं. आणि ब्रम्हचारी, गृहस्थ, वानप्रस्थ व सन्यासीही नाहीं. असा वर्णाश्रम रहित केवल बोधरूप असा मी आहें.

या प्रमाणेंच आचार्यांनीं याचीं सर्व उत्तरें ऐकून संतुष्ट होत्सातेत्यांनीं यास बरोबर घेतलें. व तोही आला. पुढें आचार्यांनीं यास संन्यास दिला. व ते दिग्विजयार्थ फिरत असतां हा त्यांजबरोबर होता. (आ, शं. पद्दा.)

**हस्तिनवल्ली**– अनागोंदीस नांव आहे.

**हस्तिनापुर**– कुरुदेशाची राजधानी. कौरवपांडवांनीं येथेंच राज्य केलें. परंतु निमिचक्र राजाच्या कारकीर्दींत हें शहर भागीरथीस पूर येऊन वाहून गेलें. त्या मुळें राजानें कौशांबींत गादी नेली. ती तेथें युधिष्ठिर वंशीय शेवटला राजा क्षेमक या पर्यंत होती. सारांश भागीरथीच्या पुरानें वाहवल्या पासून हें शहर ओसाड पडलें. तें हल्लीं केवळ खेड्या प्रमाणें आहे. मिरत शहर या जवळच वसलेलें आहे.

**हातीराम बैरागी**– गिरीवरच्या गादीचा अधिकारी.

**हारावलीकोश**– पुरुषोत्तमराजकृत संस्कृत कोश.

**हालराजा**– आंध्रभृत्य राजांतील एक. हालेय असेंही यास कोणी म्हणतात.

**हितशिक्षा**– वीरविजय जतीकृत गुजराथींत.

**हितोपदेश**– संस्कृत भाषेंत असलेला पंचतंत्र ग्रंथाचा संक्षेप. याचा कर्ता आढळत नाहीं. खुसरूनें प्रथम फारशी भाषेंत भाषांतर शके सुमारें ४७५ मध्यें करविलें. तें याचें होय. (स्करबरू.शा.प.)

**हिंदीभाषा**– सिंधुनदीच्या पूर्व किनाऱ्यास राहणाऱ्या लोकांची भाषा. पंजाबी मुलतानी, सिंधी, जाटी, हरूटी आणि मारवाडी इत्यादिक भाषा त्या सर्व हींतून निघालेल्या आहेत. व ही स्वतः संस्कृत भाषेंतून निघाली आहे.

**हिंदुस्थान**– ज्यांत आपण राहतों असा हा एक मोठा विस्तीर्ण देश आहे. याच्या उत्तरेस व ईशान्येस हिमालय पर्वत आहे. पूर्वेस बंगालचा समुद्र आहे. दक्षिणेस व पश्चिमेस मोठा समुद्र. आणि वायव्येस सिंधुनदी आहे. काश्मीरापासून कन्याकुमारी पर्यंत याची दक्षिणोत्तर लांबी ९५० को-

स आणि कराची बंदरापासून आसामापर्यंत पूर्वपश्चिमरुंदी ७५० कोस आहे. ते-थून दक्षिणेकडे निरुंद होत होत जाऊन कन्याकुमारीपाशीं अगदीं निरुंद झा-ला आहे. याचें क्षेत्रफळ ६४३५०० आहे. व यांत लोकसंख्या सुमारें वीस कोटी आहे. याचे उत्तर मध्य आणि दक्षिण हिंदुस्थान असे तीन भेद आहेत. व यांत नर्मदेपासून पलीकडे विक्रम संवत् चालतो. आणि नर्मदेच्या दक्षिणेस शालिवा-हन शक चालतो. पुराणमता प्रमाणें हा भरतखंडाचा एक भाग होय असेंजरी पूर्वी मानीत असतील तरी हल्लीं हाच भरतखंड असें ठरलें आहे.

**हिममित्र**– मंडनमिश्राचा बाप. (मा. शं. वि. पहा.)

**हिमराम**– हा गुजराथी ब्राम्हण जातीचा कवि तोरणागांवचा राहणारा होय. हा सं-वत् १८६४ मध्यें होता. कर्मकथा हा ग्रंथ याचा आहे. या शिवाय पदें व गर्भे हेही आहेत. (का. दो. गु.)

**हिमालय**– हिंदुस्थानाच्या उत्तर सीमेवरील पर्वत. पुराणमता प्रमाणें ऋषीक दे-शाच्या उत्तरेस जो हिमालय आहे तो आमच्या प्राचीन कोशांत प्रथमार्थक म्हटला आहे. व हा द्वितीयार्थक म्हटला आहे. या कोशांत जेथें जेथें हिमालय हें नांव आलें आहे तेथें तेथें तें वाचकांनीं द्वितीयार्थक समजावें. कारण हल्लीं प्रथमार्थक हिमालयावर मधील अफाट व अतिशय थंड अशा समुद्राच्या व्यव-धानामुळें कोणाचीही गति नाहीं.

**हिरण्यकेशीनदी**– गडइंग्लंज पेठ्यांत सह्याद्रीचा जो भाग आहे, त्यांतून हिचा उ-गम आहे. भूदरगड व अजरें यांतून वहात ही बेळगांव जिल्ह्यांत गेली आहे.

**हिरण्यगर्भमत**– प्राणोपासकमत. हे पहिल्या शंकराचार्यांच्या वेळेस होतें. (आनं.)

**हिरालाल**– विष्णुस्वामीच्या गादीवरील पुरुष. केशवाचार्याचा पुत्र.

**हिरेशिंगवाणी**– एक साधु.

**हिसारा**– खांडववन जेथें होतें तेथें वसलेलें शहर. याचे उत्तर अक्षांश सुमारें २९ व पूर्व रेखांश ७५ आहेत. (प्रा. हिं. न.)

**हुएनसंग**– चीन जातीचा गृहस्थ. हा बौद्धधर्मी होता. व हिंदुस्थानांत आपल्या धर्मस्थापकांच्या जागा पाहण्या करितां यात्रे निमित्त इकडे आला होता. श-के ५५१ तागाईत ५६७ पावेतों सोळा वर्षें हा हिंदुस्थानांत हिंडत होता त्या वेळेस यानें येथें जें जें पाहिलें तें तें सर्व लिहिलें. त्यांत काश्मीरच्या हर्ष राजा-चें चरित्र सविस्तर लिहिलें आहे. व त्यांत बाणभट्टाच्या नांवाचा उल्लेख आहे.

**हुगळी**– भागीरथीनदीचा कलकत्या जवळचा फांटा.

**हुसंगाबाद**– जुनें नांव भांजकट नगर.

**हृदयप्रकाश**– निष्कुळानंदकृत गुजराथी भाषेंतील ग्रंथ.

**हेमचंद्र**– विशाला नगरीचा राजा.

**हेमचंद्रकाव्य**– हेमचंद्र पंडित कृत संस्कृत भाषेंत. याचे सर्ग २० व श्लोक ३५०० आहेत. लेशाभयतिलक नांवाची टीका ती यावरच आहे.

**हेमचंद्रपंडित**– तेविसावा तीर्थकर पार्श्वनाथ त्याच्या शिष्य परंपरेंत होऊन गेलेला पंडित. हा पाटणा शहरचा मूळचा राहणारा होता, असें समयविलोक ग्रंथावरून समजतें. यानें शके १०९५ मध्यें कुमारपाल नामक गुजराथेंतील राजास जैनधर्मी केलें.गुजराथेमध्यें जैन धर्म याच्याच पासून फैलावला. याला हेमराज किंवा हेमाचार्यजी असें जैनलोक ह्मणतात. यानें केलेलें एक व्याकरण आहे. व त्याचे सूत्राध्याय सात आहेत. अनेकार्थ वैरच ज्यास हेमकोश म्हणतात तो ग्रंथ याचाच आहे. हेमचंद्र काव्य, अलंकार चूडामणि, अभिज्ञान चिंतामणि आणि महावीर चरित हे ग्रंथ यानेंच रचलेले आहेत. (क.च.)

**हेमचंद्रव्याकरण**– हेमचंद्रकृत.

**हेमराज**– हेमचंद्रपंडित तोच.

**हेमाचार्यजीजती**– हेमचंद्र पंडितास सन्मानार्थक नांव.

**हेमाडपंत**–हेमाद्रिपंत तोच.

**हेमाद्रिपंत**– हा जातीचा ब्राम्हण बिह्यान्ही होता असें म्हणतात. पैठ्णामध्यें शके ११२५त जो चंद्रसेन नांवाचा राजा होता त्याचा हा दिवाण असे. असें सांगतात कीं, हा वैद्यक्रियेंत मोठा निपुण असल्या मुळें, बिभीषणानें यास लंकेस नेलें होतें. कारण त्यास अन्नद्वेष झाला होता. तो यानें बरा केल्या वरून बिभीषणानें यास अपरिमित सोन्याच्या विटा बक्षीस करून व त्यांच्या मोठ्या राक्षसांच्या डोक्यावर देऊन परत हिंदुस्थानांत पोंहोंचविलें. त्या द्रव्यावर यानें हजारों देवालयाचीं वगैरे कामें केलीं. यानें जीं जीं कामें केलीं त्यांस चुना म्हणून लागलाच नाहीं. अशी कांहीं इमारती बांधण्याची याची तऱ्हा व कला होती. व याच्या कामाची बांधणी तेंगणी असून दारें लहान अशा प्रकारची असे.

हा मोठा गणपति उपासक व लिहिण्याच्या कामांत फारच हुशार असा असे. मोडी अक्षराची लिपी यानेंच काढिली म्हणून सांगतात. हल्लीं जो पत्र-

व्यवहार महाराष्ट्रांत चालू आहे त्याचे मायने म्हणजे कोणी कोणास पत्र कसें लिहावें ती रीत मूळ यानें पाडली. त्या विषयीं लेखन पद्धति म्हणून याचा जो ग्रंथ आहे त्यांत त्या गोष्टी सविस्तर सांगितल्या आहेत. आम्हांस याचा वर सांगितलेला ग्रंथ सांपडला नाहीं. तथापि ऐकण्यांत असलेला एक मायना आहे तो वाचकांस पाहण्या साठीं खालीं लिहिला आहे.

"विज्ञापना अशी कीं, राजश्री देवराव दादानीं" मजला विनति केली कीं"
"आमच्या सर्व भाउबंदांनीं" दीक्षित यांचा आश्रय करून समाईक जो इना"
"म आहे," तें क्षेत्र पितृसंपादित तेव्हां भागिलें असावें हें" विहित असून"
"विभाग न देतां उत्पन्न तेच घेतात." यास्तव आम्ही आहों तरी, कृपाक"
"रून त्या इनामांत" आम्हांस भाग येईल असें दीक्षित यांस स्नेहित की"
"सें एक पत्र द्यावें, या करितां लेखनांत येतें कीं," दादानीं जो वाका मं"
"ज समज विला असे तो" सत्य रितीनें ध्यानीं आणाल, विशेष लिहूणें"
"नकोच हे विनति""

या मायन्यांत विरामचिन्हें खालच्या बाजूस दिल्या प्रमाणें शब्द वाचले असतां सरळ पत्र दिसून येतें असें तर आंहेच. पण आणखी यांत विशेष असा आहे कीं, वरच्या खुणां प्रमाणें वाचल्यास त्या पांच आर्या आहेत असें वाचकांस तेव्हांच समजेल. यानें लिहिण्याचे प्रकार म्हणजे ऋगम २ ऋजू आणि सुसात्विक असे तीन कल्पिले असल्याचें ऐकतों. परंतु ग्रंथ न सांपडल्या मुळें त्या विषयीं कांहीं विशेष लिहितां येत नाहीं.

**हेरंबसुत**– हा वाममार्गी गाणपत्य उच्छिष्ट गणपति मताचा होता. श्रीमच्छंकराचार्यांनीं जसे तांत्रिक मार्गी शैव वैष्णव वगैरे मोडिले. त्याच प्रमाणें गाणपत्यही मोडिले. त्यांत याचेंही मत खंडित केलें. ( आ. शं. वि. प्र. १७).

**हेलाराज**– भर्तृहरीच्या कारिकांचे व्याख्याकार जे मुख्य दोन होते त्यांतील पुण्यराजाचा हा सोबती होता.

**हैदराबाद**– निजामाची हैदराबाद. जिला दक्षिण हैदराबाद म्हणतात ती एक. आणि दुसरी सिंधहैदराबाद.

**हैमकोश**– हेमचंद्र पंडितानें केलेला कोश.

**हैहयदेश**– चोली महेश्वराच्या आसमंतातच्या प्रदेशाचें जुनें नांव.

होळकरघराणें– पुणे जिल्ह्यांत निरानदीच्या कांठीं होळ म्हणून गांव आहे तेथें राहणाऱ्या एकां धनगराचा मुलगा मल्हारी नांवाचा होता. तो या घराण्याचा मूळपुरुष होय. हा लहान असतां खानदेशांत याचा मामा होता तेथें जाऊन कांहीं दिवस राहिला. परंतु शेळ्या मेंढ्या राखण्यां वांचून दुसरें काम नसल्यामुळें यास त्याचा कंटाळा येऊन हा नंदुरबार येथें गेला. व तेथें कांताजी कदम बांडे याजवळ चाकरीस राहिला. तेथें वाढतां वाढतां हा चांगला हुशार दिसल्या वरून, थोरल्या बाजीराव साहेबांनीं यास बांड्यापासून मागून घेऊन आपल्या लष्करांत ठेविलें. तेथून हा मोठा सरदार बनला. व याच्या राजधानीचें शहर इंदुर झालें.

याचा पुत्र खंडेराव होळकर तोही बापाप्रमाणेंच शिपाई होता. त्यास बायको होती तिचें नांव अहल्याबाई व पुत्राचें नांव माळीराव होतें. माळीराव व खंडेराव हे दोघे पितापुत्र लवकरच मरण पावले. त्या मुळें अहल्याबाईनें कांहीं वर्षें राज्य वहिवाटिलें. पुढें तिनें भाऊबंदां पैकीं तुकोजीरावास गादीचा अधिकारी करून ती शके १७१७ मध्यें मरण पावली. तुकोजी रावास काशीराव व मल्हारराव हे दोन औरस पुत्र; आणि विठोजी व यशवंतराव हे दोन दासीपुत्र होते. यांत काशीराव लवकरच मेला व मल्हाररावास दौलतराव शिंद्यानें ठार मारविलें. त्यांत यशवंतराव सांपडला असतांही तो त्यांतून एक डोळा फुटून निभावला. व त्यास धारच्या राजाचा आश्रय मिळाला.

पुढें यशवंतराव इंदुरास आला. व त्यानें काशीरावाच्या गरोदर स्त्रीस ठार मारवून दुसरा मल्हारराव त्याच्या खंडेराव नामक पुत्रास विषप्रयोग करविल्यानें त्यास वेड लागलें व तो लवकरच मेला. नंतर खंडेरावाची दासी तुळजाबाई कारभार पाहूं लागली असतां तिचा खून झाला. म्हणून दत्त छोटा मल्हारराव अधिकारी झाला. तो मरण पावतांच त्याच्या बायकोनें मार्तंडरावास दत्तक घेतलें. परंतु तोही लवकर मेला. मागून हरिहरराव किंवा हरिराव गादीचा अधिकारी झाला. आणि तो मरण पावल्या नंतर तुकोजीराव गादीचे अधिकारी शके १७६४ मध्यें झाले. हल्लीं हे विद्यमान आहेत. येणें प्रमाणें या घराण्याची हकीकत शके १६५४ पासून १८०१ पावेतों आहे. (हिंदु० छा० इति०).

क्षपणक– पूर्वी ज्या चार्वाकाचें वर्णन केलें त्याचें व याचें मत एकच आहे. याचें जन्म युधिष्ठिर शकाच्या ६६२व्या वर्षीं विभवसंवत्सरीं पयोष्णी नदीचे तीरीं

चित्रकूट पर्वताच्या जवळील चंद्रपुर येथें श्रावण शुद्ध ९ मीस झालें. याच्या बापाचें नांव गुणमंगल आणि आईचें नांव भानुकला होतें. हा पुढें युधिष्ठिर शक ७२६ अंगिरा संवत्सरीं आभीर देशांतील स्वप्रकाश क्षेत्रांत ज्येष्ठ शु० ९ मीस मरण पावला. याच्या मतांत चार्वाक मतापेक्षां विशेष होता तो असाः—

अधोगच्छति भूगोल ऊर्ध्वंगच्छंति नित्यशः
जीवाः सर्वे महाभागा देहपाता दनंतरम्॥१॥

अर्थ:- पृथिवी नेहेमीं खालीं चालली आहे ती तशीच सतत जात राहणार. आणि देहपातानंतर त्यांतून निघालेला जीव सतत वर जात राहणार.

२— क्षपणक हें नांव पहिल्याचें मात्र विशेष नांव होतें. परंतु पुढीलांचीं तीं तशीं नव्हतीं म्हणजे प्रत्येकांचीं विशेष नांवें निराळीं होतीं असेंच दिसून येतें. यास प्रत्यंतर असें आहे कीं भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्य यांचा वाद ज्या क्षपणिकाशीं झाला व त्यास त्यांनीं जिंकिलें त्याचें नांव पूर्णसमय होतें. (आनं० शं० वि० प्र० ४६ पहा.).

३— विक्रमादित्याच्या सभेंतील नऊ पंडित रत्नांत होता दुसरा पंडित तो. याचेंही विशेष नांव निराळें असलें पाहिजे. परंतु तें श्लोकांत दाखविण्यांत आलें नाहीं.

क्षमाषोडशी— वेदांताचार्यकृत संस्कृत भाषेंतील ग्रंथ.

क्षिप्रानदी— शंखोद्धार क्षेत्राजवळ चर्मण्वती नदीस मिळालेली नदी.

क्षीरतरंगिणी— क्षीरस्वामीकृत व्याकरण विषयावरील ग्रंथ.

क्षीरस्वामी— काश्मीर येथील जयापीड राजाचा गुरु. यानें धातुपाठ, निपाताव्ययोपसर्गपाठ, लिंगसूत्रें आणि क्षीरतरंगिणी इतके ग्रंथ लिहिले. जयापीड शके ७२५ मध्यें होता. म्हणून हाही त्याच वेळचा म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. (बु० का० शो०).

२— शके १४२३ मध्यें प्रतापरुद्र राजाच्या आश्रयास होता पंडित तो. याची अमरावर टीका असून शिवाय क्षीरस्वामी निघंट म्हणून एक कोशही आहे. हा मोठा नियमानें वागणारा असल्यामुळें बहुत दिवस वांचला होता असें म्हणतात. (क० च०)

क्षीरस्वामीनिघंट— क्षीरस्वामीनें केलेला कोश. याचे श्लोक १००० आहेत. (रा०)

क्षुद्रक— कलियुगांतील सूर्यवंशी राजा प्रसेनजित त्याचा पुत्र व रणकराजाचा बाप.

**क्षेत्रज्ञ**— शिशुनागवंशीय क्षेमधर्मा राजाचा पुत्र व बिंबिसार राजाचा बाप. (रा०)

**क्षेम**— मागध राजांतील शुचिराजाचा पुत्र. व सुव्रत राजाचा बाप. (राजमा०)

**क्षेमक**— युधिष्ठिरवंशीय निमिराजाचा पुत्र. यास पुढें संतति नव्हती. हा युधिष्ठिराच्या वंशांत राजा झाला. कारण येथून युधिष्ठिराचावंश संपला. तो असा-कीं, हा गादीवर असतां याच्या वीरसेन नामक प्रधानानें यास मारिलें. व आपण राजा होऊन आपली गादी त्यानें कौशांबी नगरांतून काढून इंद्रप्रस्थ (दिल्ली) येथें नेली. तेव्हां पासून दिल्ली शहर राजधानी झालें. ही गोष्ट युधिष्ठिर शकाच्या १८५४ व्या वर्षी घडली. क्षेमक राजास लक्ष्मीदेव असें दुसरेंही नांव होतें. (रा. मा.)

**क्षेमगुप्त**— काश्मीर येथें होऊन गेलेला एक राजा. हा शके ८७२ व ८८० इतक्या काळांत होता. (बु. का. शो.)

**क्षेमधर्मा**— शिशुनागवंशीय राजा. काकवर्ण राजाचा पुत्र व क्षेत्रज्ञाचा बाप. (रा.)

**क्षेमराज**— काश्मीराकडे झालेल्या अभिनवगुप्ताचा शिष्य. हा शके १००० राच्या सुमारांत होता. (बु. का. शो.).

**क्षेमेंद्र**— यास व्यासदास असेंही म्हणत. हा शालिवाहनाच्या १० व्या शतकांत होता. हाही क्षेमराजा प्रमाणेंच अभिनव गुप्ताचा शिष्य होता. बृहत्कथामंजरी, भारतमंजरी, कलाविलास, राजावली, रामायणमंजरी, दशावतारचरित, समयमातृका, व्यासाष्टक, सुवृत्ततिलक, लोकप्रकाशकोश, नीतिकल्पतरु, चारुचर्या इत्यादि ग्रंथ याचे आहेत. याच्या बापाचें नांव प्रकाशेंद्र होतें. याच्या वेळेस काश्मीर येथें अनंत राजाची कारकीर्द होती. (बु. का. शो.)

## ज्ञ.

**ज्ञानकंद**— श्रीमच्छंकराचार्यांच्या शिष्यांतील एक सन्यासी.

**ज्ञानगीता**— जगजीवन स्वामीकृत गुजराथींत.

**ज्ञानगिरि**— बोधगिरीचा शिष्य व सिंहलगिरीचा गुरु.

**ज्ञानज्योति**— गंगाधर सरस्वतीच्या सात शिष्यांतील एक.

**ज्ञानदेव**— विष्णुस्वामीच्या मागून त्याची गादी चालविणारा पहिला पुरुष.

२— ज्ञानेश्वर जो निवृत्तीचा भाऊ तोच.

३— मानभावांत झालेला पुरुष तोच. निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, आणि मुक्ताबाई अशीं चार भावंडें मानभाव पंथांत झालीं होतीं असें म्हणतात. कित्येक म्हणतात कीं अभंगांत नांव घालण्या पुरतींच तीं नांवें होतीं. यरुन:त्या

कोणी त्याच नांवाच्या व्यक्ति हीत्या असें नाहीं. असो. तें कांहीं का असेना. डोळे दडपून जे काळे पिवळे रंग दिसतात त्यांवर जेवढे अभंग किंवा ओंव्या आहेत त्या यांच्या होत. खरा ज्ञानदेव किंवा मुक्ताबाई यांची तशा प्रकारची कविता मुळींच नाहीं. कारण ते वास्तविक ब्रह्मात्मज्ञानी होते. (वृद्ध माहिती.)

**ज्ञानमूळ**— जगजीवन स्वामीकृत गुजराथी भाषेंत.

**ज्ञानमोदक**— हा एक प्राकृत ओंवीबद्ध ग्रंथ गोसावीनंदन यानीं केलेला आहे. याचीं प्रकरणें २१ आहेत.

**ज्ञानविमल**— जैनधर्मा विषयींचा ग्रंथ लिहिणारा हा एक जती होता. (का० दो०)

**ज्ञानविलास**— सुंदर कविकृत हिंदुस्थानी भाषेंत हा ग्रंथ आहे.

**ज्ञानश्री**— बौद्धधर्मविषयक एक ग्रंथकार.

**ज्ञानसमुद्र**— सुंदर कविकृत हिंदुस्थानी भाषेंत.

**ज्ञानेंद्रसरस्वती**— प्रौढ मनोरमेवरील मोठ्या टीकेचा लिहिणारा. व सिद्धांत कौमुदीवर तत्त्वबोधिनी म्हणून जी टीका आहे तिचा कर्ता. (क० चं०).

**ज्ञानेश्वर**— प्रख्यात जे निवृत्तिनाथ त्यांचा हा धाकटा भाऊ, व शिष्य होता. याचें जन्म शके ११९४ मध्यें झालें होतें. सर्व लोकमान्य जो ज्ञानेश्वरी ग्रंथ तो यानें १२१२ मध्यें लिहिला. अनुभवामृत ज्यास कोणी अमृतानुभव म्हणतात तो ही ग्रंथ याचाच आहे. व तो ज्ञानेश्वरीच्या मागून झालेला आहे. ज्ञानेश्वराचें वर्णन महिपति बावांनीं भक्तविजयाच्या आठव्या व नवव्या अध्यायांत सविस्तर लिहिलें आहे.

ज्ञानेश्वराच्या अंगांत इतर भावंडां पेक्षां चळवळ अधिक होती, असें त्यानें रेड्याकडून वेद बोलविला व अग्नि आणि पाणी यांच्या साह्या वांचून निर्जीव भिंत चालविली वगैरे गोष्टीं वरून दिसून येतें. शिवाय नामदेव शिंपी, गोरा कुंभार, कबीर इत्यादि भक्तमंडळांशीं स्नेह जोडण्या करितां यानें वारंवार पंढरीस जाऊन पांडुरंगा पुढें भजन व कीर्तनही करावें. सारांश असें करण्यापासून वारकऱ्यांत याची मान्यता व प्रख्याति याच्या इतर भावंडां पेक्षां अधिक झाली. यानें अभंग पुष्कळ लिहिले आहेत. त्यांत केवळ विठोबास अनुलक्षून हा अभंग आहे:—

रूप पाहतां लोचनीं॥ सुख झालें हो साजणीं॥१॥ तो हा विठ्ठल बरवा॥ तो हा माधव बरवा॥ध्रु०॥ बहुत सुकृतांची जोडी॥ म्हणुनी वि-

डुलीं आवडी ॥ तोह्या० ॥२॥ सर्व सुखांचें आगर ॥ बाप रखुमादेवीवर तोह्या० ॥३॥

'बाप रखुमादेवीवर' असें नांव अभंगांत लिहिण्याचा याचा परिपाठ असे. म्हणून असे जेवढे अभंग आहेत तेवढे ते सर्व याचे समजावे. ज्ञानदेव असेंही नांव कोठें कोठें आहे. असो. वर आह्मी असें लिहिलें आहे कीं, ज्ञानेश्वरी ग्रंथ यानें लिहिला. त्यांत याचें उपमादिक लिहिण्याचें चातुर्य कसें आहे तें वाचकांस कळावें या साठीं अध्याय १८ यांतील ओंव्या खालीं दिल्या आहेतः—

नहुषु स्वर्गाधिपति झाला ॥ परी राहाटीं भांबावला ॥ तो भुजंगत्व पावला ॥ नेणशी काई ॥ १४७९ ॥ म्हणोन बहुत पुण्य तुवां ॥ केलें तेणें धनंजया ॥ आजि शास्त्रराजा इया ॥ झालाशी विषय ॥ ८० ॥ तरी यंयाच शास्त्राचेनि ॥ संप्रदायें पांघुरोनी ॥ शास्त्रार्थ हा निकेनी ॥ अनुष्ठीं हो ॥ ८१ ॥ येऱ्हवीं अमृत मथना ॥ सारिखें होईल अर्जुना ॥ जरी रिघसी अनुष्ठाना ॥ संप्रदायेंवीण ॥ ८२ ॥ गाय धड जोडे गोमटी ॥ ते तेंच पयदे किरीटी ॥ जें जाणिजे हातवटी ॥ सांजवणीची ॥ ८३ ॥ तैसा श्रीगुरु प्रसन्न होय ॥ शिष्यविद्याही कीर लाहे ॥ परि ते फळे संप्रदायें ॥ उपासिलिया ॥ ८४ ॥ म्हणोन शास्त्रीं जो इये ॥ उचित संप्रदाय आहे ॥ तो ऐक आतां बहुवे ॥ आदरेंशीं ॥ ८५ ॥ तरी तुवां हे पार्था ॥ गीताशास्त्र लाधलें आस्था ॥ तें तपोहीना सर्वथा ॥ सांगावें नाहीं ॥ ८५ ॥ अथवा तापसही झाला ॥ परी गुरुभक्तीशीं जो ढिला ॥ तो वेदीं अंत्यजु वाळिला ॥ तैसा वाळीं ॥ ८७ ॥ ना तरी पुरोडाश जैसा ॥ न घापे वृद्ध ही वायसा ॥ गीता नेदी तैसी तापसा ॥ गुरुभक्तिहीना ॥ ८८ ॥ का तपही जोडे देहीं ॥ भजे गुरु देवाचे ठायीं ॥ परी आकर्णनीं नाहीं ॥ चाड जरी ॥ ८९ ॥ तरी मागील दोहीं अंगीं ॥ उत्तम होय कीर जगीं ॥ परी या श्रवणालागीं ॥ योग्यु नव्हे ॥ ९० ॥ मुक्ताफळ भलतैसें ॥ होय परी मुख नसे ॥ तंव गुण प्रवेशो ॥ तेथें कायी ॥ ९१ ॥ सागरु गंभीरु होय ॥ हें कोण ना ह्मणत आहे ॥ परी वृष्टि वायां जाय ॥ झाली तेथें ॥ ९२ ॥ धालिया दिव्यान्न सुवावें ॥ मग जें वायां धाडावें ॥ तें आर्तींचि कां न करावें ॥ उदारपण ॥ ९३ म्हणोन योग्य भलतैसें ॥ होतु जरी का चाड नसे ॥ तरी झणें वानीवसें ॥ देसी हें तया ॥ ९४ ॥ रूपाचा सुजाणु डोळा ॥ वोडवूं पे काई परिमळा ॥

जेथें जें मानें तें फळा॥ तेथेंच येगा॥ ९५॥ म्हणोनि तपीं भक्तीं॥ पहांवे ते सुभद्रा पति॥ परी शास्त्र श्रवणीं अनासक्ति॥ वाळावेचि ते॥ ९६॥ तयांतें तप भक्ति॥ होऊन श्रवणीं आर्ती॥ आथी ऐसीही आयती॥ देखसी जरी॥ ९७॥ तरी गीताशास्त्र निर्मिता॥ जो मी सकळ लोक शास्ता॥ तया मातें सामान्यता बोलेल जो॥ ९८॥ माझ्या सज्जनेंसीं मातें॥ पैशून्याचेनी आव्हातें॥ एक आहाती तयातें॥ योग्य न म्हण॥ ९९॥ तयाची येर आघवी॥ सामग्री ऐसी जाणावी॥ दीपेंवीण ठाणदिवी॥ रात्रींची जैसीं॥ १५००॥ आंग गोरें आणि तरुणें॥ वरी लेइलें असें लेणें॥ परी एक लेनी प्राणें॥ सांडिलें जेवी॥ १॥ कीं सोनयाचें सुंदर॥ निर्वाळिलें होय घर॥ परी सर्पांगना द्वार॥ रुंधलें आहे॥ २॥ नातरी दिव्यान्न चोरवट॥ परी माजी काळकूट॥ असो मैत्री कपट॥ गर्भिणी जैशी॥ ३॥ तैसीच तप भक्ति मेधा॥ तयाची जाण प्रबुद्धा॥ जो माझ्यांची का निंदा॥ माझीच करी॥ ४॥ या कारणें धनंजया॥ तो भक्तु मेधावी तपिया॥ तरी नको बापा इया॥ शास्त्रा आतळों देवों॥ ५॥ म्हणोन तपाचा धनुर्धरा॥ तळीं दाटोन गाडोरा॥ वरी गुरुभक्तीचा पुरा॥ प्रासादु झाला॥ ६॥ आणि श्रवणेच्छेचा पुढां॥ दारवंठा सदा उघडा॥ वरी कळसू चोरवडा॥ अनिंदा रत्नाचा॥ ७॥ ऐशिया भक्तालयीं गोमटी॥ गीता रत्नेश्वर हा प्रतिष्ठीं॥ मग माझिया संवसाटी॥ तुकसी जगीं॥ ८॥ १०९

---

भरुण अंगा जवळिकें॥ म्हणोनि सूर्यातें देखें॥ माभू तळींची न देखे॥ मुंगी कायी॥ १७२०॥ म्हणून आम्हां प्राकृतां॥ देशी कारें बंधे गीता॥ म्हणणें हें अनुचिता॥ कारण नोहे॥ २१॥ आणि बाप पुढां जाय॥ तें घेत पाउलांची सोय॥ बाळ ये तरी न लाहे॥ पावों कायी॥ २२॥ तैसा व्यासाचा मागोवा घेतु॥ भाष्यकारा वाट पुसतु॥ अयोग्य ही मी न पवतु॥ कें जाईन?॥ २३॥

---

त्रिभुवनेंक पवित्र॥ अनादि पंचक्रोश क्षेत्र॥ तेथें जगाचें जीवन सूत्र॥ श्रीमहालया असे॥ १८०४॥ तेथें यदुवंश विलास॥ जो सकळ कळा निवास॥ न्यायातें पोषी क्षितीश॥ श्रीरामचंद्र॥ ५॥ तेथें महेशान्वय संभूतें॥ श्रीनिवृत्तिनाथ सुतें॥ केलें ज्ञानदेवें गीतें॥ देशी कार लेणें॥ ६

जें उपनिषदांचें सार॥ सर्व शास्त्रांचें माहेर॥ परम हंसीं सरोवर॥ सेविजे जें॥८॥ तिये गीतेचा कलश॥ संपूर्ण हा अष्टादश॥ म्हणे निवृत्तिदास ज्ञानदेवो९॥ शके बाराशतें बारोत्तरें॥ तैं टीका केली ज्ञानेश्वरें॥ सच्चिदानंदबावा आदरें॥ लेखकु झाला॥१८१०॥

## अनुभवामृतशब्दखंडन प्रकरण ६.

बाप उपेगी वस्तु शब्दु॥ जो या धरासधर नादु॥ अमूर्ताचा विशदु॥ आरिसा नव्हे?॥१॥ पाहतें आरसा पाहे॥ येथें कांहींच नवल नव्हे॥ परीदर्पणें येणें होय॥ न पाहतें पाहातें॥२॥ वडील अव्यक्ताचिया वंशा॥ उद्धरकारु सूर्य जैसा॥ येणें एकें गुणें आकाशा॥ अंबरत्व॥३॥ आपण तरी खपुष्प॥ परी फळ दे जगद्रूप॥ शब्द मविते माप॥ कोण आहे॥४॥ विधिनिषेधाचिया वाटा॥ दाविता हाचि दिवटा॥ बंधमोक्ष कळिकटा॥ शिष्टु हाच॥५॥ शब्दा शिवाच्या शरीरीं॥ कुमारुचि हा जिऊसरीं॥ जेवि अंगें पंचाक्षरी॥ तेवींच बोलु॥६॥ जीव देहीं बांधला॥ तो बोलें एकें सुटला॥ आत्मा बोलें भेटला॥ आपणया॥८॥ जे प्रवृत्ति आणि निवृत्ति॥ विरुद्धा इया हात धरिती॥ मग शब्देंच चालती॥ एकलेनी॥११॥ किंबहुना शब्दु॥ स्मरणदानी प्रसिद्धु॥ परी यथाहि संबंधु॥ नाहीं येथें १२

या उताऱ्यां वरून ज्ञानेश्वराची भाषासरणी जी दिसून येते तीवरून लोकांचें असें अनुमान आहे कीं, त्या वेळेस भाषाच तशी होती. व आणखी तिजमध्यें छप्पन्न भाषांचेही शब्द आहेत. परंतु तें अनुमान खरें नाहीं. कारण स्वतः ज्ञानेश्वरानें केलेला जो हरिपाठ त्यांतीलच भाषा यास प्रत्यक्ष साक्ष असून याच्यापूर्वीं होऊन गेलेले मुकुंदराज व हेमाद्रिपंत त्यांची ही साक्ष पाहतां वरील अनुमान सिद्ध होत नाहीं. आतां तीन छपन्न भाषांतील शब्द आहेत असें जर म्हणावें तर बंगाली, तेलंगी, द्राविडी या भाषांतील किंवा सिंधी वगैरे भाषांतील शब्द ज्ञानेश्वरींत एकही आढळत नाहीं. म्हणून हेंही म्हणणें व्यर्थ आहे.

ज्ञानेश्वरींत कायतो कानडी भाषेंतील वारंवार शब्द आलेला सांगारें एवढा आढळतो. व तेवढ्या वरूनच जर तीन छप्पन्न भाषा आल्या असें कोणी म्हणेल तर तें म्हणणें, जसें कानडी भाषेंत नाकास मूग म्हणतात तेव-

द्या वरून तोंडास मटकी, डोळ्यांस उडीद म्हणावें या म्हणण्या प्रमाणेंच वेडेपणा-चें होईल. सारांश ज्ञानेश्वरींत अपरिचित शब्द जे कित्येक वाटतात ते प्रायः संस्कृताचे अपभ्रंशच फार आहेत. कांहीं थोडे कुळंबाऊ शब्द आहेत व ते गोजिरवाणे दिसण्या करितां बुद्ध्या लाडकेपणानें लिहिले आहेत. जसे गंगा, यमुना, गोदावरी, बाळकृष्ण इत्यादि नांवाचा उच्चार गंगु, यमु, गोदु, बाळू असा करितात. त्याच प्रमाणें पार्थ, अर्जुन, कृष्ण, इत्यादि नांवें पार्थु, अर्जुनु, कृष्णु, अशीं ज्ञानेश्वरानें लिहिलीं आहेत. उदाहरणार्थ पुढील ओंवी पहा:– "गोडी आणि गुळु॥ कापुरु आणि परमळु॥ निवडूं जातां पांगुळु॥ निवाडु होय॥" या विषयावर आम्हीं पूर्वी हंसकोश (कवितां मधील कठिण शब्दांचा कोश) लिहिला. त्यांत जे सोळा नियम दाखल केले आहेत तेथें असे शब्द कवि कां लिहितात त्याचें विवरण केलें आहे.

ज्ञानेश्वराची समाधि अळंदीस आहे. व ती त्यांच्या वयाच्या २९व्या वर्षी झाली असल्याचें लोक बोलतात. ज्ञानेश्वराच्या प्रसिद्धी मुळें त्याच्या इतर भावंडांचीही प्रसिद्धि झाली. हल्लीं सर्व भावंडां पेक्षां याची मान्यता वारकऱ्यांत इतकी आहे कीं, जसे मनिमहिन्यांतील शुक्लपक्षींच्या एकादशीस पंढरीस जाणारे हजारों वारकरी आहेत, तसेच कृष्णपक्षीं एकादशीस अळंदीसही जाणारे आहेत.

**ज्ञानेश्वरी**— ज्ञानेश्वरानें केलेली भगवद्गीतेवर मराठी भाषेंत टीका. हिला भावीक वारकरी आई म्हणतात. यांत तात्पर्य इतकेंच कीं, या ग्रंथाची मान्यता त्या लोकांत इतकी मोठी आहे.

समाप्त.

श्री.

## या कोशांत जे शब्द घालण्याचे राहून गेले व किल्येक नवे आढळले ते येणें प्रमाणें.

---

**अकोलें**— हा गांव वऱ्हाडांत आहे. व हा हल्लीं जिल्ह्याची जागा आहे.

**अजरें**— हा तालुका कोलापुराच्या नैर्ऋत्येस त्याच भांतीं आहे.

**अनंतकवि**— भारतचंपूचा कर्त्ता.

**अश्वघोष**— हा एक मोठा जैन पंडित होऊन गेलेला आहे. हा कधीं होता हें जरी निश्चित समजत नाहीं तरी तो भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्यांच्या आधीं होऊन गेलेला आहे. कारण यानें ब्राम्हण म्हणजे जीव नव्हे, ब्राह्मण म्हणजे देह नव्हे इत्यादिक विकल्प करून, व शेवटीं ब्राम्हण नाहींच असा निश्चय ठरवून, वज्रसूचि नांवाचा त्या विषयीं एक ग्रंथ लिहिला. त्याचें खंडन आचार्यांनीं केलें आहे, व तें त्याच्याच पुढें जोडून त्याचें नांव वज्रसूचि उपनिषत् ठेविलें आहे.

**अळतें**— कोलापूर इलाख्यांतील हा एक पेटा आहे.

**आत्मानुभव**— सखाराम बावा गाडगीळ वांईकर यानीं वेदांतविषयावर लिहिलेला मराठी भाषेंत ओंवीबद्ध ग्रंथ तो.

**इंदुरबोधलें**— हा गांव वऱ्हाडा मधला आहे. येथें मालोपंत राहात असे.

**इंद्रद्युम्न**— हा राजा कोठला तें समजत नाहीं. मात्र हा अर्वाचीन काळचा असें खास दिसून येतें. कारण यानें जगन्नाथाची स्थापना केली. ती कृष्ण निजधामास गेल्यावर केली.

**कर्कोटकुळ**— कर्कोटक नागवंशांतील राजांचें कुळ तें.

**कलभूर्य**— हा एक राजवंश कलचुरी नांवानें प्रख्यात आहे. परंतु या नांवाचें मूळ समजत नाहीं.

**कुंतलपुर**— हा गांव गुजराथेंत आहे.

**खुसरुबादशाहा**— इराणदेशाचा बादशाहा. हा त्या देशांत मुसलमान लोकांचा पैगंबर जो महंमद त्याच्या जन्मापूर्वी तेथें राज्य करीत होता. शालिवाहन शके ४५३ पासून ५०१ पावेतों यानें ४८ वर्षें राज्य केलें. त्याच वेळांत यानें पंचतंत्र ग्रंथाचा संक्षेप जो हितोपदेश, त्याचें भाषांतर पारसी भाषेंत

करविलें असें गिबन साहेबांनीं लिहिलें आहे.

**खेड**— हा गांव पुणेजिल्ह्यांत भीमेच्या कांठीं आहे.

**खेडराहाटागर**— रत्नागिरी जिल्ह्यांतील गांव.

**गडहिंग्लज**— कोलापुर प्रांताचे खालसा आणि दुमाला असे जे दोन विभागआहेत त्यांतील खालसा विभागा पैकीं सहा पेठ्यांतील एक पेटा तो.

**गन्नवरम**— हा गांव मद्रासेकडे आहे.

**गोवर्धनभट्ट**— यांचें प्रसिद्ध नांव गट्टूलालजी पंडित असें आहे. हे तैलंग ब्राह्मण व वल्लभमतानुयायी आहेत. वेदांतचिंतामणि इत्यादि संस्कृत ग्रंथ यानींच केलेले आहेत. यांची बुद्धि तीव्र असून शीघ्र कवित्व हा गुण यांच्या अंगीं अपूर्व आहे. हे हल्लीं मुंबई येथें विद्यमानआहेत.

**घर्घरनद**— गोग्रानदीसच नांव आहे, असें ह्मणतात.

**चितपुर**— गुजराथे मधील एक गांव.

**तोरगळ**— हा गांव बेळगांव जिल्ह्यांत रामदुर्गा जवळ आहे. येथील लोक मलप्रभेचें पाणी पितात.

**देवासें**— हें एक लहानसें संस्थान माळव्यामध्यें इंदुराच्या ईशान्य दिशेस आहे. येथील राजा पवार उपनांवाचा आहे व तो धारच्याच राजघराण्यांतीलआहे.

**द्वादशीक्षेत्र**— अंबरीष राजानें द्वादशीचें पारणें येथें केलें. त्या वरून यास हें नांव पडलें. नामदेवानें आपण लिहिलेल्या अभंगांत याचा उल्लेख केलाआहे. त्या वरून हें नांव याच्या क्षेत्र माहात्म्यांत असेलसें वाटतें. यास हल्लीं बारशी कां म्हणतात त्या विषयीं बारशी शब्द पहा.

**बोधायनाचार्य**— व्याससूत्रांवर यानेंही वृत्तिनांवाची व्याख्या लिहिलेलीआहे. परंतु सुरेश्वराचार्यांनीं लिहिलेल्या वृत्ति व त्यांच्या योगानें त्यास सकलमान्य पडलेलें वार्तिककार नांव तसें यास नाहीं. आणि त्यावरून हा त्यांच्या मागचा आहे असें दिसून येतें.

**ब्रह्मसूत्रवृत्ति**— व्याससूत्रांवरील वृत्ति. ही एक सुरेश्वराचार्यकृत व दुसरी बोधायनाचार्यकृत अशी दोन प्रकारची आहे.

**भामती**— वाचस्पति मिश्राची बायको. ही मोठी विद्वान् होती. कल्पतरु ग्रंथावर हिनें संस्कृत टीका लिहिली आहे.

भाषाविवृत्ति– भगवद्गीतेवरील रघुनाथशास्त्री पर्वते कृत गद्यरूप टीका.

भूदरगड– कोलापुर प्रांतांतील तालुक्याचा गांव. हा त्याच्याच पूर्वेस आहे.

राजव्यवहारकोश– रघुनाथपंडित अमात्य कृत संस्कृत कोश. या मध्यें राजव्यवहारांत जेवढे पारसी भाषेचे शब्द आले आहेत, ते व त्या सगळ्यांस संस्कृत पर्याय दिले आहेत. जसें "शाहाजादो राजपुत्रो प्रधानः पेशवास्मृतः" इत्यादि.

राळेरास– हा गांव बालेघाटावर आहे.

वज्र– कृष्णाचा पणतु· कृष्ण निजधामास गेल्यावर द्वारका बुडाली असतां यास अर्जुनानें हस्तिनापुरास आणिलें. नंतर जेव्हां युधिष्ठिर महाप्रयाणास निघाला, तेव्हां त्यानें परीक्षितास हस्तनापूरच्या राज्यावर स्थापून याची स्थापना इंद्रप्रस्थ (दिल्ली) येथील राज्यावर केली. यानें व याच्या वंशजांनीं तेथें राज्य किती दिवस केलें त्या विषयीं कांहींच शोध लागत नाहीं. आणि परीक्षित वंशीय शेवटला राजा क्षेमक (लक्ष्मीदेव) त्यास त्याच्या वीरसेन प्रधानानें मारून कौशांबी नगरांतील गादी इंद्रप्रस्थास आणिली, त्या वेळेस यांचा वंशज तेथें कोणी होता असेंही दिसून येत नाहीं.

श्रीधरकवि– हा काश्मिराकडील राहणारा होता. याचा मूळगांव भूरिसृष्टि, होय. (बुल्ह॰ को॰ शोध·)

समास·

श्री.

# पुरवणी.

या पुरवणींत जो मज़कूर किंवा जीं अक्षरें ज्या स्थळीं जोडून वाचायाचीं, त्या स्थळीं तीं "  " अशा खुणेच्या मध्यें दाखविलीं आहेत, व सदरील खुणांच्या मागलीं व पुढलीं अक्षरें संदर्भला-गण्या साठीं दोन अगर तीन तेथें तेथें लिहून ठेविलीं आहेत. शिवाय जेथें नागमोडी रेघेची खूण केली आहे तेथें पुढीलस-र्व मजकूर वाचायाचा आणि जेथें ही खूण नाहीं, तेथें मजकू-र संपला अगर असला तर तो रद्द आहे असें समजायाचें.

| पृष्ठ. | ओळ. | |
|---|---|---|
| ३ | २४ | त्यांतील "एक्या बायकोची" अतिरूपवान् ~~~~ |
| ३ | २६ | त्यांतील "एक्या बायकोचा" मुलगा ~~~~ |
| ४ | २८ | असून "तिच्या" जवळच ~~~~ |
| ७ | २ | राजा. "हा" कैयदान्या वेळीं ~~~~ |
| ८ | १५ | भट्टकृत "प्राकृत श्लोकबद्ध" ग्रंथ. ~~~~ |
| ९ | २५ | उतरली "व" तिला ~~~~ |
| १३ | २ | सना "पूर्वी ४१ वर्षे" ठार मारून ~~~~ |
| १३ | २५ | दिशें"कडील" आदिपात्य ~~~~ |
| १४ | २६ | हे "तीन" वेदांत विषयाबरील ~~~~ |
| १५ | २ | मनुष्य "जाई" त्याजवळ. |
| १५ | १४ | असें "ह्मणाला" ~~~~ |
| १६ | २६ | कवि "मध्याचार्यांच्या मागून झाला." आंध्रप्रयोग ~~~~ |
| १९ | २९ | ह्मणून "तो" इतरानें ~~~~ |
| २० | ४ | होत "आलीं" आहेत. ~~~~ |
| २२ | १ | आहेत. "श्रीदत्त तोच याचा कर्ता आहे असें ३२व्या सर्गावरून समजतें. हा निरालंब उपनिषदावरील गद्यरूप व्याख्येवर लिहिलेला आहे." |

| पृष्ठ. | ओळ | |
|---|---|---|
| २३ | २८ | “हे” संवत्सर. ~~~~~ |
| २८ | ५ | उत्तराद्धांत “असलेला” काश्मीर येथील ~~~~~ |
| २९ | ७ | (ग्या॰को॰) “याच्या समाधीचें स्थान. अळते गांवाच्या पूर्वेस एका मैला-<br>वर असणाऱ्या डोंगराच्या माथ्यावर आहे. (मद्रा॰ व कर्ना॰ इतिहा॰)” |
| २९ | १८ | रेषा “ती” या नगरी वरून ~~~~~ |
| ३० | २ | त्याचे “ते” साहा भाग कल्पितात ~~~~~ |
| ३० | १४ | तेरु “वेल्लुवर” ~~~~~ |
| ३२ | ३ | राज्यास “जोडिलीं. मेवाड, मारवाड आणि भाटिया वगैरे प्रांतांत” ~~~~~ |
| ३२ | ६ | मुंगेरी “(मौंगीर)” शहरांत ~~~~~ |
| ३२ | ७ | बद्दलचा “संक्षिप्त” उतारा ~~~~~ |
| ३३ | १८ | करून “त्यांवर” सुंदर कवीनें ~~~~~ |
| ३४ | १०. | अहिक्षत्रा नगरी-टीप- “ही नगरी प्राचीन काळीं दक्षिण पांचाल दे-<br>शाची राजधानी असे. परंतु अर्वाचीन काळीं ती जैनांनीं जांगल दे-<br>शाची राजधानी ठरविली होती. या देशभेदा बद्दल शंका धरण्याचें<br>कारण नाहीं.” |
| ३९ | २३ | करावें. “असें” चालत असतां ~~~~~ |
| ४१ | २८ | हा “एक मोठा ज्योतिषी हिंदुस्थानामध्यें होऊन गेला. हा क्षपणकअ-<br>थवा जैनमताचा होता, असें ऐकण्यांत येतें” याला होऊन ~~~~~ |
| ४३ | १९ | रायलूच्या ~~~~~ |
| ४३ | २१ | कविता “जेव्हां” त्यानें पाहिली. |
| ४४ | १२ | देशासच ~~~~~ |
| ४५ | ९ | (संक्षे॰ जिन) “युधिष्ठिर उत्तरपंथास जाऊं लागला. तेव्हां परीक्षितास<br>व वज्रास क्रमानेंच हस्तिनापुरास व येथें त्यानें स्थापिलें होतें”<br>(वज्र) शा॰प. |
| ४९ | १७ | हुलमत, “त्याच्या गादीची ही पहिली जागा. उडुपी शक्रमणि असें-<br>ही या गांवास नांव आहे.” |
| ४९ | २२ | “यास हल्लीं दुसरें नांव कांहीं दिसत नाहीं. पहिलें नांव मात्र बुडालें |

| पृष्ठ. | ओ. | |
|---|---|---|
| | | आहे. परंतु हा पूर्वी एक नामांकित देश होता. याची राजधानी श्रावस्ती."---- |
| ४९ | २९ | -- ज्ञानकांडपर ब्रह्मसूत्रें. "याचे अध्याय ४ आहेत." व याच्यावर ---- |
| ५४ | ९ | संकटें आलीं. "तरी" ही यांनीं. |
| ५५ | २३ | आपल्या धर्माचा मुख्य आचार्य "समजून सर्वज्ञ" असें नांव देतात. |
| ५५ | २५ | (प्रब॰ शारो॰) "हा अर्वाचीन असल्यामुळें सौगत आणि बौद्ध हे यास आपला धर्माचार्य समजत नाहींत." |
| ६४ | १८ | याची सविस्तर कथा आहे. "अर्थात् सांख्य शास्त्रकर्ता प्राचीन असल्या मुळें, व हा अर्वाचीन असल्या मुळें, दोघे निरनिराळे आहेत." |
| ७० | २१ | (प्रा. हिं. न.) "परंतु हल्लीं कांहींच यास नांव नसून मूळचें नांव अगदींच बुडालें आहे." |
| ७७ | ७ | पूर्वरे॰ ७७° आहेत. "हें शहर कलबुर्ग्या जवळचें होय." "२- पुण्याहून मुंबईस जातांनां घांटा खालीं शहर वजो गांव आहे तो." |
| ७८ | २२ | "गुजराथेंतील एक प्रांत." सोरटी सोमनाथ यांतच आहे. |
| ८० | ९ | प्रसादानें झाला व "तो" राज्य न करितां ---- |
| ८९ | १३ | गाथा आहे. तो याच्याच संमतीनें ---- |
| ९० | ९ | – अशीं हिमालयाचीं दोन शिखरें आहेत. "हा हिमालय प्राचीन कोशांत जो द्वितीयार्थक सांगितला आहे तो समजावा." व पूर्वकिरातांत---- |
| ९१ | ८ | चालुक्य टीप – "ब्रह्मदेव अर्घ्य देत असतां, कांहीं संकट निवारणार्थ त्याकडे इंद्र आला. त्या बरोबर हाताच्या चुलुकांत (चुळक्यांत) जें पाणी होतें, त्या पासून त्यानें जो वीर उत्पन्न केला तो चालुक्य राजांचा मूळपुरुष. तेथून पुढें चालुक्यवंश चालू झाला. असें बिल्हण कवीनें आपल्या विक्रम काव्यांत लिहिलें आहे. (महा॰ व कर्ना॰ इ॰ पृष्ठ १११ तील टीप पहा.)" |
| ९७ | ४ | म्हणजे बौद्ध "यांनीं" श्रवण करून ---- |
| ९७ | ६ | रूपदर्श "जो" त्या प्रत ---- |

| पृष्ठ. | ओळ | |
|---|---|---|
| ९९ | ४ | कोडगू म्हणतात "केरल देशांतील हा एक प्रांत आहे. व कावेरी नदी यांतू न वाहात आहे." |
| १०२ | २७ | येणें प्रमाणें "क्रमानेंच" आहेस. —— |
| १०३ | ११ | पशुवध "फार" होतो म्हणून —— |
| १०७ | १२ | सांगडवाला "ह्मणाला एक पैसा घेईन" —— |
| १११ | १७ | वस्त्र नेसलेली "व" त्या वेळीं —— |
| १११ | १८ | मस्तकावरील "तिच्या" वेणीची लड खालीं सुटलेली "असून" तिनें स्तनास —— |
| ११२ | १० | संमन भाट "होता". त्यानें बादशाहाची मर्जी संतुष्ट केली "व" त्यावरून- |
| ११६ | ७ | ते सर्व "यानें" तेवरम —— |
| १२१ | १७ | तापी व पयोष्णी "या दोन नद्यांच्या" पूर्वेकडील —— |
| १२१ | २१ | "ही नदी कोठें आहे. तें कळत नाहीं." |
| १२३ | २७ | फडके "त्यांचे" चिरंजीव —— |
| १२९ | १९ | नाथांस "व" आपल्या नवऱ्यास नमस्कार करून, "तसेंच" मागील सर्व |
| १३४ | २७ | "हे शांकर मतानुयायी गाणपत्य होते." यांनीं केलेलीं पदें पुष्कळ प्रसिद्ध —— |
| १३४ | २८ | आहेत. "व ज्ञानमोदक हाही प्राकृत ओंवीबद्ध ग्रंथ यांचा आहे." |
| १३५ | १ | परम गुरु "असून" महा ज्ञानसंपन्न व —— |
| १३५ | ८ | फार जुना आहे "म्हणजे प्राचीन आहे." युधिष्ठिर शका आलीकडचा अर्वाचीन नव्हे." |
| १३८ | १२ | पदरीं असे. "याचें स्वत:चें नांव चतुर व बापाचें नांव साबाजी होतें." हा गृहस्थ "चांगला" विद्वान् होता. —— |
| १३८ | २४ | येथील राहणारा "होय." यानें भारतावर —— |
| १४० | १८ | राज्यकार "भार" चालविणारा —— |
| १४१ | ४ | "द्वितीयार्थक" जयदेव कविकृत. |
| १४३ | २ | (कवि०) "हा राजा शालिवाहन शका पूर्वीं १०० वर्षें होता." |
| १४५ | १ | कीर्ति "यानें" ऐकिली. "व ती" वरून असें सांगतात कीं, —— |

| पृष्ठ | ओ० | |
|---|---|---|
| १४७ | २० | बेदरच्या यवन "बांदशोहानें" एके वेळीं पंदरीस—— टीप– हा बादशा-हा कोणता व याचें नाव काय होतें त्याचा कि-त्ता लागला नाहीं. |
| १४८ | १९ | यांनीं सुमारें "पंधरा" वर्षा मागें —— |
| १४९ | २३ | आज तेहेतीसशें वर्षें "होऊन गेलीं" आहेत. |
| १५२ | १७ | असाप्रयोग हें "च" यास प्रत्यक्ष—— |
| १५३ | ५ | करीत नाहींत "कीं" काय? |
| १५६ | २१ | तो याच्या प्रमाणें विद्वान् नव्हता. "कारण," त्यानें आपला—— |
| १५७ | २६ | पर्वत "आहे" त्या खालचें पयोष्णा नदीच्या कांठचें शहर, "तेंही याच नांवानें मोडतें." |
| १६० | ३ | नैर्ऋत्य दिशेकडील देश. "याचें नांव हल्लीं बुडालें आहे." यांतून न-मसा—— |
| १६२ | २३ | लोकवार्त्ता आहे. "(इंद्रद्युम्न श०प०)" |
| १७० | २९ | कवी विषयीं "प्रसन्न राघव नामक स्वकृत ग्रंथांत येणें प्रमाणें लि-हिलें आहे."—— |
| १७१ | १२ | होऊन वयांत आल्यावर हा कविता करूं लागला. "याच्या कवितेंत कोमलता, शृंगार, व करुणरस पूर्ण आहेत. शिवाय शब्दालंका-र व अर्थालंकार यांचीही साधणूक चांगली आहे." |
| १७१ | १८ | गीतगोविंद "हा ग्रंथ याचा आहे. व तो गद्यपद्यात्मक आहे." त्यांत "या-नें कृष्णाचा विलास वर्णिला आहे. —— |
| १७१ | २४ | सभेंत गात असत. "म्हणून" या कवीस. —— |
| १७५ | ७ | कच्छवाह "म्हणवितात. हें नांव पडण्यास कारण काय? व त्याचा अर्थ काय? तें कांहीं कळत नाहीं." रामानुजाचार्यांची येथें गादी व म-ठ आहे. (तु·मा·). |
| १७७ | ९ | अयोध्ये जवळ पूर्वीं असलेलें नगर· "परंतु हल्लीं यास काय म्हणता-त तें समजत नाहीं." |
| १७७ | २१ | भास्कराचार्यांच्या जन्मभूमीचा गांव. "यासच हल्लीं बीड म्हणतात." (नि-बंधमाला अंक६५.) |
| १७८ | ७ | "हा हिस्तीयार्थुक हिमालयाच्या तोंडींच आहे· भारतांतील जांगलदेश चं |

| पृ० | ओ० | |
|---|---|---|
| | | हा एक नव्हत. जैन ग्रंथांत अहिक्षत्रा नगर तें याची राजधानी म्हटली आहे. संस्कृतामध्यें रखररखीत प्रदेशास जंगल म्हणतात. त्या-वरूनच जांगल शब्द उत्पन्न झाला आहे." |
| १८० | २१ | क्षत्रिय म्हणवितात. "परंतु या नांवाचें मूळ काय तें समजून येत नाहीं." |
| १८१ | १८ | हा "द्वितीयार्धक" हिमालयांत आहे. (प्रा० हिं० न०). |
| १८२ | १३ | – वहात जाणारी नदी. " (प्रा. हिं. न.) परंतु हिचा अलीकडील नकाशांत ठिकाण नाहीं." |
| १८२ | २३ | "हें नांव अजून चालू असेलसें वाटतें. तक्षशिला नगर तें हेंच. याचे अक्षांश व रेखांश प्राचीन हिंदुस्थानाच्या नकाशा वरून जे आम्ही दिले आहेत त्यांचा मेळ अलीकडील नकाशाशीं दिसून येत नाहीं. ही तरी त्या नकाशांत गोमच्च आहे." |
| १८३ | १७ | —– मठ व गादी आहे. "व ती गादीची तिसरी जागा आहे." |
| १८४ | १२ | मिदनापूर शहर आढळतें. "हें पूर्वी बंगालच्या पूर्वेस असणारा कर्वट देश त्याची राजधानी असे." |
| १८४ | २८ | रामानुजाचार्यांच्या "पहिल्या" गादीचें नांव. |
| १८५ | २ | त्रिविष्टप "म्हणजे स्वर्ग, व त्याचा अपभ्रंश तिबेट होय. परंतु असा अर्थ करणें इलाइल म्हणजे विलायत, असा अर्थ करण्या प्रमाणेंच आहे. वस्तुतः तिबेट हा स्वर्ग नाहीं. इतकेंच नव्हे. तर भौम स्वर्गही नाहीं. कारण भरत वर्ष किंवा त्यांतील प्रदेश कर्मभूमि आहे असें पुराण स्पष्ट सांगतें." |
| २११ | १५ | असें जैन म्हणतात. "परंतु हा उत्तर पांचाल होय." |
| २१२ | २२ | दशारण्याच्या आसमंतातचा प्रदेश." हा तमसा व शोण या दोन नद्यांच्या मध्यें आहे." |
| २१९ | १६ | इंद्रप्रस्थ (दिल्ली) येथें राज्य "करूं लागला." या धीर धीरा स्फुर्ता—— |
| २२३ | ११ | पूर्वरे०७६ आहेत. "अशोकानें हा किल्ला बांधिला, त्याच वेळेस यास जवळच लागून असणारें वेरूळचें लेणींही त्यानें तयार केलें होतें. |

| पृ. | ओ. | |
|---|---|---|
| २२४ | ४ | राहणारा गांधर्व."गांधर्व ह्मणजे कळवंतिणीच्या मागील साजिंद्यां पैकीं तबलची तो. या शब्दाची प्रवृत्ति गुजराथ प्रांतांत आहे." हा संवत्१६७८ मध्यें होता. —— |
| २२७ | २५ | त्यांतील एक."श्लोक. सर्वज्ञः सुगतो बुद्धो धर्मराजस्तथागतः इत्यादि." |
| २३० | १८ | बाजीरावांकडून"दिल्ली येथें. |
| २३१ | ७ | परगण्याचा एक गांव. "२ गुजराथेंतही याच नांवाचा एक गांव आहे." |
| २३३ | १४ | गाणगापुरास होऊन गेले, "त्यांच्या पादुका येथें आहेत." |
| २३६ | ६ | आदळतें. "हा" लहानपणीं —— |
| २४९ | १६ | हें तुम्हांस "अनुभवास आलें आहे काय?" ——. |
| २५८ | १० | या मतांत ईश्वर मानीत नाहींत."म्ह० ईश्वर अगदीं नाहींच असा अर्थ नव्हे. तर ईश्वर आहे, परंतु तो मुख्य नाहीं. कारण, तो मायाधीन आहे. म्हणून मायाही प्रधान होय. आणि एवढ्याच कारणामुळें या शास्त्रास निरीश्वर सांख्य म्हणतात." सांख्य म्हणजे काय? —— |
| २५८ | २२ | या स्थळीं "शके १७९१ मध्यें निरालंबोपनिषदावर गद्यात्मक असें स्वतःचें ब्रह्मसत्र झालें होतें." |
| २६३ | १ | "इत्यादिक प्रमुख होते. यां पैकीं मेरुशास्त्री यांनीं मात्र न्यायशास्त्रावर एक ग्रंथ लिहिलेला आहे, आणि त्यामुळें त्यांचें नांव अक्षरक्रमांत लिहिलें आहे." अस्तु बाळाजीपंत दादा —— |
| २६३ | ७ | (बु०का० शो०) "हें पुराण भविष्यपुराणा प्रमाणेंच असेल असें मात्र कोणी समजूं नये." |
| २६५ | १६ | पांचालदेश म्हणतात."परंतु पुराणा प्रमाणें पांचालदेश निराळा आहे." |
| २६७ | १ | तेंच पुढें चंद्राचार्य "व" वररुचि "या दोन" पंडितांस —— |
| २६७ | ११ | होऊन गेल्यास सुमारें "३००० वर्षे" —— |
| २७० | ३ | "भागीरथीच्या कांठचें पाटना शहर तें. हें उत्तर अक्षांश २५ँ६ व पू० रे० ८५ँ वर आहे." —— |
| २७६ | ११ | (जैनग्रंथ) "परंतु हें वर्णन भारतावरून पाहतां चुकीचें आहे." |
| २८१ | १४ | वसविलें. "हें काश्मिराकडे आहे. (बु० शो०)." |

| पृष्ठ. | ओ. | |
|---|---|---|
| २८२ | ३ | पैशाची, "राक्षसी" आणि शौरसेनी —— |
| २८२ | ४ | ज्या प्राकृत "च्यार" भाषा त्यांतील एक. |
| २८५ | ६ | नेसत असतां "त्यानें" पूर्वी पाहिलेला —— |
| २८७ | २८ | त्याची राज्य "कार" कीर्द होती —— |
| २८९ | २३ | सारांश, "पुणें येथील लोकांचें" —— |
| २९८ | १५ | काश्मीरचा राजा. "कर्कोटकुळ म्हणजे कर्कोट नागापासून झालेला जो पुरुष त्या पासून वाढलेला क्षत्रिय वंश तो. (बु० का० शो०). |
| २९९ | २१ | कुटुंब जें हल्लीं विद्यमान आहे "तें" या कवीची कन्या होय. |
| ३०० | १३ | "जयदेव कविकृत संस्कृत भाषेंत." |
| ३०२ | १० | ते या कवींचा बहुमान राखीत. "या पालीगर राजाचें मूळ काय तें समजत नाहीं. यानें त्यांच्या आज्ञे वरून" —— |
| ३१२ | १६ | पुरंदरे, भानू "व मेहेंदळे" इत्यादिक लौकिकास आले. |
| ३१९ | २३ | सहज अनुमान होते. "अस्तु. नाना फडणविसास" —— |
| ३२० | १४ | मी "राजहंस" फिरतों कवडी समान. |
| ३२१ | १८ | आला. "दक्षिणेंतील" सरदारांचे तहनामे ठरले. —— |
| ३२१ | २५ | औत्तर– टीप. "उत्तरेचा पुत्र परीक्षित राजा तो." |
| ३२३ | १२ | याच्या मागें "याचा" दुसरा मुलगा. —— |
| ३२५ | १७ | "यांचें मूळचें नांव काय असेल तें असो. मात्र बिरबल हें नांव पडण्यास कारण झालें तें असें:- असें सांगतात कीं, हा प्रथम उज्जनी शहरच्या राजकन्येचा विश्वासू कारभारी होता. ही याची नेमणूक राजाकडूनच होती. हा कारभार करीत असतां शहरांत कोणी श्रीमान् सावकार होता. त्यास च्यार बीर साध्य असत. त्या बीरांनीं पाहिजे तेव्हां येऊन तो सांगेल तें काम करावें. अशी कांहीं त्याजवळ अपूर्व जिन्नस होती. तिच्या बळानें तो बीरांकडून राजकन्येस आपल्या महालांत नित्य आणवी. व तिला आपली पापवासना प्रदर्शित करी. त्या योगानें राजकन्या झुरणीस लागून तिनें ती गोष्ट यास कळविली. तिच्या यानें पत्ता लाविला असतां, सावकारानें भिऊन ती जिन्नस यास दिली. |

| पृ. | ओ. | |
|---|---|---|
| | | तेव्हां पासून राजकन्या निर्भय होऊन तेच बीर यास साध्य झाले व हा बीरबल नांव पावला. हा संस्कृत व फारसी या दोनी विद्यांत निपुण असून आत्याचु चतुर होता. तशांत राजकन्येच्या शिफारसी वरून राजानें यास आपला प्रधान केलें. पुढें हा आपल्या चातुर्यानें प्रख्यातीस आल्या वरून अकबर बादशाहानें यास राजापासून मागून घेऊन आपला प्रधान केलें." |
| ३२५ | १२ | हा हजरजबाबी तर नांवाजण्या सारखा होता. एकदां असें सांगतातकीं;— |
| ३२६ | २३ | ग्रंथांतील प्रस्तावनेंत जो "थोडा मजकूर" आहे, तो वाचकांस— |
| ३२७ | ६ | याचें जुनें नांव दशार्ण अथवा दशारण्य "होय." हा तमसा नदी— |
| ३२७ | ७ | मध्यें आहे." परंतु हाल्लीं हाच मुख्य होऊन दशार्ण हा त्यांतील एक प्रदेश झाला आहे. असें नकाशांत जें याचें सध्या नांव लिहिलें आहे, त्यावरून दिसून येतें." |
| ३४६ | ५ | (संक्षेप जि०) "याचा शक ८९० वर्षे चालला" असें जरी वर लिहिलें आहे तरी युधिष्ठिर शकाचीं बंद पडलेलीं १३ वर्षे याच्याच शकांत धरावीं लागतात आणि त्यामुळें याचा शक ९०३ वर्षे म्हणावा लागतो." |
| ३५८ | २१ | सूर्योदय व सूर्यास्त होतो" तो हल्लीं प्रमाणें कधींच न होता"— |
| ३६१ | ५ | श्रीधर कवीचा गांव. "हा काश्मिराकडे आहे." |
| ३८६ | २१ | आधींचा ग्रंथकार आहे. "महेश्वर भट्टी हा ग्रंथ याचा असें ऐकण्यांत येतें. परंतु महेश्वरभट्टी व धर्माब्धि एकच कीं कसें त्या विषयीं अजून आम्हांस शोध नाहीं." |
| ३९१ | २० | कारण जें "पांचरात्र नामक" परम मत त्याचा मी स्वीकार करून— |
| ४०३ | २५ | कविता आहे (क० च०)." हिनें आपल्या इतर भावंडां प्रमाणेंच लग्न केलें नव्हतें." |
| ४०४ | १५ | "हें काव्य कालीदासकृत आहे. यावर वल्लभदेवकृत संस्कृत टीका असून पद्यरूप असें मराठींत याचें भाषांतर कै० वे. कृष्णाशास्त्री चिपळूणकर यांनीं केलें आहे." |
| ४१० | १५ | धौषनाश्व इत्यादि "शककर्ते" राजे होऊन गेल्यावर.— |

| पृ. | ओ. | |
|---|---|---|
| ४१३ | २३ | “वेरूळचें लेणें तयार झालें. क्षेमकास त्याच्या वीरसेन प्रधानानें मारिलें.”— |
| ४१४ | १४ | “योगानंद” या शब्दावर आह्मीं सामान्यतः माहिती दिली आहे. परंतु यांच्या शिष्यवर्गांपैकीं एकानें “योगानंदविजय” नांवाचें काव्य संस्कृत भाषेंत केलें आहे; त्यांत यांचें ठिकाण, काल, विद्वत्ता, स्वभाव व कविताशक्ति इत्यादिकां विषयीं सविस्तर वर्णन आहे. त्यांतील कांहीं मासले येथें घेतों:—<br><br>श्लो॰ प्रहर्षिणीवृत्तं<br><br>*स्थानविष॰* यस्यासीन्ननु कनकापणप्रसिद्धं हेमाढ्यं निवसनभूः स्कपत्तनं तत् ॥ गोदाया विमलतरैः पयोधिभंगैरास्पृष्टं बहुलगु वाजिराजिपूर्णं ॥३॥<br><br>*पूर्वाश्र॰ नांव* वसंततिं॰॥ ॥तत्राभवद्द्व इवाति विरक्तचित्तः ख्यातो गिरांपतिरिव श्रुतिसारवक्ता ॥ ज्योतिर्विदां कुलशिखामणि रीड्यकीर्ती रामः सखे स्कपपदेन विराजमानः॥७॥ सब्रम्हचर्यसमधीत<br>*वर्तनावि॰* षडंग वेदो निर्वर्तितक्रिय उतैष गृहेषु तिष्ठन् ॥तीर्थावगाहभिषतो धृतवन्यचर्यः संन्यासमुत्तरवयस्युररीचकार॥८॥<br><br>*विद्वत्तावि॰* शालिनी॰॥ ॥वेदाध्येता पैलवत्सैव बुद्धिस्तद्व्याख्याने केवलं शंकरार्यः॥ यः पौराण्यां व्याकृतौ व्यास एव ज्योतिःशास्त्रे चापरो भास्करोऽभूत् ॥१०॥<br><br>*संन्या॰आ॰वि॰* शालिनी॰॥ ॥यश्चैवग्र्यं वर्षशत्याप्यपार्यं चत्वारिंशद्भायनैस्तत्समाप्य॥ आगत्यासौ पंढरीं पुण्यभूमिं तुर्यं भेजे त्वाश्रमं त्यक्तकामः॥१२॥<br><br>*ग्रंथ केले त्यावि॰* मंदाक्रांता॰॥ अष्टावक्रं जगति सरली कृत्य यः कृत्यमुक्तो ग्रास्थेचाङ्गैरपि विरचयामास रामेश गीते॥ प्रासोद्बोधं सपदि कृतवान्पंचदश्यर्थकोशं नूत्नान्ग्रंथानपि स विदधे ग्रंथिभेत्ता दयालुः॥१३॥ |
| ४१७ | १९ | नांवाचा “संस्कृत” ग्रंथ आहे. |
| ४१७ | २० | शांकरपादभूषण नांवाचाही “दुसरा मोठा संस्कृत ग्रंथ आहे. शिवाय |

| पृ. | ओ. | |
|---|---|---|
| | | भगवद्गीतेवर मराठींत गद्यरूपानें भावार्थदीपिका नावाची एक टीका आहे." हे शके १७८९ मध्यें मरण पावले. |
| ४१७ | २८ | सुरथ राजाचा बाप. "व रुमित्राचा आजा." |
| ४१८ | ७ | संजय राजाचा बाप. शाक्य व शुद्धोद ते याचे क्रमानेंच नातू व पणतु: होते. |
| ४१९ | ६ | हल्लीं सोलापूर येथें जे "राळे रासकर" आहेत त्यांचा मूळ पुरुष. —— |
| ४२१ | २५ | (बु० का० शो०) "भक्तमाल ग्रंथाच्या आधारानें जसा भक्तविजय, त्या प्रमाणेंच हा समजावा." |
| ४३३ | ४ | विष्णुसहस्रनाम. " हें व्यासकृताहून निराळें समजावें."—— |
| ४४० | २ | एक मोठें तळें बांधिलें. "परंतु तें बांधलें कोठें तें समजत नाहीं." त्या सभोंवतें —— |
| ४४० | ९ | कलियुगांतील शुद्धोद राजाचा पुत्र व "प्रसेनजित राजाचा बाप." |
| ४५९ | १७ | कर्त्ता. "जो माधवाचार्य त्याचा गुरु." |
| ४७५ | १० | चालू न होतां "मुख्यत्वानें" सर्वत्र —— |
| ४७५ | २२ | (आत्म पु० प्र०) "या पुढें आनंदगिरीनें आचार्यांचा जन्मवृत्तांत येणें प्रमाणें लिहिला आहे." |

# पुरवणीचें परिशिष्ट.

| पृष्ठ | ओळ | |
|---|---|---|
| ४४१ | ३ | लीलावती ग्रंथा बद्दल लोकांमध्यें एक असा ग्रह आहे कीं, जो कोणी हा ग्रंथ पढतो त्याचा निर्वंश होतो, दरिद्र येतें व त्यास वेड लागतें. परंतु ह्या सर्व कल्पना भ्रांतिमूलक आहेत. झाडास पानें किती व भिंतीत विटा किती आहेत हें लीलावती वरून बिनचूक मुळींच सांगतां येत नाहीं, परंतु दाळिंब वगैरे फळें न फोडतां त्यांतील दाणे हे व धान्याच्या राशी वरून हें धान्य किती आहे हें मात्र सांगतां येतें. |
| ४४५ | २२ | वल्लभ मतांतील आणि इतर कित्येक मतांतील ज्या कांहीं अशा प्रकारच्या वगैरे गोष्टीं लिहिल्या आहेत. त्यांजवर आह्मीं अभिप्राय न दिल्यामुळें, त्या आह्मांस मान्य आहेत असें कोणीं समजूं नये. |
| ४५७ | १३ | आहेत "हें शहर हल्लीं कलादगी जिल्ह्या खालीं आहे" |
| ४६१ | १८ | खंडन केलें आहे "व सूर्य हा पृथिवीच्या वरचे वर अंतरिक्षांत मेरूसभोंवता फिरतो असें प्रतिपादन केलें आहे." हा यज्ञेश्वर ------ |
| ४६१ | २० | केला होता "सुब्बाजी बापु हे भाळव्यांतील शिहूर येथील संस्कृत पाठशाळेवरील मुख्य पंडित होते. यानीं सिद्धांतशिरोमणिप्रकाश या नांवाचा ग्रंथ लिहून त्यांत पुराणमताचें खंडन व इंग्लिश भूगोल मताचें प्रतिपादन केलें होतें. व इलावृत्त ह्मणजे विलायत, मद्र देश ह्मणजे माद्रीद शहर इत्यादिक विलक्षण तर्क केले होते. त्यांचें यांत खंडन केलें आहे" हा |
| ४६२ | २१ | (ललित विस्तर) दुसरा बुद्ध युधिष्ठिर शकाच्या १३१२ व्या वर्षीं झाला होता. हें सर्व प्रसिद्ध आहे. ह्मणून त्याचा पंतोजी ही त्याच वेळचा हें उघड आहे. |
| ४६३ | ११ | लेलें आहे "तें संभाषण बरेंच लांब आहे. तथापि तें येथें थोडक्यांत सांगणें आवश्यक दिसतें. कारण, त्या वरून यांचें ज्ञान कसे तऱ्हेवर गेलें होतें, तें न सांगितल्यास ध्यानांत येणार नाहीं. शके १७७९ मध्यें आह्मांस कोणी एका गृहस्थानें मुंबईस नेलें होतें. तेव्हां यांच्या आमच्या भेटी होऊन संभाषण चालल्या वेळीं, एक गोष्ट सहज अशी घडून आली कीं, कोणी |

| पृ. | ओ. | |
|---|---|---|

प्रभु जातींचा गृहस्थ येऊन त्यानें आमचें भाषण संपतांच बावांस असा प्रश्न
केला कीं, आपण पूर्वी भावार्थसिंधु नांवाचा जो ग्रंथ पद्यात्मक लिहिलात.
त्यांत आपण – ॥ विष्णु ह्मणे सखाराम ॥ माझा गुरु पूर्णकाम ॥ तयांचे कृपा
पावलों परम ॥ सहजात्मैक्य आपुलें ॥ – अशी लिहिलेली ओंवी, हल्लींच्या
वेदोक्तधर्मप्रकाश ग्रंथांत सदरचा ग्रंथ जोडतांना गाळलीत त्याचें कारण का-
य? यावर बावा बोलले. ज्यां विषयीं आह्मीं ती ओंवी लिहिली होती त्यां-
चें आमचें अलीकडे बनेनासें झाल्यामुळें आह्मीं त्यांचा त्याग केला आहे.व
ह्मणूनच ती ओंवी आह्मी गाळली आहे आणि यास उदाहरण याज्ञव-
ल्क्याचें आह्मी प्रमाण धरिलें आहे. असें एकून तो गृहस्थ तर कुंठित झा-
लाच. परंतु बावांनें हें गुप्त भांडवल आह्मांस स्पष्ट करून दाखविल्यानें त्याचें
अतिशय आश्चर्य वाटलें. पुढें तो गृहस्थ कांहीं बोलत नाहीं व बावांनीं
त्यास दिलेलें उत्तर यथार्थ नाहीं असें पाहून, आमच्यानें बोलल्या वांचून
राहवेना, ह्मणून आह्मीं बावांस पुसलें कीं, आपले गुरु ब्रह्मनिष्ठ होते किं-
वा नाहीं? होते तर त्यांपासून तुह्मास स्वकीय रूपाचें ज्ञान प्राप्त होऊन
तुमचें समाधान पूर्ण झालें आहे कीं नाहीं? झालें असें तुह्मी ओंवींत
कबूल करीत आहां, त्या अर्थी तुह्मास नाहीं ह्मणतां येत नाहीं. बरें असें
जर आहे, तर तुह्मी याज्ञवल्क्याचें दिलेलें प्रमाण कसें लागू पडतें?
याज्ञवल्क्यानें गुरूचा त्याग जो केला, तो त्यापासून ब्रह्मविद्या संपा-
दन करून त्यानंतर त्यानें केला असें मुळींच झालें नाहीं. ती गोष्ट वेदाध्य-
यन संबंधानें झाली असून तीही स्वतः याज्ञवल्क्यानें आपल्या इच्छे-
नें केली नाहीं. तर गुरूनींच स्वकीय इच्छेनें त्याचा त्याग केला. वास्त-
व तुह्माकडून जो गुरूचा त्याग घडला तो केवळ तुमच्या इच्छेनें घड-
ला असें होतें व तो त्याग ब्रह्मविद्या संबंधानें दिसतो. वास्तव ही गो-
ष्ट तुह्मांकडून अत्यंत अनुचित घडली—" ज्ञानहीनो गुरुस्त्याज्यः "
" ऐसे गुरु अडक्याचे तीन ॥ मिळाले तरी टाकावे " – इत्यादि वचनां
वरून ब्रह्मविद्या ज्ञानशून्य जो गुरु त्याचा मात्र त्याग उक्त आहे. तुमचें
तसें झालें नाहीं. तुह्मी त्यांची ब्रह्मनिष्ठता कबूल करून त्यांच्या कृपेनें

| पृ. | ओ. | |
|---|---|---|
| | | समाधान झाल्याचें ही कबूल करतां आणि केवळ आपल्या इच्छेनें त्यांचा त्याग करतां या तुमच्या ज्ञानास काय ह्मणावें? — "ऐसे जे का पापरूप ॥ दीर्घद्वेषी वज्रलेप ॥ तयांस प्रायश्चित्त अनुताप ॥ उद्भवतां आहे ॥ १ ॥ तेहीं पुन्हा शरण जावें ॥ सद्गुरूस संतोषवावें ॥ कृपा झालिया व्हावें ॥ पुनः शुद्ध" ॥ २ ॥ दासबोध ॥ — असें न कराल तर या प्रमाणें होईल — गुरुत्यागाद्भवेन्मृत्युर्मंत्रत्यागाद्दरिद्रता ॥ गुरुमंत्र परित्यागी रौरवं नरकं व्रजेत् ॥ — इतकें बोलून आह्मी उठलों. ही गोष्ट आह्मी मोघम ठेविली होती, तिचें कारण यांत स्वप्रशंसा होती. हल्लीं आह्मांस या बद्दल एका गृहस्थानें पत्र लिहिलें. त्यावरून निरुपाय होऊन ती येथें लिहिली. |
| ४६६ | ४. | संस्कृत भाषेंत "हें सहस्रनाम भारतोक्त सहस्रनामाहून निराळें आहे." |
| ४८९ | १६ | शबर स्वामीचा काल निर्णय आह्मांस सांपडला नाहीं |
| ४९२ | १९ | येथें अशी शंका होईल कीं, पैठणापासून नर्मदे पर्यंत शालिवाहनाच्या सैन्यास दुसरी नदी आढळलीच नाहीं कीं काय? त्यास असें समजावें कीं, नद्या पुष्कळ आढळल्या असतील. परंतु त्यांत विशेष पाणी नसेल आणि त्यामुळें सैन्यास त्यांच्या पार जाण्यास अडचण पडली नसेल. किंवा दुसरें असें कीं, नर्मदे पर्यंतच शालिवाहनाचा शक चालावा अशी ईश्वरेच्छा असल्यामुळें, तसें झालें असावें. असें ह्मटलें पाहिजे. |
| ५०२ | १२ | लिहिले आहेत "गोरखपुरा जवळच कपिलवस्तु शहर प्राचीन नकाशांत सांपडतें. त्या कपिलवस्तुशहराच्या वायव्येस श्रावस्ती नगरी आहे. परंतु ही नगरी हल्लींच्या चालू नकाशांत सांपडत नाहीं. यास्तव गोरखपुरावरून त्याचा निर्णय करावा. |
| ५०२ | १९ | श्रीकंठदेश ह्मणजे काश्मीर देश असावा कारण श्रीहर्षराजा त्यांत राज्य करीत होता. |
| ५१८ | ३ | कसई हिंदु असतात असें भक्तिविजया वरून समजतें. अर्थात् खाटीक ह्मणजे कसाब असा अर्थ करून; कसाबास गायधारजिणी ही लोकांतील ह्मण सार्थ करावी. कसई आणि कसाब या दोहोंत विशेष अर्थभेद असेलसे आह्मांस वाटत नाहीं. परंतु कसई हिंदु अस- |

| पृ. | ओ. | |
|---|---|---|
| | | तात हा जो समज़ मागून चालत आला आहे. त्यावरून कसाब (खाटीक) हे यवन असतात असें समजण्यास हरकत नाहीं. |
| ५१३ | १९ | आणिला आहे ". तो असा कीं, वल्लभाचार्यांच्या हजारों संमदायिकांस त्याकडून यानें ओढून घेऊन आपल्या मतांत सामील केलें 'आहे. व कःरीतही आहे. |
| ५२३ | १५ | करथराजाचा पुत्र " हा सूर्यवंशीय शेवटचा राजा असून श्रावस्ती नगरींत राज्य करीत होता-" |
| ५२५ | ३ | सूर्यसिद्धांताचें ममाण शंकराचार्यांनीं घेऊन पृथिवी सतत खालीं खालीं चालली आहे असें ह्मणणाऱ्या क्षपणिकाचें खंडन केलें ह्मणून असें दिसतें कीं, तो सिद्धांत त्यांस साकल्यें करून मान्य होता. ह्मणजे त्यांत लिहिलेल्या इतर गोष्टी, जशा सूर्यास चंद्र व चंद्रास पृथिवी आच्छादिते इत्यादिही मान्य होत्या; असें कोणी ह्मणेल तर असें अगदीं समजूं नये. श्रुति, युक्ति व अनुभूति या तिहींस जें जें अनुकूल तें तें मात्र घ्यावयाचें प्रतिकूळ घ्यावयाचें नाहीं; असा शंकराचार्यांचा नियम असल्यानें त्यांच्या भाष्यादिक ग्रंथावरून स्पष्ट दिसून येतें. |
| ५३६ | ७ | भरतखंड असें " अलीकडील नव्या विद्वानांचें ह्मणणें आहे." |
| | | प्रस्तावना पृष्ट १ ओळ २२ |
| | | भरत शक चालत होता. व तो " ९०३ " वर्षें चालला होता. |

